भारतरत्न म. म. डॉ. काणेकृत

# धर्मशास्त्राचा इतिहास

**(सारांशरूप ग्रंथ)**

**पूर्वार्ध**

लेखक

अनुवादक

**यशवंत आबाजी भट**

बी. कॉम.



भारतरत्न म. म. डॉ. काणेकृत

# धर्मशास्त्राचा इतिहास

(सारांशरूप ग्रंथ)
पूर्वार्ध

अनुवादक :
यशवंत आबाजी भट,
बी. कॉम.




महाराष्ट्र राज्य
साहित्य व संस्कृति मंडळ
१९६७

RS. 20.00

अनुक्रमणिका

# प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळाच्या विविध कार्यक्रमांपैकी एक कार्यक्रम अन्य भाषांतील ग्रंथांची भाषांतरे व अनुवाद प्रकाशित करणे हा आहे. ज्ञान हे विनिमयाने वाढते. जगातील सगळ्याच प्रौढ अवस्थेस पोचलेल्या संस्कृतींमध्ये विशेषतः पश्चिमी संस्कृतीमध्ये फार विशाल ग्रंथसंपत्ती निर्माण झाली व होत आहे. मराठी साहित्याला समृद्ध होण्याकरिता जगातील सर्व साहित्यामधील निवडक विचारसंपन्न व सुंदर साहित्याचा मराठीत अनुवाद करण्याची आवश्यकता आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळाने वरील उद्देश दृष्टीसमोर ठेवून गेल्या वर्षी भाषांतर समिती नेमली आहे. ही समिती भाषांतर किंवा संक्षिप्त अनुवाद करण्यास विविध भाषांमधील कोणते ग्रंथ स्वीकृत करावे यासंबंधी विविध योजना तयार करीत आहे. अत्यंत प्रगत अशा इंग्लिश भाषेतील व अन्य भाषांमधील ग्रंथांची निवड या समितीने केली आहे व त्यामध्ये तज्ज्ञांकडून वारंवार येणाऱ्या सूचनांच्या अनुसारानेही भर पडत आहे.

भाषांतर करणे ही क्रिया मूळ ग्रंथ लिहिणे या क्रियेइतकीच जबाबदारीची गोष्ट आहे. नामांकित ग्रंथ लिहिण्यास जसे परिश्रम घ्यावे लागतात तसेच भाषांतरासही घ्यावे लागतात. परंतु मूळ ग्रंथ लिहिणे व भाषांतर करणे या दोन प्रयत्नांची प्रक्रिया अत्यंत भिन्न आहे. विकासाच्या समान पातळीवर असलेल्या अत्यंत प्रगत झालेल्या इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, रशियन इत्यादि पश्चिमी भाषांमधील प्रतिष्ठित (classical) ग्रंथांचे एकमेकीत भाषांतर करणे सुद्धा फार जिकीरीचे काम असते. प्रत्येक भाषेची मूलभूत रचना पदपदार्थसंबंध, शब्दावली, म्हणी व उपवाक्यसंबंध यांत कमीजास्त विभिन्नता असते. कोणताही नामांकित वैचारिक प्रबंध किंवा कलात्मक निबंध संपूर्ण अभिप्रायाने भाषांतरित करणे हे जवळ जवळ अशक्य कोटीतले काम असते. उत्कृष्ट ललित साहित्याचे भाषांतर तर उभयभाषांमध्ये कितीही सामर्थ्यशाली असलेल्या विद्वानांनी केले तरी भाषांतर बरोबर झाले असे समाधान कधीच मिळत नाही. उदाहरणार्थ, शेक्सपियर व गटे यांचे जर्मन व इंग्लिश भाषांमध्ये प्रत्येक पिढीत अनुवाद करण्याचे प्रयत्न झाले परंतु नव्या पिढीला अशा उच्चतम कलाकृतींच्या नव्या भाषांतराची भूक रहातेच.

अर्धप्रगत देशामधील मराठी सारख्या भाषांमध्ये अत्यंत प्रगत पश्चिमी भाषांमधील वैचारिक व कलात्मक साहित्य भाषांतरद्वारा किंवा अनुवादद्वारा पुनः निर्माण करणे सांस्कृतिक विकासाच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे. पश्चिमी प्रगत भाषांमध्ये शेकडोच नव्हे तर हजारो ग्रंथ प्रतिवर्षी निर्माण होत आहेत. त्या प्रगत भाषांच्या साहित्याची, वैचारिक किंवा कलात्मक क्षेत्रात बरोबरी करणे हे आज तरी अशक्यप्राय दिसते. परंतु या अशक्य महान् उद्दिष्टाचा वेगाने पाठपुरावा करणेही तितकेच आवश्यक आहे. दीर्घकाळपर्यंत मागे रहावेच लागणार आहे. परंतु मार्गक्रमणा वेगाने करणे हे सर्वात वरिष्ठ असे सांस्कृतिक कर्तव्य आहे. आपल्या भाषांची रचना मागासलेली आहे, साहित्य मागासलेले आहे, कारण वैचारिक व कलात्मक निर्मितीचे सामर्थ्य अपुरे आहे. शब्द व वाक्यप्रयोग यांचा भयंकर तुटवडा आहे; कारण विचारांचाच तुटवडा आहे. नवे विचार व नवे शब्द यांची जुळ्या अपत्यांसारखी निर्मिती होत असते. परंतु त्यातल्या त्यात विचार व प्रतिभा शब्दनिर्मितीस प्रेरणा देतात. तसे पाहिले तर विचार अगोदर की शब्द अगोदर, याचे उत्तर विचार अगोदर असेच द्यावे लागते. विचाराची किंवा प्रतिभेची प्रक्रिया सुरू झाल्याशिवाय शब्दसरस्वतीचे उन्मेष आविर्भूत होऊ शकत नाहीत असा याचा अर्थ आहे. परकीय प्रगल्भ साहित्यामधील विचारांचा व प्रतिभेचा मराठी मन जसजसा अधिक मागोवा घेत जाईल तसतसे नवे शब्द व नवी वाक्ये अवतरतील. प्रथम या शब्दांना व वाक्यांना अर्थाभिव्यक्तीचे सामर्थ्य आलेले दिसणार नाही. ते

नवे शब्द व ती नवी वाक्ये कित्येकदा अर्थशून्य वाटतील कारण त्यांतील अर्थ अस्पष्ट असणार. शब्दांना व वाक्यांना अर्‍थ रूढीनेच प्राप्त होतो. शब्द व वाक्यांची रूढी म्हणजे शब्दांचा व वाक्यांचा वारंवार वापर.

पुढारलेल्या इंग्लिश साहित्यासारख्या विचारसमृद्ध साहित्यातील पुस्तकांची भाषांतरे व संक्षिप्त अनुवाद प्रकाशित करण्याचा कार्यक्रम साहित्य आणि संस्कृति मंडळाने आखला आहे. विस्तृत ग्रंथांचे भाषांतर करणे जेव्हा सोयीचे वाटणार नाही तेव्हा त्या ग्रंथांचे शब्दशः व वाक्यशः भाषांतर न करता सारांशरूपाने अनुवाद करावा असे साहित्य व संस्कृति मंडळाने ठरविले आहे.

सुप्रसिद्ध संस्कृत पंडित श्री. डॉ. पां. वा. काणे यांनी इंग्लिश भाषेमध्ये अनेक भागांमध्ये “History of Dharmashastra” हा प्रचंड ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्याचा संक्षिप्त अनुवाद श्री. य. आ. भट यांनी केलेला आम्ही प्रसिद्ध करीत आहोंत. हा अनुवाद मूळ लेखक श्री. काणे यांनी वाचून मान्य केला आहे.

वाई<br>दिनांक २१।४।६७ }

**लक्ष्मणशास्त्री जोशी**<br>अध्यक्ष<br>महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ

## अनुक्रमणिका

# अनुवादकर्त्याचे निवेदन

देवाच्या दयेने भारतरत्न महामहोपाध्याय डॉ. पांडुरंग वामन काणे ह्यांनी इंग्रजी भाषेत लिहिलेल्या 'History of Dharmashastra' ह्या विस्तृत आणि विद्वत्तापूर्ण ग्रंथाच्या मराठीमध्ये केलेल्या सारांश स्वरूपाच्या अनुवादाचा पूर्वार्ध मराठी वाचकांना सादर करण्याला मला फार आनंद होत आहे.

मूळ इंग्रजी ग्रंथ पुणे येथील भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट ह्या संस्थेने प्रसिद्ध केला आहे. ह्याकरिता हा मराठी अनुवाद त्या संस्थेची आणि म. म. डॉ. काणे ह्यांची अनुमति घेऊन केला असून तो महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळामार्फत प्रसिद्ध होत आहे. मराठी अनुवाद करण्याला अनुमति दिल्याबद्दल मी भांडारकर संस्था आणि म. म. डॉ. काणे ह्यांचा अत्यंत ऋणी आहे.

मूळ इंग्रजी ग्रंथाचे पाच खंड असून एकूण पृष्ठसंख्या ६००० च्या वर आहे. एवढ्या विस्तृत ग्रंथाचा संपूर्ण मराठी अनुवाद तयार केला होता, परंतु तो छापण्याचा योग आला नाही. तेव्हा महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाने सुचविल्यावरून हा मराठी अनुवाद सुमारे १२०० पानात तयार केला आहे. तसे करिताना मूळ ग्रंथातील बरेच भाग पूर्णपणे गाळावे लागले आणि निरनिराळ्या विषयांवरील विस्तृत विवेचनांत बराच संक्षेप करावा लागला. अशा गाळलेल्या भागांत : (१) मूळग्रंथातील टीपांमध्ये दिलेली निरनिराळ्या संस्कृत ग्रंथांतील अवतरणे, (२) परिशिष्टात दिलेली विस्तृत संस्कृत अवतरणे, (३) निरनिराळ्या खंडात दिलेल्या प्राचीन संस्कृत ग्रंथांच्या आणि ग्रंथकारांच्या याद्या, तसेच तीर्थांच्या, व्रतांच्या, प्रमुख राजकीय अधिकाऱ्यांच्या, उत्सवांच्या याद्या इत्यादिकांचा समावेश होतो. निरनिराळ्या संस्कृत ग्रंथांच्या संदर्भांमध्ये संक्षेप केला आहे. तथापि मूळ ग्रंथाचे सामान्य स्वरूप मराठी वाचकांना कळावे असा प्रयत्न केला आहे. ज्या जिज्ञासू वाचकांना अधिक माहिती आणि विस्तृत विवेचन पाहण्याची इच्छा असेल त्यांच्या सोयीकरता प्रत्येक प्रकरणाच्या आरंभी त्या प्रकरणात आलेली माहिती मूळच्या ग्रंथाच्या कोणत्या पानातून घेतली आहे ही माहिती दिली आहे. मूळ इंग्रजी ग्रंथाच्या निरनिराळ्या खंडांच्या शेवटी विस्तृत विषयसूची जोडलेल्या आहेत. प्रस्तुत ग्रंथाच्या उत्तरार्धाच्या अखेरीला थोडक्यात एक विषयवार सूची (Index) जोडण्याचा विचार आहे. मूळ संस्कृत आणि इतर ग्रंथांचे संदर्भ डॉ. काणे यांच्या इंग्रजी ग्रंथावरून दिले आहेत.

मूळ ग्रंथाचा उद्देश, त्यात आलेले विषय ह्यांच्यासंबंधी म. म. डॉ. काणे ह्यांनी निरनिराळ्या खंडांना लिहिलेल्या प्रस्तावनांतील थोडेसे उतारे पुढे देत आहे:—

### ग्रंथाचा उद्देश (खंड १ ची प्रस्तावना, ता. २८—८—१९२९)

"मी प्रसिद्ध केलेल्या व्यवहारमयूखाच्या आवृत्तीकरिता माहिती गोळा करीत असताना माझ्या मनात अशी कल्पना आली की धर्मशास्त्राचा त्रोटक इतिहास व्यवहारमयूखाच्या आरंभी जोडला तर तो धर्मशास्त्राचे अध्ययन करणाऱ्या भारतीय विद्यार्थ्यांना अतिशय उपयुक्त झाल्याशिवाय राहणार नाही. माझे धर्मशास्त्राचे चिंतन जसेजसे वाढत गेले तसेतसे मला असे आढळून आले की ह्या विषयावरील माहिती लहानशा प्रस्तावनेमध्ये समाविष्ट केल्याने त्या विषयाच्या समृद्धत्वाची आणि प्राचीनकाळची समाजरचना, तुलनात्मक

न्यायदानपद्धति आणि ज्ञानाच्या इतर शाखा ह्याच्या दृष्टीने धर्मशास्त्राच्या इतिहासाचे महत्व ह्यांची पुरेशी कल्पना येणार नाही. शेवटी मी धर्मशास्त्राचा इतिहास पूर्णपणे स्वतंत्र रीतीने प्रसिद्ध करण्याचा निश्चय मनात ठरविला."

## ग्रंथात येणारे विषय

"पहिल्याने माझा उद्देश धर्मशास्त्रासंबंधी कालानुक्रम आणि अत्यंत प्राचीन काळापासून त्या शास्त्रामध्ये समाविष्ट होणाऱ्या निरनिराळ्या विषयांच्या बाबतीत घडलेल्या परिवर्तनाचा इतिहास एकाच खंडामध्ये समाविष्ट करावा असा होता. तथापि, मागाहून कालानुक्रमाचा भाग एका स्वतंत्र खंडामध्ये प्रसिद्ध करणे मला इष्ट वाटले. धर्मशास्त्रात अंतर्भाव होणाऱ्या विवाह आणि इतर संस्कार, न्यायदानपद्धति आणि कायद्याची अंमलबजावणी, नित्यकर्मे, व्रते, श्राद्ध आणि आशौच ह्या विषयांचा वेदकालापासून आधुनिक कालापर्यंत कसकसा विकास झाला ह्यांचे वर्णन दुसऱ्या खंडामध्ये करण्याचे मी ठरविले."

## मराठी अनुवाद करण्याची इच्छा

"भारतामधील चालीरीतींमध्ये जे फेरबदल घडून आले आहेत त्यांच्या संबंधी, त्याचप्रमाणे भारतीय समाजरचनेमध्ये झालेल्या स्थित्यंतराविषयी आणि सामान्यतः कालानुक्रमाविषयी शास्त्रीवर्गात चमत्कारिक भावना प्रचलित आहेत आणि शास्त्रीवर्गाचे भारतातील सामान्य जनसमुदायावर फार मोठे वजन आहे ह्याकरिता ह्या ग्रंथाचे (संस्कृत भाषेत आणि) माझी मातृभाषा जी मराठी तिच्यामध्ये नजीकच्या भविष्यकाळी भाषांतर करण्याचा हेतु आहे आणि मला अशी आशा वाटते की शास्त्री लोकांनी जर हा ग्रंथ वाचला तर त्यांच्या दृष्टिकोनात इष्ट असा बदल होण्याचा संभव आहे."

## मूळ ग्रंथाचे वैशिष्ट्य (खंड २ ची प्रस्तावना ता. १५–६–१९४१)

"धर्मशास्त्राच्या विशिष्ट विषयांचे विवेचन करणारी उत्कृष्ट पुस्तके प्रख्यात विद्वानांनी जगाला सादर केली आहेत. तथापि, माझ्या माहितीप्रमाणे कोणत्याही एका लेखकाने समग्र धर्मशास्त्राची चिकित्सा करण्याचा आतापर्यंत प्रयत्न केलेला नाही. त्या दृष्टीने पाहिल्यास हा ग्रंथ त्या विषयावरील अग्रेसर ग्रंथाच्या स्वरूपाचा आहे.

अनेक युरोपियन आणि भारतीय ग्रंथकारांची अशी रूढी पडून गेली आहे की भारताला सांप्रतकाळी पीडा देणाऱ्या बहुतेक अनिष्ट गोष्टी जातिव्यवस्था आणि धर्मशास्त्रात वर्णन केलेला जीवनक्रम ह्यांच्यामुळे उत्पन्न झाल्या असल्याचे प्रतिपादन करावयाचे. बऱ्याच प्रमाणात मला हे मत मान्य नाही. मी असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे की मनुष्याचा स्वभाव महत्त्वाच्या बाबतीत सर्व जगभर एकसारखाच असल्याकारणाने भारतात उत्पन्न झालेल्या प्रकारच्याच अनिष्ट प्रवृत्ती आणि अनिष्ट गोष्टी सर्वही देशात उत्पन्न होत असतात आणि त्या देशात जातिव्यवस्था अस्तित्वात असली अथवा नसली तरीही तेथील मूळच्या उपयुक्त संस्थांची, कालांतराने भारतातल्याप्रमाणेच अनिष्ट अशी रूपांतरे होतात. जातिनिर्बंधामुळे काही विशिष्ट अनिष्ट परिणाम झाले आहेत ही गोष्ट मला मान्य केली पाहिजे; परंतु जातिव्यवस्था ही एकच बाब अशा स्वरूपाची नाही. कोणतीही समाजव्यवस्था पूर्णत्वाला पोचलेली नसते आणि अशा अनिष्ट परिणामापासून सुरक्षितही नसते. मी स्वतः जरी ब्राह्मणप्रमुख अशा समाजात वाढलो असलो तरी विद्वान

लोक एवढे मान्य करतील की मी सर्व प्रश्नांच्या साधक आणि बाधक अशा दोनही बाजू मांडल्या असून निःपक्षपातीपणाने प्रतिपादन करण्याचा प्रयत्न केला आहे."

"कायद्याचे आणि न्यायालयांतील निर्णयांचे जे अनेक उल्लेख ह्या ग्रंथात केले आहेत त्यांचा उद्देश असे दाखविण्याचा आहे की धर्मशास्त्रातील अनेक नियम अद्यापि हिंदू लोकांच्या नेहमीच्या आचरणात आहेत आणि धर्मशास्त्रातील बराच मोठा भाग जरी व्यवहारातून लुप्त झाला असला तरी अशा नियमांचा हिंदु समाजाच्या सर्व वर्गात शिरकाव झालेला आहे. हाच खुलासा शिलालेखांच्या आणि ताम्रपटांमधील लेखांच्या उल्लेखांना लागू पडतो. अशा शिलालेखांवरून आणि ताम्रपटांवरून असे सिद्ध होते की धर्मशास्त्रात सांगितलेले नियम केवळ ध्येयवादी अथवा विद्यासंपन्न पंडितांनी तयार केलेले आदर्श स्वरूपाचे नियम नसून दोन हजार वर्षांच्या संपूर्ण कालखंडात लोकांकडून अशा नियमांचे पालन केले जात असे आणि राज्यकर्ते त्यांची अंमलबजावणी करीत असत."

प्रस्तुत अनुवादाचे काम संपूर्णस्वरूपात आणि सारांशस्वरूपात एक तपाहून अधिक काळपर्यंत चालत आले आहे. ह्या दीर्घ कालात ज्या अनेक व्यक्ती आणि संस्था ह्यांचे मला साह्य झाले त्यांचे कृतज्ञतापूर्वक आभार मानून हे निवेदन पुरे करीत आहे.

द्वारा डॉ. नि. दा. लेले
ब्राह्मण वाडी, नौपाडा, ठाणे }

**यशवंत आबाजी भट**

———–—

## अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका

## म. म. डॉ. काणेकृत धर्मशास्त्राचा इतिहास– सारांश ग्रंथ

# ह्या ग्रंथात योजिलेल्या महत्त्वाच्या संक्षिप्तसंज्ञांचा अर्थ

| संक्षेप | अर्थ |
|---|---|
| अथर्व | अथर्ववेद |
| अर्थशास्त्र | कौटिलीय अर्थशास्त्र. |
| आप. ध. सू. | आपस्तम्बधर्मसूत्र. |
| आप. मं. पा. | आपस्तम्बमंत्रपाठ. |
| ऋ. | ऋग्वेद. |
| **ऐ.ब्रा.** | ऐतरेय ब्राह्मण. |
| कलिवर्ज्यवि. | कलिवर्ज्यविनिर्णय (हस्तलिखित). |
| कात्या. | कात्यायनस्मृतिसारोद्धार. |
| कात्या. श्रौ. | कात्यायनश्रौतसूत्र. |
| काम.<br>कामन्दक | } कामन्दकीयनीतिसार. |
| कृत्यर. | कृत्यरत्नाकर. |
| **कौ.**<br>कौटिलीय | } कौटिलीय अर्थशास्त्र. |
| गृह. र. | गृहस्थरत्नाकर |
| **गौ.** | गौतमधर्मसूत्र. |
| चतुर्वि. | चतुर्विंशतिमत. |
| छां. उप. | छान्दोग्य उपनिषद् |
| **जै.** | जैमिनीयपूर्वमीमांसासूत्र |
| जै. न्या. मा. | जैमिनीयन्यायमालाविस्तार. |
| तै. आ. | तैत्तिरीय आरण्यक. |
| तै. ब्रा. | तैत्तिरीय ब्राह्मण. |
| तै. सं. | तैत्तिरीय संहिता. |
| दत्त. चं. | दत्तकचन्द्रिका. |
| रा. ध. कौ.<br>राजध. कौ.<br>राजधर्मकौ. | } राजधर्मकौस्तुभ. |
| रा. नी. प्र.<br>राजनी. प्र.<br>राजनीति प्र. | } मित्रमिश्रकृतराजनीतिप्रकाश . |
| दत्त. मी. | दत्तकमीमांसा. |
| नारद. | नारदस्मृति. |
| नीति वा.<br>नीतिवाक्या. | } नीतिवाक्यामृत. |
| नीतिसार. | कामन्दकीयनीतिसार. |
| परा. मा. | पराशरमाधवीय. |
| पा. | पाणिनीय अष्टाध्यायी. |
| बुध.<br>बुधभू. | } बुधभूषण. |
| बृह. | बृहस्पतिस्मृति (निबंध ग्रंथातील अवतरणे) |
| बृह. उप. | बृहदारण्यक उपनिषद् |
| बृहत्सं. | बृहत्संहिता. |
| बौ. ध.<br>बौ. ध. सू. | } बौधायनधर्मसूत्र. |
| बौ. श्रौ. | बौधायन श्रौतसूत्र. |
| मद. पा. | मदनपारिजात. |
| मनु. | मनुस्मृति. |
| मिता. | विज्ञानेश्वरकृत-याज्ञ. वरील मिताक्षराटीका. |
| मीमांसाकौ.<br>मी. कौ. | } खण्डदेवकृत मीमांसाकौस्तुभ. |
| मेधा. | मनुस्मृतीवरील मेधातिथिकृत भाष्य. |
| या. अंथवा याज्ञ. | याज्ञवल्क्यस्मृति. |
| स. वि.<br>सर. वि. | } सरस्वतीविलास. |
| स्मृतिच. | स्मृतिचन्द्रिका. |
| स्मृति. मु. | स्मृतिमुक्ताफल. |
| मुंबई लॉ. रि. | रतनलाल आणि धीरजलाल यांचा मुंबई लॉ रिपोर्टर. |

अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| राज. र.<br>राजनीर. } | चण्डेश्वरकृत राजनीतिरत्नाकर. |
| वाज. सं.<br>वाज. सं. | वाजसनेयसंहिता. |
| वाज. सं. | वाजसनेयसंहिता. |
| वि. चि. | विवादचिन्तामणि. |
| वि. ता. | कमलाकरकृतविवादताण्डव |
| वि. र. | विवादरत्नाकर. |
| व्यव. त. | रघुनन्दनकृतव्यवहारतत्त्व. |
| व्य. नि.<br>व्यव. नि. } | व्यवहारनिर्णय. |
| व्य. प्र. | मित्रमिश्रकृतव्यवहारप्रकाश. |
| व्य. म. अथवा<br>व्य. मयूख } | व्यवहारमयूख. |
| व्य. मा. | व्यवहारमातृका. |
| व्य. सा. | व्यवहारसार. |
| शुक्र.<br>शुक्रनी. }<br>शुक्रनीति. | शुक्रनीतिसार. |
| सं. कौ. | संस्कारकौस्तुभ. |
| सत्या. श्रौ. | सत्याषाढश्रौतसूत्र. |

| | |
|---|---|
| भांडा. ओ. रि. इ. | भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे. |
| कलकत्ता लॉ. रि. | इंडियन लॉ रिपोर्टस्, कलकत्ता भाग. |
| सं. आ. | महाभारताची संशोधित आवृत्ती, पुणे. |
| दायभाग | जीमूतवाहनकृतदायभाग. |
| एपि. इं. | एपिग्राफिआ इंडिका. |
| फु. बें. | फुल बेंच. |
| हिर. गृ. सू. | हिरण्यकेशीय गृह्यसूत्र. |
| आश्व. गृ. सू. | आश्वलायन गृह्यसूत्र. |
| रॉ. ए. सो. | रॉयल एशियाटिक सोसायटी. |
| मूर. इंडि. अपीले | मूरकृत इंडियन अपीलांचा वृत्तान्त |
| पौ. ध. ग्रं. | पौर्वात्यांचे धर्मग्रंथ (Sacred Books of the East) संपादक मॅक्समुल्लर. |
| शत. ब्रा. | शतपथ ब्राह्मण. |

## प्रस्तुत ग्रंथामध्ये उल्लेख केलेल्या महत्त्वाच्या ग्रंथांचा आणि ग्रंथकारांचा

# कालानुक्रम

[विशेष सूचना— काही काल आणि विशेषतः प्राचीन ग्रंथांचे काल आनुमानिक आहेत. ]

| | |
|---|---|
| वैदिक संहिता, ब्राह्मणग्रंथ आणि उपनिषदे. वेदामधील काही सूक्ते ख्रि, पू. ४००० हूनही अधिक प्राचीन असण्याचा संभव आहे आणि काही उपनिषदे (प्रमुख आणि सर्वात प्राचीन समजल्या जाणाऱ्या उपनिषदांपैकी देखील काही उपनिषदे) ख्रि. पू. १००० नंतरची आहेत. | ख्रि. पू. ४००० ते ख्रि. पू. १०००. |
| निरुक्त | ख्रि. पू. ८०० ते ख्रि. पू. ५००. |
| प्रमुख श्रौतसूत्रे (आपस्तंब, आश्वालायन, बौधायन, कात्यायन, शांख्यायन, लाट्यायन, द्राह्यायन, सत्याषाढ) आणि काही गृह्यसूत्रे (आश्वलायन, आपस्तंब इ.) | ख्रि. पू. ६०० ते ख्रि. पू. ४००. |
| धर्मसूत्रे (आपस्तंब, गौतम, बौधायन, वसिष्ठ) आणि गृह्यसूत्रे (पारस्कर, बौधायन आणि दुसरी काही). | ख्रि. पू. ६०० ते ख्रि. पू. ३००. |
| पाणिनि. | ख्रि. पू. ६०० ते ख्रि. पू. ३००. |
| जैमिनीचे पूर्वमीमांसासूत्र. | ख्रि. पू. ५०० ते ख्रि. पू. २००. |
| कौटिल्याचे अर्थशास्त्र. | ख्रि. पू. ३०० ते ख्रि. पू. १००. |
| पतंजलीचे महाभाष्य. | ख्रि. पू. १५०. |
| मनुस्मृति. | ख्रि. पू. २०० ते इ. स. २००. |
| याज्ञवल्क्यस्मृति. | इ. स. १०० ते इ. स. ३००. |
| विष्णुधर्मसूत्र. | इ. स. १०० ते इ. स. ३००. |
| नारदस्मृति. | इ. स. १०० ते इ. स. ४००. |
| वैखानसस्मार्तसूत्र. | इ. स. २०० ते इ. स. ५००. |
| शबराचे जैमिनीसूत्रावरील भाष्य | इ. स. २०० ते इ. स. ५००. |
| बृहस्पतिस्मृति (अद्यापि उपलब्ध नाही) | इ. स. ३०० ते इ. स. ५००. |
| काही उपलब्ध पुराणे— वायु, विष्णु, मार्कंडेय, कूर्म, मत्स्य. | इ. स. ३०० ते इ. स. ६००. |
| कात्यायनस्मृति (अद्यापी उपलब्ध नाही) | इ. स. ४०० ते इ. स. ६००. |
| बृहत्संहितेचा कर्ता वराहमिहिर | इ. स. ५०५ ते इ. स. ५८७. |
| कुमारिलाचे तंत्रवार्तिक | इ. स. ६५० ते इ. स. ७५०. |
| अद्वैत मताचे थोर तत्त्ववेत्ते श्रीशंकराचार्य | इ. स. ७८८ ते इ. स. ८२०. |
| बहुतेक इतर स्मृति आणि काही पुराणे | इ. स. ६०० ते इ. स. ९००. |

अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीकाकार विश्वरूप | इ. स. ८०० ते इ. स. ८५०. |
| मनुस्मृतीवरील टीकाकार मेधातिथि | इ. स. ९००. |
| विज्ञानेश्वरकृत मिताक्षरा | इ. स. ११००. |
| लक्ष्मीधरकृत कल्पतरु | इ. स. ११०० ते इ. स. ११५०. |
| जीमूतवाहन | इ. स. ११०० ते इ. स. ११५०. |
| अपरार्क | इ. स. ११२५. |
| स्मृत्यर्थसार | इ. स. ११५० ते इ. स. १२००. |
| स्मृतिचंद्रिका | इ. स. १२०० ते इ. स. १२२५. |
| हरदत्त | इ. स. ११५० ते इ. स. १३००. |
| कुल्लूक | इ. स. ११५० ते इ. स. १३००. |
| हेमाद्रिकृत चतुर्वर्गचिंतामणि | इ. स. १२६० ते इ. स. १२७०. |
| चण्डेश्वर (गृहस्थरत्नाकर आणि इतर रत्नाकरांचा कर्ता) | इ. स. १३१० ते इ. स. १३६०. |
| पराशरमाधवीयाचे लेखक माधवाचार्य | इ. स. १३०० ते इ. स. १३८०. |
| मदनपारिजात | इ. स. १३६० ते इ. स. १३९०. |
| मदनरत्न | इ. स. १४२५ ते इ. स. १४५०. |
| रघुनंदन | इ. स. १५२० ते इ. स. १५७०. |
| कमलाकरभट्ट (निर्णयसिंधु आणि शूद्रकमलाकराचा कर्ता) | इ. स. १६१० ते इ. स. १६४०. |
| नीलकंठ (संस्कारमयूख आणि इतर मयूखांचा कर्ता) | इ. स. १६१५ ते इ. स. १६४५. |
| वीरमित्रोदयाचा कर्ता मित्रमिश्र | इ. स. १६१० ते इ. स. १६४०. |
| अनंतदेव (संस्कारकौस्तुभाचा कर्ता) | इ. स. १६५० ते इ. स. १६८०. |
| वैद्यनाथकृत स्मृतिमुक्ताफल | सुमारे इ. स. १६८६. |
| नागोजीभट्ट | इ. स. १७०० ते इ. स. १७५०. |
| बालंभट्टीचा कर्ता बालंभट्ट | इ. स. १७५० ते इ. स. १८२०. |
| काशीनाथकृत धर्मसिंधु | इ. स. १७९०. |

———

# धर्मशास्त्राचा इतिहास

## (संक्षिप्त मराठी अनुवाद)

## खंड १. धर्मशास्त्रावरील ग्रंथ व ग्रंथकार

## प्रकरण १

## धर्म शब्दाचा अर्थ

(मू. ग्रं. पा. १—४)

संस्कृत भाषेत असे काही शब्द आहेत की त्यांचा यथातथ्य अनुवाद दुसऱ्या कोणत्याही भाषेत करणे शक्य होत नाही. 'धर्म' हा अशापैकीच एक शब्द आहे. त्या शब्दाच्या अर्थाची अनेक परिवर्तने झाली आहेत. ऋग्वेदामधील सूक्तांमध्ये तो शब्द किमान ५६ वेळा आला असून सामान्यतः 'धर्मन्' ह्या नपुंसकलिंगी रूपात विशेषण अथवा नाम म्हणून योजलेला आढळतो. वैदिक भाषेच्या अति प्राचीनकाळच्या स्वरूपात धर्म ह्या शब्दाचा नेमका काय अर्थ होता हे सांगणे अवघड आहे. तो शब्द धृ=धारण करणे, आधार देणे, पोषण करणे ह्या धातूपासून बनला आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. ऋग्वेदामधील काही थोड्या वाक्यात तो शब्द धारण करणारा अथवा आधार देणारा अथवा पोषण करणारा ह्या अर्थाने योजिला असावा असे दिसते. काही वाक्यात

[पितुं नु स्तोषं महो धर्माणं तविषीम् । ऋ. १· १८७· १
ही ऋचा शुक्लयजुर्वेद ३४·७ मध्ये आली आहे.
इममञ्जस्पामुभये अकृण्वत धर्माणमग्निं विदथस्य साधनम् ।
ऋग्वेद १०·९२·२]

तो शब्द निःसंशयपणे पुल्लिंगी आहे. इतर सर्व ठिकाणी तो शब्द उघड रीतीने नपुंसकलिंगी योजिलेला असतो अथवा पुल्लिंगी अथवा नपुंसकलिंगी म्हणता येईल अशा रूपात योजिलेला असतो. बहुतेक सर्व ठिकाणी [ऋ. (१·२२·१८), (५·२६·६), (८·४३·२४), (९·६४·१) इत्यादि.] धर्मन् ह्या शब्दाचा अर्थ 'धर्मासंबंधी नियम अथवा धार्मिक विधि' असा असतो. काही वाक्यात

[आप्रा रजांसि दिव्यानि पार्थिवा श्लोकं देवः कृणुते स्वाय धर्मणे ।
ऋ ४·५३·३
धर्मणा मित्रावरुणा विपश्चिता व्रता रक्षेथे असुरस्य मायया ।
ऋ. ५· ६३· ७ इ.]

'धर्मासंबंधी नियम' हा अर्थ तेथील संदर्भाला जुळत नाही आणि अशा वाक्यात त्या शब्दाचा अर्थ 'आचरणाची निश्चित तत्त्वे अथवा नियम' असा असावा असे वाटते. वाजसनेयी संहितेमध्ये धर्मन् ह्या शब्दाचे

अनुक्रमणिका

अर्थ वरील सारखेच आढळतात. ऋग्वेदामधील ज्या ऋचात धर्मन् हा शब्द आला आहे त्यांच्यापैकी अनेक ऋचा अथर्ववेदामध्ये आल्या आहेत. अथर्व. '११.९.१७' मध्ये

[ऋतं सत्यं तपो राष्ट्रं श्रमो धर्मश्च कर्म च।

भूतं भविष्यमुच्छिष्टे वीर्यं लक्ष्मीर्बलं बले ॥ अथर्व ११·९·१७.] 'धर्मः' हा शब्द 'धार्मिक विधि केल्याने प्राप्त झालेले पुण्य' ह्या अर्थाने योजिला असल्यासारखे दिसते. ऐतरेय ब्राह्मणामध्ये

[धर्मस्य गोप्ताऽजनीति तमभ्युत्क्रुष्टमेवंविदभिषेक्ष्यन्नेतयार्चाभिमन्त्रयेत। ऐ. ब्रा. ७·१७.

धर्म हा शब्द 'धर्मासंबंधी कर्तव्यांचा संपूर्ण समुच्चय' अशासारख्या गूढ अर्थाने योजिला असावा. छांदोग्यउपनिषदात (२·२३) म्हटले आहे की "धर्माच्या तीन शाखा असतात. एका शाखेमध्ये यज्ञ, अध्ययन आणि दान ह्यांचा (म्हणजे गृहस्थाश्रमाचा) समावेश होतो; दुसऱ्या शाखेत तपाचा (म्हणजे वानप्रस्थाश्रमाचा) समावेश होतो; तिसऱ्या शाखेत आपल्या गुरूच्या घरी राहणारा आणि आमरणान्त गुरूच्या कुटुंबातील एक व्यक्ति म्हणून राहणारा ब्रह्मचारिन् ह्याचा समावेश होतो. ह्या सर्वांनाही पुण्यवानांचे लोक प्राप्त होतात. जो ब्रह्माच्या मध्ये राहतो त्याला अमरत्व प्राप्त होते." वरील अवतरणामध्ये धर्म हा शब्द 'आश्रमांची विशिष्ट कर्तव्ये' ह्या अर्थाने योजिला असल्याचे दिसून येईल.

वरील त्रोटक विवेचनावरून धर्म ह्या शब्दाच्या अर्थामध्ये निरनिराळे बदल कसे होत गेले आणि शेवटी त्या शब्दाला "आर्यांच्या समाजाचा एक घटक ह्या नात्याने आणि एका विशिष्ट जातीची आणि एका विशिष्ट अवस्थेत असणारी व्यक्ति ह्या नात्याने एखाद्या मनुष्याचे अधिकार, त्याची कर्तव्ये आणि त्याच्यावरील जबाबदाऱ्या" हा अत्यंत महत्त्वाचा अर्थ कसा प्राप्त झाला हे कळून येते. तैत्तिरीय उपनिषदात (१·११) विद्यार्थ्याला केलेल्या 'सत्यं वद, धर्मं चर' इत्यादी सुप्रसिद्ध उपदेशामध्ये धर्म हा शब्द ह्याच अर्थाने योजिला असल्याचे दिसते. भगवद्गीतेतील 'स्वधर्मे निधनं श्रेयः' (३·३५) ह्या सुपरिचित श्लोकामध्येही धर्म हा शब्द त्याच अर्थाने योजिलेला आहे. धर्मशास्त्रावरील ग्रंथांमध्ये तो शब्द त्याच अर्थाने योजिलेला असतो. मनुस्मृति (१·२) मध्ये असे सांगितले आहे की सर्व वर्णांचे धर्म आम्हाला शिकवा अशी ऋषींनी मनूला विनंती केली. याज्ञवल्क्यस्मृति (१·१) मध्ये धर्म ह्या शब्दाचा तसाच अर्थ आहे. तंत्रवार्तिकामध्ये (पृ. २३७) असे म्हटले आहे की सर्व धर्मसूत्रांचा उद्देश वर्णांचे आणि आश्रमांचे धर्म सांगणे हा असतो. मनुस्मृतीवरील आपल्या टीकेत मेधातिथीने वर्णधर्म, आश्रमधर्म, वर्णाश्रमधर्म, नैमित्तिकधर्म आणि गुणधर्म अशा पाच प्रकारच्या धर्मांचा उल्लेख केला आहे. प्रस्तुत ग्रंथामध्ये धर्म ह्या शब्दाचा अर्थ वरीलप्रमाणेच असल्याचे धरण्यात येईल. धर्मशास्त्र ह्या सदरात अनेक विषयांचा समावेश होतो, परंतु प्रस्तुत ग्रंथामध्ये आचार आणि व्यवहार (नियम आणि न्यायदान) ह्या विषयांवरील ग्रंथांना प्रामुख्य देण्यात येईल.

धर्म ह्या शब्दाच्या दुसऱ्याही काही व्याख्या अस्तित्वात आहेत. एक कुतूहलाचा विषय ह्या दृष्टीने त्यांच्यापैकी काही थोड्या व्याख्यांचा उल्लेख करता येईल. जैमिनीने पूर्वमी. सूत्र (१·१·२) मध्ये 'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः' (आज्ञास्वरूपाच्या वेदवचनांवरून ज्याचा बोध होतो तो धर्म) अशी व्याख्या दिली आहे. वैशेषिकांनी 'यतोभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः' (ज्याच्यापासून ऐहिक आणि पारलौकिक सुखाची प्राप्ती होते तो धर्म) अशी व्याख्या केली आहे. ह्याशिवाय 'अहिंसा परमो धर्मः' (अनुशा. ११५·१३), 'आनृशंस्यं परो धर्मः' (वनपर्व ३७३.७६), 'आचारः परमो धर्मः' (मनु. १·१०८) ह्यांच्या सारख्या दुसऱ्याही एकतर्फी स्वरूपाच्या व्याख्या आहेत. हारीताने धर्माची व्याख्या 'श्रुतिप्रमाणकः' (वेदावर आधारलेला) अशी केली आहे.

अनुक्रमणिका

धर्मशास्त्राच्या इतिहासाचे दोन मुख्य भाग पडतात : पहिल्या भागामध्ये धर्माच्या विषयावर लिहिलेले ग्रंथ आणि त्यांचे कर्ते ह्यांची माहिती (कालनिर्णय), त्यांतील विषय, त्यांचे परस्परावलंबित्व, त्यांचा त्यांच्यानंतर झालेल्या ग्रंथांवर आणि ग्रंथकारांवर झालेला परिणाम ह्यांचा समावेश होतो आणि दुसऱ्या भागामध्ये धर्म ह्या शब्दाने जे दाखविले जाते त्याचे म्हणजे वर्णधर्म, आश्रमधर्म, प्रभृति निरनिराळे धर्म, तात्त्विक सिद्धान्त, देवपूजा, पुनर्जन्म वगैरे सर्व गोष्टींचा समावेश होतो.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण २

## धर्माची आधारस्थाने

(मू. ग्रं. पा. ४—१०)

वैदिक धर्मासंबंधी माहिती कोणकोणत्या ग्रंथांवरून कळते; त्या ग्रंथांत कोणकोणते विषय आले आहेत, त्या ग्रंथांचा कालानुक्रम कसा आहे ह्या आणि तदनुषंगिक इतर गोष्टींचा विचार ह्या खंडात करावयाचा आहे. ही साधनसामग्री अत्यंत विस्तृत आहे आणि त्यामुळे केवळ काही निवडक ग्रंथांसंबंधी आणि काही ग्रंथकारांसंबंधी विवेचन करण्यात येईल.

मनुस्मृतीमध्ये [वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदाम् । आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव च ॥ मनु. २·६.]धर्माची पाच आधारस्थाने सांगितली आहेत. "धर्माचा सर्वात श्रेष्ठ आधार संपूर्ण वेद होय, त्याच्या खालोखाल ज्यांना वेदांचे ज्ञान आहे अशा लोकांची परंपरा आणि आचार हे धर्माचे आधार असतात; त्यांच्यानंतर सदाचारसंपन्न लोकांची रूढी हा धर्माचा आधार असतो आणि शेवटी स्वतःच्या मनाचा संतोष हा धर्माचा आधार असतो." वेद, स्मृति, सदाचार, स्वतःला इष्ट वाटणारे आचरण आणि पूर्ण विचारान्ती उत्पन्न होणारी कामना ह्या गोष्टी धर्माची आधारस्थाने असल्याचे परंपरेने मानण्यात येते असे याज्ञवल्क्यानेही[श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः । सम्यक् सङ्कल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम् ॥ याज्ञ १·७.]

म्हटले आहे. ह्या सर्वांवरून वेद, स्मृति आणि शिष्टाचार हे धर्माचे मुख्य आधार आहेत ही गोष्ट स्पष्ट होते.

वेदवाङ्मयामध्ये निरनिराळ्या वेदांच्या संहिता, ब्राह्मण, आरण्यके, उपनिषदे आणि निरुक्त प्रभृति वेदांगे ह्यांचा समावेश होतो. धर्माच्या बाबतीत अमुक गोष्ट करावी अथवा अमुक गोष्ट करू नये असे विधिनिषेधपर नियम वेदामध्ये सुसंगत रीतीने सांगितलेले नाहीत. परंतु धर्मशास्त्रात ज्या विषयांचा अंतर्भाव होतो असे वेदांच्या नंतरच्या काळात मानण्यात येऊ लागले अशा विषयांसंबंधीचे बरेच उल्लेख वेदामध्ये वर्णनाच्या ओघात आलेले आहेत. उदाहरणार्थ, विवाहाचे निरनिराळे प्रकार, निरनिराळ्या प्रकारचे पुत्र, संपत्तीची विभागणी, वारसा, श्राद्ध, स्त्रीधन या विषयांवरील उल्लेख वेदामध्ये पुष्कळ सापडतात. जिला बंधु नाही

अशा कुमारिकेला पति मिळणे कठिण जात असे अशा अर्थाची वचने ऋग्वेद, [ऋ. १· १२४· ७, अथर्व. १· १७. १, निरुक्त ३· ४-५.] अथर्ववेद आणि निरुक्त ह्या ग्रंथांत आली आहेत आणि बंधु नसलेल्या कन्येबरोबर विवाह करू नये असा जो नियम धर्मसूत्रात आणि याज्ञवल्क्यस्मृतीसारख्या [अरोगिणीं भ्रातृमतीमसमानार्षगोत्रजाम् । याज्ञ. १· ५३.] स्मृतीत सांगितला आहे त्याचे बीज अशा वेदवचनात आहे. ऋग्वेदातील (१०·८५) हे सूक्त विवाहाच्या बाबतीत फार महत्त्वाचे आहे आणि त्या सूक्तामधील मंत्रांचा सांप्रतकाळी देखील विवाहविधीमध्ये उपयोग करितात. त्या सूक्तावरून असे दिसून येते की ज्या प्रकारच्या विवाहाला धर्मसूत्रात आणि मनुस्मृतीत ब्राह्मविवाह अशी संज्ञा दिली आहे त्या प्रकारच्या विवाहविधीशी प्राचीन वेदकाळी प्रचलित असणारा विवाहविधी महत्त्वाच्या बाबतीत जुळता होता. तसेच वधू विकत घेणे (आसुर विवाह [मैत्रा. सं. (१·

अनुक्रमणिका

१०· ११).]), कन्येने अनेक पुरुषांमधून आपला प्रियकर निवडून काढणे (गांधर्व विवाह [भद्रा वधूर्भवति यत्सुपेशाः स्वयं सा मित्रं वनुते जने चित् ।
ऋ. १०· २७·१२.])

ह्यांचेही उल्लेख वेदवाङ्मयात आले आहेत. औरस [नहि ग्रभायारणः सुशेवोऽन्योदर्यो मनसा मन्तवा उ । ऋ. ७· ५· ८·] पुत्र, दत्तक पुत्र, क्षेत्रज पुत्र ह्यांचेही उल्लेख वेदामध्ये आले आहेत. 'औरस पुत्र आपल्या पित्याची संपत्ती स्वतःच्या भगिनीला देत नाही' असे ऋ. (३·३·१२) म्हटले आहे. ऋग्वेदामध्ये [ब्रह्मचारी चरति वेविषद्विषः स देवानां भवत्येकमङ्गम् ।
ऋ. १०· १०९· ५·]

ब्रह्मचर्यदशेची महती वर्णन केली आहे. पंचमहायज्ञांची नावे तैत्तिरीय
[पञ्च वा एते महायज्ञाः सतति प्रतायन्ते सतति सन्तिष्ठन्ते
देवयज्ञः पितृयज्ञो भूतयज्ञो मनुष्ययज्ञो ब्रह्मयज्ञः । तै. आ. २· १०· ७·]

आरण्यकात दिली आहेत. गाई, घोडे, सुवर्ण आणि वस्त्रे ह्यांच्या दानांची ऋग्वेदात
[उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण । इ०
ऋ. १०· १०७· २·]

प्रशंसा केली आहे. केवळ स्वतःकरिताच अन्न शिजविणाऱ्या मनुष्याची ऋग्वेदात [केवलाघो भवति केवलादी । ऋ. १०· ११७· ६·] निंदा केली आहे.

धर्मसूत्रात आणि मागाहूनच्या काळात झालेल्या धर्मशास्त्रावरील दुसऱ्या ग्रंथांत जे नियम समाविष्ट केले आहेत त्यांचे मूळ अशा रीतीने अत्यंत प्राचीन अशा वेदकाळातील परंपरेमध्ये खोलपर्यंत गेलेले होते. तथापि धर्मशास्त्रावरील एखाद्या सुसंगत ग्रंथाप्रमाणे ह्या गोष्टींचे विवेचन करण्याचा वेदाचा उद्देश नव्हता. त्या ग्रंथात धर्माच्या निरनिराळ्या अंगांसंबंधी सुटी सुटी वचने आलेली आहेत. धर्मशास्त्रात अंतर्भूत होणाऱ्या विषयांचे व्यवस्थित आणि सुसंगत विवेचन धर्मसूत्रांत आणि स्मृतिग्रंथांत सापडते.

सध्या उपलब्ध असलेल्या धर्मासंबंधीच्या वाङ्मयामध्ये वेदांच्या खालोखाल प्रथम स्थान धर्मसूत्रांना आहे. धर्मसूत्रांनंतर मनु आणि याज्ञवल्क्य ह्यांच्या सारख्या प्राचीन श्लोकबद्ध स्मृतींचा क्रम लागतो. नारदस्मृतिसारखे पुष्कळ स्मृतिग्रंथ उपलब्ध आहेत आणि बृहस्पतिस्मृति, कात्यायनस्मृति ह्यांच्या सारखे पुष्कळ स्मृतिग्रंथ सध्या उपलब्ध नसून त्यांची माहिती इतर ग्रंथांतील त्यांच्यामधील अवतरणांवरूनच मिळते. स्मृतींच्या नंतर रामायण आणि महाभारत ह्या दोन आदि काव्यांचा आणि भागवत प्रभृति इतर पुराणांचा क्रम लागतो. हे ग्रंथ कमी अधिक प्रमाणावर अधिकृत मानले जातात. त्यांच्या नंतर महत्त्वाचे मानले जाणारे ग्रंथ म्हणजे स्मृतिग्रंथांवर विश्वरूप, मेधातिथि, विज्ञानेश्वर, अपरार्क ह्यांच्या सारख्या ग्रंथकारांनी केलेल्या टीका आणि भाष्ये आणि हेमाद्रि, नीलकंठ प्रभृतींनी लिहिलेले धर्मशास्त्रावरील निबंधग्रंथ हे होत.

धर्मशास्त्रावरील सुसंगत स्वरूपाच्या ग्रंथांची रचना व्हावयाला केव्हापासून सुरुवात झाली ह्या प्रश्नाला एकादे निश्चित उत्तर देणे अशक्य आहे. वारसाहक्कासंबंधी पूर्वीच्या काळी झालेल्या वादविवादाचा उल्लेख निरुक्त (३· ४-५) ह्यात आला आहे, तसेच त्या ग्रंथात वारसाहक्कासंबंधीचे एक पद्ममय
[तदेतदृक्श्लोकाभ्यामभ्युक्तम् । अङ्गादङ्गात्सम्भवसि...
स जीव शरदः शतम् ॥ अविशेषेण पुत्राणां दायो भवति धर्मतः ।
मिथुनानां विसर्गादौ मनुः स्वायम्भुवोऽब्रवीत् ॥]

अवतरण उद्धृत केले आहे. त्यावरून असा संभव वाटतो की संपूर्ण श्लोकमय अथवा ज्यात काही श्लोक आहेत असा धर्मशास्त्रावरील एक ग्रंथ निरुक्ताच्या रचनाकाळी अस्तित्वात होता. गौतम, बौधायन आणि आपस्तंब ह्यांची धर्मसूत्रे खात्रीने ख्रि. पू. ६०० ते ख्रि. पू. ३०० ह्या काळातील असली पाहिजेत.

अनुक्रमणिका

गौतमधर्मसूत्रात (९·२१) 'धर्मशास्त्राणि' असा शब्द आला आहे. आणि बौधायन धर्मसूत्रामध्येही (४·५·९) 'धर्मशास्त्र' हा शब्द आला आहे. गौतमाने 'इत्येके' म्हणून इतरांची मते उद्‌धृत केली आहेत. बौधायनाने औपजंघनि, कात्य प्रभृति अनेक धर्मशास्त्रकारांची नावे दिली आहेत. आपस्तंबाने देखील एक, कण्व प्रभृति अनेक ऋषींची मते वर्णन केली आहेत. पतंजलीच्या महाभाष्यावरून [धर्मशास्त्रं च तथा । महाभाष्य खंड १ पा. २४२.] असे दिसून येते की त्याच्या काळी धर्मशास्त्रे अस्तित्वात होती आणि त्यांना वेदांच्या खालोखाल प्रामाण्य दिले जात असे. ह्यावरून असे सिद्ध होते की धर्मशास्त्रावरील ग्रंथ निरुक्ताच्या रचनाकालापूर्वी अथवा निदान ख्रि. पू. ६०० ते ख्रि. पू. ३०० ह्या काळापूर्वी अस्तित्वात होते आणि ख्रि. पू. दुसऱ्या शतकात अशा ग्रंथांना सर्वश्रेष्ठ प्रामाण्याचे स्थान प्राप्त झाले होते.

मॅक्समुल्लर प्रभृति पाश्चिमात्य विद्वानांनी असे मत प्रतिपादन केले आहे की संपूर्णतः अनुष्टुभ छंदात असलेले ग्रंथ सूत्रग्रंथांच्या मागाहून रचिले गेले. परंतु हे मत ग्राह्य धरिता येत नाही. कारण प्राचीन काळच्या एका धर्मसूत्रात (म्हणजे बौधायन धर्मसूत्रात) श्लोकबद्ध असे मोठमोठे भाग आहेत आणि त्यांच्यापैकी पुष्कळसे श्लोक दुसऱ्या ग्रंथातून उद्‌धृत केलेले आहेत. आपस्तंब धर्मसूत्रामध्येही पुष्कळ पद्यभाग आहेत. ह्यावरून त्या सूत्रांच्या रचनाकालापूर्वी श्लोकछंदात रचलेले धर्मशास्त्रावरील ग्रंथ अस्तित्वात असल्याचा जोराचा संभव दिसतो. शिवाय प्राचीन काळी अस्तित्वात असलेले फार मोठे वाङ्मय नष्ट झालेले असून सांप्रत उपलब्ध नाही. अशा परिस्थितीत कालनिर्णयासारख्या मुद्यावर एकादे मत आग्रहाने प्रतिपादन करणे निरर्थक आहे.

धर्मशास्त्रावरील वाङ्मय सामान्यतः स्पष्ट परंतु थोड्याशा प्रमाणात एकमेकांना व्यापणाऱ्या अशा तीन कालखंडात विभागता येते. पहिल्या कालखंडात प्राचीन धर्मसूत्रे आणि मनुस्मृति हे ग्रंथ येतात. ह्या कालखंडाचा किमान आरंभ ख्रि. पू. ६ वे शतक हा असून त्याची अंतिम मर्यादा इ.स.च्या आरंभापर्यंत आहे. बहुतेक श्लोकबद्ध स्मृतींची रचना ज्या काळात झाली तो दुसरा कालखंड असून त्याची मर्यादा इ.स.च्या आरंभीच्या काही शतकांपासून सुमारे इ. स. ८०० इतकी आहे. टीकाकार आणि निबंधग्रंथकार ज्या काळात होऊन गेले तो तिसरा कालखंड असून त्या कालखंडात इ.स. च्या सातव्या शतकापासून इ.स. १८०० पर्यंतचा एक सहस्राहून अधिक वर्षांचा समावेश होतो. स्मृतिग्रंथांवरील टीकांचे लेखन ह्या तिसऱ्या कालखंडाच्या जवळजवळ अखेरीपर्यंत होत होते. तथापि इ.स.च्या १२ व्या शतकानंतर लेखकांची सर्वसाधारण प्रवृत्ति एकाद्या विशिष्ट स्मृतीवर टीका न लिहिता धर्मशास्त्रात अंतर्भूत होणाऱ्या विषयांवरील सर्व स्मृतीतील वचनांचा समन्वय केलेले सारस्वरूपाचे निबंधग्रंथ लिहिण्याकडे होती.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण ३

## धर्मसूत्रे

(मू. ग्रं. पा. १० – १२)

धर्मसूत्रे, गृह्यसूत्रे आणि श्रौतसूत्रे अशी तीन प्रकारची सूत्रे असतात आणि ह्या तीन प्रकारच्या सूत्रांमिळून होणाऱ्या समुच्चयाला 'कल्प' अथवा 'कल्पसूत्रे' म्हणतात. अशा कल्पसूत्रांचा कोणत्यातरी वेदशाखेशी अथवा वेदामध्ये अंतर्भूत होणाऱ्या एकाद्या सूत्रचरणाशी संबंध असतो. तीनही प्रकारची सूत्रे असलेली संपूर्ण कल्पसूत्रे फक्त आपस्तम्ब, हिरण्यकेशी आणि बौधायन ह्या यजुर्वेदान्तर्गत सूत्रचरणांच्या बाबतीतच अस्तित्वात आहेत. सर्वही सूत्रचरणांशी संबंध असणारी धर्मसूत्रे आज उपलब्ध नाहीत. तसेच उपलब्ध असलेल्या सर्व धर्मसूत्रांना पूरक अशी गृह्यसूत्रे आणि श्रौतसूत्रे अस्तित्वात नाहीत. उदाहरणार्थ, ऋग्वेदात अंतर्भूत असलेल्या आश्वलायन सूत्रचरणाशी संबंध असणारी श्रौतसूत्रे आणि गृह्यसूत्रे आहेत, परंतु त्या सूत्रचरणाशी संबंध असणारे धर्मसूत्र अस्तित्वात नाही. त्याचप्रमाणे शांख्यायन सूत्रचरणाशी संबंध असणारी श्रौत आणि गृह्य सूत्रे अस्तित्वात आहेत, परंतु शांख्यायन धर्मसूत्र उपलब्ध नाही.

श्रौतसूत्रात यज्ञासंबंधी नियम सांगितलेले असतात. गृह्यसूत्रात मुख्यत्वेकरून कौटुंबिक धर्मविधींचा विचार केलेला असतो. मनुष्यांची कर्तव्ये, त्यांचे अधिकार आणि जबाबदाऱ्या ह्यांच्यासंबंधीचे नियम गृह्यसत्रात क्वचितच दिलेले असतात. धर्मसूत्रात मुख्यत्वेकरून आर्यांच्या समाजातील व्यक्तींनी त्या समाजाचे घटक ह्या नात्याने करावयाच्या वैयक्तिक आचरणासंबंधी नियम सांगितलेले असतात. गृह्यसूत्रात येणाऱ्या विषयांपैकी विवाह, संस्कार, ब्रह्मचारी आणि स्नातक यांनी पाळावयाचे नियम, अनध्याय, श्राद्ध, मधुपर्क ह्यांच्यासारख्या काही विषयांसंबंधीचे नियम धर्मसूत्रात देखील दिलेले असतात. धर्मसूत्रांचे कार्यक्षेत्र गृह्यसूत्रांपेक्षा अधिक विस्तृत असते. त्यांचा मुख्य हेतु कायदा आणि शिष्टाचार ह्यासंबंधी नियम सांगण्याचा असतो.

आरंभी जरी सर्व सूत्रचरणांच्या संस्थापकांनी रचलेली अथवा त्यांच्या नावावर प्रसिद्ध असणारी धर्मसूत्रे नसली तरी कालांतराने सर्व सूत्रचरणांनी काही विशिष्ट धर्मसूत्रांचा स्वीकार केला असावा. तथापि धर्मसूत्रात विशिष्ट धर्मविधींचा विचार केलेला नसल्यामुळे हळूहळू सर्वही शाखेचे लोक सर्व धर्मसूत्रांना प्रमाणभूत मानू लागले असावेत.

धर्मसूत्रे संपूर्ण गद्यात अथवा गद्यपद्यमिश्रित अशी असतात. धर्मसूत्रांची भाषा स्मृतींच्या भाषेपेक्षा सामान्यतः अधिक प्राचीन असते. परंतु धर्मसूत्रात स्मृतींप्रमाणे विषयांची सुसंबद्ध अशी रचना नसते. त्यात उद्धृत केलेली वेदवचने सामान्यतः ज्या वेदाशी अथवा चरणाशी त्या धर्मसूत्राचा संबंध असतो, त्याच वेदाच्या संहितेमधून घेण्याची अधिक प्रवृत्ती क्वचित प्रसंगी आढळून येते. धर्मसूत्रांचे कर्ते आपल्यास दिव्यदृष्टी असणारे ऋषी अथवा देवादि अतिमानव कोटीतील व्यक्ती म्हणवीत नाहीत. ह्याच्या उलट मनु आणि याज्ञवल्क्य ह्यांच्या स्मृतींचे कर्तृत्व ब्रह्मदेवासारख्या देवाकडे असल्याचे त्या ग्रंथात सांगितले आहे. बहुतेक धर्मसूत्रे बऱ्याच स्मृतींपेक्षा अधिक प्राचीन काळी झालेली आहेत.

ह्यापुढे धर्मसूत्रांतील गौतम, बौधायन, आपस्तम्ब, हिरण्यकेशी, वसिष्ठ, विष्णु, हारीत आणि शंखलिखित ह्या प्रमुख धर्मसूत्रांचे विवेचन एकेक स्वतंत्र प्रकरणात केले आहे. कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथही सूत्रस्वरूपाचा असून त्यात धर्मशास्त्रासंबंधी महत्त्वाची माहिती आली आहे. म्हणून त्या ग्रंथाचेही विवेचन एका स्वतंत्र प्रकरणात केले आहे. धर्मसंबंधी नियम असलेले काही सूत्रग्रंथ अद्यापि छापले गेले नसून फक्त हस्तलिखित स्वरूपात आहेत. काही सूत्रग्रंथांतील अवतरणे निबंधग्रंथांत उद्धृत केली आहेत त्यावरूनच त्या ग्रंथांची कल्पना करावी लागते. अशा ग्रंथांपैकी काही ग्रंथांसंबंधी त्रोटक माहिती एका प्रकरणात दिली आहे. काही पाश्चिमात्य संस्कृत पंडितांनी मानवधर्मसूत्र एकेकाळी अस्तित्वात होते असे प्रतिपादन केले आहे. म्हणून त्या प्रश्नाचाही थोडक्यात ऊहापोह एका स्वतंत्र प्रकरणात केला आहे.

————

अनुक्रमणिका

## प्रकरण ४

# गौतम धर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. १२ – २०)

हे धर्मसूत्र आज उपलब्ध असलेल्या सर्व धर्मसूत्रात सर्वात जुने आहे. गौतमधर्मसूत्राचे अध्ययन विशेषतः सामवेदानुयायी करीत असत. श्रौत, गृह्य आणि धर्म ह्या विषयांवरील सिद्धान्त असलेले संपूर्ण गौतमकल्पसूत्र एकेकाळी अस्तित्वात असण्याचा संभव आहे. गौतमधर्मसूत्राचा सामवेदाशी निकट संबंध दर्शविणाऱ्या दुसऱ्याही काही गोष्टी आहेत. गौतमधर्मसूत्रामधील कृच्छ्रप्रायश्चित्ताविषयीचा २६ वा अध्याय सामविधान ब्राह्मणाशी बहुतेक शब्दशः सारखा आहे. गौतमधर्मसूत्रात पाच व्याहृतींचा

[ओंपूर्वा व्याहृतयः पञ्च सत्यान्ताः । गौ. ध. सू. १· ५२·
भूः, भुवः, स्वः, तपः, सत्यं. गौतम २८·८·]

उल्लेख केला आहे आणि सामवेदामध्येही थोड्याशा भिन्न क्रमाने पाचच व्याहृतींचा उल्लेख केला आहे. सामवेदाशी संलग्न असलेल्या गोभिलगृह्यसूत्रात गौतम हा एक अधिकृत ग्रंथकार असल्याचे सांगितले आहे.

गौतमधर्मसूत्रावरील हरदत्ताच्या टीकेवरून त्या धर्मसूत्राचे २८ अध्याय असल्याचे कळून येते. त्या धर्मसूत्रात आलेले विषय इतरही धर्मसूत्रात सामान्यतः दिलेले असतात. ह्याकरिता धर्मसूत्रातील विषयांची सामान्य कल्पना येण्याकरिता गौतमधर्मसूत्रातील विषयांची संक्षिप्त यादी पुढे दिली आहे :

धर्माचा उगम; प्रमाण वचनांचा अर्थ करण्यासंबंधी नियम; उपनयन; ब्रह्मचाऱ्याच्या संबंधीचे नियम; चार आश्रम; ब्रह्मचारी आणि वैखानस ह्यांची कर्तव्ये; गृहस्थाश्रमीयांसंबंधी नियम; विवाह; विवाहाचे आठ प्रकार; दैनिक पंचमहायज्ञ; दानाचे फल; अतिथिसत्कार; मार्गासंबंधी नियम; ब्राह्मणाने करावयाचे व्यवसाय; चाळीस संस्कार आणि आठ आध्यात्मिक गुण; स्नातक आणि गृहस्थ ह्यांनी पाळावयाचे नियम; चार वर्णांची विशिष्ट कर्तव्ये; राजधर्म; निरनिराळ्या अपराधांबद्दल करावयाचे शासन; चोरी; व्याजबट्टा; शासनाच्या बाबतीत ब्राह्मणांना असणाऱ्या विशेष सवलती; ऋणविमोचन; साक्षीदारांसंबंधी नियम; कोणत्या प्रसंगी खोटे बोलणे क्षम्य असते; जनन आणि मृत्यु ह्यांच्यासंबंधी आशौच; श्राद्धे; वेदाध्ययन; अनध्याय; विहित आणि निषिद्ध अन्न; प्रायश्चित्ते; तप आणि दान ह्यांचे निरनिराळे प्रकार; महापातके, उपपातके, ब्रह्महत्या, व्यभिचार इत्यादि पातकांबद्दल करावयाची प्रायश्चित्ते; मद्य आणि अपवित्र पदार्थांचे सेवन; गुप्त प्रायश्चित्ते; चांद्रायण तप; संपत्तीचे वाटत; स्त्रीधन; वारसा अधिकार.

गौतमधर्मसूत्र सर्वस्वी गद्यात आहे आणि त्यात इतर धर्मसूत्रांप्रमाणे बाहेरच्या ग्रंथांतील उद्‌धृत केलेले अथवा स्वतः ग्रंथकाराने रचलेले असे श्लोक मुळीच नाहीत. गौतमाची भाषा बौधायनाच्या आणि आपस्तंबाच्या भाषेपेक्षा पाणिनीय सांप्रदायाशी अधिक जुळती आहे. गौतमधर्मसूत्रात निरनिराळ्या वेदांच्या संहिता आणि ब्राह्मणग्रंथ ह्यांच्याशिवाय उपनिषदे, वेदांगे, इतिहास, पुराणे, उपवेद, धर्मशास्त्र ह्यांचे उल्लेख केले आहेत. आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या ग्रंथकारांचा निर्देश गौतमाने पुष्कळ ठिकाणी 'एके' अथवा 'एकेषाम्' ह्या शब्दांनी केला आहे. धर्म ह्या विषयावरील एक ग्रंथकार ह्या नात्याचा गौतमाचा सर्वात प्राचीन उल्लेख बौधायनधर्मसूत्रात [..... नेति गौतमोऽत्युग्रो हि क्षत्रधर्मो ब्राह्मणस्य।

अनुक्रमणिका

बौ. ध. सू. २· २· ६९ – ७०.]

केला आहे. गौतमधर्मसूत्रातील प्रायश्चित्तासंबधीचा अध्याय थोडेसे किरकोळ बदल करून बौधायनाने आपल्या धर्मसूत्रात समाविष्ट केला आहे. वसिष्ठधर्मसूत्रातील प्रायश्चित्तासंबंधीचा अध्याय गौतमधर्मसूत्रामधील त्याच अध्यायावरून घेतला आहे. गौतम आणि वसिष्ठ धर्मसूत्रांतील पुष्कळशी सूत्रे

[गौत. ३· ३१ – ३३ = वसिष्ठ ९· १ – ३;
गौत. ३· २६ = वसिष्ठ ९· १०; गौ. १· ४४ = वसि. ३· ३७. इत्यादि.]

सर्वस्वी अथवा जवळ जवळ एकसारखी आहेत. गौतमधर्मसूत्रातील सूत्रे कुमारिलभट्टांनी तंत्रवार्तिकात, तसेच श्रीशंकराचार्यांनी वेदान्तसूत्रात, विश्वरूपाने याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीकेत, मेघातिथीने मनुस्मृतीवरील टीकेत उद्‌धृत केली आहेत.

गौतमधर्मसूत्रात उल्लेख केलेले ग्रंथ, तसेच गौतमधर्मसूत्रांचा ज्या ग्रंथकारांनी उल्लेख केला आहे अथवा त्यातील सूत्रे ज्यांनी उद्‌धृत केली आहेत असे ग्रंथकार ह्या सर्वांचा विचार करता गौतमधर्मसूत्रांचा रचनाकाल ख्रि. पू. ६०० ते ख्रि. पू. ४०० ह्या कालखंडानंतरचा मानता येत नाही.

हरदत्ताने गौतमधर्मसूत्रावर मिताक्षरा नावाची एक विद्वत्तापूर्ण टीका लिहिली आहे. वामनाचा पुत्र मस्करि ह्याचे ह्या सूत्रावरील भाष्यही विद्वत्तापूर्ण आहे. असहायानेही गौतमधर्मसूत्रावर एक भाष्य लिहिले असावे असे दिसते.

मिताक्षरा (विज्ञानेश्वरकृत), स्मृतिचंद्रिका, हेमाद्रि इत्यादि ग्रंथांत आणि ग्रंथकारांनी 'श्लोकगौतम' नावाच्या एका ग्रंथामधील अवतरणे उद्‌धृत केली आहेत. अपरार्क, हेमाद्रि आणि माधव ह्यांची 'वृद्धगौतमाची ' अवतरणे उद्धृत केली आहेत आणि दत्तकमीमांसा ह्या ग्रंथात एकाच मुद्यावर वृद्धगौतम आणि बृहद्‌गौतम यांची अवतरणे एकमेकाशेजारी उद्‌धृत केली आहेत. जीवानंदाने 'वृद्धगौतमस्मृति' प्रसिद्ध केली आहे. तिच्यात २२ अध्याय असून सुमारे १७०० श्लोक आहेत. ती स्मृति महाभारतातील अश्वमेघ पर्वामधून घेतली असावी असे दिसते. त्या स्मृतीत चार वर्णाचे धर्म सांगा अशी युधिष्ठिराने श्रीकृष्णाला विनंति केल्याचे वर्णन केले आहे. ह्या संबंधात ही गोष्ट लक्ष्यात ठेवणे अवश्य आहे की गौतम हे विशेषनाम म्हणजे एका विवक्षित व्यक्तीचे नाव नसून सामान्यनाम आहे. कठोपनिषदात नचिकेत आणि त्याचा पिता ह्या दोघांना गौतम अशी संज्ञा लावली आहे.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण ५

## बौधायन धर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. २०-३२)

बौधायन हा कृष्ण यजुर्वेदाचा आचार्य आहे. त्याच्या सूत्राची संपूर्ण प्रत अद्यापि उपलब्ध झालेली नाही आणि तो ग्रंथ आपस्तंब आणि हिरण्यकेशीय सूत्रांसारखा काळजीपूर्वक जतन केलेला नाही. डॉ. कॅलंडने इ.स. १९०३ मध्ये जर्मन भाषेत लिहिलेल्या आपल्या निबंधात बौधायन सूत्रात आलेल्या विषयांचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे :

प्रश्न १ ते २१ = श्रौत; प्रश्न २२ ते २५ = द्वैध; प्रश्न २६ ते २८ = कर्मान्त; प्रश्न २९ ते ३१ = प्रायश्चित्त; प्रश्न ३२ = शुल्बसूत्र; प्रश्न ३३ ते ३५ = गृह्यसूत्र; प्रश्न ३६ = गृह्यप्रायश्चित्त; प्रश्न ३७ = गृह्यपरिभाषा; प्रश्न ३८ ते ४१ = गृह्यपरिशिष्ट; प्रश्न ४२ ते ४४ = पितृमेध; प्रश्न ४५ = प्रवर; प्रश्न ४६ ते ४९ = धर्म.

सध्या उपलब्ध असलेले धर्मसूत्र मुळात होते तसे नसावे असे वाटते. ह्या ग्रंथाची भाषा जराशी भोंगळ आहे. संक्षेपाने अथवा थोडक्या शब्दात वर्णन करणे हा बौधायनाचा हेतूच दिसत नाही. पुष्कळ विषयांचे विवेचन दोन स्थळी केले आहे आणि पुष्कळ वेळा निरनिराळ्या विवेचनात तर्कशुद्ध पूर्वापार संगतीही दिसून येत नाही. धर्मसूत्रात सामान्यतः येणाऱ्या स्वरूपाचे विषय बौधायन धर्मसूत्रात आले आहेत.

औपजंघनि, कात्य, कश्यप अथवा काश्यप, गौतम, प्रजापति, मनु, मौद्गल्य, हारीत इत्यादि धर्मविषयावरील ग्रंथकारांचा बौधायनाने निर्देश केला आहे. धर्मविषयावरील अनेक श्लोक बौधायनाने उद्धृत केले आहेत. त्यावरून त्याच्या पूर्वी धर्मविषयावर अनेक श्लोकबद्ध ग्रंथ झाले असले पाहिजेत असे दिसून येत. शबरस्वामी, कुमारिलभट्ट, विश्वरूप, मेधातिथि इत्यादि अनेक ग्रंथकारांनी बौधायनाला धर्मशास्त्रावरील ग्रंथकार मानिले आहे आणि त्याच्या ग्रंथातील प्रत्यक्ष शब्दही आपल्या ग्रंथात उद्धृत केले आहेत अथवा त्याचा स्पष्ट नामनिर्देश त्यांनी केला आहे, आणि असे ग्रंथ विज्ञानेश्वराच्या (मिताक्षरेचा कर्ता) काळापूर्वी शेकडो वर्षे अस्तित्वात होते.

बौधायन कोणत्या प्रांतात राहणारा होता हे निश्चयपूर्वक सांगता येत नाही. बौधायन सूत्राचे अनुयायी मुख्यत्वे दक्षिण भारतात राहतात. वेदावरील श्रेष्ठ भाष्यकार सायणाचार्य हा बौधायन सांप्रदायाचा होता. गृह्यसूत्रात बौधायनाला 'प्रवचनकार' असे म्हटले आहे. प्रवचन हे कोणत्या तरी सूत्रसांप्रदायाचे नाव असावे. पल्लव देशाच्या नंदिवर्म राजाने इ. स. च्या ९ व्या शतकात दिलेल्या एका दानपत्रात प्रवचनसूत्राच्या ब्राह्मणांचा उल्लेख केला आहे. ह्यावरून बौधायन दाक्षिणात्य असावा.

बौधायन धर्मसूत्रात गौतमाचा उल्लेख दोन वेळा केला आहे. ह्यावरून उपलब्ध बौधायन धर्मसूत्र गौतमाच्या नंतर झालेले आहे ह्यात संशय नाही. शबरस्वामीच्या काळी बौधायन धर्मसूत्रांना प्रमाणभूत

स्मृतीचा दर्जा प्राप्त झाला होता. शबरस्वामीचा काळ इ. स. ५०० च्या नंतरचा असणे शक्य नाही. ह्यावरून बौधायन धर्मसूत्र ख्रि. पू. ५०० ते ख्रि. पू. २०० ह्या कालखंडात झाले असावे.

बौधायनाच्या धर्मसूत्रावर गोविंदस्वामीची टीका विद्वत्तापूर्ण असून ती सामान्यतः मुद्याला धरून अशी आहे. गोविंदस्वामी हा बऱ्याच अलीकडील काळातील ग्रंथकार असावा.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण ६

## आपस्तम्ब धर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. ३२ – ४६)

कृष्ण यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेच्या आपस्तम्ब कल्पसूत्रात (गृह्य, श्रौत आणि धर्मसूत्रे मिळून) तीस प्रश्न आहेत. त्यांपैकी २८ आणि २९ ह्या प्रश्नात धर्मसूत्र आले आहे. हा ग्रंथ अनेकवेळा मुद्रित झाला आहे. आपस्तम्ब श्रौत, गृह्य आणि धर्मसूत्रे एकाच व्यक्तीने लिहिली आहेत किंवा नाही हे जरी निश्चित सांगता आले नाही तरी त्यातील गृह्य आणि धर्मसूत्राचा एकमेकांशी अतिशय निकट संबंध असल्याचे दिसून येते आणि ते दोनही ग्रंथ एकाच ग्रंथकाराने रचले असावेत असे वाटते. धर्मसूत्रात आलेल्या उल्लेखावरून गृह्यसूत्रे हे धर्मसूत्राच्या पूर्वी झालेले असावे असे ध्वनित होते आणि काही ठिकाणी धर्मसूत्रात गृह्यसूत्राचा निर्देशही केला आहे. स्मृतिचंद्रिका [स्मृतिचं. ३ पा. ४५८.] ह्या ग्रंथात धर्मसूत्र आणि गृह्यसूत्र ह्यांचा कर्ता एकच आहे असे स्पष्ट विधान केले आहे.

धर्मसूत्रात सामान्यतः येणारे विषयच आपस्तम्ब धर्मसूत्रात आले आहेत. विवाहाचे प्रकार, अनध्याय, ब्रह्मचाऱ्याची कर्तव्ये ह्यांच्यासारखे विषय इतर गृह्यात सामान्यतः आलेले असतात; परंतु ते विषय आपस्तम्ब गृह्यसूत्रात मुळीच न देता धर्मसूत्रात घातले आहेत. काही विषयांचे विवेचन धर्मसूत्रात येऊन गेल्यामुळे त्यांची द्विरुक्ती होऊ नये म्हणून ते गृह्यसूत्रात हेतुपुरःसर गाळले असावेत. आपस्तम्ब धर्मसूत्राच्या प्रत्येक प्रश्नाची ११ पटले आहेत. बौधायन धर्मसूत्रापेक्षा हे धर्मसूत्र अधिक संक्षिप्त आणि आटोपशीर पद्धतीने लिहिलेले आहे आणि त्यात इतर धर्मसूत्रांपेक्षा प्राचीन आणि पाणिनीय सांप्रदायाच्या विरुद्ध असणारे शब्द अधिक आहेत.

आपस्तम्ब धर्मसूत्र मुख्यत्वेकरून गद्यात असले तरी त्यात मधून मधून श्लोक आहेत. त्यांपैकी काही श्लोकांच्या पूर्वी ‘उदाहरन्ति’ किंवा ‘अथाप्युदाहरन्ति’ असे शब्द घालून ते श्लोक दुसऱ्या कोणत्यातरी ग्रंथातून उद्धृत केले असल्याचे स्पष्टपणे सांगितले आहे. काही ठिकाणी तसा स्पष्ट निर्देश नसला तरी ते श्लोक दुसऱ्या कोणत्यातरी ग्रंथातून उद्‌धृत केले असावेत असे दिसते.

आपस्तम्बाने वेद आणि वेदवाङ्मय ह्यांच्या व्यतिरिक्त धर्मविषयावरील एक, कण्व, काण्व, कुशिक इत्यादि दहा ग्रंथकारांची मते नामनिर्देशपूर्वक उद्धृत केली आहेत. बौधायन आणि आपस्तम्ब ह्यांची मते आणि लेखनशैली एकमेकाशी पुष्कळ जुळतात. ‘एके’ असा निर्देश करून उद्धृत केलेल्या मतांपैकी पुष्कळशी मते गौतमाची आहेत. आपस्तम्ब धर्मसूत्राचा पूर्व मीमांसेशी विशेष संबंध आहे. उपलब्ध धर्मसूत्रांपैकी फक्त आपस्तम्ब धर्मसूत्रातच मीमांसाशास्त्रातील पारिभाषिक शब्द, मीमांसाशास्त्रातील मते आढळतात. आपस्तम्बाच्या काळी मीमांसाशास्त्रातील सिद्धान्त फार परिणत अवस्थेला पोचले होते आणि मीमांसाशास्त्रातील विवेचन करणारे ग्रंथ त्याकाळी अस्तित्वात होते असे आपस्तम्ब सूत्रातील मतावरून दिसते. कदाचित आपस्तम्बाला सध्या उपलब्ध असणारे मीमांसासूत्र अथवा ज्यात जवळजवळ तशीच भाषा वापरली आहे अशी त्या सूत्राची एकादी पूर्वावृत्ती माहित असावी असे त्या दोन ग्रंथांतील भाषेच्या साम्यावरून वाटते.

अनुक्रमणिका

फार प्राचीन काळापासून आपस्तम्ब धर्मसूत्रातील अवतरणे प्रमाणभूत वचने म्हणून दुसऱ्या ग्रंथांत उद्धृत केली जात असत. जैमिनिसूत्रावरील [जै. सू. ६· ८·१८ वरील शबरभाष्यात आप. ध. सू. २· ५· ११· १२।१३ ह्यांच्यापैकी एक सूत्र उद्धृत केले असून दुसऱ्या सूत्राचा गोषवारा दिला आहे.] भाष्यात शबरस्वामींनी आपस्तम्बाची सूत्रे उद्धृत केली आहेत. कुमारिलभट्टांनी तंत्रवार्तिकात [तन्त्रवार्तिक पा. १३८ वर 'प्रतिदेशे व्यवस्थया' । आपस्तम्बेन संहृत्य दुष्टादुष्टत्वमादृतम् ॥ ह्या वाक्यात आप. ध. सू. २· ६· १५· १ 'एतेन देशकालधर्मा व्याख्याताः' ह्या सूत्राचा उल्लेख केला आहे.] आपस्तम्बाच्या मतांचा उल्लेख केला आहे. ब्रह्मसूत्रावरील [ब्र. सू. ४· २· १४ वरील भाष्यात आप. ध. सू. १· ७· २० उद्धृत केले आहे.] भाष्यात श्रीशंकराचार्यांनी आपस्तम्बाचे एक सूत्र उद्धृत केले असून आपस्तम्ब धर्मसूत्रातील दोन पटलांवर [आप. ध. सू. १· ८· २२।२३·] टीका लिहिली आहे. विश्वरूपाच्या याज्ञवल्क्य [याज्ञ. ३· २३७ वरील विश्वरूपाच्या टीकेत आप. ध. सू. १· ९· २४· ६ ते २३ ही १८ सूत्रे उद्धृत केली आहेत.] स्मृतीवरील टीकेत आणि मेधातिथीच्या [मनु. २·२४७, ३· १०२ प्रभृति वरील मेधातिथीच्या टीकेत अनुक्रमे आप. ध. सू. २· ५· ११· २, २· ४· ७· १६ प्रभृति सूत्रे उद्धृत केली आहेत.] मनुस्मृतीवरील टीकेत आपस्तम्बाची सूत्रे उद्धृत केली आहेत. मिताक्षरेमध्ये आणि अपरार्काने आपस्तम्बाची अनेक सूत्रे उद्धृत केली आहेत. अशा रीतीने शबरस्वामींच्या काळापासून (म्हणजे निदान इ.स. ५०० पासून) इ. स. ११०० पर्यंतच्या काळात झालेल्या अनेक ग्रंथांत उद्धृत केलेल्या अवतरणांवरून आपस्तम्बसूत्राच्या उपलब्ध प्रतीच्या अस्सलपणाबद्दल खात्री पटते.

आपस्तम्बाच्या राहण्याच्या ठिकाणासंबंधी आणि त्याच्या स्वतःसंबंधी फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. आपस्तम्ब हे प्राचीन काळचे नाव नाही. वैदिक वाङ्मयात हे नाव आढळत नाही. तर्पणात त्याचे नाव बहुधा बौधायनानंतर आणि सत्याषाढ, हिरण्यकेशिन् ह्यांच्या पूर्वी घातलेले असते. तेव्हा परंपरागत नियमाप्रमाणे आपस्तम्बाची शाखा हिरण्यकेशी शाखेच्या पूर्वी झालेली होती आणि अधिक प्रामाण्य असलेली होती असे दिसते. आपस्तम्ब शाखेचे लोक नर्मदेच्या दक्षिणेला आग्नेय भागात म्हणजे आन्ध्रदेशात आणि गोदावरीच्या मुखाजवळील प्रदेशात आढळतात असे महार्णव ह्या ग्रंथात म्हटले आहे. ह्यावरून आपस्तम्ब शाखेचे मूलस्थान दक्षिण भारतात आणि बहुधा आन्ध्र देशात होते असा स्वाभाविक तर्क करावयास प्रत्यवाय नाही.

आपस्तम्ब धर्मसूत्राचा काल फक्त स्थूलमानानेच निश्चित करता येईल. ते सूत्र बहुधा गौतमधर्मसूत्राच्या नंतर तसेच बौधायन धर्मसूत्रांच्या देखील नंतर झाले असावे. आपस्तम्ब धर्मसूत्रातील भाषाशैली आणि त्यातील व्याकरण ह्यावरून ते सूत्र अतिशय प्राचीन असावे असे दिसते. बुद्धधर्माचा त्या सूत्रात कोठेही स्पष्ट उल्लेख केलेला नाही. ह्यावरून त्या सूत्राचा काल ख्रि. पू. ६०० ते ख्रि. पू. ३०० असा धरल्यास ते फारसे चुकीचे होणार नाही.

आपस्तम्ब धर्मसूत्रावरील हरदत्ताची उज्वला नावाची टीकाच फक्त सापडली आहे. स्मृतिचन्द्रिका आणि वीरमित्रोदय ह्या ग्रंथांत उद्धृत केलेल्या आपस्तम्ब सूत्रावरील भाष्याचे उतारे हरदत्ताच्या टीकेत सापडत नाहीत. ह्यावरून तो भाष्यकार हरदत्ताच्या पूर्वी होऊन गेलेल्या टीकाकारांपैकी एक असावा.

हरदत्ताने उद्धृत केलेल्या आपस्तम्बाच्या श्लोकांपैकी तीन [जीवानंद आवृत्ती खंड १ पा. ५६७ – ५८५ वर आप.स्मृति अध्याय १ श्लो. १६, १९, ३१ आले आहेत.] श्लोक आपस्तम्बाच्या श्लोकबद्ध स्मृतीत सापडतात. जीवानंदाने छापलेल्या आपस्तम्ब स्मृतीत १० अध्याय मिळून प्रायश्चित्त आणि शुद्धी ह्या विषयांवरील सुमारे २०७ श्लोक आहेत. परंतु स्मृतिचन्द्रिका आणि अपरार्क ह्यांनी उद्धृत केलेल्या श्लोकांवरून श्लोकबद्ध आपस्तम्ब स्मृति हा बराच मोठा ग्रंथ असावा आणि ती स्मृती आपस्तम्ब सूत्राच्या मानाने प्राचीन काळची असावी असे वाटते.

अनुक्रमणिका

# प्रकरण ७

## हिरण्यकेशी धर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. ४६–५०)

हिरण्यकेशी कल्पाचे प्रश्न २६ आणि २७ मिळून हिरण्यकेशी धर्मसूत्र होते. हे धर्मसूत्र मुख्यत्वेकरून आपस्तम्ब धर्मसूत्राच्या आधारावर रचिलेले आहे. त्याला स्वतंत्र ग्रंथ म्हणून क्वचितच म्हणता येईल. त्यात आपस्तंबाच्या धर्मसूत्रातील शेकडो सूत्रे शब्दशः समाविष्ट केली आहेत. त्यामुळे आपस्तंब धर्मसूत्राचा खरा पाठ कोणता हे ठरविण्याला हिरण्यकेशी धर्मसूत्राचा फार उपयोग होतो. तैत्तिरीय शाखेच्या खांडिकेय विभागात हिरण्यकेशी हा एक सूत्रचरण आहे आणि त्याची स्थापना आपस्तंब सांप्रदायाच्या नंतर झालेली आहे. चरणव्यूहावरील टीकेत उद्धृत केलेल्या महार्णव ग्रंथातील अवतरणात असे म्हटले आहे की हिरण्यकेशी शाखेचे लोक नैर्ऋत्य दिशेला सह्याद्री आणि सागर ह्यांच्यामधील प्रदेशात आणि परशुराम क्षेत्रात (म्हणजे कोकणात) आढळतात. सध्या रत्नागिरी जिल्ह्यात आपणास हिरण्यकेशी शाखेचे म्हणविणारे पुष्कळ ब्राह्मण आहेत.

काही काही सूत्रांच्या हिरण्यकेशी पाठाची भाषा आपस्तंब सूत्रातील पाठापेक्षा अधिक सरळ आहे आणि त्यातील भाषा श्रेष्ठ दर्जाच्या काव्यातील भाषेसारखी आहे. ह्यावरून असे स्पष्टपणे दिसून येते की ज्यावेळी हिरण्यकेशी शाखेने आपस्तंब सूत्रांचा स्वीकार केला त्यावेळी त्यांनी त्या सूत्रांची भाषा शिष्टसंमत करण्याचा प्रयत्न केला असावा. त्या दोन्ही ग्रंथातील सूत्रांची निरनिराळ्या पोट विभागात केलेली विभागणी पुष्कळच वेगळी आहे. हिरण्यकेशी सूत्रातील पहिल्या (२६ व्या) प्रश्नात ८ पटले आहेत. परंतु आपस्तंबाने आपल्या दोन्ही प्रश्नांत प्रत्येकी ११ पटले दिली आहेत. ह्यामुळे दोन्ही ग्रंथांतील खंडिकातील सूत्रे सारखी नाहीत. हिरण्यकेशी सूत्रातील पहिल्या प्रश्नात ३१ खंडिका आहेत. आणि दुसऱ्यात २० खंडिका आहेत. काही काही खंडिकांची स्थानेही बदलली आहेत.

हिरण्यकेशी धर्मसूत्रावरील महादेव दीक्षिताची उज्वला नावाची टीका शब्दशः हरदत्ताच्या आपस्तंबसूत्रावरील टीकेशी जुळती आहे. विक्रम संवत १६६८ (इ.स. १६११।१२) मध्ये लिहिलेल्या हरदत्ताच्या टीकेच्या हस्तलिखित प्रतीत महादेवाच्या टीकेतील काही भाग आहे. ह्यावरून महादेवदेखील बऱ्याच पूर्वीच्या काळात होऊन गेला असल्याचे दिंसते.

————

# प्रकरण ८

## वसिष्ठ धर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. ५०-६०)

वसिष्ठाची श्रौत आणि गृह्यसूत्रे कधीकाळी अस्तित्वात असलीच तरी ती सध्या उपलब्ध नाहीत. कुमारिल भट्टांनी तन्त्रवार्तिकात असे [पू. मी. सू. १·३·११ वरील तन्त्रवार्तिक पा १७९. "... तद्यथा गौतमीयगौभिलीये छन्दोगैरेव परिगृहीते। वसिष्ठे बह् वृचैरेव शङ्खलिखितोक्तं च वाजसनेयिभिः । आपस्तम्बबौधायनीये तैत्तिरीयैरेव प्रतिपन्ने । एवं तत्र तत्र गृह्यव्यवस्थाभ्युपगमादि दर्शयित्वा विचारयितव्यम् । किं तानि तेषामेव प्रमाणान्युत सर्वेषाम् ।"] म्हटले आहे की वसिष्ठ धर्मसूत्राचे अध्ययन मुख्यत्वेकरून ऋग्वेदानुयायी करीत असले तरी ते धर्मसूत्र इतर धर्मसूत्रांप्रमाणेच सर्व चरणांना प्रमाणभूत आहे. वसिष्ठधर्मसूत्रात सर्व वेदातील अवतरणे उद्धृत केली आहेत आणि वसिष्ठ ह्या नावाशिवाय त्या सूत्राचा ऋग्वेदाशी संबंध जोडणारी दुसरी कोणतीही विशिष्ट गोष्ट त्या सूत्रात नाही. तेव्हा असे वाटते की वसिष्ठाचे धर्मसूत्र प्रथमतः धर्मशास्त्रावरील एक स्वतंत्र ग्रंथ म्हणून लिहिले गेले असावे आणि पुढे आश्वलायनाची श्रौत आणि गृह्यसूत्रेच फक्त असणाऱ्या ऋग्वेदानुयायी लोकांनी वसिष्ठाच्या धर्मसूत्राचा अंगिकार केला असावा. वसिष्ठांनी आपल्या ग्रंथाला 'धर्मशास्त्र' असे म्हटले आहे.

इतर धर्मसूत्रात आलेले बहुतेक विषय ह्या सूत्रातही आले आहेत. इतर धर्मसूत्राप्रमाणे हे धर्मसूत्रही गद्यात रचलेले असून त्यात मधून मधून श्लोक आले आहेत. भाषेच्या बाबतीत वसिष्ठधर्मसूत्र गौतमधर्मसूत्रासारखे आहे आणि त्यातील पुष्कळ सूत्रे गौतमाच्या सूत्राशी पूर्णपणे अथवा जवळजवळ समान अशी आहेत. बौधायनाच्या सूत्राशी जुळतील अशीही बरीच सूत्रे वसिष्ठधर्मसूत्रात आहेत. वसिष्ठधर्मसूत्राच्या निरनिराळ्या हस्तलिखित प्रतीत सापडणाऱ्या अध्यायांची संख्या ६ पासून ३० पर्यंत भिन्न भिन्न असते आणि काही ठिकाणी त्या ग्रंथाची भाषा अतिशय अशुद्ध आहे. ह्यावरून वसिष्ठधर्मसूत्राचा समग्रग्रंथ अस्सल आहे किंवा नाही ह्याविषयी शंका प्रदर्शित करण्यात आल्या आहेत. परंतु जर काही भाग मूळच्या ग्रंथात मागाहून समाविष्ट करण्यात आला असलाच तर ती गोष्ट निदान फार प्राचीन काळी घडली असली पाहिजे. कारण मिताक्षरा, विश्वरूप, आद्य श्रीशंकराचार्य ह्यांच्यासारख्या प्राचीन ग्रंथकारांनी वसिष्ठधर्मसूत्रातील अनेक अवतरणे उद्धृत केली आहेत आणि अशी अवतरणे वसिष्ठधर्मसूत्राच्या पहिल्या अध्यायापासून बहुतेक सर्व अध्यायांतून घेतलेली आहेत. त्या अवतरणात आणि सध्या छापलेल्या वसिष्ठधर्मसूत्राच्या प्रतीत क्वचितच भेद आढळतो. ह्यावरून वसिष्ठधर्मसूत्रांच्या सध्याच्या प्रतीतील बहुतेक सर्व अध्याय बऱ्याच पूर्वीही सध्याच्या स्वरूपात अस्तित्वात होते हे सिद्ध होते.

वसिष्ठ धर्मसूत्रात निरनिराळ्या वेदामधील आणि ब्राह्मण ग्रंथांतील अवतरणे उद्धृत केली आहेत. तसेच हारीत, गौतम, यम, प्रजापति ह्यांच्या सारख्या धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांची अवतरणेही उद्धृत केली आहेत. अशा अवतरणातील काही श्लोक मनुस्मृतीत आढळतात.

मनुस्मृति आणि याज्ञवल्क्यस्मृति ह्यांनी वसिष्ठ धर्मसूत्रांना एक प्रमाणभूत ग्रंथ मानले आहे. तंत्रवार्तिकात धर्मशास्त्रावरील ग्रंथांचा उल्लेख करताना मनु, गौतम आणि वसिष्ठ ह्यांना प्रमुख स्थान दिले आहे. ह्यावरून वसिष्ठांचा धर्मशास्त्रावरील ग्रंथ ख्रिस्ती शकाच्या आरंभीच्या कांही शतकात अस्तित्वात होता हे निश्चितपणे सिद्ध होते आणि त्या ग्रंथाचा अस्सलपणा सातव्या शतकानंतर झालेल्या प्रसिद्ध ग्रंथावरून

सिद्ध होतो. वसिष्ठ धर्मसूत्रात सांगितलेली मते फार प्राचीन काळची आहेत. आपस्तम्बाप्रमाणे वसिष्ठानेही विवाहाचे ब्राह्म आदि सहाच प्रकार सांगितले आहेत; ह्या सर्व गोष्टींवरून असे म्हणता येईल की वसिष्ठधर्मसूत्र हा ग्रंथ गौतम, आपस्तम्ब आणि बौधायन ह्यांच्या ह्यांच्या नंतर परंतु इ. स. च्या प्रारंभाच्या पुष्कळ अगोदर झालेला आहे. ठोकळ मानाने ख्रि. पू. ३०० ते ख्रि. पू. १०० ह्या कालखंडात ते धर्मसूत्र झाले असावे.

विश्वरूप, मिताक्षरा, स्मृतिचंद्रिका, चतुर्विंशतिमत ह्या ग्रंथांवरील भट्टोजीकृत टीका ह्यांनी वृद्ध वसिष्ठ नावाच्या एका ग्रंथकाराचा उल्लेख केला आहे. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की वृद्ध वसिष्ठाचा ग्रंथ बऱ्याच पूर्वीच्या काळी झालेला असावा आणि त्यात याज्ञवल्क्यस्मृतीत आलेल्या (व्यवहारासहित) बहुतेक सर्व विषयांचा विचार केलेला असावा. स्मृतिचंद्रिकेत एका ज्योतिर्वसिष्ठाचे काही श्लोक उद्धृत केले आहेत. इंडिया ऑफिस सूचीमध्ये दहा अध्याय असलेल्या आणि वैष्णवांच्या धार्मिक आचारांचे आणि कर्तव्यांचे वर्णन केलेल्या वसिष्ठस्मृतीचा उल्लेख केला आहे.

बौधायनधर्मसूत्रांवरील टीकेत गोविंदस्वामीने वसिष्ठ (२१·१३) हे सूत्र आणि त्यावरील यज्ञस्वामीची टीका उद्धृत केली आहे. ह्यावरून यज्ञस्वामीने वसिष्ठधर्मसूत्रांवर टीका केली होती असे कळून येते.

----

अनुक्रमणिका

# प्रकरण ९

## विष्णुधर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. ६० – ७०)

ह्या सत्रात १०० अध्याय आहेत. परंतु अध्यायांची संख्या मोठी असली तरी ते सूत्र फारसे विस्तृत नाही. कित्येक अध्यायात फक्त एक एक सूत्र आणि एक एक श्लोक आहे. पहिला आणि शेवटला अध्याय संपूर्ण श्लोकबद्ध आहेत, बाकीच्या अध्यायांत गद्यपद्य मिश्रण आहे. ह्या धर्मसूत्राचा यजुर्वेदातील सर्वात जुन्या शाखांपैकी कठ ह्या शाखेशी निकट संबंध आहे.

विष्णुधर्मसूत्राच्या पहिल्या अध्यायात त्या सूत्राच्या उत्पत्तीविषयी पुढील कथा दिली आहे. खवळलेल्या सागरातून वराहाने पृथ्वी वर काढल्यानंतर आपले संरक्षण कोण करील हे विचारण्याकरिता ती कश्यपाकडे गेली आणि कश्यपाने तिला विष्णूकडे जाण्यास सांगितले. विष्णूने पृथ्वीला सांगितले की जे लोकवर्ण आणि आश्रम ह्यांच्या कर्तव्याचे पालन करतात ते तुझे संरक्षण करतील. तेव्हा वर्ण आणि आश्रम ह्यांची कर्तव्ये कोणती हे सांगण्याची पृथ्वीने परमेश्वराला विनंती केली आणि त्या विनंतीवरून विष्णूने जी माहिती सांगितली ती ह्या सूत्रात दिली आहे.

विष्णुधर्मसूत्राची उत्पत्ती वरीलप्रमाणे असल्यामुळे ते सूत्र स्वतः विष्णूने सांगितले आहे अशा स्वरूपात त्या सूत्राची रचना केली आहे. मागील प्रकरणात वर्णन केलेल्या कोणत्याही धर्मसूत्राची रचना तशा स्वरूपाची नाही. त्या सत्राची भाषाशैली सरळ आणि काहीशी पाल्हाळिक आहे. त्यात व्याकरणदृष्ट्या अशुद्ध असलेली रूपे बहुधा आढळत नाहीत. ह्या सूत्राच्या काही अध्यायातील मजकूर तुलनेने जुन्या काळचा असून तो गौतम आणि आपस्तम्ब ह्या प्राचीन धर्मसूत्रांच्या तोडीचा आहे. परंतु त्या सूत्रातील बराच मोठा भाग त्यानंतरच्या काळातील असल्याचे स्पष्ट दिसते. विष्णुधर्मसूत्रात मनुस्मृती, याज्ञवल्क्यस्मृती आणि भगवद्‌गीता ह्यांच्यातील श्लोकांशी जुळणारे अनेक श्लोक आहेत. असे श्लोक त्या ग्रंथांतून विष्णुधर्मसूत्रात घेतले असावेत. कारण मनुस्मृती, याज्ञवल्क्यस्मृती आणि भगवद्‌गीता यांनी त्यांच्या तुलनेने कमी महत्त्वाच्या अशा विष्णुधर्मसत्रातून असे श्लोक उतरून घेतले असावे असे म्हणणे अतिशय अशक्यकोटीतील वाटते. मनुस्मृती [उदाहरणार्थ, विष्णु २३-५० हा श्लोक मनु ५·१३१ सारखा आहे आणि त्यात 'मनुरब्रवीत्' ह्याच्याजागी 'तत्परिकीर्तितम्' असे शब्द घातले आहेत.] आणि भगवद्‌गीता [विष्णु २०· ४८।४९ आणि ५१।५२ हे श्लोक भगवद्‌गीता २·१३, २३, २४, २८ ह्यांच्यासारखे आहेत.] ह्यातील ज्या श्लोकात 'मनु' अथवा 'कौंतेय', 'भारत' अशासारखे शब्द आहेत. त्या श्लोकांशी समान असणाऱ्या विष्णुधर्मसूत्रामधील श्लोकात त्या सूत्राच्या भूमिकेला जुळण्याकरिता 'वसुधे', 'भाविनि' असे पृथ्वीवाचक शब्द घातले आहेत. विष्णु धर्मसूत्रामधील शेकडो गद्यभाग याज्ञवल्क्यस्मृ [विष्णु ६· ४१ = याज्ञ. २· ५३, विष्णु ८· ३८ = याज्ञ २· ७९ इ०] तीमधील गद्यभागाशी समान आहे. विष्णुधर्मसूत्रात असे पुष्कळ विषय आहेत की ते याज्ञवल्क्यस्मृतीत नाहीत. ह्यावरून असा तर्क होतो की उपलब्ध विष्णुधर्मसूत्र याज्ञवल्क्यस्मृतीच्या मागून झाले असावे.

याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीकेत विश्वरूपाने विष्णुस्मृतीचा उल्लेख केला आहे आणि तो विष्णुधर्मसूत्राला अनुलक्षून असावा. मनुस्मृतीवरील टीकेत मेघातिथीने विष्णुधर्मसूत्रातील काही अवतरणे

उद्धत केली आहेत. मिताक्षरा, अपरार्क आणि स्मृतिचन्द्रिका ह्यांनीही विष्णुधर्मसूत्रातील बरीच अवतरणे उद्धृत केली आहेत.

विष्णुधर्मसूत्रात सर्व वेदसंहिता आणि ऐतरेय ब्राह्मण यांतील अवतरणे घेतली असून वेदांगे, इतिहास, धर्मशास्त्र, पुराणे ह्यांचे उल्लेख केले आहेत. विष्णुधर्मसूत्रात पितरांनी गायिलेल्या गाथा अशी संज्ञा असलेले पुष्कळ श्लोक उद्धृत केले असून त्यांचे अनुशासनपर्वातील पितरांच्या गाथांशी अतिशय साम्य आहे.

विष्णुधर्मसूत्रात काठकसंहितेमधील मंत्र आणि काठकगृह्यसूत्रातील सूत्रे घेतली असल्यामुळे तो ग्रंथ काठकशाखेचा मान्य ग्रंथ असावा आणि काठकशाखेचे मूलस्थान काश्मीर आणि पंजाब ह्या देशात असल्यामुळे विष्णुधर्मसूत्र हा ग्रंथही त्या देशात झाला असावा. विष्णुधर्मसूत्रात जो प्राचीन भाग आहे त्याची रचना ख्रि. पू. ३०० ते ख्रि. पू. १०० ह्या कालखंडात झाली असावी असे म्हणता येईल. कुमारिलभट्टानी तंत्रवार्तिकात कोणत्या विशिष्ट शाखेचे लोक कोणत्या विशिष्ट धर्मसूत्रांचा अभ्यास करतात ह्याबद्दलची जी माहिती दिली आहे त्यात विष्णुधर्मसूत्राचा उल्लेख केलेला नाही ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. विष्णुधर्मसूत्रातील प्राचीन भागाच्या रचनेनंतर त्या सूत्राची वैष्णव सांप्रदायाला अनुसरून समग्र पुनर्रचना करण्यात येऊन गद्यमय आणि पद्यमय मोठेमोठे भाग त्यात घालण्यात आले असावेत आणि हा प्रकार इ. स. च्या तिसऱ्या शतकानंतर बराच काळ गेल्यावर झाला असला पाहिजे. आठवड्यातील वारांचा उल्लेख त्या सूत्रात केला आहे. ह्यावरून विष्णुधर्मसूत्र तुलनेने अलिकडील काळात झाले असावे असे ठरते.

विष्णुधर्मसूत्रातील ३५ ते ४२ ह्या अध्यायातील सर्व गद्यभाग मिताक्षरेने बृहद्विष्णूचा म्हणून उद्धृत केला आहे. दुसऱ्याही एके ठिकाणी मिताक्षरेने विष्णुधर्मसूत्रातील सूत्रे बृहद्विष्णूची म्हणून उद्धृत केली आहेत.

आनंदाश्रमाने प्रसिद्ध केलेल्या स्मृतिसंग्रहात एक लघुविष्णुस्मृती आहे. तिच्यात ५ अध्याय असून ११४ श्लोक आहेत आणि त्यात वर्णांच्या आणि चार आश्रमांच्या कर्तव्यांविषयी विवेचन केले आहे. पराशरमाधवीय ह्या ग्रंथात गद्यविष्णूची आणि पद्यविष्णूची अनेक अवतरणे उद्धृत केली आहेत. त्यातील एका अवतरणावरून गद्यविष्णु आणि विष्णुधर्मसूत्र एकच असावेत असे दिसते. विष्णूची पुष्कळ सूत्रे त्यांच्यावरील भारुचीच्या टीकेसह सरस्वतीविलासात उद्धृत केली आहेत. ती सर्व सूत्रे विष्णुधर्मसूत्राच्या छापील प्रतीत आढळत नाहीत.

विष्णुधर्मसूत्रावर नंदपंडिताने वैजयंती नावाची टीका केली होती. तसेच वर उल्लेख केल्याप्रमाणे भारुचीनेही त्या सूत्रांवर टीका लिहिली असण्याचा संभव आहे.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण १०

## हाराताचे धर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. ७०– ७५)

मागील प्रकरणापर्यंत छापलेल्या आणि सुप्रसिद्ध अशा धर्मसूत्रांपैकी प्रमुख धर्मसूत्रांचे विवेचन करण्यात आले. दुसरी काही धर्मसूत्रे फक्त दुर्मिळ अशा हस्तलिखित पोथ्यात मिळतात आणि काही धर्मसूत्रे अद्यापि उपलब्ध झालेली नसून दुसऱ्या ग्रंथांनी घेतलेल्या अवतरणांवरून त्यांची जुळणी करावी लागते. अशा धर्मसूत्रांपैकी एक दोन प्रमुख ग्रंथांचा आता विचार करण्यात येईल. प्रस्तुत प्रकरणात हारीताच्या धर्मसूत्राची माहिती देऊन पुढील प्रकरणात शंख-लिखितांच्या धर्मसूत्रांचे विवेचन करण्यात येईल.

बौधायन, आपस्तम्ब आणि वसिष्ठ ह्यांनी आपल्या धर्मसूत्रात हारीताची सूत्रे प्रमाणभूत वचने म्हणून उद्धृत केली आहेत. ह्यावरून हारीत हा एक प्राचीन काळचा धर्मसूत्रकार होता ही गोष्ट पूर्णपणे सिद्ध होते. इतर ग्रंथकारांपेक्षा आपस्तम्बाने हारीताची अवतरणे अधिक वेळा उद्धृत केली आहेत. ह्यावरून असा निष्कर्ष काढता येईल की ते दोघेही एकाच वेदाचे अनुयायी असावेत. तंत्रवार्तिकात गौतम प्रभृती धर्मसूत्रकारांच्या बरोबर हारीताचा उल्लेख केला आहे. विश्वरूपापासून अगदी अलीकडील काळातील धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांपर्यंत अनेक ग्रंथकारांनी हारीताच्या धर्मसूत्रातील विस्तृत अवतरणे उद्धृत केली आहेत. त्या अवतरणांवरून असे दिसते की हारीताचे धर्मसूत्र अत्यंत विस्तृत असावे.

हारीत धर्मसूत्राच्या नाशिक येथे सापडलेल्या एका हस्तलिखित प्रतीचे वर्णन डॉ. जॉली यांनी केले आहे. त्यात असे म्हटले आहे की ते हस्तलिखित अत्यंत अशुद्ध होते; त्यात ३० अध्याय होते; त्यातील भाषा आणि त्यातील विषय एवढ्यांचा विचार केल्यास तो ग्रंथ प्राचीन काळचा असावा असा ग्रह होतो; परंतु अलिकडील काळच्या निबंधग्रंथांत उद्धृत केलेले काही उतारे त्या प्रतीत आढळत नाहीत.

हारीताच्या धर्मसूत्रातील अवतरणात आणि मैत्रायणीय परिशिष्ट आणि मानवश्राद्धकल्प ह्यांच्यात विलक्षण साम्य आढळते. ह्यावरून असे अनुमान होते की, हारीत हा कृष्ण यजुर्वेदाचा सूत्रकार असावा. काश्मिरी भाषेतील 'कफल्ल' ['पालङ्क्या-नालिका....... भूस्तृण-कफेल्ल-माष-मसूर कृतलवणानि च श्राद्धे न दद्यात्' हारीताचे सूत्र.] हा शब्द हारीताच्या सूत्रात आला आहे. ह्यावरून हारीतधर्मसूत्राची निर्मिती बहुधा काश्मिरात झाली असावी असे वाटते.

निबंधग्रंथात उद्धृत केलेल्या हारीताच्या धर्मसूत्रातील अवतरणांवरून असे दिसते की इतर धर्मसूत्रात आलेल्याच विषयांवर विस्तृत विवेचन त्या धर्मसूत्रात केले होते. मनुस्मृतीवरील टीकेत कुल्लूकाने असे वर्णन केले आहे की हारीत धर्मसूत्रातील प्रारंभीची सूत्रे पुढीलप्रमाणे होती: 'अथातो धर्म व्याख्यास्यामः । श्रुतिप्रमाणको धर्मः । श्रुतिश्च द्विविधा वैदिकी तांत्रिकी च ।' अशाच तऱ्हेची भाषाशैली इतरही अवतरणात वापरलेली आहे.

अनुक्रमणिका

हारीताने सर्व वेदांतील अवतरणे भेदभाव न करता उद्धृत केली आहेत त्यामुळे तो कोणत्या विशिष्ट वेदाचा अनुयायी होता हे समजत नाही. तंत्रवार्तिकात कुमारिलभट्टानी हारीत हा एक प्राचीन धर्मसूत्रकार असल्याचे म्हटले असले तरी त्याचा कोणत्याही विशिष्ट शाखेत समावेश केला नाही ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. इतर बहुतेक धर्मसूत्रांप्रमाणेच हारीताच्या धर्मसूत्रात मधूनमधून श्लोक घातले आहेत. परंतु निबंधग्रंथांत हारीताचे म्हणून उद्धृत केलेले पुष्कळ श्लोक उघडपणे अर्वाचीन काळचे आहेत. उदाहरणार्थ स्मृतिचन्द्रिकेत [स्मृतिचं. ३ पा. ३४४.] उद्धृत केलेल्या हारीताच्या एका श्लोकात राशींचा उल्लेख केला आहे. ह्यावरून तो विशिष्ट श्लोक अलिकडील काळातील असल्याचे दिसून येते.

जीवानंदाच्या स्मृतिसंग्रहात एक लघुहारीतस्मृति आणि एक वृद्धहारीत स्मृति आहे. लघुहारीत स्मृतीत ७ अध्याय असून सुमारे २५० श्लोक आहेत आणि त्यात चार वर्णांच्या आणि आश्रमांच्या कर्तव्यांचे आणि योगाचे विवेचन केले आहे. वृद्धहारीतस्मृति उघडपणे वैष्णव सांप्रदायाची आहे आणि तिच्यात ८ अध्याय असून सुमारे २६०० श्लोक आहेत. ती स्मृति हारीताने अम्बरीषाला सांगितली असल्याचे तिच्यात वर्णन केले आहे. आनंदाश्रमाच्या संग्रहातील वृद्धहारीतस्मृतीत ११ अध्याय आहेत आणि त्यात जीवानंदाच्या प्रतीतील पहिल्या दोन अध्यायाचे पांच अध्याय केले आहेत. श्लोकबद्ध वृद्धहारीतस्मृतीत मनु, याज्ञवल्क्य, नारद आणि कात्यायन ह्यांचे उल्लेख असल्यामुळे तो ग्रंथ तुलनेने अलिकडील काळात झाला असल्याचे सिद्ध होते. आनंदाश्रमाच्या संग्रहामधील लघुहारीत स्मृतीमध्ये ११७ श्लोक आहेत आणि ती स्मृती जीवानंदाच्या संग्रहातील स्मृतीहून भिन्न आहे.

————

अनुक्रमणिका

## प्रकरण ११

# शख—लिखितधर्मसूत्र

(मू. ग्रं. पा. ७५—७९)

तन्त्रवार्तिकात [पृ. १९ वरील टीप पहा.] असे सांगितले आहे की शंखलिखितांच्या धर्मसूत्राचे अध्ययन प्रामुख्याने (शुक्ल यजुर्वेदातील) वाजसनेयी शाखेचे लोक करीत असत. याज्ञ. (१·५) मध्ये धर्मशास्त्रकारांच्या नावांत शंखलिखितांचा समावेश केला आहे. कृत, त्रेता, द्वापर आणि कलि ह्या चार युगात धर्माच्या बाबतीत अनुक्रमे मनु, गौतम, शंखलिखित आणि पराशर ह्यांनी केलेल्या नियमांना अधिक प्रामाण्य असते असे पराशरस्मृतीत (१·२४) सांगितले आहे. निरनिराळ्या पुराव्यावरून असे सिद्ध होते की शंखलिखितांचे धर्मसूत्र प्राचीन काळचे आहे, ते सर्वस्वी नसले तरी बहुतेक गद्यात आहे आणि अद्यापपर्यंत जरी ते उपलब्ध नसले तरी एकेकाळी ते लोकांना सहज मिळू शकत असे.

निबंधग्रंथांत उद्धृत केलेल्या शंख-लिखितांच्या धर्मसूत्रातील अवतरणांवरून त्या धर्मसूत्राची भाषाशैली आणि त्यातील विषय इतर उपलब्ध धर्मसूत्रांशी बरेच जुळते असावेत असे दिसते. गौतम अथवा आपस्तम्ब ह्यांनी ज्या विषयांचे विवेचन केले आहे ते बहुतेक सर्व विषय शंखलिखितांच्या धर्मसूत्रात समाविष्ट झाले आहेत. उद्धृत केलेल्या अवतरणात व्याकरणदृष्ट्या अशद्ध रूपे बहुधा आढळत नाहीत. याज्ञ. स्मृतीत प्राचीन धर्मशास्त्रकारांची जी यादी दिली आहे त्यात शंखलिखितांचा समावेश केला आहे. ह्या गोष्टीवरून तसेच त्या धर्मसूत्राच्या सर्वसाधारण भाषाशैलीवरून आणि त्यात वर्णन केलेल्या सिद्धान्तावरून जवळजवळ निश्चित स्वरूपाचा असा निष्कर्ष निघतो की उपलब्ध याज्ञ.स्मृति शंखलिखितांच्या धर्मसूत्रांच्या नंतर बऱ्याच काळांनी झाली असावी. स्मृतिकारांच्या यादीत शंखाने याज्ञवल्क्याचा उल्लेख केला आहे. परंतु तो उल्लेख उपलब्ध याज्ञवल्क्यस्मृतीला अनुलक्षून असण संभवनीय वाटत नाही.

शंख-लिखितांच्या गद्य अवतरणांत वेदाङ्गे, सांख्य, योग, धर्मशास्त्र यांचे उल्लेख आले आहेत. त्यांत वर्णन केलेल्या तर्पणात धर्मशास्त्रावरील वीस ग्रंथकारांचा निर्देश केला आहे. प्रजापती, अंगिरस्, उशना, प्राचेतस, वृद्ध गौतम ह्या ग्रंथकारांच्या मतांचा नामनिर्देशपूर्वक उल्लेख केला आहे. ह्या सर्व गोष्टींवरून असा निष्कर्ष निघतो की शंखलिखितांचे धर्मसूत्र बहुधा गौतम आणि आपस्तम्ब ह्यांच्यामागून परंतु याज्ञवल्क्यस्मृतीच्या अगोदर म्हणजे ख्रि. पू. ३०० ते इ. स. १०० ह्या कालखंडात झाले असावे.

शंखलिखितांच्या धर्मसूत्रावरील एका टीकेचा उल्लेख लक्ष्मीधराने (इ.स. ११००—११६०) आपल्या कल्पतरू ह्या ग्रंथात केला आहे. विवादरत्नाकर (इ.स. १३१४) ह्या ग्रंथातही शंखलिखितांच्या भाष्यकाराचा उल्लेख केला असून विवादचिंतामणी ह्या ग्रंथात शंखलिखितांच्या धर्मसूत्रावरील भाष्यकाराच्या भाष्यातील एक अवतरण उद्धत केले आहे.

जीवानंदान १८ अध्याय आणि सुमारे ३३० श्लोक असलेली एक शंखस्मृती छापली आहे आणि सुमारे ९३ श्लोक असलेली एक लिखितस्मृती छापली आहे. आनंदाश्रमाच्या संग्रहात ७१ श्लोक असलेली एक लघुशंखस्मृती आहे, आणि ३२ श्लोक असलेली एक लिखितस्मृती आहे. ते सर्व ग्रंथ अलिकडील

काळात झालेले आहेत. कदाचित १८ अध्याय असलेली शंखस्मृती ह्याला अपवाद असू शकेल. १८ अध्याय असलेल्या स्मृतीतील सुमारे ५० श्लोक मिताक्षरेने उद्धृत केले आहेत आणि त्या ग्रंथामधील काही गद्यभाग मेधातिथीने उद्धृत केला आहे. शंखस्मृति शंखाच्या धर्मसूत्राच्या आधाराने रचलेली असून तिच्यात त्या धर्मसूत्रातील काही गद्यभाग पद्यात रूपांतर करून समाविष्ट केला असावा अथवा त्याच्याशी जुळता मजकूर त्या स्मृतीत घातला असावा असे वाटते. श्लोकबद्ध शंखस्मृतीची प्रवृत्ती अधिक कडक स्वरूपाचे नियम सांगण्याकडे आहे.

______

**अनुक्रमणिका**

# प्रकरण १२

## मानवधर्मसूत्र एके काळी खरेच अस्तित्वात होते काय?

(मू. ग्रं. पा. ७९—८५)

हारीताचे धर्मसूत्र आणि शंखलिखितांचे धर्मसूत्र ह्यांच्या संपूर्ण प्रती उपलब्ध नसल्या तरी त्यांची इतकी अवतरणे इतर ग्रंथात उद्धृत केलेली आढळतात की त्यांवरून ती धर्मसूत्रे एके काळी अस्तित्वात होती ह्याविषयी संशय राहात नाही. मानवधर्म सूत्राचा प्रकार वेगळा आहे. मॅक्समुल्लर आणि वेबर ह्या पाश्चिमात्य संस्कृत पंडितांनी अशी एक कल्पना मांडली आहे की प्राचीन काळी मानवधर्मसूत्र ह्या नावाचा एक ग्रंथ अस्तित्वात होता आणि त्या ग्रंथाची सुधारणा करून अथवा पुनर्रचना करून सध्या उपलब्ध असलेली मनुस्मृती तयार करण्यात आली. हे मत अद्यापिही पाश्चिमात्य संस्कृत पंडितात प्रचलित आहे. ह्याकरिता ह्या मताला आधार म्हणून सांगण्यात येणाऱ्या प्रमुख कारणांचा थोडक्यात विचार प्रस्तुत प्रकरणात करावयाचा आहे.

वसिष्ठधर्मसूत्रात [वसिष्ठ ध. सू. (४· ५।८),] एके ठिकाणी 'मानवा' च्या काही विशिष्ट मतांचा उल्लेख केला असून त्यानंतर दोन श्लोक आणि काही गद्यमय उद्धृत केला आहे. उपलब्ध मनुस्मृती संपूर्ण श्लोकबद्ध आहे. तेव्हा ती गद्य अवतरणे मानवधर्मसूत्रातून उद्धृत केली असल्याचे मानले पाहिजे असे एक कारण सांगण्यात येते. त्या मुद्यावर असे उत्तर देता येईल की वसिष्ठधर्मसूत्रातील 'मानव' हा शब्द मनुस्मृतीला अनुलक्षून घातला आहे. तंत्रवार्तिकात आणि विश्वरूपाच्या टीकेतही 'मानव' हा शब्द तशाच अर्थाने योजला आहे. त्या सूत्रानंतरच्या दोन सूत्रांत मनूचे दोन [मनु. ५· ४१ आणि ५·४८.] श्लोक उद्धृत केले असून त्यांतील मताला आधार म्हणून एका ब्राह्मणग्रंथातील गद्य उतारा दिला आहे.

वसिष्ठधर्मसूत्रात मनूच्या म्हणून उद्धृत केलेल्या काही अवतरणातील मतांसारखी मते उपलब्ध मनुस्मृतीमध्ये आढळत नाहीत, अथवा ती मते उपलब्ध मनुस्मृतीतील मतांच्या विरुद्ध आहेत. तसेच अशा अवतरणात एके ठिकाणी [वसि. १९· ३७·] एक श्लोक असून तो अनुष्टुभ छंदातील नाही आणि त्या श्लोकाच्या समान अर्थाचा श्लोक मनुस्मृतीत नाही. असा एक मुद्दा वरील तर्काला आधार म्हणून सांगण्यात येतो. मनुस्मृतीतील श्लोकांशी जुळणारे पुष्कळ श्लोक वसिष्ठधर्मसूत्रात आले आहेत. मनूची म्हणून म्हटलेली पुष्कळ अवतरणे मनुस्मृतीत आढळतात. तेव्हा काही थोडी अवतरणे उपलब्ध मनुस्मृतीत मिळत नाहीत एवढ्याच गोष्टीवरून वसिष्ठधर्मसूत्रे लिहितेवेळी वसिष्ठांच्या समोर मनुस्मृती नसून मानवधर्मसूत्रेच होती असा निष्कर्ष एकदम काढता येणार नाही. त्याप्रमाणेच त्रिष्टुभछंदामधील तो श्लोक अथवा त्याच्या समानार्थी श्लोक मनुस्मृतीत आढळत नाही एवढ्याच आधारावर काहीही सिद्धान्त काढता येणार नाही

कामंदकीय नीतिसूत्रात राजाने वेद, वार्ता आणि दंडनीति ह्या तीन विद्यांचे अध्ययन करावयाचे असते असे मानवाचे मत असल्याचा उल्लेख केला आहे आणि 'आन्वीक्षिकी' अशी संज्ञा असलेली विद्या 'त्रयी' म्हणजे वेद विद्येचेच एक अंग आहे असेही मानवाचे मत असल्याचे सांगितले आहे. परंतु मनुस्मृती [त्रैविद्येभ्यस्त्रयी विद्यां दण्डनीतिं च शाश्वतीम् ।
आन्वीक्षिकीं चात्मविद्यां वार्तारम्भांश्च लोकतः ॥ मनु ७· ४३·] मध्ये राजाने अध्ययन करावयाच्या चार पृथक् विद्या असल्याचे सांगितले आहे. ह्या मुद्याचा असा खुलासा करता येईल की राजाने अध्ययन करावयाच्या

अनुक्रमणिका

विद्यांच्या संख्येच्या बाबतीत कामंदकीयनीतिसूत्रात उल्लेख केलेल्या 'मानवा' च्या मतात आणि मनुस्मृतींच्या मतात विरोध नाही. 'आन्वीक्षिकी' ही चवथी विद्या असल्याचे कोणी कोणी मानतात ही गोष्ट मानवग्रंथाला माहीत होती परंतु त्या विद्येचा वेदांच्या अध्ययनात समावेश होतो असे त्यात सांगितले आहे. त्या विद्यांचे अध्ययन कोणाजवळ करावे एवढेच मनुस्मृतीत सांगितले आहे.

आपस्तम्ब, बौधायन आणि हिरण्यकेशी ह्यांचे गृह्य, श्रौत आणि धर्मसूत्रे असलेले संपूर्ण कल्प आहेत; मानवगृह्यसत्रे आणि मानवश्रौतसूत्रे आहेत त्याअर्थी त्याचेही धर्मसूत्र अस्तित्वात असले पाहिजे असाही एक मुद्दा मांडण्यात येतो. दक्षिण भारतात उत्पन्न झालेल्या आणि अस्तित्वात असलेल्या आपस्तम्ब, बौधायन आणि हिरण्यकेशी ह्या कृष्ण यजुर्वेदाच्या तीन चरणांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही वेदाच्या एकाद्या चरणात त्या सूत्रचरणाच्या संस्थापकाच्या नावाने प्रसिद्ध असलेली धर्मसूत्रे उपलब्ध नाहीत. असे का झाले असावे ह्याची उपपत्ती पुढीलप्रमाणे सांगता येईल. ब्राह्मणांनी जेव्हा दक्षिण भारतात वसाहत केली तेव्हा आरंभीच्या काळात त्यांच्या आजूबाजूला परकीय संस्कृती आणि परकीय चालीरीती ह्यांचे प्राबल्य होते. त्यामुळे दक्षिण भारतात वास्तव्य करणाऱ्या कृष्ण यजुर्वेदी शाखेच्या आर्य लोकांच्या सर्वसाधारण आचारांच्या बाबतीत स्पष्ट नियम घालून देणे अवश्य होते. तशा प्रकारची आवश्यकता उत्तर भारतात भासत नव्हती. कारण त्या प्रदेशात प्रचलित असणाऱ्या सूत्रचरणांच्या अनुयायांना दैनंदिन व्यवहारात लागणाऱ्या आचारांची चांगली माहिती होती आणि त्यांच्या आजूबाजूचा समाज जवळजवळ एकजिनसी आणि समान ध्येयाचा आणि समान संस्कृतीचा होता. ह्याकरिता जेव्हा प्रत्येक चरणाकरिता श्रौत आणि गृह्यकृत्यांची वर्णने करणारे ग्रंथ प्रथम तयार करण्यात आले तेव्हा धर्मासंबंधी नियम सांगणारे वेगवेगळे सुव्यवस्थित ग्रंथ तयार केले पाहिजेत असे वाटले नाही. नेहमीच्या व्यवहारातील आचारासंबंधीचे काही नियम गृह्यसूत्रात घालण्यात आले, कारण गृह्यसत्रात विवेचन केलेल्या विषयांशी जुळते असे ते नियम होते. तथापि दक्षिण भारतातील यजुर्वेदाच्या आपस्तम्बप्रभृती चरणात अस्तित्वात असणाऱ्या संपूर्ण सूत्रग्रंथांची माहिती उत्तर आणि मध्य भारतात जेव्हा पसरली तेव्हा त्या प्रदेशात प्रचलित असणाऱ्या चरणांचे प्रमुख लोक आपापल्या चरणातील सूत्रग्रंथ सर्व विषयात परिपूर्ण करण्याकरिता धडपड करू लागले आणि निरनिराळ्या धर्मसूत्रांचा शोध करून त्यांचा आपल्या चरणातील ग्रंथात त्यांनी समावेश केला. ही गोष्ट तुलनेने बऱ्याच प्राचीन काळी झाली असली पाहिजे.

वरील विवेचनाचा विचार केल्यास मानवधर्मसूत्र एकेकाळी अस्तित्वात असल्याचे आणि उपलब्ध मनुस्मृती त्या धर्मसूत्राची पुनर्रचना करून बनविलेली असल्याचे उपलब्ध पुराव्यावरून सिद्ध होत नाही. मनुस्मृतीची पुनर्रचना झाली असण्याचा संभव असून त्यावेळी काही थोडे फेरफार करण्यात आले असतील. ह्यासंबंधी अधिक विवेचन पुढे मनुस्मृतीच्या प्रकरणात करण्यात येईल.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण १३

## कौटिलीय अर्थशास्त्र

(मू. ग्रं. पा. ८५-१०४)

अर्थशास्त्रावरील उपलब्ध ग्रंथांत कौटिलीय अर्थशास्त्र हा सर्वात जुना ग्रंथ आहे. अर्थशास्त्र आणि धर्मशास्त्र ह्या दोन शास्त्रांची उद्दिष्टे आणि ती प्राप्त करून घेण्याचे मार्ग भिन्न असल्याकारणाने ती दोन शास्त्रे परस्परविरोधी असल्याचे जरी पुष्कळवेळा मानण्यात येते तरी वास्तविक रीतीने पाहिल्यास अर्थशास्त्र हे धर्मशास्त्राचेच
[धर्मशास्त्रान्तर्गतमेव राजनीतिलक्षणमर्थशास्त्रमिदं विवक्षितम् ।
याज्ञ. २· २१ वरील मिताक्षरा टीका.] एक अंग आहे. कारण अर्थशास्त्रात राजाच्या कर्तव्यासंबंधी विवेचन केलेले असते आणि धर्मशास्त्रावरील पुष्कळ ग्रंथांतही राजाच्या कर्तव्यासंबंधी नियम सांगितलेले असतात. तसेच कौटिलीय अर्थशास्त्रात न्यायदानासंबंधी (धर्मस्थीय आणि कंटकशोधन ह्या नावांची) दोन प्रकरणे आहेत. ह्या सर्व कारणांकरिता धर्मशास्त्राच्या इतिहासाच्या प्रस्तुत ग्रंथात कौटिलीय अर्थशास्त्राचे विवेचन करणे योग्य होईल. शौनकाने केलेल्या चरणव्यूहामध्ये अर्थशास्त्र हा अथर्ववेदाचा एक उपवेद असल्याचे सांगितले आहे.

'जगावर [तस्याः पृथिव्या लाभपालनोपायः शास्त्रमर्थशास्त्रमिति । कौ. १५· १] स्वामित्व कसे मिळवावे आणि ते कसे राखावे ह्याविषयी उपाय सांगणे' हा अर्थशास्त्राचा उद्देश असल्याचे खुद्द कौटिल्याने सांगितले आहे. कौटिलीय अर्थशास्त्रावरून भारतातील लोकांच्या सामाजिक, आर्थिक, राजकीय आणि धार्मिक व्यवहारासंबंधी महत्त्वाची माहिती उपलब्ध होते. ह्या ग्रंथाची १५ अधिकरणे असून त्यात १५० अध्याय, १८० विषय आणि (३२ अक्षरांचा एक श्लोक ह्या गणनेने) ६००० श्लोक आहेत. शिवाय त्यांत मधूनमधून काही श्लोक आले आहेत. बहुतेक श्लोक अनुष्टुभ छंदातील आहेत, काही थोडे इंद्रवज्रा अथवा उपेंद्रवज्रा ह्या छंदांत आहेत. काही श्लोक दुसऱ्या ग्रंथांतून उद्धव केल्यासारखे स्पष्टपणे दिसते. परंतु कौटिलीय अर्थशास्त्रापूर्वी अर्थशास्त्रावर झालेल्या ग्रंथांविषयी काही माहिती उपलब्ध नसल्यामुळे त्या श्लोकांपैकी जुन्या ग्रंथांतून उद्धृत केलेले किती आणि कौटिल्याने स्वतः रचलेले किती हे सांगणे शक्य नाही. कौटिलीय अर्थशास्त्राची भाषाशैली सरळ आणि स्पष्ट आहे, वेदान्तसूत्रे आणि व्याकरणसूत्रे ह्यांच्यासारखी त्रोटक नाही. त्यात पारिभाषिक शब्दांचा आणि क्वचित वापरण्यात येणाऱ्या शब्दांचा बराच भरणा आहे. आणि सामान्यतः ती पाणिनीच्या व्याकरणाला अनुसरून आहे.

ह्या ग्रंथात आलेले मुख्य मुख्य विषय पुढीलप्रमाणे आहेत :

(१) राजा, मंत्री, पुरोहित, मंत्रीमंडळ, परराजांच्या दरबारी असणारे प्रतिनिधी, गुप्तहेर.
(२) राज्यकारभार, निरनिराळ्या खात्यांवरील अधिकारी, कर, जमाखर्च.
(३) न्यायदान, विवाह, स्त्रीधन.
(४) कंटकनिर्मूलन म्हणजे अपराध्यांना शासन, निरनिराळे अपराध, निरनिराळी शासने.
(५) राजद्रोह, आपत्काळी कोशात द्रव्यभरती करण्याचे मार्ग, राजसेवकांची वेतने.
(६) राजसत्तेची सात अंगे, राजनीती.

अनुक्रमणिका

(७) सभोवतालच्या राज्यांशी युद्ध, संधी इत्यादी संबंध.
(८) राजसत्तेमधील निरनिराळे दोष, राजावर आणि राज्यावर येणाऱ्या आपत्ती.
(९) दुसऱ्या राज्यांवर स्वारी करणे, युद्धसंबंधी योजना.
(१०) प्रत्यक्ष युद्धासंबंधी विचार, सैन्याची निरनिराळी अंगे, व्यूह.
(११) संस्था आणि व्यापारी संघटना.
(१२) बलवान शत्रूबरोबर वागावयाचे मार्ग.
(१३) परराज्यांसंबंधी डावपेच.
(१४) गुप्तसाधने, शत्रूचा वध करण्याकरिता उपाययोजना.
(१५) समारोप.

कौटिलीय अर्थशास्त्रात वर्णन केलेली न्यायदानपद्धती मनु, याज्ञवल्क्य, नारद ह्यांनी सांगितलेल्या पद्धतीशी जुळती आहे. त्यातल्या त्यात याज्ञवल्क्य [अभियुक्तो न प्रत्यभियुञ्जीत अन्यत्र कलहसाहससार्थसमवायेभ्यः। कौ. ३· १; ‘अभियोगमनिस्तीर्य नैनं प्रत्यभियोजयेत् । कुर्यात्प्रत्यभियोगं च कलहे साहसेषु च ॥ याज्ञ २· ९–१०.] स्मृतीतील विवेचनात आलेली शब्दरचना अर्थशास्त्राशी इतकी जुळती आहे की त्यांच्यापैकी कोणातरी एकाने दुसऱ्याच्या ग्रंथातून उसनवारी केली आहे असे मानणे भाग आहे. कायद्याच्या अनेक मुद्यांच्या बाबतीत याज्ञवल्क्याची मते कौटिलीयाच्या मतांपेक्षा अधिक प्रगत आहेत. ह्यावरून याज्ञवल्क्याचा ग्रंथ कौटिलीय अर्थशास्त्रानंतर अनेक शतकांनी झाला असला पाहिजे. मनुस्मृतीच्या जुन्या
[‘उक्तो नियोगो मनुना निषिद्धः स्वयमेव तु’ मनू ९· ६८
वरील कुल्लूकाच्या टीकेत उद्‌धृत केलेले बृहस्पतीचे अवतरण.] भागातील मते कौटिलीयाशी अधिक जुळती आहेत. ह्यावरून उपलब्ध मनुस्मृतीला प्रस्तुतचे स्वरूप प्राप्त होण्यापूर्वी अर्थशास्त्र झाले असले पाहिजे.

चाणक्य अथवा कौटिल्य अथवा विष्णुगुप्त ह्याने अर्थशास्त्रावर एक ग्रंथ रचला असल्याचे बऱ्याच प्राचीन काळापासून मानीत असत. विष्णुगुप्ताने दुसऱ्या कोणाच्या मदतीशिवाय नंदांचा पाडाव केला, चंद्रगुप्ताला पृथ्वी समर्पण केली आणि अर्थशास्त्ररूपी सागराचे मंथन करून त्यातून आपला राजनीतिशास्त्रावरील ग्रंथ हे सार काढले अशी विष्णुगुप्ताची थोरवी कामंदकीय नीतिसार [कामं. १·४।६·] ह्या ग्रंथात वर्णन केली असून कामंदक विष्णुगुप्ताला आपला गुरू [विद्याश्चतस्र एवैता इति नो गुरुदर्शनम् । कामं. २· ६·] मानीत असल्याचेही त्या ग्रंथात म्हटले आहे. तंत्राख्यायिका [चाणक्याय च महते नमोस्तु नृपशास्त्रकर्तृभ्यः। तन्त्राख्यायिका श्लो. २] ह्या ग्रंथात राजनीतिशास्त्रावरील एक ग्रंथकार म्हणून आर्यचाणक्याला नमन केले आहे आणि हा तंत्राख्यायिका ग्रंथ इ.स. ३०० च्या नंतरच्या काळात खात्रीने झालेला नाही. दंडीकृत दशकुमारचरितात आचार्य विष्णुगुप्ताने मौर्य राजाकरिता दंडनीतीचा संक्षेप ६००० श्लोकात केला होता असे म्हटले असून चाणक्याच्या ग्रंथातील अवतरणेही उद्धृत केली आहेत. खुद्द अर्थशास्त्रात [कौ. २·१०· घ. इ. ३] ह्या शास्त्राचा कर्ता कौटिल्य असल्याचे आणि राज्यकारभाराविषयीचे त्या ग्रंथातील नियम कौटिल्याने मौर्य राजाकरिता तयार केले असल्याचे सांगितले आहे. ग्रंथाच्या अखेरच्या श्लोकात असे म्हटले आहे की नंद राजापासून ज्याने रागाने पृथ्वी हिसकावून घेतली त्याने हे शास्त्र रचले आहे आणि एकाच शास्त्रावर निरनिराळे भाष्यकार भिन्नभिन्न प्रकारची भाष्ये करतात हे पाहून विष्णुगुप्ताने स्वतःच मूळ ग्रंथ लिहिला आणि त्यावर स्वतःच भाष्य लिहिले.

ह्या ग्रंथाच्या कर्त्याविषयी, त्याच्या अस्सलपणाविषयी आणि त्याच्या रचनाकालाविषयी बरेच मतभेद आहेत. अलेक्झांडरच्या समकाळी म्हणजे ख्रि. पू. ३२० च्या सुमारास होऊन गेलेल्या चंद्रगुप्त

मौर्यांच्या प्रख्यात मंत्र्याने हा ग्रंथ लिहिला नसावा. तसेच हा ग्रंथ एकट्यानेच लिहिलेला नसून एकाद्या सांप्रदायातर्फे तयार करण्यात आला असावा अशी मते काही पाश्चिमात्य संस्कृत पंडितांनी प्रदर्शित केली आहेत. चंद्रगुप्ताच्या मंत्र्याने हा ग्रंथ लिहिला नसावा ह्या मताला आधार म्हणून असे सांगण्यात येते की, चंद्रगुप्ताच्या साम्राज्यासारख्या विस्तृत साम्राज्याची ज्या मंत्र्याला स्थापना करावयाची होती आणि त्या साम्राज्यासंबंधी अनेक चिंतांनी त्याला व्यापले असल्यामुळे त्याला अशा तऱ्हेचा ग्रंथ लिहिण्याला वेळ मिळणे शक्य नव्हते. परंतु सायणाचार्य आणि माधवाचार्य ह्यांना ज्याप्रमाणे विजयनगरच्या साम्राज्याचा राज्यकारभार करीत असतानाही मोठमोठे ग्रंथ लिहिण्यास वेळ मिळाला त्याप्रमाणे चाणक्यालाही वेळ मिळू शकला असेल असे म्हणता येईल. ह्या ग्रंथात निरनिराळ्या विषयांची जी काळजीपूर्वक मांडणी केली आहे आणि रचनेत जो सुसंगतपणा राखला आहे त्यावरून हा संपूर्ण ग्रंथ कोणातरी एकाच अत्यंत बुद्धिमान पुरुषाच्या डोक्यातून निपजला असावा असे वाटते. मुद्राराक्षस ह्या नाटकात कौटिल्य हा शब्द 'कुटिल' (कपटी) ह्या शब्दापासून झाला असल्याचे सांगितले आहे आणि कोणीही ग्रंथकार आपली स्वतःची मते त्या नावाने सांगणार नाही अशीही एक शंका प्रदर्शित करण्यात येते. नंदाशी सामना करताना चाणक्याने जे उपाय योजले त्यावरून त्याला कौटिल्य ही संज्ञा मिळाली असणे असंभवनीय नाही, परंतु नंदाशी त्याने केलेले वर्तन स्वार्थी हेतूने केलेले नसून नंद ह्या जुलमी राजाच्या सत्तेतून देशाची मुक्तता करण्याकरिता तसे वर्तन केले असल्यामुळे लोकांनी दिलेले ते टोपण नाव चाणक्याला आवडू लागले असण्याचाही संभव आहे. काही हस्तलिखित प्रतीत कौटल्य असाही शब्द आहे. तसेच कुटल, कोटली आणि कौटिल्य ह्या नावाची गोत्रे आहेत. ह्या प्रकरणात उल्लेख केलेल्या अंतर्गत आणि बाह्य पुराव्यावरून हा ग्रंथ चंद्रगुप्ताच्या मंत्र्याने ख्रि. पू. ३०० च्या सुमारास लिहिला असल्याची जी परंपरागत आख्यायिका आहे तिला दुजोराच मिळतो.

कौटिलीयाच्या कर्त्याला चार वेदांची माहिती होती. अथर्ववेदातील वशीकरणाची आणि मंत्रांची माहिती होती. वेदांच्या सहा अंगात त्याने पुराणांचा समावेश इतिहासात केला आहे, धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र, सांख्य, योग आणि लोकायत हे सांप्रदाय, मौहुर्तिक, कारान्तिक (भविष्यवादी), गुरू आणि शुक्र, धातुशास्त्र इत्यादिकांचे त्यात उल्लेख केले आहेत. संस्कृत ही त्यावेळी राज्यकारभाराची भाषा होती. कौटिल्याला वनस्पतींची आणि औषधींची आश्चर्यकारक माहिती होती असे दिसते. त्याने पाऱ्यापासून तयार केलेले विष देणाऱ्याचा, पाऱ्यात मिसळलेल्या सोन्याचा ['रसः काञ्चनिकाः' कौ. २· १२·] आणि हिंगुलुक ह्यांचे उल्लेख केले आहेत. अर्थशास्त्रातील धर्मस्थीय ह्या विभागात ज्या ग्रंथकारांचा किंवा सांप्रदायांचा उल्लेख केला आहे त्यात मानव ह्या ग्रंथकाराखेरीज फक्त बृहस्पत्य आणि औजनस ह्यांचीच नावे आहेत. गौतम, आपस्तम्ब, बौधायन, वसिष्ठ, हारीत ह्यांच्यासारख्या प्रख्यात आणि प्राचीन सूत्रकारांचा कौटिलीयात कोठेही नामनिर्देश केलेला नाही.

आतापर्यंत कौटिलीयावरील दोन टीका सापडल्या आहेत. एक टीका भट्टस्वामीने केलेली प्रतिपदपंचिका असून दुसरी माधवयज्वनकृत नयचन्द्रिका ही आहे. दोन्ही टीका त्रुटित आहेत आणि छापल्या गेल्या आहेत.

चाणक्याच्या नावाने प्रसिद्ध असलेले अनेक नीतिसंग्रह अस्तित्वात असून ते छापले गेले आहेत. ते सर्व संग्रह कौटिलीय ह्या ग्रंथाच्या नंतर झालेले असून त्यात म्हणींचा आणि सुभाषितांचा भरणा असतो. अशा संग्रहांपैकी चाणक्य राजनीति ह्या नावाच्या ग्रंथात ६६० श्लोक आहेत आणि तो भोज राजा ह्याने रचला आहे. दुसरे अनेक संग्रह वृद्ध चाणक्य, लघु चाणक्य इत्यादींच्या नावाने प्रसिद्ध आहेत.

अनुक्रमणिका

## प्रकरण १४

# इतर सूत्रग्रंथ

(मू. ग्रं. पा. १०७-१३१)

धर्मासंबंधी जे काही थोडे सूत्रग्रंथ फक्त हस्तलिखित स्वरूपात आहेत अथवा ज्या सूत्रग्रंथातील अवतरणांवरून ज्यांच्या अस्तित्वाची कल्पना करावी लागते त्यांपैकी हारीत, शंखलिखित ह्या दोन ग्रंथांची माहिती मागे देऊन झाली. त्याप्रमाणेच मानवधर्मसूत्र ह्या विवादित ग्रंथाबद्दलही विवेचन एका प्रकरणात केले. आता इतर सूत्रग्रंथांविषयी थोडक्यात विवेचन ह्या प्रकरणात करण्यात येईल. ह्या प्रकरणात उल्लेख केलेले ग्रंथ, गौतम, आपस्तम्ब प्रभृती ग्रंथकारांच्या धर्मसूत्रांच्या इतके जुन्या काळचे असतीलच असे नाही आणि ते मनु, याज्ञवल्क्य ह्यांच्या स्मृतींच्या पूर्वी झालेले असतील असेही नाही. तथापि धर्मशास्त्रावरील सर्वच प्राचीन ग्रंथांचे रचनाकाल काहीशा अनिश्चित स्वरूपाचे असल्यामुळे सूत्ररूपाने लिहिलेल्या सर्व ग्रंथांचा ह्या प्रकरणात समावेश केला आहे. त्यांच्यापैकी काही काही ग्रंथ श्लोकबद्ध ग्रंथांच्या नंतरच्या काळातही रचले असण्याचाही संभव आहे. अशा ग्रंथकारांचा निर्देश कालानुक्रमाने न करता अकारविल्हेने केला आहे :

### **१. अत्रि** (मू. ग्रं. पा. १०७)

अत्रीच्या मताचा उल्लेख मनुस्मृतीत केला आहे. ह्यावरून अत्रि हा धर्मशास्त्रावरील एक प्राचीन ग्रंथकार होता हे सिद्ध होते. ९ अध्याय असलेल्या आत्रेय धर्मशास्त्राच्या अनेक प्रती डेक्कन कॉलेजच्या संग्रहात आहेत. त्या ग्रंथात दाने, जप आणि तप ह्यांचे विवेचन केले असून त्यातील काही अध्यायात गद्य आणि पद्य भागांचे मिश्रण आहे. त्याची भाषाशैली पुढील काळात झालेल्या भाष्य आणि टीका ग्रंथांच्या भाषेसारखी आहे.

ह्या सूत्रग्रंथाखेरीज अत्रिस्मृती, अत्रिसंहिता, लघु अत्रिस्मृती, वृद्धात्रेयस्मृती इत्यादी नावाचे श्लोकबद्ध ग्रंथ उपलब्ध आहेत.

### **२. उशनस (शुक्र)** (मू. ग्रं. पा. ११०)

महाभारतात [श्लोकौ चोशनसागीतौ पुरा तात महर्षिणा । शान्ति ५६· २८ भगवानुशनाचाह श्लोकमत्र विशांपते । शान्ति. ५७–२ इत्यादि.] उशनसाने राजनीतिशास्त्रावर ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आहे. जनमेजयाच्या नीतिप्रकाशिका ['ब्रह्मा महेश्वरः...... । बृहस्पतिश्च शुक्रश्च भारद्वाजोमहातपाः । ... । एते हि राजशास्त्राणां प्रणेतारः परंतपाः' जनमेजयकृत नीतिप्रकाशिका.] ह्या ग्रंथात राजशास्त्राच्या अतिविस्तीर्ण ग्रंथाचा संक्षेप करणाऱ्या आचार्यात शुक्राचा समावेश केला आहे. राजनीतिशास्त्रावरील उशनसाच्या ग्रंथाचा दुसऱ्याही ग्रंथकारांनी उल्लेख केला असून त्यातील अवतरणे उद्धृत केली आहेत. परंतु हा राजनीतिशास्त्रावरील उशनसाचा सूत्रग्रंथ अद्यापि उपलब्ध झालेला नाही. डेक्कन कॉलेजाच्या संग्रहात औशनस धर्मशास्त्राच्या दोन हस्तलिखित प्रती आहेत. त्यात काही श्लोक असून त्यात इतर धर्मसूत्रातल्या सारखेच विषय आले आहेत. गौतमधर्मसूत्रावरील टीकेत हरदत्ताने उद्धृत

केलेल्या अवतरणावरून आणि स्मृतिचंद्रिकेतील उल्लेखावरून असे दिसून येते की धर्माच्या आचार, व्यवहार आणि प्रायश्चित्त ह्या सर्व शाखांचे विवेचन असलेला उशनसाचा एक सूत्रग्रंथ त्या ग्रंथांच्या रचनाकाळी उपलब्ध होता. सदरहू सूत्रग्रंथ गौतम आणि वसिष्ठ ह्यांच्या धर्मसूत्रांच्या आणि मनुस्मृतीच्याही नंतर झालेला असावा. जीवानंदाच्या स्मृतिसंग्रहात ५१ श्लोक असलेले एक औशनस धर्मशास्त्र दिले आहे.

शुक्रनीतिसार नावाचा एक ग्रंथ सन १८८२ मध्ये प्रसिद्ध झाला आहे. तो ग्रंथ तुलनेने अलीकडील काळात झालेला आहे.

### ३. कण्व आणि काण्व. (मू. ग्रं. पा. ११६).

हे धर्मशास्त्रावरील दोन पृथक् ग्रंथकार होते असे आपस्तम्बधर्मसूत्रावरून दिसून येते. स्मृतिचंद्रिकेत आह्निक आणि श्राद्ध ह्या विषयावरील कण्वाची वचने काही थोड्या ठिकाणी उद्धृत केली आहेत. त्यांपैकी एक अवतरण [अध्वरे वेदेतिहासपुराणानीति ध्यायन् ब्राह्मेण तीर्थेनौष्ठ्योः सलोमदेशमुन्मृजेत् । स्मृतिचं. १ पा. ९७ वरील कण्वाचे अवतरण.] गद्यात आहे. दुसऱ्याही काही ग्रंथात [गौ. ध. सू, २१, ३ वरील हरदत्ताची टीका, आचारमयूख, श्राद्धमयूख इ०.] कण्वाची अवतरणे उद्धृत केली आहेत. मद्रास सरकारच्या ओरिएंटल ग्रंथसंग्रहालयात (खंड ५ पा. १९२९ क्र. २६२४) कण्वाच्या ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत आहे.

### ४. कश्यप आणि काश्यप. (मू. ग्रं. पा. ११७)

हे दोघे बहुधा एकच असावेत. कश्यपाच्या धर्मसूत्रात आह्निककृत्ये, श्राद्ध, प्रायश्चित्त ह्यांच्यासारखे धर्मसूत्रात व सामान्यतः येणारे सर्व विषय होते असे दिसून येते. ह्या धर्मसूत्रांतील उतारे विश्वरूपाने [याज्ञ. ३· २५७, याज्ञ. ३·२६२ प्रभृतिवरील विश्वरूपाची टीका आणि याज्ञ ३· २३ वरील मिताक्षरा टीका.] आणि त्यांच्या नंतरच्या सर्व प्रसिद्ध ग्रंथकारांनी उद्धृत केले आहेत. डेक्कन कॉलेजच्या संग्रहात गद्यात असलेली काश्यपस्मृती आहे. निरनिराळ्या टीकाग्रंथात काश्यपाची म्हणून उद्धृत केलेली काही सूत्रे ह्या स्मृतिग्रंथात सापडतात. हरदत्ताने [आप. ध. सू. २· ६· १३· २ वरील हरदत्ताच्या टीकेत उद्धृत केलेले सात प्रकारच्या पुनर्भूंच्या संबंधीचे श्लोक.] उद्धृत केलेले काही श्लोकही त्या स्मृतीत आढळतात.

याज्ञवल्क्याने धर्मशास्त्र प्रयोजकांच्या यादीत काश्यपाच्या नावाचा समावेश केलेला नाही, परंतु स्मृतिचंद्रिका [स्मृतिचं. १. पा. १.] आणि सरस्वतीविलास [सरस्व. पा. १३.] ह्या ग्रंथात उल्लेख केलेल्या उपस्मृतींमध्ये काश्यपस्मृतीचा समावेश केला आहे.

### ५. गार्ग्य (मू. ग्रं. पा. ११९)

विश्वरूपाने उद्धृत [याज्ञ १, ४।५ वरील टीका.] केलेल्या वृद्धयाज्ञवल्क्याच्या एका श्लोकात दिलेल्या धर्मवक्तारांच्या नावात गार्ग्याचा समावेश केला आहे. दुसरे एके ठिकाणी [याज्ञ. १·७२ वरील टीका.] विश्वरूपाने गार्ग्याचे एक सूत्र उद्धृत केले आहे. ह्यावरून गार्ग्याचा धर्मशास्त्रावरील एक सूत्रग्रंथ अस्तित्वात होता असे दिसते. मिताक्षरा, [याज्ञ. ३· ३२६ वरील मिताक्षरा.] अपरार्क आणि स्मृतिचंद्रिका ह्या ग्रंथातही गार्ग्याचे आह्निक, श्राद्ध आणि प्रायश्चित्त ह्या विषयांवरील श्लोक उद्धृत केले आहेत. पराशरानेही धर्मशास्त्रावरील ग्रंथकारात गार्ग्याचा समावेश केला आहे.

गार्ग्य आणि वृद्ध गार्ग्य हे दोनही ग्रंथकार एकच असावेत असे वाटते. अपरार्काने [अपरार्क पा. ५४७.] गार्ग्याचे ज्योतिषशास्त्रासंबंधी बरेच श्लोक उद्धृत केले आहेत. हा ग्रंथ बहुधा एक स्वतंत्र ग्रंथ असावा. ज्योतिष आणि फल ज्योतिषशास्त्रावरील एका गार्गीसंहितेचे काही भाग उपलब्ध झाले आहेत आणि त्यात महत्त्वाची ऐतिहासिक माहिती दिली आहे. स्मृतिचंद्रिकेत ज्योतिर्गार्ग्य ह्या नावाच्या आणि एका बृहद्‌गार्ग्य ह्या नावाच्या ग्रंथकाराची अवतरणे उद्धृत केली आहेत.

### ६. **च्यवन** (मू. ग्रं. पा. ११९)

मिताक्षरा [याज्ञ ३·३० वरील मिताक्षरा], अपरार्क [याज्ञ १· २०७, ३· २६४।२६५ वरील अपरार्काची टीका.] प्रभृती ग्रंथकारांनी च्यवनाच्या ग्रंथातील पुष्कळ सूत्रे आणि काही श्लोक उद्धृत केले आहेत. त्यात गाईचे दान करण्याचा विधी, अशुद्ध पदार्थांचा संसर्ग झाला असता करावयाचे प्रायश्चित्त इत्यादी विषय आहेत.

### **७. जातुकर्ण्य (मू. ग्रं. पा. ११९)**

वृद्धयाज्ञवल्क्याच्या श्लोकात ['भूयांसो धर्मवक्तार उत्पन्ना भाविनस्तथा। ..... बौधायनो जातुकर्णो विश्वामित्रः पितामहः ॥' याज्ञ. १· ४।५ वरील विश्वरूपाच्या टीकेत उद्धृत केलेले वृद्ध-याज्ञवल्क्याचे अवतरण.] दिलेल्या धर्मवक्तारांच्या यादीत जातुकर्णाचा समावेश केला आहे. ह्या ग्रंथकाराचे नाव जातुकर्णि अथवा जातूकर्ण्य अथवा जातुकर्ण अशा वेगवेगळ्या प्रकारांनी लिहिले जाते. विश्वरूपाने [याज्ञ १· १, १· २, १· २९, १· ७९ प्रभृतीवरील विश्वरूपाची टीका. ] जातुकर्ण्याची गद्य अवतरणे अनेक वेळा उद्धृत केली आहेत. ह्या अवतरणांवरून जातुकर्ण्याने आचार आणि श्राद्ध ह्या विषयांवर एक सूत्रग्रंथ केला होता असे दिसून येते. तो ग्रंथ तुलनेने प्राचीन काळचा असावा. मिताक्षरा, हरदत्त, अपरार्क आणि अलिकडील काळातील इतर ग्रंथकार ह्यांनी उद्धृत केलेली जातुकर्ण्याची अवतरणे पद्यमय आहेत. ह्यावरून ह्या ग्रंथकारांच्या काळी जातुकर्ण्याचा सूत्रग्रंथ नष्ट झाला असावा अथवा लोकांच्या आठवणीतून गेला असावा असे दिसते. अपरार्काने [अपरार्क (पा. ४२३).] उद्धृत केलेल्या जातुकर्ण्याच्या श्लोकात कन्या राशीचा उल्लेख केला आहे. ह्यावरून त्या श्लोकाचा रचनाकाळ इ.स.च्या ३ ऱ्या अथवा ४ थ्या शतकांच्या फारसा पूर्वीचा नसावा.

### ८. **देवल** (मू. ग्रं. पा. १२०)

मिताक्षरेमध्ये [याज्ञ. १· १२०, १· १२८ इ. वरील मिताक्षरा.] देवलाच्या ग्रंथातील अनेक गद्य अवतरणे उद्धृत केली आहेत. अपरार्काच्या [याज्ञ. १· ५८, ३. १०९, ३. २२७ प्रभृतीवरील अपरार्काची टीका.] ग्रंथात आणि स्मृतिचंद्रिकेत [स्मृतिचं. १ पा. ६३, १ पा. ५२.] देवलाच्या ग्रंथातील अनेक गद्य अवतरणे उद्धृत केली आहेत. मिताक्षरा, हरदत्त, अपरार्क यांच्या ग्रंथात तसेच स्मृतिचंद्रिकेत देवलाच्या ग्रंथातील आचार, व्यवहार, श्राद्ध, प्रायश्चित्त इत्यादी विषयांवरील अनेक श्लोक उद्धृत केले आहेत. ते श्लोक असलेला ग्रंथ एक वेगळाच स्वतंत्र ग्रंथ असावा असे वाटते. आनंदाश्रमाच्या संग्रहात ९० श्लोक असलेली देवलस्मृती आहे. त्यात म्लेच्छांशी संपर्क आला असता करावयाच्या शुद्धीचे आणि प्रायश्चित्तांचे विवेचन केले आहे. हा ग्रंथ अलिकडील काळात रचला गेला असावा असे दिसते.

देवलाच्या मताचा उल्लेख महाभारतात [त्रीणि ज्योतींषि पुरुष इति वै देवलोब्रवीत् । अपत्यं कर्म विद्या च यतः सृष्टाः प्रजास्ततः ॥ सभा, ७२·५] आला आहे. अपरार्काने आणि स्मृतिचंद्रिकेत उद्धृत केलेल्या देवलाच्या श्लोकात संपत्तीची वाटणी, वारसा, स्त्रीधन हे विषय आले आहेत. त्यावरून असे दिसते की कायदेपंडित असणारा हा देवल बृहस्पती आणि कात्यायन ह्या श्रेष्ठ कायदेपंडितांच्या काळाच्या सुमारास होऊन गेला असावा.

## ९. पैठीनसी (मू. ग्रं. पा. १२१)

याज्ञवल्क्याने प्राचीन सूत्रकारांच्या यादीत पैठीनसीचा समावेश केला नसला तरी तो तुलनेने बऱ्याच प्राचीन काळी झालेला धर्मशास्त्रावरील सूत्रकार असावा असे दिसते. पैठीनसीच्या ग्रंथातील श्राद्धासंबंधीचा एक गद्य उतारा अथर्ववेदातील श्राद्धविधीशी जुळतो. त्याअर्थी पैठीनसीच्या ग्रंथाचा अथर्ववेदाशीसंबंध असावा असे डॉ. कॅलंड आणि डॉ. जाली ह्यांनी म्हटले आहे. मिताक्षरा, [याज्ञ ३· १७ वरील मिताक्षरा; स्मृतिचं. २. पा २६३; अपरार्क पा, ११२, २३९, ७४४ इ०] स्मृतिचंद्रिका, अपरार्क, हरदत्त प्रभृती ग्रंथकारांनी पैठिनसीची अनेक सूत्रे उद्धृत केली आहेत.

## १० बुध (मू. ग्रं. पा. १२३)

ह्या सूत्रकाराचा याज्ञवल्क्याने अथवा पराशराने उल्लेख केलेला नाही आणि त्याच्या मताचे आधार फारच क्वचित दिलेले आढळतात. अपरार्क, [याज्ञ. १· ४।५ वरील अपरार्काची टीका, कल्पतरु (वीरमित्रोदय. परिभाषा, पा. १६ वरील अवतरण, हेमाद्रि चतुर्व-दानखंड, पा. ५२७), जीमूतवाहन (कालविवेक).] कल्पतरु, हेमाद्री आणि जीमूतवाहन ह्यांनी बुधाचा उल्लेख केला असून त्याचा उल्लेख केलेल्या ग्रंथकारात हेच बहुधा सर्वात जुने असावेत. डेक्कन कॉलेजच्या संग्रहात गद्यात असलेल्या बुध धर्मशास्त्राच्या हस्तलिखित प्रती आहेत. हा ग्रंथ फारच लहान आहे. तो प्राचीन काळचा असावा असा ग्रह होत नाही. हेमाद्रीने उद्धत केलेली बुधाच्या ग्रंथातील सर्व अवतरणे त्या हस्तलिखित ग्रंथात मिळत नाहीत.

## ११. बृहस्पती (मू. ग्रं. पा. १२३)

कौटिलियात बृहस्पतीच्या मतांचा अनेक वेळा उल्लेख केला आहे. त्यावरून बृहस्पती हा अर्थशास्त्राचा एक प्राचीन आचार्य होता हे सिद्ध होते. ब्रह्मदेवाने धर्म, अर्थ आणि काम ह्या विषयावर केलेल्या ग्रंथाचा बृहस्पतीने ३००० अध्यायात संक्षेप केला असे महाभारतात [महाभारत, शांति. ५९· ८०।८५.] वर्णन केले आहे. विश्वरूप [याज्ञ १· ३२३ २· ३८. २· १५४ प्रभृतिवरील विश्वरूपाची टीका, गौतम २२· १८ वरील हरदत्ताची टीका.] आणि हरदत्त यांनी जी गद्य अवतरणे दिली आहेत त्यावरून बृहस्पतीने धर्मशास्त्राच्या व्यवहार आदी अंगांवर एक सूत्रग्रंथ रचला होता हे सिद्ध होते. विश्वरूपाने बृहस्पतीच्या ग्रंथातील प्रायश्चित्त ह्या विषयावरील श्लोक उद्धृत केले असून ते आणि इतर गद्य अवतरणे एकाच ग्रंथातील असल्याचे ध्वनित केले आहे. ह्यावरून बृहस्पतीच्या ग्रंथात श्लोकही होते असे दिसते. अर्थशास्त्रावरील आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथ, निरनिराळ्या ग्रंथकारांनी केलेले असणे अधिक संभवनीय वाटते. याज्ञवल्क्याने धर्मशास्त्रप्रवक्तारांमध्ये बृहस्पतीचा समावेश केला आहे.

व्यवहार, आचार आणि प्रायश्चित्त ह्या विषयावरील बृहस्पतीचे जे शेकडो श्लोक मिताक्षरेत आणि दुसऱ्या टीकाग्रंथात उद्धृत केले आहेत, ते श्लोक असणारा बृहस्पतीचा एक स्वतंत्र ग्रंथ असावा आणि तो

इ.स. ३०० ते ५०० ह्यांच्या दरम्यान रचला गेला असावा. ८० श्लोक असलेली एक बृहस्पतीस्मृती जीवानंद आणि आनंदाश्रम यांनी प्रसिद्ध केली आहे. तिचीच संक्षिप्त आवृत्ती डेक्कन कॉलेज संग्रहात आहे. त्या स्मृतीत बृहस्पती इंद्राला दानासंबंधी उपदेश करीत असल्याचे वर्णन केले आहे. त्या स्मृतीतील दोन श्लोक दान-बृहस्पतीचे म्हणून दानरत्नाकरात उद्धृत केले आहेत. डॉ. एफ्. डब्ल्यू. थॉमस ह्यांनी बार्हस्पत्य अर्थशास्त्र नावाचा एक ग्रंथ इ. स. १९२१ मध्ये प्रसिद्ध केला आहे. त्यात राजांचे आचार आणि कर्तव्ये, त्यांनी अध्ययन करावयाचे विषय, शकुन, राजनीतिसंबंधी नियम इत्यादी विषयांचे विवेचन केले आहे. तो ग्रंथ अलिकडील काळात झालेला असावा असे दिसते.

## **१२. भरद्वाज आणि भारद्वाज.** (मू. ग्रं. पा. १२६)

विश्वरूप [याज्ञ १, १५, १· ३२ प्रभृतिवरील विश्वरूपाची टीका, अपरार्क पा. ११५५.] प्रभृती जुन्या टीकाकारांनी उद्धृत केलेल्या गद्य अवतरणांवरून असे दिसते की भरद्वाज अथवा भारद्वाज ह्या ग्रंथकाराचा धर्मविषयावरील एक सूत्रग्रंथ अस्तित्वात होता आणि भरद्वाज आणि भारद्वाज ह्या दोन्ही नावांनी बहुधा त्याच ग्रंथाचा उल्लेख केला असावा. स्मृतिचंद्रिका, हरदत्ताची टीका इत्यादी अनेक ग्रंथात भारद्वाजाचे जे श्लोक उद्धृत केले आहेत ते भारद्वाजाच्या श्लोकबद्ध स्मृतीतून घेतले असावेत असे दिसते.

कौटिलीय अर्थशास्त्रात भारद्वाजाच्या मताचा अनेकवेळा उल्लेख केला आहे आणि एकदा कणिक भारद्वाजाच्या मताच्या उल्लेख केला आहे. ह्यावरून भारद्वाज हा अर्थशास्त्रावरील एक प्राचीनकाळचा ग्रंथकार असावा हे सिद्ध होते. महाभारतात [शान्ति. ५८· ३·] राजशास्त्रावरील ग्रंथकारांत भारद्वाजाचा समावेश केला आहे. भारद्वाजाच्या ग्रंथामधील सहा गुणांसंबंधी दोन श्लोक यशस्तिलक [यशस्तिलक (४ था आश्वास, पा. १००).] ह्या ग्रंथात उद्धृत केले आहेत. ह्यावरून भारद्वाजाचा राजधर्मावरील ग्रंथ इ. स.च्या १० व्या शतकात उपलब्ध होता आणि त्यात गद्यभागाबरोबर काही श्लोकही होते.

पराशरमाधवीय [परामाध. (खं. ३ पा. २३१).], सरस्वतीविलास [सरस्व. पा ३१४, ३२०.] ह्या ग्रंथात भरद्वाजाचे व्यवहारविषयावरील श्लोक उद्धृत केले आहेत. ते श्लोक त्याच्या राजनीतिशास्त्रावरील प्राचीन ग्रंथाहून भिन्न असणाऱ्या ग्रंथातून घेतले असावेत असे दिसते.

## **१३. वैखानस धर्मप्रश्न अथवा धर्मशास्त्र.** (मू. ग्रं. पा. १०५)

हा ग्रंथ लहानसाच असून त्यात तीन प्रश्न आहेत आणि प्रत्येक प्रश्नाचे खंड नावाचे ४१ विभाग केले आहेत. त्यात चार वर्णांची आणि चार आश्रमांची कर्तव्ये मुख्यत्वेकरून वर्णन केली आहेत. ह्या ग्रंथाची भाषाशैली आणि त्यात आलेले विषय ह्यांचा विचार करता तो ग्रंथ गौतम आणि बौधायन ह्यांच्या धर्मसूत्रांच्या नंतरच्या काळात झाला असावा. सध्या उपलब्ध असलेला ग्रंथ एकाद्या वैष्णवाने लिहिला असावा अथवा सुधारला असावा. कारण विष्णु अथवा नारायण ह्यांच्यावरील श्रद्धा आणि भक्ती ह्या ग्रंथात विशेष रीतीने प्रतिपादन केली आहे.

बुल्हरला सापडलेल्या वैखानससूत्राच्या एका हस्तलिखित प्रतीत ७ प्रश्न असलेले एक गृह्यसूत्र आणि (वर वर्णन केलेले) तीन प्रश्न असलेले धर्मसूत्र असून प्रवरासंबंधीचा चौथा प्रश्न आहे.

अनुक्रमणिका

धर्मशास्त्रावरील प्राचीनग्रंथांत वैखानसासंबंधी जे उल्लेख आले आहेत त्यावरून तो फार प्राचीन काळी झालेला ग्रंथकार होता ही गोष्ट सिद्ध होते. वैखानस धर्मप्रश्न हा ग्रंथ त्रिवेंद्रम् संस्कृत ग्रंथमालेत प्रसिद्ध झाला आहे.

## **१४. शातातप** (मू. ग्रं. पा. १२८)

याज्ञवल्क्याने [याज्ञ. १· ४।५.] आणि पराशराने धर्मशास्त्रप्रवक्तारांमध्ये शातातपाचा समावेश केला आहे. विश्वरूप, हरदत्त आणि अपरार्क ह्यांनी शातातपाच्या ग्रंथातील प्रायश्चित्त ह्या विषयावरील अनेक गद्य अवतरणे उद्धृत केली आहेत. विश्वरूपाने [यथा शातातपः श्राद्धमनुक्त्वैव तद्गतान्गुणानाह - 'विना यज्ञोपवीतेन गन्धैर्यस्तुसमालभेत्' इती । याज्ञ. ३.२३६ वरील विश्वरूपाची टीका आणि तीत उद्धृत केलेला शातातपाचा श्राद्धविषयावरील अर्धश्लोक.] उद्धृत केलेल्या श्राद्धविषयावरील शातातपाच्या अवतरणात काही श्लोक आहेत. तसेच मिताक्षरा, स्मृतिचंद्रिका प्रभृती ग्रंथांत आचार आणि श्राद्ध ह्या विषयावरील शातातपाचे श्लोक उद्धृत केले आहेत. ह्यावरून शातातपाचा श्लोकबद्ध ग्रंथ त्याच्या सूत्रग्रंथाहून बहुधा निराळा असावा असे वाटते.

इंडिया ऑफिस ग्रंथसूचीत आणि मद्रास सरकारच्या हस्तलिखितांच्या सूचीत शातातपस्मृतीचा उल्लेख केला आहे. जीवानंदाच्या संग्रहात कर्मविपाक नावाची शातातपस्मृती आहे. डेक्कन कॉलेज संग्रहात एक वृद्धशातातपस्मृती आहे. इंडिया ऑफिस सूचीत आणि आनंदाश्रमाच्या संग्रहात वृद्धशातातपस्मृती आहे.

हेमाद्रीने स्मृतिकारांच्या नावात वृद्धशातातपाचा समावेश केला आहे. जीमूतवाहनाने व्यवहारमातृका ['वृद्धशातातपवचनं तु बहुज्ञजीर्णकृतनिबन्धेस्माभिर्दृष्टं न पुनर्भोजदेवे ।' जीमूतवाहनकृत व्यवहारमातृका (पा. ३०५)] ग्रंथात वृद्धशातातपाच्या मतांचा उल्लेख केला आहे.

याज्ञ (३.२९०) वरील टीकेत मिताक्षरेने बृहत् शातातपाचा उल्लेख केला आहे.

## **१५. सुमन्तु** (मू. ग्रं. पा. १२९)

विश्वरूप, हरदत्त आणि अपरार्क ह्यांच्या ग्रंथातील अवतरणांवरून [याज्ञ. ३· २२९।२३६, ३· २३७ प्रभृतिवरील विश्वरूपाची टीका; गौतम (२२· १३ आणि १८) वरील हरदत्ताची टीका; याज्ञ. १· ५३, १· ६५ वरील अपरार्काची टीका.] असे सिद्ध होते की सुमन्तूने धर्मशास्त्रासंबंधी आणि विशेषेकरून आचार आणि प्रायश्चित्त ह्यांच्या संबंधी एक सूत्रग्रंथ रचिला होता. हा ग्रंथ अतिशय प्राचीन काळच्या ग्रंथांपैकी नसावा असे वाटते. याज्ञवल्क्याने किंवा पराशराने धर्मवक्तारांमध्ये सुमंतूचा समावेश केला नाही. उलटपक्षी सुमन्तु हे नाव प्राचीन काळचे आहे. सुमन्तु हा जैमिनीचा शिष्य असल्याचे भागवतामध्ये म्हटले आहे. आणि शांतिपर्वात सुमन्तु प्रभृती व्यासांच्या शिष्यांचा उल्लेख केला आहे. नित्य तर्पणामध्ये जैमिनी, वैशंपायन, पैल ह्यांच्या नावाबरोबर सुमन्तूचे नाव येते.

सुमन्तूच्या ग्रंथातील धर्मशास्त्रासंबंधी अनेक श्लोक अपरार्क, स्मृतिचन्द्रिका प्रभृती ग्रंथात उद्धृत केले आहेत. हा ग्रंथ बहुधा सुमन्तूच्या सूत्रग्रंथापेक्षा निराळा असावा. अपरार्काने उद्धृत केलेल्या सुमन्तूच्या [याज्ञ. १· २२३ आणि वरील आणि याज्ञ १· २१७।२१८ वरील अपरार्काची टीका.] श्लोकात शंखाच्या वचनाचा आणि कन्या राशीचा उल्लेख केला आहे.

मिताक्षरेने आणि अपरार्काने सुमन्तूचे व्यवहारविषयावरील श्लोक मुळीच उद्धृत केले नाहीत हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. सरस्वतीविलासात [सरस्वती. पा. ३२१, ३२२, ३२३, ३२४.] सुमन्तूच्या ग्रंथातील व्यवहारविषयावरील भरपूर अवतरणे उद्धृत केली आहेत.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण १५

## स्मृतिग्रंथ

(मू. ग्रं. पा. १३१—१३५)

स्मृती हा शब्द दोन अर्थाने वापरला जातो. व्यापक अर्थाने तो शब्द वेदवाङ्मयाव्यतिरिक्त असणाऱ्या प्राचीन सनातनी मताच्या सर्व धर्मग्रंथांना लावण्यात येतो. अशा ग्रंथात पाणिनीय व्याकरण, श्रौतसूत्रे, गृह्यसूत्रे आणि धर्मसूत्रे, महाभारत, मनुयाज्ञवल्क्य प्रभृतींचे ग्रंथ ह्यांचा समावेश होतो. संकुचित अर्थाने स्मृती आणि धर्मशास्त्र हे शब्द समानार्थी असल्याचे मानले जाते. 'श्रुतिस्तु वेद विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः' असे मनु. २·१० मध्ये म्हटले आहे. स्मृति हा शब्द तैत्तिरीय आरण्यकात (१·२) आला आहे.

प्राचीन काळी स्मृतींची म्हणजे धर्मशास्त्रावरील ग्रंथांची संख्या अतिशय लहान असली पाहिजे. गौतमाने धर्मशास्त्राचा उल्लेख केला आहे परंतु मनूखेरीज दुसऱ्या कोणत्याही इतर स्मृतिकाराच्या नावाचा निर्देश त्याने केलेला नाही. त्या नंतरच्या काळात धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांची संख्या वाढत गेली. बौधायनाने स्वतःला सोडून ६ नावे दिली आहेत, वसिष्ठाने पाच आणि आपस्तम्बाने १० नावे दिली आहेत. याज्ञवल्क्याने धर्मशास्त्रप्रणेतारांची एकूण २० नावे सांगितली आहेत. अशा रीतीने ही संख्या वाढता वाढता चतुर्विंशतिमत ह्या ग्रंथात २४, षट्त्रिंशन्मतात ३६, वृद्धगौतमस्मृतीत आणि प्रयोगपारिजात ह्या ग्रंथात (१८ मुख्य स्मृती, १८ उपस्मृती आणि २१ इतर स्मृती मिळून) ५७ पर्यंत वाढली. निर्णयसिंधु, नीलकंठकृत मयूख, वीरमीत्रोदय ह्यांच्यासारख्या अलिकडील काळातील निबंधग्रंथांत निर्देश केलेल्या सर्व स्मृतींची बेरीज केल्यास ती सुमारे १०० होईल.

ह्या सर्व स्मृती प्रामाण्याच्या दृष्टीने समान योग्यतेच्या नाहीत. त्यांच्यापैकी बहुतेक अप्रसिद्ध आहेत आणि जुन्या काळी होऊन गेलेल्या ग्रंथकारांनी त्या स्मृतीतील अवतरणे फारच थोड्या प्रसंगी उद्धृत केली आहेत. धर्मसूत्रे सोडून दिल्यास बाकीच्या स्मृतींपैकी जेमतेम १०।१२ स्मृतींवरच टीका लिहिल्या गेल्या आहेत. टीकांच्या सख्येवरून प्रामाण्याचा दर्जा ठरवू लागल्यास सर्व स्मृतीत मनुस्मृतीच सर्वात श्रेष्ठ ठरेल आणि तिच्या खालोखाल याज्ञवल्क्यस्मृतीचा क्रम लागेल.

प्रमाणभूत मानलेल्या स्मृतींची रचना निरनिराळ्या काळात झालेल्या ऋषींनी केलेली आहे. त्यांच्यापैकी काही संपूर्ण गद्यरूप आहेत, काही गद्यपद्यमिश्रित आहेत परंतु बहुसंख्य स्मृती श्लोकबद्ध आहेत. काही थोड्या स्मृती फार प्राचीन असून त्यांची रचना ख्रि. पू. कित्येक शतके झाली आहे. गौतम, आपस्तम्ब आणि बौधायन ह्यांची धर्मसूत्रे आणि मनुस्मृती हे ग्रंथ अशा प्राचीन काळचे आहेत. याज्ञवल्क्य, पराशर, नारद ह्यांच्या स्मृतींसारखे काही ग्रंथ इ.स. च्या आरंभीच्या काही शतकात रचले गेले होते. ह्यांच्याखेरीज बाकीच्या बहुतेक स्मृतींची रचना इ.स. ४०० ते इ.स. १००० ह्या कालखंडात झालेली आहे. पूर्वीच्या सूत्रांची पुनर्रचना करून काही स्मृती तयार केलेल्या आहेत. दोन अथवा तीन वेगवेगळ्या स्मृती एकाच नावाने प्रचलित आहेत. उदाहरणार्थ, शातातप, हारीत, अत्रि, ह्यांच्या स्मृती. बरेच ग्रंथ प्रसिद्ध ग्रंथकारांच्या नावामागे वृद्ध, बृहत्, लघु अशी उपपदे लावून तयार केलेल्या नावावर प्रसिद्ध आहेत आणि त्यातील बरेच ग्रंथ उपपदविरहित नावावर प्रसिद्ध असलेल्या ग्रंथाहून भिन्न असतात. काही ग्रंथांच्या

बाबतीत वृद्ध अथवा बृहत् उपपद असणारे ग्रंथ उपपदविरहित ग्रंथांपेक्षा मोठे असतात आणि असे सर्वही ग्रंथ उपपदविरहित ग्रंथांच्या मागाहून झालेले आहेत.

बहुतेक निबंधग्रंथकारांना अवतरणे उद्धृत करताना आपल्या स्मरणशक्तीवर अवलंबून राहावे लागे. तसेच अधिकृत ग्रंथांच्या ऐवजी हस्तलिखित प्रतींचा उपयोग करावा लागे. त्यामुळे काही सुप्रसिद्ध असणारे श्लोकदेखील निरनिराळ्या ग्रंथकारांनी निरनिराळ्या ग्रंथातून उद्धृत केले असल्याचे सांगितले आहे. ह्या पुढील प्रकरणात मनुस्मृती प्रभृती काही महत्त्वाच्या श्लोकबद्ध स्मृतींचे विवेचन त्या ग्रंथांच्या रचनाकालाच्या क्रमाने करण्याचा प्रयत्न केला आहे.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण १६

## मनुस्मृती

(मू. ग्रं. पा. १३५—१५८)

मनूचा उल्लेख ऋग्वेद, तैत्तिरीय संहिता, ताण्ड्यमहाब्राह्मण, ऐतरेय ब्राह्मण, शतपथब्राह्मण, निरुक्त अशा प्राचीन वेदवाङ्मयात आलेला आहे. मनु हा मानव जातीचा मूळ पुरुष असल्याचे वेदग्रंथात ['मानव्यो हि प्रजाः' तै. सं. २· १· ५· ६·] म्हटले आहे. गौतम, वसिष्ठ, आपस्तम्ब, ह्या सूत्रकारांनी मनूची मते उद्धृत केली आहेत. महाभारतात मनूचा अनेक ठिकाणी उल्लेख केला आहे. त्यापैकी काही ठिकाणी नुसता मनु असा, काही ठिकाणी [शान्ति २१. १२.] स्वायंभुवमनु असा आणि काही ठिकाणी [शान्ति ५७· ४३·] प्राचेतस मनु असा उल्लेख केला आहे. शांतिपर्व (३३६·३८।४६) मध्ये असे वर्णन केले आहे की, परमेश्वराने धर्मशास्त्रावर १ लक्ष श्लोकांचा ग्रंथ रचिला होता आणि त्या धर्माचा प्रसार स्वायंभुव मनूने केला. नारदस्मृतीत म्हटले आहे की, एक लक्ष श्लोक, १०८० अध्याय आणि २४ प्रकरणे असलेले एक धर्मशास्त्र मनूने रचले, त्याचा नारदाने १२ हजार श्लोकात संक्षेप केला, त्याचा पुढे मार्कंडेयाने ८ हजार श्लोकात संक्षेप केला आणि त्याचाच सुमतिभार्गवाने ४ हजार श्लोकात संक्षेप केला. नारदस्मृतीत त्या शास्त्राचा पहिला [तत्रायमाद्यः श्लोकः । आसीदिदं तमोभूतं न प्राज्ञायत किंचन । ततः स्वयंभूर्भगवान्प्रादुरासीच्चतुर्मुखः ॥ नारदस्मृति.] श्लोक म्हणून उद्धृत केलेला श्लोक उपलब्ध मनुस्मृतीत (अध्याय १) आढळतो. उपलब्ध मनुस्मृतीत [मनु. १· ३२—६०.] मनुस्मृतीच्या उत्पत्तीची कथा अशी दिली आहे की ब्रह्मदेवापासून विराट् उत्पन्न झाले, त्याच्या मागून मनूची उत्पत्ती झाली आणि मनूपासून भृगु, नारद प्रभृती ऋषींची उत्पत्ती झाली, ब्रह्मदेवाने आपण केलेले शास्त्र मनूला शिकविले, मनूने ते शास्त्र दहा ऋषींना शिकविले, पुढे काही महर्षि निरनिराळ्या वर्णांचे आणि संकर जातींचे धर्म विचारण्याकरिता मनूकडे आले असता मनूने त्यांना आपला शिष्य भृगु ह्याच्याकडे जाण्यास सांगितले आणि भृगूने त्या ऋषींना सांगितलेले शास्त्र म्हणजेच मनुस्मृती होय. उपलब्ध मनुस्मृतीमध्ये भृगूने महर्षींना शास्त्र सांगितल्याची भूमिका स्वीकारली आहे. स्वायंभुव मनूने केलेल्या शास्त्राच्या भृगु, नारद, बृहस्पती आणि अंगिरस ह्यांनी चार संहिता रचल्या असल्याचे भविष्यपुराणात [भार्गवीया नारदीया च बार्हस्पत्याङ्गिरस्यपि । स्वायंभुवस्य शास्त्रस्य चतस्रः संहिता मताः ॥ भविष्यपुराण (चतुर्व. दान. पा. ५२८ वरील अवतरण).] म्हटले आहे.

उपलब्ध मनुस्मृती कोणी रचली हे सांगणे अशक्यप्राय आहे. पुराणात वर्णन केलेल्या मनूने अथवा मानवजातीचा आद्यपुरुष म्हणून ऋग्वेदात ज्याचा उल्लेख केला आहे. त्या मनूने हा ग्रंथ रचला असणे शक्य नाही. महाभारतात स्वायंभुव [शान्ति २१· १२·] मनूने धर्मशास्त्राचा प्रसार केला आणि प्राचेतस [शान्ति ५७· ४३ आणि ५८·२·] मनूने राजनीतिशास्त्राचा (अर्थशास्त्राचा) प्रसार केला असे म्हटले आहे. आरंभी मनूच्या नावावर दोन वेगळे ग्रंथ अस्तित्वात असून मनुस्मृतीचा जो कोणी कर्ता असेल त्याने त्या दोन्ही ग्रंथातील माहिती समाविष्ट करून आपला स्वतःचा ग्रंथ रचला असावा आणि अशी घटना कौटिलीय अर्थशास्त्राच्या काळी कदाचित झालेली नसावी अथवा झाली असल्यास नुकतीच झाली असावी. उपलब्ध मनुस्मृतीमध्ये तो ग्रंथ स्वायंभुव मनूने केल्याचे म्हटले आहे आणि त्यात ज्या दुसऱ्या मनूंची नावे दिली आहेत त्यात प्राचेतस मनूचे नाव नाही.

अनुक्रमणिका

उपलब्ध मनुस्मृतीत १२ अध्याय असून २६९४ श्लोक आहेत. मनुस्मृतीची भाषा सुबोध आणि ओघवती आहे. तिच्यामधील रूपे पाणिनीय व्याकरणाशी सामान्यतः जुळतात. मनुस्मृतीत आलेल्या विषयांचे संक्षिप्त वर्णन पुढीलप्रमाणे करता येईल :

(१) निरनिराळ्या वर्णांचे धर्म समजून घेण्याकरिता आलेल्या ऋषींना मनू उपदेश करतो, विश्वाची उत्पत्ती, ब्रह्मदेवाने उत्पन्न केलेले धर्मशास्त्र मनूला मिळते आणि तो ते ऋषींना शिकवितो. निमिषापासून ब्रह्मदेवाच्या दिवसापर्यंत कालगणना, प्रलय, धर्माचा ऱ्हास, निरनिराळ्या युगांतील धर्म आणि ध्येये.

(२) धर्माची व्याख्या, धर्माची उगमस्थाने, आर्यावर्ताच्या सीमा, संस्कारांची आवश्यकता, निरनिराळे संस्कार, उपनयन व ब्रह्मचाऱ्याची कर्तव्ये.

(३) ब्रह्मचर्याची मर्यादा, विवाह, पतिपत्नींची कर्तव्ये, गृहस्थाश्रम, पंचमहायज्ञ, श्राद्ध.

(४) गृहस्थाची कर्तव्ये, भक्ष्याभक्ष्य अन्ने.

(५) आशौच, पदार्थांची शुद्धी, पत्नी आणि विधवा यांची कर्तव्ये,

(६) वानप्रस्थ आणि परिव्राजक ह्यांची कर्तव्ये.

(७) राजधर्म, राजाच्या विद्या, राजाचे दोष, मंत्रिमंडळ, अधिकारी, राजमंडळ, संधिविग्रहादी सहा गुण.

(८) न्यायदान, वादाचे मुद्दे, न्यायाधीश, निरनिराळे अपराध आणि त्यांना शासन, जकाती, सात प्रकारचे दास.

(९) पति आणि पत्नी ह्यांची शास्त्रोक्त कर्तव्ये, बारा प्रकारचे पुत्र, वाटप, वारसा, निरनिराळी पातके आणि प्रायश्चित्ते, कारागृहे, वैश्य आणि शूद्र ह्यांची कर्तव्ये.

(१०) ब्राह्मणांची कर्तव्ये, मिश्र जाती, चारी वर्णांचे अधिकार आणि कर्तव्ये, संपत्ती मिळविण्याचे आणि उपजीविकेचे योग्य मार्ग.

(११) दान, प्रायश्चित्त, पूर्व जन्मातील पातकांची दृश्य फले, निरनिराळी प्रायश्चित्ते, पापनाशक मंत्र.

(१२) कर्माविषयी विवेचन, निःश्रेयस् कशाने प्राप्त होते, आत्मज्ञान हेच सुखाचे सर्व श्रेष्ठ साधन, प्रवृत्त आणि निवृत्त कर्मे, शिष्ट आणि परिषद, मानवशास्त्राच्या अध्ययनाचे फळ.

मनुस्मृतीच्या रचनाकाळाचा निर्णय अंतर्गत आणि बाह्य पुराव्यांच्या आधारावर करता येईल. उपलब्ध टीकांत मेधातिथीचे भाष्य सर्वात जुने आहे. मेधातिथीचे भाष्य इ.स. ९०० च्या सुमारास लिहिले गेले. मेधातिथीने ज्या मूळग्रंथावर टीका केली तो (थोडे पाठभेद वगळल्यास) सांप्रतकाळी उपलब्ध असलेल्या मनुस्मृतीसारखाच होता. विश्वरूपाने २०० हुन अधिक श्लोक उद्धृत केले असून ते सर्वही

अनुक्रमणिका

अध्यायांतील आहेत. तेव्हा विश्वरूपाच्या काळी हल्लीचीच मनुस्मृती अस्तित्वात होती. जैमिनीय सूत्रांवरील शबरस्वामींच्या भाष्यात मनूचा उल्लेख असून त्यात उद्धृत केलेला श्लोक मनुस्मृतीतील
[‘एवं च स्मरति । भार्या दासश्च पुत्रश्च निर्वनाः सर्व एव ते ।
यत्ते समधिगच्छन्ति यस्य ते तस्य तद्धनम् ।’ शाबर भाष्यातील अवतरण
‘भार्या पुत्रश्च दासश्च त्रय एवाधनाः स्मृताः ।’ मनु. ४१६
घ. इ. ४] एका श्लोकाशी जवळजवळ जुळतो. शबरस्वामीचा काळ इ.स. ५०० च्या पूर्वी काही शतके असण्याचा संभव आहे. मनुस्मृतीतील ८·३१८ आणि ८·३१६ हे श्लोक रामायणात आले आहेत. ह्यावरून मनुस्मृतीला हल्लीचे स्वरूप इ.स. च्या २ ऱ्या शतकाच्यापूर्वी बरीच वर्षे प्राप्त झाले असावे.

मनुस्मृतीत काही भाग पूर्वीचा असून काही भाग मागाहूनचा असावा असे दिसते. मनुस्मृतीत अनेक मुद्यांवर परस्परविरोधी मते दिली आहेत. मांसभक्षण, नियोग इत्यादी सारख्या काही बाबतीतील मते सामान्य लोकसमाजाच्या बदललेल्या मतांशी जुळती करून घेण्याकरिता मागाहून हे विशिष्ट बदल करण्यात आले असण्याचा संभव आहे. असे असले तरी असे सर्व बदल इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या पुष्कळ अगोदर केले असले पाहिजेत असे बृहस्पती प्रभृती ग्रंथकारांनी उद्धृत केलेल्या अवतरणांवरून दिसून येते. अशी पुनर्रचना एकापेक्षा अधिक वेळा मात्र झालेली नसावी.

उपलब्ध मनुस्मृती याज्ञवल्क्यस्मृतीपेक्षा बरीच जुन्या काळची असावी असे त्या दोन ग्रंथांतील मतांची तुलना केल्यास दिसून येते. याज्ञवल्क्यस्मृतीचा जास्तीत जास्त जुना काळ इ.स. चे तिसरे शतक होऊ शकेल. उपलब्ध मनुस्मृतीतील विषयांची रचना आणि तिच्यातील सिद्धांत ह्या गोष्टी गौतम, बौधायन प्रभृतीसारख्या प्राचीन धर्मसूत्रांच्या मानाने बऱ्याच प्रगत स्वरूपाच्या आहेत. ह्या अंतर्गत पुराव्यावरूनही उपलब्ध मनुस्मृतीचा रचनाकाळ इ. स. च्या २ ऱ्या आणि ३ ऱ्या शतकांच्या मध्यंतराचा असावा असे दिसते.

महाभारत आणि मनुस्मृती ह्यांच्या परस्परसंबंधाचा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा आहे. मनुस्मृतीत ‘इतिहास’ हा शब्द आला आहे परंतु महाभारताचा कोठेही नामनिर्देश केलेला नाही. उलटपक्षी, महाभारतातील बहुतेक सर्व पर्वात ‘मनुरब्रवीत्’, ‘मनूचे राजधर्म’ ‘मनूचे शास्त्र’ ह्यांच्या सारखे शब्द आले आहेत आणि त्यातील मते मनुस्मृतीतील मतांशी जुळतात. मनूचे म्हणून सांगितलेले नसलेलेही महाभारतातील शेकडो श्लोक मनुस्मृतीतील श्लोकांशी तंतोतंत जुळतात. ह्या सर्व पुराव्यावरून मनुस्मृती महाभारताच्या अगोदर झालेली असावी असे वाटते.

मनुस्मृतीचा अंमल हिंदुस्थानाबाहेरही होत होता. चंपा आणि कांबोज ह्या देशातील प्राचीन संस्कृत शिलालेखात मनुस्मृतीतील श्लोकांशी जुळते असे काही श्लोक आढळतात. ब्रह्मदेशातील ब्रह्मी लोक ज्या धम्मथत्सांना अनुसरून चालतात ती मनुस्मृतीच्या आधारावर तयार केलेली आहेत. बाली बेटात अद्यापिही मनुस्मृतीला कायद्याचा एक ग्रंथ मानतात.

मनुस्मृतीवर अनेक टीका झालेल्या आहेत. त्यात मेधातिथी, गोविंदराज आणि कुल्लूक ह्यांच्या टीका विशेष प्रसिद्ध आहेत. आणि त्यांचे स्वतंत्र विवेचन करण्यात येईल. त्याखेरीज नारायण, राघवानंद, नंदन ह्यांनीही मनुस्मृतीवर टीका केल्या आहेत. नारायण हा टीकाकार इ. स. ११००-१३०० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात होऊन गेला. राघवानंदाने मेधातिथी, गोविंदराज, नारायण प्रभृतींचा उल्लेख केला आहे. त्यावरून तो इ.स. १४०० नंतर झाला असावा. नंदन बऱ्याच मागाहूनच्या काळात होऊन गेला.

**अनुक्रमणिका**

विश्वरूप, मिताक्षरा, स्मृतिचंद्रिका, पराशरमाधवीय प्रभृती ग्रंथांत आह्निक, व्यवहार आणि प्रायश्चित्त ह्या विषयांवरील वृद्ध मनूचे अनेक श्लोक उद्धृत केले आहेत. मिताक्षरा आणि दुसरे काही ग्रंथ ह्यात बृहद्‌मनूचे काही श्लोक उद्धृत केले आहेत. ह्या दोघांच्या नावाने प्रसिद्ध असलेले स्वतंत्र ग्रंथ अद्यापि उपलब्ध झालेले नाहीत. मनुस्मृतीच्या हस्तलिखित प्रतीत आढळणारे परंतु मेधातिथीसारख्या जुन्या टीकाकारांनी मान्यता न दिलेले श्लोक पुढे वृद्धमनूचे अथवा बृहद्‌मनूचे मानले जाऊ लागले असण्याचाही संभव आहे. मनूच्या विस्तृत ग्रंथाचा सुमति भार्गवाने ४००० श्लोकात संक्षेप केला अशी आख्यायिका नारदस्मृतीत दिली आहे. उपलब्ध मनुस्मृतीत जवळजवळ २७०० श्लोकच आहेत. तेव्हा नारदाने सांगितलेला आकडा वृद्धमनूचे आणि बृहद्‌मनूचे म्हणून प्रसिद्ध असलेले श्लोक त्यात मिळवून तयार केला असावा.

―――――

अनुक्रमणिका

## प्रकरण १७

## रामायण आणि महाभारत

(मू. ग्रं. पा. १५८—६०)

ह्या दोन महाकाव्यांत आणि त्यांतल्या त्यांत महाभारतात अनेक ठिकाणी धर्मशास्त्रासंबंधी विवेचन केले आहे आणि त्या ग्रंथातील अशी अवतरणे महाभारतानंतर झालेल्या ग्रंथकारांनी स्मृतीच्या योग्यतेची प्रमाणभूत मानली आहेत. आदिपर्व (अ. २·८३) ह्या श्लोकात महाभारताला धर्मशास्त्र अशी संज्ञा दिली आहे. रामायण हे मुख्यत्वेकरून काव्य आहे. तथापि त्यातील उदात्त ध्येयामुळे ते जवळ जवळ महाभारताइतकेच लोकप्रिय झाले होते आणि निबंधग्रंथांत रामायणाला धर्माचा एक प्रमाणभूत ग्रंथ मानून त्याचा आधार दिलेला असतो. तथापि, महाभारतापेक्षा रामायणाचा आधार पुष्कळच कमी वेळा दिलेला असतो. अयोध्या कांड (अ० १००) आणि अरण्यकांड (अ० ३३) यात राजनीतिशास्त्रासंबंधी आणि राज्यकारभारासंबंधी विवेचन आले आहे.

हे दोन ग्रंथ म्हणजे भारताच्या प्राचीन काळच्या संस्कृतीची परंपरेने प्राप्त झालेली एक मूल्यवान वडिलोपार्जित संपत्तीच आहे.

धर्मशास्त्रातील खालील विषय महाभारतात आणि रामायणात आले आहेत.

**महाभारत :**

अभिषेक (राज्याभिषेक) —शांति ४०.
अराजक (त्याचे दुष्परिणाम) — शांति ६७.
अहिंसा — शांति २६४ आणि २६६.
आश्रमधर्म—शांति ६१, २४३ ते २४६.
आचार — अनु. १०४, आश्वमेधिक ४५.
आपद्धर्म—शांति १३१ प्रभृती.
उपवास—अनु. १०६—१०७.
गाईची प्रशंसा —अनु. ५१ आणि ७३.
तीर्थे - वन. ८२ प्रभृती, अनु. २५-२६, शल्य. ३५-५४.
दंडस्तुती - शांति. १५, १२१, २६८, २९५.
दान — वन. १८६, शांति. २३५, अनुशासन ५७—९९.
दायभाग — अनु. ४५ आणि ४७.
पुत्र (निरनिराळे प्रकार) — अनु. ४८-४९.
प्रायश्चित्त — शांति ३४-३५, १६५ (३३ प्रभृ.)
ब्राह्मणाच्या उपजीविकेची साधने — शांति ७६—७८.

भक्ष्याभक्ष्य—शांति ३६, ७८.

राजनीति – सभा. ५, वन. १५०, उद्योग. ३३-३४, शांति. ५९-१३०, २९८, आश्रमवासिक. ५-७.

वर्णधर्म—शांति. ६० आणि २९७, मिश्रजाती—शांति. ६५, २९७, अनु. ४८-४९.

विवाह-अनु. ४४-४६.

श्राद्ध—स्त्रीपर्व. २६-२७, अनु. ८७-९५.

**रामायण :**

अभिषेक—अयोध्या. १५, युद्ध १२८

अराजक—अयोध्या ६७.

पातके—किष्किंधा. १७, '(श्लो. ३६-३७), १८ (श्लो. २२-२३) इत्यादी.

राजधर्म—बाल. ७, अयोध्या- १००, अरण्य. ६ (श्लो. ११-१४), ९ (२-९) ३३, ४० (१०-१४), ४१ (१-६), युद्ध. १७-१८ आणि ६३.

श्राद्ध—अयोध्या ७७, १०३, १११ (श्लोक १०४-१२०).

सत्यप्रशंसा—अयोध्या १०९.

स्त्रीधर्म—अयोध्या २४, २६-२७, २९, ३९, ११७-११८.

——————

# प्रकरण १८

## पुराणे

(मू. ग्रं. पा. १६०-१६७)

पुराणे हा वाङ्मयप्रकार अत्यंत प्राचीन काळापासून अस्तित्वात होता. तैत्तिरीय आरण्यकात [‘ब्राह्मणानीतिहासान् पुराणानि कल्पान्गाथा नाराशंसीः’ इ० तै. आ. २· १०.] ‘ब्राह्मण, इतिहास, पुराणे आणि नाराशंसी गाथा’ ह्यांचा उल्लेख आहे. छांदोग्यउपनिषद (७·१-२ आणि ४) यात ‘इतिहास-पुराण’ ह्यांना पाचवा वेद अशी संज्ञा दिली आहे. बृहदारण्यक उपनिषद (४·१·२) यात आणि गौतमधर्मसूत्रात (८·६ आणि ११·१९) ‘इतिहास’ आणि ‘पुराण’ ह्यांचे उल्लेख आले आहेत.

पूर्वयुगात एकच पुराण अस्तित्वात होते असे मत्स्यपुराणात [पुराणमेकमेवासीत् तदाकल्पान्तरेनघ । मत्स्य. अ. ५३] म्हटले आहे. सध्या उपलब्ध असलेली पुराणे प्राचीन काळच्या पुराणांची पुनर्रचना करून तयार केलेली आहेत. इ.स.च्या प्रारंभीच्या काही शतकांत ज्यावेळी बुद्ध आणि जैन धर्मांचा ब्राह्मणविशिष्ट धर्मावर झालेल्या हल्ल्याचा जोर कमी झाला आणि जुन्या धर्मांचे, तत्त्वज्ञानाचे आणि वाङ्मयाचे पुनरुज्जीवन झाले त्यावेळी अशी पुनर्रचना झाली असावी. कुमारिल भट्टानी तंत्रवार्तिकामध्ये [रा. ए. सो. मुंबई शाखा नियतकालिक सन १९२५ पा. १२२.] सध्या उपलब्ध असलेल्या अनेक पुराणांत आलेल्या विषयांचा उल्लेख केला असून त्यांतील काही अवतरणेही उद्धृत केली आहेत. ह्यावरून सध्या उपलब्ध असणारी सर्व पुराणे नसली तरी त्यांच्यापैकी काही तरी इ.स.च्या ६ व्या शतकाच्या पूर्वी झालेली होती हे सिद्ध होते.

पूर्वापार परंपरेप्रमाणे पुराणांची संख्या १८ असून त्याशिवाय १८ उपपुराणेही आहेत. ह्या अठरा पुराणांची नावे निरनिराळ्या पुराणात निरनिराळी दिली आहेत. मत्स्यपुराणात (अ. ५३) मुख्य पुराणांची नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत :

ब्राह्म, पद्म, विष्णु, वायु, भागवत, नारदीय, मार्कंडेय, आग्नेय, भविष्य, ब्रह्मवैवर्त, लिंग, वराह, स्कंद, वामन, कूर्म, मत्स्य, गरुड, ब्रह्मांड. इतर पुराणांनी ह्यांपैकी काही नावे गाळली असून त्यांच्याजागी दुसरी घातली आहेत. पुराणांच्या नावाप्रमाणेच निरनिराळ्या पुराणातील श्लोकसंख्यांच्या बाबतीतही निरनिराळ्या पुराणात मतभेद आहेत. महापुराण आणि उपपुराणे ह्यांच्याखेरीज गणेश, मौद्गल, देवी, कल्की इत्यादी पुराणांच्या जातीचे दुसरे काही ग्रंथ अस्तित्वात आहेत.

अपरार्क, हेमाद्री ह्यांच्यासारख्या टीकाकारांनी आणि निबंधग्रंथकारांनी पुराणांना धर्माचे प्रमाणभूत ग्रंथ मानून त्यातील अवतरणे सढळपणे उद्धृत केली आहेत. मत्स्य, विष्णु, विष्णुधर्मोत्तर, अग्नी, गरुड ह्या पुराणांत धर्मशास्त्रातील अनेक विषयांचे विवेचन केले आहे. अग्निपुराणात याज्ञवल्क्यस्मृतीतील बरेच श्लोक आले आहेत. त्याप्रमाणेच गरुड पुराणातही त्या स्मृतीतील सुमारे ४०० श्लोक उद्धृत केले आहेत. पुराणांच्या सध्या उपलब्ध असलेल्या संहितांची रचना मनु, याज्ञवल्क्य, पराशर, नारद इत्यादी स्मृतींच्या मागाहून झालेली आहे असे पुराणे आणि स्मृती ह्यांचे वाचन केल्यास स्पष्टपणे दिसून येते.

अनुक्रमणिका

हिंदुस्थानात अस्तित्वात असलेली धार्मिक विचारांची आणि आचारांची परंपरा अखंडित असली तरी आधुनिक काळच्या हिंदूंच्या व्यावहारिक धर्माचा आधार मुख्यत्वेकरून पुराणे हाच आहे. धर्मशास्त्रावरील विषयांवरील सहस्रावधी श्लोक पुराणात आले आहेत. पुराणांचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास मध्ययुगीन काळात आणि आधुनिक काळात धार्मिक समजुती आणि आचार ह्यांची परिवर्तने कशी झाली ह्याची बरीच माहिती मिळू शकेल.

अठरा मुख्य पुराणात धर्मशास्त्रासंबंधी कोणकोणत्या विषयांवर माहिती आली आहे ह्याची काहीशी कल्पना पुढील यादीवरून होईल :—

आचार, आह्निक, आशौच, आश्रमधर्म, भक्ष्याभक्ष्य, ब्राह्मणाची कर्तव्ये, दान, द्रव्यशुद्धी, गोत्र आणि प्रवर, कलिस्वरूप, कलिवर्ज्य, कर्मविपाक, नरक, नीती, पातके, देवालयादिकांची प्रतिष्ठा, प्रायश्चित्त, राजधर्म, संस्कार, शांति, श्राद्धे, स्त्रीधर्म, तीर्थे, तिथी, उत्सर्ग (तलाव, विहिरी, उद्याने इत्यादी लोकोपयोगी कृत्ये), वर्णधर्म, विवाह, व्रते, व्यवहार, युगधर्म.

———–––

अनुक्रमणिका

## प्रकरण १९

# याज्ञवल्क्यस्मृती

(मू. ग्रं. पा. १६८—१९०)

याज्ञवल्क्य हे नाव अत्यंत प्रसिद्ध अशा वैदिक ऋषींच्या नावांपैकी एक आहे. शांतिपर्वात (अ० ३१२) अशी कथा दिली आहे की वैशंपायन आणि त्याचा शिष्य याज्ञवल्क्य यांच्यात एकदा वैमनस्य उत्पन्न झाले आणि याज्ञवल्क्याने सूर्याची उपासना करून त्याच्यापासून शुक्ल, यजुर्वेद, शतपथ ब्राह्मण इत्यादिकांची प्राप्ती करून घेतली. हीच कथा थोड्याशा भेदाने विष्णुपुराण [विष्णु (३· ५)], भागवत [भागवत (१२· ६. ६१—७४).] आणि इतर पुराणे यांत आली आहे. प्रत्यक्ष याज्ञवल्क्य [ज्ञेयं चारण्यकमहं यदादित्यादवाप्तवान्। योगशास्त्रं च मत्प्रोक्तं ज्ञेयं योगमभीप्सता ॥ याज्ञ. ३· ११०.] स्मृतीत देखील त्या स्मृतीच्या कर्त्याने सूर्यापासून मिळविलेल्या आरण्यकाचा उल्लेख केला आहे. आरण्यक आणि स्मृती ह्यांचा कर्ता एकच नसला तरी याज्ञवल्क्यस्मृतीचा इतर कोणत्याही वेदांपेक्षा शुक्ल यजुर्वेदाशी आणि त्या वेदाशी संल्लग्न असणाऱ्या वाङ्मयाशी अधिक संबंध होता.

याज्ञवल्क्यस्मृतीत १००३ ते १००६ असे श्लोक निरनिराळ्या प्रतीत आढळतात. याज्ञ. स्मृतीतील बरेच श्लोक अग्निपुराणात आले आहेत. आणि त्यावरून याज्ञवल्क्य स्मृतीतील अस्सल श्लोक कोणते ह्यांचा पडताळा फारच चांगला पाहता येतो. याज्ञवल्क्यस्मृतीवरील उपलब्ध टीकात विश्वरूपाची टीका सर्वात अगोदरची आहे. विश्वरूप इ. स. ८००।८२५ च्या सुमारास होऊन गेला. त्याच्यानंतर सुमारे २५० वर्षांनी झालेल्या विज्ञानेश्वराची मिताक्षरा टीका फार प्रख्यात आहे. काही थोडे अपवाद वगळल्यास अग्निपुराणात दिलेले पाठ विश्वरूप आणि मिताक्षरा यांनी दिलेल्या पाठांशी जुळतात. अग्निपुराण इ. स. ९०० च्या सुमारास रचिले गेले असावे. कारण त्यात दंडिन् आणि भामह ह्यांच्या ग्रंथातील अवतरणे उद्धृत केली आहेत. याज्ञवल्क्य स्मृतीतील श्लोकांच्या अस्सलपणाबद्दलचा पडताळा गरुडपुराणावरूनही पाहता येतो. अग्निपुराणात याज्ञवल्क्यस्मृतीचा निर्देश केलेला नाही परंतु गरुडपुराणात [याज्ञवल्क्येन यत्पूर्व धर्म प्रोक्तं कथं हरे। गरुड ९३. १] याज्ञवल्क्याने सांगितलेल्या धर्माचा उल्लेख केला आहे. गरुडपुराणात फक्त काही थोडेच श्लोक जसेच्या तसे उद्धृत केले आहेत बऱ्याच स्थळी याज्ञवल्क्यस्मृतीतील शब्द आणि वाक्ये उद्धृत न करता त्यांचा फक्त सारांश सांगितला आहे.

शंखलिखिताच्या धर्मसूत्रात धर्मशास्त्रप्रणेत्यांमध्ये याज्ञवल्क्याचा समावेश केला आहे आणि स्वतः याज्ञवल्क्याने [वक्तारो धर्मशास्त्राणां... ... गौतम शङ्खलिखितौ हारीतोत्रिरहं तथा ॥ याज्ञ १· ४।५. (मू. ग्रं. पा. १३३ टीप २५८).] शंखलिखितांचा धर्मशास्त्रप्रवक्त्यामध्ये समावेश केला आहे. ह्यावरून शंखलिखितांनी उपलब्ध याज्ञवल्क्यस्मृतीचा निर्देश केला नसून तिच्या पूर्वी अस्तित्वात असणाऱ्या याज्ञ. स्मृतीचा निर्देश केला असावा असा सकृद्दर्शनी यथार्थ वाटणारा तर्क निघू शकतो. परंतु ह्या एका गोष्टीखेरीज अशी एक पूर्वीची आवृत्ती असावी असे सिद्ध करणारा कोणताही पुरावा अस्तित्वात नाही. अग्निपुराण, गरुडपुराण, विश्वरूपाची टीका आणि मिताक्षरा ह्यांतील पाठांचा विचार करता याज्ञवल्क्यस्मृतीची मूळ संहिता सामान्यतः इ. स. ७०० पासून एकाच स्वरूपात राहिली आहे असे दिसते.

अनुक्रमणिका

याज्ञवल्क्याचा ग्रंथ मनूच्या ग्रंथापेक्षा अधिक व्यवस्थित आहे. मनुस्मृतीत आलेल्या बहुतेक सर्व विषयांचे याज्ञवल्क्याने विवेचन केले आहे. परंतु त्याचे विवेचन आटोपशीर असल्याकारणाने मनूच्या २७०० श्लोकांच्या जागी याज्ञवल्क्याला एकसहस्रापेक्षा थोडे अधिक इतकेच श्लोक पुरेसे झाले आहेत. याज्ञवल्क्याच्या शब्दांचे मनुस्मृतीतील शब्दांशी अतिशय साम्य आढळते. त्याने थोड्या शब्दात विषय प्रतिपादन करण्याचा फार मोठा प्रयत्न केला असून तो यशस्वीही झाला आहे. सबंध याज्ञ०स्मृती अनुष्टुभछंदात रचलेली आहे. संक्षेपात वर्णन करण्याचा कटाक्षाचा प्रयत्न असूनही त्याचे श्लोक केव्हाही क्लिष्ट नसतात. भाषा ओघवती आणि मुद्याला धरून अशी आहे. पाणिनीय व्याकरणाला सोडून असणारी रूपे त्यात फारशी आलेली नाहीत. मनुस्मृतीप्रमाणेच याज्ञवल्क्यस्मृतीतही मधून मधून प्रश्न विचारलेले असून याज्ञ० महर्षींनी एका विषयामागून दुसऱ्या विषयांचे विवेचन केले आहे. अशी आख्यायिका आहे की मिथिला नगरीत निरनिराळे ऋषी याज्ञवल्क्याकडे आले आणि त्यांनी वर्ण, आश्रम यांचे आणि इतरांचे धर्म आम्हाला शिकवा अशी विनंती केल्यावरून याज्ञवल्क्यांनी त्यांना धर्म सांगितले.

चार वेद, सहा वेदांगे आणि चौदा विद्या यांचा याज्ञ. ने उल्लेख केला आहे. तसेच त्याने स्वतः रचलेल्या आरण्यकाचा आणि योगशास्त्राचाही उल्लेख केला आहे. ग्रंथारंभी स्वतःखेरीज १९ धर्मशास्त्रकर्त्यांची नावे सांगितली आहेत. नामनिर्देश न करता सूत्रे आणि भाष्ये यांचेही उल्लेख केले आहेत.

याज्ञवल्क्याची मते विष्णुधर्मसूत्रातील मतांशी अतिशय जुळती आहेत. कौटिलीय अर्थशास्त्र आणि याज्ञ. स्मृती ह्यांच्यामध्येही अतिशय साम्य आहे. कोटिलीयाच्या रचनाकाळाचा विचार केल्यास याज्ञ०स्मृतीने कौटिलीयातील मते घेतली असली पाहिजेत. मनुस्मृती आणि याज्ञ०स्मृती यातील अनेक विषयांवरील मतांची तुलना केल्यास याज्ञ०स्मृती उपलब्ध मनुस्मृतीच्या मागून पुष्कळ वर्षांनी झालेली असावी असे दिसून येते.

याज्ञ०स्मृतीचा शुक्लयजुर्वेदाशी अत्यंत निकट संबंध आहे. त्यात उद्धृत केलेल्या अथवा उल्लेख केलेल्या मंत्रांपैकी बहुतेक मंत्र ऋग्वेदात तसेच शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेय संहितेत आढळतात. काही थोडे मंत्र [याज्ञ. १· २३० = वाज. सं. ५· २६; याज्ञ. १· २५४ = वाज. सं· १९. ४५, याज्ञ. १· ३०० = वाज. सं. ९· ४० आणि १५· ५४ इ०.] ऋग्वेदात आढळत नाहीत. परंतु वाजसनेय संहितेतच आढळतात. एके ठिकाणी बृहदारण्यक [... द्रष्टव्यस्त्वथ मन्तव्यः श्रोतव्यश्च द्विजातिभिः ॥' याज्ञ. ३· १९१ = 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यः' इ. बृहदार. उप. २· ४· ५ आणि ४· ५· ६.] उपनिषदातील काही भागांचा अनुवाद केला असून त्या उपनिषदातील प्रत्यक्ष शब्दच वापरले आहेत. याज्ञ०स्मृति ही शुक्ल यजुर्वेदाच्या एका धर्मसूत्राच्या आधारावर तयार करण्यात आली असे काही पाश्चिमात्य ग्रंथकारांनी म्हटले आहे. परंतु त्याला पोषक असा पुरावा उपलब्ध नाही.

याज्ञ०स्मृतीचा रचनाकाल ख्रि. पू. पहिले शतक आणि इ. स. चे तिसरे शतक ह्यांच्या दरम्यानचा असावा. कुमारिलभट्टांनी तंत्रवार्तिकात मनु, आपस्तंब, बौधायन, यांचे उल्लेख केले आहेत परंतु याज्ञ०स्मृतीचा मुळीच उल्लेख केला नाही. त्यावरून कुमारिलभट्टांना मनु, गौतम इत्यादिकांच्या एवढा याज्ञवल्क्य श्रेष्ठ आणि आदरणीय वाटला नसावा. मनुस्मृती आणि कौटिलीय यांचे अनुकरण याज्ञ०स्मृतीत केले असल्यामुळे त्या ग्रंथाचा काळ ख्रि. पू. पहिल्या शतकापूर्वीचा मानता येत नाही.

याज्ञ०स्मृतीत (१·२९६) नऊ ग्रहांची नावे रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहू आणि केतू ह्या क्रमाने दिली आहेत. वारांची नावे आणि ग्रहांचा क्रम हिंदुस्थानातील लोकांनी जर एकाद्या

परदेशापासून घेतला असला तर तो इजिप्तमधील लोकांपासून घेतला असण्याचाही संभव आहे. तेव्हा ह्या उल्लेखावरून याज्ञ०स्मृतीच्या कालनिश्चितीला काही मदत होत नाही.

याज्ञवल्क्यस्मृतीशिवाय याज्ञवल्क्याच्या नावाशी संबंध असणारे आणखी तीन ग्रंथ आहेत. ते म्हणजे वृद्धयाज्ञवल्क्य, योगयाज्ञवल्क्य आणि बृहद्याज्ञवल्क्य यांच्या स्मृती हे होत. हे तीनही ग्रंथ तुलनेने बरेच प्राचीन आहेत. त्या ग्रंथातील अवतरणे दुसऱ्या ग्रंथांत ['ननु हिरण्यगर्भो योगस्य वक्ता नान्यः पुरातनः' बृहद्योगियाज्ञ. १२· ५. हे अवतरण वाचस्पति मिश्राने योगसूत्र भाष्यावरील टीकेत उद्धृत केले आहे. अपरार्काच्या याज्ञ ३·१९८—२०१, ३· ५७, ३· २०५ यांवरील टीकेमध्ये बृहद्योगियाज्ञ. ची अवतरणे उद्धृत केली आहेत.] उद्धृत केली आहेत त्यांवरून विचार करता बृहद्याज्ञवल्क्याचा ग्रंथ इ. स. १००० पूर्वीचा असावा आणि योग-याज्ञवल्क्य हा ग्रंथ इ. स. ८०० च्या बऱ्याच अगोदर निश्चितपूर्वक अस्तित्वात होता. डेक्कन कॉलेजच्या संग्रहात 'बृहद्योगी याज्ञवल्क्यस्मृति' ह्या नावाचा दुसरा एक हस्तलिखित ग्रंथ आहे. त्या ग्रंथाच्या अंतःस्वरूपावरून तो ग्रंथ इ. स. २०० ते ७०० ह्या कालखंडात रचला गेला असला पाहिजे.

याज्ञवल्क्यस्मृतीवर बऱ्याच टीका लिहिल्या गेल्या आहेत. त्यांपैकी विश्वरूप, विज्ञानेश्वर (मिताक्षरा), अपरार्क आणि शूलपाणी ह्यांच्या टीका अधिक प्रसिद्ध आहेत. ब्रिटिश सरकारच्या न्यायालयात हिंदु-कायद्याच्या अंमलबजावणीच्या बाबतीत सर्व हिंदुस्थानभर विज्ञानेश्वरांच्या मिताक्षरा टीकेला सर्वोच्च महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आणि त्यामुळे पर्यायाने याज्ञवल्क्यस्मृतीला सर्व हिंदुस्थानभर अधिकृत ग्रंथांचे स्थान मिळाले. थोडक्यात परंतु स्पष्ट शब्दांत केलेले तत्त्वांचे प्रतिपादन, व्यापक दृष्टी आणि स्त्रीपुरुषांच्या आणि निरनिराळ्या वर्णांच्या अधिकाराच्या बाबतीत इतर ग्रंथांच्या मानाने अधिक निःपक्षपातीपणा हे गुण ह्या स्मृतीत असल्यामुळे तिला मिळालेल्या ह्या उच्च स्थानाला ती खरोखरच पात्र आहे.

————

अनुक्रमणिका

# प्रकरण २०

## इतर महत्त्वाचे स्मृतिग्रंथ

(मू. ग्रं. पा. १९०-२२१)

मनुस्मृती आणि याज्ञवल्क्यस्मृती ह्यांच्याव्यतिरिक्त इतर महत्त्वाच्या स्मृतींपैकी ह्या प्रकरणात पराशरस्मृती, नारदस्मृती, बृहस्पतीस्मृती आणि कात्यायनस्मृती ह्यांचे थोडक्यात विवेचन करण्यात येईल.

**पराशरस्मृती :** (मू. ग्रं. पा. १९०)

याज्ञवल्क्याने प्राचीन धर्मशास्त्रकारांमध्ये पराशराचा समावेश केला आहे. ह्यावरून पराशरस्मृती प्राचीन काळची असली पाहिजे. परंतु उपलब्ध पराशरस्मृतीत याज्ञ०स्मृतीचा उल्लेख केला आहे. ह्यामुळे प्राचीन काळची पराशरस्मृती आज उपलब्ध नसून तिची पुनर्रचना करून तयार केलेली स्मृती उपलब्ध असावी असे वाटते. गरुडपुराणात पराशरस्मृतीचा सारांश १९ श्लोकात सांगितला आहे. कौटिल्याने राजनीति आणि राजव्यवस्था यासंबंधीच्या विवेचनात पाराशर अथवा पाराशरस् ह्यांच्या मताचा अनेकवेळा उल्लेख केला आहे. ह्यावरून पराशराचा राजनीतिशास्त्रावर एक ग्रंथ असावा आणि त्यात बहुधा व्यवहाराचा विचार केलेला असावा.

उपलब्ध पराशरस्मृतीत १२ अध्याय असून ५९२ श्लोक असल्याचा त्या ग्रंथातच उल्लेख केला आहे ह्या ग्रंथात आचार आणि प्रायश्चित्त ह्या विषयांचेच फक्त विवेचन केले आहे. परंतु व्यवहार ['अत एवाचारकाण्डे व्यवहाराणामन्तर्भावमभिप्रेत्य पराशरः पृथग्व्यवहारकाण्डमकृत्वा क्षितिं धर्मेण पालयेदिति सूचनमात्रं व्यवहाराणां कृतवान्' परा. माध. पा. ८] हे क्षत्रियांच्या कर्तव्यातील एक अंग आहे असा युक्तिवाद करून माधवाचार्यांनी त्या स्मृतीवरील आपल्या टीकेत—म्हणजे पराशरमाधवीय ह्या ग्रंथात—व्यवहार ह्या विषयासंबंधी विस्तृत विवेचन केले आहे.

पराशर हे नाव प्राचीन काळचे आहे. त्या नावाचा उल्लेख तैत्तिरीय [तै. आरण्यक १· १· ३· ३७.] आरण्यकात, बृहदारण्यक [बृहदारण्यक वंश प्रकरणामध्ये 'पाराशर्य' हे नांव आहे.] उपनिषदात निरुक्तात [निरुक्त ६· ३० 'पराशीर्णस्य वसिष्ठस्य जज्ञे।'] आणि पाणिनीच्या [पाराशर्यशिलालिभ्यां भिक्षुनटसूत्रयोः । पाणिनी ४· ३· ११०·] सूत्रात आला आहे. पराशरस्मृतीमध्ये असे वर्णन केले आहे की एकदा ऋषिलोक व्यासांकडे जाऊन त्यांनी धर्म आणि कलियुगात मानवजातीला हिंतावह आचार आम्हाला सांगा अशी व्यासांना विनंती केली आणि व्यासांनी त्या ऋषींना आपला पिता शक्तिसुत पराशर ह्याच्याकडे बदरिकाश्रमात नेले आणि नंतर पराशरांनी चारी वर्णांच्या आचारांचे विवेचन केले. त्या स्मृतीत त्यावेळी ज्ञात असलेल्या १९ स्मृतींची नावे दिली असून कलियुगात पराशरस्मृतीला प्रमाणभूत मानावे असे सांगितले आहे.

पराशरस्मृतीत धर्मशास्त्रावरील दुसऱ्या अनेक ग्रंथकारांची मते उद्धृत केली आहेत. पराशरस्मृतीतील अवतरणे मिताक्षरा, अपरार्क प्रभृती दुसऱ्या अर्वाचीन काळातील ग्रंथांत उद्धृत केली आहेत आणि त्यांतील बहुतेक अवतरणे उपलब्ध पराशर स्मृतीत सापडतात. ह्यावरून इ.स.च्या ९ व्या शतकाच्या पूर्वार्धात त्या स्मृतीला आधारभूत ग्रंथांचा दर्जा प्राप्त झाला होता. पराशरस्मृतीत मनूचा अनेक

वेळा उल्लेख केला आहे ह्यावरून त्या स्मृतीचा रचनाकाळ इ.स.च्या पहिल्या आणि पाचव्या शतकांच्या दरम्यानचा मानावा लागतो. विष्णुधर्मोत्तर [अनाथं ब्राह्मणं प्रेतं ये वहन्ति द्विजातयः । पदे पदे यज्ञफलमानुपूर्वाल्लभन्ति ते ॥' अ. ३ पा. १२ = विष्णुधर्मोत्तर ७५· १·] पुराणात पराशरस्मृतीतील श्लोक घेतले असल्याचे त्या पुराणातील अवतरणांवरून दिसून येते.

जीवानंदाच्या संग्रहात बृहत्पराशरसंहिता नावाचा एक सुमारे ३००० श्लोकांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. हा ग्रंथ पराशरस्मृतीची पुनर्रचना करून सुव्रताने तयार केला असावा असे दिसते. त्यातील प्रास्ताविक श्लोकात पराशरस्मृतीसारखीच कथा दिली आहे. ह्या ग्रंथात [जीवानन्द स्मृतिसंग्रह भाग २ पा. २४४.] राशींचा उल्लेख केला आहे. ह्यावरून तो अलिकडील काळात झाला असावा.

अपरार्काने (याज्ञ. २.३१८ वरील टीकेत) वृद्ध पराशरस्मृतीतील एक अवतरण उद्धृत केले असून ते पराशरस्मृतीतील मताच्या विरुद्ध आहे. पराशरमाधवीयातही वृद्धपराशराचे एक अवतरण उद्धृत केले आहे. तो ग्रंथ पराशरस्मृती आणि बृहत्पराशर स्मृती ह्यांच्यापेक्षा निराळा असावा. हेमाद्रीने [चतुर्वर्ग. खं. ३ भाग २ पा. ४८.] चतुर्वर्गचिंतामणी ह्या ग्रंथात आणि भट्टोजीने [चतुर्विंशतिमतावरील भट्टोजीची टीका (पा. १३८)] चतुर्विंशति मतावरील टीकेत ज्योतिःपराशर नावाच्या एका ग्रंथातील अवतरणे उद्धृत केली आहेत.

**नारदस्मृती :** (मू. ग्रं. पा. १९६)

व्यवहारविषयाचे विवेचन केलेले नारदाचे एक लहान आणि एक मोठा— असे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. मोठ्या ग्रंथातील ५ व्या प्रकरणातील २२ व्या श्लोकापासून पुढील संहिता लहान ग्रंथातील संहितेसारखीच आहे. नेपाळमध्ये सापडलेल्या एका हस्तलिखितात चोरी आणि दिव्ये ह्या विषयांचे विवेचन असलेली दोन प्रकरणे अधिक आहेत. त्याच हस्तलिखितात एका प्रकरणाच्या शेवटी 'इति मानवधर्मशास्त्रे नारदप्रोक्तायां संहितायां' असे उल्लेख आहे. ह्यावरून मनुस्मृती आणि नारदस्मृती ह्यांचा निकट संबंध दिसून येतो.

याज्ञ. ने अथवा पराशराने नारदाच्या नावाचा प्राचीन धर्मशास्त्रप्रणेत्यांच्या नावात समावेश केलेला नाही. परंतु वृद्धयाज्ञवल्क्याच्या एका अवतरणात धर्मशास्त्रप्रवक्त्यात नारदाचे नाव पहिल्याप्रथम घातले आहे.

नारदस्मृतीच्या छापील प्रतीत ३ प्रास्ताविक प्रकरणे असून एकूण १०२८ श्लोक आहेत. त्यात न्यायदानाच्या पद्धतीची मूलतत्त्वे (व्यवहारमातृक) आणि न्यायसभा ह्या विषयांचे विवेचन केले आहे नारदस्मृतीतील श्लोक निरनिराळ्या निबंधग्रंथात उद्धृत केले आहेत. स्मृतिचंद्रिका, हेमाद्री, प्रभृती अर्वाचीन निबंधग्रंथात नारदस्मृतीतील आचार, श्राद्ध, प्रायश्चित्त ह्या विषयांवरील अनेक श्लोक उद्धृत केले आहेत. परंतु विश्वरूप, मेघातिथी आणि विज्ञानेश्वर ह्यांच्यासारख्या जुन्या ग्रंथकारांनी नारदस्मृतीतील व्यवहार प्रकरणाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही प्रकरणातील एकही अवतरण उद्धृत केलेले नाही. ह्यावरून आचार आणि प्रायश्चित्त ह्या विषयांवरील अवतरणे ज्यातून घेतली आहेत तो ग्रंथ नारदस्मृतीच्यानंतर तयार झाला असावा आणि मेघातिथी प्रभृतींच्या काळी तो अस्तित्वात नसावा अथवा त्याला प्रमाणभूत ग्रंथांचा दर्जा प्राप्त झाला नसावा.

मनूने केलेल्या मूळ ग्रंथाचा नारद, मार्कंडेय आणि सुमतिभार्गव ह्यांनी एकामागून एक संक्षेप केले असे वर्णन केलेला प्रास्ताविक भाग गद्यात असून बाकीचा सर्व ग्रंथ एक दोन अपवाद सोडून श्लोकबद्ध आहे. नारदस्मृतीत धर्मशास्त्र [नारद व्यवहारमातृका, अ. १· ३७ आणि ३९.] आणि अर्थशास्त्र यांचे उल्लेख केले आहेत. मनूने म्हणून उद्धृत केलेल्या काही श्लोकांशी समानार्थी श्लोक उपलब्ध मनुस्मृतीत आढळत नाहीत. मनुस्मृती [मनु. ८· १२।१४ आणि १८।१९ = नारद (सभा. ८।१० आणि १२।१३); मनु ८·१४०।१४१ = नारद (ऋणादान ९९।१००) इ०] आणि महाभारत [शान्ति १११· ६६ = नारद (व्य. मा. ७२); उद्योग ३५· ५८= नारद (सभा. १८); उद्योग ३५· ३१।३२ = नारद (ऋणा २०२।२०३) इ०] ह्यात असलेले बरेच श्लोक नारदस्मृतीत आले आहेत. कौटिल्याच्या [कौटिल्य, धर्मस्थीय, अ. १ अखेरचे श्लोक = ना. व्य. मा. अ. १ श्लो. २· १०।११, ३९।४०; नारद, व्य. मा. १· १०।११ ह्या श्लोकांचे पूर्वार्ध ना. मध्ये आहेत.] अर्थशास्त्रावरील वाक्ये नारदस्मृतीशी जुळतात आणि काही ठिकाणी तर दोन्ही ग्रंथातील वाक्ये अक्षरशः सारखी आहेत.

नारदस्मृती मनुस्मृतीच्या आधारावर केलेली असली तरी काही महत्त्वाच्या बाबतीत त्या दोन ग्रंथातील मते भिन्न आहेत, मनुस्मृतीपेक्षा नारदस्मृतीची रचना अधिक पद्धतशीर आहे. याज्ञवल्क्याला दिव्याचे ५ प्रकारच माहित होते; नारदाला सात प्रकार माहित होते आणि नारदाचे विवेचन याज्ञवल्क्यापेक्षा अधिक विस्तृत आहे. ह्यावरून नारदस्मृती याज्ञ०स्मृतीच्या मागाहून झालेली असावी. त्यात याज्ञ०-स्मृतीपेक्षा अधिक व्याख्या सांगितल्या आहेत. न्यायदानपद्धतीविषयीचे नारदाने दिलेले नियम अधिक व्यवस्थित आणि अधिक सांगोपांग आहेत. ह्या सर्व गोष्टींवरून याज्ञ०च्याच काळी किंवा त्याच्यानंतर थोड्याच काळाने नारदस्मृती रचिली गेली असावी. इ.स.च्या आरंभीच्या काही शतकांत म्हणजे इ. स. १०० ते इ. स. ३०० ह्या दरम्यान नारद होऊन गेला असावा.

नारदाचे वसतिस्थान निश्चितपणे सांगता येत नाही. त्या स्मृतीची सर्वात जुनी हस्तलिखित प्रत नेपाळात मिळाली. परंतु तेवढ्यावरून काही निश्चित तर्क करता येत नाही. काव्य विषयावरील प्रसिद्ध ग्रंथकार भामह हा काश्मीर प्रांतातील होता, परंतु त्याच्या ग्रंथाची एकमेव उपलब्ध झालेली हस्तलिखित प्रत दक्षिणभारतात मिळाली आहे.

भट्टोजीने चतुर्विंशतिमतावरील टीकेत (पा. ११) एका ज्योतिर्नारदाचे अवतरण उद्धृत केले आहे. रघुनंदनाने बृहन्नारदाचे एक अवतरण उद्धृत केले असून निर्णयसिंधु आणि संस्कार कौस्तुभ ह्या ग्रंथात लघुनारदाची अवतरणे उद्धृत केली आहेत.

नारदस्मृतीवर असहायाने टीका केली आहे.

**बृहस्पतिस्मृति** (मू. ग्रं. पा. २०७)

याज्ञ०स्मृतीमध्ये दिलेल्या धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांच्या यादीत बृहस्पतीचा समावेश केला आहे. परंतु त्या ठिकाणी बृहस्पतीचा राजनीतिशास्त्रावरील ग्रंथच याज्ञवल्क्यांच्या मनात असावा. राजनीतिशास्त्रावरील ग्रंथांप्रमाणेच कायद्याच्यासंबंधीचा एक बृहस्पतीचा ग्रंथ आहे. परंतु तो संपूर्ण ग्रंथ अद्यापि सापडलेला नाही.

अनुक्रमणिका

त्या ग्रंथातील अवतरणे इतर ग्रंथात उद्धृत केली आहेत त्यावरून जेव्हा तो ग्रंथ उपलब्ध होईल तेव्हा कायद्याचे काटेकोर सिद्धान्त आणि व्याख्या ह्यांच्या बाबतीत प्राचीन भारतातील लोकांची तीव्र बुद्धिमत्ता किती उच्च दर्जाला पोचली होती हे दर्शविणारे तो ग्रंथ एक फार मौल्यवान साधन होईल.

उपलब्ध मनुस्मृतीशी बृहस्पतीस्मृतीचे निकट साम्य आहे. मनुस्मृतीमधील त्रोटक विवेचनाचा बृहस्पतीने काही ठिकाणी विस्तार करून त्याबद्दलची उदाहरणे [मनु ८·१५३ मध्ये व्याजाचे चक्र, काल, कारित आणि कायिक असे चार प्रकार सांगितले आहेत, परंतु त्यांची उदाहरणे दिली नाहीत. बृहस्पतीने त्यांचा पुढीलप्रमाणे खुलासा केला आहे असे कुल्लूकाने म्हटले आहे : 'तासां स्वरूपमाह बृहस्पतिः ।

कायिका कायसंयुक्ता मासग्राह्या च कालिका । वृद्धेर्वृद्धिश्चक्रवृद्धिः कारिता ऋणिनाकृता ॥] दिली आहेत. त्यामुळे बृहस्पतीला मनुस्मृतीवरील वार्तिककार म्हणता येईल. घनासंबंधी [तदाहबृहस्पतिः । 'द्विपदोव्यवहारश्च धनहिंसासमुद्भवः । जीमूतवाहनकृत व्यवहारमातृका पा. २७७.] (दिवाणी) आणि हिंसेसंबंधी (फौजदारी) असे विवादांचे स्पष्ट दोन विभाग करणारा बृहस्पती हा पहिलाच कायदेपंडित असावा.

बृहस्पतीने प्रतिपादन केलेल्या मतांचा विचार केल्यास तो निश्चितपणे मनु आणि याज्ञवल्क्य ह्यांच्या मागून झाला असावा असे स्पष्ट होते. विश्वरूप आणि मेघातिथी हे बृहस्पतीला प्रमाणभूत ग्रंथकार मानीत असत. कात्यायनाने बृहस्पतीची अवतरणे आधाराकरिता अनेक ठिकाणी उद्धृत केली आहेत. ह्या सर्वांचा विचार केल्यास बृहस्पती इ. स. च्या ४ थ्या शतकानंतर झाला असे म्हणता येत नाही. ज्या अर्थी बृहस्पतीला उपलब्ध मनुस्मृतीची माहिती होती आणि तो याज्ञवल्वयानंतर आणि बहुधा नारदाच्याही नंतर झालेला होता, त्या अर्थी बृहस्पती इ. स. २०० ते ४०० ह्यांच्या मध्यंतरी झाला असला पाहिजे.

विश्वरूपाने बृहस्पतीच्या ग्रंथातील गद्य आणि पद्य अवतरणे भेदभाव न करता उद्धृत केली आहेत. ह्यावरून कायद्याच्या विषयावरील श्लोकबद्ध ग्रंथ करणारा बृहस्पती आणि राजनीतिशास्त्रावरील सूत्रकार बृहस्पती हे दोन्ही एकच होते आणि तो ग्रंथकार अति प्राचीन काळी होऊन गेलेला होता असे विश्वरूपाच्या काळी समजत असत असे दिसते. बृहस्पतीचा देश कोणता ह्याबद्दल काही निश्चितपणे सांगता येत नाही.

बृहस्पतीचे १००० हून अधिक श्लोक निरनिराळ्या ग्रंथांत उद्धृत केलेले आहेत आणि त्यांत व्यवहाराप्रमाणेच आह्निक, श्राद्ध, इत्यादी विषयांवरीलही श्लोक आहेत. ह्यावरून बृहस्पतीचा ग्रंथ फार विस्तृत असून त्यात कित्येक सहस्त्र श्लोक असले पाहिजेत आणि त्यात केवळ व्यवहाराविषयाचीच नव्हे तर धर्मशास्त्रातील इतर प्रश्नांची चर्चा केलेली होती.

मिताक्षरेत (याज्ञ० ३-२६१ वरील टीकेत) एक वृद्ध बृहस्पतीचा श्लोक उद्धृत केला आहे. कुल्लूकानेही वृद्ध बृहस्पतीचा एक श्लोक उद्धृत केला आहे. हेमाद्रीने ज्योतिर्दृहस्पतीचा एक श्लोक चतुर्वर्गचिंतामणि ह्या ग्रंथात उद्धृत केला आहे. अपरार्काने वृद्धबृहस्पतीचे म्हणून ४ श्लोक उद्धृत केले आहेत, परंतु त्यांपैकी ३ श्लोक बृहस्पतीचे असल्याचे पराशरमाधवीयात म्हटले आहे आणि एक श्लोक कात्यायनाचा असल्याचे व्यवहारमातृका ह्या ग्रंथात सांगितले आहे.

**कात्यायनस्मृती** (मू. ग्रं. पा. २१३)

प्राचीन हिंदु कायदा आणि व्यवहार ह्यांच्या बाबतीत प्रमाणभूत मानलेल्या ग्रंथकारांत नारद, बृहस्पती आणि कात्यायन ही त्रिमूर्ती आहे. कात्यायनाचा व्यवहारविषयावरील ग्रंथ बृहस्पतीच्या

ग्रंथाप्रमाणेच अद्यापी उपलब्ध झालेला नाही. त्याची माहिती इतर ग्रंथात उद्धृत केलेल्या अवतरणांवरूनच कळते.

शंखलिखित, याज्ञवल्क्य आणि पराशर ह्यांनी धर्मप्रणेत्यांमध्ये कात्यायनाचा समावेश केला आहे. बौधायन धर्मसूत्रात (१·२·४७) कात्यायनाचा उल्लेख केला असून त्याचा आधार दिला आहे. शुक्ल यजुर्वेदाचे एक श्रौतसूत्र आणि एक श्राद्धकल्प कात्यायनाच्या नावावर प्रसिद्ध आहेत.

कात्यायनाने नारद आणि बृहस्पती ह्यांनी योजलेली परिभाषा आणि त्यांचे रचना कौशल्य ह्यांचा पूर्णपणे स्वीकार केला आहे. निरनिराळ्या प्रकारच्या स्त्रीधनाच्या काळजीपूर्वक व्याख्या सांगणारा आणि त्यासंबंधी विवेचन करणारा कात्यायन हाच पहिला ग्रंथकार असावा असे दिसते आणि त्याच्या त्या विषयावरील विवेचनाला अधिकृत ग्रंथाचा दर्जा प्राप्त झाला आहे. सुमारे १०।१२ निबंधग्रंथांत व्यवहार ह्या विषयावरील कात्यायनाच्या ग्रंथातील सुमारे ९०० श्लोक उद्धृत केले आहेत. सर्वसाधारण व्याख्या आणि स्त्रीधनासंबंधीचे विस्तृत नियम ह्यांच्यासारख्या काही विशिष्ट बाबतीत नारद आणि बृहस्पती ह्यांच्यापेक्षा कात्यायन अधिक पुरोगामी आहे.

कात्यायन खात्रीने मनु आणि याज्ञवल्क्य ह्यांच्या मागाहून बऱ्याच काळाने झालेला होता; नारद त्याच्यापूर्वी होऊन गेल्याचे कात्यायनाच्या ग्रंथात दर्शित केले आहे. तो बृहस्पतीला व्यवहारविषयावरील प्रमुख ग्रंथकार मानीत असे. ह्या सर्वांचा विचार करता कात्यायनाचा काल जास्तीत जास्त इ. स. च्या ३ ऱ्या अथवा ४ थ्या शतकाइतका असू शकेल. विश्वरूप आणि मेघातिथी ह्यांनी कात्यायनाला नारद आणि बृहस्पती ह्यांच्या सारखाच अधिकृत असा स्मृतिकार मानला आहे. म्हणून कात्यायनाच्या कालाची जास्तीतजास्त अलिकडील मर्यादा इ. स. चे ६ वे शतकही असू शकेल.

व्यवहारमातृका ह्या ग्रंथात (पा. ३०७) वृद्धकात्यायनाचे एक अवतरण दिले आहे. दायभाग आणि सरस्वतीविलास (पा. ३२०) ह्या ग्रंथातही वृद्धकात्यायनाचे श्लोक उद्धत केले आहेत. हे दोन ग्रंथ वेगळे होते किंवा एकच होते हे निश्चित सांगता येत नाही. चतुर्वर्गचिंतामणी ह्या ग्रंथात एका उपकात्यायनाचा उल्लेख केला आहे. अपरार्काने श्लोक-कात्यायनाचा एक श्लोक उद्धृत केला आहे.

सुमारे ५०० श्लोक असलेला कात्यायनकृत कात्यायनस्मृती अथवा कर्मप्रदीप अथवा गोभिलस्मृती अशा नावाने प्रसिद्ध असलेला एक ग्रंथ उपलब्ध आहे. त्या ग्रंथात काही गद्यभागही आहे. मिताक्षरा, अपरार्क, स्मृतिचंद्रिका प्रभृती ग्रंथांनी उद्धृत केलेले कात्यायनाचे काही श्लोक त्या ग्रंथात सापडतात. तथापी त्याच ग्रंथकारांनी कात्यायनाची म्हणून उद्धृत केलेली अनेक अवतरणे त्या ग्रंथात सापडत नाहीत. ह्यावरून असे सिद्ध होते की कात्यायनाने एक मोठा ग्रंथ केला असावा आणि कर्मप्रदीप ही त्या ग्रंथाची संक्षिप्त आवृत्ती असावी. कायदेपंडित कात्यायन आणि कर्मप्रदीपाचा कर्ता हे दोघे एकच असावे असे सिद्ध करणारा पुरेसा पुरावा उपलब्ध नाही. विज्ञानेश्वर आणि अपरार्क ह्यांच्यासारखे जुने प्रख्यात ग्रंथकार त्या दोघांत भेदभाव करीत नसावेत असे दिसते. परंतु विश्वरूप ह्या सर्वांत प्राचीन टीकाकाराने आचार आणि प्रायश्चित्त ह्या विषयांवरील कात्यायनाची अवतरणे कोठेही उद्धृत केली नाहीत. ह्यावरून अशी शंका येते की आचार आणि न्यायदान ह्यांच्याशी संबंध नसणाऱ्या दुसऱ्या विषयांचे विवेचन केलेला कात्यायनाचा ग्रंथ विश्वरूपाला माहित नसावा.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण २१

## इतर श्लोकबद्ध स्मृती

(मू. ग्रं. पा. २२१-२४६)

प्रस्तुत प्रकरणामध्ये इतर श्लोकबद्ध स्मृतींची संक्षिप्त वर्णने अकार अनुक्रमाने दिली आहेत.

**१. अंगिरस** (मू. ग्रं. पा. २२१)

याज्ञवल्क्याने धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांत अंगिरसाचा समावेश केला आहे. ह्याच्या ग्रंथातील व्यवहार ह्या विषयाव्यतिरिक्त इतर विषयांवरील अवतरणे विश्वरूपाने [विश्वरूप (याज्ञ १· ९, १· ५०, ३· २४८ प्रभृतीवरील टीका); अपरार्क (पा २२।२३, १०९, ११२) मेघातिथि (मनु ५· १५७); हरदत्त (गौ. २०·१)] आणि त्याच्या नंतर झालेल्या ग्रंथकारांनी पुष्कळ वेळा उद्धृत केली आहेत. स्मृतिचंद्रिकेत [यत्पूर्व मनुना प्रोक्तं धर्मशास्त्रमनुत्तमम् । न हि तत्समतिक्रम्य वचनं हितमात्मनः ॥ स्मृतिचं. (आह्निक).] अंगिरसाची काही गद्य अवतरणेही उद्धृत केली आहेत.

कमी अधिक श्लोक असलेल्या अंगिरसस्मृतीच्या अनेक हस्तलिखित प्रती उपलब्ध आहेत. विश्रामबागेमधील एका हस्तलिखित ग्रंथाला बृहद्अंगिरस असे नाव दिले आहे. मिताक्षरेमध्ये [मिताक्षरा (याज्ञ ३. २४३, २४१, २५८, आणि २६०)] एका मध्यम अंगिरसाची अवतरणे अनेक वेळा उद्धृत केली आहेत.

**२. ऋष्यशृंग** (मू. ग्र. पां. २२३)

ह्या ग्रंथकाराची आचार, आशौच, श्राद्ध आणि प्रायश्चित्त ह्या विषयांवरील अवतरणे [अपरार्क (पा. ७२४), मिताक्षरा (याज्ञ २· ११९)] मिताक्षरा, अपरार्क, स्मृतिचंद्रिकाप्रभृती ग्रंथांनी पुष्कळ वेळा उद्धृत केली आहेत. स्मृतिचंद्रिकेने ऋष्यशृंगाचे एक गद्य अवतरणही [अपि वाससा यज्ञोपवीतार्थान्कुर्यात् तदभावे त्रिवृत्ता सूत्रेण । स्मृतिचं १ (पा. ३२)] उद्धृत केले आहे.

**३. कार्ष्णाजिनि** (मू. ग्र. पां. २२३)

ह्या ग्रंथकाराची मुख्यत्वे श्राद्धासंबंधी अवतरणे [मिताक्षरा (याज्ञ ३· २६५) अपरार्क (पा. १३८)] मिताक्षरा, अपरार्क, स्मृतिचंद्रिका प्रभृती ग्रंथांत उद्धृत केली आहेत. अपरार्काने उद्धृत केलेल्या एका श्लोकात कन्या आणि वृश्चिक ह्या राशींचा उल्लेख आहे.

**४. चतुर्विंशतिमत** (मू. ग्रं. पा. २२३)

ह्या ग्रंथात मनु, याज्ञवल्क्य, अत्रि, विष्णु, वसिष्ठ, व्यास, उशनस्, आपस्तंब, वत्स, हारीत, बृहस्पती (गुरु), नारद, पराशर, गार्ग्य, गौतम, यम, बौधायन, दक्ष, शंख, अंगिरस, शातातप, सांख्य

(सांख्यायन?), संवर्त, विश्वामित्र ह्या २४ ऋषींनी केलेल्या उपदेशांचे सार ग्रथित केले आहे म्हणून त्याला चतुर्विंशतिमत हे नाव पडले आहे.

ह्या ग्रंथातील अवतरणे मिताक्षरा, अपरार्कप्रभृती अलिकडील काळच्या ग्रंथात अनेक वेळा उद्धृत केली आहेत. परंतु विश्वरूप आणि मेघातिथि ह्यांनी ह्या ग्रंथातील अवतरणे घेतली नाहीत. हा ग्रंथ विश्वरूप आणि मेघातिथि ह्यांच्या काळात बहुधा रचला गेला असावा.

ह्या ग्रंथाच्या काही भागावर भट्टोजीची मोठी विद्वत्तापूर्ण टीका प्रसिद्ध झालेली आहे.

### ५. **दक्ष** (मू. ग्रं. पा. २२५)

याज्ञवल्क्याने दिलेल्या धर्मशास्त्रकारांच्या नावांत दक्षाचे नाव आहे. विश्वरूपाने [विश्वरूप (याज्ञ १· १७, ३· ३०, ३· ६६, ३· १९१).] आणि मिताक्षरेने [मिता. (याज्ञ. १· ८९, ३· ५८, ३· २४३)] दक्षाचे श्लोक उद्धृत केले आहेत. अपरार्काने [सामान्यं याचितं न्यस्तमाधिर्दाराश्च तद्धनम् । अन्वाहितं च निक्षेपः सर्वस्वं चान्वये सति ॥ आपत्स्वपि न देयानि नव वस्तुनि पण्डितैः । यो ददाति स मूढात्मा प्रायश्चित्तीयते नरः ॥ अपरार्क पा ४०४.] दक्षाचे कोणत्या नऊ वस्तू दान देता येत नाहीत ह्याविषयीचे दोन सुप्रसिद्ध श्लोक उद्धृत केले आहेत.

जीवानंदाच्या स्मृतिसंग्रहात ७ अध्याय आणि २२० श्लोक असलेली एक दक्षस्मृती छापली असून आनंदाश्रमाच्या संग्रहातही एक दक्षस्मृति आहे.

ही स्मृती निःसंशय फार प्राचीन काळची आहे. निरनिराळ्या ग्रंथांत उद्धृत केलेले दक्षाचे बहुतेक श्लोक ह्या छापील प्रतीत आढळतात.

### ६. **पितामह** (मू. ग्रं. पा. २२६)

वृद्धयाज्ञवल्क्याच्या श्लोकात धर्मशास्त्रकाराच्या नावात पितामहाचा समावेश केला आहे. ह्या स्मृतीतील मुख्यतः व्यवहार ह्या विषयावरील अवतरणे विश्वरूप, मिताक्षरा, अपरार्क, स्मृतिचंद्रिकाप्रभृती ग्रंथांनी उद्धृत केलेली आहेत.

ह्याने एका प्रश्नावरील बृहस्पतीचे [ग्रामगोष्ठपुरश्रेणिसार्थसेना निवासिनाम् ।
व्यवहारश्चरित्रेण निर्णेतव्यो बृहस्पतिः ॥] मत उद्धृत केले आहे. ह्यावरून तो बृहस्पतीच्या मागून आणि इ. स. च्या ४ थ्या आणि ७ व्या शतकांच्या मध्यंतरीच्या काळात केव्हातरी होऊन गेला असावा.

### ७. **पुलस्त्य** (मू. ग्रं. पा. २२८)

वृद्धयाज्ञवल्क्याने वर्णन केलेल्या धर्मशास्त्रप्रणेत्यांपैकी पुलस्त्य एक आहे. विश्वरूप, [विश्वरूप (याज्ञ १·१७), मिता (याज्ञ ३·२५३), अपरार्क (याज्ञ ३·५७), स्मृतिचं (आह्निक आणि श्राद्ध).] मिताक्षरा, प्रभृती ग्रंथकारांनी पुलस्त्याचे अनेक श्लोक उद्धृत केले आहेत आणि ते श्राद्ध, संध्या, आशौच, यतींची कर्तव्ये, इत्यादी विषयांसंबंधी आहेत. दानरत्नाकरात [दानरत्नाकर (डे. कॉ. हस्तलि. क्र. ११४ सन १८८४-८६,) पृष्ठ ५१ अ] पुलस्त्याचे एक गद्य अवतरण

उद्धृत केले आहे. पुलस्त्यस्मृति इ. स. च्या ४ थ्या आणि ७ व्या शतकांच्या मध्यंतरच्या काळात रचिली गेली असावी.

**८. प्रचेतस्** (मू. ग्रं. पा. २२९)

पराशराने दिलेल्या ऋषींच्या नावात प्रचेतसाचे नाव आहे परंतु याज्ञवल्क्याने त्याच्या नावाचा समावेश केला नाही. ह्याची आह्निककर्मे, श्राद्ध, आशौच, प्रायश्चित्त ह्या विषयांवरील गद्य आणि पद्य अवतरणे मिताक्षरा, [मिता. (याज्ञ ३·२७), हरदत्त (गौ. २३·१)] स्मृतिचंद्रिका, हरदत्त आणि अपरार्क ह्यांनी उद्धृत केली आहेत.

मिताक्षरा, हरदत्त, अपरार्क ह्यांनी आशौच आणि प्रायश्चित्त ह्या विषयांवरील [मिता. (याज्ञ ३·२०, २६३।२६४), हरदत्त (गौ. २२· १८)] बृहत् प्रचेतसाचे आणि वृद्ध प्रचेतसाचे श्लोक उद्धृत केले आहेत आणि त्याच विषयावरील वृद्ध प्रचेतसाची अवतरणे मिताक्षरा आणि अपरार्क ह्यांनी उद्धृत केली आहेत.

**९. प्रजापती** (मू. ग्रं. पा. २२९)

बौधायनधर्मसूत्रात [बौ. ध. सू. २· ४· १५ आणि २·१०· ७१.] प्रजापतीला एक प्रमाणभूत ग्रंथकार मानला आहे. वसिष्ठाने प्रजापतीचे श्लोक [वसिष्ठ ३·४७, १४·१६।१९, २४।२७, ३०।३२] पुष्कळवेळा उद्धृत केले आहेत आणि ते सर्व श्लोक एक तर मनुस्मृतीत सापडतात अथवा त्यांच्या समानार्थी श्लोक मनुस्मृतीत आहेत. ह्यावरून वरील दोन्ही ग्रंथकारांच्या मनात प्रजापती म्हणजे मनु असेच असावे असा संभव वाटतो.

आनंदाश्रमाच्या संग्रहात १९८ श्लोक असलेली एक प्रजापतिस्मृती आहे. परंतु मिताक्षरा, अपरार्क ह्यांनी उद्धृत केलेल्या प्रजापतीच्या श्लोकांपैकी एकही त्या स्मृतीत आढळत नाही. त्या स्मृतीतील एका श्लोकात कन्या आणि वृश्चिक राशींचा उल्लेख केला आहे

अपरार्काने (पा. ९५२) परिव्राजकांच्या सांप्रदायाविषयी प्रजापतीचे एक मोठे गद्य अवतरण उद्धृत केले आहे. पराशरमाधवीयात दिव्यासंबंधी प्रजापतीचे अनेक श्लोक उद्धृत केले आहेत.

**१० मरीचि** (मू. ग्रं. पा. २३०)

मिताक्षरा, अपरार्क स्मृतिचंद्रिका ह्यांनी आह्निक, आशौच, व्यवहार इत्यादी विषयांच्या बाबतीत मरीचीला प्रमाणभूत मानला आहे. मिळकतीच्या स्वामीत्वाची देवघेव ह्या विषयीची मरीचीची मते प्रचलित [स्थावरे विक्रयाधाने विभागे दान एव च । प्रतिग्रहे च क्रीते न नालेख्या सिध्यति क्रिया ॥ परा. माध. खं. ३ पा. १२८ वरील मरीचीचे अवतरण; अविज्ञातनिवेशत्वाद्यत्र मूल्यं न लभ्यते । हानिस्तत्रसमाकल्प्या क्रेतुनाष्टिकयोर्द्वयोः ॥ अपरार्क पा. ७७५] कायद्यातील तत्त्वांशी फारच जुळती आहेत.

अपरार्काने (पा. ९०८), आशौच ह्या विषयावरील मरीचीचे एक गद्य अवतरण उद्धृत केले आहे.

**११. यम** (मू. ग्रं. पा. २३१)

वसिष्ठधर्मसूत्रात यमाचे चार श्लोक उद्धृत केले आहेत. त्यांपैकी तीन मनुस्मृतीत आढळतात. त्यातील एका [अथाप्युदाहरन्ति । अथचेन्मत्रविद्युक्तः शारीरैः पङ्क्तिदूषणैः । अदृष्यं तं यमः प्राह पङ्क्तिपावन एव सः ॥ वसि ध. सू. ११· २०.] श्लोकात यमाला प्रमाणभूत म्हटले आहे. याज्ञवल्क्याने ऋषींच्या नावात यमाचा समावेश केला आहे.

जीवानंदाच्या स्मृतिसंग्रहात एक यमस्मृती छापली आहे. आनंदाश्रमाच्या संग्रहात एक यमस्मृती आहे. त्यातील विषय सारखे असले तरी बहुतेक श्लोक एकमेकांशी जुळत नाहीत. त्यातील काही श्लोक मनुस्मृतीतील श्लोकांशी जुळते आहेत. आनंदाश्रमाच्या संग्रहात एक बृहद् यमस्मृती आहे. त्या स्मृतीतील पुष्कळ श्लोक जीवानंदाच्या यमस्मृतीशी जुळते आहेत.

हरदत्त, अपरार्क प्रभृती काही ग्रंथांत लघुयमाचा एक श्लोक उद्धृत केला आहे. वेदाचार्यकृत स्मृतिरत्नाकर ह्या ग्रंथांत स्वल्पयमाचा एक श्लोक उद्धृत केला आहे.

विश्वरूप, विज्ञानेश्वर प्रभृती ग्रंथात धर्मशास्त्राच्या व्यवहारासहित सर्व विषयांवरील यमाचे ३०० हून अधिक श्लोक उद्धृत केले आहेत. ह्यावरून यमाचा एक मोठा ग्रंथ ह्या ग्रंथकारांसमोर असावा आणि वर उल्लेख केलेल्या ग्रंथासारख्या त्या मोठ्या ग्रंथाच्या निरनिराळ्या संक्षिप्त आवृत्त्या तयार करण्यात आल्या असाव्या. अपरार्काने यमाची काही गद्य [अपरार्क पा ५८, ११३०, ११३५, १२१८, १२२२.] अवतरणे उद्धृत केली आहेत. महाभारतात (अनु. १०४.७२।७४) यमाच्या गाथा उद्धृत केल्या आहेत. स्मृतिचंद्रिकेत दिलेल्या यमाच्या [हंसे वर्षासु कन्यास्थे इ० स्मृतिचं (श्रा. पा. ३६६ घारपुरे आवृत्ती)] एका श्लोकात सूर्य मिथुन राशीत असल्याचा उल्लेख केला आहे.

**१२. लौगाक्षि** (मू. ग्रं. पा. २३५)

मिताक्षरेने [मिता. (याज्ञ ३· १।२, २६०, २८९).] आशौच आणि प्रायश्चित्त ह्या विषयावरील लौगाक्षीचे श्लोक उद्धृत केले आहेत. अपरार्काने संस्कार, वैश्वदेव इत्यादी अनेक विषयांवरील लौगाक्षीची गद्य अवतरणे आणि श्लोक उद्धृत केले आहेत.

**१३. विश्वामित्र** (मू. ग्रं. पा. २३६)

बृहद्याज्ञवल्क्याच्या श्लोकात धर्मशास्त्रकारांच्या नावात विश्वामित्राचा समावेश केला आहे. अपरार्क, स्मृतिचंद्रिका प्रभृती ग्रंथात धर्मशास्त्राच्या व्यवहाराव्यतिरिक्त बहुतेक सर्व विषयांवरील विश्वामित्राचे श्लोक उद्धृत केले आहेत. मद्रास सरकारच्या हस्तलिखितांच्या सूचीत ९ अध्याय असलेल्या एका विश्वामित्रस्मृतीचा निर्देश केला आहे.

**१४. व्यास** (मू. ग्रं. पा. २३६)

जीवानंदाच्या आणि आनंदाश्रमाच्या स्मृतिसंग्रहात व्यासांच्या नावाची एक स्मृती समाविष्ट केली आहे. दोन्ही ग्रंथ जवळजवळ एकसारखे असून त्यात ४ अध्याय आणि सुमारे २५० श्लोक आहेत.

अनुक्रमणिका

विश्वरूपाने आणि मेघातिथीने व्यासांचे म्हणून जे श्लोक उद्धृत केले आहेत ते मुख्यत्वेकरून महाभारतातून घेतलेले आहेत. स्मृतिचंद्रिकेमध्ये व्यासाचे व्यवहारविषयावरील सुमारे २०० श्लोक उद्धृत केले आहेत. त्यात आलेली मते बहुतेक बाबतीत नारद, कात्यायन आणि बृहस्पती ह्यांच्या मतांसारखीच आहेत. ह्यावरून व्यास हा ग्रंथकार याज्ञवल्क्य आणि बृहस्पती ह्यांच्या काळाच्या सुमारास म्हणजे इ.स. च्या २ ऱ्या आणि ५ व्या शतकांच्या मध्यंतरी होऊन गेला असावा.

अपरार्कप्रभृती दुसऱ्या काही ग्रंथांत उद्धृत केलेले व्यासांचे श्लोक खात्रीने महाभारतातून अथवा आनंदाश्रमाच्या संग्रहातील स्मृतीतून घेतलेले नाहीत. त्यातील श्लोकांत [अपरार्क (याज्ञ. १·१२); अपरार्क (पा. ४२४)] वार आणि राशी ह्यांचे उल्लेख केले आहेत. त्यावरून तो व्यास बराच मागाहूनचा असला पाहिजे. व्यवहारविषयावरील ग्रंथकार व्यास आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथकार व्यास दोन होते किंवा एक होते हे निश्चित सांगता येत नाही. स्मृतिचंद्रिकेत गद्यव्यासाचे एक अवतरण आणि सुमारे ४५० श्लोक उद्धृत केले आहेत. अपरार्काने बृहद्व्यासाचा एक श्लोक उद्धृत केला असून मिताक्षराप्रभृती दुसऱ्याही काही ग्रंथांनी बृहद्व्यासाचे श्लोक उद्धृत केले आहेत. बल्लाळसेनाने दानसागर ग्रंथात महा-व्यास आणि लघुव्यास ह्यांची वचने आधारभूत म्हणून उद्धृत केली आहेत. तसेच त्याने दानव्यासांचाही उल्लेख केला आहे. तो बहुधा महाभारतातील दानधर्माच्या विषयावरील भागांना उद्देशून असावा.

## **१५. षट्विंशन् मत** (मू. ग्रं. पा. २३८)

हा ग्रंथ चतुर्विंशतिमत ह्या ग्रंथासारखाच असावा असे दिसते. परंतु त्याची एकही हस्तलिखित प्रत उपलब्ध नसल्यामुळे त्यात आधारभूत मानलेले ३६ ऋषी कोण हे सांगता येत नाही.

ह्या ग्रंथाला काहींनी प्रमाणभूत मानला होता तर काहींनी मानला नव्हता. विश्वरूप आणि मेघातिथी ह्यांनी ह्या ग्रंथाचा निर्देश केला नाही. ह्यावरून हा ग्रंथ स्मृतींच्या रचनाकाळातील सर्वात अखेरीला तयार झालेला ग्रंथ असावा आणि तो बहुधा इ.स. ७०० ते ९०० ह्यांच्या मध्यंतरी केव्हा तरी झाला असावा. व्यवहार ह्या विषयावरील ह्या ग्रंथातील एकही अवतरण उद्धृत केलेले आढळत नाही. ह्या ग्रंथातून उद्धृत केलेल्या एका [बौद्धान् पाशुपताञ्जैनान् लोकायतिक कापिलान् । विकर्मस्थान् द्विजान् स्पृष्ट्वा सचैलो जलमाविशेत् ॥ स्मृतिचं० १ पा ११८ वरील अवतरण.] श्लोकात बौद्ध, पाशुपत, जैन, नास्तिक आणि कपिलानुयायी ह्यांचा उल्लेख केला आहे. ह्या ग्रंथातील एक गद्य अवतरण अपरार्काने उद्धृत केले आहे.

## **१६. संग्रह अथवा स्मृतिसंग्रह** (मू. ग्रं. पा. २३९)

ह्या ग्रंथातील धर्मशास्त्राच्या सर्व विषयावरील अवतरणे मिताक्षराप्रभृती ग्रंथांनी वारंवार उद्धृत केली आहेत. व्यवहार ह्या विषयावरील अवतरणे विपुल असून कायद्याच्या इतिहासाच्या दृष्टीने ती फार महत्त्वाची आहेत.

संग्रहातील मते पुष्कळ बाबतीत धारेश्वराच्या मतासारखी [संग्रहकारस्य धारेश्वरमतानुसारित्वात् । स्मृतिचं.] होती आणि ती मिताक्षरा प्रभृती अर्वाचीन ग्रंथकारांना संमत नव्हती. विश्वरूप आणि मेधातिथी ह्यांनी संग्रहाचा उल्लेख केला नाही. त्यातील मतांचा विचार करता **स्मृतिसंग्रह** हा ग्रंथ इ.स. च्या ८ व्या आणि १० व्या शतकांच्या मध्यंतरी झाला असावा.

**१७. संवर्त** (मू. ग्रं. पा. २४२)

याज्ञवल्क्याने दिलेल्या स्मृतिकारांच्या यादीत संवर्ताचे नाव आहे. विश्वरूप, मेधातिथी, मिताक्षराप्रभृती ग्रंथांनी संवर्ताची धर्मशास्त्राच्या सर्व विषयावरील अवतरणे उद्धृत केली आहेत. अपरार्कने संवर्ताच्या ग्रंथातून सुमारे २०० श्लोक उद्धृत केले आहेत. तो एक मोठा ग्रंथ असावा.

जीवनंदाच्या आणि आनंदाश्रमाच्या स्मृतिसंग्रहात सुमारे २३० श्लोक असलेली एक संवर्तस्मृती आहे. छापील संवर्तस्मृती मूळच्या संवर्तस्मृतीतील काही भागांची संक्षिप्त आवृत्ती असावी असे दिसते.

मिताक्षरेने बृहद्संवर्ताचे एक अवतरण [मिता. (याज्ञ ३·२६५, २८८)] उद्धृत केले आहे. हरिनाथकृत स्मृतिसार ह्या ग्रंथात स्वल्पसंवर्ताचे एक अवतरण उद्धृत केले आहे.

**१८. हारीत** (मू. ग्रं. पा. २४४)

व्यवहार ह्या विषयावरील उद्धृत केलेल्या हारीताच्या श्लोकांवरून कायदेपंडित असणारा हारीत, बृहस्पती आणि कात्यायन ह्यांच्या काळी म्हणजे इ.स. ४०० ते ७०० च्या मध्यंतरी होऊन गेला असावा.

ज्याच्या योगाने आपल्या स्वतःच्या धनाची प्राप्ती होते आणि ज्याच्या योगाने दुसऱ्या जातीला अनुरूप असणारी कृत्ये करण्याचे टाळले जाते, अशा प्रकारचा न्याय करण्याची जी पद्धती तिला व्यवहार म्हणतात अशी त्याने व्याख्या [स्वधनस्य यया प्राप्तिः परधर्मस्य वर्जनम् । न्यायेन यत्र क्रियते व्यवहारः स उच्यते ॥ हारीत (स्मृतिचं-मधील अवतरण)] दिली आहे. व्यभिचारी स्त्रीला [भार्याया व्यभिचारिण्या परित्यागो न विद्यते । दद्यात्पिण्डं कुचेलं च अधःशय्यां च शाययेत् ॥ हारीत (स्मृतिचं.)] देखील तिचा त्याग न करिता पतीने तिचे शरीर आणि प्राण एकत्र राहतील इतके अन्न आणि कमीत कमी आवश्यक कपडे तिला द्यावे असे त्याने सांगितले आहे.

―――――

अनुक्रमणिका

## प्रकरण २२

# प्रमुख टीकाग्रंथ आणि निबंधग्रंथ

(मू. ग्रं. पा. २४६-४६६)

धर्मशास्त्रावरील वाङ्मयाचे सामान्यतः जे तीन कालखंड पडतात त्यांतील तिसरा कालखण्ड इ. स. च्या ७ व्या शतकापासून इ. स. १८०० पर्यंतचा असून त्यात निरनिराळ्या स्मृतिग्रंथांवर टीकात्मक ग्रंथ आणि सर्व स्मृतींवरील वचनांचा समन्वय केलेले सारस्वरूपाचे निबंधग्रंथ लिहिले गेले. ह्या कालखंडातील ज्या भागात प्रसिद्ध टीकाकार होऊन गेले तो पहिला भाग सुवर्णयुग होय. स्मृतिग्रंथांवरील टीकांचे लेखन ह्या तिसऱ्या कालखंडाच्या जवळ जवळ अखेरीपर्यंत होत होते. उदाहरणार्थ, नंद पंडिताने विष्णुधर्मसूत्रावरील आपली वैजयंती नामक टीका इ. स. च्या १७ व्या शतकात लिहिली. तथापि इ. स. च्या १२ व्या शतकानंतर लेखकांची सर्वसाधारण प्रवृत्ती एकाद्या विशिष्ट स्मृतीवर टीका न लिहिता धर्मशास्त्रात अंतर्भूत होणाऱ्या विषयांवरील सर्व स्मृतिवचनांचा समन्वय केलेले सार स्वरूपाचे निबंधग्रंथ लिहिण्याकडे होती. अशा तऱ्हेच्या निबंधग्रंथांची उदाहरणे कल्पतरु, स्मृतिचंद्रिका, चतुर्वर्गचिंतामणि, चंडेश्वरकृत निरनिराळे रत्नाकर ही आहेत. ह्या कालखंडाच्या अगदी आरंभीच्या भागात देखील ग्रंथकारांनी एकाद्या विशिष्ट ग्रंथावर टीका लिहिण्याचा जरी संकल्प केला असला तरीही त्यांनी लिहिलेल्या ग्रंथांची रचना निबंधग्रंथांच्या स्वरूपाची असे आणि निरनिराळ्या स्मृतिवचनांतील विसंगती दूर करून त्यांत सुसूत्रता आणण्याचा आणि त्यातील परस्परविरोधी भासणाऱ्या वचनांचा समन्वय करणारा अर्थ लावण्याचा ते ग्रंथकार प्रयत्न करीत. उदाहरणार्थ, विश्वरूपाची (आचार आणि प्रायश्चित्त ह्या विषयावरील) टीका, विज्ञानेश्वराची मिताक्षरा टीका आणि अपरार्काचा ग्रंथ, हे ग्रंथ जरी याज्ञवल्क्यस्मृतीवर टीका म्हणून लिहिले असले तरी ते वास्तविक निबंधग्रंथाच्या स्वरूपाचे आहेत. टीका आणि निबंध ह्या दोन प्रकारांमध्ये अशा रीतीने स्पष्ट भेद दर्शविणारी सीमारेषा खरोखरच अस्तित्वात नाही. प्रस्तुत ठिकाणी टीकाकार आणि निबंध ग्रंथकार ह्यांच्यात स्पष्टभेद न मानता ज्यांनी धर्मशास्त्राच्या सर्व अथवा बहुतेक विषयांसंबंधी ग्रंथ लिहिले आहेत आणि ज्यांच्या ग्रंथांना प्रमाणभूत ग्रंथांची योग्यता प्राप्त झाली आहे अशा काही थोड्या महत्त्वाच्या आणि आदर्शभूत टीकाकारांचे आणि निबंधकारांचे विवेचन शक्य तितके त्यांच्या कालानुक्रमाने ह्या आणि ह्याच्या पुढील प्रकरणात केले आहे.

### १. **विश्वरूप** (मू. ग्रं. पा. २५२)

विश्वरूपाची याज्ञवल्क्यस्मृतीवर बालक्रीडा नावाची एक टीका प्रसिद्ध आहे. विश्वरूपाची व्यवहारविभागावरील टीका अतिशय त्रोटक आहे परंतु आचार आणि प्रायश्चित्त ह्या विभागांवरील टीका खरोखरच प्रचंड आहे. आणि ती मिताक्षरेच्या तोडीची आहे. विश्वरूपाची भाषा सोपी आणि जोरदार आहे आणि ती आद्य शंकराचार्यांच्या भाषेसारखी आहे. विश्वरूपाच्या ग्रंथावर पूर्व मीमांसेमधील मताची छाप पडलेली आहे. त्याने जैमिनीचा नामनिर्देश करून त्याची अवतरणे उद्धृत केली आहेत. विश्वरूप पूर्वमीमांसाशास्त्रात अत्यंत निपुण असला तरी त्याची तत्त्वज्ञानासंबंधी मते श्रीशंकराचार्यांच्या मतांसारखीच असल्याचे दिसून येते. मोक्ष हा यथार्थ ज्ञानाने प्राप्त होतो आणि सर्व संसार हा अविद्येपासून उत्पन्न होतो असे त्याचे मत होते. अनेक बाबतीत मिताक्षरा आणि विश्वरूप ह्यांची मते भिन्नभिन्न होती.

अनुक्रमणिका

विश्वरूपाने कुमारिलभट्टाच्या श्लोकवार्तिकाचा उल्लेख केला आहे आणि मिताक्षरेने विश्वरूपाला एक अधिकारी टीकाकार मानले आहे. ह्यावरून विश्वरूप इ.स. ७५० ते १००० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात होऊन गेला असला पाहिजे. विश्वरूप आणि आद्य शंकराचार्य ह्यांचा प्रसिद्ध शिष्य सुरेश्वराचार्य हे एकच असल्याचे मानतात. माधवाचार्यांनी आपल्या अनेक ग्रंथात सुरेश्वराच्या सुप्रसिद्ध ग्रंथातील अवतरणे विश्वरूपाची म्हणून उद्धृत केली आहेत. गुरुवंश काव्यात (२.५९) सुरेश्वर आणि विश्वरूप एकच असल्याचे सांगून तो कुमारिलभट्ट आणि श्रीशंकराचार्य ह्यांचा शिष्य असल्याचे वर्णन केले आहे. श्रीशंकराचार्य यांचा काळ इ. स. ७८८ ते ८२० हा असल्याचे सामान्यतः मानण्यात येते. ह्या सर्व गोष्टींचा विचार करता असे ठरते की विश्वरूप इ.स. ८०० ते ८२५ ह्या सुमारास होऊन गेला असावा.

अर्वाचीन काळच्या अनेक ग्रंथांत विश्वरूप-निबंध [शिवरामकृत कृत्यचिन्तामणि पृष्ठ १५० (डे. कॉ. हस्त. क्र. २२१ सन १८७९), वर्षक्रियाकौमुदी (पा ३७८, ३८०)] ह्या नावाच्या एका निबंध ग्रंथातील उतारे पुष्कळवेळा उद्धृत केले आहेत. तो ग्रंथ दुसऱ्या कोणातरी विश्वरूपाचा असावा असे वाटते. रघुनंदनाने उद्वाहरत्त्व [रघुनन्दनकृत उद्वाहतत्व (जीवानन्द आवृत्ती पा. ११६)] ह्या ग्रंथात विश्वरूपसमुच्चयाचा उल्लेख केला आहे. तो ग्रंथ आणि विश्वरूप निबंधग्रंथ बहुधा एकच असावेत.

## २. **मेधातिथी** (मू. ग्रं. पा. २६८)

मेधातिथी हा मनुस्मृतीवरील एक विस्तृत आणि विद्वत्तापूर्ण टीकेचा कर्ता होता. त्या स्मृतीवरील उपलब्ध असणाऱ्या टीकांत त्याचीच टीका सर्वात जुनी आहे.

मेधातिथीने पूर्वमीमांसेचे सखोल अध्ययन केले होते. त्याच्या भाष्यात जैमिनीची सूत्रे वारंवार उद्धृत केली असून त्यांचा उपयोग स्मृतिवचनांचा अर्थ लावताना पदोपदी केला आहे. मेधातिथीचे भाष्य फार उद्बोधक माहितीने भरलेले आहे.

दुसऱ्या ग्रंथांत मेधातिथीची म्हणून जी अवतरणे [परा. माध. (१ भाग २ पा. १८३–१८६); लोल्लटाचार्यकृत श्राद्धप्रकरण, आनंदाश्रमसंग्रहामधील हस्त लि. पृ. ४ ब, १० अ] उद्धृत केली आहेत त्यांवरून असे दिसून येते की मेधातिथीने धर्मशास्त्रातील अनेक विषयांचे विवेचन केलेला एक विस्तृत श्लोकबद्ध ग्रंथ लिहिला होता. हा ग्रंथ सांप्रत उपलब्ध झालेला नाही. मेधातिथीसारख्या जुन्या काळच्या विद्वान ग्रंथकाराने तो केलेला असल्यामुळे तो उपलब्ध झाल्यास त्याच्या योगाने धर्मशास्त्राचा विकास कसकसा होत गेला ह्याविषयी बरीच माहिती उजेडात येईल.

मेधातिथीने असहाय आणि कुमारिलभट्ट ह्यांचे नामनिर्देश केले आहेत आणि श्रीशंकराचार्यांची मतेही त्याने उद्धृत केली असल्याचा फार संभव आहे. त्याअर्थी तो इ. स. ८२० नंतर झाला असावा. मिताक्षरेने मेधातिथीला प्रमाणभूत मानला आहे. म्हणून तो इ.स. १०५० च्या पूर्वी झाला असला पाहिजे. तेव्हा तो इ.स. ८२५ आणि ९०० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात होऊन गेला असावा. मेधातिथीने विश्वरूप, भारुची अथवा श्रीकर ह्यांचे उल्लेख केले नाहीत ही गोष्टही वरील कालनिर्णयाला पुष्टि देते.

मेधातिथीच्या बापाचे नाव वीरस्वामिन् होते आणि त्याच्या भाष्यात दाक्षिणात्य ग्रंथकारांकडे विशेष लक्ष्य दिले आहे. ह्यावरून तो दाक्षिणात्य होता असे डॉ. जालीने [डॉ. जॉलीचीं टागोर लॉ लेक्चर्स पा. ६] प्रतिपादन

केले आहे. ह्याच्या उलट तो काश्मिरी (निदान उत्तर भारतातील होता असे बुल्हरने [बुल्हर (पौधग्रं. खं २५ पा CXXIII- CXXVI)] म्हटले आहे आणि त्याच्या भाष्यात आलेल्या अनेक उल्लेखांवरून हे मत बरोबर असावे असे दिसते. निर्णयसिंधूचा [निर्णयसिन्धु, सांपिड्य प्रकरण, तिसरा परिच्छेद] कर्ता कमलाकरभट्ट ह्यांच्यासारखे अर्वाचीन ग्रंथकार मेधातिथीला दाक्षिणात्य मानतात.

## ४. **धारेश्वर भोजदेव** (मू. ग्रं. पा. २७५)

धारानगरीचा विशेष प्रसिद्ध आणि विद्वानांचा आश्रयदाता राजा भोजदेव हाच धारेश्वर असावा असे अनेक गोष्टींवरून सिद्ध होते. दायभाग ['अयं वा धारेश्वरपुरस्कृतो वचनार्थः ।' दायभाग (पा. ५३) 'अत एव भोजदेवेनापि कृताकृता दुहित्रधिकारे' इ० (दाय भाग पा २८०)] ह्या ग्रंथात भोजदेव आणि धारेश्वर ह्या दोघांचे निर्देश केले असून त्या दोघांत भेद मानलेला नाही. इतर काही ग्रंथांत जी मते [विधवेच्या हक्कासंबंधी धारेश्वराची म्हणून मिताक्षरेने जी मते सांगितली आहेत तीच मते कमलाकरकृत विवादताण्डव ह्या ग्रंथात भोजदेवाची असल्याचे म्हटले आहे.] धारेश्वराची म्हणून सांगितली आहेत तीच दुसऱ्या काही ग्रंथात भोजदेवाची म्हणून म्हटली आहेत.

धारानगरीच्या भोजाने (अथवा त्याच्या नावावर) ज्ञानाच्या अनेक शाखांवर ग्रंथ रचले होते. काव्यशास्त्रावरील सरस्वतीकंठाभरण आणि शृंगारप्रकाश हे त्याचे दोन विस्तृत ग्रंथ अस्तित्वात आहेत. भोजाने व्याकरणावर एक ग्रंथ केला होता असे राजमार्तंड ग्रंथात म्हटले आहे. त्याने योगसूत्रावर एक टीका लिहिली होती आणि राजमृगांक नावाचा एक वैद्यक विषयावरील ग्रंथ लिहिला होता. भोजाने केलेला तत्त्वप्रकाश नावाचा शैव आगमावरील एक ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. मिताक्षरा, दायभाग इत्यादी ग्रंथांतील उल्लेखांवरून भोजदेवाने धर्मशास्त्रातील प्रमुख विषयांवर एक विस्तृत ग्रंथ लिहिला होता हे सिद्ध होते. रघुनंदनकृत निरनिराळ्या 'तत्त्व ग्रंथात भोजराजाच्या भुज बलभीम आणि राजमार्तंड ह्या दोन ग्रंथांचे उल्लेख केला आहेत. काही ठिकाणी राजमार्तंड ह्या ग्रंथाबरोबरच बृहद्‌राजमार्तंड ह्या ग्रंथाचा उल्लेख केला आहे. त्यावरून ते दोन ग्रंथ स्वतंत्र असावेत असे दिसते. मद्रास सरकारच्या हस्तलिखितांच्या सूचीत भोजराजाच्या भुजबलनिबंध नावाच्या ग्रंथाचा समावेश केला असून त्या ग्रंथात स्त्रीजातक, कर्णादिवेध इत्यादी धर्मशास्त्रांशी संबंध येणाऱ्या ज्योतिषशास्त्रातील विषयांचे विवेचन केले आहे. धारानगरीच्या भोजराजाची कारकीर्द ५५ वर्षाइतकी दीर्घ होती. त्याच्या संबंधीच्या [इंडि. ॲंटिक्केरी खं. ४१ पा २०१ (इ. स. १०२० चे दानपत्र); एपि. इंडि. खं. १८ पा. ३२० (इ. स. १०२० चा ताम्रपट) एपि. इंडि. खं. ३ पा. ४६–५० (इ. स. १०५५।५६ चा शिलालेख)] ताम्रपट आणि शिलालेख ह्यांतील उल्लेखांवरून त्याने इ. स. १००० आणि १०५५ ह्यांच्या मध्यंतरच्या काळात राज्य केले असले पाहिजे असे सिद्ध होते.

भोजाने केलेला धर्मप्रदीप नावाचा एक ग्रंथ आहे. तो ग्रंथ भारमल्लाचा पुत्र आशापुरचा राजा भोज ह्याच्या आज्ञेवरून पंडितांच्या एका सभेने तयार केला होता. त्यात विज्ञानेश्वराच्या ग्रंथातील आणि मदनपारिजातातील अवतरणे उद्धृत केली आहेत. त्यावरून तो इ. स. १४०० नंतर झाला असला पाहिजे.

## ४. **विज्ञानेश्वर** (मू. ग्रं. पा. २८७)

विज्ञानेश्वराने केलेल्या याज्ञवल्क्यस्मृतीवरील मिताक्षरा अथवा ऋजुमिताक्षरा अथवा प्रमिताक्षरा ह्या टीकाग्रंथाची योग्यता धर्मशास्त्रावरील वाङ्‌मयात अद्वितीय आहे. त्या ग्रंथाच्या पूर्वी सुमारे दोन हजार वर्षांत जी धर्मशास्त्राविषयी चर्चा होऊन गेली त्या चर्चेचे सार त्या ग्रंथात ग्रथित केले आहे. ब्रिटिशांच्या

अनुक्रमणिका

अमलाखाली न्यायालयांत बंगाल प्रांत सोडून इतर सर्व हिंदुस्थानभर दत्तक, वाटप, वारसा इत्यादी हिंदु कायद्यांच्या अनेक विषयांच्या बाबतीत मिताक्षरा हा ग्रंथ सर्वश्रेष्ठ प्रमाणभूत मानण्यात येत असे. ह्या ग्रंथात केवळ याज्ञवल्क्यस्मृतीतील श्लोकांचे विवरण केलेले नसून अनेक स्मृतिवचनांचा त्यात संग्रह केला आहे आणि त्या वचनांमध्ये असलेल्या परस्परविरोधांचा निरास पूर्वमीमांसाशास्त्रात घालून दिलेल्या नियमानुसार त्या वचनांचा अर्थ करून केला आहे. तसेच निरनिराळ्या सिद्धांतांची व्याप्ती किती आहे, त्याचा उपयोग कोणत्या प्रसंगी करावयास पाहिजे ह्यासंबंधी व्यवस्था त्या ग्रंथात घालून दिली आहे आणि अशा रीतीने परस्परविरोधी भासणाऱ्या स्मृतिवचनांमध्ये एकसूत्रीपणा आणला आहे.

ग्रंथसमाप्तीच्या श्लोकात ग्रंथकाराने आपले नाव विज्ञानयोगिन् असे दिले आहे. तो भारद्वाज गोत्री असून त्याच्या पित्याचे नाव पद्मनाभभट्ट असे होते. तो परमहंस (म्हणजे संन्यासी) असून त्याच्या गुरूचे नाव उत्तम असे होते. त्याने मिताक्षरा टीका लिहिली तेव्हा (पूर्वीच्या निजामाच्या राज्यातील) कल्याण ह्या नगरात विक्रमार्क अथवा विक्रमादित्य देव हा राजा राज्य करीत होता. मिताक्षरेत विश्वरूप, मेधातिथी आणि धारेश्वर ह्यांचे उल्लेख आले आहेत. त्यावरून ती इ. स. १०५० नंतर लिहिली गेली असली पाहिजे. लक्ष्मीधरकृत कल्पतरू ह्या (इ. स. च्या १२ व्या शतकाच्या दुसऱ्या पादात झालेल्या) ग्रंथात विज्ञानेश्वराचा उल्लेख केला आहे. ह्यावरून ती इ. स. ११२० पूर्वी रचिली गेली असली पाहिजे. कल्याण येथील चालुक्य वंशातील ज्या विक्रमार्क राजाच्या कारकिर्दीत विज्ञानेश्वर होऊन गेला असणे शक्य आहे तो सहावा विक्रमादित्य इ. स. १०७८ ते ११२७ ह्यांच्या सुमारास राज्य करीत होता. ह्या सर्व गोष्टींवरून मिताक्षरा हा ग्रंथ इ.स. १०७० ते ११०० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात रचला गेला असावा असे ठरते.

मिताक्षरेवर झालेल्या अनेक भाष्यांत विश्वेश्वर, नंदपंडित आणि बालंभट ह्यांनी केलेली भाष्ये अतिशय प्रसिद्ध आहेत.

विज्ञानेश्वराने आशौचदशक नावाचा एक ग्रंथ लिहिला होता. त्यात आशौच ह्या विषयावर शार्दूलविक्रीडित छंदातील १० श्लोक आहेत. ह्या ग्रंथावर हरिहराने टीका लिहिली असून दुसऱ्याही अनेक टीका उपलब्ध आहेत.

## ५. **जीमूतवाहन** (पा. ३१८)

बंगालमधील धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांत जीमूतवाहन हा फार प्रसिद्ध ग्रंथकार आहे. ह्याचे कालविवेक, व्यवहारमातृका आणि दायभाग असे तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. ते तीनही ग्रंथ धर्मरत्न [इति पारिभाद्रीयमहामहोपाध्यायजीमूतवाहनकृतौ धर्मरत्ने कालविवेकः समाप्तः ।] नावाच्या एका विस्तृत ग्रंथाची प्रकरणे करण्याचा ग्रंथकाराचा हेतु होता असे त्यांत केलेल्या उल्लेखांवरून दिसते.

कालविवेक ह्या ग्रंथात धार्मिक कृत्ये करण्याचा योग्य समय कोणता ह्या विषयाचे विवेचन केले आहे. त्यात वराहमिहिर आणि ब्रह्मगुप्त ह्यांच्यासारखे ज्योतिष आणि फलज्योतिषशास्त्रावरील प्राचीन ग्रंथकार, प्राचीनस्मृति आणि पुराणे ह्यांचे उल्लेख केले आहेत. त्यात जीमूतवाहनाने पूर्वमीमांसाशास्त्रामधील सिद्धांताचा आणि वचनांचा वारंवार आणि परिणामकारक रीतीने उपयोग केला आहे. ह्यावरून त्याने पूर्वमीमांसाशास्त्राचे सखोल अध्ययन केले असल्याचे दिसते.

व्यवहारमातृका ह्या ग्रंथात व्यवहार म्हणजे न्यायदानपद्धती ह्या विषयाचे विवेचन केले आहे. त्या ग्रंथातच ह्या ग्रंथाचे नाव न्यायमातृका असे दिले आहे, आणि एका हस्तलिखित प्रतीत त्याने नाव न्यायरत्नमालिका असे दिले आहे.

दायभाग हा जीमूतवाहनाचा सर्वात अधिक प्रसिद्ध असा ग्रंथ आहे. ब्रिटिश अंमलात बंगाल प्रांतामधील न्यायालयात दायभाग हा सर्वश्रेष्ठ आधारभूत ग्रंथ मानला जात असे. हा ग्रंथ मिळकतीच्या वारसासंबंधी आहे.

जीमूतवाहन हा बंगाल प्रांतातील विश्ववसेन राजाचा मुख्य न्यायाधीश होता अशी आख्यायिका आहे. त्याने आपल्याला 'पारिभाद्रीय महामहोपाध्याय' असे म्हटले आहे. तो पारिभद्रकुलात जन्मला असून राढा येथील रहिवासी होता.

कालविवेक ह्या ग्रंथात केलेल्या विवेचनावरून तो ग्रंथ इ.स. १०९१।९२ च्या नंतर लवकरच लिहिला गेला असावा असे दिसते. त्याने केलेल्या इतर ग्रंथकारांच्या उल्लेखांवरून आणि इतर ग्रंथकारांनी केलेल्या त्याच्या उल्लेखांवरून जीमूतवाहनाने आपल्या ग्रंथाची रचना इ. स. १०९० ते ११३० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात केली असावी असे दिसते.

दायभागावरील टीकाकारांत रघुनंदन एक प्रख्यात टीकाकार होता.

## ६. **अपरार्क** (मू. ग्रं. पा. ३२८)

याज्ञवल्क्यस्मृतीवर अपरार्काने 'अपरार्क-याज्ञवल्कीय-धर्मशास्त्रनिबंध' ह्या नावाची एक अतिविस्तृत टीका लिहिली होती. ग्रंथसमाप्तीच्या श्लोकात आणि समाप्तीच्या [इति श्रीविद्याधरवंशप्रभवश्रीशिलाहारनरेन्द्रजीमूतवाहनान्वयप्रसूतश्रीमदपरादित्यदेवविरचिते याज्ञ वल्कीयधर्मशास्त्रनिबन्धेऽपरार्के प्रायश्चित्तप्रकरणम्] संकल्पात ग्रंथकाराने आपले नाव "अपरादित्य' असे दिले आहे आणि तो विद्याधरांच्या जीमूतवाहनाच्या कुळात जन्मलेला एक शिलाहार राजा होता असे म्हटले आहे. अपरार्काचा ग्रंथ मिताक्षरेप्रमाणेच वास्तविकपणे निबंधग्रंथाच्या स्वरूपाचा असून मिताक्षरेपेक्षा कितीतरी अधिक विस्तृत आहे. सुबोध विवेचन, युक्तिवाद करण्यातील कौशल्य, सूक्ष्म तर्क, आणि निरनिराळ्या प्रकारची माहिती, सुव्यवस्थितपणे मांडणे ह्या बाबतीत अपरार्काची योग्यता मिताक्षरेपेक्षा कमी प्रतीची आहे.

अपरार्क आणि मिताक्षरा ह्यांच्यामध्ये काही गोष्टीत वैचित्र्य आढळते. मिताक्षरेइतक्या वेळा त्याने पूर्वमीमांसेतील सिद्धांतांचा उपयोग केलेला नाही. त्याची मते सामान्यतः जीमूतवाहनाच्या सारखी होती. तो अद्वैत वेदांताचा कट्टा अनुयायी असावा असे दिसत नाही. अपरार्काला मिताक्षरेची माहिती असावी असे वाटते. दुसऱ्या टीकाकारांचे म्हणून अपरार्काने सांगितलेले काही पाठ आणि मते मिताक्षरेत आढळतात आणि त्यावरून अपरार्क मिताक्षरेच्या मतांचा निर्देश करीत असावा असे दिसते.

शिलाहार घराण्याच्या सर्वही शाखा जीमूतवाहनाशी आपला संबंध जोडीत असत. शिलाहाराच्या उत्तरेकडील ठाणे येथील शाखेत अपरादित्य नावाच्या दोन राजांचा शिलालेखात उल्लेख केला आहे. त्यापैकी एका अपरादित्य राजाने शके १०४९ (इ. स. ११२७) मध्ये दिलेले एक दानपत्र [रॉयल एशि. सो. मुंबई

शाखा नियतकालिक खंड २१ पा ५०५-५१६] उपलब्ध आहे. त्यात त्या राजाला 'शिलाहार नरेन्द्र आणि 'जीमूतवाहनान्वयप्रसूत' अशी विशेषणे लावली आहेत आणि अशीच विशेषणे याज्ञ॰स्मृतीवरील टीकाग्रंथातही त्या टीकेच्या कर्त्याला लावली आहेत. पहिला अपरादित्य देव ह्याने दिलेला दानपत्रे इ. स. १११५ ते ११३० ह्यांच्या मध्यंतरच्या काळातील आहेत. याज्ञ॰ स्मृतीवर टीका करणारा राजा हा पहिला अपरादित्य देवच असण्याचा फार संभव आहे. आणि त्याने आपली टीका इ. स. च्या बाराव्या शतकाच्या पूर्वार्धात (इ. स. ११२५ च्या सुमारास) लिहिली असावी. स्मृतिचंद्रिकेत अपरार्काची मते अनेक ठिकाणी उद्धृत केली आहेत आणि स्मृतिचंद्रिका हा ग्रंथ इ. स. १२०० च्या सुमारास झाला असावा. अपरार्काला मिताक्षरेची माहिती असेल तर तो इ. स. ११०० नंतर आणि इ. स. १२०० च्या अगोदर होऊन गेला असला पाहिजे.

अपरादित्याने भासर्वज्ञकृत न्यायसारग्रंथावर न्यायमुक्तावलि नावाची टीका लिहिली होती.

## ७. देवण्णभट्टकृत स्मृतिचंद्रिका (मू. ग्रं. पा. ३४३)

हा धर्मशास्त्रावरील सुप्रसिद्ध असा फार विस्तृत निबंधग्रंथ आहे. धर्मशास्त्रावरील ज्या निबंधग्रंथांच्या हस्तलिखित प्रती उपलब्ध झाल्या आहेत त्यांत (कल्पतरु सोडल्यास) स्मृतिचंद्रिका हाच बहुधा सर्वात जुना निबंध ग्रंथ असावा. ह्या ग्रंथकाराने प्रायश्चित्त ह्या विषयावरही एक ग्रंथ लिहिला असावा असे वाटते. स्मृतिचंद्रिकेतील समाप्तीवाचक संकल्पात ग्रंथकाराचे नाव देवण्ण, देवण, देवनद अथवा देवगण असे निरनिराळ्या प्रकारचे सांगितले आहे. त्याच्या पित्याचे नाव केशवादित्य भट्ट होते. आणि देवण्णभट्ट हा सोमयाजी होता असे म्हटले आहे.

स्मृतिचंद्रिकेत अनेक ग्रंथकारांची फारच विस्तृत अवतरणे उद्धृत केली आहेत आणि त्यामुळे काही काही स्मृतींची जुळवणी करताना तसेच त्यांची हस्तलिखिते आणि निरनिराळ्या आवृत्त्या तपासताना स्मृतिचंद्रिकेचा फार उपयोग होतो. देवण्णभट्ट हा दाक्षिणात्य ग्रंथकार होता आणि दक्षिण भारतात त्याचा ग्रंथ न्यायालयात मिताक्षरेच्या खालोखाल प्रमाणभूत मानला जातो.

स्मृतिचंद्रिकेत मिताक्षरा, अपरार्क आणि स्मृत्यर्थसार ह्यांची नावे आली असल्यामुळे त्या ग्रंथाचा रचनाकाळ इ. स. ११५० च्या पूर्वीचा असू शकत नाही. दुसऱ्या कोणत्याही निबंधकारांपेक्षा हेमाद्रीने स्मृतिचंद्रिकेतील मते बहुधा अधिक वेळा उद्धृत केली आहेत. त्यावरून स्मृतिचंद्रिका हा ग्रंथ हेमाद्रीच्या पूर्वीच्या पिढीत म्हणजे इ. स. १२२५ च्या पूर्वी झाला असावा.

स्मृतिचंद्रिका नावाचे ग्रंथ अनेक ग्रंथकारांनी केले होते. शुकदेव [इंडिया ऑफिस सूची पा. ४७१ क्र. १५४९] मिश्र, आपदेव [मित्र ह्यांची टिपणे खं ६ पा. ३०१] आणि वामदेवभट्टाचार्य [मित्र ह्याची टिपणे खं. ९ पा. १३७] ह्यांनी लिहिलेले स्मृतिचंद्रिका नावाचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

## ८. हेमाद्री (मू. ग्रं. पा. ३५४)

हेमाद्रि आणि माधवाचार्य हे दाक्षिणात्य ग्रंथकारांमध्ये अत्यंत देदीप्यमान तारकांसारखे प्रसिद्ध आहेत. हेमाद्री हा फार विस्तृत ग्रंथलेखक आहे. प्राचीन विधी आणि व्रते ह्यांचा संग्रह असलेला

चतुर्वर्गचिंतामणि नावाचा एक सर्वसंग्रह स्वरूपाचा ग्रंथ त्याने केला आहे. त्या ग्रंथात [खण्डानि चास्मिन्व्रतदानतीर्थमोक्षाभिवानि क्रमशो भवन्ति । यत्पञ्चमं तत्परिशेषखण्डमखण्डितो यत्र विभाति धर्मः ॥ चतुर्व. चिं. खं. २ भाग १ श्लोक १६ वा. घ. इ. ६] म्हटले आहे की व्रत, दान, तीर्थ, मोक्ष आणि परिशेष अशा पाच खंडांत धर्मशास्त्राचे विवेचन करण्याचा हेमाद्रीचा हेतु होता. ग्रंथकाराने योजलेली ही प्रचंड ग्रंथरचना त्याच्या हातून पुरी झाली असेल किंवा नाही ह्याबद्दल फारच संशय वाटतो. चतुर्वर्गचिंतामणि ह्या ग्रंथातील ज्या भागात व्रत, दान, श्राद्ध आणि काल हे विषय आले आहेत त्या भागाची सुमारे ६००० पृष्ठे भरतील अशी सहा पुस्तके छापली गेली आहेत. आणि ज्या भागात तीर्थ आणि मोक्ष ह्यांचे विवेचन यावयाचे होते ते खंड अद्यापी उपलब्ध झाले नाहीत.

हेमाद्रीने ज्या ज्या विषयांचे विवेचन केले आहे त्या त्या विषयांवर त्याचा ग्रंथ प्रमाणभूत मानण्यात येतो. त्याने पूर्वमीमांसाशास्त्राचा सखोल अभ्यास केला असावा असे दिसते. त्याच्या ग्रंथात व्यवहार ह्या विषयाचे विवेचन करण्याचा त्याचा उद्देश नसला तरी त्याने त्या विषयाचा परामर्श घेतला आहे.

हेमाद्रीने आपल्या स्वतःसंबंधी जी माहिती आपल्या ग्रंथात दिली आहे त्याप्रमाणे तो वत्स गोत्राचा होता. त्याच्या आजोबाचे नाव वासुदेव असून पित्याचे नाव कामदेव होते. तो देवगिरी येथील यादव घराण्यातील महादेव नावाच्या राजाचा श्रीकरण प्रभु (म्हणजे दप्तरावरील अधिकारी) होता. महादेवाने इ.स. १२६० ते १२७१ पर्यंत राज्य केले. ह्यावरून हेमाद्रीचा ग्रंथ इ. स. १२६० ते १२७० ह्यांच्या मध्यंतरी केव्हा तरी रचला गेला असला पाहिजे.

हेमाद्रीने शौनकाच्या प्रणवकल्पावर टीका लिहिली असल्याचे सांगतात. तसेच त्याने कात्यायनाच्या नियमांना अनुसरून श्राद्धकल्प नावाचा एक ग्रंथ लिहिला असावा असे दिसते. मुग्धबोध व्याकरणाचा सुप्रसिद्ध कर्ता वोपदेव ह्याने केलेल्या मुक्ताफल ग्रंथावर हेमाद्रीने कैवल्यदीपिका नावाची टीका केली होती. वाग्भटाच्या अष्टांगहृदय नावाच्या वैद्यक ग्रंथावरही हेमाद्रीने आयुर्वेदरसायन नावाची टीका लिहिली होती.

एकंदरीत हेमाद्री हा एक श्रेष्ठ दर्जाचा पुरुष होता. एका विशिष्ट शिल्प-पद्धतीने बांधलेल्या अनेक देवालयांसंबंधी हेमाद्रीचे नाव सर्व महाराष्ट्रभर विख्यात आहे. मोडी लिपीचाही शोध त्याने लावला असे म्हणतात. काही थोड्या दशकांतच त्याचा चतुर्वर्गचिंतामणि हा ग्रंथ आणि विशेषतः त्यातील दान आणि व्रतखंड ही खंडे सर्व दक्षिण भारतात आणि हिंदुस्थानात प्रमाणभूत [एपि. इं. खं १४ पा. १०२ (इ. स. १३६९ मधील शिलालेख); एपि. इं. खं ३ पा. ५९, ६१ (इ. स. १३८० मधील ताम्रपट)] ग्रंथ समजली जाऊ लागली. माधवाचार्यांनी आपल्या कालनिर्णय ह्या ग्रंथात पा. ६७ वर (रचना इ. स. १३४० च्या सुमारास) हेमाद्रिकृत कालखंडाचा प्रमाणभूत ग्रंथ असा स्पष्ट उल्लेख केला आहे. शंकरभट्टकृत द्वैतनिर्णय, निर्णयसिंधु इत्यादी ग्रंथांत हेमाद्रीच्या ग्रंथातील अवतरणे उद्धृत केली आहेत.

## **९. कुल्लूकभट्ट** (मू. ग्रं. पा. ३५९)

मनुस्मृतीवरील सर्व टीकांत कुल्लूकाची मन्वर्थमुक्तावली नावाची टीका अतिशय प्रसिद्ध आहे. कुल्लूकाची टीका आटोपशीर असून सुबोध आहे आणि त्याचे विवेचन नेहमी मुद्याला धरून असते. तथापि त्याची टीका स्वयंस्फूर्त नसून त्याने मेधातिथी आणि गोविंदराज ह्यांच्या टीकांच्या आधारावर आपली टीका लिहिली आहे आणि त्यांचा नामनिर्देश न करता त्यांच्या ग्रंथांतील बराच भाग त्याने आपल्या टीकेत

समाविष्ट केला आहे. त्याच्यापूर्वी झालेल्या मेधातिथी प्रभृतींच्या मनुस्मृतीवरील टीका कुल्लूकाला दोषपूर्ण वाटल्यावरून मनुवचनांचा वास्तविक अर्थ ज्यात सांगितला आहे अशी टीका लिहिण्याच्या उद्देशाने त्याने आपली टीका लिहिली [सारासारवचःप्रपञ्चनविधौ मेधातिथेश्चातुरी ..... स्पष्टं मानवमर्थतत्त्वमखिलं वक्तुं कृतोयं श्रमः ॥] आहे. सर विल्यम जोन्स [पेद्द रामप्पा विरुद्ध बेंगरी शेषाम्मा (इंडि. लॉ रिपोर्ट, २ मद्रास २८६ पा. २९१)] ह्यांनी कुल्लूकाच्या टीकेची प्रशंसा करताना म्हटले आहे की "तिच्यासारखी सर्वात अधिक गूढ असूनही समजावयाला सुगम असणारी अशी दुसरी कोणतीही टीका कोणत्याही प्राचीन अथवा अर्वाचीन ग्रंथकाराच्या ग्रंथावर आजपर्यंत झाली नसेल." ह्या प्रशंसेला कुल्लूकाची टीका बऱ्याच प्रमाणात पात्र आहे.

कुल्लूकाने स्वतःसंबंधी अशी माहिती दिली आहे की तो बंगाल (गौड प्रांत) मधील वरेन्द्र ब्राह्मण कुलातील असून त्याचे राहण्याचे गाव नंदन हे होते. त्याच्या पित्याचे नाव भट्टदिवाकर असून त्याने ही टीका काशी येथे पंडितांच्या सान्निध्यात लिहिली.

कुल्लूकाने स्मृतिसागर नावाचा एक निबंधग्रंथही लिहिला होता. त्याचप्रमाणे त्याने श्राद्धसागर, विवादसागर आणि आशौचसागर हे ग्रंथही लिहिले होते.

कुल्लूक बहुधा इ. स. ११५० आणि १३०० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात होऊन गेला असावा आणि आपली टीका त्याने इ. स. १२५० च्या सुमारास लिहिली असावी. त्याने भोजदेव, कल्पतरु, आणि हलायुध ह्यांचे उल्लेख केले असल्यामुळे तो इ .स. ११५० नंतर झाला असला पाहिजे. तसेच चंडेश्वरकृत राजनीति-रत्नाकर [अत एवकुल्लूकभट्ट :- राजशब्दोपि नात्र क्षत्रियजातिपरः किंत्वभिषिक्तजनपदपालयितृपुरुषपरः । राजनीतिरत्नाकर पा. २] ह्या ग्रंथात कुल्लूकाच्या टीकेतील अवतरणे उद्धृत केली असल्यामुळे तो इ. स. १३०० च्या पूर्वी होऊन गेला असला पाहिजे. तो स्वतः बंगाली असूनही त्याने दायभागाचा कोठेही उल्लेख केला नाही ह्यावरून तो जीमूतवाहनानंतर लवकरच होऊन गेला असावा.

**१० माधवाचार्य** (मू. ग्रं. पा. ३७४)

धर्मशास्त्रावरील दाक्षिणात्य ग्रंथकारांत माधवाचार्य हे अत्यंत तेजस्वी ताऱ्यासारखे आहेत हे मागे सांगितलेच आहे. त्यांची कीर्ती इतकी थोर आहे की त्यांचा क्रम फक्त आद्य श्री शंकराचार्यांच्याच खाली लागू शकेल. त्यांची बुद्धि अष्टपैलू होती आणि संस्कृत वाङ्मयाच्या बहुतेक सर्व शाखांवर अनेक विस्तृत ग्रंथ त्यांनी स्वतः लिहिले होते अथवा आपला बंधु सायण ह्याच्या अथवा इतरांच्याकडून लिहविले होते. विद्वान पंडित, दूरदृष्टीचा मुत्सद्दी, विजयनगरच्या राज्याचा स्थापनेच्या काळातील आधारस्तंभ, वृद्धपणी संन्यास घेऊन आत्मचिंतनात मग्न झालेला आणि सर्वसंग त्याग केलेला संन्यासी अशा निरनिराळ्या प्रकारचे उपयुक्त आयुष्य त्यांनी घालविले होते आणि म्हणून आजही त्यांचे नाव लोकांना विस्मयचकित करते. त्यांनी केलेल्या अनेक ग्रंथांत पराशरमाधवीय ह्या नावाची पराशरस्मृतीवर केलेली टीका आणि कालनिर्णय हे दोन ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत.

पराशरमाधवीय हा ग्रंथ केवळ पराशरस्मृतीतील श्लोकांवर टीका नसून व्यावहारिक आणि धार्मिक कायद्यासंबंधीचा तो एक निबंधग्रंथ आहे. मूळ पराशरस्मृतीत व्यवहार (न्यायदान) ह्या विषयावर एकही श्लोक नाही. तथापी राजांनी योग्य प्रकारे प्रजेवर राज्य करावे अशा अर्थाचा जो एक श्लोक पराशरस्मृतीत आला आहे त्या श्लोकावर टीका करताना माधवाचार्यांनी व्यवहार ह्या विषयाचे इतके विस्तृत विवेचन केले

आहे की त्या विवेचनाने एकंदर ग्रंथाचा एक चतुर्थांशाहून अधिक भाग व्यापला ['अत एवाचारकाण्डे व्यवहाराणामन्तर्भावमभिप्रेत्य पराशरः पृथग्व्यवहारकाण्डमकृत्वा क्षितिं धर्मेण पालयेदिति सूचनमात्रं व्यवहाराणां कृतवान् ।' परा. माध. पा ८] आहे. आधुनिक हिंदु कायद्याच्या बाबतीत दक्षिण भारतात पराशर माधवीय हा प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो. त्यांची लेखनशैली सुबोध असून त्यांनी सामान्यतः लांबलचक आणि दुर्बोध चर्चा टाळलेली असल्याचे आढळून येते.

माधवाचार्यांच्या पित्याचे नाव मायण्णा आणि मातेचे नाव श्रीमती होते. त्यांना सायण आणि भोगनाथ ह्या नावाचे दोन कनिष्ठ बंधु होते. ते कृष्ण यजुर्वेदी बौधायनसूत्रचरणातील असून त्यांचे गोत्र भारद्वाज होते. विद्यातीर्थ [लब्धामाकलयन्प्रभावलहरीं श्रीभारतीतीर्थतो विद्यातीर्थमुपाश्रयन् हृदि भजे श्रीकण्ठमव्याहतम् । कालनिर्णय श्लोक २ रा.], भारतीतीर्थ आणि श्रीकंठ हे त्यांचे गुरू होते. ते बुक्कण (अथवा बुक्क) राजाचे कुलगुरू आणि मंत्री होते. माधवाचार्यांचे संन्यासाश्रमातील नाव विद्यारण्य होते. विद्यारण्यांनी विजयनगरीची स्थापना [नागेष्वर्केर्मित इहशके शालिवाहनस्य याते ... श्रीविजयनगरीं निर्ममे निर्ममेन्द्रः । गुरुवंश काव्य ६·८] शके १२५८ (इ.स. १३३५) मध्ये केली. आणि हरिहराला राज्याभिषेक केला असे गुरुवंश काव्यात वर्णन केले आहे.

विद्यारण्य बऱ्याच उतारवयात ९० व्या वर्षी इ.स. १३८६ मध्ये समाधिस्त झाले अशी आख्यायिका आहे. कालनिर्णय ह्या ग्रंथात शके १२५६ ते १२८१ (इ.स. १३३४ ते १३५९) पर्यंतच्या अधिक महिन्यांचा विचार केला आहे. माधवाचार्य निदान १३७७ मध्ये संन्यासी झाले होते असे इ.स. १३७८ मधील एका दानपत्रात विद्यारण्यांचा उल्लेख केला आहे त्यावरून दिसून येते. तेव्हा माधवाचार्यांचे ग्रंथ इ.स. १३३५ ते १३६० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात रचले गेले असावे. पंडित लोकात अशी आख्यायिका होती की वेदांवरील भाष्ये माधवाचार्यांनी लिहिली आणि ती आपला बंधु सायण ह्याच्या नावाने प्रसिद्ध केली.

दुसरा एक माधव नावाचा विद्वान पुरुष होऊन गेला. तोही बुक्क राजाचा मंत्री असून मोठा योद्धा होता. त्याच्या गुरूचे नाव काशीविलास क्रियाशक्ती होते आणि पित्याचे नाव चौंड होते. त्याचा उल्लेख इ.स. १३९१ च्या एका दानपत्रात [रॉयल एशि. सो. मुंबईशाखानियतकालिक खं. ४ पा. ११५ (कुचर अथवा माधवपूर गावचे दानपत्र)] केला आहे. तो आणि माधवाचार्य एकच असणे शक्य नाही.

**११. नारायणभट्ट** (मू. ग्रं. पा. ४१९)

काशी येथील सुप्रसिद्ध भट्ट घराण्यात नारायणभट्ट, कमलाकरभट्ट, आणि नीलकण्ठभट्ट हे विद्वान ग्रंथकार होऊन गेले. नारायणभट्ट मूळचा पैठण येथील रहिवासी असून तो पुढे काशी येथे राहण्यास गेला. त्याच्या पित्याचे नाव रामेश्वरभट्ट असून त्याचे गोत्र विश्वामित्र होते. नारायणभट्टाने सर्व शास्त्रांचे अध्ययन आपल्या पित्यापाशी केले. सर्व हिंदुस्थानातील पंडित त्याला आपला पुढारी आणि आश्रयदाता मानीत असत. अशी आख्यायिका सांगतात की नारायणभट्टाने पुण्याईच्या बळावर अवर्षणाच्या काळात पाऊस पाडला आणि त्यामुळे ज्या मुसलमान राज्यकर्त्यांने काशीविश्वेश्वराचे मंदिर जमीनदोस्त केले होते त्याच्याकडून ते पुन्हा बांधण्याची नारायणभट्टाला अनुज्ञा मिळाली. नारायणभट्टाने धर्मशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिले होते, त्यात अंत्येष्टिपद्धती, त्रिस्थली सेतु आणि प्रयोगरत्न हे ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. त्याने लिहिलेले ग्रंथ त्या त्या विषयावर अधिकृत समजण्यात येतात आणि अद्यापिही बहुतेक सर्व भारतभर त्यांचा उपयोग करण्यात येतो. त्याने वृत्तरत्नाकरावरही एक टीका लिहिली होती.

अनुक्रमणिका

नारायणभट्टाचा जन्म शके १४३५ (इ. स. १५१३) मध्ये झाला. त्याचा लेखनव्यवसाय इ.स. १५४० ते १५७० ह्या कालात चालत असावा.

कोणा एका नारायण नावाच्या ग्रंथकाराने लिहिलेला धर्मशास्त्रावरील 'धर्मप्रवृत्ती' नावाचा एक ग्रंथ आहे. त्या ग्रंथातील विषयविवेचन शैली आणि भाषाशैली तसेच समाप्तीवाचक संकल्प भिन्न प्रकारचे आहेत. त्यावरून तो ग्रंथ नारायणभट्टाने केलेला नसावा असे वाटते.

**१२. कमलाकरभट्ट.** (मू. ग्रं. पा. ४३२)

सुप्रसिद्ध नारायणभट्टाचा हा नातु असून त्याच्या पित्याचे नाव रामकृष्णभट्ट असे होते. कमलाकराच्या अंगात गाढ विद्वत्ता असून त्याने बहुतेक शास्त्रांवर ग्रंथरचना केली होती. त्याने २२ वर ग्रंथ लिहिले होते आणि त्यापैकी अर्ध्याहून अधिक ग्रंथ धर्मशास्त्र ह्या विषयावरील आहेत. त्याच्या धर्मशास्त्रावरील ग्रंथांत निर्णयसिंधू शूद्रकमलाकर आणि विवादतांडव हे सर्वात अधिक प्रख्यात आहेत. निर्णयसिंधु अथवा निर्णय कमलाकर हा ग्रंथ विद्वत्ता, उद्योग आणि सुबोधपणा ह्यांच्या बाबतीत आदर्श मानण्यासारखा आहे. निर्णयसिंधूमध्ये सुमारे १०० स्मृतींची आणि तीनशेच्यावर निबंधकारांची नावे सांगितली आहेत.

निर्णयसिंधू हा कमलाकरभट्टाने आरंभी केलेल्या ग्रंथांपैकी एक होता. त्याची रचना संवत् १६६८ (इ. स. १६१२) मध्ये झाली होती. कमलाकराने इ.स. १६१० आणि १६४० ह्यांच्या मध्यंतरच्या कालात आपली ग्रंथरचना केली असावी. ज्या गागाभट्टाने श्री शिवाजीमहाराजांच्या राज्यारोहण समारंभात इ.स. १६७४ मध्ये पौरोहित्य केले तो कमलाकराचा पुतण्या होता.

**१३. नीलकण्ठभट्ट** (मू. ग्रं. पा. ४३८)

नीलकण्ठ हा नारायणभट्टाचा नातु असून त्याच्या पित्याचे नाव शंकरभट्ट असे होते. शंकरभट्ट मीमांसाशास्त्रात निष्णात असून त्याने शास्त्रदीपिका प्रभृती ग्रंथ मीमांसाशास्त्रावर केले होते आणि द्वैतनिर्णय आणि धर्मप्रकाश ह्या नावाने दुसरे ग्रंथ लिहिले होते.

नीलकंण्ठाने भगवंतभास्कर ह्या नावाचा धर्मविषयक आणि लौकिक कायद्यासंबंधी एक सर्वसंग्रह स्वरूपाचा ग्रंथ लिहिला होता. तो भगवंत देव नावाच्या एका बुंधेला सरदाराच्या सन्मानार्थ रचला होता. त्या ग्रंथाचे १२ भाग असून त्यांना मयूख म्हणजे किरण अशी संज्ञा दिली आहे. त्यात संस्कार, आचार, काल, श्राद्ध इत्यादी विषयांचे विवेचन केले आहे. ह्या ग्रंथांखेरीज नीलकंठाने व्यवहारतत्त्व आणि दत्तकनिर्णय ह्या नावाने ग्रंथही लिहिले होते.

नीलकण्ठ हा सर्वात श्रेष्ठ अशा निबंधकारांपैकी एक आहे. अफाट स्मृतिवाङमयावरील प्रभुत्त्व, विवेचनातील सुबोधपणा, थोडक्यात सहजपणे वर्णन करण्याचे कौशल्य, विषयाचे स्पष्ट ज्ञान आणि निर्णय काढण्यात दिसणारा सावधपणा ह्या गुणांत धर्मशास्त्रावरील मध्ययुगीन संस्कृत ग्रंथकारात कोणीही ग्रंथकार नीलकण्ठापेक्षा वरचढ होऊन गेला नाही.

गुजरात, मुंबई बेट आणि उत्तरकोकण ह्या प्रदेशात हिंदु कायद्याच्या बाबतीत नीलकंठाचा व्यवहारमयूख हा ग्रंथ न्यायालयांत प्रमाणभूत मानला जातो आणि महाराष्ट्राच्या बाकीच्या प्रदेशात देखील मिताक्षरेच्या खालोखाल व्यवहारमयूखाला महत्त्वाचे स्थान दिले जाते. इतर मयूखांपैकी संस्कारमयूखाचा आधार न्यायालये वरचेवर घेतात. प्रायश्चित्तमयूख आणि प्रतिष्ठामयूख ह्यांचेही आधार वरिष्ठ न्यायालय घेत असते.

व्यवहार तत्त्वाच्या एका हस्तलिखित प्रतीवर संवत् १७०० (इ.स. १६४४) ही मिती घातलेली आहे. ह्यावरून नीलकंठाची ग्रंथरचना इ स. १६१० ते १६४५ ह्यांच्या मध्यंतरच्या काळात झाली असावी.

**१४. काशीनाथ उपाध्याय** (मू. ग्रं. पा. ४६३)

काशीनाथ उपाध्याय ऊर्फ बाबा पाध्ये ह्यांनी धर्मसिंधुसार अथवा धर्मब्धिसार ह्या नावाचा एक विस्तृत ग्रंथ रचला होता. तो ग्रंथ धर्मसिंधु ह्या नावाने प्रसिद्ध आहे. सांप्रतकाळी धार्मिक आचाराच्या बाबतीत दक्षिणेत तो ग्रंथ प्रमुख आधारग्रंथ मानला जातो आणि न्यायालयांतील निर्णयात देखील त्याचा उल्लेख करण्यात आलेला आहे.

निर्णयसिंधू ह्या ग्रंथात ज्या क्रमाने निरनिराळे विषय दिले आहेत त्या क्रमानेच ते विषय धर्मसिंधूमध्ये दिले आहेत. त्यात असे म्हटले आहे की हा ग्रंथ कुशाग्रबुद्धी नसताही ज्यांना धर्माच्या बाबतीतील सर्वमान्य निर्णय जाणण्याची इच्छा असते अशा लोकांकरिता लिहिला आहे.

काशीनाथ पाध्ये हे फार विद्वान पुरुष होते. त्यांचे कुटुंब मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातील गोळवली ह्या गावचे राहणारे होते. ते कऱ्हाडे ब्राह्मण होते. त्यांच्या पित्याचे नाव अनंत असे होते. अनंत कोकणातील जन्मभूमी सोडून पंढरपूर येथे राहावयास गेला. धर्मसिंधू हा ग्रंथ शके १७१२ म्हणजे इ.स. १७९०—९१ मध्ये लिहिला गेला. काशीनाथ पाध्ये ह्यांनी संन्यास घेतला आणि ते शके १७२७ (इ. स. १८०५।६) मध्ये समाधिस्त झाले.

———————

अनुक्रमणिका

# प्रकरण २३

## इतर काही निबंधग्रंथकार आणि टीकाकार

मागील प्रकरणात उल्लेख केलेल्या ग्रंथकारांखेरीज आणखी काही थोड्या निबंधग्रंथकारांसंबंधी आणि टीकाकारांसंबंधी थोडक्यात माहिती ह्या प्रकरणात दिली आहे. मागील प्रकरणाप्रमाणे ह्या प्रकरणातही ह्या ग्रंथकारांसंबंधी विवेचन त्यांच्या कालानुक्रमाने केले आहे.

### **१. असहाय** (मू. ग्रं. पा. २४७)

ह्याने नारदस्मृतीवर भाष्य लिहिले [असहायकृत नारदभाष्य, पहिला श्लोक.] होते आणि ते कल्याणभट्टाने शुद्ध केले होते. त्याचा काही भाग प्रसिद्ध झाला आहे. ह्याशिवाय त्याने गौतमधर्मसूत्रावर एक भाष्य आणि मनुस्मृतीवर एक टीका लिहिली असल्याचे इतर ग्रंथांत उल्लेख आहेत आणि त्यातील काही अवतरणेही इतर ग्रंथांत उद्धृत केली आहेत. विश्वरूप [विश्वरूप (याज्ञ. ३·२६३—२६४ वरील टीका)] आणि मेधातिथी [मेधातिथि (मनु ८·१५६ वरील टीका)] ह्यांनी असहायाचा उल्लेख केला आहे. ह्यावरून तो इ.स. ७५० च्या पूर्वी होऊन गेला असावा.

### **२. भर्तृयज्ञ** (मू. ग्रं. पा. २५१)

हा एक फार प्राचीन काळी होऊन गेलेला टीकाकार असावा. भर्तृयज्ञाने कात्यायनश्रौतसूत्र [अनन्तदेवकृत श्राद्धकल्पसूत्रपद्धति नांवाच्या कात्यायनाच्या श्राद्धसूत्रावरील टीकेत.], पारस्करगृह्यसूत्र ['एते पञ्च भूसंस्कारा' इति भर्तृयज्ञभाष्ये । पारस्करगृह्यसूत्र १·१·२ वरील गदाधराचे भाष्य.], गौतमधर्मसूत्र ['संविभागो भर्तृदाय' इति भर्तृयज्ञः । चण्डेश्वरकृत गृहस्थरत्नाकर (डे. कॉ. हस्तलि. क्र. ४४ सन १८८३—८४ पृष्ठ ७८ अ)] ह्या ग्रंथांवर टीका लिहिल्या असल्याचे उल्लेख आणि त्यांतील अवतरणे इतर ग्रंथांत आली आहेत. मेधातिथीने भर्तृयज्ञाच्या ग्रंथातील अवतरणे उद्धृत केली आहेत. ह्यावरून भर्तृयज्ञ इ. स. ८०० च्या पूर्वी होऊन गेला असावा.

### **३. भारुचि** (मू. ग्रं. पा. २६४)

विशिष्टाद्वैत सांप्रदायाच्या आचार्यात भारुचीच्या नावाचा समावेश रामानुजाचार्यांनी आपल्या ग्रंथात केला आहे. दुसऱ्या काही ग्रंथांत आलेल्या उल्लेखांवरून भारुचीने विष्णुधर्मसूत्रावर ['यथाह भारुचिरेतद्विष्णुवचनव्याख्यानावसरे...' सरस्वतीविलास, परिच्छेद ६३७, पा ४२२।२३ (म्हैसूर आवृत्ती)] एक टीका लिहिली असावी. अथवा विष्णुधर्मसूत्रातील अनेक सूत्रांचे स्पष्टीकरण करणारा एक ग्रंथ लिहिला असावा. मिताक्षरा, पराशरमाधवीय आणि सरस्वतीविलास ह्या ग्रंथांत भारुचीच्या मतांचा उल्लेख केला आहे. ह्यावरून तो इ. स. १०५० च्या पूर्वी होऊन गेला असावा.

**४. श्रीकर** (मू. ग्रं. पा. २६६)

हा बहुधा मिथिला देशात झालेला ग्रंथकार असावा. श्रीकराने अनेक स्मृतींवर एक निबंधग्रंथ लिहिला असून त्यात याज्ञ०स्मृतीतील शब्दांचे स्पष्टीकरण करण्याकडे विशेष लक्ष दिले असावे. त्याच्या मताचे उल्लेख मिताक्षरा [एतेनाल्पधनविषयत्वं श्रीकरादिभिरुक्तं निरस्तं वेदितव्यम् । मिता. (याज्ञ. २· १३५)], दायभागप्रभृती ग्रंथांत आले आहेत. ह्यावरून तो बहुधा इ. स. च्या ९ व्या शतकात होऊन गेला असावा.

**५. देवस्वामिन्** (मू. ग्रं. पा. २७९)

स्मृतिचंद्रिकेत असे म्हटले आहे की देवस्वामीने स्मृति-समुच्चय म्हणजे स्मृतींचा संग्रह करणारा एक निबंधग्रंथ लिहिला होता. स्मृतिचंद्रिकेत [स्मृतिचं. २ (पा २८५, २८९, २९५ इ.)] देवस्वामीची भरपूर अवतरणे उद्धृत केली आहेत. हा ग्रंथ उपलब्ध नाही. परंतु त्यांच्या संबंधीच्या इतर ग्रंथात केलेल्या उल्लेखांवरून त्यात आचार, व्यवहार आशौच इत्यादी धर्मशास्त्रातील विषयांचे विवेचन केले असावे.

देवस्वामीचा ग्रंथ स्मृतिचंद्रिकेपूर्वी म्हणजे इ.स. ११५० पूर्वी झाला असला पाहिजे. गार्ग्यनारायण ह्या इ.स. ११०० पूर्वी झालेल्या ग्रंथकाराने देवस्वामीचा उल्लेख केला आहे. ह्यावरून देवस्वामी बहुधा इ.स. १००० ते १०५० ह्यांच्या पूर्वी अथवा त्या सुमारास होऊन गेला असावा.

**६. जितेन्द्रिय** (मू. ग्रं. पा. २८१)

जितेन्द्रियाने धर्मशास्त्रावर एक विस्तृत ग्रंथ लिहिला होता असे दायभाग [दायभाग पा. १८९, २५६, ३५० इ, दायतत्त्व पा. १८२], दायतत्त्व इत्यादी ग्रंथांवरून समजते. ह्यावरून तो इ. स. १००० ते १०५० ह्या सुमारास होऊन गेला असावा. हा एक बंगाली ग्रंथकार होता. त्याने न्यायालयातील कार्यपद्धतीसंबंधीही लिहिले असावे असे जीमूतवाहनाच्या ग्रंथांवरून दिसते

**७. बालक** (मू. ग्रं. पा. २८३)

जीमूतवाहनाच्या दायभाग [दायभाग पा. १६१, १९०, २६२, २८२, ३५६ इ०] ह्या ग्रंथात बालकाची अवतरणे उद्धृत केली आहेत. दुसऱ्याही काही ग्रंथकारांनी ह्याच्या मतांचा उल्लेख केला आहे. ह्यावरून हा पूर्वभारतातील अथवा बंगाली ग्रंथकार असावा आणि त्याने व्यवहार आणि प्रायश्चित्त ह्यांच्यासारख्या धर्मशास्त्रातील अनेक शाखांवर ग्रंथरचना केली असावी आणि तो. इ.स. ११०० च्या पूर्वी होऊन गेला असावा असे दिसते.

**८. बालरूप** (मू. ग्रं. पा. २८४)

हरिनाथ, मिसरु मिश्र [मिसरुमिश्रकृत विवादचन्द्र (डे. कॉ. हस्त. क्र. ५७ सन १८८३।८४ पृष्ठ ३३ अ, ३५ अ.] इत्यादिकांच्या ग्रंथांत बालरूपाच्या मताचा उल्लेख केला आहे. ह्यावरून तो इ. स. १२५० च्या पूर्वी होऊन गेला असावा. बालरूप आणि वर उल्लेख केलेला बालक ते दोघे एकच असण्याचाही संभव आहे. तसे असेल

तर त्याचा काल इ. स. ११०० पूर्वीचा ठरेल. त्याची मते श्रीकरासारखीच होती. त्याने व्यवहार, काल इत्यादी विषयांवर ग्रंथरचना केली असावी.

## **९. योग्लोक** (मू. ग्रं. पा. २८६)

ह्याची माहिती जीमूतवाहन आणि रघुनंदन ह्यांच्या ग्रंथांवरूनच काय ती मिळू शकते. त्याच्या ग्रंथांतील अवतरणांवरून [योग्लोकेन तु स्वल्पबृहद्ग्रंथभेदेन द्वयमेवोक्तं बलाबल० कालविवेक पा. ३६५] त्याने बृहद्योग्लोक आणि स्वल्प योग्लोक असे दोन ग्रंथ रचिले होते आणि काल आणि व्यवहार ह्या विषयांचे विवेचन केले होते. उपलब्ध पुराव्यावरून तो इ.स. ९५० ते १०५० ह्यांच्या मध्यंतरी झाला असावा.

## **१०. कामधेनु** (मू. ग्रं. पा. २९३)

हा धर्मशास्त्रातील निरनिराळ्या शाखांचे विवेचन केलेला एक प्राचीन निबंधग्रंथ आहे. त्याची हस्तलिखित प्रत उपलब्ध नाही. परंतु त्यातील अवतरणे [चण्डेश्वरकृत विवादरत्नाकर, पा. ७८, ८० इ.; शूलपाणिकृत श्राद्धविवेक प्रारंभीचे वाक्य; श्रीदत्तकृत समयप्रदीप (डे. कॉ. हस्त. क्र. ४७१ सन १८७५-७६ पृष्ठ ५३ ब.] चण्डेश्वर, शूलपाणी, श्रीदत्त, हेमाद्री आदी ग्रंथकारांनी उद्धृत केली आहेत, अथवा त्या ग्रंथाचा उल्लेख केला आहे.

कामधेनु ह्या ग्रंथाचा कर्ता कोण हे निश्चित नसले तरी त्याचा कर्ता गोपाल असल्याचे चण्डेश्वराने ['गोपालस्य च कामधेनुरमणं०' चण्डेश्वरकृत व्यवहाररत्नाकर (मित्र ह्यांची टिपणे, खं. ६ पा. ६६)] म्हटले आहे. ऑफ्रेचने आपल्या सूचीत कामधेनु ग्रंथाचा कर्ता शंभु असल्याचे सांगितले आहे. शंभूने धर्मशास्त्रावर एक निबंधग्रंथ लिहिला असल्याचे स्मृतिचंद्रिकेत म्हटले आहे आणि शंभु हा निबंधकार असल्याचे हेमाद्रीनेही म्हटले आहे. ह्यावरून हा शंभु इ.स. ११५० च्या पूर्वी होऊन गेला असला पाहिजे. स्मृत्यर्थसार ह्या ग्रंथात कामधेनु आणि शंभु ह्या दोघांचा पृथक् उल्लेख केला आहे. ह्यावरून शंभु हा कामधेनु ग्रंथाचा कर्ता नसावा अशी शंका येते. कल्पतरु आणि हारलता ह्यांनी कामधेनु ग्रंथ प्रमाणभूत मानला आहे. ह्यावरून तो ग्रंथ इ. स. १००० ते ११०० ह्यांच्या मध्यंतरी झाला असावा.

## **११. हलायुध** (मू. ग्रं. पा. २९६)

लक्ष्मीधर, [लक्ष्मीधरकृत कल्पतरु (बनारस कॉ. प्रत पृष्ठ ८७६, ३८० इ०); चण्डेश्वरकृत विवादरत्नाकर; रघुनंदनकृत दिव्यतत्व, दायतत्त्व इ०] चण्डेश्वर, रघुनंदन प्रभृती ग्रंथकारांनी हलायुधाचा उल्लेख केला असून त्याची अवतरणेही उद्धृत केली आहेत. तो बहुधा मैथिल अथवा बंगाली ग्रंथकार असून इ. स. १००० आणि ११०० ह्यांच्या मध्यंतरी होऊन गेला असावा. मिथिला आणि बंगाल प्रांतांतील ग्रंथकार हलायुधाला मोठा प्रमाणभूत असा ग्रंथकार मानतात.

हलायुध नावाचे दुसरेही काही ग्रंथकार होऊन गेले. हलायुध नावाच्या एका ग्रंथकाराने अभिधानरत्नमाला, कविरहस्य हे ग्रंथ आणि बहुधा पिंगलाच्या छंदःशास्त्रावर मृतसंजीवनी नावाची टीका रचिली होती. हा हलायुध उपलब्ध पुराव्यावरून इ. स. च्या १० व्या शतकाच्या उत्तरार्धाच्या फारसा पूर्वी झाला नसला पाहिजे.

ब्राह्मणसर्वस्व ह्या प्रख्यात ग्रंथाचा कर्ताही हलायुध नावाचा होता. हा हलायुध बंगालचा राजा लक्ष्मणसेन ह्याच्या राज्यात न्यायाधीश होता. त्याने मीमांसासर्वस्व, वैष्णवसर्वस्व, शैवसर्वस्व आणि पंडितसर्वस्व हे ग्रंथही रचिले असल्याचा उल्लेख ब्राह्मणसर्वस्वामध्ये [मीमांसासर्वस्वं वैष्णवसर्वस्यमकृत शैवसर्वस्वम् । पण्डितसर्वस्वमसौ सर्वस्वं सर्वधीराणाम् ॥ ब्राह्मणसर्वस्व श्लोक १९.] केला आहे. ह्या हलायुधाने इ. स. ११७५ ते १२०० ह्या कालात आपले ग्रंथ लिहिले असावेत.

आणखी एका हलायुधाने कात्यायनकृत श्राद्धकल्पसूत्रावर प्रकाश नावाची टीका लिहिली होती. त्यातील उल्लेखांवरून तो इ.स. ११५० नंतर होऊन गेला असावा.

## १२. **भवदेवभट्ट** (मू. ग्रं. पा. ३०१)

दुसऱ्या ग्रंथांत आलेल्या उल्लेखांवरून भवदेवभट्टाने न्यायदानपद्धतीवर व्यवहारतिलक [रघुनन्दनकृत व्यवहारतत्त्व (जीवानंद खं. २ पा. २०७); वीरमित्रोदय पा. ८५] नावाचा ग्रंथ रचिला होता असे दिसते. त्या ग्रंथातील अवतरणांवरून हा ग्रंथ फार महत्त्वाचा असला पाहिजे. परंतु अद्यापि तो उपलब्ध झालेला नाही. भवदेवाने कर्मानुष्ठानपद्धती अथवा दशकर्मपद्धती अथवा दशकर्मदीपिका ह्या नावाचा एक ग्रंथही लिहिला असून त्यात सामवेदी ब्राह्मणांच्या दहा विधींची आणि संस्कारांची माहिती दिली आहे. भवदेवाने प्रायश्चित्तनिरूपण, तौतातित-मत-तिलक हे ग्रंथही रचिले होते. त्याला 'बालबलभीम-भुजंग' असेही म्हटले आहे. भवदेव बंगालमधील हुगळीच्या पश्चिमेस आणि गंगेच्या दक्षिणेस असणाऱ्या राढा विभागातील सिद्धलग्राम येथे राहणारा होता. हा इ.स. ११०० च्या फारसा पूर्वी झाला नसला पाहिजे.

धर्मशास्त्रावर ग्रंथ करणारे भवदेव नावाचे अनेक ग्रंथकार त्यानंतरच्या काळात होऊन गेले. दानधर्मक्रिया नावाच्या (१७ व्या शतकाच्या मध्यभागी झालेल्या) ग्रंथाचा कर्ता भवदेव नावाचा होता. १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात झालेल्या स्मृतिचंद्रिका ह्या ग्रंथाचा कर्ता भवदेव होता.

## १३. **प्रकाश** (मू. ग्रं. पा. ३०६)

कल्पतरु, विवादरत्नाकर प्रभृती जुन्या काळच्या निबंधग्रंथांत उद्धृत केलेल्या अवतरणांवरून असे सिद्ध होते की व्यवहार, दान, श्राद्ध इत्यादी विषयांचे विवेचन केलेला प्रकाश ह्या नावाचा एक ग्रंथ अस्तित्वात होता. बहुधा तो याज्ञ०स्मृतीवर टीकाग्रंथ असावा. हेमाद्रीने [... ब्राह्मणभ्यो देयानिति महार्णव प्रकाशकारो मन्यते । हेमाद्रिकृत चतुर्व. ३· १· १०३१; 'तथा च स्मृतिमहार्णवे आह बुधः ।' चतुर्व ३·१· ११२ त्याच ग्रंथात पा. १८३, ५४५ वर नुसता 'महार्णव' शब्द आला आहे.] महार्णवप्रकाश, स्मृतिमहार्णव अथवा नुसता महार्णव ह्या नावाच्या ग्रंथाचे उल्लेख केले आहेत. ही तीनही नावे एकाच ग्रंथाची असावीत आणि चण्डेश्वराने उल्लेख केलेला प्रकाश ग्रंथ आणि स्मृतिमहार्णव हे एकच ग्रंथ असावेत असे उपलब्ध माहितीवरून दिसते. हा ग्रंथ इ.स. १००० ते ११०० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात झाला असला पाहिजे.

## १४. **पारिजात** (मू. ग्रं. पा. ३०८)

पारिजात अशी संज्ञा असलेले अनेक ग्रंथ आहेत. उदाहरणार्थ, विवाद-पारिजात (रचना इ.स. १६२५), मदनपारिजात (रचना इ.स. १३७५) आणि प्रयोगपारिजात (रचना इ.स. १४००।१५००). तथापी,

अत्यंत जुन्या निबंधकारांनी [कल्पद्रुमे वाप्यथ पारिजाते हलायुधे वाप्यथवा प्रकाशे । विवादरत्नाकर ] ज्यातील अवतरणे उद्धृत केली आहेत असा पारिजात नावाचा एक स्वतंत्र ग्रंथ होता. त्यात व्यवहार, दान इत्यादी विषयांचे विवेचन केले होते. तो इ.स. १००० ते ११२५ ह्यांच्या मध्यंतरी झाला असावा.

**१५. गोविंदराज** (मू. ग्रं. पा. ३०९)

गोविंदराजाची मनुस्मृतीवरील टीका प्रसिद्ध झाली असून [गोविन्दराजकृत मनु ३·२४७, ३·२४८ वरील टीका] त्यात त्याच्या स्मृतिमंजिरी नावाच्या ग्रंथाचा उल्लेख केला आहे. गोविंदराजाच्या ग्रंथावरून असे कळते की तो ब्राह्मण असून गंगेच्या पवित्र तीरावर राहत असे. हा इ.स. ११३५ च्या पूर्वी झाला असावा.

**१६. लक्ष्मीधरकृत कल्पतरु** (मू. ग्रं. पा. ३१५)

हा एक अतिशय विस्तृत ग्रंथ होता, परंतु त्याची पूर्ण हस्तलिखित प्रत उपलब्ध झालेली नाही. समग्र ग्रंथाला कृत्यकल्पतरु ['इति श्रीमद्‌गोविन्दमहाराजसान्धिविग्रहिकश्रीलक्ष्मीधरभट्टविरचिते कृत्यकल्पतरौ राजधर्मकाण्डः संपूर्णः । (इंडियाऑफिसहस्तलि. क्र. ८५२).] अथवा नुसते कल्पतरु अथवा त्याच अर्थाची कल्पद्रुम अथवा कल्पवृक्ष अशी नावे दिलेली आहेत. ग्रंथकर्ता लक्ष्मीधर हा गोविन्दचंद्र राजाचा संधिविग्रह मंत्री होता अशी माहिती ग्रंथात दिली आहे. मिथिला बंगाल ह्या देशातील आणि सामान्यतः उत्तरभारतातील जुन्या ग्रंथकारांवर ह्या ग्रंथाची फार मोठी छाप पडली होती. हा ग्रंथ स्वतंत्र निबंध ग्रंथाच्या स्वरूपाचा आहे.

हा ग्रंथ इ.स. च्या १२ व्या शतकाच्या दुसऱ्या पादात लिहिला गेला असावा.

**१७. प्रदीप** (मू. ग्रं. पा. ३३४)

दुसऱ्या ग्रंथांत उद्धृत केलेल्या अवतरणांवरून असे दिसून येते की प्रदीप हा व्यवहार, श्राद्ध, शुद्धी इत्यादी विषयांवरील बहुधा एक स्वतंत्र ग्रंथ होता. तो इ.स. ११०० नंतर आणि इ.स. ११५० च्या पूर्वी झाला असावा. हेमाद्रीने [चतुर्व. (काल) पा. ३५५.] उल्लेख केलेला स्मृतिप्रदीप नावाचा ग्रंथ आणि इतरांनी उल्लेख केलेला प्रदीप हा ग्रंथ एकच असणेही संभवनीय आहे.

**१८. श्रीधरकृत स्मृत्यर्थसार** (मू . ग्रं. पा. ३३५)

हा एक सुप्रसिद्ध ग्रंथ असून तो छापला गेला आहे. श्रीधर हा स्वतः श्रौतयज्ञ करणारा होता. त्याच्या पित्याचे नाव नागभर्तृ विष्णुभट्ट असून गोत्र विश्वामित्र होते. श्रीधराची म्हणून इतर ग्रंथांत उल्लेख केलेली काही मते स्मृत्यर्थसारात [चतुर्व. (काल) पा. २०] आढळत नाहीत. ह्यावरून श्रीधराने दुसरा एक विस्तृत ग्रंथ रचिला असावा. हा दक्षिण भारतातील ग्रंथकार होता. उपलब्ध पुराव्यावरून स्मृत्यर्थसार हा ग्रंथ इ.स. ११५० आणि १२०० ह्यांच्या मध्यंतरी झाला असावा.

**१९. अनिरुद्ध** (मू. ग्रं. पा. ३३७)

अनिरुद्ध हा बंगाल प्रांतातील धर्मशास्त्रावरील जुन्या आणि प्रसिद्ध ग्रंथकारांपैकी एक होता. ह्याचे हारलता ['इति चाम्पाहट्टीयमहोपाध्यायधर्माध्यक्षश्रीमदनिरुद्धभट्टविरचिताशौचव्यवस्था हारलता समाप्ता।; 'इतिचाम्पा ..... अनिरुद्धभट्टविरचिता छन्दोगानां पद्धतिः पितृदयिता समाप्ता।] आणि पितृदयिता अथवा कर्मोपदेशिनीपद्धती हे दोन ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. हारलता ह्या ग्रंथात आशौचासंबंधी विवेचन असून पितृदयिता ह्या ग्रंथात सामवेदी लोकांकरिता नित्यकर्मे, श्राद्ध, दान इत्यादी विषयांचे विवेचन केले आहेत. अनिरुद्ध गंगातीरावरील विहारपाटक ह्या गावचा रहिवाशी असून चांपाहट्टीय बंगाली ब्राह्मण होता. तो धर्माधिकरण (न्यायाधीश) होता. हारलता ग्रंथ इ.स. ११०० नंतर झाला असला पाहिजे. अनिरुद्धकृत चातुर्मास्यपद्धती आणि भगवत्मंजरी ह्या दोन ग्रंथांचेही उल्लेख आढळतात. भगवत्मंजरी हा वैष्णव सांप्रदायाचा ग्रंथ आहे.

**२०. बल्लालसेन** (मू. ग्रं. पा. ३४०)

बंगाल प्रांताच्या ह्या सुप्रसिद्ध राजाचे आचारसागर, प्रतिष्ठासागर, दानसागर आणि अद्‌भुत सागर हे चार ग्रंथ प्रसिद्ध आहेत. अद्‌भुतसागर हा ग्रंथ त्याने अपूर्ण ठेविला होता आणि त्याचा पुत्र लक्ष्मणसेन ह्याने तो पुरा केला. बल्लालसेनाची ग्रंथरचना इ.स. च्या १२ शतकाच्या तिसऱ्या पादात झाली असावी. दानसागर हा ग्रंथ वास्तविक अनिरुद्धभट्टाने केला असून तो बल्लालसेनाच्या नावावर प्रसिद्ध केला असे रघुनंदनाचे ['विष्णुरहस्यानार्षत्वस्य दानसागरे अनिरुद्धभट्टेनाभिहितत्वाच्च' (एकादशीतत्त्व खं. २ पा. ४४).] मत होते आणि प्रत्यक्ष त्या ग्रंथात देखील तो ग्रंथ बल्लालसेनाने आपल्या गुरूच्या (अनिरुद्धाच्या) सांगण्याप्रमाणे रचिला असल्याचे म्हटले आहे.

**२१. हरिहर** (मू. ग्रं. पा. ३४१)

हरिहराने व्यवहार ह्या विषयावर एक ग्रंथ रचिला होता असे इतर ग्रंथांतील [विवादरत्नाकर, पा. २२१, ४०२; चतुर्व. (काल) ३· २· पा. ५२; समयप्रदीप (डे. कॉ. हस्त. क्र. ३७१ सन १८७५।७६ पृष्ठ ५२ अ).] अवतरणांवरून दिसून येते. परंतु तो ग्रंथ उपलब्ध झालेला नाही. हा इ. स. १३०० च्या पूर्वी होऊन गेला असावा. हरिहराने रचिलेली पारस्करगृह्यसूत्रावरील एक टीका उपलब्ध आहे. हरिहराने विज्ञानेश्वराच्या आशौच दशकावर टीका केली होती. हे दोन्ही हरिहर एकच असण्याचा संभव आहे.

सुप्रसिद्ध बंगाली ग्रंथकार रघुनंदन ह्याचा पिता हरिहराचार्य नावाचा होता. तसेच कोणा एका हरिहराचार्याने समयप्रदीप नावाचा ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथ शके १४८१ (इ. स. १५५९।६०) मध्ये लिहिला होता.

**२२. हरदत्त** (मू. ग्रं. पा. ३४७)

भाष्यकार ह्या नात्याने हरदत्ताची फार मोठी प्रसिद्धी आहे. त्याने आपस्तंब गृह्यसूत्र, आप०मंत्रपाठ, आश्वलायनगृह्यसूत्र, गौतम धर्मसूत्र, आप. धर्मसूत्र इत्यादी ग्रंथावर आदर्शभूत अशा टीका लिहिल्या आहेत.

त्याच्या ग्रंथांतील उल्लेखांवरून हरदत्त दक्षिणभारतातील रहिवाशी असावा अथवा त्याला दक्षिणभारतातील प्रघातांचा पूर्ण परिचय असावा असे दिसते. वीरमित्रोदय [... 'स्मृतिचन्द्रिकाकारहरदत्तादीनां दाक्षिणात्यनिबन्धृणां...' (वीर मि. पा. ७०५)] ह्या ग्रंथात हरदत्ताचा दाक्षिणात्य निबंधकारांत समावेश केला आहे. आश्व. गृ. सूत्रावरील अनाविला टीकेच्या समाप्तिवाचक संकल्पात त्याने कर्त्याचे नाव 'हरदत्ताचार्य मिश्र' असे दिले आहे. नारायणभट्टाने (जन्म इ. स. १५१३) हरदत्ताची मते उद्धृत केली आहेत. हरदत्ताने आपस्तंबाचा भाष्यकार देवस्वामिन् ह्याच्याखेरीज दुसऱ्या कोणत्याही टीकाकारांचा उल्लेख केला नाही. ह्यावरून तो तुलनेने प्राचीन काळचा असावा. तो इ. स. ११०० ते १३०० ह्यांच्या मध्यंतरी केव्हा तरी आणि त्यातल्या त्यात इ. स. ११०० च्या जवळच्या काळात होऊन गेला असण्याचा अधिक संभव आहे.

## २३. **श्रीदत्त उपाध्याय** (मू. ग्रं. पा. ३६३)

श्रीदत्त उपाध्याय हा मिथिला प्रांतातील मध्यकालीन निबंधकारांमधील सर्वांत जुन्यांपैकी एक होता. ह्याने आचारदर्श, छंदोगाह्निक (सामवेदी), समयप्रदीप, पितृभक्ति, श्राद्धकल्प इत्यादी ग्रंथ केले होते. उपलब्ध पुराव्यावरून श्रीदत्ताची ग्रंथरचना इ. स. १२७५ आणि १३१० ह्यांच्या मध्यंतरी झाली असावी.

श्रीदत्तमिश्र नावाचा दुसरा एक मैथिली ग्रंथकार होऊन गेला असावा. त्याने एकाग्निदान आणि एक दोन इतर ग्रंथ केले होते. हा श्रीदत्त इ. स. च्या १४ व्या शतकाच्या अखेरीला होऊन गेला असावा.

## २४. **चण्डेश्वर** (मू. ग्रं. पा. ३६६)

धर्मशास्त्रावरील मैथिली ग्रंथकारांत चण्डेश्वर सर्वांत अधिक प्रसिद्ध आहे. त्याने स्मृतिरत्नाकर [श्रीकृत्यदानव्यवहारशुद्धिपूजाविवादेषु गृहस्थकृत्ये । रत्नाकरा धर्मभुवो निबन्धाः कृतास्तुलापुरुषदेन सप्त। (विवादरत्नाकर अखेरचा श्लोक)] अथवा नुसता रत्नाकर ह्या नावाचा एक विस्तृत निबंधग्रंथ लिहिला आहे. त्यात कृत्य, दान, व्यवहार, शुद्धि, पूजा, विवाद आणि गृहस्थ ह्या सात विषयाचे विवेचन केलेली 'रत्नाकर' उपपद असलेली सात प्रकरणे आहेत. चण्डेश्वरकृत विवाद रत्नाकर हा ग्रंथ ब्रिटिश अंमलात मिथिला (तिरहूत) प्रांतात हिंदुकायद्याच्या बाबतीत सर्वांत अधिक प्रमाणभूत धरिला जात असे.

चण्डेश्वराने दुसरेही अनेक ग्रंथ लिहिले होते. त्यांपैकी कृत्यचिंतामणी, राजनीतिरत्नाकर, दानवाक्यावली, शिववाक्यावली इत्यादी ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

चण्डेश्वर हा मिथिला प्रांताच्या राजाचा एक मंत्री होता. त्याने नेपालचा पराभव करून शके १२३६ (इ. स. १३१४) मध्ये वाग्मती नदीच्या तीरावर आपली सुवर्णतुला केली होती. तो मंत्री असून मुख्य न्यायाधीश होता असेही त्याच्या ग्रंथांवरून दिसून येते. उपलब्ध पुराव्यावरून चण्डेश्वराचे ग्रंथलेखन इ. स. १३१४ पासून ५० पेक्षा अधिक वर्षेपर्यंत चालत होते असे दिसते. मैथिली आणि बंगाली ग्रंथकारांवर चण्डेश्वराच्या मतांची फार मोठी छाप पडली होती.

अनुक्रमणिका

## २५. **हरिनाथ** (मू. ग्रं. पा. ३७२)

धर्मशास्त्रावरील अनेक विषयांचे विवचेन केलेला स्मृतिसार नावाच्या निबंधग्रंथाचा कर्ता हरिनाथ होता. ह्या ग्रंथाचा काहीही भाग छापला गेलेला नाही. ह्या ग्रंथातील अवतरणे शूलपाणी, मिसरु मिश्र [मिसरुमिश्रकृत विवादचन्द्र डे. कॉ. हस्त. क्र. ५७ सन १८८३–८४ पृष्ठ ५ अ.] ह्यांनी उद्धृत केली आहेत. ह्यावरून आणि इतर पुराव्यावरून हा ग्रंथ इ. स. च्या १४ व्या शतकाच्या शेवटल्या पादाच्या पूर्वी आणि इ. स. १२५० नंतर रचिला गेला असावा.

स्मृतिसार ह्या नावाचे अनेक ग्रंथ आहेत. उदाहरणार्थ, केशवमिश्रकृत, यादवभूषण भट्टाचार्यकृत, देवयाज्ञिककृत, इत्यादि.

## २६. **मदनपाल आणि विश्वेश्वरभट्ट** (मू. ग्रं. पा. ३८१)

मदनपाल हा राजा भोजराजाप्रमाणेच विद्येचा मोठा पुरस्कर्ता असावा असे दिसते. त्याच्या नावाने अनेक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. मदनपारिजात, स्मृतिमहार्णव अथवा मदनमहार्णव, तिथिनिर्णयसार आणि स्मृतिकौमुदी हे धर्मशास्त्रावरील चार ग्रंथ त्याच्या नावावर (म्हणजे त्याच्या आश्रयाखाली लिहिलेले) प्रसिद्ध आहेत. मदनपालाच्या आश्रयाखाली लिहिलेला मदनपारिजात हा ग्रंथ विश्वेश्वरभट्ट ह्याने रचिला होता. ह्या विश्वेश्वरभट्टाने मिताक्षरेवर सुबोधिनी नावाची टीका केली होती. मदनपालाचा पुत्र मांधाता ह्याच्या नावावर महार्णव नावाचा एक ग्रंथ प्रसिद्ध आहे. तो मांधात्याने अनेक विद्वानांकरवी रचिला होता. तिथिनिर्णयसार हा ग्रंथ विश्वनाथाने केला होता. विश्वेश्वर आणि विश्वनाथ एकच असण्याचा संभव आहे. ह्याखेरीज मदनविनोदनिघंटु (वैद्यकावरील), सूर्यसिद्धान्त विवेक अथवा वासनार्णव, यंत्रप्रकाश, सिद्धांतगर्भ इत्यादी ग्रंथ ['यन्त्रप्रकाशसमहार्णवपारिजातसिद्धान्तगर्भतिथिनिर्णयसारमुख्याः । ग्रन्थाश्च येन रचिताः०' – स्मृतिकौमुदि श्लोक १४ वा) घ. इ. ७] मदनपालाने (त्याच्या नावाने प्रसिद्ध असलेले) केले होते.

मदनपाल दिल्लीच्या उत्तरेस असलेल्या काष्ठा (सांप्रतचे कथ) येथे राज्य करणाऱ्या टाक राजवंशातील होता. विश्वेश्वरभट्ट हा पेरिभट्ट याचा पुत्र असून त्याचे गोत्र कौशिक होते. तो द्रवीड देशातील रहिवाशी असावा आणि आश्रयाच्या शोधात उत्तर भारतात गेला असावा. तो हिंदु कायद्याच्या बाबतीत वाराणसी परंपरेतील एक प्रमुख आधारभूत ग्रंथकार समजला जातो. मदनपाल आणि विश्वेश्वरभट्ट ह्यांचा लेखनव्यवसाय इ. स. १३६० ते १३८० ह्यांच्या मध्यंतरी झाला असला पाहिजे.

## २७. **मदनरत्न** (मू. ग्रं. पा. ३८९)

मदनरत्न हा धर्मशास्त्रावरील एक विस्तृत निबंधग्रंथ आहे. ह्याचा काहीही भाग अद्यापी छापलेला नाही. हा ग्रंथ शक्तिसिंहाचा पुत्र मदनसिंह देव ह्या राजाच्या आश्रयाखाली लिहिण्यात आला होता. ह्या ग्रंथाचे उद्योत संज्ञा असलेले सात भाग असून त्यात समय, आचार, व्यवहार, प्रायश्चित्त इत्यादी [उद्योताः समयाचारव्यवहारविवेचकाः । प्रायश्चित्तस्य दानस्य शुद्धिशान्त्योश्च सप्तमे । (समयोद्योत श्लो. २४ विश्रामबाग संग्रह क्र. १४६).] विषयांचे विवेचन केले आहे. त्या ग्रंथात केलेल्या उल्लेखावरून आणि इतर ग्रंथांत उद्धृत केलेल्या त्या ग्रंथातील अवतरणांवरून मदनरत्न हा ग्रंथ इ. स. १३५० ते १५०० च्या मध्यंतरी लिहिला गेला असावा. नारायणभट्ट, कमलाकरभट्ट इत्यादी ग्रंथकारांनी मदनरत्नातील अवतरणे महत्त्वाचे आधार म्हणून उद्धृत केली आहेत.

## २८. **शूलपाणि** (मू. ग्रं. पा. ३९३)

धर्मशास्त्रावरील बंगाली ग्रंथकारात जीमूतवाहनाच्या खालोखाल शूलपाणि हा अत्यंत प्रमाणभूत असा ग्रंथकार आहे. धर्मशास्त्रात अंतर्भूत होणाऱ्या विषयांवर अनेक लहानलहान निबंधवजा ग्रंथ शूलपाणीने लिहिले होते आणि त्या सर्वांचा समावेश स्मृतिविवेक ह्या नावाच्या एका विस्तृत निबंधग्रंथात करण्याचा त्याचा मनोदय होता. अशा ग्रंथांच्यापैकी १४ ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्या प्रत्येकाच्या नावाच्या शेवटी 'विवेक' हे उपपद लाविले होते. त्याच्या ग्रंथांपैकी श्राद्धविवेक हा सर्वात अधिक प्रसिद्ध आहे. श्राद्धविवेक ह्या ग्रंथावर श्रीनाथ आचार्यचूडामणी आणि गोविंदनंद ह्यांच्या सारख्या प्रख्यात ग्रंथकारांनी अनेक टीका लिहिल्या आहेत. शूलपाणीने याज्ञ. स्मृतीवरही एक टीका लिहिली होती. शूलपाणीच्या प्रायश्चित्तविवेकावरही तशाच टीका झाल्या आहेत.

अशी आख्यायिका आहे की शूलपाणी हा बंगालच्या लक्ष्मणसेन राजाचा न्यायाधीश होता. परंतु ती खरी असावी असे दिसत नाही.

शूलपाणीने उल्लेख केलेल्या ग्रंथांवरून आणि इतर ग्रंथकारांनी केलेल्या त्याच्या उल्लेखांवरून शूलपाणी इ.स. १३७५ आणि १४६० ह्यांच्या मध्यंतरी होऊन गेला असावा.

## २९. **रुद्रधर** (मू. ग्रं. पा. ३९६)

रुद्रधर हा धर्मशास्त्रावरील एक सुप्रसिद्ध मैथिली ग्रंथकार असून त्याने अनेक ग्रंथ केले होते. शुद्धिविवेक, श्राद्धविवेक, व्रतपद्धती, वर्षक्रिया इत्यादी ग्रंथ त्याने केले होते. रुद्रधराच्या पित्याचे नाव महामहोपाध्याय लक्ष्मीधर असे होते. उपलब्ध पुराव्यावरून रुद्रधर इ. स. १४२५ आणि १४६० ह्यांच्या मध्यंतरी झाला असावा. चण्डेश्वराचा शिष्य आणि कृत्यचंद्रिका, विवेकचंद्रिका इत्यादी ग्रंथांचा कर्ता रुद्रधर वेगळाच ग्रंथकार असावा.

## ३०. **मिसरु मिश्र** (मू. ग्रं. पा. ३९८)

ह्याचे विवादचंद्र आणि (न्याय-वैशेषिक पद्धतीवरील) पदार्थचंद्रिका [श्रीचन्द्रसिंहनृपतेर्दयिता लछिमा महादेवी । रचयति पदार्थचन्द्रं मिसरु मिश्रोपदेशेन ॥ (विवादचंद्र श्लोक २, मित्र ह्यांची टिपणे खं. ९ पा. १२ क्र. २९०१).] हे दोन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. विवादचंद्र हा ग्रंथ मिथिला येथील कामेश्वरवंशाच्या चंद्रसिंह राजपुत्राची पत्नी लछमीदेवी हिच्या [इति महामहोपाध्याय श्रीमिसरूमिश्रविरचितो विवादचन्द्रः समाप्तः । (इंडिया ऑफिस सूची पा. ४५४ क्र १५००)] आज्ञेवरून लिहिला होता. हा चंद्रसिंह इ.स. च्या १५ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास होऊन गेला असावा. विवादचंद्र हा ग्रंथ मिथिला प्रांतात हिंदु कायद्याच्या बाबतीत प्रमाणभूत असल्याचे ब्रिटिश अमलात मानले जात असे.

## ३१. **वाचस्पति मिश्र** (मू .ग्रं. पा. ३९९)

मिथिला प्रांतातील निबंधग्रंथकारात वाचस्पती मिश्र हा सर्वात अधिक योग्यतेचा ग्रंथकार आहे. त्याचा विवादचिंतामणी हा ग्रंथ हिंदु कायद्याच्या बाबतीत मिथिला प्रांतात सर्वांत अधिक प्रमाणभूत असल्याचे न्यायालयांनी मान्य केले आहे. त्याचे ग्रंथ अतिशय मोठे असून असे अनेक ग्रंथ त्याने रचिले होते.

अनुक्रमणिका

त्याने असे म्हटले आहे की त्याच्या तारुण्यात त्याने शास्त्रावर दहा ग्रंथ आणि स्मृतींवर तीस निबंध लिहिले असून उतारवयात श्राद्धकल्प हा ग्रंथ लिहिला होता. 'चिंतामणी' उपपद असलेले याचे ११ तरी ग्रंथ प्रसिद्ध आहेत. 'निर्णय' उपपद असलेले त्याचे ग्रंथआहेत. शिवाय 'महार्णव' उपपद असलेले सात ग्रंथ त्याने प्रत्यक्ष लिहिले असावे अथवा लिहिण्याचे योजिले असावे असे दिसते. त्यांपैकी कृत्यमहार्णव हा ग्रंथ उपलब्ध आहे.

उपलब्ध पुराव्यावरून वाचस्पतिमिश्राचे ग्रंथलेखन इ.स. १४५० ते १४८० ह्यांच्या मध्यंतरी झाले असावे.

वाचस्पती नावाचे दुसरेही [शंकराचार्यांच्या शारीरकभाष्यावर भामति नांवाची टीका लिहिणारा वाचस्पति (इ.स. च्या ९ व्या शतकाचा पूर्वार्ध); स्मृतिसारसंग्रह ग्रंथ लिहिणारा (चंद्रशेखर) वाचस्पति (इ. स. १८ व्या शतकाचा पूर्वार्ध)] काही ग्रंथकार होऊन गेले.

## ३२. **नृसिंहप्रसाद** (मू. ग्रं. पा. ४०६)

हा धर्मशास्त्रावरील विश्वकोशाच्या स्वरूपाचा एक ग्रंथ आहे. ह्या ग्रंथाची संपूर्ण हस्तलिखित प्रत वाराणसी संस्कृत कॉलेजमध्ये आहे. परंतु त्याचा काहीही भाग अद्यापी छापला गेला नाही. ह्या ग्रंथाची 'सार' ह्या नावाची १२ प्रकरणे असून त्यात संस्कार, आह्निक, इत्यादी विषयांचे विवेचन केले आहे. ग्रंथकाराचे नाव दलपती अथवा दलाधीश असून त्याच्या पित्याचे नाव वल्लभ होते. तो भारद्वाज गोत्राचा आणि याज्ञवल्क्य शाखेचा (म्हणजे शुक्ल यजुर्वेदी) होता. तो वैष्णव पंथाचा मोठा पुरस्कर्ता असून देवगिरी (दौलताबाद) येथील निजामशहाचा मुख्यमंत्री होता. नृसिंहप्रसाद ह्या ग्रंथात ज्या ग्रंथांचे आधार दिले आहेत त्यांवरून तो ग्रंथ इ. स. १४८० ते १५१२ ह्यांच्या मध्यंतरी रचिला गेला असावा.

## ३३. **प्रतापरुद्रदेव** (मू. ग्रं. पा. ४१०)

प्रतापरुद्रदेव हा ओरिसा प्रांतातील कटक येथे राज्य करणाऱ्या गजपती वंशातील राजा होता. त्याने रचिलेला सरस्वतीविलास हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. प्रतापरुद्रदेवाने पंडितांची एक परिषद भरविली आणि मुलकी आणि धर्मविषयक कायद्यासंबंधी एक विस्तृत निबंधग्रंथ रचिला. सरस्वतिविलास हा ग्रंथ हिंदु कायद्याच्या बाबतीत दक्षिण भारतात मिताक्षरेच्या खालोखाल प्रमाणभूत मानला जातो. ह्या ग्रंथाच्या व्यवहारखंडात सामान्यतः विज्ञानेश्वराच्या (मिताक्षरेच्या) दायभागासंबंधीच्या मतांचे अनुकरण केले आहे.

प्रतापरुद्रदेवाने कटक येथे इ. स. १४९७ ते १५३९ पर्यंत राज्य केले. तेव्हा सरस्वतीविलास हा ग्रंथ इ.स. च्या सोळाव्या शतकाच्या पहिल्या पादात झाला असला पाहिजे.

प्रतापरुद्रदेवाने केलेला प्रतापमार्तंड अथवा प्रौढप्रतापमार्तंड ह्या नावाचा एक ग्रंथ उपलब्ध आहे. त्याचे प्रकाश संज्ञा असलेले पाच भाग असून त्यात पदार्थनिर्णय, वत्सरादी निर्णय, तिथिनिरूपण, व्रतनिर्णय आणि विष्णुभक्ती हे विषय आले आहेत.

### **३४. गोविन्दानन्द** (मू. ग्रं. पा. ४१४)

गोविन्दानंदाने अनेक ग्रंथ लिहिले होते. त्यांपैकी दानकौमुदी, शुद्धिकौमुदी, श्राद्धकौमुदी आणि वर्षक्रियाकौमुदी हे चार ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत, हे सर्वही ग्रंथ क्रियाकौमुदी नावाच्या एका निबंधग्रंथाचे भाग असावेत असे दिसते. ह्याशिवाय त्याने शुद्धिदीपिका ग्रंथावर कौमुदी नावाची टीका लिहिली होती आणि शूलपाणीच्या प्रायश्चित्तविवेकावर तत्त्वार्थकौमुदी नावाची टीका लिहिली होती.

गोविंदानंदाचा पिता गणपतिभट्ट हा बंगाल प्रांतातील मिदनापुर जिल्ह्यातील बाग्री गावचा रहिवासी होता.

उपलब्ध पुराव्यावरून गोविंदानंदाच्या निरनिराळ्या ग्रंथांची रचना इ.स. १५०० आणि १५४० ह्यांच्या मध्यंतरी झाली असावी असे दिसते.

### **३५. रघुनंदन** (मू. ग्रं. पा. ४१६)

बंगाल प्रांतातील धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांत रघुनंदन हा शेवटचा होता. त्याने धर्मशास्त्राच्या निरनिराळ्या शाखांचे विवेचन केलेला स्मृतितत्त्व नावाचा एक सर्वसंग्रह स्वरूपाचा ग्रंथ लिहिला होता. त्याचे २८ भाग असून त्यांना 'तत्त्व' अशी संज्ञा दिली आहे. 'स्मृतिविषयावरील त्याच्या प्रभुत्वावरून त्याच्यानंतरच्या ग्रंथकारांनी त्याला 'स्मार्तभट्टाचार्य' अथवा नुसती 'स्मार्त' अशी संज्ञा दिली आहे. ह्या २८ तत्त्वांखेरीज दुसरेही अनेक ग्रंथ रघुनंदनाने लिहिले होते. दायभागावरील एक टीका त्याच्या नावाने प्रसिद्ध आहे आणि ती सर्व टीकांत अधिक प्रमाणभूत मानण्यात येते.

रघुनंदनाच्या पित्याचे नाव हरिहरभट्टाचार्य असे होते आणि तो बंगाली वंद्यघटीय ब्राह्मण होता.

उपलब्ध पुराव्यावरून रघुनंदन इ.स. १४८० आणि १५७० ह्यांच्या मध्यंतरी होऊन गेला असावा आणि त्याने केलेल्या ग्रंथांची संख्या लक्षात घेता त्याचा लेखन व्यवसाय इ .स. १५२० ते १५७० यांच्या मध्यंतरच्या ५० वर्षांच्या दीर्घ कालात चालला असावा.

### **३६. टोडरानंद** (मू. ग्रं. पा. ४२१)

अकबराचा प्रख्यात अर्थमंत्री राजा टोडरमल्ल ह्याने सर्वसंग्रह स्वरूपाचा एक विस्तृत ['श्रीमान्हैन्दवपारसीकधरणीशक्रस्य राजाग्रणी । राजा टोडरमल्लचण्डकिरणस्तीव्रप्रतापोदयः ।' (व्यवहारसौख्य श्लोक २)] ग्रंथ लिहिला असून त्यात व्यावहारिक आणि धर्मसंबंधी कायदा, ज्योतिषशास्त्र आणि वैद्यक ह्या विषयांचे विवेचन केले आहे. ह्या ग्रंथाच्या विभागांना 'सौख्य' अशी संज्ञा दिली आहे. तोडरमल्ल हा अष्टपैलू बुद्धीचा पुरुष होता. त्याने यशस्वी सेनापती ह्या नात्याने जसा लौकिक संपादन केला होता तसाच अर्थशास्त्रपटु आणि मुत्सद्दी ह्या नात्यानेही लौकिक संपादन केला होता. टोडरमल्ल हा खेत्री जातीचा होता आणि तो इ. स. १५८९ मध्ये लाहोर येथे मरण पावला.

त्याच्या ज्योतिःसौख्य नावाचा ग्रंथ टोडरमल्लाच्या आज्ञेवरून नीलकंठाने लिहिला होता. तो ग्रंथ शके १४८४ (इ. स. १५७२) मध्ये रचिला गेला होता. व्यवहारसौख्य ह्या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रतीच्या शेवटी संवत् १६३८ (इ. स. १५८१।८२) ही मिती घातली आहे. ती मिती त्या ग्रंथाच्या रचनेची असावी असे वाटते. ह्यावरून वर उल्लेख केलेले ग्रंथ तोडरमल्लाच्या आश्रयाखाली इ.स. १५६५ ते १५८९ ह्यांच्या मध्यंतरी लिहिले गेले असावेत असे वाटते.

## **३७. नंदपंडित** (मू. ग्रं. पा. ४२३)

नंदपंडिताने धर्मशास्त्रावर प्रचंड ग्रंथ लिहिले होते. परंतु त्यांच्यापैकी बहुतेक ग्रंथ अद्यापी छापले गेलेले नाहीत. ह्या करिता त्याच्या ग्रंथांपैकी प्रमुख ग्रंथांची थोडीशी माहिती पुढे दिली आहे.

त्याने पराशरस्मृतीवर विद्वन्मनोहरा [पराशरस्मृतेष्टीका विद्वन्मनोहरा स्मृतिसिन्धुः । श्राद्धकल्पलता चैता नन्दपण्डितकृता टीकाः॥ (वैजयन्ती डे. कॉ. हस्त क्र. ३९ सन १८६६–६८)] नावाची एक टीका लिहिली होती. तसेच विज्ञानेश्वरकृत मिताक्षरेवर प्रमिताक्षरा अथवा प्रतीताक्षरा ह्या नावाची एक टीका लिहिली होती असे दिसते. त्याने श्राद्धकल्पलता नावाचाही एक ग्रंथ लिहिला होता. कौशिकादित्याच्या षडशीति अथवा आशौचनिर्णय ह्या ग्रंथावर नंदपंडिताने शुद्धिचंद्रिका नावाची टीका लिहिली होती. त्याने स्मृतिसिंधु ह्या नावाचा एक प्रचंड निबंधग्रंथ लिहिला होता. त्या ग्रंथाचे काही भाग उपलब्ध झाले आहेत. ह्या ग्रंथात आलेल्या सिद्धांतांचा सारांश असलेला तत्त्वमुक्तावली ह्या नावाचाही एक ग्रंथ त्याने तयार केला होता. वैजयंती अथवा केशववैजयंती हा नंदपंडितांचा एक प्रख्यात ग्रंथ आहे. त्यात विष्णुधर्मसूत्रावर टीका केली आहे. आधुनिक हिंदु कायद्याच्या प्रश्नावर वाराणसी सांप्रदायातील जे ग्रंथ झाले आहेत त्यातील वैजयंती हा एक प्रमुख ग्रंथ आहे. कर्नाटक देशातील विजयपुर येथील केशव नावाच्या राजाच्या प्रोत्साहनावरून तो ग्रंथ लिहिल्यामुळे त्याला केशव वैजयंती असे नाव आहे. दत्तकमीमांसा हा नंदपंडिताचा सर्वांत अधिक प्रसिद्ध असलेला ग्रंथ आहे. ब्रिटिश अमलात दत्तकाच्या बाबतीत हा ग्रंथ प्रमाणभूत मानण्यात येत असे. वरील ग्रंथांखेरीज नवरात्रप्रदीप, हरिवंशविलास, काशीप्रकाश, स्मार्तसमुच्चय इत्यादी ग्रंथ नंदपंडिताने लिहिले होते.

नंदपंडिताच्या घराण्याचा मूळपुरुष लक्ष्मीधर हा निजामाच्या राज्यातील बिदर येथील रहिवासी होता आणि तो वाराणसी येथे गेला. नंदपंडिताला विनायक पंडित असेही म्हणत असत. त्याच्या पित्याचे नाव रामपंडित होते. नंदपंडिताने केलेल्या माधवानंद काव्याच्या एका प्रतीवर संवत १६५५ (इ. स. १५९९) हे वर्ष लिहिले आहे आणि ते बहुधा नंदपंडिताच्या हस्ताक्षरात आहे. त्याने शेवटी शेवटी केलेला वैजयंती ग्रंथ संवत १६७९ (इ. स. १६२३) मध्ये रचिल्याचे त्यात वर्णन केले आहे. ह्यावरून नंद पंडिताची ग्रंथरचना इ. स. १५९५ आणि १६३० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात झाली असावी.

## **३८. वीरमित्रोदय** (मू. ग्रं. पा. ४४०)

वीरमित्रोदय [स्वस्ति श्रीयुतवीरसिंहनृपतेराज्ञावशादुत्सुकः । श्रीमित्राभिधपण्डितः प्रतिदिशं कीर्त्यानिशं मण्डितः ॥ नानानिर्णयवर्णनं ... व्यवहारसाधकमिमं कुर्वे प्रकाशं परम् ॥ (व्यवहारप्रकाश श्लो. २)] हा मित्रमिश्राने रचिलेला एक विस्तृत निबंधग्रंथ असून त्यात धर्मशास्त्राच्या बहुतेक सर्व विषयांचा समावेश केला आहे. हेमाद्रिकृत चतुर्वर्गचिंतामणि हा ग्रंथ सोडल्यास वीरमित्रोदय हाच धर्मशास्त्रावरील बहुधा सर्वांत अधिक विस्तृत ग्रंथ आहे. तथापी ह्या ग्रंथाचे महत्त्व आणि उपयुक्तता हेमाद्रीच्या ग्रंथापेक्षाही

अधिक आहे. कारण, त्यात व्यवहार ह्या विषयाचाही समावेश केलेला आहे. ह्या ग्रंथाच्या विभागांना 'प्रकाश' अशी संज्ञा दिली आहे. हिंदु कायद्याच्या बाबतीत वाराणसी सांप्रदायात वीरमित्रोदय हा एक फार मोठ्या योग्यतेचा ग्रंथ आहे. इतर प्रांतांतही वीर मित्रोदयाला उच्चस्थान दिले जाते.

वीरमित्रोदयाखेरीज मित्रमिश्राने याज्ञ०स्मृतीवर एक टीका लिहिली होती. वीरमित्रोदय हा प्रचंड ग्रंथ लिहिण्यास ओर्छा येथील राजा वीरसिंह ह्याने आज्ञा केली होती आणि वीरमित्रोदय ह्या नावात 'वीर' आणि 'मित्र' ही दोनही नावे सूचित होतात.

वीरसिंहाने ओर्छा येथे इ.स. १६०५ ते १६२७ पर्यंत राज्य केले. तेव्हा मित्रमिश्राचा लेखनव्यवसाय इ.स.च्या १७ व्या शतकातील पहिल्या पादात (इ.स. १६१० आणि १६४० ह्यांच्या दरम्यान) झाला असावा.

मित्रमिश्राच्या पित्याचे नाव परशुराम पंडित होते आणि पितामहाचे नाव हंस पंडित होते. हंस पंडित गोपाचल (ग्वालेर) येथील रहिवासी होता.

### **३९. अनंत देव** (मू. ग्रं. पा. ४४७)

अनंत देवाने स्मृतिकौस्तुभ नावाचा एक प्रचंड निबंधग्रंथ लिहिला होता. त्यातील संस्कार विषयावरील प्रकरणाला संस्कारकौस्तुभ असे नाव आहे. हिंदुस्थानातील सर्वोच्च न्यायालयाने संस्कारकौस्तुभ हा ग्रंथ प्रमाणभूत असल्याचे मान्य केले आहे. स्मृतिकौस्तुभाचे दीधिति (म्हणजे किरण अथवा अंश) ह्या नावाचे अनेक विभाग केले आहेत. अनंत देवाने अग्निहोत्रप्रयोग, चातुर्मास्यप्रयोग ह्यांच्यासारखे अनेक प्रयोगही लिहिले होते आणि कृष्णभक्तिचंद्रिका नावाचे एक नाटकही लिहिले होते. अनंत देव हा सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय संत एकनाथ [आसीद्गोदावरीतीरे वेदवेदिसमन्वितः । श्रीकृष्णभक्तिमानेक एकनाथाभिधो द्विजः । (स्मृतिकौस्तुभ श्लोक १३)] ह्याच्या कुलात जन्मला होता आणि तो एकनाथापासून चौथा पुरुष होता. त्याचा पिता आपदेव ह्याने न्यायप्रकाश अथवा आपदेवी ह्या नावाचा ग्रंथ केला होता.

स्मृतिकौस्तुभ हा ग्रंथ बाजबहादूर नावाच्या राजाच्या आज्ञेवरून रचिला होता. बाजबहादराने अलमोरा आणि नैनिताल ह्यांच्यावर इ.स. १६३८ ते १६७८ पर्यंत राज्य केले. अनंत देवाच्या ग्रंथलेखनाचा काल इ.स. १६७३ च्या सुमाराचा असावा.

### **४० नागोजीभट्ट** (मू. ग्रं. पा. ४५३)

नागोजीभट्टाने अनेक शास्त्रांवर आदर्श स्वरूपाचे ग्रंथ लिहिले होते. त्याने लिहिलेल्या सर्व ग्रंथांची संख्या सुमारे तीस भरेल. धर्मशास्त्रावर त्याने आचारेंदुशेखर, आशौचनिर्णय, तिथींदुशेखर, प्रायश्चित्तेंदुशेखर अथवा प्रायश्चित्तसारसंग्रह, श्राद्धेंदुशेखर, सपिंडीमंजरी, आणि सापिंड्यदीपिका अथवा सापिंड्यनिर्णय हे ग्रंथ लिहिले होते.

नागोजीभट्ट हा काळ (म्हणजे काळे) उपनावाच्या महाराष्ट्र ब्राह्मण कुलात जन्मला होता. शृंगवेरनगराच्या राम नावाच्या राजाने त्याला आश्रय दिला होता. हे शृंगवेरनगर गंगेच्या काठी प्रयागच्या वरच्या बाजूला असावे. नागोजीभट्टाचा गुरु हरिदीक्षित हा प्रख्यात वैय्याकरणी भट्टोजी दीक्षितांचा नातु

अनुक्रमणिका

होता. भट्टोजी इ. स. च्या १७ व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला. तेव्हा नागोजीभट्ट इ. स. च्या १७ व्या शतकाच्या अखेरीला आणि १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला असावा.

### ४१. **बालंभट्ट अथवा बालकृष्ण** (मू. ग्रं. पा. ४५६)

लक्ष्मीव्याख्यान ऊर्फ बालंभट्टी ही विज्ञानेश्वराच्या मिताक्षरा टीकेवर केलेली टीका असून कोणा एका लक्ष्मीदेवी नावाच्या स्त्रीच्या नावावर ती प्रसिद्ध केली आहे. ती टीका अति विस्तृत आहे. समग्र ग्रंथापैकी मिताक्षरेच्या आचार ह्या भागावरील टीका सर्वात अधिक विद्वत्तापूर्ण असून ती जवळजवळ एकाद्या स्वतंत्र ग्रंथासारखी आहे. मिताक्षरेचा अर्थ करण्याच्या बाबतीत मुंबई (महाराष्ट्र) प्रांतात बालंभट्टीला फारच महत्त्व दिले जाते. बालंभट्टी ह्या [... खेरडामुद्गलापत्यगणेशापत्यकृष्णकः । महादेवः सुतस्तस्य ... । पत्नी तस्य ह्युमारूपा साध्व्युमा तस्य कन्यका । पायगुण्डोपाख्यवैद्यनाथपत्नी पतिव्रता । मिताक्षराया विवृतिं तनुते सर्वसंविदे ॥ (बालम्भट्टी, आचारकाण्ड).] ग्रंथात असे म्हटले आहे की तो ग्रंथ वैद्यनाथ पायगुंडाची पत्नी आणि खेरडा आडनावाच्या आणि मुद्गल गोत्राच्या महादेवीची कन्या लक्ष्मी हिने रचिला होता आणि तिच्या माहेरचे नाव उमा असे होते. अशी आख्यायिका आहे की लक्ष्मीदेवीचे एक अपत्य मृत झाल्यामुळे तिला शोक झाला होता, त्यावेळी तिच्या समाधानाकरिता वैद्यनाथाचा पुत्र बालकृष्ण ऊर्फ बालंभट्ट ह्याने तो ग्रंथ तिच्या नावावर प्रसिद्ध केला. वैद्यनाथ हा नागोजीचा शिष्य असून त्याने व्याकरणशास्त्रावर मंजूषा नावाचे अनेक ग्रंथ आणि प्रायश्चित्त ह्या विषयावर एक ग्रंथ लिहिला होता. इंडिया ऑफिस सूचीमध्ये असे म्हटले आहे की बालकृष्ण पायगुंड हा दक्षिणी ब्राह्मण होता आणि तो कोलब्रूकचा पंडित (संस्कृतशिक्षक) होता. कोलब्रूकने इ.स. १८०० च्या सुमारास धर्मशास्त्रसंग्रह हा ग्रंथ लिहिण्याचे काम बालंभट्टाकडे सोपविले त्यावेळी बालंभट्ट सुमारे ८० वर्षांचा होता. ह्यावरून बालंभट्ट हा इ.स. १७३० आणि १८२० ह्यांच्या मध्यंतरच्या काळात होऊन गेला असावा.

### ४२. **जगन्नाथ तर्कपंचानन** (मू. ग्रं. पा. ४६५)

ब्रिटिशांनी बंगाल प्रांताचा राज्यकारभार नबाबाकडून आपल्याकडे घेतल्यानंतर हिंदूंच्या वैय्यक्तिक कायद्याची माहिती सुलभतेने ज्यांत सापडेल असे निबंध ग्रंथ लिहिण्याचे प्रयत्न करण्यात आले. ब्रिटिशांच्या प्रेरणेने लिहिल्या गेलेल्या अशा निबंधग्रंथांपैकी सर्वांत अधिक प्रसिद्ध असलेला निबंधग्रंथ जगन्नाथ तर्कपंचानन ह्याने रचिलेला विवादभंगार्णव हा आहे. जगन्नाथ तर्कपंचानन हा गंगेच्या काठी असलेल्या त्रिवेणी ह्या गावचा राहणारा होता आणि त्याच्या पित्याचे नाव रुद्रतर्कवागीश असे होते. तो निबंधग्रंथ लिहिण्याची कल्पना सर विल्यम जोन्स याची होती आणि त्या ग्रंथातील करारनामा आणि वारसा ह्या दोन प्रकरणांचे इंग्रजी भाषांतर कोलब्रुक ह्याने इ. स. १७९६ मध्ये केले होते. ते भाषांतर कोलब्रुकचा निबंधग्रंथ ह्या नावाने प्रसिद्ध आहे. ब्रिटिश सत्तेच्या आरंभाच्या काळात न्यायालयांना त्या ग्रंथाचा फार उपयोग होत असे. त्या ग्रंथाचे दीप नावाचे भाग केले असून प्रत्येक दीपाचे रत्न नावाचे पोटभाग केले आहेत. जगन्नाथ इ.स. १८०६ मध्ये १११ व्या वर्षी मरण पावला.

जगन्नाथ तर्कपंडिताच्या ग्रंथाचा बंगाल प्रांतात जरी उपयोग करण्यात येत असे तरी तो ग्रंथ पश्चिम भारतात प्रमाणभूत मानू नये असे ब्रिटिशांनी अगदी आरंभापासून ठरविले होते.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण २४

# समारोप

(मू. ग्रं. पा. ४६६)

आतापर्यंतच्या प्रकरणात सुमारे २५ शतकात होऊन गेलेल्या प्रमुख अशा प्रमाणभूत ग्रंथांचे आणि धर्मशास्त्रावरील प्रमुख ग्रंथकारांचे परीक्षण करण्यात आले. धर्मशास्त्रावर ग्रंथ लिहिणाऱ्या ग्रंथकारांची आणि त्यांनी लिहिलेल्या ग्रंथाची संख्या अगणित आहे. आर्यवंशातील लोकांचे ऐहिक, धार्मिक, नैतिक अशा सर्व विषयात नियंत्रण करावे आणि त्यांना इहपरलोकी सुखाची प्राप्ती करून द्यावी ह्याच अत्यंत उदात्त हेतूने हे असंख्य ग्रंथकार आणि ग्रंथ प्रेरित झाले होते. समाजातील निरनिराळ्या वर्णांच्या व्यक्तींच्या त्या त्या विवक्षित वर्णांच्या दृष्टीने असणाऱ्या कर्तव्यांवर त्या ग्रंथकारांनी अधिक जोर दिला असून व्यक्तींच्या हक्कांना आणि अधिकारांना त्यांनी फारसे महत्त्व दिलेले नाही. भारतामधील आर्यांच्या समाजात निरनिराळे परस्परविरोधी हितसंबंध आणि प्रवृत्ती अस्तित्वात असूनही ह्या ग्रंथकारांनी आणि ग्रंथांनी आर्यांच्या निरनिराळ्या वर्गांत फार बळकट अशी एकजूट निर्माण केली आणि तिच्यामुळे एकामागून एक आलेल्या परकीयांच्या आक्रमणांना तोंड देऊन हिंदु समाजाला आपले अस्तित्व टिकविता आले. धर्मवेड्या परकीयांच्या सत्तेखाली असतानाही त्या ग्रंथकारांनी परकीयांच्या संस्कृतीपासून हिंदुसंस्कृतीचे आणि हिंदुवाङ्मयाचे संरक्षण केले. धर्मशास्त्रावरील ह्या ग्रंथकारांच्या मनातील हेतु समाजात उत्पन्न झालेला गोंधळ मोडून काढण्याचा आणि प्रचलित रूढींचा मेळ प्राचीन ऋषींच्या वचनांशी घालून देण्याचा असल्यामुळे त्यांना धर्मवचनांचे कीस काढणारे वादविवाद करावे लागले आणि त्या कारणाने निरनिराळे भेद आणि पोटभेद निर्माण करण्याचाही दोष त्यांना पत्करावा लागला; तसेच निरनिराळे धार्मिक विधी करणे हेच मानवी जीविताचे इतिकर्तव्य आहे असे त्यांना वाटत असल्यामुळे आचारधर्माला त्यांनी अधिक महत्त्व दिले. तथापि त्या ग्रंथकारांपैकी तुलनेने अलिकडील काळात झालेल्या बहुतेक ग्रंथकारांच्या सभोवती आक्रमक आणि अत्यंत सहानुभूतिशून्य अशी परकीय संस्कृती नांदत होती आणि ते त्याच प्रवृत्तीच्या राजकर्त्यांच्या सत्तेखाली राहत होते. आणि त्या ग्रंथकारांच्या भावनांविषयी सहानुभूती असणारी अशी मध्यवर्ती राजसत्ता त्यावेळी भारतात अस्तित्वात नव्हती. त्यामुळे त्या ग्रंथकारांना स्वतःच्या आकुंचित क्षेत्रातच अधिकाधिक वावरणे भाग पडत असे आणि समाजाचे नियमन करण्याकरिता जशी स्वतंत्रबुद्धी, भविष्यकाळाविषयी उमेद आणि दूरदृष्टी उपयोगावी लागते तशी उपयोगणे त्यांना शक्य नव्हते. त्यांच्या कार्यात अशा प्रकारचे दोष असले तरीही धर्मशास्त्रावर ग्रंथ लिहिणाऱ्या ह्या ग्रंथकारांनी जे कार्य केले आहे ते कौतुकास्पद असेच आहे आणि सहस्रावधी वर्षांच्या काळात हिंदुसमाजाचे परिवर्तन कसकसे होत गेले हे समजून घेण्याची ज्यांना इच्छा आहे त्यांनी ह्या ग्रंथकारांविषयी आदरबुद्धी दाखविणे अवश्य आहे.

―――――

अनुक्रमणिका

# धर्मशास्त्राचा इतिहास

### (संक्षिप्त मराठी अनुवाद)

## खंड २ रा — वर्णाश्रम-धर्म

## प्रकरण २५

## धर्मशास्त्रात अंतर्भूत होणारे विषय

(मू. ग्रं. पा. २. १—१८)

फार प्राचीन काळापासून धर्मशास्त्रात अनेक विषयांचा समावेश करण्यात आला आहे. मनुष्याच्या सर्व आयुष्यक्रमाशी संबंध असणारी वर्ण आणि आश्रम ह्यांची कर्तव्ये आणि तदनुषंगिक व्यवहार (न्यायदान), प्रायश्चित्त, शांती, दान इत्यादी विषय ह्यांचे विवेचन धर्मशास्त्रावरील धर्मसूत्रे आणि स्मृती ह्यांच्यासारख्या ग्रंथात केलेले असते. धर्मशास्त्रकारांच्या मताप्रमाणे 'धर्म' ह्या शब्दाची व्याप्ती एक उपासनेचा पंथ एवढीच नसून त्या शब्दात प्रत्येक मनुष्याने व्यक्ती ह्या नात्याने व्यक्तीचा विकास करण्याकरिता आणि समाजाचा एक घटक ह्या नात्याने मानवी समाजाचा विकास करण्याकरिता करावयाच्या कृत्यांचा आणि पाळावयाच्या निर्बंधांचा समावेश होतो असे मानले जात असे.

धर्माची प्रमुख उत्पत्तिस्थाने श्रुती आणि स्मृती असून त्यांच्या खालोखाल शिष्ट लोकांचा आचार हेही धर्माचे उत्पत्तिस्थान असल्यामुळे त्यांना अनुसरून धर्माचे प्रथमतः श्रौतधर्म आणि स्मार्तधर्म असे दोन भाग करण्यात आले आणि त्यानंतर सदाचार हा आणखी एक भाग करण्यात [वेदोक्तः परमोधर्मः स्मृतिशास्त्रगतोऽपरः। शिष्टाचीर्णः परःप्रोक्तस्त्रयोधर्माः सनातनाः ॥ अनुशासन १४१·६५] आला. श्रुती म्हणजे वेद, ब्राह्मण ग्रंथ, उपनिषदे ह्या ग्रंथात ज्यांचे विवेचन केलेले असते असे अग्नीची उपासना, दर्शपूर्णमास, सोमयाग ह्यांच्यासारखे यज्ञ ह्यांचा समावेश श्रौतधर्मात करण्यात आला आणि स्मृतीमध्ये वर्णन केलेले वर्णांचे आणि आश्रमांचे नियम आणि आचार ह्यांचा समावेश स्मार्तधर्मात करण्यात आला. तसेच समाजातील प्रतिष्ठित व्यक्तीच्या आचारावरून ज्यांचे ज्ञान होते अशा नियमांचा शिष्टाचारात समावेश करण्यात आला. काही ग्रंथात ह्या प्रमुख विभागांव्यतिरिक्त वर्णधर्म, आश्रमधर्म, वर्णाश्रमधर्म, गुणधर्म, नैमित्तिक धर्म आणि सामान्य धर्म असे धर्माचे सहा [अत्र च धर्मशब्दः षड्विधस्मार्तधर्मविषयः । तद्यथा-वर्णधर्म आश्रमधर्मो वर्णाश्रमधर्मो गुणधर्मो निमित्तधर्मः साधारणधर्मश्चेति। -याज्ञ १·१ वरील मिताक्षरा.] विभाग केले आहेत. सर्व वर्णांना आवश्यक असे सामान्य धर्म सांगताना आमच्या धर्मशास्त्रकारांनी अहिंसा, सत्य, दया, क्षमा, इत्यादी आत्मिक आणि नैतिक गुणांना सर्वात अधिक महत्त्व दिले आहे. सर्व भूतांमध्ये एकच आत्मा वास करीत असतो असा वेदान्ताचा सिद्धान्त असल्यामुळे दया, अहिंसा इत्यादी उच्च आत्मिक गुणांचा स्वीकार करावयाचा असतो. उच्च नैतिक गुणांचा स्वीकार करण्याचे दुसरे कारण आपल्या धर्मातील पुरुषार्थाची कल्पना हे आहे. पुरुषार्थ म्हणजे मनुष्याच्या जन्माचे अंतिम ध्येय आणि असे पुरुषार्थ धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार असल्याचे फार प्राचीन काळापासून मानण्यात येते. धर्म म्हणजे शुद्ध आचरण, अर्थ म्हणजे द्रव्य मिळविणे, काम म्हणजे शारीरिक, मानसिक इत्यादी सुखांची प्राप्ती आणि मोक्ष

अनुक्रमणिका

म्हणजे जीवाची बंधनातून मुक्ती करून जीव आणि ईश्वर ह्यांचे ऐक्य साधणे. ह्यातील मोक्ष हा सर्वात श्रेष्ठ पुरुषार्थ म्हणजे मानवी आयुष्याचे ध्येय मानले जाते. ते ध्येय फार काळानंतर अनेक जन्मांनी प्राप्त होण्यासारखे असते. त्यामुळे ते फक्त काही थोड्या लोकांनाच मिळण्यासारखे असते. तथापी ते प्राप्त करून घेण्याकरिता सत्य, [अहिंसासत्यमस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः । एतं सामासिकं धर्म चातुर्वर्ण्ये ऽब्रवीन्मनुः ॥ मनु. १०·६३] अहिंसा इत्यादी नैतिक गुण आचरणात आणण्याचा प्रत्येकाने शक्य तितका प्रयत्न करावयाचा असतो. बाकीच्या तीन पुरुषार्थात काम म्हणजे सुखोपभोग हे ध्येय सर्वात कमी प्रतीचे मानण्यात येते. आमच्या धर्मशास्त्रकारांनी काम ह्या पुरुषार्थाचा सर्वस्वी निषेध केलेला नाही. मनुस्मृती (५-५६) असे म्हटले आहे की सर्व प्राण्यांची स्वाभाविक प्रवृत्ती भूक, तहान, विषयभोग ह्यांच्या सारख्या सामान्य आणि क्षुद्र वासनांची तृप्ती करून घेण्याकडे असते. मनुष्य हा इतर प्राण्यांहून अधिक उच्च प्रतीचा असल्यामुळे त्याने अशा वासनांवर विशेष भर न देता त्यांच्यापासून निवृत्त होण्याचा अथवा त्या वासनांचे नियमन करण्याचा प्रयत्न करावा. अर्थ म्हणजे द्रव्यप्राप्ती हे ध्येय कौटिल्यासारख्या अर्थशास्त्रावरील ग्रंथकारानेच श्रेष्ठ मानले आहे परंतु त्यानेही [धर्मार्थाविरोधेन कामं सेवेत । ..... अर्थ एव प्रधान इति कौटिल्यः । -अर्थशास्त्र १·७] धर्माशी आणि अर्थाशी विरोध नसणारा काम मनुष्याने उपभोगावा असे म्हटले आहे.

धर्मशास्त्राचा मुख्य हेतु मनुष्याच्या नित्य व्यवहारातील क्रिया चांगल्या रीतीने कशा कराव्या ह्यासंबंधी निर्बंध सांगण्याचा असल्यामुळे धर्मशास्त्रकारांनी साधारण धर्मापेक्षा वर्णाश्रम धर्माला अधिक प्राधान्य दिले असून त्याचे वर्णन अधिक विस्तारपूर्वक केले आहे. मुख्यत्वेकरून आर्यावर्त, ब्रह्मावर्त, भरतवर्ष, ह्या प्रदेशात राहणाऱ्या आर्य लोकांच्या धर्माचे वर्णन स्मृतिकारांनी केलेले असते.

ऋग्वेदाच्या रचनेच्या काळी आर्य संस्कृतीचे केन्द्र सुप्रसिद्ध सप्तसिंधु नद्या असणाऱ्या वायव्य भारतातील यमुना नदीपर्यंतच्या प्रदेशात होते आणि ह्या प्रदेशाला **आर्यावर्त** अशी संज्ञा होती. क्रमाक्रमाने आर्य लोक मूळच्या प्रदेशातून दक्षिणेकडे आणि पूर्वेकडे पसरत गेले. मनुस्मृतीत ब्रह्मावर्त, ब्रह्मर्षी देश, मध्यदेश, आर्यावर्त आणि म्लेच्छ देश ह्यांच्या व्याख्या पुढीलप्रमाणे दिल्या आहेत :

**ब्रह्मावर्त**– सरस्वती आणि दृशद्वती ह्या नद्यांच्यामधील प्रदेश;

**ब्रह्मर्षिदेश**– कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल आणि शूरसेन हे प्रदेश;

**मध्यदेश**– हिमालय आणि विंध्य पर्वतांच्या मधील आणि विनशनाच्या (म्हणजे जेथे सरस्वती गुप्त होते त्या स्थानाच्या) पूर्वेस आणि प्रयागाच्या पश्चिमेस असणारा प्रदेश;

**आर्यावर्त**– हिमाचल आणि विंध्य पर्वत ह्यांच्यामधील पूर्व आणि पश्चिम महासागरांपर्यंतचा प्रदेश;

**म्लेच्छ देश**– वरील प्रदेशाव्यतिरिक्त असणारा देश.

ब्रह्मावर्त देशातील लोकांचा परंपरागत चालत आलेला आचार तो **सदाचार** असे मानण्यात येत असे. (मनु. २.१७।२४). ब्रह्मर्षि देश ब्रह्मावर्ताहून किंचित् कमी पवित्र मानला जाई. ज्या प्रदेशात काळ्या पाठीची हरणे स्वच्छंदाने विहार करतात तो प्रदेश स्नानसंध्यादी कर्मांना योग्य असल्याचे सांगितले आहे. तीन उच्च वर्णांच्या लोकांनी ब्रह्मावर्त, ब्रह्मर्षिदेश, मध्यदेश आणि आर्यावर्त ह्या पुण्यकारक देशांत राहण्याचा प्रयत्न करावा परंतु शूद्रांनी उपजीविकेची अडचण पडल्यास कोणत्याही देशात राहण्यास प्रत्यवाय नाही. फार प्राचीन काळीं विंध्यपर्वताच्या दक्षिणेकडील प्रदेश आर्यसंस्कृतीच्या बाहेरचा असून त्या प्रदेशात राहणारे लोक शुद्ध आर्यवंशातील नसून मिश्रवंशातील असतात असे मानण्यात येत असे (अपरार्क पा. ५).

अनुक्रमणिका

आरटक, कारस्कर, पुंड्र इत्यादी देशांत जाऊन येणाऱ्याला प्रायश्चित्त करावे लागत असे. पुढे हा नियम यात्रादी हेतूने त्या देशांत जाणाऱ्यांना लावण्यात येत नाहीसा झाला. पुढेपुढे असे मानण्यात येऊ लागले की पृथ्वी ही स्वभावतः अपवित्र नसते, अपवित्र लोकांच्या अथवा गोष्टींच्या संसर्गाने तिला अपवित्रपणा येतो. जर एकाद्या क्षत्रिय राजाने म्लेच्छ देश जिंकून घेऊन तेथे चातुर्वर्ण्य व्यवस्थेची स्थापना केली तर तो म्लेच्छदेश देखील यज्ञ करण्यास योग्य होऊ शकेल. (मेधा– मनु. २.२३).

वैदिक धर्म ज्यात चालतो अशा प्रदेशाला लागणारा **भारतवर्ष** हा शब्द विशेषतः पुराणांत फार योजण्यात येतो. ह्या देशाच्या पूर्व, दक्षिण आणि पश्चिम दिशांना महासागर आणि उत्तरेस हिमाचल पर्वत असल्याचे मार्कण्डेय ५७–५९ प्रभृती निरनिराळ्या पुराणांत [दक्षिणापरतो ह्मंस्य पूर्वेण च महोदधिः । हिमवानुत्तरेणास्य कार्मुकस्य यथा गुणः ॥ तदेतद्भारतं वर्षं । –मार्कण्डेय ५७·५९.] सांगितले आहे. पूर्वमीमांसा ह्या ग्रंथाच्या काळी ह्या सर्व प्रदेशात एकच भाषा आणि एकच संस्कृती प्रचलित होती. हे नाव स्वायंभुव मनूच्या वंशातील भरत ह्याच्यावरून पडल्याचे काही पुराणांत सांगितले आहे. (मार्कण्डेय ५३·४१). दुसऱ्या काही पुराणांत दुष्यंत शकुंतला ह्यांचा पुत्र भरत ह्याच्यावरून हे नाव पडल्याचे वर्णन केले आहे. (वायु. २·३७·१३०).

–––––

अनुक्रमणिका

## प्रकरण २६

## वर्ण

(मू.ग्रं. पा. २. १८-१०४)

सर्व स्मृतिकारांनी आर्यावर्त अथवा भारतवर्ष ह्या देशात राहणाऱ्या लोकांच्या वर्णांचे आणि आश्रमांचे धर्म वर्णन केले आहे. याज्ञ. सारख्या काही थोड्या स्मृतींनी तर धर्मबाह्य लोकांचे आचारही दिले आहेत.

भारतवर्षात प्रचलित असलेल्या जातिसंस्थेची उत्पत्ती कशी झाली आणि त्या संस्थेची विशिष्ट लक्षणे कोणती आहेत ह्याबद्दल अलिकडील काळातील ग्रंथकारांत मतवैचित्र्य अस्तित्वात आहे. रिस्ले, इवेरसन् प्रभृती निरनिराळ्या ग्रंथकारांनी वंश, फिरत्या जमाती, धंदा अशासारख्या कोणत्यातरी एकाद्या गोष्टीवर अथवा मुद्यावर अवास्तव भर दिलेला असतो. सिडनेलोसारख्या काही पाश्चात्य ग्रंथकारांनी जातिसंस्थेची फार प्रशंसा केली आहे आणि येन, शेरिंग् सारख्या काही ग्रंथकारांनी तिच्यावर कडक टीकाही केली आहे. काही ग्रंथकारांनी म्हटले आहे की जातिसंस्था ही आपमतलबी ब्राह्मण लोकांनी शोधून काढलेली योजना आहे.

प्रत्यक मोठ्या संस्थेमध्ये एका टोकाला काही चांगल्या गोष्टी असतात आणि दुसऱ्या टोकाला काही वाईट गोष्टीही असतात. प्रस्तुत ग्रंथात जातिसंस्थेची अतिशय निंदा अथवा अतिशय प्रशंसा करणे ह्या दोन्ही आत्यंतिक गोष्टी टाळण्याचा प्रयत्न करण्यात येईल आणि सर्व वस्तुस्थिती वाचकांपुढे मांडून तिची चिकित्सा करून आपला स्वतःचा निष्कर्ष काढण्याचे काम शक्य तोवर वाचकांवरच सोपविण्यात येईल. भारताच्या इतिहासात एक आणीबाणीची वेळ आली आहे. नव्या मतांशी आणि जागतिक प्रवृत्तींशी संघर्ष होऊन जुनी मते, जुन्या संस्था आणि जुने आचारविचार नष्ट होत आहेत. आपली सर्व जुनी ध्येये आणि जुन्या संस्था निरुपयोगी मानून त्यांचा पूर्ण नाश करणे योग्य आहे अथवा जुन्यांपैकी काही संस्था पाया म्हणून कायम ठेवून त्याच्या आधारावर नवी समाजरचना उभारून नव्या आचारविचारांचा परिपोष करणे योग्य आहे ह्याबद्दल निर्णय ठरविणे अगत्याचे झाले आहे. जातिसंस्था कारस्थानी, लोभी आणि आपमतलबी ब्राह्मणांनी निर्माण केलेली एक कृत्रिम व्यवस्था आहे हे मत प्रस्तुत ग्रंथकाराला मान्य नाही. तसेच जातिसंस्थेची सर्व इमारत थोड्याच अवकाशात संपूर्णपणे नष्ट करता येईल असेही त्याला वाटत नाही. तथापी ह्या प्रश्नावर अधिक काही लिहिणे ही गोष्ट प्रस्तुत ग्रंथाच्या वास्तविक कक्षेबाहेरची आहे.

प्रस्तुत ग्रंथात मुख्यत्वेकरून प्राचीन आणि मध्ययुगीन काळांतील संस्कृत ग्रंथांतील आधारांचा विचार केला आहे.

जन्मावर आणि व्यवसायावर आधारलेली एक प्रकारची जातिसंस्था प्राचीनकाळी इराण, रोम आणि जपान ह्या देशांत पुष्कळ शतके अस्तित्वात होती. परंतु भारतात अस्तित्वात असलेल्या जातिसंस्थेइतके अथवा जवळजवळ तितके कडक निर्बंध आणि गुंतागुंत त्या देशांपैकी कोणत्याही देशातील जातिसंस्थेत उत्पन्न झालेले नव्हते आणि जातींचे पोटभेद वाढत जाण्याऐवजी तेथील जातिसंस्था हळुहळू शिथिल होत जाऊन कालांतराने नष्ट झाल्या.

भारतातील प्रचलित जातिसंस्थेची वैशिष्ट्ये आणि लक्षणे निरनिराळ्या ग्रंथांत पुढीलप्रमाणे दिली आहेत : (१) जन्मसिद्धता, (२) विवाहनिर्बंध, (३) अन्नोदक निर्बंध, (४) व्यवसायनिर्बंध, (५) जातींची उच्चनीचता. प्रत्येक जातीची पंचाईत असणे हेही एक लक्षण काही ग्रंथकारांनी सांगितले आहे. परंतु सध्याच्या काळी ते लक्षण ब्राह्मण आणि क्षत्रियवर्णाच्या बहुतेक जातींत आढळत नाही. सध्या विवाहनिर्बंध आणि जन्मसिद्धता हीच प्रमुख लक्षणे आढळतात.

जातींची लक्षणे सर्व कालांत सारखी नव्हती. जातीसंबंधी सांप्रत प्रचलित असलेल्या सर्वसाधारण कल्पना आणि प्राचीन व मध्ययुगीन काळांतील धर्मशास्त्रावरील ग्रंथांत सांगितलेल्या कल्पना ह्यांत फार भेद आहे. व्यवसायांच्या बाबतीत घाणेरडे आणि अपवित्र मानलेले व्यवसाय सोडून बाकीचा कोणताही व्यवसाय कोणीही मनुष्य जाती भ्रष्ट होण्याची भीती न बाळगता करू शकतो. सध्या देखील ब्राह्मण असणाऱ्या अथवा ब्राह्मण म्हणवून घेणाऱ्या जातीतील इसमाशिवाय दुसऱ्या कोणाला पुरोहित मानण्यात येत नाही. तथापि निरनिराळ्या जातींतील पूर्वी असलेले निर्बंध नवमताच्या लाटेपुढे आणि व्यावहारिक अडचणींमुळे पुष्कळच ढिले पडले आहेत आणि थोडक्याच काळात जातिसंस्था मुख्यतः लग्नाशीच संबंध असणारी एक सामाजिक बाब उरेल आणि तिचा धर्माशी संबंध उरणारही नाही असे दिसते.

ऋग्वेदातील (२·१३·४; १·१७९·६) वर्णनावरून असे दिसते की, त्या काळी आर्य आणि दस्यु अथवा दास हे दोन प्रतिस्पर्धी गट अस्तित्वात होते आणि ते गट त्यांच्या अंगाच्या रंगावरून निर्माण झाले होते. आर्य आणि दस्यु ह्यांच्यात शारीरिक लक्षणांपेक्षा त्यांच्या धर्ममतांत अधिक विरोध असल्याची वर्णने वेदात आली आहेत. दास आणि दस्यू हे मूळचे आर्य वंशातील असून आर्यांच्या धर्मापासून आणि संस्कृतीपासून भ्रष्ट झालेले लोक होते किंवा काय हे सांगता येत नाही. आर्यवंशातील लोकांमध्ये दुफळी होऊन त्यांची परस्परात युद्धे होत असली तरी ते आर्य आणि दास ह्यांना अलग राखीत. आर्य आणि दस्यु अथवा दास ह्यांच्या अंगाच्या रंगांत भेद होता. त्याप्रमाणेच त्यांचे धर्म, भाषा आणि शरीराचा बांधा यांच्यामध्येही भेद होता. ऋग्वेदाच्या काळी वर्ण हा शब्द दास आणि आर्य ह्यांना अनुलक्षून योजलेला आढळतो. ऋग्वेदामध्ये (६·७५·१०, ७·१०३·७, ४·४२·१) ब्राह्मण आणि क्षत्रिय हे शब्द जरी पुष्कळ ठिकाणी आले असले तरी पुरुषसूक्ताहून (ऋ. १०·९०) अन्य कोठेही वैश्य आणि शूद्र हे शब्द आलेले नाहीत. पुरुषसूक्ताची रचना ऋग्वेदातील इतर सूक्तांच्या रचनेनंतर अनेक शतके झालेली असण्याचा संभव आहे आणि पुरुषसूक्ताच्या काळी देखील ब्राह्मणादी चार वर्ण उत्पन्न होऊन त्यांचे परिवर्तन जातीत झाले होते असे सांगता येत नाही.

**ब्राह्मण**:— ऋग्वेदाच्या काळी ब्राह्मणांना फार पूज्य मानले जात असे. ब्राह्मण ब्रह्म (म्हणजे प्रार्थनासूक्ते) म्हणत असत आणि सोमप्राशन करीत असत. ब्राह्मण हा एक स्वतंत्र वर्ण त्यावेळी होता परंतु तो जन्मसिद्ध होता किंवा काय आणि ब्राह्मणांनी इतरांकडील अन्नभक्षण करणे आणि त्यांच्याशी विवाह करणे ह्यांच्या बाबतीत काही निर्बंध होते किंवा काय हे स्पष्ट होत नाही. धर्मसूत्रांच्या काळी देखील अन्नोदक आणि विवाह ह्यांसंबंधी नियम मध्ययुगीन आणि अर्वाचीन काळासारखे कडक नव्हते. मात्र त्याकाळी ब्राह्मण हा फक्त ब्राह्मणकुलात जन्म घेतल्यानेच होतो असा स्पष्ट निर्बंध होता.

**क्षत्रिय** :— ऋग्वेदात क्षत्र हा शब्द अनेक वेळा आला असून राजन्य हा शब्द फक्त पुरुषसूक्तात आला आहे. ऋग्वेदकाळी क्षत्रिय जन्मसिद्ध होते अथवा त्यांचा साधारणपणे एक पृथक्‌वर्ग होता किंवा काय हे स्पष्ट होत नाही. शंतनुराजाची कथा ऋग्वेदात आली आहे आणि त्या कथेत शंतनु आणि देवापि हे दोघे

भ्राते असून शंतनु राजा झाला आणि देवापि त्याचा पुरोहित होता असे वर्णन केले आहे. ह्यावरून राजेपण आणि पुरोहितपण जन्मावर अवलंबून नव्हते असे दिसते.

**वैश्य :**— ऋग्वेदात वैश्य हा वर्णवाचक शब्द फक्त पुरुषसूक्तात आला असून विश शब्द अनेक वेळा आलेला आहे. ऋग्वेदातील बहुतेक सूक्तांत 'विश' शब्दाचा अर्थ वैश्य असणे शक्य नाही. त्या शब्दाचा अर्थ 'सर्व आर्य लोक' असा असावा असे दिसते.

**दास अथवा दस्यू :**— अलिकडील वाङ्मयात दास ह्या शब्दाचा अर्थ अंकित अथवा गुलाम असा असतो. ह्यावरून असे अनुमान होते की आर्यांशी विरोध करणाऱ्या जमाती असणाऱ्या दासांचा हळुहळू पाडाव करण्यात येऊन त्यांना आर्यांची सेवा करणारे बनविण्यात आले. शत्रुत्वाच्या संबंधाच्या जागी मित्रत्वाचे संबंध जोडण्यात येऊन त्यांना समाजात अतिशय कनिष्ट दर्जाचे स्थान देण्यात आले. पुरुषसूक्तामध्ये [पद्भयां शूद्रो अजायत। पुरुषसूक्त ऋ. १०·९०·१२·] शूद्राची उत्पत्ती परमेश्वराच्या पायापासून झाल्याचे सांगितले आहे. धर्मसूत्रांत शूद्रांना कृष्णवर्ण म्हटले आहे. (आप. ध. सू. १·९·२७—११; बौ. ध. सू. २·१·५९). शूद्र हा यज्ञकर्माला योग्य नसतो, तो दुसऱ्यांना वाहून नेण्याचे काम करतो, तो देवताहीन असतो, तो असत्य भाषण करणारा असतो अशा प्रकारची वर्णने निरनिराळ्या ब्राह्मण ग्रंथांत केली आहेत. अशा रीतीने जरी शूद्राला आर्यांचा शत्रू मानण्याचे बंद झाले होते आणि त्याला समाजात स्थान दिले होते तरी त्याला अत्यंत नीच आणि अत्यंत कनिष्ट दर्जाचा मानण्यात येई आणि त्याला घरकाम आणि सेवेचे काम करावे लागे आणि त्याला यज्ञ करू दिला जात नसे.

ऋग्वेदाव्यतिरिक्त इतर संहिता आणि ब्राह्मणग्रंथ ह्यांच्यावरून असे स्पष्ट दिसून येते की ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे तीन वर्ण परस्परांपासून अलग झाले होते आणि त्यांचे अधिकार, कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या त्याकाळी जवळजवळ निश्चित झाल्या होत्या. ब्राह्मणग्रंथांच्या काळी चातुर्वर्ण्यव्यवस्था इतकी दृढमूल झाली होती की तशी व्यवस्था देवांमध्येही अस्तित्वात असल्याचे मानीत. (मैत्रा. सं. १·१०·१३; शत. ब्रा. १४·४· २· २३।२५).

ब्राह्मणादि वर्णांची नैसर्गिक कर्तव्ये आणि वैशिष्ट्ये निरनिराळ्या ग्रंथांत दिली आहेत. लोकांना शिक्षण देणे अथवा पूर्णत्व प्राप्त करून देणे हे ब्राह्मणांचे नैसर्गिक कर्तव्य समजले जात असे. (शत. ब्रा. ११·५·७·१) लोकांचे नियमन करणे हे क्षत्रियाचे नैसर्गिक कर्तव्य असून सर्व लोकांच्या धर्माचा तो एक आधार असल्याचे मानले जाई. (ऐत. ब्रा. ३८ आणि ३९·३). ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्यांच्या सहकार्याने कीर्ती आणि यश प्राप्त होते असे पुष्कळ ठिकाणी वर्णन केले आहे. (शत. ब्रा. ४·१·४·६). कधीकधी क्षत्रिय आपणास ब्राह्मणांपेक्षा वरिष्ठ दर्जाचे मानीत. वैश्यांची उत्पत्ती अन्न ठेवण्याच्या पात्रापासून अथवा प्रजापतीच्या जननेंद्रियापासून झाल्याचे वर्णन केले असून त्यांची संख्या इतरांपेक्षा अधिक असते आणि जरी त्यांचा इतरांकडून उपभोग घेण्यात येत असला तरी त्यांचा क्षय होत नाही असे तै. सं. ७·१·१·५ मध्ये म्हटले आहे. वैश्य गुरे बाळगीत आणि त्यांना कराचा मोठा बोजा सहन करावा लागे.

**इतर उद्योगधंदे आणि जाती.**

विशिष्ट नावे असलेले इतर उद्योग आणि धंदे संहिताग्रंथांच्या रचनाकाळी अस्तित्वात होते आणि अशा उद्योगांपासून आणि धंद्यांपासून पुढे भिन्न भिन्न जाती बनल्या. ह्या सर्व व्यवसायांच्या सध्याच्या काळासारख्या जाती संहितांच्या काळी बनल्या होत्या किंवा काय हे निश्चयपूर्वक सांगता येत नाही. वैदिक

वाङ्मयात आलेल्या नावांपैकी पुष्कळशी नावे जातींची नाहीत. उदाहरणार्थ, तस्कर (चोर), क्लीब (नपूंसक). तथापि वैदिक वाङमयात उल्लेख केलेल्या व्यवसायांपैकी बहुतेक व्यवसाय आणि धंदे करणाऱ्या जाती आणि पोटजाती शेकडो वर्षे अस्तित्वात आहेत. ह्यावरून असे म्हणता येईल की संहिता आणि ब्राह्मण ग्रंथांच्या काळी निरनिराळे धंदे करणारे वर्ग अस्तित्वात होते आणि त्यांच्या जाती बनल्या होत्या अथवा बनण्याच्या मार्गावर होत्या. ऐत. ब्रा. (३३.६) मध्ये विश्वामित्राची कथा आली आहे आणि त्या कथेत असे वर्णन केले आहे की [ताननुव्याजहारान्तान्वः प्रजा भक्षीष्टेति । त एतेन्ध्राः पुण्ड्राः शबराः पुलिन्दामूतिवा इत्युदन्त्या बहवो वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः । ऐ. ब्रा. ३३·६] विश्वामित्राच्या ५० ज्येष्ठ पुत्रांनी जेव्हा शुनःशेपाला विश्वामित्राचा पुत्र मानण्याचे नाकबूल केले तेव्हा विश्वामित्राने त्यांना असा शाप दिला की तुमचा अत्यंत नीच जातीशी संबंध येईल आणि त्याप्रमाणे ते पन्नास पुत्र समाजातील अत्यंत खालच्या दर्जाचे आणि मुख्यत्वेकरून अंध्र, पुंड्र, शबर इत्यादी दस्यु असणाऱ्या जातींचे झाले. बहुधा ह्याच कथेच्या आधारावर मनूने (१०·४३ व ४५) म्हटले आहे की पौंड्रक, ओड्र, द्रवीड, कांबोज इत्यादी जातीचे लोक मूळचे क्षत्रिय असून पुढे उपनयनादी संस्कारांचा लोप झाल्यामुळे आणि ब्राह्मणांशी सहवास सुटल्यामुळे ते शूद्रत्वालां [.... क्षत्रियजातयः । वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥ मनु १०·४३] पोचले.

धर्मसूत्रांत आणि स्मृतिग्रंथांत चारी वर्णांचे आणि त्यांच्या अधिकारांचे आणि कर्तव्यांचे वर्णन केलेले असले तरी तशी प्रत्यक्ष व्यवस्था त्या ग्रंथांच्या काळी अस्तित्वात नसून तो एक समाजापुढे ठेवलेला आदर्श असे. तशी समाजव्यवस्था पुरुषसूक्त आणि शतपथ ब्राह्मण ह्यांच्या रचनाकाळी अस्तित्वात असावी आणि त्या ग्रंथात वर्णन केल्याप्रमाणे त्या काळच्या समाजाचे चार भाग बऱ्याच मोठ्या अंशी झाले असावेत असे निरनिराळ्या प्रमाणांवरून मान्य करावे लागते.

**वरील विवेचनावरून असे निष्कर्ष निघतात की** –

(१) आज ज्या काळासंबंधी वाङ्मय उपलब्ध आहे अशा अत्यंत प्राचीन काळी समाजाचे आर्य आणि त्यांचे प्रतिस्पर्धी दस्यू अथवा दास असे दोन विभाग होते. त्या दोघांचे रंग आणि संस्कृती भिन्न होत्या आणि त्यामुळेच बहुधा त्यांच्यामध्ये विरोध उत्पन्न झाला असावा. वेदांच्या संहितांच्या काळापूर्वी शेकडो वर्षे दस्यूंचा पराभव झाला होता आणि त्यांना समाजात आर्यांचे दास असे मानीत असत. अशा प्रकारे पराभूत होऊन दास केले गेलेले दस्यू हेच शूद्र होत. प्रथमतः आर्य लोक दस्यूंपासून दूर राहत आणि आपणास त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ मानीत. पुढेपुढे ही एकापेक्षा दुसऱ्याला श्रेष्ठ मानण्याची आणि त्याच्यापासून दूरदूर राहण्याची प्रवृत्ती आर्याआर्यांमध्येही सुरू झाली.

(२) ब्राह्मण ग्रंथांच्या रचनाकाळाच्या सुमारास ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य हे जन्माच्या आधारावर एकमेकांपासून अलग असणारे विभाग पडले होते आणि त्यांच्यात क्षत्रियांपेक्षा ब्राह्मण जन्मतः श्रेष्ठ असल्याचे मानीत. विद्याध्ययन करणाऱ्या आणि पुरोहितपणा करणाऱ्या लोकांना ब्राह्मण समजत. राजे, सेनानायक आणि काही सैनिक ह्यांना क्षत्रिय समजत आणि शिल्पकार आणि इतर सामान्य लोकांना वैश्य मानीत.

(३) संस्कृतीच्या विकासामुळे श्रमविभागणीचे तत्त्व अंमलात आले आणि त्यायोगाने निरनिराळ्या पुष्कळ कलांची आणि उद्योगधंद्यांची वाढ झाली आणि निरनिराळे उद्योगधंदे करणाऱ्या लोकांच्या त्यांच्या व्यवसायांवरून अनेक पोटजाती वाढू लागल्या. अशा रीतीने असंख्य जाती आणि पोटजातींचे जाळे बनले.

मुख्य चार वर्णांखेरीज रथकारांसारख्या (मिश्र) पोटजाती निर्माण झाल्या. काही अनार्य वंशाचे लोक मूळचे क्षत्रिय असून पुढे आचारभ्रष्ट झाले असल्याचे मानण्यात येऊ लागले.

वैदिक काळाची समाप्ती ख्रि. पू. १००० वर्षांपेक्षा अर्वाचीन नसल्याचे मानण्यात येते. त्याच्यापूर्वी वैदिक काळ किती वर्षांचा होऊन गेला हे सांगणे अशक्य आहे. निरनिराळ्या वेदसंहिता, ब्राह्मणग्रंथ, छांदोग्य आणि बृहदारण्यक ह्यांच्यासारखी प्राचीन उपनिषदे ह्या ग्रंथांत निरनिराळे उद्योगधंदे करणाऱ्यांची ६० हून अधिक नावे आढळतात. वैदिक काळाच्या समाप्तीपूर्वी बहुधा त्या नावांच्या निरनिराळ्या जाती बनल्या होत्या, अथवा बनत चालल्या होत्या. त्या नावांपैकी काही नावे जातींची अथवा व्यवसायांची नसण्याचाही संभव आहे. ख्रिस्ती शकाच्या पूर्वी शेकडो वर्षे भारतात अनेक जाती अस्तित्वात होत्या ही गोष्ट बुद्धधर्माच्या प्राचीन ग्रंथांवरून तसेच मेग्यास्थेनिसने लिहिलेल्या भारतवर्णनापैकी आज उपलब्ध असलेल्या ग्रंथांवरूनही सिद्ध होते.

श्रुतीत सांगितलेल्या चार वर्णांपासून निरनिराळ्या जातींची आणि पोटजातींची उत्पत्ती झाली असे सिद्ध करण्याचा प्राचीन धर्मशास्त्रकारांनी फार मोठा प्रयत्न केला होता. त्या त्या ग्रंथकारांच्या काळी अस्तित्वात असलेल्या निरनिराळ्या जाती भिन्न वर्णाच्या स्त्रीपुरुषांचा संबंध होऊन त्या संकरापासून झाल्या असेच सर्व धर्मशास्त्रकारांचे मत आहे. ह्याविषयी निरनिराळ्या स्मृतीत पुष्कळ मतभेद आहेत परंतु ते सर्व तपशीलाच्या बाबतीत आहेत. वरील उपपत्तीला पुरातन वैदिक वचनांचाही आधार आहे.

ह्या बाबतीत स्मृतिकारांनी काही मूलभूत सिद्धांत सांगितले आहे :—

(१) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चार वर्णांचा समाजातील दर्जा एकमेकांहून क्रमाक्रमाने कमी कमी असतो.

(२) एकाद्या वरच्या दर्जाच्या वर्णातील पुरुषाचा विवाह त्याच्यापेक्षा कमी दर्जाच्या वर्णातील स्त्रीबरोबर होण्याला शास्त्राची संमती असे अथवा तसे विवाह पूर्वीच्या काळी शास्त्रसंमत मानले जात. एकाद्या वरच्या दर्जाच्या वर्णातील स्त्रीचा विवाह तिच्याहून खालच्या दर्जाच्या वर्णाच्या पुरुषाबरोबर होणे निंद्य मानले जात असून तसा विवाह शास्त्रसंमत नसे.

(३) कोणत्याही मनुष्याचा वर्ण अथवा जात तो ज्या वर्णात अथवा जातीत जन्माला येतो त्यावरून ठरत असतो. म्हणजे त्या मनुष्याचे मातापिता समान वर्णाचे अथवा जातीचे असून त्यांचा विवाह शास्त्रसंमत पद्धतीने झालेला असेल तरच तो मनुष्य त्याच्या मातापित्यांच्या वर्णाचा अथवा जातीचा होऊ शकतो.

एकदा वरच्या दर्जाच्या वर्णाचा पुरुष त्याच्यापेक्षा कनिष्ठ दर्जाच्या वर्णाच्या स्त्रीबरोबर विवाह करील तर त्या विवाहाला **अनुलोम** (शब्दशः अर्थ केसांच्या स्वाभाविक गतीप्रमाणे म्हणजे निसर्गाप्रमाणे झालेला) विवाह म्हणतात आणि त्या दंपत्यापासून झालेल्या संततीला अनुलोम संतती म्हणतात. ह्याच्या उलट एकाद्या वरच्या दर्जाच्या वर्णाच्या स्त्रीचा संबंध तिच्यापेक्षा कनिष्ठ दर्जाच्या वर्णाच्या पुरुषाबरोबर घडला तर त्या संबंधाला **प्रतिलोम** (निसर्गाविरुद्ध) संबंध म्हणतात आणि त्यांच्या संततीला प्रतिलोम संतती म्हणतात.

गौतम, मनुप्रभृती प्राचीन ग्रंथकारांनी असा निर्बंध सांगितला आहे की पुरुषाने शक्यतोवर स्ववर्णाच्या कन्येबरोबर विवाह करावा. (गौतम ४·१; मनु ३·१२।१३; याज्ञ. १·५५ आणि ५७). तथापि

स्ववर्णाहून कनिष्ट दर्जाच्या वर्णाच्या कन्येबरोबर विवाह करण्यास त्यांनी अनुमती दिली आहे. याज्ञ. ने मूर्धावसिक्त, अंबष्ट, निषादप्रभृती सहा अनुलोम जातींचा उल्लेख केला आहे. उच्च वर्णाच्या स्त्रीचा तिच्यापेक्षा कमी दर्जाच्या वर्णाच्या पुरुषाबरोबर शास्त्रोक्त विवाह होऊ शकत नाही म्हणून सर्व प्रतिलोम संतती विधियुक्त विवाहापासून झालेली असू शकत नाही असे काही ग्रंथकारांनी म्हटले आहे. भिन्न वर्णाच्या मातापित्यांपासून झालेल्या संततीची जात त्या स्त्रीपुरुषांचा विवाह झाला असेलतर एक प्रकारची असते आणि त्या स्त्रीपुरुषांच्या अशास्त्रोक्त आणि चोरट्या व्यवहारापासून ती संतती झालेली असेल तर निराळ्या प्रकारची असते. उदाहरणार्थ, ब्राह्मणवर्गाचा पुरुष आणि क्षत्रिय वर्णाची स्त्री ह्यांचा विवाह झाला असेल तर त्यांच्या संततीला सूत म्हणतात; परंतु त्याच स्त्रीपुरुषांच्या विवाहबाह्य व्यभिचारी संबंधापासून झालेल्या संततीला रथकार म्हणतात. प्रतिलोम जाती ह्या शूद्रासमान असतात असे मनूने म्हटले आहे. परंतु मूर्धावसिक्त प्रभृती सहा अनुलोम जातींना द्विजातीयांप्रमाणेच उपनयनादी संस्कार करण्याचा अधिकार असतो. सवर्ण, अनुलोम, प्रतिलोम ह्यांच्याहून वेगळ्या असणाऱ्या कुंड, गोलक, कानीन आणि सहोढ ह्यांच्यासारख्या विवाहबाह्य संततीच्या जाती असतात आणि त्यांना शूद्र मानावे असे मिताक्षरेने (याज्ञ. १·९०) प्रतिपादन केले आहे. क्षेत्रज पुत्र ह्या वरील संततीहून वेगळा असतो आणि तो आपल्या मातेच्या जातीचा होतो. तसेच कानीन, गूढज आणि सहोढ संततीदेखील त्यांचा जनक समजणे शक्य होणार नाही म्हणून मातेच्या जातीची समजावी असे निरनिराळ्या ग्रंथकारांनी सांगितले आहे. (विश्वरूप—याज्ञ. २·१३३ आणि १३५)

वरील विवेचनावरून दिसून येईल की वर्णव्यवस्थेचा उगम वंश, संस्कृती, स्वभाव आणि व्यवसाय ह्यांच्या आधारावर झाला असून त्या व्यवस्थेत मुख्यत्वे मनुष्याच्या नैतिक आणि बौद्धिक योग्यतेचा विचार करण्यात येतो. स्मृतिग्रंथांत दिलेल्या आदर्श स्वरूपाच्या वर्णव्यवस्थेत देखील मनुष्याने करावयाच्या कर्तव्याला आणि समाजाकरिता करावयाच्या प्रयत्नांना अधिक महत्त्व दिले आहे आणि मनुष्याला जन्मतः मिळणाऱ्या हक्कांना आणि सुखसोयींना तसे महत्त्व दिलेले नाही. ह्याच्या उलट जातिव्यवस्थतेत सर्व जोर जन्मावर आणि वंशावर असतो आणि त्यामुळे जन्माच्या आणि वंशाच्या आधारावर मिळणाऱ्या हक्कांना त्यांच्या अनुषंगाने येणारी कर्तव्ये न करता चिकटून राहण्याची प्रवृत्ती उत्पन्न होते.

समाजातील आधुनिक प्रकारची एक जात ह्या अर्थाने जाती हा शब्द वैदिक वाङ्मयात क्वचितच आढळतो. निरुक्तामध्ये (१२·१३) 'कृष्णजातीया' हे शब्द शूद्रजातीची ह्या अर्थाने योजले आहेत. [रामा रमणायोपेयते न धर्माय कृष्णजातीया । निरुक्त १२·१३·] ह्यावरून निदान निरुक्ताइतक्या प्राचीन काळापासून जाती हा शब्द आधुनिक प्रकारची जात ह्या अर्थाने वापरीत असल्याचे दिसून येते. त्यानंतरच्या सूत्रग्रंथांत आणि स्मृतींमध्ये जाती हा शब्द पुष्कळ वेळा आला असून कोठे कोठे वर्ण आणि जाती ह्यांमध्ये भेद दर्शित केला असून पुष्कळ वेळा त्यांचा परस्परांच्या अर्थाने उपयोग केला आहे.

ज्या ऋषींनी आणि स्मृतिकारांनी अनुलोम विवाहाला संमती दिली आहे त्यांच्यामध्येही अशा दांपत्यांपासून झालेल्या संततीच्या दर्जासंबंधी एकवाक्यता नाही.

ह्या बाबतीत तीन निरनिराळी मते अस्तित्वात आहेत. एकप्रकारचे मत असे आहे, की एका वर्णाच्या पुरुषाने स्वतःहून एक पायरी खालच्या दर्जाच्या वर्णाच्या स्त्रीबरोबर (उदाहरणार्थ ब्राह्मण पुरुषाने क्षत्रिय स्त्रीबरोबर अथवा क्षत्रिय पुरुषाने वैश्य स्त्रीबरोबर) विवाह केला असल्यास त्या दंपत्याची संतती पित्याच्या जातीची होते. दुसऱ्या प्रकारचे मत असे आहे की अनुलोम संबंधाच्या संततीचा दर्जा पित्याच्या दर्जापेक्षा

अनुक्रमणिका

कमी परंतु मातेच्या दर्जापेक्षा वरचा असतो. तिसरे मत असे आहे की अनुलोम विवाहापासून झालेल्या संततीचे अधिकार आणि हक्क मातेच्या वर्णाच्या अधिकारासारखे आणि हक्कांसारखे असतात आणि सर्वसाधारण लोकमतही असेच आहे.

प्राचीन धर्मसूत्रकारांनी फक्त काही थोड्याच मिश्र जातींचा उल्लेख केला आहे. मनु आणि विष्णु ध. सू. ह्या ग्रंथांतच मिश्र जातींच्या व्यवसायाबद्दल पहिल्या प्रथम चर्चा केली आहे. सर्व स्मृतिकारांनी सांगितलेल्या जातींची बेरीज १०० हून क्वचितच अधिक होईल. काही स्मृतींत निरनिराळ्या जातींचे भिन्न भिन्न व्यवसायही वर्णन केले आहेत. मूळ अनुलोम जाती फक्त सहाच आहेत. त्याप्रमाणेच मूळ प्रतिलोम जातीही फक्त सहाच आहेत. बाकीच्या पोटजाती : (१) अनुलोम आणि प्रतिलोम जातींचा मूळच्या चार वर्णांशी संबंध होऊन, (२) एका अनुलोम जातीचा पुरुष आणि दुसऱ्या अनुलोम जातीची स्त्री ह्यांचा संबंध होऊन, (३) प्रतिलोम जातींचे परस्परांशी संबंध होऊन आणि (४) अनुलोम आणि प्रतिलोम जातींच्या स्त्रीपुरुषांचे परस्परांशी संबंध होऊन उत्पन्न झालेल्या आहेत. ह्या चार प्रकारांनी एकूण ६० जाती होतात आणि त्या ६० जातींचे परस्परांशी संबंध होऊन असंख्य पोटजाती उत्पन्न झाल्या असे विष्णु ध. सू. (१६·७) मध्ये म्हटले आहे. ह्यावरून असे दिसून येते की विष्णु ध. सू. [संकरसंकराश्चासंख्येयाः । विष्णु ध. सू. १६·७] च्या रचनाकाळाच्या पूर्वी (म्हणजे निदान २००० वर्षांच्यापूर्वी) असंख्य जाती आणि पोटजाती उत्पन्न झाल्या होत्या आणि मूलभूत चार वर्णांपासून ह्या इतक्या जातींची आणि पोटजातींची उत्पत्ती कशी झाली ह्याची उपपत्ती लावणे धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांना अशक्य झाल्यामुळे त्यांनी ते काम सोडून दिले होते. त्यानंतरच्या काळातही ह्या स्थितीत फरक झाला नाही आणि निबंधग्रंथांच्या रचनाकाळी तर ती स्थिती पूर्वीच्याहून जास्त बिकट झाली. धर्मशास्त्रावरील मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांत पोटजातींचे सविस्तर वर्णन बहुधा टाळलेले असते आणि फक्त मूलभूत चार वर्णांच्या कर्तव्यांच्या चर्चेलाच महत्त्व दिलेले असते. निरनिराळ्या गटांची उपपत्ती लावणे कठीण होऊ लागल्यामुळे मनुप्रभृतींनी असे प्रतिपादन केले आहे की मनुष्यांच्या पोटजाती त्यांच्या आचारांवरून आणि व्यवसायांवरून समजतात.

ह्यावरून असे दिसते की स्मृतींच्या काळी जाती ह्या मुख्यत्वेकरून व्यवसायांवरून बनल्या असल्याचे बहुतेक ग्रंथकारांचे मत होते.

**संकर अथवा वर्णसंकर**

जातींच्या आणि पोटजातींच्या विवेचनात 'वर्णसंकर' (अथवा नुसता संकर) हा शब्दाचा पुष्कळवेळा उल्लेख येतो. मनूने वर्णसंकर हा शब्द मिश्र जाती ह्या अर्थाने आणि संकर हा शब्द एकापेक्षा अधिक वर्णांचे मिश्रण अथवा परस्पर शरीरसंबंध ह्या अर्थाने योजला असावा असे दिसते. भगवद्गीतेत (१·४१।४३) म्हटले आहे की स्त्रिया दूषित (नीतिभ्रष्ट) झाल्यामुळे वर्णसंकर होऊ लागतो आणि अशा संकराच्या योगाने ते कुल आणि त्या कुलाचा नाश करणारा हे दोन्ही निश्चयाने नरकाला जातात. अशा धर्मविरुद्ध आचरणाने पूर्वापार चालत आलेल्या जातींच्या आणि कुलांच्या धर्मांचा उच्छेद होतो. वर्णसंकर घडू नये ह्याविषयी स्मृतींचा फार कटाक्ष असल्यामुळे त्यांनी असा एक नियम घालून दिला आहे की वर्णविहित धर्माचे उल्लंघन करणाऱ्या स्त्री-पुरुषांचे नियंत्रण करणे हे राजाच्या [तस्माद्राज्ञा विशेषेणं स्त्रियो रक्ष्यास्तु संकरात । नारदस्त्रीपुंस ११३.] कर्तव्यांमधील एक प्रमुख कर्तव्य आहे. वेदान्तसूत्रावरील भाष्यात श्रीशंकराचार्यांनी वर्णाश्रमव्यवस्था विस्कळित झाली असल्याचा उल्लेख केला आहे. तथापि ज्या अर्थी शास्त्रांनी वर्ण आणि आश्रमांची व्यवस्था ठरविली आहे त्याअर्थी अन्य युगात अशी स्थिती नसावी असे त्यांनी अनुमान केले आहे.

**जात्युत्कर्ष आणि जात्यपकर्ष**– प्राचीन स्मृतिग्रंथांत जात्युत्कर्ष आणि जात्यपकर्ष ह्यासंबंधी काही नियम दिले आहेत. (गौ. ४·१८।१९; मनु. १०·६४।६५; याज्ञ. १·९६); ह्याविषयची कल्पना पुढीलप्रमाणे आहे : अनुलोममिक्ष विवाहापासून झालेल्या संततीचा दर्जा काही परिस्थितीत अधिक वरचा होतो, ह्याला जात्युत्कर्ष म्हणतात. आणि काही परिस्थितीत संततीचा दर्जा खालचा होतो, ह्याला जात्यपकर्ष म्हणतात, उदाहरणार्थ, जेव्हा एकादा ब्राह्मणपुरुष क्षत्रिय स्त्रीबरोबर विवाह करतो तेव्हा त्या दंपत्याच्या संततीला 'सवर्ण' म्हणतात. अशा सवर्ण कन्येचा विवाह ब्राह्मण वराबरोबर झाला आणि अशी व्यवस्था ७ पिढ्यांपर्यंत चालली तर सातव्या पिढीतील कन्येला ब्राह्मण वरापासून झालेली कन्या ब्राह्मणवर्णाची होते. हा जातीचा उत्कर्ष झाला. ह्याच्याउलट एकाद्या ब्राह्मणाने क्षत्रिय स्त्रीबरोबर विवाह केला आणि त्या दंपत्याला झालेल्या पुत्राने क्षत्रिय स्त्रीबरोबर विवाह केला, त्या दंपत्याला झालेल्या पुत्राने क्षत्रिय स्त्रीबरोबर विवाह केला आणि अशी परंपरा सतत ५ पिढ्यांपर्यंत चालली तर पांचव्या पिढीतील पुरुषाला क्षत्रिय स्त्रीपासून झालेला पुत्र क्षत्रियवर्णाचा होतो. हा जातीचा अपकर्ष म्हणजे कमीपणा झाला. हाच नियम क्षत्रिय पुरुषाच्या वैश्य स्त्रीबरोबर झालेल्या विवाहाला आणि वैश्य पुरुषाच्या शूद्र स्त्रीबरोबर झालेल्या विवाहाला लागतो. तसेच तो नियम निरनिराळ्या अनुलोम जातीमधील विवाहांना लागतो. ह्याबाबतीत पिढ्यांच्या संख्येच्या बाबतीत मतवैचित्र्य आहे.

याज्ञ. ने जात्युत्कर्ष आणि जात्यपकर्ष ह्यांचा दुसरा एक प्रकार सांगितला आहे. तो प्रकार म्हणजे जर एकाद्या वर्णाच्या पुरुषाने त्याच्या वर्णाहून वरिष्ठ अथवा कनिष्ठ वर्णाचा व्यवसाय स्वीकारला आणि अशी परंपरा ७ अथवा ५ पिढ्या सतत चालली तर ७ व्या किंवा ५ व्या पिढीत त्यांच्या संततीचा त्या व्यवसायाला अनुरूप असा वर्ण बनतो.

ह्या जात्युत्कर्षाच्या आणि जात्यपकर्षाच्या बाबतीत मूळ स्मृतिकार आणि त्या स्मृतींवरील टीकाकार ह्यांच्यात एकवाक्यता दिसून येत नाही. ह्यावरून असे दर्शित होते की स्मृतींत वर्णन केलेल्या प्रकारच्या योजनांत प्रारंभी जरी कदाचित वस्तुस्थितीचा थोडासा अंश असला तरी त्या योजना कल्पित आणि ध्येय स्वरूपाच्या असाव्या. आंतरजातीय विवाहाची साधार उदाहरणे शिलालेखात मिळतात परंतु मनु प्रभृतींनी सांगितलेल्या प्रकारची जात्युत्कर्षाची उदाहरणे धर्मशास्त्रावरील ग्रंथांत अथवा शिलालेखांत क्वचितच आढळतात.

धंदे करणाऱ्या जाती आर्थिकदृष्ट्या संपन्न आणि सुसंघटित असत असे धर्मशास्त्रावरील ग्रंथांवरून आणि शिलालेखांवरून दिसून येते. त्यांचा अंतर्गत कारभार, सचोटी आणि आर्थिक स्थैर्य इतकी चोख असत की निरंतर चालावयाच्या धर्मादायाच्या कार्याकरिता हजारांनी मोजता येण्यासारख्या रकमा लोक अशा संघटनांजवळ ठेव म्हणून ठेवीत असत असे ख्रि. शकाच्या आरंभाच्या काळातील शिलालेखांवरून दिसून येते. (एपि. इं. खं. २ पा. १२४; एपि. इं. खं. ८ पा. ८८ इ०). अशा संघटनांना श्रेणी, पूग, व्रात, संघ अशी निरनिराळी नावे असत; त्यांचे निरनिराळे नियम असत आणि त्या नियमांचे त्या त्या संघटनांच्या सदस्यांकडून उल्लंघन होऊ नये आणि त्या सदस्यांनी आपआपले परंपरागत चालत आलेले व्यवसायच करावेत अशी व्यवस्था करणे हे राजाचे [पाषण्डनैगमश्रेणीपूगव्रातगणादिषु । संरक्षेत्समयं राजा दुर्गे जनपदे तथा ॥ – नारद (समयस्थानपाकर्म २).] कर्तव्य असल्याचे स्मृतींनी सांगितले आहे. (नारद–समयस्थानपाकर्म २ इ०) ख्रिस्ती शकाच्या १० व्या शतकापूर्वी रचलेल्या स्मृतिग्रंथांत आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथांत ज्यांची नावे दिली आहेत. अथवा ज्यांचा उल्लेख केला आहे अशा जातींची संख्या १२५।१५० हून अधिक नाही. त्यांच्यापैकी काही जातींची नावे अद्यापीही त्याच स्वरूपात अथवा किंचित् भेदाने अस्तित्वात आहेत. उदाहरणार्थ, कायस्थ,

अनुक्रमणिका

कुंभकार, चर्मकार इत्यादि काही जातींच्या नावांचा देशाशी संबंध आहे. उदाहरणार्थ अंबापासून अंबष्ठ, मगधापासून मागध, विदेहापासून वैदेहक. दुसऱ्या काही जाती वंशद्योतक आहेत. उदाहरणार्थ, आभीर, किरात, शक. पुष्कळशा जातींची नावे व्यवसायावरून उद्‌भवलेली आहेत, जसे अयस्कर (लोहाचे काम करणारा), तक्षन् (तासणारा, सुतार), तैलिन् (तेल काढणारा), नट इ०.

आधुनिक काळी प्रत्येक मूळच्या वर्णाच्या देशभेदामुळे, व्यवसायभेदामुळे आणि दुसऱ्या काही कारणांनी पुष्कळ पोटजाती झाल्या आहेत. उदाहरणार्थ, ब्राह्मणांचे प्रथमतः पाचगौड आणि पाच द्राविड असे दहा भेद झाले. त्यांतील द्राविड ब्राह्मणांपैकी महाराष्ट्र ब्राह्मणांच्या चित्पावन (कोकणस्थ), कऱ्हाडे, देशस्थ, देवरुखे वगैरे पुष्कळ पोटजाती झाल्या. असे सांगतात की गुजराथ प्रांतात ब्राह्मणांच्या ८४ पोटजाती असून त्यांपैकी बहुतेक पोटजाती एकमेकांशी रोटीबेटी व्यवहार करीत नाहीत. पुष्कळवेळी प्रत्येक पोटजातीत पुरोहितपणा (भिक्षुकी) करणारे आणि तसे न करणारे असे आणखी भेद असतात. वैदिक काळात उत्पन्न झालेल्या तुटकपणे राहण्याच्या भावनेपासून भौगोलिक आणि इतर कारणांनी आणखी आणखी भेद आणि पोटभेद उत्पन्न झाले. प्राचीन काळी देखील उत्तरेकडील प्रान्तातील ब्राह्मण मागधासारख्या पूर्वेकडील प्रांतातील ब्राह्मणांना कमी प्रतीचे मानीत.

क्षत्रियांमध्ये आपणास सूर्यवंशी, चंद्रवंशी, अग्निवंशी म्हणविणाऱ्यांच्या सारखे पुष्कळ पोटभेद आहेत. टॉड आणि शेरिंग ह्यांच्या राजस्थानासंबंधीच्या ग्रंथांत परमारांच्या ३५, गुहलोटांच्या २४, छमनांच्या २६, सोळंकींच्या १६ अशा अनेक शाखा असल्याचे वर्णन केले आहे.

विल्सनने 'हिंदुस्थानातील जाती' ह्या ग्रंथात (खंड १ पा. ६५।७०) फक्त १३४ जातींची संस्कृत आणि आधुनिक मराठी नावे दिली आहेत. इतर ग्रंथांच्या तुलनेने अलिकडील काळातील ग्रंथांत दिलेल्या पोटजातींची संख्या २०० हूनही अधिक भरत नाही.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण २७

## वर्णांचे धर्म, निर्बंध आणि अधिकार

(मू. ग्रं. पा. २.१०५—१६४)

निरनिराळ्या वर्णांचे धर्म (कर्तव्ये) आणि त्यांचे अधिकार ह्यांना धर्मशास्त्रावरील सर्व ग्रंथांत फार महत्त्वाचे स्थान दिलेले असते. (वेदांचे) अध्ययन, यज्ञ करणे आणि दान देणे हे सर्व द्विजातीयांचे म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांचे धर्म म्हटले असून त्या गोष्टी न केल्यास अथवा त्यांच्याकडे दुर्लक्ष्य केल्यास पाप लागते. वेद शिकविणे, यज्ञात पुरोहितपणा करणे, आणि दान स्वीकारणे ह्यांना ब्राह्मणांच्या वृत्ती अथवा अधिकार म्हणतात; शस्त्र धारण करणे आणि लोकांचे संरक्षण करणे ह्या क्षत्रियांच्या वृत्ती अथवा अधिकार असतात; शेतकी करणे, पशुसंगोपन आणि व्यापार, सावकारी करणे ह्या वैश्यांच्या वृत्ती अथवा अधिकार असतात आणि ह्या गोष्टींवरच मुख्यत्वेकरून त्यांचा चरितार्थ चालतो. परंतु त्या सर्व गोष्टी अथवा त्यांच्या पैकी एक गोष्ट त्या त्या वर्णांनी चरितार्थाकरिता केलीच पाहिजे असा निर्बंध त्या त्या वर्णांच्या लोकांवर नसतो. प्रत्येक वर्णाच्या बाबतीत त्या वर्णाच्या लोकांनी काही विशिष्ट गोष्टी अथवा व्यवसाय करू नये असे निर्बंध त्यांच्यावर असतात.

ह्या प्रत्येकाविषयी थोडेसे विवेचन ह्या प्रकरणात करावयाचे आहे.

**अध्ययन** :— सर्वात जुन्या असणाऱ्या वेदांच्या रचनाकाळीदेखील ब्राह्मण आणि विद्या ह्यांच्यात अविभाज्य संबंध होता. जनकासारख्या काही क्षत्रिय राजांनी तत्त्वज्ञान आणि ब्रह्मविद्येचा अभ्यास यांत प्रावीण्य मिळविले होते आणि याज्ञवल्क्यासारखे काही विद्वान ब्राह्मण देखील अशा राजांकडे शिष्य म्हणून गेले होते असे श. ब्रा. (११·६·२१·६) वरून दिसून येत असले तरी तेवढ्यावरून क्षत्रिय अथवा राजे हेच ब्रह्मविद्येचे आद्य पुरस्कर्ते होते असे म्हणता येणार नाही. सर्व वर्णाचे लोक वेदाध्ययन करीत असत, परंतु मनूने (४·१४७) म्हटले आहे की ब्राह्मणाने निरंतर आणि लक्षपूर्वक वेदांचेच अध्ययन करावे. वेदांचे अध्ययन हाच त्यांचा सर्वात मोठा आधार असून बाकी सर्व गौण असतात. याज्ञ. (१·१९८) मध्ये म्हटले आहे की वेदांच्या संरक्षणासाठी, देव आणि पितर ह्यांच्या संतोषासाठी आणि धर्माच्या संरक्षणासाठी परमेश्वराने ब्राह्मण निर्माण केले.

**अध्यापन :**— धर्मशास्त्रावरील ग्रंथांच्या रचनाकाळी वेदांचे अध्यापन (शिकविणे) सर्वत्र ब्राह्मणांच्या हाती होते. काही क्षत्रिय आचार्य अथवा तत्त्ववेत्ते ह्याचे उल्लेख ब्राह्मण ग्रंथांत आले असले तरी त्यांना सामान्यत्वेकरून गौण दर्जाचे धरले आहेत. आपस्तंबाने (आ. ध .सू. २·२·४ २५।२८) म्हटले आहे की ब्राह्मण अध्यापक मिळत नसले तर ब्राह्मणाने क्षत्रियापासून अथवा वैश्यापासून विद्या शिकावी. नैष्ठिक ब्रह्मचारी ह्याने ब्राह्मणेतर आचार्याकडे विद्यार्थी म्हणून राहू नये (मनु २·२४२); परंतु ब्राह्मणाने एकादी उपयुक्त अथवा गुणकारी कला शूद्रापासूनही शिकण्यास हरकत नाही (मनु २·२३८). गुरूने शिष्यापासून शिकविण्याचा मोबदला घ्यावयाच्या द्रव्याबद्दल पूर्वी करार न करता शिकवावे असे शास्त्रात आग्रहपूर्वक सांगितले आहे. ह्यावरून वेद शिकविण्यापासून ब्राह्मणाला फारसा द्रव्यलाभ होत नसावा.

**याजन अथवा यज्ञात पुरोहितपणा करणे :—** ह्या कामाचा ब्राह्मणांनाच अधिकार होता. वेदात आणि निरुक्तामध्ये देवापि आणि शंतनु ह्यांच्या कथेचा उल्लेख आला असून शंतनु हा राजा असून त्याचा बंधु देवापि हा त्याचा पुरोहित होता असे म्हटले आहे. (ऋ. १०·९८·७; निरुक्त २·१०). त्यावरून वैदिक कालात क्षत्रिय पुरोहित होऊ शकत असे दिसते. ब्राह्मणांमध्येही सर्वच जण पूर्वी केव्हाही पुरोहित नसत आणि हल्लीही नसतात. देवालयात मूर्तीची पूजा करण्याची वृत्ती अलिकडील काळातील आहे. तथापि ती वृत्ती करणाऱ्या पुजाऱ्याला सामान्यत्वेकरून कमी प्रतीचा मानीत आणि श्राद्धात आमंत्रण करण्याला अथवा देवांप्रीत्यर्थ करावयाच्या यज्ञात ऋत्विजाचे काम करण्याला असा ब्राह्मण अपात्र असल्याचे मनूने (३·१५३) म्हटले आहे.

**दान घेणे :—** ब्राह्मणाने अध्यापन करून अथवा पुरोहितपणा करून द्रव्यसंपादन करण्यापेक्षा दान घेऊन द्रव्य संपादन करणे अधिक चांगले असल्याचे यमाने [प्रतिग्रहाध्यापनयाजनानां प्रतिग्रहं श्रेष्ठतमं वदन्ति । प्रतिग्रहाच्छुध्यति जप्यहोमैर्याज्यं तु पापैर्न पुनन्ति वेदाः ॥ यम (स्मृतिचं. १ पा १७९).] म्हटले आहे. दान कोणापासून स्वीकारावे, कोणी स्वीकारावे ह्यासंबंधी बृ. उप. (४ १·३ आणि ५·१४·५—६) सारख्या प्राचीन काळी देखील नियम सांगितले होते. त्यावरून असे सूचित होते की फक्त विद्वानांनाच मोठी दाने स्वीकारता येत असत.

ब्राह्मणांपुढे दारिद्र्य, साधी राहणी आणि उच्च विचारसरणी, धनप्राप्तीकरता प्रत्यक्ष प्रयत्न न करणे, संस्कृतीचे संरक्षण करणे आणि त्यात प्रगती करण्याची आकांक्षा धरणे ही ध्येये ठेवलेली असत. स्वतःची आणि कुटुंबाची उपजीविका होईल आणि आपली धार्मिक कृत्ये करता येतील इतकेच द्रव्य त्याने संपादन करावे आणि तेही दुसऱ्याला शक्यतितके कमी दुःख देऊन आणि स्वतःच्या देहालाही विशेष श्रम न होतील अशा रीतीने संपादन करावे. धान्याचा संग्रह शक्य तितका कमी करणे चांगले. ज्याच्याजवळ चालू दिवसाला पुरेल इतकेच धान्य असते आणि जो उद्याची काळजी करीत नाही तो सर्वात उत्तम ब्राह्मण होय असे मनूने म्हटले आहे. (मनु. ४·२-३; ४·७-८; १०·११२; ४·१२ इ०). शेतकऱ्याने धान्य कापून घरी नेल्यानंतर शेतात पडलेली धान्याची कणसे अथवा शेतात पडलेले धान्याचे कण वेचून आणून त्यावर उपजीविका करणे ह्या प्रकाराला मनूने (४·५) ऋत म्हटले आहे. ब्राह्मणाने समाधानी वृत्तीचे अवलंबन करावे. अडचणीत असला तरी त्याने जास्त आसक्ती धरून द्रव्यार्जन करू नये. धनसंचय हे ब्राह्मणाला प्राप्त होणारे एक संकट आहे असे महाभारतात म्हटले आहे. (अनुशा. ४७·२२).

ब्राह्मणाने दान घ्यावयाचे ते अधार्मिक अशा लोकांकडून घेऊ नये. एकाद्या ब्राह्मणाजवळ अन्य मार्गाने मिळालेली पुरेशी संपत्ती असेल तर त्याने द्रव्यार्जन करू नये आणि दान स्वीकारू नये. क्षुधित मातापिता, पत्नी, इत्यादिकांच्या पोषणाकरिता अडचणी मध्ये ब्राह्मणाला कोणाकडूनही (शूद्राकडून अथवा पतिताकडूनदेखील) दान स्वीकारता येते. (मनू. ४·२५१). परंतु अशा द्रव्याने त्याने आपली स्वतःची क्षुधा तृप्त करू नये. ह्याप्रमाणेच श्रोत्रिय आणि आपल्या उदरनिर्वाहाकरिता श्रम करण्याला असमर्थ असलेल्या ब्राह्मणांचे संरक्षण करणे हे राजाचे कर्तव्य असते, असे शास्त्रात सांगितले आहे. (गौ. १०·९।१०; याज्ञ. ३·४४). दाता दान स्वीकारण्यास पात्र अशा मनुष्याकडे स्वतः जाऊन जे दान देतो ते उत्तम प्रतीचे दान होय आणि कोणी याचना केल्यावर दाता दान देतो ते कनिष्ठ प्रतीचे दान होय. (पराशर १·२९). पवित्र आचरणाचे आणि वेदवेत्ते अशाच ब्राह्मणांना सर्व धर्मकृत्यांत भोजनास बोलवावे आणि योग्य काळी, योग्य ठिकाणी आणि सत्पात्र दान स्वीकारणारा भेटेल तेव्हाच दान द्यावे.

अनुक्रमणिका

अशा प्रकारचे विद्वान आणि निर्लोभी वृत्तीचे ब्राह्मण पूर्वीच्या काळाप्रमाणे चालू विसाव्या शतकात देखील आढळतात.

प्रतिग्रह म्हणजे दान स्वीकारणे हा ब्राह्मणांचा विशेष अधिकार असला तरी दान कोणीही आणि कोणालाही देऊ शकत असे. तथापी दानामुळे प्राप्त होणारे पुण्य हे दान घेणाऱ्याच्या पात्रतेवर आणि जातीवर अवलंबून असते. (याज्ञ. १·६; गौ. ५·१८; मनु. ७·८५). वैश्वदेवामध्ये [सर्वान्वैश्वदेवे भागिनः कुर्वीताश्वचाण्डालेभ्यः । आप. ध. सू. २·४·९·५] गृहस्थाश्रमीयाने सर्वांना (कुत्री, चांडाल, पतित ह्यांना सुद्धा) अन्न दिले पाहिजे. (आप. ध. सू. २·४·९·५).

वर सांगितल्यासारखे उदात्त ध्येय ब्राह्मणांच्या पुढे ठेवले होते तरी ब्राह्मणांची लोकसंख्या वाढल्यामुळे आणि दान देणारे आणि यज्ञ करणारे कमी कमी होऊ लागल्यामुळे दान आणि प्रतिग्रह ह्यांच्या बाबतीतील कडक नियम शिथिल करावे लागले आणि कालांतराने असे म्हटले जाऊ लागले की ब्राह्मण विद्वान असो वा अशिक्षित असो त्यालाच दान द्यावे आणि त्याने ते दान बेलाशक स्वीकारावे. पहिली सवलत देवांप्रीत्यर्थ करावयाच्या विधींच्या बाबतीत देण्यात आली. (अनुशा. ९०·२) आणि पुढे पुढे [ब्राह्मणान्न परीक्षेत क्षत्रियो दानधर्मवित् । दैवे कर्मणि पित्र्ये तु न्याय्यमाहुः परीक्षणम् ॥ अनुशासन ९०·२.] असे म्हणण्यात येऊ लागले की देवतांच्या आणि पितरांच्या प्रीत्यर्थ करावयाच्या कृत्यांत बोलवावयाच्या ब्राह्मणांच्या विद्वत्तेची अथवा शीलाची चौकशी करण्यापेक्षा ती कृत्ये तात्काल करणे चांगले आणि असे जो करील त्याचे पितर आणि देवही त्यामुळे संतुष्ट होतात आणि कोणत्याही स्थितीत असणाऱ्या अग्निप्रमाणे ब्राह्मणही कोणत्याही स्थितीत देवतारूपी असतो. (स्कंदपुराण—अपरार्क पा. ४५५).

ब्राह्मणांना विहित असणाऱ्या अध्यापन, याजन आणि प्रतिग्रह ह्या तीन साधनांव्यतिरिक्त दुसरे व्यवसाय आपल्या उपजीविकेकरिता करण्यास धर्मशास्त्रांनी संमती दिली आहे. विशिष्ट परिस्थितीत ब्राह्मणाने क्षत्रियाला विहित असलेला व्यवसाय करून अथवा तेही शक्य न झाल्यास वैश्याला विहित कर्मे करून आपली उपजीविका करावी. (गौत. ७·६ आणि ७). तीन वर्णांपैकी कोणालाही आपल्या स्वतःला विहितकर्मे करून आपली उपजीविका करणे अशक्य झाल्यास त्याने स्वतःच्या वर्णाहून एक पायरी खालच्या वर्णाचे व्यवसाय करावे (वसि. ध. सू. २·२२) परंतु कोणीही खालच्या वर्णाच्या व्यक्तीने स्वतःच्या वर्णाहून वरिष्ठ वर्णाला विहित असे चरितार्थाचे व्यवसाय करू नये. (वसि. ध. सू. २·३३). गौतमाने म्हटले आहे की सामान्यतः ब्राह्मणाने शूद्रांना विहित असा सेवेचा व्यवसाय करू नये. परंतु त्यांचे जीवित धोक्यात असले तर शूद्राचाही व्यवसाय करण्यास हरकत नाही. परंतु तसे करताना त्याचे शूद्रांबरोबर एका बैठकीवर बसणे, कांदे लसुणासारखे ब्राह्मणांना निषिद्ध असणारे पदार्थ खाणे हे प्रकार करू नयेत आणि निव्वळ घरकामाची सेवा करू नये. (गौ. ७·२२।२४).

शूद्रांचे विशिष्ट कर्म म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या तीन वर्णांची सेवा करून त्यांच्याकडून आपल्या चरितार्थाला लागणारी साधने मिळविणे हे होय. निरनिराळ्या [शुश्रूषा शूद्रस्येतरेषां वर्णानाम् । पूर्वस्मिन् पूर्वस्मिन्वर्णे निश्रेयसं भूयः । आप. ध. सू. १·१·१·७।८.] वर्णांच्या सेवेत वैश्याची सेवा करण्यापेक्षा क्षत्रियाची सेवा केल्याने आणि क्षत्रियाची सेवा करण्यापेक्षा ब्राह्मणाची सेवा केल्याने शूद्राला अधिक सुखाचा लाभ होतो. (आप. ध. सू. १·१·१·७।८). वरिष्ठ वर्णाच्या मनुष्याची सेवा करून एखादा शूद्र वृद्ध झाला आणि अधिक काम करण्यास असमर्थ झाला तर त्याच्या पूर्वीच्या धन्याने त्या शूद्राचा प्रतिपाळ करावा असे गौतमाने सांगितले आहे. (गौ. १०-६३),

अनुक्रमणिका

कालांतराने व्यवसायाच्या बाबतीत शूद्रांची स्थिती सुधारली. त्यांना सुतारकी, चित्रकला अशासारखे व्यवसाय करण्यास आणि गुरे बाळगणे, शेतकी करणे ह्यांच्या सारखे वैश्यांचे व्यवसाय करण्यास परवानगी देण्यात येऊ लागली. (याज्ञ. १·१२०). काही विशिष्ट वस्तूव्यतिरिक्त कोणतेही पदार्थ विकण्यास त्याला मोकळीक होती. शूद्राचा दर्जा वाढता वाढता काही शूद्र राजेही झाले. प्राचीन स्मृती शूद्राजवळ धनसंचय असण्याच्या विरुद्ध होत्या. कारण त्यांच्या मताने शूद्राने धनसंचय केल्यास धनाच्या गर्वाने आणि अज्ञानाने तो ब्राह्मणांना प्रतिबंध करू शकेल आणि त्यांना त्रास देऊ शकेल. (गौ. १०·६४।६५; मनू. १०·१२९). इतर वर्णांच्या जवळ अथवा दूर राहणे, त्यांनी केलेले अन्न इतर वर्णांनी ग्रहण करणे ह्यावरून आणि आचरणावरून शूद्रांचे (सुतार, लोहारांसारखे) अनिर्वासित आणि (चांडालासारखे) निर्वासित, भोज्यान्न आणि अभोज्यान्न, सच्छूद्र आणि असच्छूद्र असे विभाग करण्यात येत. (याज्ञ. १·१६६).

आपत्काली ब्राह्मणाला क्षत्रियाचा व्यवसाय करण्याला परवानगी असे आणि फार प्राचीन कालापासून ब्राह्मणांनी शस्त्र धारण करण्याचा व्यवसाय केल्याचे आढळते. सैन्यात भरती करण्यात ब्राह्मण हा सर्वात अधिक चांगला समजावा असे काही आचार्यांचे मत असल्याचे आणि ते मत आपल्यास मान्य नसल्याचे कौटिल्याने (९·२) म्हटले आहे. कारण ब्राह्मणांच्या सैन्यापुढे साष्टांग नमस्कार घातल्यास शत्रूला त्याला आपल्या बाजूला वळवून [प्रणिपातेन ब्राह्मबलं परोऽभिहारयेत् । कौटिल्य ९.२] घेता येते. गोब्राह्मणांचे संरक्षण करण्याकरिता, वर्णसंकर टाळण्याकरिता ब्राह्मणाने आणि वैश्याने शस्त्र धारण करावे असे बौधायन (२·२·८०), वसि (३·२४) प्रभृतींनी सांगितले आहे.

आपत्काली ब्राह्मणांना वैश्याचे व्यवसाय करण्याची परवानगी असली तरी सावकारी (व्याजबट्टा), शेतकी, गुरे बाळगणे हे व्यवसाय करण्याच्या बाबतीत त्यांच्यावर बरेच निर्बंध घातले होते. त्यांनी हे व्यवसाय स्वतः न करता दुसऱ्याच्याद्वारा केले पाहिजेत आणि व्याजबट्टा हा व्यवसाय आपत्कालीही करता कामा नये.

अशा प्रकारचे निर्बंध ब्राह्मणांवर घालण्याची कारणे उघड आहेत. ब्राह्मणांनी साध्या राहणीने राहावे, प्राचीन विद्यांचे संरक्षण करावे आणि त्या विद्यांची वृद्धी करावी, सामान्य व्यवहारी मनुष्यासारखे आयुष्य घालविण्याच्या नादाने त्यांना उच्च पारमार्थिक गुणांचा त्याग करू नये आणि धनार्जनाच्या आणि शौर्याने मिळणाऱ्या कीर्तीच्या मागेच सतत लागण्याचे अंतःकरण आणि भावना कठोर बनतात हे टाळावे हीच ती कारणे होत.

वैदिक ग्रंथांत ब्राह्मणांनी शेती करण्यास निषेध केला नाही. परंतु वेद्याभ्यासाकडे लक्ष्य दिल्याने शेतकी बुडते आणि शेतकीकडे लक्ष्य दिल्याने विद्याभ्यास बुडतो. ही दोन्ही साधत असल्यास दोन्ही करावी. [शक्तिमानुभयं कुर्यादशक्तस्तु कृषिं त्यजेत् । बौ. ध. सू. १·५·१०१.] परंतु दोन्ही साधत नसल्यास शेतकीचा त्याग करावा. (बौ. ध. सू. १·५·१०१). ब्राह्मणाने शेतीचा व्यवसाय करतानादेखील अनेक निर्बंध पाळले पाहिजेत. तो व्यवसाय निंद्य मानला असून तो करणे भागच पडले तर आपत्ती दूर होईपर्यंतच करावा. उत्पन्न केलेल्या धान्याचा १/६ राजाला, १/२१ देवांना, १/३० ब्राह्मणांना द्यावा असे सांगितले आहे. ह्याच्या उलट वृद्ध हारीताने (७·१७९, १८२) म्हटले आहे की शेतकी हा व्यवसाय सर्व वर्णांना सामान्य असून शेतकी, पशुसंगोपन आणि सेवा हे व्यवसाय कोणालाच निषिद्ध नाहीत.

आपत्काली ब्राह्मणाला व्यापार करण्यास परवानगी दिली असली तरी त्याने कोणत्या वस्तू विकाव्या ह्याबद्दल अतिशय निर्बंध घातलेले असत. चंदनासारखे सुवासिक पदार्थ, तेल तुपांसारखे पातळ पदार्थ, शिजविलेले अन्न, दूध, दही, तीळ, तांदूळ, इत्यादि अनेक पदार्थ विकण्याचा अथवा त्यांची अदलाबदल करण्याचा निषेध असे. हेच निर्बंध त्या व्यवसायात पडलेल्या क्षत्रियाला लागू नसत. ब्राह्मणाने किंमतीबद्दल घासाघीस न करता एक निश्चित किंमत ठरवून विकावे. काही पदार्थांची अदलाबदल करण्याची मोकळीक असे. उदाहरणार्थ, कच्च्या अन्नाच्या मोबदला तितक्याच मापाचे शिजलेले अन्न, तिळाच्या मोबदला तितक्याच मापाचे दुसरे धान्य घेता येत असे. (गौ. ७·८।१४; ७·१५; आप. ध. सू. १·७·२०·१२।१३; बौ. ध. सू. २·१·७७।७८; वसिष्ठ २·२४।२९).

निरनिराळ्या प्रकारच्या आचरणांवरून ब्राह्मणांचे निरनिराळे भेद काही ग्रंथकारांनी केले आहेत. उदाहरणार्थ, जो रोज स्नानसंध्या, जप, होम करतो त्याला अत्रीने (श्लोक ३७३।३८३) देवब्राह्मण अशी संज्ञा दिली असून मूर्ख, संस्काररहित, धर्मबाह्य आणि क्रूर अशा ब्राह्मणाला त्याने चांडालब्राह्मण म्हटले आहे. वेदाध्ययन न करणे, गायत्री जप न करणे इत्यादी अनेक कर्मे करणाऱ्याला शूद्र समजावे असे निरनिराळ्या स्मृतींनी सांगितले आहे. (बौ. ध. सू. २·४·२०; वसि. ध. सू. ३·१।२; मनु. २·१६८ इ०).

भिक्षा मागणे हे कृत्य ब्रह्मचारी (वेदाध्ययन करणारा विद्यार्थी) आणि यती ह्यांना विहित असते. काही विशिष्ट कारणाकरिता इतरांनीही भिक्षा मागणे योग्य समजले जात असे आणि त्यांना आपल्या योग्यतेप्रमाणे भिक्षा घालणे हे इतरांचे कर्तव्य मानले जात असे. अशा कारणांत गुरूकरिता, स्वतःच्या (प्रथम) विवाहाकरिता, मातापितरांच्या चरितार्थाकरिता इत्यादींचा समावेश होत असे. जो मनुष्य अडचणीशिवाय स्वतःच्या इंद्रियांच्या संतोषासाठी भिक्षा मागत असेल त्याच्याकडे लक्ष देऊ नये. इतरांना नव्हेच परंतु ब्राह्मणांना देखील अनिर्बंधपणे भिक्षा मागण्याची मुभा स्मृतींनी कधीही [अव्रता ह्यनधीयाना यत्र भैक्षचरा द्विजाः । तं ग्रामं दण्डयेद्राजा चोरभक्तप्रदो हि सः ॥ वसिष्ठ ३·४ आणि पराशर १·६०.] दिली नव्हती अथवा अशी भिक्षा मागण्यास उत्तेजनही दिले नव्हते. (आप. ध. सू. २·५·१०.१।४; मनू. ४·२५१, वसिष्ठ ३·४ इ०).

वेदकाळी देखील निव्वळ जन्मावरून ब्राह्मणाची थोर प्रशंसा केली जाई आणि त्यांना इतरांपेक्षा श्रेष्ठ दर्जाचे मानले जाई. ब्राह्मण हे दृश्य असणारे देव असतात, पृथ्वीवर असणारी सर्व संपत्ती ब्राह्मणांच्या मालकीची आहे, ब्राह्मण परमेश्वराच्या सुखापासून उत्पन्न झाले असल्यामुळे ते जन्मतःच सर्व काही गोष्टींना पात्र असतात इत्यादी स्मृतिवचने आहेत. ही प्रशंसापर वचनें ब्राह्मणांनी केवळ आपले महत्त्व वाढविण्याकरिता आणि इतर वर्णांवर आपले वर्चस्व दृढ करण्याकरिताच घातली होती असे समजू नये. त्यांना अशा प्रकारचे महत्त्व त्यांच्या गुणानीच प्राप्त झाले होते. विस्तृत अशा वाङ्मयाचे ते जनिते आणि संस्कृतीचे संरक्षक होते. आपखुषीने ज्या देणग्या मिळतील त्यांच्यावर अवलंबून राहून हा संरक्षणाचा भार ब्राह्मणांनी आपल्या अंगावर घ्यावा अशीच समाजाची अपेक्षा होती. त्यांच्यापैकी ज्यांनी हे ध्येय गाठण्याचा शक्य तितका प्रयत्न केला त्यांची संख्याही अगदीच लहान नव्हती आणि ह्या दुसऱ्या प्रकारच्या ब्राह्मणांच्या थोरपणामुळेच सर्व ब्राह्मणवर्णाचे यश वाढले. शेकडो वर्षे मानवी समाज काही थोड्या शेलक्या पुढाऱ्यांच्या गटाची सत्ता आणि राज्य मानीत आला आहे. अशा रीतीने परंपरागत चालत आलेल्या धर्माला आणि सामाजिक प्रघातांना अनुसरून समाजावर सत्ता चालविणारे पुढारी बहुधा वंशपरंपरेने आलेले असतात. ब्राह्मणांप्रमाणेच स्मृतींनी राजाच्या पदाचीही अतिशय महती वर्णन केली आहे आणि राजाचे पद त्यावेळी आणि आजही वंशपरंपरेने चालणारे आहे.

अनुक्रमणिका

स्मृतिकारांनी प्रतिपादन केलेली वर्णांची उपपत्ती श्रमविभागावर उभारलेली आहे. समाजातील निरनिराळ्या गटांमध्ये परस्परविरोध न होता त्यांचा समन्वय व्हावा असा त्यांचा हेतु होता. त्या वर्णव्यवस्थेत निरनिराळ्या वर्णांच्या अधिकारांपेक्षा आणि त्यांना मिळावयाच्या सवलतींपेक्षा त्यांनी करावयाच्या कर्तव्यांवर अधिक जोर दिला होता. ब्राह्मणांना जरी अतिशय उच्च स्थान दिले असले तरी त्यांनी ऐहिक सत्तेची हाव न धरिता इतर वर्णांच्या तुलनेने दारिद्र्यात राहावे आणि आपले ज्ञान इतर वर्णांना शिकवून जो थोडासा आणि अनिश्चित असा मोबदला मिळेल त्यावर आपला निर्वाह करावा असे ध्येयही त्यांच्यापुढे ठेविले होते. क्षत्रियांनाही आपण सर्व सामर्थ्यवान नसून आपल्यास ज्याच्या आधाराची अपेक्षा आहे असा आपल्यापेक्षा श्रेष्ठ असा एक वर्ण आहे असे मानण्यास लावले.

शिक्षण देणे, पुरोहितपणा करणे आणि दान स्वीकारणे ह्या विशिष्ट अधिकारां व्यतिरिक्त आणखीही काही अधिकार आपल्यास आहेत असे ब्राह्मण म्हणत असत. अशा अधिकारांपैकी काही महत्त्वाच्या बाबी पुढे दिल्या आहेत :

(१) ब्राह्मणांना केवळ ब्राह्मणकुलात जन्म घेतल्यामुळे सर्व वर्णाचे गुरुत्व (पूज्यत्व) प्राप्त होते. मनूने (१-३१ आणि ९४) म्हटले आहे की ब्राह्मण विधात्याच्या मुखापासून उत्पन्न झाल्यामुळे, त्याच्या श्रेष्ठत्वामुळे, तपश्चर्येच्या योगाने आणि त्याच्या संस्कारांच्या श्रेष्ठत्वामुळे तो सर्व वर्णाचा स्वामी असतो.

(२) इतर वर्णांची कर्तव्ये, आचार आणि व्यवसाय ह्यांच्या संबंधीचे नियम ब्राह्मणांनी ठरवावे आणि इतर वर्णांनी त्याप्रमाणे वागावे आणि राजाने ब्राह्मणांनी घालून दिलेल्या नियमांप्रमाणे राज्यकारभार चालवावा. (वसि. ध. सू. १.३९।४१).

(३) ब्राह्मणांना काही विशिष्ट गोष्टींची माफी असावी. शासनाच्या बाबतीत त्यांना चाबकाचा मार देणे, अंगावर शृंखला घालणे, हद्दपार करणे, निर्भर्त्सना करणे देहान्ताची शिक्षा देणे ह्या गोष्टींची माफी असते. प्रत्यक्ष व्यवहारात ह्या सर्व सवलती नेहमीच दिल्या जात असत असे नाही. (गौ. ८·१२।१३; कौटि. ४·८).

(४) श्रोत्रिय म्हणजे वेदवेत्त्या ब्राह्मणांवर राजाने कर बसवू [ब्राह्मणेभ्यः करादानं न कुर्यात् । ते हि राज्ञो धर्मकरदाः । विष्णु ध. सू. ३·२६।२७.] नये असे बहुतेक स्मृतिकारांनी सांगितले असून त्याचे कारण ब्राह्मणांना धर्माचरणाच्या योगाने लागणाऱ्या पुण्याचा १/६ अंश राजाला मिळत असतो असे सांगितले आहे. (विष्णु ध .सू. ३·२६।२७).

(५) भूमिगत द्रव्य ब्राह्मणांना सर्वच्या सर्व ठेवता येते. ह्याच्या उलट इतर वर्णांना अशा द्रव्यापैकी काही भाग राजाला द्यावा लागतो. इतकेच नव्हे तर भूमिगत द्रव्य राजाला सापडले तरी त्याला त्यातील अर्धे ब्राह्मणांना द्यावे लागते. (गौत. १०·४३।४५; वसिष्ठ ध. सू. ३·१३।१४; मनु. ८·३७।३८).

(६) रस्त्याने जाताना राजानेही श्रोत्रियाला आपल्यापेक्षा अगोदर वाट दिली पाहिजे. (गौत. ६·२१।२२; आप. ध. सू. २·५·११·५।९).

अनुक्रमणिका

(७) ब्राह्मणाचा देह फार प्राचीन काळापासून अतिशय पवित्र मानला जाई. ब्रह्महत्त्या हे सर्वात मोठे पातक समजले जात असे. (तै. सं. ५·३·१२·१।२; शत. ब्रा. १३·३·१·१). एकादा ब्राह्मण शस्त्रधारण करून रणामध्ये दुसऱ्या मनुष्याला ठार मारण्याकरिता चाल करून आला तर अशा **आततायी** ब्राह्मणाला ठार मारावा किंवा नाही याबद्दल फार मतवैचित्र्य होते. बृहस्पतीने [आततायिनमुत्कृष्टं वृत्तस्वाध्यायसंयुतम् । यो न हन्याद्व धप्राप्तं सोऽश्वमेधफलं लभेत् ॥ बृहस्पति (स्मृतिचं. व्यवहार पा. ३१५).] म्हटले आहे की दांडगाईच्या योगाने वधाला पात्र असलेल्याही आततायी ब्राह्मणाला जो ठार मारीत नाही त्याला अश्वमेध यज्ञ केल्याचे पुण्य प्राप्त होते. (स्मृति. चं. व्यवहार पा. ३१५).

(८) ब्राह्मणावर [तस्मात् ब्राह्मणाय नापगुरेत न निहन्यान्न लोहितं कुर्यात् । तै. सं. २·६·१०·१।२] हल्ला करणे, नुसती धमकी देणे, त्याला प्रहार करणे, रक्त येईल अशी जखम करणे ह्या गोष्टी फार प्राचीन काळापासून निंद्य मानल्या आहेत. (तै. सं. २·६·१०—१।२).

(९) काही अपराधांच्या बाबतीत इतर वर्णांच्या लोकांपेक्षा ब्राह्मणाला कमी शासन मिळत असे. (मनु. ८·२६७।२६८; याज्ञ. २·२०६।२०७ इ०).

(१०) ब्राह्मणाशिवाय इतर कोणा पक्षकाराला एकाद्या ब्राह्मणाची साक्ष देता येत नसे आणि एकाद्या करारपत्रावर साक्षीदार म्हणून एकाद्या ब्राह्मणाने सही केलेली नसेल तर त्याला इतर कारणाकरिता राजादेखील साक्षीला बोलावित नसे. (गौ. १३·४; मनु. ८.६५ इ०).

(११) काही विशिष्ट ब्राह्मणांनाच फक्त श्राद्धाकरिता आणि देवकार्यांमध्ये भोजनाला बोलावता येई. (गौत. १५·५ आणि ९; आप. ध. सू. २·७.१७·४; मनु. ३·१२४, १२८ इ०).

(१२) सौत्रामणियाग, सत्र संज्ञा असणारे यज्ञ ह्यांच्यासारखे काही यज्ञ फक्त ब्राह्मणांनाच करिता येत असत. सत्रसंज्ञक यज्ञ भृगु, शुनक आणि वसिष्ठ ह्या गोत्रांच्या ब्राह्मणांना देखील करता येत नसत. (कात्या. श्रौ. १·६·१३; जैमि. ६·६·२४।२६).

(१३) मृताशौचाचा अवधी ब्राह्मणांच्या बाबतीत सर्वात कमी म्हणजे १० दिवस असे. क्षत्रियांना ११ दिवस, वैश्याना १२ दिवस आणि शूद्रांना १ महिना आशौच पाळावे लागते. (गौ. १४·१।४; मनु. ५·८३ इ०). ह्याहून कमी महत्त्वाच्या अनेक सवलती ब्राह्मणांना असल्याचे नारदाने (प्रकीर्णक ३५।३९) म्हटले आहे. अशा गोष्टींत राजाने आपले मुख सर्वांच्या आधी ब्राह्मणाला दाखवावे, नदी ओलांडून जाण्याकरिता असलेल्या तरीवर ब्राह्मणांनी शुल्क न देणे, इत्यादिकांचा समावेश होतो.

ब्राह्मणांना असणाऱ्या सवलतींप्रमाणे शूद्रालाही अनेक सवलती होत्या आणि त्याच्या उलट अनेक निर्बंधही असत. त्यांपैकी काही निर्बंध पुढे दिले आहेत :—

(१) शूद्राला वेदाध्ययन करता येत नसे. तरी पण महाभारतासारखे इतिहास आणि पुराणे ब्राह्मणवक्त्याजवळून श्रवण करता येत असत. (शान्तिपर्व ३२८·४९).

(२) त्याला पवित्र अग्नीची स्थापना करता येत नसे. (तै. सं. ७·१·१·६).

(३) त्याला संस्कारांचा अधिकार नसतो, त्याला उपदेश देऊ नये, धर्मशिक्षण देऊ नये, व्रत करण्यास सांगू नये. (मनु. ४·८०).

(४) विशिष्ट अपराधांबद्दल त्याला इतरांपेक्षा अधिक शासन करण्यात येई. उदाहरणार्थ, वाक्पारुष्य (शिवीगाळ, निंदा) ह्या अपराधाच्या बाबतीत एकाद्या शूद्राने ब्राह्मणाची निंदा केली तर त्याला देहान्ताची अथवा जीभ तोडण्याची शिक्षा असे, परंतु तोच अपराध एकाद्या क्षत्रियाने केल्यास त्याला १०० नाणी दंडाची आणि एकाद्या वैश्याने केल्यास त्याला १५० नाणी दंडाची शिक्षा असे. (मनु. ८·३७८, ८·३८५, ८·२७०, ८·२६७).

(५) शूद्राला न्यायाधीशाच्या जागी नेमता येत असे. (मनु. ८·९, याज्ञ १·३ मनु. ८·२० इ.).

(६) ब्राह्मणाने शूद्राकडील अन्नग्रहण करण्यावर निर्बंध असे. (गौ. १७·६, मनु. ४·२५३ इ०).

(७) एके काळी ब्राह्मणाच्या घरी शूद्राला स्वयंपाक करण्याचा अधिकार असे. (अनुशा. ५९·३३). परंतु क्रमाक्रमाने शूद्राने ब्राह्मणाला स्पर्श करू नये इतक्या हलक्या दर्जाचा त्याला मानू लागले.

(८) ब्राह्मणाने शूद्राकडून कोणती दाने स्वीकारावी ह्याविषयी फार निर्बंध [द्रव्यादानं विवाहसिद्ध्यर्थं धर्मतन्त्रसंयोगे च शूद्रात् । गौतम १८·२४] असत. (गौ. १८·२४).

(९) शूद्राला [शूद्रोहं नाधिकारो मे चातुराश्रम्यसेवने । अनुशासन १६५·१०.] वेदाध्ययन करता येत नसल्यामुळे चार आश्रमांपैकी फक्त गृहस्थाश्रमाचाच त्याला अधिकार असे. (अनुशा. १६५·१०).

(१०) शूद्राच्या जीविताचे मोल फार अल्प धरले जात असे. उदाहरणार्थ, क्षत्रियाच्या वधाबद्दल ६ वर्षे ब्रह्मचर्य पालन करण्याचे प्रायश्चित्त करावयास आणि १००० गाई आणि बैलांचे दान देण्यास सांगितले आहे. परंतु एकाद्या शूद्राच्या वधाबद्दल १ वर्ष ब्रह्मचर्याचे पालन आणि १० गाई आणि बैलांचे दान देण्यास सांगितले आहे. (याज्ञ. ३·२३६, मनु. ११·६६, गौ. २२·१४।१६ इ०).

अशा निर्बंधाप्रमाणेच त्यांचा वचपा काढू शकतील अशा काही सवलतीही शूद्रांना असत. ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्यांच्या विशिष्ट व्यवसायांव्यतिरिक्त कोणताही व्यवसाय शूद्राला करता येत असे; अन्नाच्या आणि मद्यप्राशनाच्या बाबतींत त्याला निर्बंध नसत; आणि आह्निक कर्मे करण्याचे बंधन नसे; संस्कार करावे लागत नसत; विवाहाच्या बाबतीत गोत्रप्रवराचे निर्बंध नसत; शास्त्रात सांगितलेल्या नियमांच्या उल्लंघनाबद्दल त्याला प्रायश्चित्त करावे लागत नसे.

भारतामधील शूद्रांची प्राचीन आणि मध्ययुगीन काळात जी स्थिती होती तिच्याबद्दल पुष्कळ पाश्चिमात्य ग्रंथकार नाके मुरडतात. परंतु पाश्चिमात्य लोकांनी सुरू केलेला गुलामांचा व्यापार, अमेरिकेतील मूळचे रहिवासी तांबडे, पिवळे आणि काळे रंगाचे लोक ह्यांच्याबरोबर पाश्चिमात्य लोकांनी केलेली वागणूक, अनार्य म्हणून गणलेल्या वंशाच्या लोकांविरुद्ध युरोपमध्ये केलेले कायदे इत्यादी गोष्टी ते विसरतात.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण २८

## अस्पृश्यता

(मू. ग्रं. पा. २.१६५—१७९)

भारतामधील जातिसंस्थेबद्दल ज्या ज्या ग्रंथकारांनी लिहिले आहे त्यांना त्यांना काही काही जाती अस्पृश्य मानल्या जातात ह्या गोष्टीचा चमत्कार वाटतो. परंतु अशी स्थिती केवळ भारतातच अस्तित्वात आहे असे समजण्याचे कारण नाही. अमेरिकेतील संयुक्त संस्थानांमधील दक्षिणेकडील संस्थानांत नीग्रो लोकांची स्थिती अद्यापी देखील अशी आहे की त्यांच्या राहण्याच्या जागा वेगळ्या असतात, सार्वजनिक वाहनात आणि करमणुकीच्या ठिकाणी वंशभेदानुसार वेगळ्या जागा असतात, सार्वजनिक स्वरूपाच्या आणि शिक्षणविषयक संस्थांत नीग्रोंना प्रतिबंध असतो. दक्षिण आफ्रिकेत भारतीय लोकांना मिळणाऱ्या भेदभावाच्या वागणुकीविरुद्ध महात्मा गांधींना सत्याग्रह करावा लागला होता ह्याची चालू पिढीतील लोकांना आठवण आहे.

स्मृतींत ज्या जातींना अंत्यज अशा संज्ञा दिली आहे अशी कित्येक जातींची नावे प्राचीन वैदिक ग्रंथात आढळतात. उदाहरणार्थ, चर्मम्न, चांडाल, पौल्कस, वप्ता ही नावे ऋग्वेदात (८·५·३८) आली आहेत. विदलकार अथवा बिदलकार (बुरुड) ह्यांचा उल्लेख तै. ब्रा. मध्ये आला आहे. परंतु त्या ग्रंथाच्या वेळी त्या जाती बनल्या होत्या किंवा नाही आणि त्या अस्पृश्य होत्या किंवा काय हे स्पष्ट होत नाही. चांडाल ह्या शब्दाचा अस्पष्ट उल्लेख [यत्ते कपूयां योनिमापद्येरन् श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चण्डालयोनिं वा । छां. उप. ५·१०·७.] छां. उप. (५·१०·७) मध्ये आला आहे आणि तेथील संदर्भावरून चांडाल अस्पृश्य होते किंवा काय हे समजले नाही तरी एवढे अनुमान करता येते की त्या काळी समाजात चांडाल हे अत्यंत कनिष्ठ प्रतीचे मानले जात असत.

प्राचीन स्मृतींनी समाजात फक्त चारच [चतुर्थ एकजातिस्तु शूद्रो नास्ति तु पञ्चमः । मनु १०·४. स्मृताश्च वर्णाश्चत्वारः पञ्चमो नाधिगम्यते । अनुशा. ४७·१८.] वर्ण असल्याचे सांगितले आहे. (मनु. १०·४, अनुशा. ४७·१८). आंगिरसाने [चाण्डालः श्वपचः क्षत्ता सूतो वैदेहिकस्तथा । मागधायोगवौ चैव सप्तैतेऽन्त्यावसायिनः । मध्यमाङ्गिरस (याज्ञ ३·२६५ वरील मिताक्षरा).] चांडाल आणि श्वपच ह्यांच्याबरोबरच क्षतृ, सूत प्रभृती प्रतिलोम जातींचा शूद्रामध्ये समावेश केला आहे. ह्यावरून धर्मासंबंधी कर्तव्ये आणि अधिकार ह्यांच्या बाबतीत तो चांडालांना शूद्र मानीत असे असे दिसते. परंतु पुढे पुढे शूद्र आणि चांडालासारख्या जाती ह्यांच्यात भेद मानण्यात येऊ लागला. आणि शास्त्रात तसे करण्याला आधार नसताना देखील लोकरूढीप्रमाणे आणि तुटक राहण्याच्या प्रवृत्तीमुळे अधिकाधिक जातींचा अस्पृश्यजातीत समावेश होऊ लागला.

अस्पृश्यता केवळ जन्मावरूनच उत्पन्न झाली नाही आणि होत नाही. काही अतिशय पापदायक अपराध केल्यामुळे काही लोक बहिष्कृत आणि अस्पृश्य केले जात असत. ब्रह्महत्त्या, सुरापान इत्यादी महापातके करणाऱ्याला जातिबहिष्कृत करावे, त्याच्याबरोबर विवाहसंबंध करू नये, आणि त्याने सर्व प्रकारच्या वैदिक धर्मांचा त्याग करून जगभर परिभ्रमण करावे असे मनूने (९·२३५।२३९) सांगितले आहे. परधर्मातील अथवा पंथातील लोकांबद्दल वाटणाऱ्या द्वेषामुळे आणि तिरस्कारामुळे त्या लोकांना अस्पृश्य मानले जाई. मासिक रजोदर्शन ह्यांच्यासारख्या काही विशिष्ट परिस्थितीत काही व्यक्ती अस्पृश्य होतात.

अनुक्रमणिका

पारधी, खाटिक ह्यांच्यासारख्या गलिच्छ व्यवसाय करणाऱ्यांना स्पर्श झाल्यास स्नान करावे असे सांगितले आहे. आध्यात्मिक उन्नतीच्या दृष्टीने शास्त्रविहित शुद्धतेला आणि देहशुद्धीला अधिक महत्त्व देण्यात येत असे. धार्मिक दृष्ट्या आणि धर्माचरणाच्या दृष्टीने शुद्धाशुद्धता पाळण्याच्या भावनांवरून अस्पृश्यतेचा उद्भव झालेला आहे. पुष्कळ व्यवसाय आणि शिल्पकला प्राचीन काळी वंशपरंपरेने चालत असत, त्यामुळे हळुहळू अशी कल्पना होऊ लागली की विशिष्ट अमंगल आणि भीतिदायक व्यवसाय करणाऱ्या जातींची व्यक्ती जन्मतःच अस्पृश्य असते. अति प्राचीन धर्मसूत्रांत केवळ चांडाल ह्या जातीला जन्मतः अस्पृश्य मानली होती. गौतमाने (४·१५ आणि २३) म्हटले आहे की चांडालजात ब्राह्मण स्त्री आणि शूद्र पुरुष ह्यांच्या संबंधापासून झालेली संतती असून सर्व प्रतिलोमजातींत ती अत्यंत दूषणीय असते. चांडालप्रभृती जातींच्या लोकांनीच फक्त गावाबाहेर राहावे असे मनूने (१०·३६ आणि ५१) सांगितले आहे. ह्यावरून अगदी कनिष्ठ दर्जाच्या देखील इतर जातींना गावात राहण्यास प्रत्यवाय नसावा असे दिसते. मेधातिथीने (मनु. १०·१३ वरील टीका) म्हटले आहे की प्रतिलोम जातींपैकी फक्त चांडाल हीच जात अस्पृश्य असते.

चांडाल आणि म्लेच्छ ह्यांच्याबरोबर भाषण करण्यासंबंधी नियम विष्णु धर्मसूत्रात (५·१०४) सांगितले आहेत. परंतु म्लेच्छांच्या बाबतीत अस्पृश्यतेचे निर्बंध पुष्कळ दिवसांपूर्वीच लोकांनी टाकून दिले आहेत आणि अंत्यज जातींपैकी धोबी, बुरुड, कोळी ह्यांच्यासारख्या जाती आता बऱ्याच प्रांतांत अस्पृश्य मानल्या जात नाहीत.

चांडालाच्या सावलीमुळे देखील अपवित्रता येत असे मानीत असल्याचे मनुप्रभृती प्राचीन स्मृतिग्रंथांवरून दिसून येत नाही. पुढे काही स्मृतींनी चांडालाची सावली पडल्यास ब्राह्मणांनी स्नान केले पाहिजे असा नियम घातला. बृहस्पतीने (याज्ञ. ३·३० वरील मिताक्षरा) म्हटले आहे की [युगं च द्वियुगं चैव त्रियुगं च चतुर्युगम् । चण्डालसूतिकोदक्यापतितानामधःक्रमात् ॥ बृहस्पति (याज्ञ ३·३० वरील मिताक्षरा).] चांडालाला ४ युगे (म्हणजे १६ हात) अंतरावर दूर ठेवावा. सार्वजनिक रस्त्याच्या बाबतीत याज्ञ.ने (१·१९४ आणि १९७) असे सांगितले आहे की चांडाल जरी सार्वजनिक रस्त्यावरून चालत गेला तरी तो रस्ता सूर्यचंद्रांच्या किरणांच्या योगाने आणि वाऱ्याने शुद्ध होतो. ह्यावरून असे दिसून येईल की सार्वजनिक स्वरूपाच्या बाबतीत स्मृतींनी समंजसपणाचे नियम घालून दिले होते आणि दक्षिण भारतातील काही भागात प्रचलित असलेल्या पंचम जातीवरील निर्बंधांना मान्यता दिली नव्हती.

काही विशिष्ट जातींना अस्पृश्य मानण्यासंबंधीच्या ह्या सर्वसाधारण नियमांना स्मृतींनी काही अपवाद सांगितले होते. अत्रीने (२४९) म्हटले आहे की देवालय, धार्मिक मिरवणूक, विवाह, यज्ञसमारंभ आणि सर्व प्रकारचे उत्सव ह्यांमध्ये जर एकाद्या अस्पृश्याचा स्पर्श झाला तर त्यामुळे दोष उत्पन्न होत नाही. अशाच प्रकारचे नियम दुसऱ्याही [ग्रामे तु यत्र संस्पृष्टिर्यात्रायां कलहादिषु । ग्रामसन्दूषणे चैव स्पृष्टिदोषो न विद्यते ॥ शातातप (स्मृतिचं. १ पा. ११९).] काही स्मृतींनी (शातातप– स्मृतिचं. १ पा. ११९) सांगितले आहेत. अस्पृश्यांच्या विहिरीतील अथवा त्यांच्या घरातील पाणी पिणे, त्यांच्याकडील कच्चे अथवा शिजविलेले अन्न भक्षण करणे, आणि अस्पृश्य वर्णाच्या स्त्रीबरोबर रतिसंभोग करणे ह्याबद्दल कोणते प्रायश्चित्त करावे ह्याबद्दल सविस्तर नियम स्मृतींनी सांगितले आहेत. त्यांचा उल्लेख 'प्रायश्चित्त' प्रकरणात करण्यात येईल.

अस्पृश्यांना पूजेचा पूर्णपणे प्रतिबंध नव्हता. त्यांना विष्णूच्या अवतारमूर्तीची पूजा करिता येते. अत्यजांनी भैरवाचे देवालय स्थापावे असे [चतुर्वर्णैस्तथा विष्णुः प्रतिष्ठाप्यः सुखार्थिभिः । भैरवोपि चतुर्वर्णैरन्त्यजानां तथा मतः । देवीपुराण (निर्णयसिन्धु ३).] देवीपुराणात (निर्णयसिंधु भाग ३) सांगितले आहे. अस्पृश्यांना उपनयनादी संस्कार

अनुक्रमणिका

नसतात. प्रतिलोम जातींना व्रते करण्याचा अधिकार असतो असे मिताक्षरेने [अतः स्त्रीशूद्रयोः प्रतिलोमजानां च त्रैवर्णिकवद् व्रताधिकार इति सिद्धम् । मिताक्षरा (याज्ञ ३·२६२).] (याज्ञ ३·२६२) सांगितले आहे.

आधुनिक काळात अस्पृश्यतेची रूढी नष्ट करण्याच्या प्रश्नाचा महात्मा गांधींसारख्या मोठमोठ्या विचारवंत पुढाऱ्यांनी विचार केला आहे आणि करीत आहेत. ह्या बाबतीतील तथाकथित अस्पृश्यांना महत्त्वाच्या वाटणाऱ्या गोष्टी म्हणजे शिक्षण संस्थांत शिक्षणाची सोय करणे, सार्वजनिक विहिरी, रस्ते, उपहारगृहे आणि खाणावळी यांत असलेले निर्बंध काढून टाकणे आणि सार्वजनिक देवालयांत प्रवेश करू देणे ह्या आहेत. ह्या सर्व बाबतींत उच्च वर्णांच्या काही उत्साही कार्यकर्त्यांनी बरेच कार्य केले आहे. ख्रिस्ती मिशनरीही अस्पृश्यांमध्ये चांगले कार्य करीत आहेत. परंतु त्यांचा प्रयत्न प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीने धर्मांतर करण्याकडे असतो. अस्पृश्यतेचे पूर्णपणे उच्चाटण होणे अजूनही फार दूरची गोष्ट आहे. त्या कामातील मुख्य अडथळा सर्वसाधारण जनतेतील शिक्षणाचा अभाव हा आहे. पुष्कळसा भाग अस्पृश्यांच्या स्वतःच्या प्रयत्नांवर अवलंबून आहे. अस्पृश्य लोक त्यांच्यामधील निरनिराळ्या जातींत आणि पोटभेदांत आपसात उघडपणे मिसळण्याला आणि भोजन करण्याला तयार होत नाहीत. हा प्रश्न फार व्यापक आहे आणि पिढ्यानपिढ्या वाढत आलेले हे भीतिदायक दुष्परिणाम एकदम निःशेष नाहीसे करता येणार नाहीत. अस्पृश्यांच्या पुढाऱ्यांनी जर भरमसाट मागण्या केल्या तर निदान २० कोटी सवर्ण हिंदु त्यांना निकराचा विरोध करतील आणि अस्पृश्यतेच्या रूढीतील दोष दूर करण्याच्या कार्याला अडथळा येईल.

अस्पृश्यवर्गातील सर्वच लोक अत्यंत दरिद्री असतात असे समजण्याचे कारण नाही. देशावरील महार आणि चांभार ह्यांच्यासारख्या काही विशिष्ट जातींतील बरेचसे लोक खेड्यांतील पुष्कळशा इतर सामान्य शेतकऱ्यांपेक्षा सांपत्तिक दृष्ट्या अधिक सुखी असतात. देशावरील महार हे वंशपरंपरेने चालणारे गावकामगार असतात.

——————

अनुक्रमणिका

# प्रकरण २९

# दास्य (गुलामगिरी)

(मू. ग्रं. पा. २.१८०-१८७)

बाबिलोन, इजिप्त, ग्रीस, रोम ह्यांच्यासारख्या सर्व प्राचीन राष्ट्रांत आणि युरोप खंडातील पुष्कळ राष्ट्रांत गुलामगिरीची पद्धती अस्तित्वात होती. अशा गुलामगिरीचे स्वरूप आर्थिक आणि सामाजिक जीवनातील एक बाब असे होते. परंतु इंग्लंड आणि अमेरिकेतील संयुक्त संस्थाने ह्यांच्यासारख्या पाश्चिमात्य ख्रिस्ती राष्ट्रांनी गुलामगिरीला धंद्याचे स्वरूप देऊन ती इतक्या भयंकर थराला नेली की कोणत्याही प्राचीन राष्ट्रांना त्या स्थितीची स्वप्नात देखील कल्पना आली नसेल. इंग्रज आणि अमेरिकन लोक गुलाम पकडून आणण्याकरिता आफ्रिकेवर स्वाऱ्या करीत आणि तेथील लोकांना पकडून अनिर्वचनीय अशा घाणेरड्या स्थितीत कसेतरी गलबतात कोंबून घालून आपल्या देशांत आणीत. त्यांच्यापैकी अर्धे अधिक लोक प्रवासातच मृत्यू पावत. आपल्या देशात आणल्यावर त्या गुलामांना एकाद्या जिनसाप्रमाणे मळेवाल्यांना आणि इतरांना विकीत. अशी ही निर्दयपणाची गुलामगिरीची पद्धती त्या देशातील ख्रिस्ती धर्माच्या सरकारांनी मान्य केली होती इतकेच नव्हे तर ख्रिस्ती धर्माच्या धर्माधिकाऱ्यांचाही त्या पद्धतीला पाठिंबा होता. अशी ही गुलामगिरीची पद्धती ब्रिटिश वसाहतीत इ.स. १८३३ साली आणि ब्रिटिशांच्या अमंलाखाली असलेल्या भारताच्या भागात कायद्याने इ. स. १८४३ मध्ये बंद करण्यात आली.

मागे वर्णन केल्याप्रमाणे प्राचीन भारतात आर्य आणि दास हे दोन प्रतिस्पर्धी गट होते. आणि त्यांची परस्परांशी युद्धे होत असत. अशा युद्धात जेव्हा दासांचा पराजय करून त्यांना पकडण्यात येई तेव्हा त्यांना गुलाम म्हणून वागविले जात असण्याचा संभव आहे. ‘दास’ हा शब्द ऋग्वेदामध्ये आर्यांचा प्रतिस्पर्धी ह्या अर्थाने आला आहे. परंतु गुलाम ह्या अर्थाने तो शब्द ऋग्वेदात फारच थोड्या ठिकाणी वापरलेला आहे. (ऋ. ८·५६·३; ८·५·३८; ८·१९·३२). तै. सं. ब्राह्मण आणि उपनिषदे ह्या वैदिक ग्रंथात अनेक दास आणि दासी अथवा मुली बक्षिस अथवा दान दिल्याची वर्णने आली आहेत. (तै. सं. ७·५·१०·१; २·२·६·३; बृह. उप. ४·४·२३; छा. उप. ७·२४·२) ह्यावरून असे दिसते की वैदिक काळात पुरुष आणि स्त्रिया ह्या दान देण्यासारख्या वस्तु झाल्या होत्या आणि म्हणून त्यांची स्थिती गुलामांसारखी असे.

उच्च तीन वर्णांच्या लोकांची सेवा करणे हेच शूद्राचे कर्तव्य असल्याचे आणि विधात्याने ब्राह्मणांची सेवा करण्याकरिताच शूद्राची उत्पत्ती केली असल्याचे जरी स्मृतींनी सांगितले असले तरी शूद्र हे त्या द्विजातीयांचे गुलाम नसत. एकाद्या द्विजातीय मनुष्याने विश्वजित् यज्ञ करून आपली सर्व संपत्ती दान दिली तरी त्याला त्याच्या पदरी असलेल्या शूद्राचे त्या शूद्राची इच्छा नसेल तर दान करता [शूद्रश्च न देय इत्यान्वादेशः । कुतः । धर्मशास्त्रत्वात् । ...... सोन्यस्मै दीयमानो नेच्छेदपि । न चानिच्छतस्तस्य स प्रभवति । शबर (जै. ६·७·६)] येत नसे. (जै. ६·७-६ आणि त्यावरील शबरभाष्य). धन्याने दासाला दयाळूपणाने वागवावे असे ध्येय असे. सम्राट अशोकाने शिलालेखात केलेल्या आज्ञापत्रात ज्या आज्ञा केल्या आहेत त्यात दास (गुलाम) आणि सेवक (पगारी नोकर) ह्यांना दयाळूपणाने वागवावे अशी आज्ञा केली आहे. शारीरिक शिक्षा देण्याच्या बाबतीत मनुने स्वतःचा पुत्र आणि दास ह्यांना समान योग्यतेचे मानले आहेत. ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकात भारतात आलेल्या मेग्यास्थेनिस ह्या ग्रीक मनुष्याने असे वर्णन केले आहे की भारतात कोणीही मनुष्य गुलाम बाळगीत नाही.

अनुक्रमणिका

त्याकाळी गुलामगिरीची पद्धती भारतात अस्तित्वात होती हे निःसंशय असल्यामुळे असे दिसते की ग्रीस देशात ज्याप्रमाणे गुलामांना वागवित असत त्यांच्या तुलनेने भारतात गुलामांना इतके चांगल्या रीतीने वागवीत असावेत की भारतात गुलाम नाहीत असे त्याला वाटले असावे.

कौटिल्याने (३·१३) म्हटले आहे [म्लेच्छानामदोषः प्रजां विक्रेतुमाधातुं वा । न त्वेवार्यस्य दासभावः । कौटिल्य ३·१३.] की म्लेच्छांनी आपली मुले विकली अथवा गहाण टाकली तरी त्यांना शासन होऊ शकत नाही, परंतु आर्यांना गुलाम बनविता येत नाही. जन्मतः गुलाम नसलेल्या एकाद्या अल्पवयी शूद्र, वैश्य, क्षत्रिय अथवा ब्राह्मण मुलाला त्याच्या एकाद्या नातलगाने विकले अथवा गहाण टाकले तर त्या नातलगाला त्या मुलाच्या वर्णाला अनुसरून वाढत्या प्रमाणात दंड होत असे.

कौटिल्याने निरनिराळ्या प्रकारच्या गुलामांचा उल्लेख केला आहे आणि त्या निरनिराळ्या प्रकारच्या गुलामांची मुक्तता कशी करावी ह्यासंबंधी नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, **ध्वजाहृत** म्हणजे युद्धात पाडाव केलेला, **आत्मविक्रयिन्** म्हणजे स्वतःच आपली विक्री करून घेणारा, **उदरदास** अथवा **गर्भदास** म्हणजे एकाद्या गुलामापासून एकाद्या दासीला झालेला, **आहितिक** म्हणजे दंड भरण्याकरिता अथवा न्यायालयाच्या हुकुमाने गुलाम केलेला. इत्यादी.

गुलाम असलेल्याही मुलीशी तिच्या इच्छेविरुद्ध संभोग करणाऱ्या तिच्या धन्याला शासन होत असे आणि तोच अपराध एकाद्या तिऱ्हाइताने केला तर त्याला अधिक शासन होत असे.

स्मृतिकारांपैकी नारद आणि कात्यायन ह्यांनी गुलामांना कसे वागवावे ह्या विषयी सविस्तर विवेचन केले आहे. (नारद अभ्युपेत्या शुश्रूषा ६-७; २९, ३० इ०; कात्यायन-अपरार्क पा. ७८९). दुसऱ्याची सेवा करणारे (**शुश्रूषक**) पाच प्रकारचे असल्याचे नारदाने सांगितले असून त्यांच्यापैकी **वैदिक विद्यार्थी, अन्तेवासिन्** (एकादा धंदा  शिकण्याकरिता राहिलेला उमेदवार), **अधिकर्मकृत्** (दुसऱ्या कामकऱ्यांवर देखरेख करणारा) आणि **भृतक** (मजुरीने कामावर लावलेला) ह्या चारांना **कर्मकर** असे म्हटले असून त्यांना फक्त स्वच्छ असलेलेच काम सांगता येते असे म्हटले आहे. पांचव्या प्रकारचा शुश्रूषक दास (गुलाम) असून त्याला निरनिराळ्या प्रकारची घाणेरडी अथवा गलिच्छ कामे सांगता येतात असे म्हटले आहे. नारदाने गुलामांचे पंधरा प्रकार सांगितले आहेत. गुलामाने करावयाच्या कामात घरापुढील जागा, उष्टीखळ, रस्ते, शेणाचे ढीग साफ करणे, मलमूत्र दूर वाहून नेणे, शरीराच्या गुह्य भागाला स्पर्श करणे अथवा खाजविणे, धन्याने सांगितलेली अंगसेवा करणे अशासारख्या कामांचा समावेश होतो.

याज्ञ. (२·१८३) आणि नारद (३९) ह्यांनी असे सांगितले आहे की कोणीही मनुष्य त्याच्या वर्णापेक्षा कनिष्ठ वर्णाच्या धन्याचाच गुलाम होऊ शकतो. ब्राह्मण इसमाला एकाद्या ब्राह्मण धन्याचाही गुलाम करिता येत नाही. परंतु जर एकाद्या ब्राह्मणाने आपण होऊन गुलामगिरी स्वीकारली तर त्याने चारित्र्यसंपन्न आणि वेदाध्ययन केलेल्या ब्राह्मणाला साजेसे शुद्ध काम करावे परंतु गलिच्छ काम करू नये.

एकाद्या गुलामाने आपल्या धन्याच्या प्राणावर आलेल्या संकटातून त्या धन्याला वाचविले तर तो गुलाम स्वतंत्र होतो असे नारद (३०) आणि याज्ञ. (२·१८२) यांनी सांगितले असून नारदाच्या मताप्रमाणे त्या गुलामाला धन्याच्या मिळकतीत पुत्राप्रमाणे वाटा मिळतो.

अनुक्रमणिका

जर एकाद्या धन्याने आपल्या दासीबरोबर संभोग केला आणि त्या संभोगापासून त्या दासीला अपत्य झाले तर त्या धन्याने त्या दासीची आणि तिच्या अपत्याची गुलामगिरीतून मुक्तता करावी असे कौटिल्य (३·१३) आणि कात्यायन (श्लो. ७२३) ह्यांनी सांगितले आहे.

गुलामाला आपल्या स्वतःची विक्री करून जे मिळाले असेल अथवा धन्याने आपखुषीने बक्षिस म्हणून जे काही त्या गुलामाला दिले असेल अशा वस्तूंखेरीज आपल्या मालकीची म्हणता येईल अशी काहीही संपत्ती गुलामाला असू शकत नाही. गुलामाच्या संपत्तीचा वारसाहक्क त्या गुलामाच्या नातलगांकडे जातो आणि असे नातलग नसेल तर त्या संपत्तीचा वारसा त्या गुलामाच्या धन्याकडे जातो. (कात्या. ७२४—विवादरत्ना. पा. १५०).

नारदाने (श्लोक ४२।४३) गुलामाच्या दास्यविमोचनाचा विधी पुढीलप्रमाणे वर्णन केला आहे :

जेव्हा एकाद्या गुलामावर त्याचा धनी संतुष्ट होऊन त्या गुलामाला स्वातंत्र्य देऊ इच्छितो तेव्हा त्या धन्याने त्या गुलामाच्या खांद्यावर ठेवलेले पाण्याने भरलेले मातीचे पात्र काढून घ्यावे आणि ते फोडावे, तांदुळाच्या अक्षतामिश्रित पाणी आणि फुले त्या गुलामाच्या मस्तकावर टाकावी, 'तू ह्यापुढे गुलाम नाहीस' असे शब्द तीन वेळा उच्चारावे आणि त्या गुलामाचे तोंड पूर्वेकडे करून त्याला रजा द्यावी.

गुलाम हा योग्य साक्षीदार नसतो, परंतु जेव्हा दुसरा कोणताही साक्षीदार मिळत नसेल तेव्हा गुलामाची साक्ष देता येते. (मनु. ८·७०; उशनस्—व्यवहारमयूख पा. ३७).

—————

अनुक्रमणिका

# प्रकरण ३०

## संस्कार

(मू. ग्रं. पा. २.१८८-२६७)

प्राचीन वैदिक ग्रंथांत 'संस्कार' हा शब्द क्वचितच आढळतो. जैमिनीच्या सूत्रांत 'यज्ञात करावयाची शुद्धिकरणाची एक क्रिया' ह्या अर्थाने संस्कार हा शब्द अनेक ठिकाणी आला आहे. जी क्रिया केली असता एकादी वस्तु अथवा मनुष्य काही विशिष्ट कार्याला उपयुक्त बनतो ती क्रिया म्हणजे संस्कार [संस्कारो नाम स भवति यस्मिञ्जाते पदार्थो भवति कस्यचिदर्थस्य । शबर (जै. ३·१·३) पा. ६६०.] अशी व्याख्या शबराचार्यांनी दिली आहे. (जै. ३·१·३ वरील भाष्य. पा. ६६०). असलेले दोष नाहीसे करून आणि नवीन गुण उत्पन्न करून अशा दोन प्रकारांनी [योग्यता च सर्वत्र द्विप्रकारा दोषापनयनेन गुणान्तरोपजनने च भवति । तन्त्रवार्तिक (जै. ३·८·९.) पा. १११५.] मनुष्याला पात्रता येते. संस्कारांच्या योगाने नवीन गुण उत्पन्न होतात आणि तपाच्या योगाने असलेले दोष नाहीसे होतात असे तंत्रवार्तिकात म्हटले आहे. (जै. ३·८·९ वरील भाष्य; पा. १११५) संस्कार हा शब्द बहुतेक गृह्यसूत्रांत आढळत नाही परंतु धर्मसूत्रांत तो शब्द आला आहे. (गौ. ८·८; आप. ध. सू. १·१·१·९; वसिष्ठ ४·१).

मनुष्याच्या अभ्युदयासाठी त्याच्या आंगच्या सुप्त गुणांचा विकास होण्याला संस्कारांची आवश्यकता असते असे फार प्राचीन काळापासून समजले जाई. ज्यांच्यावर असे संस्कार केले आहेत अशा व्यक्तींना त्या संस्कारांच्या योगाने समाजात एक प्रकारची विशेष पात्रता प्राप्त होऊ लागली. उपनयनासारख्या काही संस्कारांचा हेतु आध्यात्मिक आणि बौद्धिक असे. त्यांच्या योगाने अप्रगल्भ व्यक्तींना शिष्ट लोकांत प्रवेश मिळतो, वेदाध्ययनाचा मार्ग मोकळा होतो, काही विशिष्ट अधिकार प्राप्त होतो, काही विशिष्ट कर्तव्यांचेही बंधन लागते आणि मी काही विशिष्ट भूमिका स्वीकारली आहे आणि त्या भूमिकेला अनुरूप नियम पाळण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे असे तो संस्कार केलेल्या व्यक्तीला वाटू लागते. उपनयन हा सर्व संस्कारांत प्रमुख संस्कार आहे. उपनयन हा मुलाचा दुसरा जन्म असतो आणि म्हणून तीन उच्च वर्णांच्या लोकांना द्विजातीय म्हणतात आणि शूद्राला एकजाती म्हणतात. हा संस्कार ख्रिस्ती धर्मातील बॅप्टिझम्सारखा आहे आणि सेंट जॉन(३·३१) ह्यानेही असे म्हटले आहे की 'मनुष्याचा दुसरा जन्म झाल्याशिवाय त्याला परमेश्वराचे राज्य दिसणे शक्य नाही.' अत्रीने (१४१।१४२) म्हटले आहे की "एकाद्या [जन्मना ब्राह्मणो ज्ञेयः संस्कारैर्द्विज उच्यते । विद्यया याति विप्रत्वं श्रोत्रियस्त्रिभिरेव च । अत्रि १४१।१४२.] मनुष्याला ब्राह्मण कुलात जन्माला आल्यामुळे ब्राह्मण समजतात, संस्कार झाल्यामुळे त्याला द्विज (दोन जन्म घेतलेला) म्हणतात, वेदविद्येच्या योगाने तो विप्र ह्या योग्यतेला पोचतो आणि ह्या सर्वांच्या समुच्चयाच्या योगाने त्याला श्रोत्रिय म्हणतात." उपनयन होण्यापूर्वी एकाद्या मुलाने आपल्याला आवडेल तसे वर्णन करण्यास, बोलण्यास आणि खाण्यास हरकत नसते. मात्र महापातकाला हा नियम लागू पडत नाही.

संस्कारांसंबंधी मुख्यत्वेकरून विचार करावयाच्या गोष्टी म्हणजे संस्काराचा हेतु, संस्कारांचे भेद, त्यांची संख्या, प्रत्येक संस्कार करण्याची पद्धती, संस्कार करण्याचा अधिकार कोणाला असतो आणि संस्कार कोणकोणत्या व्यक्तीप्रीत्यर्थ करतात ह्या होत.

अनुक्रमणिका

मनूने (२·२७।२८) म्हटले आहे की द्विजातियांच्या बाबतीत मातापितरांकडून उत्पन्न झालेले बीज आणि गर्भाशय ह्यांच्या संबंधाच्या दोषांचे क्षालन गर्भारपणात होम केल्याने आणि जातकर्म संस्कार केल्याने होते, वेदाचे अध्ययन, व्रताचरण, होम, पुत्रोत्पत्ती, पंचमहायज्ञ ह्यांच्यासारख्या संस्कारांच्या योगाने मनुष्याचा देह ब्रह्मप्राप्तीला पात्र होतो. अशाच तऱ्हेची गर्भाधानप्रभृती निरनिराळ्या संस्कारांपासून प्राप्त होणाऱ्या फलांची वर्णने निरनिराळ्या ग्रंथांत केली आहेत. (याज्ञ. १·१३; हारीत– सं. तत्त्व. पा. ८५७). विवाह हाही एक संस्कार असून त्याच्या योगाने दोन व्यक्तींचे एकीकरण होऊन समाज चालू राहावा आणि आत्मसंयमन, स्वार्थत्याग, परस्पर सहकार्य ह्यांच्या योगाने पति-पत्नींची आत्मोन्नती व्हावी असा त्या संस्काराचा हेतु असतो.

संस्कारांचे ब्राहम्ण आणि दैव असे दोन प्रकार [द्विविधः संस्कारो भवति ब्राह्मो दैवश्च । गर्भाधानादिस्मार्तो ब्राह्मः । पाकयज्ञहविर्यज्ञसौम्याश्चेति देवः । हारीत (स्मृति चं. १ पा. १३)] हारीताने (स्मृतिचंद्रिका १ पा. १३) सांगितले आहेत. जे संस्कार फक्त स्मृतींनीच सांगितले आहेत त्यांना ब्राह्म म्हणतात आणि ते संस्कार केल्याने पवित्र झालेला मनुष्य ऋषींच्या योग्यतेचा होतो. पाकयज्ञ, हविर्यज्ञ आणि सोमयाग ह्यांच्यासारख्या धर्मसूत्रांत सांगितलेल्या संस्कारांना **दैव** संस्कार म्हणतात.

संस्कारांच्या संस्था निरनिराळ्या ग्रंथात भिन्न भिन्न सांगितल्या आहेत. गौतमाने (८·१४।२४) संस्कारांची संख्या ४० सांगितली आहे आणि आत्म्याचे गुण ८ सांगितले आहेत. गौतमाने संस्कार हा शब्द फारच विस्तृत अर्थाने योजिला असून त्याने सांगितलेल्या संस्कारांत वर उल्लेख केलेले गर्भाधान प्रभृती संस्कार, पंचमहायज्ञ, सात पाकयज्ञ, सात हविर्यज्ञ, सात सोमयज्ञ इत्यादी संस्कारांचा समावेश केला आहे. पुष्कळशा गृह्यसूत्रांत, धर्मसूत्रांत आणि स्मृतींत इतके संस्कार दिलेले नाहीत. वेदव्यासाने (१·१४।१५) १६ संस्कार सांगितले आहेत, मनु, याज्ञ. प्रभृतींनी संस्कारांची संख्या न सांगता गर्भाधानापासून अंत्येष्टिपर्यंतच्या संस्कारांचा उल्लेख केला आहे. बहुतेक निबंधग्रंथांत प्रमुख संस्कार १६ असल्याचे म्हटले आहे परंतु त्यांतही तपशीलात मतवैचित्र्य आहे. (स्मृत्यर्थसार पा. ३, संस्कार प्र. पा. १३५).

पुष्कळशा गृह्यसूत्रांत विवाहापासून प्रारंभ करून समावर्तनापर्यंतच्या संस्कारांचे विवेचन केले आहे. हिरण्यकेशी, भारद्वाज ह्यांच्यासारख्या काही गृह्य सूत्रांनी उपनयनापासून सुरुवात केली आहे. बहुतेक स्मृतिग्रंथांत आणि पुराणांत सामान्यतः संस्कार अशी संज्ञा ज्यांना दिली आहे अशा संस्कारांची नावे खाली दिली आहेत. ह्या यादीत गर्भाधानापासून सुरुवात करून मनुष्याच्या आयुष्यात ज्या अनुक्रमाने निरनिराळे संस्कार केले जातात त्या क्रमाने संस्कारांची नावे दिली आहेत.

गर्भाधान (निषेक, चतुर्थीकर्म, चतुर्थीहोम, ऋतुसंगमन), पुंसवन, गर्भरक्षण, सीमन्तोन्नयन, विष्णुबली, सोष्यन्तीकर्म (अथवा सोष्यन्ती होम), जातकर्म, उत्थान, नामकरण, निष्क्रमण, उपनिष्क्रमण, आदित्यदर्शन (अथवा निर्णयन), कर्णवेध, अन्नप्राशन, वर्षवर्धन (अथवा अब्दपूर्ती), चौल (चूडाकर्म अथवा चूडाकरण), विद्यारंभ, उपनयन, चार व्रते, केशान्त (अथवा गोदान), समावर्तन (अथवा स्नान), विवाह, पंचमहायज्ञ, उत्सर्ग, उपाकर्म, अंत्येष्टि.

सर्व द्विजातीय व्यक्तीच्या बाबतीत फक्त गर्भाधानापासून उपनयनापर्यंतचे संस्कार करणे अत्यंत आवश्यक असते. स्नान आणि विवाह हे संस्कार आवश्यक नसतात, कारण कोणालाही विद्यासमाप्तीनंतर ताबडतोब संन्याशी होता येत नसे. (स्मृति चं. १ पा. १३।१४; स्मृतिमुक्ता. वर्णाश्रमधर्म पा. ७३).

अनुक्रमणिका

शूद्रांच्या संस्कारांबद्दलही मतवैचित्र्य आहे. शूद्राला दहा संस्कार वेदमंत्ररहित करिता येतील असे वेदव्यासाने (१.१७) म्हटले आहे. शूद्राला गर्भाधानापासून चौलापर्यंतचे सात संस्कार करण्यास प्रत्यवाय नाही असे दुसऱ्या कोणी (बैजपाय गृह्य, सं. प्र. पा. १३३) म्हटले आहे. कोणी आठ संस्कार सर्व वर्णांकरिता करावयास सांगितले आहेत. (अपरार्क– याज्ञ. १–११।१२). शूद्राला मंत्र उच्चारण्याचा अधिकार नसल्यामुळे त्यांच्या संस्कारांतील विधीचे मंत्र ब्राह्मणाने म्हणावे. शूद्रांच्या सर्व धार्मिक विधींत पुराणांतील मंत्र घ्यावे आणि ते मंत्र ब्राह्मण पुरोहिताने म्हणावे असे शूलपाणीने (निर्णयसिंधु ३ पूर्वार्ध) म्हटले आहे.

अलिकडील काळात (गर्भाधान, उपनयन आणि विवाह ह्यांच्या व्यतिरिक्त) बहुतेक सर्व संस्कार लुप्त झाले आहेत आणि स्मृतींत सांगितल्याप्रमाणे आणि त्यांत सांगितलेल्या काळी ब्राह्मणांकडून देखील क्वचितच केले जातात. ब्राह्मण मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा अतिशय झपाट्याने वाढल्याकारणाने गर्भाधान संस्कारदेखील प्रचारातून मागे पडला आहे. नामकरण अन्नप्राशन हे संस्कार लौकिक स्वरूपात आणि पुरोहिताला न बोलाविता वेदमंत्रांचा उपयोग न करता करण्यात येतात. चौल संस्कार बहुतेक प्रांतांत उपनयनाच्या वेळी करतात. अंतरलेले संस्कार केव्हा करावे किंवा मुळीच करू नये ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. अंतरलेल्या संस्काराबद्दल करावयाच्या प्रायश्चिताच्या बाबतीत [आरभ्याधानमाचौलात्कालेतीते तु कर्मणाम् ।.... एतेष्वेकैकलोपे तु पाद कृच्छ्रः कार्यः । चौलेत्वर्धकृच्छ्रः । ... स्मृत्यर्थसार पा ३. ] सोपे पर्याय सांगण्यात आल्याने बरेच संस्कार न करण्याच्या प्रवृत्तीला प्रोत्साहन मिळाले. (स्मृत्यर्थसार पा. ३ इ०). आधुनिक काळात चौलापर्यंतच्या लोप झालेल्या संस्कारांबद्दल प्रायश्चित्त म्हणून (चौलापर्यंतच्या प्रत्येक संस्काराबद्दल चार आणे आणि चौलाबद्दल आठ आणे मिळून) उपाध्यायाला उपनयनाच्या वेळी दोन रुपये द्यावे लागतात.

आता निरनिराळ्या संस्कारांचे थोडक्यात वर्णन करू. हे वर्णन सामान्यतः आश्वलायन गृह्य, आपस्तंबगृह्य ह्यांच्यासारख्या गृह्य सूत्रांवरून देऊन त्या त्या विधींपैकी महत्त्वाच्या भागांचा निर्देश करण्यात येईल. उपनयन आणि विवाह ह्या हल्लीच्या काळात देखील प्रचारात असलेल्या दोन प्रमुख संस्कारांच्या बाबतीत जराशी विस्तृत तपशीलवार वर्णने करण्यात येतील.

परंतु तसे करण्यापूर्वी बहुतेक संस्कारांना सामान्य असणाऱ्या काही थोड्या गोष्टींचे विवेचन करू. पुष्कळशा विधीत होम आवश्यक असल्यामुळे सर्व गृह्यसूत्रांत नमुन्यादाखल एका होमाचे वर्णन दिलेले असते. म्हणून आश्व०गृह्यसूत्राच्या (१.३) आधारावर होमाचे त्रोटक वर्णन केले आहे. तसेच ज्याप्रमाणे बहुतेक गृह्यसंस्कारांमध्ये होमाची आवश्यकता असते त्याप्रमाणेच बहुतेक सर्व विधींत गणपतीपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन, नांदीश्राद्ध ह्यांच्यासारख्या काही गोष्टी आवश्यक असतात. म्हणून अशा गोष्टीचेही वर्णन करण्यात येईल.

### होम

आश्व. गृ. सूत्रात म्हटले आहे की जेव्हा एकाद्या मनुष्याला होम करण्याची इच्छा होईल तेव्हा त्याने एक स्थंडिल करून ते गोमयाने सारवावे. स्थंडिल हा वाळूचा अथवा भुसभुशीत मातीचा जरासा उंच असलेला चौरस ओटा असतो. त्याच्या चारी बाजू कमीत कमी एका बाणाएवढ्या लांबीच्या असाव्या. त्या स्थंडिलावर एका समिधेने एकूण सहा रेषा काढाव्या. नंतर पाणी प्रोक्षण करून त्या रेषांवर अग्नीची स्थापना करावी आणि दोन अथवा तीन समिधा अग्नीवर ठेवाव्या. नंतर परिसमूहन (अग्नीच्या सभोवतालची जागा पुसणे अथवा झाडणे), परिस्तरण (स्थंडिलासभोवती दर्भ मांडणे) ह्या क्रिया प्रथम पूर्वेला करून नंतर

अनुक्रमणिका

दक्षिणेला ह्या क्रमाने उत्तरेकडे पुऱ्या कराव्या. नंतर काही न बोलता अग्नीभोवती उदक प्रोक्षण करावे. दोन दर्भांच्या गाळण्याने (पवित्रांनी) आज्य म्हणजे तूप गाळावे. नंतर वीतभर लांबीचे दोन दर्भ आपल्या बोटांच्या चिमटीत धरावे, हात उताणे करावे आणि त्या दर्भांनी पश्चिमेकडून पूर्वेकडे आज्य शुद्ध करावे. एक वेळा ही क्रिया करताना एक मंत्र म्हणावा आणि दोन वेळा काही न बोलता ही क्रिया करावी. नंतर विशिष्ट देवतेचे नाव घेऊन 'स्वा हा' असे म्हणून अग्नीमध्ये आहुती द्याव्या. विशिष्ट देवतांचा निर्देश जेथे केला नसेल तेव्हा अग्नी, इंद्र, प्रजापती. विश्वेदेव, आणि ब्रह्मा ह्या देवता असतात. सर्वांच्या शेवटी अग्निस्विष्टकृत ह्या देवतेप्रीत्यर्थ एक आहुती द्यावी. आहुती अर्पण केल्यावर ती अमुक देवतेच्या प्रीत्यर्थ आहे, माझ्याकरिता नाही (न मम) असे म्हणावे. हे सर्वसामान्य वर्णन झाले. निरनिराळ्या गृह्यसूत्रांत ह्या तपशीलांत भेद आहेत.

खाली दिलेल्या आकृतीत स्थंडिलाची रचना, त्यावर काढावयाच्या रेषा, जयमानाची आणि मुख्य ऋत्विजाची बसावयाची जागा, होम करतेवेळी लागणाऱ्या निरनिराळ्या वस्तु इत्यादी तपशील दाखविला आहे. ज्या होमात फक्त तुपाच्या आहुती द्यावयाच्या असतात त्याला **आज्यहोम** म्हणतात. ज्या होमात शिजलेल्या अन्नाच्या आहुती द्यावयाच्या असतात त्यांना **पाकयज्ञ** म्हणतात.




सांप्रतकाळी स्थंडिलावर पाण्याने प्रोक्षण केल्यावर निरनिराळ्या संस्कारांत निरनिराळ्या नावांच्या अग्नीची स्थापना करतात. उदाहरणार्थ, उपनयन संस्कारात 'समुद्भव' नांवाच्या अग्नीची स्थापना करतात. विवाह संस्कारात 'योजक' नावाचा अग्नीची स्थापना करतात. (सं. रत्नमाला पा. ५८।५९, दानक्रिया कौमु. पा. २०५।२०६). नंतर पाण्याने प्रोक्षण केलेल्या समिधा अग्नीवर अर्पण करून, अग्नीवर वारा घालून त्याची ज्वाला काढतात आणि 'अग्नेवैश्वानर शांडिल्य, मेषध्वज, मम सन्मुखो वरदोभव' अशी अग्नीची प्रार्थना करतात. नंतर वर सांगितल्याप्रमाणे परिसमूहनादि क्रिया करतात.

सर्व **विधींचा प्रारंभ** कर्त्याने आचमन करून देशकालाचा निर्देश करून **संकल्प करून** होत असतो. संकल्पामध्ये करावयाच्या विधीचा आणि हेतूचा उच्चार केला जातो. त्यानंतर मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथात सांगितल्याप्रमाणे सर्व शुभकार्य करताना गणपतिपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन आणि नांदीश्राद्ध ह्या गोष्टी केल्या जातात. काही ग्रंथकारांच्या मताने ह्या सर्व गोष्टी मिळून एक संकल्प पुरतो आणि दुसऱ्या कोणाच्या मताने प्रत्येक गोष्टीकरता स्वतंत्र संकल्प करावा लागतो. सर्व शुभ विधीत कर्ता प्रथम स्नान करतो. विधी करावयाची जागी गोमयाने सारवितात, तिच्यावर रांगोळ्या काढतात. त्या जागेवर पाण्याने भरलेले व वर एक एक भांडे ठेवलेले दोन कलश मांडतात. पूजासामग्री उत्तरेच्या बाजूला ठेवतात.

सुशोभित केलेल्या जागेच्या पश्चिमेला दोन पाट मांडतात. एकावर विधी करणारा बसतो व त्याच्या उजव्या बाजूला पत्नी बसते. जर तो विधी विधिकर्त्याच्या मुलाला उद्देशून असेल तर तो मुलगा पत्नीच्या उजव्या बाजूला बसतो. पत्नीच्या उजव्या बाजूला थोड्या अंतरावर उत्तराभिमुख असे ब्राह्मण बसतात. विधिकर्ता आचमन करतो. काही विशिष्ट दिवशीच करावयाच्या विधिव्यतिरिक्त बाकीचे सर्व संस्कार आणि शुभ विधी काही विशिष्ट शुभ दिवशीच करावयाचे असतात. सर्व विधींत **वेदवेत्त्या ब्राह्मणांना भोजन** [यदाह कात्यायनः । गर्भाधानादिसर्वेषु ब्राह्मणान् भोजयेद्दश । अपरार्क पा. ३२ शुचिन्मन्त्रवतः सर्वकृत्येषु भोजयेत् । आप ध. सू. २·६·१५·९.] घातलेच पाहिजे असा नियम असतो. (आप. ध. सू. २·६·१५·९; अपरार्क पा. ३२)

## गणपतिपूजन

ह्या विधीत एक मूठभर तांदुळांवर ठेवलेल्या सुपारीवर गणेश देवतेचे आवाहन करावयाचे असते. ज्या 'गणांना त्वां गणपतिं०' 'ह्या ऋग्वेदातील मंत्राने गणेशाचे आवाहन करतात तो मंत्र ब्रह्मणस्पतीला उद्देशून म्हटलेला आहे. ब्रह्मणस्पती हे ब्रह्मविद्येच्या अधिष्ठात्र्या देवतेचे एक विशिष्ट नाव आहे. हत्तीचे मस्तक, उंदीरवाहन, मोठे पोट इत्यादी जे गणेश देवतेचे वर्णन मध्ययुगीन काळातील ग्रंथांत केलेले असते त्या वर्णनाचा वैदिक ग्रंथांत मुळीच उल्लेख केलेला नाही. सर्व शुभकर्मांच्या आरंभी गणेशपूजन करण्याविषयी गृह्य आणि धर्मसूत्रांत सांगितलेले नाही. विनायक हे दुष्टग्रह असल्याचे मानवगृह्यात (२·१४) सांगितले असून विनायकांच्या वक्रदृष्टीमुळे उत्पन्न होणारे परिणाम दूर करण्यासाठी शांतीसारखे विधी करावयास सांगितले आहेत. याज्ञ. ने (१·२७१—२९४) असे म्हटले आहे की विनायक हा ब्रह्मा आणि रुद्र यांनी गणांचा अधिपती नेमला असून तो केवळ विघ्ने उत्पन्न करण्याचेच कार्य करीत नसून मनुष्ये करीत असलेल्या कार्यांना आणि विधींना सिद्धी देण्याचेही कार्य करीत असतो. सर्व धर्मकृत्यांच्या आरंभी गणाधिपासह मातृकांचे पूजन करावे असे गोभिल स्मृतीमध्ये (१·१३) सांगितले आहे. गणेशाचे सर्वविश्रुत स्वरूप आणि त्याची पूजा ह्या गोष्टी इ. स. च्या ५ व्या अथवा ६ व्या शतकापूर्वी निश्चित होऊन गेल्या होत्या. गाथा सप्तशतीमध्ये (४·७२ आणि ५·३) गणेशाचा उल्लेख आहे. वामन, मत्स्य इत्यादी पुराणांत गणेशाचा उल्लेख आहे. (वामन अ. ५४; मत्स्य अ० २६०·५२।५५; अग्नि अ. ७१ आणि ३१३ इ०). भाद्रपद शुद्ध चतुर्थीला गणेशपूजन करावे असे भविष्यपुराणात सांगितले आहे. ७ व्या शतकाच्या सुमाराच्या काळातील एका शिलालेखात गणपतीचा उल्लेख आहे. गणेशपूजनाच्या विधीत आवाहनानंतर पूजन करतात, 'गणांना' ह्या मंत्राने प्रार्थना करावी, 'ओम् महागणपतेय नमः निर्विघ्नं कुरु' असे म्हणून वंदन करावे.

## पुण्याहवाचन

प्राचीन काळी हा एक फार साधा आणि लहानसा विधी होता. आप. ध. सू. मध्ये (१·४·१३.८) असे वर्णन केले आहे की सर्वसाधारणपणे नित्यव्यवहारात येणाऱ्या विवाहासारख्या सर्व शुभविधींमध्ये 'पुण्याहं', 'स्वस्ति', आणि 'ऋद्धिम्' ह्यांच्यासारख्या सर्व वाक्यांचा आरंभ 'ओम्' ह्या शब्दाने करावा, विधी कर्त्याने जमलेल्या ब्राह्मणांचा गंधपुष्पादिकांनी सत्कार करावा आणि मी जो हा अमूक विधी करण्याला आरंभ करणार आहे त्या विधीला आजचा दिवस शुभकारक असल्याची घोषणा करा अशी त्यांची प्रार्थना करावी. नंतर त्या ब्राह्मणांनी त्याला 'ओम्' हा दिवस शुभकारक असो (ओम् पुण्याहं) असे उत्तर द्यावे. अशाच रीतीने 'स्वस्ति पुण्याहम्', आणि 'ऋद्धि' हे शब्द घातलेली वाक्ये तीन तीन वेळा म्हणावीत. विधिकर्ता क्षत्रिय अथवा वैश्य वर्णाचा असल्यास ब्राह्मणांनी उत्तर देताना 'ओम्' हा शब्द घालू नये असे यमाने सांगितले आहे.

अनुक्रमणिका

## मातृकापूजन

माता अथवा मातृदेवता ह्यांचा उल्लेख गृह्यसूत्रांत केलेला नाही. परंतु ख्रिस्ती शकाच्या आरंभीच्या शतकांत मातृदेवतांची पूजा भारतातील सर्व भागांत प्रचलित होती हे अनेक पुराव्यांवरून सिद्ध करता येते. गोभिलगृह्यात गौरी, पद्मा प्रभृती १४ मातांची नावे दिली आहेत. मार्कंडेय, मत्स्य ह्या पुराणांत मातांची नावे दिली आहेत. बृहत्संहितेत मातृदेवतांच्या प्रतिमांचा उल्लेख आहे.

गृह्यसूत्रांत ज्यांचे वर्णन केलेले नाही असा हा मातृकापूजनाचा सांप्रदाय कसा उत्पन्न झाला हे सांगणे कठीण आहे. मोहेंजोदारो येथील उत्खननात मातादेवतांची चित्रे सर्वत्र आढळतात. (मार्शल याचा ग्रंथ पा. ४९।५२, चित्र क्र. १२,९४,९५). ह्यावरून असे दिसते की हा संप्रदाय अतिशय प्राचीन काळी प्रचलित असून बहुधा वैदिक धर्माच्या लोकांनी त्या सांप्रदायाचा स्वीकार करून त्याचा संबंध शिवाची पत्नी जी दुर्गा तिच्या पूजनाशी जोडला असावा. सोम तयार करीत असताना त्याचे रक्षण सात माता करीत असतात असे वर्णन ऋग्वेदामध्ये [जज्ञानं सप्त मातरो वेधामशासत श्रिये । ऋ. ९· १०२· ४.] (९·१०२·४) केले आहे परंतु त्या सात माता बहुधा सात छंद अथवा सात नद्या असाव्यात.

## नांदीश्राद्ध

ह्या विधीचे वर्णन पुढे श्राद्धाच्या प्रकरणात करण्यात येईल.

आता गर्भाधानप्रभृती निरनिराळ्या संस्कारांचे वर्णन करू.

## गर्भाधान

ह्या संस्काराचा उगम अत्यंत प्राचीन काळात झाला असल्याचे आढळून येते. ह्या संस्कारात अथर्ववेदातील एका सूक्तामधील ज्या मंत्रांचा उपयोग करण्यात येतो तेच मंत्र बृहदारण्यक उपनिषदात (६·४·१३, १९।२२) आले आहेत. त्या मंत्रात असे म्हटले आहे की प्रथम रजोदर्शनानंतर तीन दिवस पूर्ण झाल्यावर पत्नीने स्नान केल्यावर पतीने तिला साळी कांडावयास सांगावे आणि त्यातून निघालेल्या तांदुळाचा भात शिजवावा आणि त्यात तूप घालून त्याच्या आहुती अग्नीमध्ये अर्पण कराव्या. ज्या प्रकारचे अपत्य व्हावे अशी इच्छा असेल त्याला अनुसरून त्या भातात दुसरे काही विशिष्ट पदार्थ मिसळावेत. नंतर पतीने पत्नीला आलिंगन देऊन आपण दोघेजण एकमेकांचे पूरक आहोत आणि आपण पुत्र अपत्य उत्पन्न करण्याचा प्रयत्न करू असे म्हणावे आणि रतिसंभोग करावा. नंतर निरनिराळ्या देवतांना गर्भस्थापनेला साह्य करण्याची विनंती करावी आणि पृथ्वीच्या अंतर्भागी जसा अग्नी असतो त्याप्रमाणे मी तुझ्या ठिकाणी गर्भ स्थापन करीत आहे असे म्हणावे.

शांख्यायनगृह्यामध्ये (१·१८।१९) **चतुर्थीकर्म** नावाच्या संस्काराचे वर्णन केले आहे आणि तो विधी विवाह झाल्यानंतर तीन रात्री निघून गेल्यावर चौथ्या रात्री करावयाचा असतो. त्या विधीत **अध्यंडा** नावाच्या वनस्पतीचे मूळ कुटून तिचा रस पतीने पत्नीच्या नाकपुड्यात सिंचन करावयाचा असतो. वैखानसगृह्यात (३·९) ह्या विधीला **ऋतुसंगमन** असे नाव दिले आहे. त्यावरून विवाहाच्या वेळी पत्नी सामान्यतः रजोदर्शनाच्या वयाची आहे असे गृहीत धरले जात असावे. पुढे जेव्हा विवाहाची वयोमर्यादा खाली आली

अनुक्रमणिका

तेव्हा चतुर्थीकर्माचा विधी बंद झाला आणि तो विवाहानंतर पुष्कळ दिवसांनी केला जाऊ लागला आणि त्याला यथार्थत्वाने गर्भाधान असे नाव मिळाले.

प्राचीन काळी प्रत्येक कृत्याला धर्माचे अधिष्ठान असावे असा प्रयत्न करण्यात येई आणि म्हणून ह्या विधीला महत्त्व दिले जात असे. ह्या विधीच्या योग्य काळाबद्दल स्मृती आणि निबंधग्रंथ ह्यांत बराच तपशील दिलेला असतो. रजोदर्शनापासून १६ रात्री गर्भाधारणेचा स्वाभाविक काल असल्याचे मनु (३·४६) आणि याज्ञ. (१·७९) यांनी सांगितले आहे. चौथ्या रात्रीपासून सोळाव्या रात्रीपर्यंत प्रत्येक समरात्र पुत्र अपत्याकरिता अधिकाधिक उपयुक्त असल्याचे आप. गृ. मध्ये (९·१) म्हटले आहे. प्रथम रजोदर्शनानंतर ४ दिवस होऊन गेल्यावर गर्भाधानाचा विधी करावा आणि रजस्राव पूर्णपणे थांबला असेल तर चौथ्या दिवशीही तो करण्यास प्रत्यवाय नाही. अमावास्या, पौर्णिमा, अष्टमी वगैरे काही तिथी आणि मूळ आणि मघा ही नक्षत्रे वर्ज्य करावयाची असतात. प्रथम रजोदर्शनाला अशुभ तिथी, नक्षत्र, मास लागला असल्यास त्याबद्दल शांती करावी लागते. चौथ्या दिवशी स्नान केल्यावर स्त्रीने शुभ्र (अथवा स्वच्छ) वस्त्र परिधान करावे, अलंकार धारण करावे आणि फक्त योग्य अशा ब्राह्मणाबरोबरच संभाषण करावे. पतीशिवाय अन्य कोणी पुरुषाचे मुख पाहू नये कारण रजोधर्माच्या पाळीनंतर स्नान केल्यावर ज्या पुरुषाकडे स्त्री पाहते त्याच्यासारखे [यस्मादृतुस्नाता यादृशं पुरुष पश्येत्तादृशी प्रजा भवति । वैखानसस्मार्तसूत्र ३· ९.] अपत्य तिला होते असे वैखानस स्मार्त ३·९ मध्ये सांगितले आहे.

गर्भाधान हा संस्कार गर्भाचा असतो अथवा गर्भ धारण करणाऱ्या स्त्रीचा असतो ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. (विश्वरूप—याज्ञ १·११). तो संस्कार गर्भाचा असल्याचे ज्यांचे मत आहे त्यांच्या मते तो संस्कार प्रत्येक गर्भधारणेच्या वेळी केला पाहिजे आणि तो संस्कार स्त्रीचा असतो असे मत असणाऱ्यांच्या मते तो फक्त एक वेळच करावयाचा असतो.

गर्भाधान संस्कार हा होमाच्या स्वरूपाचा नाही असे काही ग्रंथकारांचे मत आहे. जेव्हा गर्भाधान विधी प्रथम रजोदर्शनाच्या वेळी केला जातो तेव्हा त्या निमित्त करावयाचा होम गृह्याग्निमध्ये केला जातो असे धर्मसिंधूमध्ये म्हटले आहे.

गर्भाधान संस्काराव्यतिरिक्त बाकीचे सर्व संस्कार पतीच्या अभावी त्याच्या कोणत्याही संपिडाला करिता येतात असे संस्कार प्रकाश ह्या ग्रंथात (पा. १६५) म्हटले आहे.

## पुंसवन

ह्या विधीच्या योगाने [शौनकोपि । पुमान् प्रसूयते येन तत्पुंसवनमीरितम् । संस्कार प्रकाश पा. १६६।६७.] पुरुष अपत्य जन्माला येते म्हणून त्याला पुंसवन हे नाव पडले आहे. (संस्कारप्रकाश पा. १६६।६७). हा शब्द अथर्ववेदात (६·११·१) आला असून त्याचा अर्थ 'पुरुष अपत्याला जन्म देणारा' असा आहे. [शमीमश्वत्थ आरूढस्तत्र पुंसुवनं कृतम् । अथर्व ६· ११· १.] आश्वलायनगृह्यामध्ये (१·१३·१।७) ह्या विधीचे वर्णन केले आहे. गरोदर पत्नीने गरोदरपणाच्या ३ ऱ्या महिन्यात पुनर्वसु नक्षत्रावर उपोषण करावे आणि पुष्य नक्षत्रावर तिच्या पतीने ज्या गाईचे वासरू त्या गाईच्याच रंगाचे असेल अशा गाईच्या एका ओंजळभर दह्यात जवाच्या २ शेंगा आणि एक दाणा घालून ते दही पत्नीला भक्षण करण्यास सांगावे. 'तू काय भक्षण करीत आहेत' असे पतीने विचारल्यावर पत्नीने 'पुंसवन' असे तीन वेळा उत्तर द्यावे. ह्याप्रमाणे पतीने पत्नीकडून तीन ओंजळी दही

भक्षण करवावे. ह्या तपशीलातही भिन्नभिन्न मते आहेत. जवाच्या ऐवजी दोन फळे असलेली वडाची डाहाळी कुटून त्याचा रस पतीने पत्नीच्या उजव्या नाकपुडीत घालावा आणि तसे करताना 'पुंसवना असि' हा मंत्र म्हणावा असे आप. गृ.मध्ये (१४·१०) सांगितले आहे. हा विधी केव्हा करावा ह्याविषयी गर्भारपणाच्या २ ऱ्या महिन्यापासून ८ व्या महिन्यापर्यंत निरनिराळे महिने सांगितले आहेत. ह्या विधीमध्ये पुत्र अपत्याचे महत्त्व दिसून येते. तसेच त्यातील गरोदर स्त्रीच्या नाकात काही विशिष्ट पदार्थ घालण्यासारखे भाग वैद्यकीय स्वरूपाचे आहेत. एका ग्रंथात गरोदर स्त्रीच्या मांडीवर कासवाचे पित्त ठेवावयास सांगितले आहे. हा विधी पतीच्या गैरहजेरीत करता येतो. (सं. रत्नमाला पा. ८१५). कोणी ह्या विधीत होम करावा असे सांगतात.

## अनवलोभन अथवा गर्भरक्षण

हा विधी पुंसवनाचाच एक भाग असल्याचे आणि ते दोन्ही विधी एकाच दिवशी केले जात असावेत असे दिसते. हा विधी केल्याने गर्भ पतन पावत नाही अथवा नाश पावत नाही.

आश्वलायनगृह्यात (१·१३·५।७) ह्याचे जे वर्णन केले आहे त्यावरून दूर्वाचा रस पत्नीच्या नाकात घालणे, तिच्या हृदयाला स्पर्श करणे आणि गर्भाचे रक्षण करण्याबद्दल देवांची प्रार्थना करणे हे त्या विधीतील प्रमुख भाग आहेत असे दिसून येते.

शांख्या. गृ. मध्ये (१·२१·१।३) **गर्भरक्षण** नावाचा एक विधी सांगितला असून तो अनवलोभनाचाच दुसरा पर्याय असावा. तो विधी गरोदरपणाच्या ४ थ्या महिन्यात करावयास सांगितला असून त्यात होम करावयाचा असतो आणि शिजलेल्या भाताच्या सहा आहुती द्यावयाच्या असतात आणि प्रत्येक आहुतीच्या पूर्वी मंत्र म्हटल्यावर पत्नीच्या अवयवांना तूप चोपडावयाचे असते. कोणी हा विधी प्रत्येक गर्भधारणेच्या वेळी करावयास सांगितला असून कोणाच्या मते तो पुंसवनासारखा फक्त एकदाच करावयाचा असतो. (आश्व. गृ. वरील कुमारिलाच्या कारिका १·६·५).

## सीमन्तोन्नयन

ह्या शब्दाचा अक्षरशः अर्थ 'एकाद्या स्त्रीच्या केसांचा भाग वरचे बाजूकडे पाडणे' असा होतो. काही ग्रंथांत ह्याला नुसती 'सीमन्त अथवा 'सीमन्तकरण' अशी नावे दिली आहेत. आश्व. गृह्यात (१·१४·१।९) असे वर्णन केले आहे की गरोदरपणाच्या ४ थ्या महिन्यात शुद्धपक्षात एकाद्या पुरुषसंज्ञा असलेल्या नक्षत्रावर हा विधी करावा. अग्नि स्थापन करून पतीने आज्याहुती अर्पण कराव्या. पत्नीने बैलाच्या कातड्यावर बसावे. पतीने समसंख्या फळे असलेला एकादा कच्च्या फळांचा घड अथवा तीन ठिपके असलेले साळपीस घेऊन त्याने पत्नीच्या केसांचा भांग करण्यास पुढील बाजूने सुरुवात करून वरच्या बाजूकडे करीत जावे. त्यावेळी वाद्ये वाजत असावी. गळ्याभोवती माळ बांधावी. मूग आणि तूप घालून शिजवलेला भात पत्नीला खाऊ घालावा. ह्या विधीत गर्भिणी स्त्रीचे मन प्रसन्न करणे हा हेतू आहे. पुरोहिताला एक बैल दक्षिणा द्यावी आणि ब्राह्मणभोजन घालावे असेही सांगितले आहे. हा विधी एकदाच करावा किंवा प्रत्येक गर्भधारणेच्या वेळी करावा ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. हा विधी गृह्यसूत्रांच्या काळी नुकताच प्रचारात आला असावा असे त्याबद्दलच्या तपशीलांतील मतवैचित्र्यावरून दिसून येते. हा विधी हळुहळू इतका मागे पडला की मनूने त्याचा निर्देशही केलेला नाही. सांप्रत काळी पश्चिम भारतात काही लोक आठव्या महिन्यात 'आठांगुळे' नावाचा एक विधी करतात. त्यात प्राचीन विधीमधील गळ्यात फळाची माळ घालण्यासारखे काही प्रकार आढळतात.

## विष्णुबली

हा विधी गरोदरपणाच्या ८ व्या महिन्यात करावयाचा असून त्याचा हेतु गर्भाला होणारे अपाय टळावे आणि स्त्रीची सुलभ प्रसूती व्हावी हा असतो. (वसिष्ठ आणि आश्वलायन-सं. प्रकाश पा. १७८). हा विधी प्रत्येक गर्भारपणी करावा असे काही ग्रंथकारांनी सांगितले आहे.

ह्या विधीत पूर्व दिवशी नांदीश्राद्ध करून होम करावयाचा असतो. शिजविलेल्या भाताच्या ६४ आहुती द्याव्या, एक भाताचा गोळा विष्णूला अर्पण करावा आणि त्याच शिजलेल्या भाताचे दोन गोळे पतिपत्नी यांनी भक्षण करावे. नंतर अग्निस्विष्टकृत याला उद्देशून आहुती द्यावी. दक्षिणा वाटावी आणि ब्राह्मणभोजन घालावे.

वैखानससूत्रात (३·१३) एक वेगळ्या प्रकारचा विधी सांगितला असून त्यात विष्णूला अभिषेक करणे, तुपाच्या १२ आहुती देणे, दुधात शिजविलेल्या भाताचा देवाला नैवेद्य अर्पण करणे, विष्णूच्या १२ नावांनी त्या भाताचे हवन करणे, अवशिष्ट भात पत्नीने भक्षण करणे असे प्रकार सांगितले आहेत.

## सोष्यंतिकर्म

हा विधी फार प्राचीन काळापासून चालत आला असावा. ऋग्वेदात (५·७८·७।९) आणि बृहदा. उप. मध्ये (६·४·२३) मध्ये त्याचा उल्लेख केला आहे. हा विधी प्रसूत होण्याच्या बेतात असलेल्या स्त्रीकरिता करावयाचा असतो. आप. गृह्यात असे वर्णन केले आहे की एकाद्या नदीच्या अथवा ओढ्याच्या प्रवाहातील प्रवाहाच्या दिशेने येणारे पाणी एका पूर्वी पाण्यात न बुडविलेल्या पात्रात पतीने भरून आणावे. पत्नीच्या पायांपाशी तुर्वती वनस्पतीचे झाड ठेवावे. एक मंत्र म्हणून प्रसूत होत असलेल्या स्त्रीच्या मस्तकाला पतीने दोन्ही हातांनी स्पर्श करावा आणि आणलेल्या पाण्याने तिच्या आंगावर प्रोक्षण करावे. गर्भाचे गुंठन बाहेर आले नाही, तर दुसरे दोन मंत्र म्हणून त्या पाण्याने तिच्या आंगावर प्रोक्षण करावे.

ह्या विधीचे परिणाम दृश्य स्वरूपाचे असल्यामुळे हा विधी संस्काराच्या स्वरूपाचा नाही असे काठकगृह्य ३३·१ वरील आदित्यदर्शनाच्या टीकेत म्हटले आहे. (इतर संस्कारांचे परिणाम अदृश्य स्वरूपाचे असतात असे मानले आहे.).

## जातकर्म

हा विधी अत्यंत प्राचीन काळापासून चालत आला असावा असे दिसते. पुत्राच्या जन्माच्या वेळी वैश्वानर इष्टि करावी आणि ज्या मुलाच्या जन्माच्या वेळी अशी इष्टि करण्यात येत तो मुलगा पवित्र, यशस्वी, अन्नाने समृद्ध, वीर्यवान् आणि पशुसंपन्न असा होतो असे तै. सं. मध्ये (२·२·५·३।४) सांगितले आहे. श. प. ब्रा. मध्ये (पौ. ध. ग्र. खंड ४४ पा. १२९) अर्भकाच्या नालछेदनापूर्वी करावयाचा एक विधी सांगितला आहे. बृहदा. उप. मध्ये (६·४·२४।२८) जातकर्माच्या विधीचे वर्णन केले आहे. त्यात पुढील भाग आहेत : (१) तूपमिश्रित दह्याचा होम करणे, (२) बालकाच्या उजव्या कानात ‘वाक्’ हा शब्द तीन वेळा उच्चारणे, (३) सुवर्णाच्या चमच्याने अथवा अंगठीने बालकाला दही, मध आणि तूप चाटविणे, (४) बालकाला गुप्त नाव ठेवणे, (५) बालकाला आईच्या अंगावर दूध पिण्यास देणे, (६) बालकाच्या मातेला संबोधणे, (७) ५ ब्राह्मण

मिळणे शक्य असल्यास त्यांना त्या बालकाच्या चारी बाजूने आणि वरून त्याच्यावर फुंकर घालावयास सांगणे आणि ब्राह्मण न मिळाल्यास बालकाच्या पित्याने स्वतःच त्या बालकाच्या सभोवार फिरून फुंकर घालणे.

हा विधी नालछेदनापूर्वी आणि बालकाला मातेने अंगावर दूध पिण्यास घेण्यापूर्वी करावयाचा असल्यामुळे तो जन्मानंतर लागलीच केला पाहिजे अशा स्वरूपाचा आहे. आश्व. गृह्यात (१.१५.१।४) असे सांगितले आहे की पुत्राचा जन्म झाला असता सर्वांच्या आधी पित्याने त्या पुत्राला स्पर्श करावा, मध आणि तूप यात सोने घासून ते मिश्रण त्या बालकाला चाटवावे, पुत्राच्या दोन्ही कानांजवळ आपले तोंड नेऊन 'मेधाजनन' (चातुर्य उत्पन्न करणारा) मंत्र म्हणावा, नंतर त्या पुत्राच्या दोन्ही खांद्यांना स्पर्श करावा आणि 'तू पाषाणासारखा, कुऱ्हाडीसारखा, सुवर्णासारखा आहेस, तू शंभर पावसाळे जग' अशा अर्थाचे मंत्र म्हणावे आणि बालकाला नाव ठेवण्याबद्दल आणि ऐश्वर्य देण्याबद्दल इंद्राची प्रार्थना करावी. नाव ठेवण्याच्या बाबतीत एक व्यावहारिक आणि एक गुप्त अशी दोन नावे ठेवावी. बालकाचा जन्म ज्या नक्षत्रावर झाला असेल त्या नक्षत्रावरून ठेवलेले नाव हे त्याचे गुप्त नाव असते आणि उपनयन होईपर्यंत हे नाव फक्त पित्याला माहित असावे. व्यावहारिक नाव जन्मानंतर १० व्या दिवशी ठेवावे.

जातकर्माच्या आनुषंगिक दुसऱ्या काही गोष्टी असतात. हिरण्यकेशीय आणि वैखानस गृह्यात (३·१४) असे सांगितले आहे की एका दगडावर कुऱ्हाड ठेवावी आणि त्या कुऱ्हाडीवर सोने ठेवावे. एका स्त्रीने त्या बालकाचे मस्तक पूर्वेकडे करून त्याला उचलून घ्यावे आणि पित्याने 'तू दगडासारखा हो, कुऱ्हाडीसारखा हो, सुवर्णासारखा हो' ह्या अर्थाचा मंत्र म्हणावा.

हा विधी क्रमाक्रमाने प्रचारातून गेला. सांप्रत काळी पश्चिम भारतात काही सुखवस्तु लोक 'पुत्रावण' नावाचा एक विधी बालकाच्या जन्मानंतर केव्हा केव्हा करतात त्या विधीमध्ये सोन्याच्या तुकड्याने अथवा सोन्याच्या अंगठीने बालकाला मध आणि तूप चाटवितात. धर्मसिंधूसारख्या अलिकडील काळात झालेल्या ग्रंथात असे सांगितले आहे की इतर विधींप्रमाणेच जातकर्माच्या विधीमध्येही स्वस्तिवाचन, पुण्याहवाचन आणि मातृकापूजन ही कृत्ये करणे आवश्यक असते. वद्य चतुर्दशी, अमावस्या ह्या तिथीवर, मूळ, आश्लेषा आणि ज्येष्ठा ह्या नक्षत्रावर आणि व्यतिपातासारख्या काही योगांवर बालकाचा जन्म झाला तर त्यामुळे होणाऱ्या अशुभ फलांची निष्कृती करण्याकरिता शांती करावयास सांगितले आहे.

हल्ली जन्मानंतर पाचव्या आणि सहाव्या दिवशी काही विधी करण्यात येतात. त्या विधींना सूत्रग्रंथात काही आधार नाही. हे विधी बहुधा पुराणांच्या काळात निर्माण झाले असावेत. त्या विधीत बालकाचा पिता अथवा दुसरा कोणी पुरुष रात्रीच्या पहिल्या प्रहरात स्नान करतो, मूठभर तांदुळाच्या राशीवर गणपती, जन्मदा, षष्ठिदेवी, भगवती (दुर्गा) ह्यांचे आवाहन करून त्यांची षोडशोपचारी पूजा करतो, ब्राह्मणांना तांबूल आणि दक्षिणा दिली जाते आणि कुटुंबातील मंडळी दुष्ट ग्रहांचे निवारण करण्याकरिता गाणी गात रात्रभर जागत बसतात.

बालकाविषयीच्या स्वाभाविक प्रेमापेक्षा ज्योतिषशास्त्रात सांगितलेल्या कारणाने उत्पन्न होणारी भीती इतकी प्रबल झाली की काही ग्रंथांत असे सांगितले आहे की काही विशिष्ट योगावर जन्मलेले बालक टाकून द्यावे अथवा निदान ८ वर्षांचे होईपर्यंत त्या बालकाचे तोंड पाहू नये. (नित्याचारपद्धती पा. २४४-२५५).

अनुक्रमणिका

## उत्थान (प्रसूतिशय्येचा त्याग करून मातेने उठणे) –

वैखानस गृह्यात (३·१८ असे सांगितले आहे की बालकाच्या जन्मानंतर १० व्या अथवा १२ व्या दिवशी पित्याने श्मश्रु करावी, स्नान करावे, घर शुद्ध करावे आण भिन्न गोत्राच्या व्यक्तीकडून सूतिकाग्निमध्ये होम करावा. नंतर सूतिकाग्नि बाजूला काढून ठेवावा आणि नंतर औपासन (गृह्याग्नी) परत आपल्या घरी आणून त्या अग्नीमध्ये वरुणाला उद्देशून आहुती द्याव्या. हिरण्यकेशीय आणि भारद्वाज ह्या दोन्ही ग्रंथांतदेखील उत्थानाच्या विधीचा उल्लेख केला आहे आणि सांगितले आहे की सूतिकाग्नी बाजूला काढून औपासन अग्नी घरात आणावा आणि त्यामध्ये काही मंत्रांचा उच्चार करून १२ अथवा ८ तुपाच्या आहुती द्याव्या.

## नामकरण (बालकाचे नाव ठेवण्याचा विधी)–

बालकाचे नाव कोणत्या वेळी ठेवावे ह्याविषयी अतिशय मतभेद आहेत आणि पुष्कळ ग्रंथांनी पुष्कळ पर्याय सुचविले आहेत. काही ग्रंथात जन्माच्या [तस्मात्पुत्रस्य जातस्य नाम कुर्यात्पाप्मानमेवास्य तदपहन्त्यपि द्वितीयमपि तृतीयम् । –शतपथ ६·१·३·९.] दिवशीच नाव ठेवावे असे सांगितले आहे. (शत. ब्रा. ६·१·३·९). काहींनी जन्मानंतर १० व्या, ११ व्या, १२ व्या, १८ व्या दिवशी, एक महिना झाल्यानंतर, १०० रात्री होऊन गेल्यानंतर, १ वर्ष झाल्यावर असे निरनिराळे पर्याय [**१० व्या दिवशी**–आप., बौधा. भारद्वाज, पारस्कर; **११ व्या दिवशी**–याज्ञ १·१२; **१०** अथवा **१२ व्या** बौ. गृ. २· १·२३; **१० रात्री, १०० रात्री** अथवा **१ वर्षानंतर**– गोभिल २· ८· ८ आणि खादिर २· ३·६; **१० रात्री, १२ रात्रीनंतर अथवा १८ व्या दिवशी** अथवा **१ महिन्यानंतर**– भविष्यपु०; **१० अथवा १२ व्या दिवशी अथवा त्यानंतर शुभमुहूर्तावर**– मनु २· ३०.] सांगितले आहेत, कोणी त्यानंतर एकदा शुभ मुहूर्त, नक्षत्र पाहून नाव ठेवावे असे म्हटले आहे. अलीकडली काळात सामान्यपणे जन्मानंतर १२ व्या दिवशी नामकरण करण्यात येते आणि त्या दिवशी सूत्रांत सांगितलेल्या सारखा कोणताही वैदिक विधी करण्यात येत नाही. फक्त बायका जमतात आणि कुटुंबातील पुरुषमंडळींचा अगोदर विचार घेऊन ठरविलेले नाव जाहीर करतात आणि त्या बालकाला पाळण्यात घालतात.

नावे किती ठेवावी ह्याबद्दल असेच मतवैचित्र्य आहे. ऋग्वेदात चार नावांचा उल्लेख केला आहे. ती चार नावे म्हणजे नक्षत्र नाव, गुप्त नाव, व्यावहारिक नाव आणि यज्ञ केल्यामुळे मिळणारे (सोमयाजी सारखे) नाव ही होत. एकाद्या व्यक्तीला तीन नावे असल्याची उदाहरणे वैदिक ग्रंथात आढळतात. (ऋ. ५·३३·८; ऐ. ब्रा. ३३·५). सामान्यतः एकाद्या व्यक्तीचा निर्देश वैदिक ग्रंथात दोन नावांनी (वैयक्तिक नाव आणि गोत्राचे नाव) केला जातो. एकाद्या ठिकाणी एकाद्या व्यक्तीला त्याच्या मातेच्या नावावरून पडलेले नाव जोडलेले असते. परंतु सर्वसाधारण पद्धती एकाद्याच्या नावाचा निर्देश त्याच्या पित्याच्या नावावरून पडलेल्या नावासह करण्याची असते.

नाव ठेवण्यासंबंधी अनेक नियम सांगितलेले आहेत. उदाहरणार्थ, आश्व. गृ. मध्ये (१·१५·४·१०) सांगितले आहे की मुलाचे नाव असे ठेवावे की त्याचे आद्यअक्षर उच्चारयुक्त असावे, मध्यंतरी एकादा अर्धस्वर असावा आणि शेवटी विसर्ग असावा, त्यात २ अथवा ४ अक्षरे असावी, पुरुष बालकाचे नाव नेहमी समसंख्या अक्षरे असलेले आणि स्त्री बालकाचे नाव विषमसंख्या अक्षरे असलेले असावे. बौधा. गृ. मध्ये (२·१·२८।२९) म्हटले आहे की मुलाचे नाव एकादा ऋषी, देवता अथवा एकादा पूर्वज ह्यांना अनुलक्षून तयार केलेले असावे. सध्याच्या काळी देखील भारतातील पुष्कळ भागांत प्रचलित असलेली नावे देवता,

अनुक्रमणिका

देवांचे अवतार ह्यांना अनुलक्षून असतात. पूर्वजाचे नाव ठेवण्याची पद्धती ही अस्तित्वात असून पुष्कळ वेळा पितामहाचे नाव त्याच्या नातवाला ठेवतात.

गुप्तनावाला **अभिवंदनीय नाम** असेही म्हणतात. कारण उपनयनानंतर नम्रतापूर्वक अभिवादन करताना नाव सांगण्याकरिता ह्या नावाचा उपयोग करावयाचा असतो. हे अभिवंदनीय नाव मुलाच्या जन्मनक्षत्रावरून अथवा त्या नक्षत्राच्या अधिष्ठात्र्या देवतेवरून ठेवलेले असावे असे कोणी सांगतात तर ते नाव मुलाच्या गोत्रावरून साधलेले असावे असे कोणाचे मत आहे. मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांत नक्षत्रावरून नावे बनविण्याचा दुसरा एक प्रकार सांगितला आहे. प्रत्येक नक्षत्राचे चार पाद करून प्रत्येक पादाला एक विशिष्ट अक्षर नियुक्त केलेले असते आणि त्या त्या पादात जन्म झालेल्या मुलाला त्या पादाकरिता योजलेल्या अक्षरावरून साधलेले नाव देतात. उदाहरणार्थ, अश्विनी नक्षत्राच्या चार पादांना 'चू, चे, चो, ला' ही अक्षरे नियुक्त केली आहेत आणि त्या चार पादांत जन्मलेल्या मुलांची नावे अनुक्रमे चूडामणि, चेदीश, चोलेश आणि लक्ष्मण अशी होतात. अशी गुप्तनावे हल्ली देखील उपनयनाच्या वेळी ब्रह्मचाऱ्याच्या कानात हलक्या आवाजात उच्चारतात आणि रोजच्या संध्यावंदनाचे वेळी म्हणावयाची (संध्येतील) नावे असे त्यांना म्हणतात.

मुलींच्या नावासंबंधीही काही विशिष्ट नियम आहेत. उदाहरणार्थ, मुलींच्या नावाच्या शेवटी 'आ' अथवा 'दा' अथवा 'ई' अथवा एकादा दीर्घ स्वर असावा असे निरनिराळ्या ग्रंथकारांनी सांगितले [तीन अक्षरी– (मानवगृह्य १·१८); अंतीं 'आ' अक्षर असावे– (पारस्कर आणि वराहगृह्य); अंती 'दा' अक्षर– (गोभिल आणि मानव); अंतीं 'ई' अक्षर– (बैजवाप); अंतीं दीर्घस्वर असावा (बौ. गृह्यशेषसूत्र).] आहे.

गृह्यसूत्रांतील हे गुंतागुंतीचे नियम गाळून मनूने (२·३१।३२) काही सोपे नियम दिले आहेत. उदाहरणार्थ, ब्राह्मणांच्या नावापुढे शर्मन्, क्षत्रियांच्या नावापुढे वर्मन्, वैश्यांच्या नावापुढे भूति अथवा दत्त आणि शूद्रांच्या नावापुढे दास असे पद असावे.

आश्व. गृ. मध्ये नामकरणाच्या विधीचे वर्णन केलेले नाही. काही ग्रंथांनी असे सांगितले आहे की पित्याने एका काशाच्या पात्रात तांदूळ पसरून त्यावर सोन्याच्या लेखणीने श्रीगणपतयेनमः अशी अक्षरे लिहून कुलदेवतेवरून ठेवलेले नाव, मासगाव, आणि व्यावहारिक नाव अशी चार नावे लिहावी.

काही ग्रंथात नामकरणानंतर लागलीच काही दुसरे विधी सांगितले आहेत. उदाहरणार्थ, आश्व.गृ. मध्ये (१·१५·११) असे सांगितले आहे की प्रवासातून परत आलेल्या पित्याने मुलाचे मस्तक आपल्या हातात धरावे आणि 'अंगादंगात्०' हा मंत्र म्हणून मुलाचे मस्तक तीन वेळा हुंगावे अथवा तीन वेळा चुंबन घ्यावे. मुलीच्या बाबतीत तिचे मस्तक हुंगावे अथवा हुंगू नये आणि तिच्या कानात मंत्र म्हणू नये. ह्यावरून मुलीपेक्षा मुलाला अधिक महत्त्व दिले जात असे, असे दिसते.

### कर्णवेध (मुलाच्या कानाच्या खालच्या पाळ्यांना भोके पाडणे)

बहुतेक सर्व प्राचीन सूत्रग्रंथांत हा विधी गाळलेला असतो. सांप्रतकाळी हा विधी सामान्यतः जन्मानंतरच्या १२ व्या दिवशी करण्यात येतो. निरनिराळ्या ग्रंथांत जन्मानंतर १० वा, १२ वा, १६ वा दिवस अथवा ७ वा अथवा १० वा महिना यात हा विधी करावा असे सांगितले आहे. गृह्यपरिशिष्टात असे सांगितले

आहे की दिवसाच्या पूर्व भागात पित्याने पूर्वाभिमुख बसावे आणि 'भद्रंकर्णेभिः०' हा मंत्र बालकाच्या पहिल्याने उजव्या कानात आणि नंतर डाव्या कानात उच्चारावा. (कर्णवेध करताना) मुलगा रडू लागला तर त्याला मध चाटावयास द्यावी. विधी पुरा झाल्यावर ब्राह्मणभोजन घालावे. सांप्रतकाळी कान टोचण्याकरिता सोनाराला बोलवितात आणि तो सोन्याच्या टोकदार तारेने कानाच्या खालच्या पाळ्यांना भोके पाडतो आणि त्या तारेचे टोक वळवून तिचे एक वाटोळे कडे बनवितो, मुलींच्या बाबतीत त्यांचा डावा कान प्रथम टोचतात. प्राचीन काळी देखील मुलाचे कान टोचीत असत असे निरुक्तातील उल्लेखावरून दिसून येते. (निरुक्त २·४).

## निष्क्रमण (मुलाला घराबाहेर उघड्या जागी नेणे)

हा एक लहानसा विधी आहे. बहुतेक ग्रंथकारांच्या मताप्रमाणे हा विधी जन्मानंतर ४ थ्या महिन्यात करावयाचा असतो. परंतु काहींनी तो जन्मानंतर १२ व्या दिवशीही करावा असे सांगितले आहे. ह्या विधीमध्ये सूर्याला उद्देशून अन्नाच्या आहुती देणे, सूर्याची पूजा करणे, बालकाचे तोंड सूर्याकडे करून त्याला सूर्यासमोर धरणे ह्या मुख्य क्रिया असून ब्राह्मणाला एक बैल दक्षिणा म्हणून देण्यास आणि शेवटी ब्राह्मणभोजन घालण्यास सांगितले आहे. गोभिलगृह्यात (२·८·१।१७) एक **चंद्रदर्शनाचा** विधी जन्मानंतर तिसऱ्या शुक्ल पक्षात तृतीयेच्या दिवशी करावयास सांगितला आहे. ह्या विधीत सायंकाळी चंद्राची पूजा करणे, बालकाला कपडे घालून घराबाहेर नेऊन मातेने पित्याजवळ देणे आणि मागाहून पित्याने मातेजवळ देणे ह्या क्रिया असतात. संस्कारप्रकाशात ह्या विधीचे अतिशय विस्तृत वर्णन केले असून तो मोठ्या समारंभाने आणि आनंदाने करावा असे सांगितले आहे. यमाच्या एका [ततस्तृतीये कर्तव्यं मासि सूर्यस्त दर्शनम् । चतुर्थे मासि कर्तव्यं शिशोश्चंद्रस्य दर्शनम् ॥ यम (संस्कारप्रकाश पा. १५०).] वचनात (संस्कारप्र. पा. २५०) जन्मापासून तिसऱ्या महिन्यात **सूर्यदर्शन** करावे आणि चौथ्या महिन्यात **चंद्रदर्शन** करावे असे सांगितले आहे.

## अन्नप्राशन (बालकाला प्रथमतः शिजवलेले अन्न खाऊ घालणे)

हा संस्कार जन्मानंतरच्या ६ व्या महिन्यात करावा असे बहुतेक ग्रंथकारांनी सांगितला आहे. कोणीकोणी हा विधी अजिबात गाळला आहे. दुसऱ्या कोणी तो ५ व्या अथवा ६ व्या महिन्यात, अथवा पहिल्या वर्षाचे अखेरीला अथवा बालकाला पहिले दात येऊ लागले म्हणजे करावा असे सांगितले आहे. बालकाला अन्नाची चव घेऊ देणे हा ह्या संस्काराचा मुख्य भाग आहे. मुलाच्या आंगात कोणते गुण यावेत अशी अपेक्षा असेल त्याप्रमाणे त्याला बोकडाचे मांस, तित्तिरपक्ष्याचे मांस, मासे अथवा शिजवलेला भात ह्यापैकी एक प्रकारचे अन्न घेऊन त्यात दही, मध, आणि तूप मिसळावे आणि ते त्या बालकाला खाऊ घालावे. नंतर अग्नीमध्ये चार आहुती द्याव्या आणि त्या बालकाला उत्तरेकडे अग्रे असलेल्या दर्भावर ठेवावे. उरलेले अन्न मातेने भक्षण करावे, ब्राह्मणभोजन घालावे आणि त्यांना त्या बालकाला आशीर्वाद देण्यास सांगावे. काही ग्रंथांनी मांसाबद्दल मुळीच उल्लेख केला नाही.

मार्कंडेय पुराणात (अपरार्क पा. २८) एक मजेदार विधी सांगितला आहे. ज्या दिवशी अन्नप्राशन संस्कार करावयाचा असेल त्या दिवशी घरात पूजा केलेल्या देवांच्यासमोर निरनिराळ्या धंद्यांची आणि शिल्पांची हत्यारे, शस्त्रे आणि शास्त्रांचे ग्रंथ इकडे तिकडे पसरून मांडून ठेवावे आणि त्या बालकाला त्या जिनसांच्या मधून रांगत सोडावे. बालक ज्या वस्तूला प्रथम हात लावील तिकडे लक्ष ठेवावे आणि त्या वस्तूंशी संबंध असलेला व्यवसाय करून ते बालक आपली उपजीविका चालवील असे समजावे.

अनुक्रमणिका

## वर्षवर्धन अथवा अब्दपूर्ती

मुलाचा जन्म ज्या तिथीला झाला असेल त्या तिथीला एक वर्षपर्यंत प्रत्येक महिन्यात काही समारंभ करावा आणि पुढे जन्मभर दरवर्षी त्या तिथीला काही समारंभ करावा असे काही सूत्रांत सांगितले आहे. (गौभि. गृ. २·८·१९।२०; शां. गृ. १·२५·१०।११ इ.) ह्या विधीमध्ये बालकाच्या जन्मनक्षत्राच्या अधिष्ठात्र्या देवतेला आणि त्या नक्षत्राला उद्देशून होम करावयाचा असतो. तसेच चिरंजीव मानलेल्या मार्कंडेयाची आणि इतर सात चिरजीविनांची पूजा करावी असे काही ग्रंथात सांगितले आहे. (कृत्यरत्ना. पा. ५४०, नित्याचारपद्धती पा. ६२१। २४). सांप्रतकाळी बालकाचा वाढदिवस एक वर्ष पुरे होईपर्यंत प्रत्येक जन्मतिथीला आणि वर्ष पूर्ण झाल्यादिवशी बायका साजरा करतात. त्या दिवशी त्या बालकाला घरातील मुख्य खांबाजवळ (मुहूर्त मेढीजवळ) अथवा ताक घुसळण्याच्या खांबाजवळ उभे करतात. काही ग्रंथांत ह्या समारंभाला 'अब्दपूर्ती' अथवा 'आयुर्वर्धापन' अशी नावे दिली आहेत. (निर्णयसिंधु, संस्कारप्र०. सं. र. मा.).

राजांच्या बाबतीत ज्या दिवशी राज्याभिषेक झाला त्या तिथीला दरवर्षी उत्सव करावा असे काही ग्रंथांत सांगितले आहे. (नित्याचारपद्धती पा. ६२१).

## चौल अथवा चूडाकर्म अथवा चूडाकरण
### (बालकाच्या मस्तकावरील केस पहिल्या वेळी कापणे)

ह्या संस्काराचा उल्लेख सर्व ग्रंथकारांनी केला आहे. डोक्याच्या बाकीच्या भागावरील केस काढून जो एक केसाचा झुपका शिल्लक ठेवतात त्याला चूडा (अथवा शिखा अथवा शेंडी) असे म्हणतात. चूडाकर्म म्हणजे बालकाच्या जन्मानंतर पहिल्या वेळी त्याची चूडा ठेवावयाचा विधी. चूडा ह्या शब्दावरून 'चौड' असा शब्द बनतो आणि त्याचा अर्थ चूडा ठेवण्याच्या हेतून केलेला विधी असा होतो. 'ड' आणि 'ल' ह्यांचा परस्परांच्या जागी उपयोग केला जातो म्हणून चौडच्या ऐवजी चौल असे ["चूडाप्रयोजनमस्य चौड्म।' 'यमकश्लेषचित्रेषु बवर्योर्डलयोर्न भित्' । –पाणि ५·१·९७ वरील महाभाष्य खंड २ पा. ३६२.] ह्या विधीचे नाव बनले. (पाणि. ५·१·९७) वरील महाभाष्य पा. ३६२).

चौल संस्कार जन्मानंतर तिसऱ्या वर्षी करावा असे बऱ्याच ग्रंथकारांचे मत आहे (बौ. गृ. २·४; पार. गृ. २·१; मनु १·३५ इ०). परंतु तो विधी पहिल्या वर्षी अथवा ज्या वर्षी करण्याचा कुलाचार असेल त्यावर्षी करावा असे काहींनी [तिसऱ्या वर्षी अथवा कुलाचारानुसार– (आश्व. आणि वराहगृह्य); कुलाचारानुसार– (पारस्कर आणि याज्ञ.); १ ल्या, २ ऱ्या अथवा ३ ऱ्या वर्षी– (यम-अपरार्क पा. २९); ३ ऱ्या अथवा ५ व्या वर्षी– (शंखलि. अपरार्क पा. २९); उपनयनाच्या वेळी (सद्गुरुशिष्य– सं. प्र. पा. २९६, नारायण, आश्व. गृ. वरील टीका १· १७· १.)] सांगितले असून १, २, ३ अथवा ५ ह्या वर्षीही करण्यास अनुमती दिली आहे. वेदामध्ये (ऋ. ४·७५·१७; तै. सं. ४·६·४·५) अनेक शिखा धारण केलेल्या मुलाचा उल्लेख केला आहे.

ह्या विधीतील मुख्य भाग बालकाचे केस वस्तऱ्याने कापणे हा असून होम करणे, ब्राह्मणाला भोजन घालणे, त्यांचे आशीर्वाद घेणे, त्यांना दक्षिणा देणे आणि कापलेले केस कोणालाही सापडणार नाही अशा रीतीने त्यांची विल्हेवाट लावणे ही आनुषंगिक कृत्ये असतात. केस कापणाऱ्या नापिताला एक तिळाची भाकरी आणि एक चांगले वस्त्र द्यावे असे काही ग्रंथांत सांगितले आहे. (काठक गृ. आणि मानव गृ.). केस कापण्याचा वस्तरा लोहाचा (तांब्याचा) असे.

अनुक्रमणिका

मस्तकावर किती शिखा ठेवाव्या आणि कोणकोणत्या भागात ठेवाव्या ह्याविषयी भिन्नभिन्न मते आहेत. उदाहरणार्थ, बौद्धायनाने (२·४) १, ३ अथवा ५ अथवा कुलाचार असेल तितक्या शिखा ठेवाव्या असे सांगितले आहे. आपस्तंबाने मुलाच्या गोत्रातील प्रवरांच्या संख्येइतक्या शिखा ठेवाव्या असे सांगितले आहे. काही [दक्षिणतः कपुजा वसिष्ठानाम् । उभयोऽत्रिकाश्यपानाम् । मुण्डा भृगवः । पञ्चचूडा अङ्गिरसः । .... काठकगृह्य ४०. २।८.] विशिष्ट गोत्रातील लोकांत विशिष्ट प्रकारच्या शिखा ठेवण्याचे प्रघात असत.

अर्वाचीन काळापर्यंत शिखा ही सर्व हिंदूंची बाह्य खूण असे. शिखा नसताना केलेले कर्म निष्फल होते आणि कोणी अज्ञानपणे अथवा मूर्खपणाने शिखा कापून टाकील तर त्याची शुद्धी तप्तकृच्छ्र प्रायश्चित्ताने होईल असे हारीताने (संस्कारप्र० पा. ३१६) सांगितले आहे.

सध्याच्या काळी मोठ्या गावातील आणि शहरातील पुरुषांनी ही शिखा ठेवण्याची चाल टाकून दिली असून ते पाश्चिमात्य पद्धतीने सर्व मस्तकभर केस राखू लागले आहेत.

आधुनिक काळात चूडाकरणाचा विधी झालाच तर तो बहुधा उपनयनाचे दिवशी केला जातो. मुलींच्या शरीराची शुद्धी व्हावी म्हणून जातकर्मापासून चौलापर्यंतचे सर्व संस्कार मुलींकरताही करावे परंतु त्यात मंत्रोच्चार करू नये असे आश्वगृह्य, मनु. याज्ञ. यांनी सांगितले आहे (आश्वगृ. १·१७·१८; मनु २·६६; याज्ञ. १·१३). आधुनिक काळीदेखील काही काही जातीत मुलीचे पहिले केस अपवित्र असल्याचे मानतात आणि म्हणून त्या अगदी लहान असताना त्यांच्या मस्तकाचे एक वेळ मुंडन करतात.

**विद्यारंभ :—** उपनयनाच्यापूर्वी मुलांच्या शिक्षणाची काय व्यवस्था करीत असत ह्याबद्दल सूत्रांत काहीही सांगितलेले नसते. कौटिल्याने (१·५) राजपुत्राच्या विद्यारंभाचा उल्लेख केला आहे. निदान इ. स. च्या पहिल्या काही शतकांपासून विद्यारंभ नावाचा एक समारंभ केला जात असे. मार्कंडेयपुराणात (अपरार्क पा. ३०।३१) असे सांगितले आहे की हा समारंभ कार्तिक शु. १२ पासून आषाढ शु. १२ पर्यंत कोणत्याही दिवशी करावा, परंतु प्रतिपदा, षष्ठी वगैरे काही तिथी आणि मंगळवार आणि शनिवार हे वार वर्ज्य करावे. विष्णु, लक्ष्मी सरस्वती इत्यादी देवतांची पूजा करावी आणि त्यांना उद्देशून आहुती द्याव्या, ब्राह्मणांचा सत्कार करावा, गुरूने पूर्वाभिमुख आणि मुलाने पश्चिमाभिमुख बसावे. गुरूने मुलाला पहिला पाठ शिकविण्यास प्रारंभ करावा, ब्राह्मणांनी मुलाला आशीर्वाद द्यावे. त्यानंतर विद्याध्ययन अनध्यायाच्या (काही विशिष्ट सुटीच्या) दिवशी बंद ठेवावे.

आधुनिक काळातील रूढी अशी आहे की एकाद्या शुभ दिवशी, सामान्यतः आश्विन शु. १० (विजयादशमी) च्या दिवशी मुळाक्षरे शिकविण्यास आरंभ करतात. सरस्वती आणि गणपती ह्यांचे पूजन करतात, शिक्षकाचा सत्कार केला जातो, आणि मुलाला 'ओम् नमः सिद्धं ' हे शब्द घोकावयास आणि स्लेट पाटीवर लिहावयास सांगतात. नंतर त्याला अ, आ, प्रभृती मुळाक्षरे शिकवितात. संस्कार रत्नमाला, (पा. ९०६) ह्यां ग्रंथाने ह्या समारंभाला 'अक्षरस्वीकार' असे अन्वर्थक नाव दिले आहे. त्या ग्रंथात उद्धृत केलेल्या गर्गाच्या एका वचनात होम करावा आणि सरस्वती, विघ्नेश (गणपती), आपली विशिष्ट देवता इत्यादी देवतांना उद्देशून तुपाच्या आहुती द्याव्या असे सांगितले आहे.

—————

अनुक्रमणिका

# प्रकरण ३१

## उपनयन

(मू. ग्रं. पा. २. २६८-१४५)

उपनयन ह्या शब्दाचा अक्षरशः अर्थ 'जवळ घेऊन जाणे' असा आहे. ह्या विधीचा मूळचा अर्थ 'आचार्याजवळ (अध्ययनाकरिता) घेऊन जाणे' असा होता. 'नवशिक्या विद्यार्थ्याचा विद्यार्थिदशेत प्रवेश करून देणे' असाही त्या विधीचा अर्थ असू शकेल आणि काही गृह्यसूत्रांत तो अर्थ स्पष्टपणे दर्शित केला आहे. (हिर. गृ. १·५·२; पार. गृ. २·२; गोभि. गृ. २·१०-२१; शत. ब्रा. ११·५·४·१). ह्या विधीला कोणी 'उपनय' असे म्हटले असून उपनय, उपनयन, मौंजीबंधन, बटुकरण आणि व्रतबंध हे समानार्थी शब्द असल्याचे काठकगृह्यावरील (४१·१) आदित्यदर्शन ह्या टीकाकाराने सांगितले आहे.

भारतात रहात असलेल्या पारशी धर्माच्या लोकांच्या नवज्योत नावाच्या विधीमध्ये कमरेभोवती दोरी गुंडाळणे, सदरा घालणे ह्यासारखे काही प्रकार उपनयनातील विधीशी जुळते असतात, त्यावरून ह्या संस्काराचे मूळ इंडो-इरानियन (म्हणजे भारतीय आर्य आणि इराणामधील प्राचीन लोक ह्यांना साधारण असणाऱ्या) संस्कृतीमध्ये असावे असे वाटते.

मुलाला आचार्याजवळ नेणे म्हणजे उपनयन अथवा ज्या विधीत मुलाला आचार्याजवळ नेतात तो विधी म्हणजे उपनयन अशी दोन प्रकारची उपपत्ती लावता येईल. प्रथमतः मुलाला आचार्याजवळ घेऊन जात असत आणि पुढे जेव्हा त्या विधीत विस्तृत समारंभ होऊ लागला तेव्हा उपनयन हा एक विधी बनला. ज्याला विद्या मिळविण्याची इच्छा असेल त्याने उपनयन हा संस्कार करावा असे श्रुतीने सांगितले आहे असे आप. गृ. (१·१·१·१९) मध्ये म्हटले असून त्या सूत्राचा अर्थ "ज्या संस्कारात श्रुतीचा (म्हणजे गायत्री मंत्राचा) उपदेश केला जातो असा संस्कार करावा" असाही होऊ शकेल. ह्या दुसऱ्या प्रकारच्या अर्थाप्रमाणे पवित्र गायत्री मंत्राचा उपदेश हाच त्या विधीतील मुख्य भाग असतो. ब्रह्मचारी म्हणून गुरूकडे राहिल्याने ऋषींच्या ऋणापासून मनुष्य मुक्त होतो असे तै [जायमानो ह वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणया जायते ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्य एष वा अनृणो यः पुत्री यज्वा ब्रह्मचारिवासि । तै. सं. ६·३·१०·५] सं. मध्ये (६·३.१०·५) म्हटले आहे. अथर्ववेदामध्ये (१०·७) **ब्रह्मचारी** (वेदाध्ययन करणारा विद्यार्थी) आणि **ब्रह्मचर्य** ह्यांची अतिशय प्रशंसा केली असून हरणाचे कातडे पांघरणे, मेखला बांधणे, समिधा अर्पण करणे, भिक्षा मागणे, अति श्रमाचे आयुष्य घालविणे, संयमन करणे ह्यांच्यासारखी उपनयनाची आणि ब्रह्मचाऱ्याची बहुतेक लक्षणे दिली आहेत. शत. प. ब्रा. (११·५·४-१-१७) मध्येही ही लक्षणे आली आहेत.

ब्रह्मचर्याची (म्हणजे वेदाच्या अध्ययनाची) कालमर्यादा सर्व वेदांकरिता ४८ वर्षे म्हणजे प्रत्येक वेदाकरिता १२ वर्षे असल्याचे गोपथ [अष्टाचत्वारिंशद्वर्षं सर्ववेदब्रह्मचर्यं तच्चतुर्धा वेदेषु व्युह्य द्वादशवर्षं ब्रह्मचर्यं द्वादशवर्षाण्यवरार्धमपि स्नास्यंश्चरेद्यथाशक्ति । गोपथ २·५.] ब्रा. (२·५) मध्ये म्हटले आहे. हा काल कमीतकमी असून प्रत्येकाने आपल्या कुवतीप्रमाणे ब्रह्मचर्याचे पालन करून नंतर समाप्तिदर्शक स्नान करावे असेही त्या ग्रंथात सांगितले आहे.

अनुक्रमणिका

उपनिषदे आणि ब्राह्मणग्रंथ ह्यात केलेल्या वर्णनावरून असे दिसते की उपनयन ही मुळात अतिशय साधी बाब होती. भावी विद्यार्थी हातात समिधा घेऊन गुरूकडे येई आणि मला विद्यार्थीदशेत प्रवेश करावयाची इच्छा आहे असे गुरूला सांगे आणि मला ब्रह्मचारी म्हणून आपल्या (गुरूच्या) घरी राहू द्या [ते ह समित्पाणयः पूर्वाह्णे प्रतिचक्रमिरे तान्हानुपनीयैवैतदुवाच । छां. उप ५·११·७] अशी गुरूला विनंती करी. (छांदो. उप. ५·११·७). बृहदा. उपनिषदात (६·२·७) म्हटले आहे [उपैम्यहं भवन्तमिति वाचा ह स्मैव पूर्व उपयन्ति स होपायनकीर्त्योवास । बृह. उप. ६·२·७.] की पूर्वीच्या युगातील विद्यार्थी ब्रह्मचर्याकरिता गुरूना फक्त शब्दांनी विनंती करीत (म्हणजे कोणताही विधी अथवा समारंभ करीत नसत). उपनिषदांच्या काळी देखील विद्यार्थी म्हणून मुलाचा स्वीकार करण्यापूर्वी बहुधा काही तरी विधी करावा लागत असे असे छां. उ. तील वर्णनावरून दिसते.

अत्यंत प्राचीन काळीं बहुधा बापच मुलाला विद्या शिकवीत असावा. परंतु तै. सं. (६·३·१०·५) आणि ब्राह्मणग्रंथ (तै. ब्रा. ३·१०·११; शत. ब्रा. ३·६·२·१५; गोपथ ब्रा. २.५।७ इ०) ह्यांतील वर्णनावरून असे दिसते की सामान्यतः विद्यार्थी गुरूकडे जात असत आणि त्याच्या घरी राहत. विद्यार्थ्याला अन्नासाठी भिक्षा मागावी लागे, गुरूच्या अग्नीकडे लक्ष द्यावे लागे, गुरूच्या गाईचे पालन करावे लागे.

**उपनयनाला योग्य वय :—** उपनयनाच्या वेळच्या वयाचा उपनिषदात उल्लेख केलेला नाही. उपनयनाचे योग्य वय कोणते ह्याबद्दल निरनिराळी मते आहेत. (आश्व. गृ. १·१९·१।६; आप. गृ. १०·२।३; बौ. गृ. २·५·२ इ.). ब्राह्मण मुलाचे उपनयन जन्मपासून अथवा गर्भापासून ८ ते १६ व्या वर्षी करावे, क्षत्रिय मुलाचे ११ ते २२ व्या वर्षी आणि वैश्य मुलाचे १२ ते २४ व्या वर्षी करावे असे निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले असून त्यात काही वर्षे मुख्य काळ असून काही वर्षे गौण काळ असतात. उदाहरणार्थ ब्राह्मण मुलाचा ८ वे वर्ष मुख्य काल असतो आणि ५ ते ११ व्या वर्षापर्यंत गौणकाल असतो, १२ ते १६ पर्यंत **गौणतर** काळ असून १६ व्या वर्षानंतर गौणतम (अत्यंत कमी प्रतीचा) काळ असतो. तीन वर्णाकरिता वसंत, ग्रीष्म आणि शरद हे अनुक्रमे शुभ ऋतु असतात अथवा सर्व वर्णाकरिता शिशिर ऋतु चालतो. मास, नक्षत्र, वार, योग यांच्याबद्दलही सूक्ष्म नियम सांगितले आहेत. मुलाचे जन्मकुंडलीत चंद्र आणि गुरु उच्चीचे असले पाहिजेत. गुरु आणि शुक्र ह्यांचे अस्त असताना (ते सूर्याच्या समीप असताना) उपनयन होत नाही. (संस्कार प्र० पा. ३५५।३८५; स्मृतिचं. १, पा. २७; अपरार्क पा. ३२ इ.).

एकाद्या मुलाचे उपनयन अधिकार [पितापितामहो भ्राता ज्ञातयो गोत्रजाग्रजाः उपायनेऽधिकारी स्यात्पूर्वाभावे परः परः ॥ वृद्धगर्गः (संस्कार प्रकाश पा. ४०७)] त्याच्या पित्याला मुख्यत्वे असतो आणि त्याच्या अभावी स्वतःच्या कुलातील पुरुष, बान्धव यांना आणि त्यांच्या अभावी अन्य गोत्रातील पुरुषाला असतो. (ब्रह्मपुराण, वृद्ध गर्ग, संस्कारप्र. पा. ४०७ अथवा वृद्धमनु—निर्णयसिन्धु ३ पूर्वार्ध).

ब्रह्मचाऱ्याला दोन वस्त्रे अंगावर घ्यावी लागतात. शरीराच्या खालच्या भागाला आच्छादन करणाऱ्या वस्त्राला **वास** अशी संज्ञा असून शरीराच्या वरच्या भागाला आच्छादन करणाऱ्या वस्त्राला **उत्तरीय** म्हणतात. तीन वर्णाच्या ब्रह्मचाऱ्यांची वस्त्रे निरनिराळ्या प्रकारची आणि रंगांची असतात. उदाहरणार्थ, काठकगृह्य ४१·१३ यात सांगितले आहे की तीन वर्णाच्या ब्रह्मचाऱ्यांचे उत्तरीय वस्त्र अनुक्रमे कृष्ण मृग, वाघ, आणि रुरु जातीचे हरिण यांचे असावे. ह्या नियमाची खूण सध्याच्या काळच्या रूढीतही दिसून येते आणि जेव्हा एकाद्या मुलाचे उपनयन होते तेव्हा त्याच्या यज्ञोपविताला हरणाच्या कातड्याचा एक लहानसा तुकडा अडकवितात.

अनुक्रमणिका

**दंड (काठी) :–** हा कोणत्या वृक्षाच्या लाकडाचा असावा ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. ब्राह्मणाने पळसाच्या लाकडाचा, क्षत्रियाने उदुंबराच्या लाकडाचा आणि वैश्याने बेलाच्या लाकडाचा दंड वापरावा अथवा सर्व वर्णाच्या ब्रह्मचाऱ्यांनी तीन्हीपैकी कोणत्याही लाकडाचा दंड वापरावा असे आश्व. गृ. मध्ये (१·१९·१३ आणि १·२०·१) सांगितले आहे. ब्राह्मणाचा दंड डोक्याइतका उंच, क्षत्रियाचा कपाळाइतका उंच आणि वैश्याचा दंड नाकाच्या शेंड्याइतका उंच असावा. दंड मोडल्यास प्रायश्चित्त करावे लागते. दंडाचा उपयोग [तत्र दण्डस्य कार्यमवलम्बनं गवादिनिवारणं तमोवगाहनमप्सु प्रवेशनमित्यादि । अपरार्क.] टेकण्यासाठी, गाई हाकण्यासाठी, रात्री बाहेर जाताना संरक्षणासाठी आणि पाण्यातून जाताना मार्गदर्शनासाठी करावयाचा असतो. (अपरार्क).

**मेखला (कंबरेभोवती बांधावयाची दोरी).** ब्राह्मणाची मेखला मुंज गवताची असावी, क्षत्रियाची मूर्वा गवताची (जिचा उपयोग धनुष्याची प्रत्यंचा करण्याकडे करतात ती) आणि वैश्याची अंबाडीच्या दोरीची असावी असे बऱ्याच ग्रंथांत सांगितले आहे. (गौत. १·१५; आश्व. गृ. १·१९·११; मनु. २·४२ इ०). ह्या बाबतीतही मतवैचित्र्य आहे. मुंज गवताच्या मेखलेला तीन पदर असावे, गवताची अग्रे उजवीकडे केलेली असावी आणि मेखलेची गाठ बेंबीच्या जवळ द्यावी असे बौधा. गृ., आप. ध. सू. प्रभृती काही सूत्रात सांगितले आहे. कुलाचाराप्रमाणे १, ३ अथवा ५ गाठी माराव्या (मनु. २·४३).

## उपनयनाचा विधी :

गृह्यसूत्रांच्या रचनेच्या काळी उपनयनामध्ये कोणते विधी करण्यात येत असत ह्याची कल्पना येण्याकरिता आश्व. गृ. सू. मध्ये सांगितलेले विधी पुढे थोडक्यात दिले आहेत.

उपनयन करावयाच्या मुलाला चांगले अलंकार घालावे. डोक्यावरील केसांची हजामत केलेली असावी. त्याने नूतन वस्त्र पांघरावे अथवा वर्णाला अनुसरून निरनिराळ्या प्रकारचे कातडे पांघरावे. वस्त्र पांघरल्यास ते वर्णानुरूप रंग दिलेले असावे. कमरेभोवती मेखला बांधावी. दंड हातात घ्यावा. मुलाने गुरूचा हात आपल्या हाताने धरावा. गुरूने अग्नीमध्ये तुपाच्या आहुती द्याव्या. मुलाने पश्चिमाभिमुख होऊन गुरूच्या समोर बसावे. गुरूने स्वतःच्या आणि मुलाच्या हातांच्या ओंजळीमध्ये पाणी भरून घ्यावे. नंतर आपल्या ओंजळीतील पाणी मुलाच्या ओंजळीतील पाण्यावर पाडावे. नंतर गुरूने त्या मुलाला त्याच्या नावाने संबोधून आपल्या हाताने त्याचा हात धरावा. 'अग्नी तुझा गुरू आहे' असे म्हणून गुरूने त्याचा हात तिसऱ्या वेळी धरावा. नंतर त्या मुलाला सूर्याकडे पाहण्यास सांगावे आणि त्याचे रक्षण करण्याबद्दल सूर्याची प्रार्थना करावी. नंतर गुरूने त्या मुलाला 'तू कोणाचा ब्रह्मचारी आहेस' इत्यादी प्रश्न विचारून 'मी तुला प्रजापतीला अर्पण करीत आहे' असे म्हणावे. नंतर त्या मुलाला उजवीकडे वळावयास सांगून आपले दोन्ही हात त्याच्या खांद्यावर ठेवावे आणि त्याच्या हृदयाला स्पर्श करावा. नंतर त्या मुलाने अग्नीला परिसमूहन करून एक समिध अर्पण करावी आणि अग्नीची प्रार्थना करावी. नंतर त्या अग्नीला स्पर्श करून आपणास मेधा, प्रज्ञा, तेज देण्याबद्दल अग्नी, इंद्र आणि सूर्य ह्यांची प्रार्थना करावी आणि आपले तोंड तीन वेळा हाताने पुसावे. नंतर विद्यार्थ्याने आपले गुडघे टेकून गुरूच्या पायांना मिठी मारावी आणि सावित्री मंत्र म्हणा अशी गुरूची प्रार्थना करावी. नंतर विद्यार्थ्याचे हात आणि त्याच्या अंगावरील वस्त्र आपल्या स्वतःच्या हातात धरून गुरूने सावित्री मंत्र म्हणावा. प्रथम एक एक चरण, नंतर अर्धा अर्धा मंत्र आणि नंतर संपूर्ण मंत्र एकदम म्हणावा आणि शिष्याकडून त्याला म्हणवेल तितका तो मंत्र म्हणवून घ्यावा. नंतर मुलाच्या कमरेभोवती मेखला बांधावी, हातात दंड द्यावा आणि 'तू आता ब्रह्मचारी आहेस, आचमन कर, सेवा कर,' इत्यादी

अनुक्रमणिका

कर्तव्यांचा उपदेश करावा. विद्यार्थ्याने सायंकाळी आणि सकाळी भिक्षा मागावी, अग्नीवर समिध अर्पण करावी, मिळालेली भिक्षा गुरूला अर्पण करावी. उरलेल्या दिवसात खाली बसू नये.

इतर सूत्रांत ह्या तपशीलात भेद आहेत. निरनिराळ्या क्रिया करताना म्हणावयाच्या मंत्रात भेद आहेत आणि निरनिराळ्या क्रियांच्या अनुक्रमातही भेद आहेत. संस्काररत्नमालेसारख्या काही अर्वाचीन ग्रंथात मुलाने शेवटल्या वेळी आईच्या पात्रातून भोजन करावे असे सांगितले असून त्याच्या जोडीला आठ ब्रह्मचाऱ्यांना भोजनास बोलवावे असे सांगितले आहे. हा प्रघात हल्लीही पाळण्यात येतो. मुलाची हजामत केलेली असावी असे बहुतेक ग्रंथांनी सांगितले आहे आणि ही रीत देखील हल्ली पाळण्यात येते. प्राचीन काळी अशी हजामत आचार्य स्वतः करीत असत. (आप. गृ. १०·६।८ वरील सुदर्शनाची टीका).

उपनयनाच्या आधल्या दिवशी **नांदीश्राद्ध** आणि उपनयनाच्या आधल्या दिवशी अथवा उपनयनापासून ७ ते १० दिवसाच्या अवधीत ग्रहमख (ग्रहांप्रीत्यर्थ करावयाचा यज्ञ) करावा असे आप. गृ. १०·५ वरील टीकेत हरदत्ताने सांगितले आहे. उपनयनाच्यापूर्वी गणपतीचे आणि कुलदैवतांचे पूजन, पुण्याहवचन, मातृकापूजन आणि मंडपदेवतांची स्थापना ही कृत्ये करतात. संकल्पामध्ये देशकालाचा उच्चार केल्यानंतर 'ह्या मुलाला द्विजपणा येऊन वेदाध्ययनाचा अधिकार प्राप्त व्हावा ह्या हेतूने परमेश्वराच्या प्रीत्यर्थ आचार्यपैतृक आणि सावित्री मातृक असा उपनयनाचा संस्कार मी करणार आहे' असे म्हटलेले असते.

उपनयनासंबंधी काही बाबींचे विवेचन पुढे केले आहे.

**यज्ञोपवीत** :— यज्ञोपवीताचा अत्यंत प्राचीन असा उल्लेख तै. सं. (२·५·११·१) मध्ये केला असून मनुष्यांसंबंधीच्या कृत्यात **नीवीत** वापरावा, पितरांसंबंधीच्या कृत्यात **प्राचीनावीत** वापरावा, देवासंबंधीच्या कृत्यात **उपवीत** वापरावा असे म्हटले आहे. उजवा हात उचलून आपले डोके उपवीतात घालून उपवीत डाव्या खांद्यावरून उजव्या आंगाकडे लोंबते सोडले म्हणजे वापरणारा **यज्ञोपवीतिन्** होतो, डावा हात आत घालून उपवीतात डोके घालून ते उजव्या खांद्यावरून डाव्या आंगाकडे लोंबते सोडले म्हणजे वापरणारा **प्राचीनावीतिन्** होतो, मानेवरून नेऊन दोन्ही खांद्यावरून छातीवर सोडले आणि हृदयाच्या जागेच्या खाली आणि नाभीच्या वरच्या बाजूला दोन्ही हातांच्या आंगठ्यांनी धरले म्हणजे त्या प्रकाराला **नीवीत** म्हणतात. (गोभि. गृ. १·२·२।४). गृहस्थाश्रमी पुरुषाने नेहमी उत्तरीय वस्त्र वापरले पाहिजे अथवा यज्ञोपवीताचाही उत्तरीय म्हणून उपयोग करावा असे आप. ध. सू. मध्ये (२·२·४· २२।२३) सांगितले आहे.

निरनिराळ्या ग्रंथांत आलेल्या उल्लेखावरून अशी अनुमाने निघतात की आधुनिक काळी लोक ज्याप्रमाणे यज्ञोपवीत जसे सतत वापरू लागले तसे प्राचीन काळी ते नेहमी वापरीत नसावे. आरंभी निरनिराळ्या कृत्यांच्या वेळी निरनिराळ्या प्रकाराने उत्तरीय वस्त्र अंगावर घेत असावे. प्राचीन काळी यज्ञोपवीत अजिबात अंगावरून काढून ठेवता येत असावे. सुताची वळलेली दोरी घालणे हा प्रारंभी उत्तरीयाचा पर्याय म्हणून उपयोगात आला असावा आणि पुढेपुढे त्याचा उत्तरीयाऐवजी सदोदित उपयोग होऊ लागला असावा.

यज्ञोपवीतामध्ये नऊ तंतू असतात आणि चांगल्या रीतीने पीळ दिलेल्या दोरीचे तीन पदर असावे (स्मृति चं. १ पा. ३१). निरनिराळ्या प्रकारच्या यज्ञांच्या वेळी घालावयाच्या यज्ञोपवीतात १, ३, ५, ७ असे

पदर असत. (मनु २. ४४ वरील मेधातिथी टीका). ते नाभीच्या खाली जाता उपयोगी नाही आणि हृदयाच्या वर राहण्याइतके आखुड असता कामा नये. (कात्यायन-स्मृतिचं. १ पा. ३१). ब्रह्मचाऱ्याने एक यज्ञोपवीत घालावे, स्नातकाने आणि गृहस्थाने २ यज्ञोपवीते घालावी, दीर्घायुष्यांची इच्छा असणाऱ्याने २ पेक्षा अधिक घालावी. (वसिष्ठ १२·१४). कश्यपाने [त्रीणि चत्वारि पञ्चाष्ट गृहिणः स्युर्दशापि वा। सर्वैर्वा शुचिभिर्धार्यमुपवीतं द्विजातीभिः ॥ कश्यप (संस्कारमयूख).] १० पर्यंत यज्ञोपवीते घालण्यास अनुमती दिली आहे. (संस्कारमयूख). इ. स. च्या आरंभापूर्वी पुष्कळ काळापासून यज्ञोपवीत घालण्याचा प्रघात सुरू झाला होता आणि ते ब्राह्मणाने नेहमीच घातले पाहिजे असा नियम होऊन बसला होता. यज्ञोपवीत उजव्या कानावर ठेवून शौच करावे असे याज्ञ. ने (१·१६) सांगितले आहे. दुसऱ्याचे यज्ञोपवीत वापरण्याचा मनूने निषेध केला आहे (४·६६). यज्ञोपवीताला ब्रह्मसूत्र असे स्मृतींनी (याज्ञ. १·१६; अत्रि १३.३) म्हटले आहे.

क्षत्रियांना आणि वैश्यांना जरी उपनयन संस्कार करण्याचा अधिकार होता तरी ते पुष्कळ वेळा तो संस्कार करण्याचे टाळीत असावे, निदान यज्ञोपवीत नेहमी घालण्याचे तरी टाळीत असावे आणि असा प्रकार वरचेवर होऊ लागल्यामुळे पुढे यज्ञोपवीत ब्राह्मणत्वाची खूण [पित्र्यमंशमुपवीतलक्षणं मातृकं च धनुरूर्जितं दधत्। रघुवंश ११·६४. जात्या चेदवध्योऽहमियं सा जातिः परित्यक्ता। वेणीसंहार अं ३.] होऊन बसले. (रघुवंश ११·६४; वेणीसंहार अं. ३)

वेदाध्ययन करण्याची इच्छा असणाऱ्या ब्रह्मवादिनी स्त्रियांचे उपनयन [पुराकल्पे कुमारीणां मौञ्जीबन्धनमिष्यते। अध्यापनं च वेदानां सावित्रीवाचनं तथा ॥ पिता पितृव्यो भ्राता वा नैनामध्यापयेत्परः। स्वगृहे चैवकन्याया भैक्षचर्या विधीयते ॥ — यम (संस्कारप्रकाश पा. ४०२–४०३)] प्राचीन काळी करण्यात येत असे आणि त्यांना अग्नी ठेवणे, वेदाध्ययन करणे, स्वतःच्या घरात (पित्याच्या घरात) भिक्षा मागणे ह्या गोष्टी कराव्या लागत (यम-संस्कारप्रकाश पा. ४०२।४०३). सद्योवधु म्हणजे ज्यांना सरळ विवाह करावयाची इच्छा असते अशा स्त्रियांच्या बाबतीतही त्यांचा विवाह समीप आला म्हणजे त्यांचा एक प्रकारचा उपनयन संस्कार करीत आणि नंतर त्यांचा विवाह करीत. (हारीतधर्मसूत्र—स्मृतिचंद्रिका). उपनयनाचे निदर्शक यज्ञोपवीत त्या घालीत. स्त्रियांचे समावर्तन करण्यासंबंधी नियम आश्वलायनाने (आश्व. गृ. ३·८) सांगितले आहेत. मनूने (६६।६७) म्हटले आहे की, स्त्रियांच्या बाबतीत जातकर्मापासून सर्व संस्कार मंत्राशिवाय करावे. त्यांचा विवाह हाच काय तो संस्कार वैदिक मंत्रांनी केला जातो. पतीची सेवा हीच स्त्रियांची गुरूची सेवा असते आणि गृहकृत्ये करणे हीच त्यांची अग्नीची सेवा असते. ह्यावरून असे दिसते की मनूच्या वेळी स्त्रियांचे उपनयन करण्याची रूढी प्रचारातून गेली होती परंतु तसा संस्कार प्राचीन काळी केला जात असे ह्याच्या काही अंधुक खुणा त्यावेळी दिसून येत असत.

यज्ञोपवीताकरिता एकाद्या ब्राह्मणाने अथवा त्याच्या कुमारिका मुलीने काढलेले सूत घ्यावे. त्याच्या पहिल्या ९६ अंगुली भूः शब्दाने मोजाव्या, नंतरच्या ९६ अंगुली भुवः शब्दाने मोजाव्या, पुढील ९६ अंगुली स्वः शब्दाने मोजाव्या. ते सूत एका पळसाच्या पानावर ठेवावे, काही मंत्राने त्याच्यावर प्रोक्षण करावे, ते डाव्या हातात घेऊन दोन वेळा टाळी वाजवावी, नंतर त्याला पीळ घालावा, ग्रंथी (गाठ) मारावी, नऊ देवतांचे त्या सुतावर आवाहन करावे, नंतर ते यज्ञोपवीत सूर्याला दाखवावे आणि नंतर मंत्रपूर्वक धारण करावे असे बौधायनसूत्रात (संस्काररत्नमाला पा. १८८) सांगितले आहे.

उपनयनाचा अधिकार कोणाला असतो ह्याबद्दल नियम सांगितले आहेत : (मनु. १०·४१; याज्ञ १·९२ आणि ५५ वरील मिताक्षरा इ.). ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांच्या व्यतिरिक्त सहा प्रकारच्या अनुलोम द्विजातीयांना उपनयनाचा अधिकार असतो. तसेच अनुलोम अनुलोम जातींच्या मिश्र अनुलोमजातींनाही उपनयनाचा अधिकार असतो. ब्राह्मणाला शूद्र स्त्रीपासून झालेला पुत्र अनुलोम असला

तरी त्याला प्रतिलोमासारखाच मानला जातो आणि त्याला उपनयनाचा अधिकार नसतो. शूद्राचे आणि प्रतिलोम जातींचे उपनयन होत नाही. (गौत. ४·२१ आणि १०·५१).

अंध, बधिर, मुके आणि अत्यंत मूर्ख ह्यांना विवाहाचा अधिकार असतो. आणि द्विजातीयांचा विवाह उपनयनापूर्वी होणे शक्य नसते म्हणून अशा व्यंग पुरुषांचा शक्य तितका उपनयन विधी करण्यात येतो. (बौ. गृ. शेषसूत्र २·९). ज्यांना गायत्री मंत्र उच्चारता येत नसेल त्यांना गुरूच्या अथवा अग्नीच्या समीप आणावे. त्याना गुरूने स्पर्श करून स्वतः गायत्री म्हणावी. काही प्राचीन ग्रंथात अश्वत्थ वृक्षाचे उपनयन करण्याची रीती सांगितली आहे. (बौ. गृ. शेषसूत्र २·१०).

**सावित्री डपपेश :–** शतपथ ब्रा. [अथास्मै सावित्रीमन्वाह । तां ह स्मैतां पुरा संवत्सरेऽन्वहाः । अथ षट्सु मासेषु । अथ चतुर्विंशत्यहे अथद्वादशाहे । सद्योह वा त्वाव ब्राह्मणायानुब्रूयादाग्नेयो वै ब्राह्मणः । शत. ब्रा. ११·५·४·१–१७] (११·५·४·१।१७) वरून असे दिसून येते की प्राचीन काळी उपनयनानंतर १ वर्ष झाल्यावर अथवा ६ महिने झाल्यावर अथवा २४, १२, ३ दिवस झाल्यानंतर गुरू विद्यार्थ्याला पवित्र गायत्री मंत्राचा उपदेश करीत असत. त्या ग्रंथात असा नियम सांगितला आहे की ब्राह्मण विद्यार्थ्याला उपनयनानंतर लागलीच गायत्री मंत्राचा उपदेश केला पाहिजे. सर्वसाधारण रूढी अशीच आहे. गायत्री मंत्राबरोबर भूः भुवः स्वः ह्या व्याहृती आणि ॐ ह्यांचा उचार करण्यात येतो. ॐ हे अक्षर प्राचीन काळापासून अत्यंत पवित्र मानले जाते. वेदाचा अभ्यास करू इच्छिणाऱ्यांने प्रथम ॐ शब्दाचा उच्चार करून अभ्यासाला आरंभ करावा असे आप. ध. सू. (१·४·१३·६) मध्ये सांगितले आहे.

'तत्सवि०' हा पवित्र गायत्री (अथवा सावित्री) मंत्र ऋग्वेद (३·६२·१०) मध्ये आला आहे आणि त्याचा शब्दशः अर्थ पुढीलप्रमाणे आहे : "अखिल चराचराला प्रेरणा करणारा जो सविता देव त्याचे सर्वांना प्रिय असे जे एक सर्वश्रेष्ठ अवर्णनीय तेज आहे त्याचे ध्यान करणे हे आमचे कर्तव्य होय. तोच भगवान आमच्या बुद्धीला अथवा कृत्यांना उत्तम रीतीने प्रेरणा करो." काही गृह्यसूत्रांत सर्व वर्णांकरिता हाच मंत्र सांगितला आहे आणि काही गृह्यसूत्रांनी क्षत्रिय आणि वैश्य ह्यांच्याकरिता निरनिराळ्या वृत्तातील मंत्र सांगितले आहेत. उदाहरणार्थ, 'आकृष्णेन०' (ऋ.१·३५·२) हा त्रिष्टुभ छंदातील मंत्र क्षत्रियांकरिता आणि 'हिरण्यपाणिः' (ऋ. १·३५·९) हा जगती छंदातील मंत्र वैश्यांकरिता घ्यावा असे शांख्यायनगृह्यावरील टीकेत सांगितले आहे. ब्राह्मणांकरिता गायत्री छंदातील, क्षत्रियांकरिता त्रिष्टुभ छंदातील आणि वैश्यांकरिता जगती छंदातील मंत्र असावा हे नियम फार प्राचीन काळचे असावे. कारण वसिष्ठस्मृतीत (४·३; अपरार्क पा. २३) म्हटले आहे की विधात्याने ब्राह्मणांना गायत्री छंदासह, क्षत्रियांना त्रिष्टुभ छंदासह आणि वैश्यांना जगति छंदासह निर्माण केले. परंतु त्याने शूद्राबरोबर कोणताच छंद निर्माण केला नाही म्हणून शूद्र हा (उपनयनाच्या) संस्काराला अपात्र असतो असे समजतात.

ब्रह्मचाऱ्याने (आणि इतरांनीही) प्रतिदिनी गायत्री मंत्राचा जप केलाच पाहिजे असे मनुप्रभृतींनी सांगितले आहे. (मनु. २·१०४; बौ. ध. सू. २·४·७।९). १००० जप उत्तम, १०० मध्यम आणि कमीत कमी १० गायत्रीचा जप केलाच पाहिजे असे वसि. ध. सू. (२६·१५) मध्ये सांगितले आहे. ह्या मंत्राने वेदाध्ययनाचा प्रारंभ होतो म्हणून त्याला ब्रह्ममुख म्हणतात (मनु. २·८१; विष्णु ध. सू. ५५·१५). सर्व वेदांचा प्रतिनिधी म्हणून सावित्री मंत्र म्हटला जातो. (आप. ध. सू. १·१·१·१०). हा मंत्र दुसऱ्या वेदांतही आला आहे. गायत्री मंत्राचा जर करण्यापूर्वी म्हणावयाचे आवाहनाचे आणि मागून म्हणावयाचे विसर्जनाचे मंत्र असतात.

**ब्रह्मचारी धर्म** :— सर्व वर्णांच्या ब्रह्मचाऱ्यांना लागू पडतील असे काही नियम आणि त्यांनी करावयाची कृत्ये धर्मशास्त्रावरील ग्रंथांत सांगितली आहेत. अशा कृत्यांपैकी काही प्रकारची कृत्ये अत्यंत मर्यादित कालापर्यंतच करावयाची असतात आणि काही कृत्ये ब्रह्मचर्याच्या संपूर्ण अवधीत करावयाची असतात.

मर्यादित कालपर्यंत करावयाच्या कृत्यांत उपनयनानंतर तीन रात्री अथवा बारा रात्री अथवा एक वर्षपर्यंत ब्रह्मचाऱ्याने क्षार आणि लवण न खाणे, जमिनीवर निजणे, उपनयनाच्या वेळी स्थापन केलेला अग्नी तीन दिवसापर्यंत कायम ठेवणे ही कृत्ये येतात. (आश्व. गृ. १·२२·१७; बौ. गृ. २·५·५५ इ.).

सर्वदा करावयाच्या कृत्यांत अग्नीला समिध अर्पण करणे, अन्नासाठी भिक्षा मागणे, पलंगावर न झोपणे, गुरूच्या घरचे काम करणे, नित्य स्नान करणे, देव, ऋषि आणि पितर ह्यांच्या प्रीत्यर्थ प्रतिदिनी तर्पण करणे इत्यादी कृत्यांचा समावेश होतो. (आश्व. गृ. १·२२·२; पार. गृ. २·३; आप. मंत्रपाठ २·६·१४).

ब्रह्मचाऱ्याने पालन करावयाचे नियम मुख्यत्वेकरून अग्निपरिचर्या, भिक्षा, संध्योपासना, वेदाभ्यासाची पद्धती आणि कालावधी, अन्न आणि पेय यांपैकी कोणती वर्ज्य करावी, गायनासारख्या दुसऱ्या काही गोष्टींचा निषेध, गुरुशुश्रूषा, ब्रह्मचाऱ्याची विशिष्ट व्रते ह्या विषयांसंबंधी असतात.

उपनयनाच्या चौथ्या दिवशी **मेधाजनन** (बुद्धीची निर्मिती) ह्या नावाचा एक विधी असे. आणि त्याच्या योगाने विद्यार्थ्याची बुद्धी वेदाभ्यास करण्यास पात्र होते असे समजत असत. एक मूळ असलेल्या पळसाच्या वृक्षासभोवती पाणी शिपडण्यास गुरूने विद्यार्थ्याला सांगावे आणि त्यावेळी काही मंत्र म्हणावे. पळासाचे झाड न मिळाल्यास कुश गवताच्या जुडग्याच्या सभोवती पाणी शिंपडतात. आश्व. गृ. (१·२२·१८।१९) मध्ये ह्या विधीचे सविस्तर वर्णन केले असून आणखी काही कृत्ये करावयास सांगितले आहे. विद्यार्थ्याने पळसाच्या झाडाच्या बुडापाशी पूर्वी वापरलेली वस्त्रे, दंड आणि मेखला ह्या वस्तू ठेवाव्या आणि नवी वस्त्रे, दंड आणि मेखला धारण करावी. जुन्या वस्तू गुरूने घ्याव्या. सांप्रतकाळी दक्षिण भारतात ह्याच्या सारखाच एक विधी केला जातो आणि त्याला मराठी भाषेत 'पळसुला' असे म्हणतात.

अग्नीला अर्पण करावयाच्या समिधांसंबंधी बरेच नियम आहेत. (आश्व. गृ. १·२२·६). ह्या समिधा पळसाच्या अथवा दुसऱ्या एकाद्या यज्ञीय म्हणजे यज्ञात वापरल्या जाणाऱ्या वृक्षाच्या असाव्या. यज्ञीय वृक्षात पळस, अश्वत्थ, न्यग्रोध, उदुंबर, बिल्व, चंदन, खदिर इत्यादिकांचा समावेश होतो. समिधा आंगठ्याहून जाड नसावी, तिच्यावरील साल काढलेली नसावी, एक वितीपेक्षा अधिक लांब अथवा आखूड नसावी, इत्यादी. निरनिराळ्या प्रसंगी समिधांची संख्या किती असावी ह्याविषयीही नियम आहेत. मुख्य वृक्ष पळस आणि खदिर हे असतात.

**भिक्षा** :— ब्रह्मचाऱ्याने उदरनिर्वाहासाठी भिक्षा मागावयाची असते. जो पुरुष अथवा स्त्री भिक्षा देण्यास नाही म्हणणार नाही अशा पुरुषाजवळ अथवा स्त्रीजवळ भिक्षा मागावी. (आश्व. गृ. १·१२२·८). भिक्षा मागताना 'भवान् (अथवा भवति) भिक्षां देहि' असे म्हणावे. ह्या शब्दांच्या रचनेमध्ये विद्यार्थ्याच्या वर्णानुसार भेद असतो. गुरूने विद्यार्थ्याला भिक्षा मागण्याकरिता एक पात्र द्यावे. भिक्षा मागून आणलेले अन्न गुरूला निवेदन करावे आणि त्यापैकी गुरु जितके अन्न घेण्यास सांगेल तितकेच अन्न विद्यार्थ्याने घ्यावे. गृहस्थाश्रमीयांनी ब्रह्मचारी आणि संन्यासी ह्यांना आपल्या ऐपतीप्रमाणे भिक्षा घालणे हे त्यांचे कर्तव्य असते.

निष्ठावंत ब्रह्मचाऱ्याला स्त्रियांनी भिक्षा दिली नाही तर तो त्यांनी संपादन केलेले पुण्य, पशु, संतती ह्यांचा नाश करतो असे आप. ध. सू. १·१·३·२६ मध्ये म्हटले आहे.

चांडालासारख्या जाती आणि महापातके केल्याचा संशय असलेले लोक ह्यांच्या व्यतिरिक्त कोणाच्याही जवळ भिक्षा मागावी. (आप. ध. सू. १·१·३·२५). ब्रह्मचारी आजारी नसताना जर सतत सात दिवस त्याने भिक्षा मागितली नाही अथवा समिधा अर्पण केली नाही तर त्याने व्रत मोडल्यासारखे होते आणि त्याबद्दल प्रायश्चित्त करावे लागते.

आपल्या गुरुकरिता भांडी भरून पाणी आणणे, फुले, गोवऱ्या, माती, कुश इत्यादी वस्तु गोळा करून आणणे ही विद्यार्थ्याची दुसरी किरकोळ कामे असतात.

विद्यार्थ्याने प्रथम भिक्षा आपल्या मातेजवळ, बहिणीजवळ अथवा मावशीजवळ मागावी असे अनु. २·५० इत्यादी काही ग्रंथांत सांगितले आहे. भिक्षेसंबंधी दुसरेही अनेक नियम निरनिराळ्या ग्रंथांत दिले आहेत.

**संध्या :–** ह्या शब्दाचा शब्दशः अर्थ 'संधिकाळ' असा आहे. परंतु त्या शब्दाने प्रातःकाळच्या आणि सायंकाळच्या संधिकाळांत करावयाच्या प्रार्थनेच्या क्रियेचा बोध होतो. ह्या क्रियेला सामान्यतः 'संध्योपासना' अथवा 'संध्यावंदन' अथवा नुसती 'संध्या' असे म्हणतात. हे कृत्य दिवसातून तीन वेळा म्हणजे सूर्योदयाच्या वेळी, मध्यान्ह काळी आणि सूर्यास्ताच्या वेळी केले पाहिजे असे काही ठिकाणी [सन्ध्यात्रये तु कर्तव्यं द्विजेनात्मविदा सदा । अत्रि (अपरार्क पा. ४९).] सांगितले आहे (अत्रि–अपरार्क पा. ४९). तथापि सामान्यतः दोन वेळा संध्या करावी असे धर्मग्रंथांत सांगितलेले असते. संध्या करण्याचा विहित काळ कोणता ह्याविषयीही नियम सांगितले आहेत.

गायत्री आणि दुसरे पवित्र मंत्र यांचा जप करणे हा संध्येमधील मुख्य भाग असून मार्जनासारख्या इतर क्रिया आनुषंगिक गौणभाग असल्याचे बहुतेक ग्रंथकारांचे मत आहे. आचमन, प्राणायाम, तीन वेळा मार्जन (आंगावर पाणी शिंपडणे), अधमर्षण, सूर्याला अर्ध्य देणे, गायत्रीचा जप आणि उपस्थान (म्हणजे प्रातःकाळी सूर्याच्या स्तुतिपर आणि सायंकाळी वरुणाच्या स्तुतिपर मंत्र म्हणणे) ही संध्योपासनेची प्रमुख अंगे असतात. सध्याच्या काळी महाराष्ट्रात संध्योपासनेच्या अगदी प्रारंभी विष्णूची २४ नावे म्हणण्याची रूढी आहे. परंतु बहुतेक स्मृतींनी अथवा प्राचीन टीकाकारांनी तसा नियम सांगितला नाही. त्याप्रमाणेच गूढार्थक निरनिराळे न्यास करण्याबद्दलचे नियम नंतरच्या काळात घातले गेले. सध्याच्या काळी ॐ केशवायनमः, ॐ नारायणायनमः, ॐ माधवायनमः अशा विष्णूच्या तीन नावांनी तीन आचमने करण्यात येतात. संध्येच्या प्रमुख अशा उपांगांबद्दल थोडेसे विवेचन करण्यात येईल.

**आचमन :–** आचमन उत्तरेकडे अथवा पूर्वेकडे तोंड करून करावे. तीन आचमने करावी. सर्व धार्मिक विधींमध्ये आचमन हे एक आनुषंगिक कृत्य असते. पुष्कळ वेळा दोन आचमने करणे अवश्य असते. आचमनात पाणी **ब्रह्मतीर्थाने** प्राशन करावे (म्हणजे तळहातावर पाणी घेऊन ते आंगठ्याच्या मूळाकडील बाजूने प्यावे) (मनु. २·१८; याज्ञ. १·१८)

**प्राणायाम** :— श्वास आत ओढून घेणे आणि श्वास बाहेर सोडणे ह्या क्रियेला **प्राणायाम** अशी संज्ञा योगसूत्रात (२·४९) दिली आहे. प्राणायामामध्ये गायत्रीचे शिर (ॐ आपोज्योति० हा मंत्र), ओंकारपूर्वक तीन व्याहृती (ॐ भूः भुवः स्वः) आणि गायत्री मंत्र ह्यांचा मनातल्या मनात उच्चार करावयाचा असतो. **पूरक** (बाहेरची हवा आत ओढून घेणे), **कुंभक** (आत घेतलेली हवा कोंडून ठेवणे) आणि **रेचक** (फुप्फुसातील हवा बाहेर सोडणे) ही प्राणायामाची तीन उपांगे असतात. मनातील पाप नाहीसे करण्यास प्राणायामाचा उपयोग होतो असे मनूने (७·७०।७१) म्हटले आहे.

**मार्जन** :— एकाद्या तांब्याच्या अथवा लाकडाच्या पात्रात ठेवलेल्या पाण्यात कुशाच्या काड्या बुडवून त्या काड्यांनी ते पाणी काही मंत्र उच्चारून अंगावर शिपंडण ह्याला मार्जन म्हणतात. ओम्, व्याहृती, गायत्री मंत्र आणि आपोहिष्ठा० ह्या ऋग्वेदातील (१०·९.१।३) तीन ऋचा ह्यांचा मुखत्वेकरून मार्जनामध्ये उपयोग करतात.

**अधमर्षण** (पाप बाहेर टाकणे) :— उजव्या हाताच्या तळव्याचा गोकर्णासारखा आकार करून त्यात पाणी घेऊन ते आपल्या नाकाजवळ धरून त्यावर 'ऋतं च सत्यं च०' ह्या ऋग्वेदातील (१०·१९०·१।३) तीन ऋचा म्हणतात आणि नंतर ते पाणी आपल्या डाव्या बाजूला जमिनीवर फेकतात.

**अर्घ्य** :— (सूर्याला आदरपूर्वक पाणी अर्पण करणे). दोन्ही हातांची ओंजळ करून त्यात पाणी घेऊन त्यावर गायत्री मंत्राचा जप करून ते पाणी सूर्याकडे तोंड करून उभे राहून तीन वेळा खाली सोडतात. तैत्ति० आर. (२·२) मध्ये म्हटले आहे की जो ब्राह्मण उदय पावणाऱ्या आणि अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे ध्यान करतो आणि त्याला प्रदक्षिणा घालून वंदन करतो त्याचा सर्व सुखांची प्राप्ती होते, कारण आदित्य हा ब्रह्म आहे. (अर्घ्य दिल्यावर 'हा आदित्य ब्रह्म आहे' हा मंत्र म्हणून प्रदक्षिणा घालतात).

**गायत्रीमंत्र** :— ह्याचा अधिक तपशील 'आह्निक' ह्या सदरात देण्यात येईल.

**उपस्थान** :— (सूर्याची उपासना) :— ह्यात काही विशिष्ट मंत्रांचा उपयोग करण्यात येतो. सकाळची संध्या केल्याने रात्रीत घडलेली पातके नष्ट होतात आणि सायंकाळची संध्या केल्याने दिवसात घडलेली पातके नष्ट होतात असे मनूने (२·१०२) म्हटले आहे. कुटुंबात झालेल्या जननामुळे अथवा मृत्यूमुळे अपवित्रपणा आला असेल तर फक्त सूर्याला अर्घ्य देण्यापर्यंत संध्या करावी परंतु जप करू नये अथवा उपस्थान करू नये. आधुनिक काळात संध्यावंदनामध्ये पुराणांतील आणि तंत्र ग्रंथांतील न्यास आणि मुद्रासंबंधाचे भाग जोडले गेले आहेत. परंतु न्यासांसारखी कृत्ये वैदिक नाहीत आणि पुष्कळ लोक ती कृत्ये करीत नाहीत.

**वेदाध्ययन** :— प्राचीन भारतातील सर्व शिक्षणपद्धतीत शिक्षकाला (आचार्याला) महत्त्वाचे स्थान असे. आचार्याला शिष्याने देवासमान मानून त्याची सेवा केली पाहिजे असे आप. ध. सू. मध्ये (१·२·६·१३) म्हटले आहे. जो विद्यार्थ्याचे संस्कार करतो आणि त्याचे पालन करतो त्याला गुरू म्हणतात (मनु २·१४२). उपनयन संस्कार करणारा गुरु कसा असावा ह्याच्याबद्दल अनेक नियम सांगितले आहेत. उपनयन संस्कारातील आचार्य ब्राह्मण असावा. ब्राह्मण आचार्य उपलब्ध नसेल तेव्हा क्षत्रिय अथवा वैश्य गुरूपाशी वेदाध्ययन करावे परंतु त्याला काही बाबतींत ब्राह्मण आचार्याहून थोडा कमी मान द्यावा. एकादी शुभ विद्या ब्राह्मणाने शूद्राजवळ देखील शिकण्यास प्रत्यवाय नसतो असे मनूने (२·२३८) सांगितले आहे.

सर्व शिक्षण तोंडाने दिले जात असे. मुलाला प्रथम प्रणव (ॐ) आणि व्याहृती आणि गायत्री शिकविण्यात येई (मनु. २·७०।७४). नंतर वेदाचे इतर भाग शिकविले जात. वेदाध्ययनाच्या आरंभी आणि शेवटी एका हातावर दुसरा हात आडवा ठेवून त्या हातांनी गुरूचे पाय धरावे. मुलाने आपल्या उजव्या हाताने गुरूच्या उजव्या पायाला आणि डाव्या हाताने डाव्या पायाला स्पर्श करावा. ॐ ह्या अक्षराचा उच्चार वेदाध्ययनाच्या आरंभी आणि शेवटी करावा.

प्रत्येक द्विजातीयाने सर्व वेद आणि उपनिषदे ह्यांचे अध्ययन केले पाहिजे असे मनूने सांगितले आहे. वेदांचा अतिशय विस्तार असल्यामुळे आणि आयुष्य अल्प असल्यामुळे वेदाध्ययनाच्या बाबतीत सवलती देणे भाग पडले आणि प्रत्येकाने फक्त एकाच वेदाचे अध्ययन करण्यास परवानगी दिली गेली. जर एकादा धार्मिक विधी एकाद्या मनष्याच्या स्वतःच्या शाखेत सांगितलेला नसला आणि जर तो विधी आपल्या शाखेच्या मताविरुद्ध नसला तर तो विधी करण्यास प्रत्यवाय नाही (गोभि. स्मृती. १·३४।३५; अपरार्क पा. ८, स्मृचं. १ पा. ४९).

वेद शिकविणे हे ब्राह्मणाचे कर्तव्य असल्याचे समजत. स्वतःच्या वेदाचे अध्ययन केल्यावर दुसऱ्या कोणी शिकविण्याविषयी विनंती केली असता जो त्याला वेद शिकवीत नाही तो आपल्या सुकृताचा नाश [यो हि विद्यामधीत्यार्थिने न ब्रूयात्स कार्यहा (कर्महा ?) स्यात् श्रेयसो द्वारमपावृणुयात् । अध्यापयेन्महदेतद्यशस्यम् । मनु. २·११३ वरील मेधा. टीका.] करतो असे मेधातिथीने म्हटले आहे (मनु. २·११३ वरील टीका). गुरूने विद्यार्थ्याशी कसे वर्तन करावे, विद्यार्थ्याच्या अंगात कोणते गुण असावे, ह्याविषयीचे नियम निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत. विद्यार्थ्यांने स्वतः कसे वागावे ह्याविषयीही पुष्कळ नियम आहेत.

संध्येमध्ये आणि इतर वेळी विद्यार्थ्याने गुरूला वंदन करावयाचे असते. वंदनामध्ये **प्रत्युत्थान** (स्वागताकरिता आपल्या आसनावरून उठणे), **अभिवादन** (वंदन करणे), **उपसंग्रहण** (गुरु अथवा दुसऱ्या कोणाचे पाय धरून त्यांना वंदन करणे), **प्रत्यभिवादन** (कोणी केलेल्या वंदनाला उलट वंदन करणे) आणि नमस्कार (नमः असे म्हणून वंदन करणे) हे भाग असतात आणि त्यांच्याविषयी अतिविस्तृत नियम सांगितले आहेत. त्यांच्याबद्दल थोडेसे विवेचन करू.

**उपसंग्रहण** :— आपल्या स्वतःच्या गोत्राचा आणि नावाचा उच्चार करणे, 'मी वंदन करीत आहे' असे म्हणणे, आपल्या कानांना स्पर्श करणे, गुरूचे पाय आपल्या हातांनी धरणे आणि असे करताना आपले मस्तक वाकविणे इतक्या गोष्टींचा उपसंग्रहणात समावेश होतो (स्मृत्यर्थसार पा. ७).

**अभिवादनामध्ये** आपल्या हातांनी पाय धरण्याचा समावेश होत नाही. अभिवादन करताना ज्याचा सन्मान करावयाचा त्याच्या पायाला वाटल्यास स्पर्श करावा अथवा करू नये. अभिवादनापूर्वी नेहमी प्रत्युत्थान केलेच पाहिजे (आप. ध. सू. १·४·१४·१६).

सूर्योदयानंतर जेव्हा विद्यार्थी गुरूची भेट घेतो तेव्हा, तसेच दैनिक वेदाध्ययनाचा पाठ घेण्यापूर्वी आणि पाठ संपविताना विद्यार्थ्याने गुरूचे पाय धरले पाहिजेत. ह्या प्रसंगांव्यतिरिक्त कोणत्याही वेळी गुरूची गाठ पडली तर विद्यार्थ्याने नुसते अभिवादन केले म्हणजे पुरे असे आप. ध. सू. (१·२·५·२०) मध्ये सांगितले आहे. परंतु ह्या बाबतीत मतवैचित्र्य असून प्रत्येक भेटीच्या वेळी गुरूचे पाय धरले पाहिजेत असे काही आचार्यांनी सांगितले आहे (आप. ध. सू. १·२·५·२१). विद्याभ्यास पुरा करून घरी परत आल्यानंतर देखील प्रत्येक मनुष्याने आपल्या गुरूंचे (म्हणजे पिता, माता, शिक्षक आणि इतर पूज्य व्यक्ती) आणि आपल्या

वडील बंधूंचे आणि भगिनींचे त्यांच्या वयाच्या क्रमाने पाय धरले पाहिजेत असेही आप. ध. सू. (१.४.१४.७।९) मध्ये म्हटले आहे.

अभिवादनाचे तीन प्रकार असतात : नित्य, नैमित्तिक आणि काम्य. अभिवादन कोणाला करावे ह्यासंबंधी नियम आहेत. उदाहरणार्थ, आपला पुरोहित, सासरा चुलता आणि मामा हे जरी आपल्यापेक्षा वयाने **लहान असले तरी** आपल्या जागेवरून उठून आणि आपले नाव सांगून त्यांचा सत्कार केला पाहिजे असे मनुप्रभृतींनी (मनु. २·१३०, आप. ध. सू. १·४·१४·११ इत्यादी) सांगितले आहे. परंतु दुसऱ्या कोणाच्या मते आपल्या जागेवरून उठून त्यांचे स्वागत केले म्हणजे त्यांना अभिवादन केल्यासारखे [ऋत्विक् श्वशुर पितृव्यमातुलानां तु यवीयसां प्रत्युत्थानमनभिवाद्याः । (गौतम ६·९).] होते (गौत. ६·९). अभिवादन करतेवेळी म्हणावयाच्या वाक्यात प्रसंगानुसार आणि वर्णानुसार भेद असतात.

**अभिवादन करावयाची पद्धती** पुढील प्रमाणे असे. ब्राम्हणाने आपला उजवा हात स्वतःच्या कानाइतका उंच करून अभिवादन करावे, क्षत्रियाने आपला उजवा हात आपल्या छातीइतका उंच करून अभिवंदन करावे, वैश्याने आपला उजवा हात कमरेइतका उंच करून अभिवादन करावे आणि शूद्राने आपला उजवा हात स्वतःच्या पाऊलाइतका खाली धरून अभिवादन करावे (आप. ध. सू. १·२·५·१६।१७). विद्वान मनुष्याला अभिवादन करावयाचे असल्यास दोन्ही हात जोडून करावे आणि अविद्वान मनुष्याला फक्त एका हाताने करावे. अभिवादन करतेवेळी उजवा हात जितका उंच करावयास सांगितले असेल त्यावरून त्यावेळी आपले मस्तक किती खाली वाकविले पाहिजे हे कळून येते (मदनपारिजात पा. २७; स्मृतिचं. १ पा. ३६).

**प्रत्यभिवादन** (कोणी केलेल्या वंदनाला उलट वंदन करणे). दुसऱ्याने केलेल्या वंदनाला योग्य प्रकारचे उत्तर देणे हे इतके अतिशय महत्त्वाचे मानले जात असे की ते ज्या ब्राह्मणाला समजत नसेल तो शूद्रवत समजावा असे मनूने सांगितले आहे. ब्राह्मणाने केलेल्या अभिवादनाला 'आयुष्मान् भव सौम्य' अशा शब्दांनी प्रत्यभिवादन करावे. ह्याप्रमाणेच इतर वर्णांच्या व्यक्तींनी केलेल्या अभिवादनाला निरनिराळ्या प्रकारची उत्तरे द्यावयाची असतात. त्या व्यक्तीच्या नावातील काही स्वर प्लुत करावयाचा असतो आणि ह्याकरिता व्याकरणाचे ज्ञान पाहिजे. म्हणून व्याकरण का शिकले पाहिजे ह्याची कारणे सांगताना महाभाष्यात (खं. १ पा. ३) म्हटले आहे की व्याकरण येत नसणाऱ्याला योग्य प्रकारचे प्रत्यभिवादन करता येत नाही आणि अशा मनुष्याला एकादा परका मनुष्य स्त्रीच समजेल.

गुरूला, गुरुपत्नीला, गुरुपुत्राला, सहाध्यायांना आणि नातलग नसलेल्या इतरांना कशा प्रकारे मान द्यावा; पुरुषांना आणि स्त्रियांना संबोधताना त्यांच्या नावामागे आणि पूर्वी कोणती उपपदे (श्री, देवी, दासी इत्यादी) लावावी, देवालये, देवतामूर्ती, पिंपळासारखे वृक्ष इत्यादिकांचा सन्मान कसा करावा ह्यासंबंधी अनेक नियम सांगितले आहेत. जागेच्या अभावी तो तपशील देता येत नाही.

**वेदाध्ययन :–** विद्या (आणि विशेषतः वेदविद्या) शिकविण्यासंबंधीच्या भारतातील प्राचीन पद्धतीमध्ये ठळकपणे लक्षात येण्यासारख्या काही गोष्टी आहेत. त्यांतील एक म्हणजे ग्रंथावरून शिकविण्याविरुद्ध असलेला मोठा पूर्वग्रह ही होय. वेदांचा योग्य अर्थ व्यक्त करण्याकरिता निरनिराळ्या स्वरांवर खाली वरती आघात असतात. असा आघात केवळ आवाज कमी अधिक करून दाखविता येत नाही तर त्याबरोबरच बोटांचीही हालचाल करावी लागते. ह्या सर्व गोष्टी तोंडाने शिकविले तरच शिकविणे

शक्य असते. प्राचीन आर्यांना लेखनकला अवगत होती किंवा नाही ह्याबद्दल अनेक वादविवाद झाले आहेत. मोहेनजोदारो आणि हरप्पा येथील उत्खननात काही मुद्रा सापडल्या आहेत. त्यांतील अक्षरे अद्यापी वाचता आली नाहीत. तथापि त्यांपैकी काही मुद्रा कमीतकमी ५००० वर्षांपूर्वीच्या आहेत. ते काही असले तरी पुस्तकावर भर देऊन जे ज्ञान मिळते ते कमी दर्जाचे असते असा समज पूर्वी होता. पुढे ही स्थिती पालटली आणि भारतादी ग्रंथ लिहून ते एकाद्या ब्राह्मणाला अथवा संस्थेला अर्पण करणे पुण्यदायक मानले जाऊ लागले. (अपरार्क पा. ३९०).

संस्कृत भाषेत [संस्कृतैः प्राकृतैर्वाक्यैर्यः शिष्यमनुरूपतः। देशभाषाद्युपायैश्च बोधयेत्स गुरुः स्मृतः॥ विष्णुधर्मसूत्रामधील अवतरण-वीरमित्रोदय (व्यव.) पा. ७२.] अथवा प्राकृत भाषेत अथवा प्रचलित देशी भाषांत विवरण करून गुरूने विद्यार्थ्यांना विषय समजावून देण्याची प्राचीन काळची शिक्षणपद्धती असे (विष्णू ध. सू. मधील अवतरण, वीरमित्रोदय (व्यवहार) पा. ७२).

## ब्रह्मचर्याची (म्हणजे विद्यार्थीदशेची) अवधी.

उपनिषदांत केलेल्या वर्णनांवरून असे दिसते की सर्व वेदांचे अध्ययन करण्याला ४८ वर्षे विद्यार्थीदशेत घालवावी लागत आणि ती अवधी चार वेदात विभागली म्हणजे एका वेदाचे अध्ययन करण्यास विद्यार्थीदशेची अवधी १२ वर्षे येते. ही अवधी किमान असून गुरुच्या घरून स्वगृही परत जाण्यापूर्वी एकाद्याला जितक्या वेदांचे अध्ययन करता येईल तितके त्याने करावे (छां. उप. ४·१०.१; ८·११.३; गोपथब्रा. २·५).

वेदांच्या अध्ययनात पुढील पाच गोष्टींचा समावेश होतो : (१) वेद पाठ करणे, (२) त्याच्या अर्थाचे चिंतन करणे, (३) उजळणी करणे, (४) वेदाचा जप करणे आणि (५) तो विद्यार्थांना शिकविणे.

अत्यंत प्राचीन काळापासून अध्ययन करावयाचे वाङ्मय विस्तीर्ण होते असे दिसून येते. शतपथ ब्राह्मणामध्ये (११·५·७.४।८) 'स्वाध्यायामध्ये ऋक्, यजु, सूत्रे, साम, अथर्ववेद, इतिहास-पुराण, नाराशंसी गाथा ह्यांचा समावेश केला आहे. शिवाय कल्प, रहस्य, ब्राह्मणग्रंथ, उपनिषदे, इत्यादी वेदांची अंगे असतात (गोपथ ब्रा. २·१०). याज्ञ. प्रभृती ग्रंथात १४ विद्यांची नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत : ४ वेद, ६ वेदांगे, पुराण, न्याय (तर्कशास्त्र), मीमांसा आणि धर्मशास्त्रे (याज्ञ १·३; मत्स्य ५३-५।६; वायु १·६१·७८). ह्या विस्तीर्ण वाङ्मयातील पुष्कळसा भाग वेदाध्यनापेक्षा भावना आणि बुद्धी ह्यांना अधिक रुचणारा असल्याकारणाने वेदांचा अभ्यास मागे पडून इतर आनुषंगिक विषयांच्या अभ्यासाला लोकप्रियता प्राप्त झाली.

वेदांचे अध्ययन करणे म्हणजे नुसते वेद तोंडपाठ करणे इतकेच नसून मंत्राचा ऋषी कोण, देवता कोणती, ब्राह्मण (म्हणजे विनियोग) काय हे ज्ञानही प्राप्त करून घ्यावयाचे असते. वेदांचा अर्थही समजून घेतला पाहिजे. वेदांचा अर्थ समजून ज्याने वेद आपलासा केला आहे तोच खरा वेदपारग [वेदस्य पारनयनमर्थतो ग्रन्थतश्च स्वीकरणं न ग्रन्थत एव। तथा च वक्तारो भवन्ति वेदाध्याप्ययं न वेदपारग इति। याज्ञ. १·५१ वरील विश्व. टीका.] होय. इतके असूनही अत्यंत प्राचीन काळापासून वेद फक्त तोंडपाठ करण्यात येई आणि बहुतेक लोक त्याचा अर्थ समजून घेण्याची खटपट करीत नसत. इतकेच नव्हे तर आजकालच्या पुष्कळ कर्मठ ब्राह्मणांची अशी पक्की समजूत आहे की वेदांचा अर्थ कळणे शक्य नाही आणि त्यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करणे हे निरर्थक आहे. वेदांचे जो अध्ययन करतो त्याला पातके स्पर्श करीत नाहीत असे अनेक स्मृतींनी सांगितले आहे (मनु.

११·२४५; याज्ञ. ३·३१०; वसि. ध. सू. २७·१ इ.). एकदा पाठ केलेल्या वेदांचे विस्मरण होऊ देता उपयोगी नाही. एकदा शिकलेले वेद टाकून देणे हे सुरापानासारखे महापातक असते (मनु. ११·५६; याज्ञ. ३·२२८).

प्राचीन काळच्या शिक्षणपद्धतीतील दुसरी एक ठळक रीतीने दिसून येणारी गोष्ट म्हणजे शिकविण्याबद्दल विद्यार्थ्याने गुरूला काय मोबदला दिला पाहिजे ह्या विषयी आगाऊ काहीही ठराव करण्यात येत नसे. विद्यार्थ्याला पूर्ण शिक्षण दिल्याशिवाय त्याच्याकडून काहीही मोबदला घेऊ नये असे याज्ञवल्क्याने [सहोवाच याज्ञवल्क्यः पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरतेति। बृह. उप. ४·१·२.] म्हटले आहे (बृह. उप. ४·१·२). विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर विद्यार्थी गुरुला जे धन देऊ शकेल ते धन स्वीकारण्याविषयी त्याने गुरूची प्रार्थना करावी अथवा काय मोबदला देऊ असे विचारावे आणि ते दिल्यावर अथवा गुरू सांगेल ते कार्य केल्यावर अथवा गुरूला काहीही न देता स्वगृही जाण्याची गुरूने अनुज्ञा दिल्यावर विद्यार्थ्यांने (विद्यार्थीदशा संपल्याचे निदर्शक असे) स्नान करावे (म्हणजे आपल्या घरी परत जावे) असे गौतमाने (२·५४।५५) म्हटले आहे. तथापि आपत्काली उपजीविकेकरिता असा करार करण्यास मनूने (१०·११६) परवानगी दिली आहे. कात्यायनाने (अपरार्क पा. ७६) सांगितले आहे की ब्राह्मण विद्यार्थ्याने गुरूला एक गाय द्यावी, क्षत्रियाने (राजपुत्राने) एक गाव द्यावा, वैश्याने शक्य असल्यास एक घोडा द्यावा. [गौर्ब्राह्मणस्य वरो ग्रामोराजन्यस्याश्वो वैश्यस्य। कात्यायन (अपरार्क पा. ७६).] आजच्या २० व्या शतकात देखील शिकविण्याबद्दल काहीही मोबदला न ठरविता किंवा काहीही मोबदला विद्यार्थ्यापासून न स्वीकारता विद्यार्थ्यांना वेद आणि शास्त्रे शिकविणारे किती तरी ब्राह्मण गुरुजी अस्तित्वात आहेत. तथापि विद्यार्थ्यांजवळून एकादी वस्तु स्वीकारली एवढ्यानेच तो शिक्षक वेतनधारी शिक्षक होत नाही. निषेध आहे तो आगाऊ करार करण्याचा आहे.

गुरूने विद्यार्थ्याला शारीरिक शिक्षा किती करावी ह्याविषयीही नियम असत. सामान्यतः मार न देता विद्यार्थ्याचे नियमन करावे आणि मार द्यावयाचा झाल्यास तो अतिरिक्त नसावा. विद्यार्थ्याचे मन चांगल्या आचरणाकडे वळेल अशा गोड शब्दात त्याला शिकवावे (रागावून मोठ्याने ओरडू नये) (गौ. २·४८।५०; आप. ध. सू. १·२·८·२९।३०) इ.

क्षत्रिय आणि वैश्य ह्यांच्या शिक्षणासंबंधी फारच थोडे नियम आढळतात. क्षत्रियाच्या (राजांच्या) शिक्षणात तीन वेद, अध्यात्मविद्या, दंडनीती, वार्ता (अर्थशास्त्र) ह्यांचा समावेश होतो (मनु. ७·४३; याज्ञ १·३११). परंतु इतक्या विषयांचे अध्ययन करणारे राजे विरळाच असावेत. वैश्यांच्या शिक्षणासंबंधी त्याहूनही कमी माहिती उपलब्ध आहे.

मनूने (१०·१; १०·७९; ९·३२८।३३२) म्हटले आहे की इतर त्रैवर्णिकांप्रमाणे वैश्यानेही वेदाध्ययन केले पाहिजे. वैश्याला व्यापार आणि कृषी ह्यांच्यासंबंधी विषय, नोकरांना द्यावयाचे वेतन, निरनिराळ्या लिप्या, निरनिराळे जिन्नस कोठे बनविले जातात अथवा उत्पन्न होतात इत्यादिकांची माहिती असावी.

शूद्रांच्या शिक्षणासंबंधी क्वचितच नियम सांगितलेले असतात. परंतु पुढे शूद्रांना शिल्पकाम आणि शेती करू देऊ लागले आणि म्हणून वैश्य उमेदवारांविषयी सांगितलेले नियम शूद्रालाही लावले जात असावे.

अनुक्रमणिका

दागिने बनविणे, नृत्य, गायन इत्यादी शिल्पांचे शिक्षण घेण्याकरिता त्या त्या धंद्यातील तज्ञ शिल्पकारांजवळ मुलांना उमेदवार म्हणून ठेवण्यात येत असे. अशा उमेदवारांसंबंधी अनेक नियम सांगितले आहे. (याज्ञ. २·१८४; नारदअभ्युप. १६।२०).

स्त्रियांच्या शिक्षणाचा दर्जा अत्यंत प्राचीन काळी मध्ययुगापेक्षा आणि अर्वाचीन काळापेक्षा पुष्कळच वरचा होता. पुष्कळशा स्त्रियांनी वेदमंत्र रचले आहेत आणि अनेक स्त्रिया अध्यात्मविद्येत निपुण होत्या. त्या शिक्षकाचेही काम करीत असत. परंतु क्रमाक्रमाने स्त्रियांची स्थिती अधिकाधिक वाईट होत गेली आणि धर्मसूत्रांत आणि मनुस्मृतीत स्त्रियांना आश्रिताचे स्थान देण्यात आले आणि वेदाभ्यास प्रभृती अनेक बाबतींत उच्चवर्णांच्या स्त्रियांना शूद्रांच्या समान मानण्यात येऊ लागले (गौ. १८·१; वसि. ध. सू. ६·१; बौ. ध. सू. २·२·४५; मनु. ९·३). स्त्रियांमध्ये वाङ्मयीन शिक्षणाचा अभाव अथवा अस्त झालेला असल्यामुळे सहशिक्षणाचा प्रश्नच उद्भवत नसे. स्त्रियांना शिक्षण घेण्याची संधी मिळाली असली तर त्यांचे शिक्षण पुरुष विद्यार्थ्यांच्या बरोबर होत असावे असे दर्शविणारे काही अस्पष्ट उल्लेख काव्यग्रंथांत आढळतात. (उदाहरणार्थ, मालतीमाधव नाटकात उल्लेख केलेली कामंदकी पुरुषविद्यार्थ्यांबरोबर एकाच गुरुकडे अध्ययन करते..... करते).

एकाद्या आचार्यापाशी शिकावयास राहणारे विद्यार्थी ज्या घरात राहत असत त्या घराला आचार्य कुल अशी संज्ञा असे (छां. उप. २·२३·२; ४·५·१; ४·९·१ इ.). विद्यार्थ्यांच्या मोठ्या वसतिगृहावरील मुख्य अधिकाऱ्याला कुलपती म्हणत. प्रसिद्ध असणाऱ्या विद्यालयांना, महाविद्यालयांना आणि विद्यापीठांना प्राचीन काळचे राजे आणि सामान्य धनिक लोक मोठमोठ्या देणग्या देत असत असे शिलालेखांवरून दिसून येते (एपि. इं. खं. १८ पा. ५).

भारतातील प्राचीन काळच्या शिक्षणपद्धतीची पाश्चिमात्य देशातील ग्रीक अथवा रोमप्रभृती ठिकाणच्या शिक्षणपद्धतीशी तुलना केल्यास भारतीय पद्धती अतिशय चांगली होती असे ठरेल. भारतीय शिक्षणपद्धतीतील दोष म्हणजे ती अतिशय वाङ्मयीन होती, पाठांतर फार असे, उपयुक्त व्यवसायांचे आणि शिल्पांचे शिक्षण क्वचितच दिले जाई आणि अभ्यासक्रमाचा प्रत्यक्ष व्यवहाराशी संबंध जोडला जात नसे, शिस्त कडक आणि कष्टकारक असे. ह्यापैकी बरेच दोष जातिसंस्थेने उत्पन्न केलेल्या परिस्थितीमुळे आले होते, कारण जातिसंस्थेत विशिष्ट जातींनी विशिष्ट व्यवसाय करावे असे ठरवून दिले होते. त्यावेळच्या शिक्षणपद्धतीची चालू विसाव्या शतकातील शिक्षणपद्धतीशी तुलना करता येणार नाही आणि करताही कामा नये. चालू शिक्षणपद्धतीत वाङमय, संगीत आणि ललितकला, हस्तव्यवसाय, गणित, भौतिकशास्त्रीय विषय, इतिहास आणि भूवर्णन हे विषय विद्यालयात सर्व मुलांना शिकविले जातात आणि विद्यादान हे राजकर्त्यांचे मुख्य कर्तव्य असल्याचे मान्य करण्यात आले आहे.

**चार वेदव्रते :**— अनेक स्मृतिकारांनी ह्या चार वेदव्रतांचा संस्कारांमध्ये समावेश केला आहे. त्या व्रतांची नावे आणि त्यासंबंधीचे विधी निरनिराळ्या सूत्रात भिन्न भिन्न सांगितले आहेत. चौलापासून उपनयनान्त जे विधी करण्यात येतात तेथपर्यंतचे सर्व विधी ह्या प्रत्येक व्रताच्या वेळी पुन्हा पुन्हा करावे लागतात. प्रत्येक व्रत एक वर्षपर्यंत करावयाचे असते. ही व्रते काही विशिष्ट ज्ञानाच्या अभ्यासाची पूर्वतयारी म्हणून करावयाची असून प्रत्येक व्रताचे वेळी काही विशिष्ट आचार पाळावयाचे असतात आणि त्यापैकी काही पुढे सर्व आयुष्यभर पाळावयाचे असतात. आश्वलायनाने (श्लोकबद्ध स्मृती) ह्या व्रतांची नावे महानाम्नीव्रत, महाव्रत, उपनिषद्व्रत आणि गोदान अशी दिली आहेत. शांख्यायनाने (२·११।१२) ती नावे शुक्रिय (हे

अनुक्रमणिका

ऋग्वेदाच्या मुख्य भागाचा अभ्यास करण्यापूर्वी करावयाचे असते), शाक्कर, व्रातिक आणि औपनिषद् (ही तीन व्रते ऐतरेय आरण्यकाच्या निरनिराळ्या भागांचा अभ्यास करण्यापूर्वी करावयाची असतात) अशी दिली आहेत. प्रत्येक व्रत करण्याचा एक विहित काल असतो. ह्या विशिष्ट व्रताचे आचरण एकाद्या विद्यार्थ्याने केले नाही तर त्याला प्रायश्चित करावे लागे. महानाम्नीव्रत गर्भापासून १२ व्या वर्षी आणि गोदानव्रत सोळाव्या वर्षी केले जाते. ब्रह्मचाऱ्याच्या हातून घडणारा सर्वात गर्ह्य अपराध म्हणजे एकाद्या स्त्रीबरोबर संभोग करणे हा असतो आणि असा अपराध करणाऱ्या ब्रह्मचाऱ्याने कडक प्रायश्चित्त करावयाचे असे. अशा विद्यार्थ्याला **अवाकीर्णिन्** म्हणत (तै. आर. २·१८; बौ. ध. सू. ४·२·१०।१३; आप. ध. सू. १·९·२६·८; मनु. ११·१२२।१२३; याज्ञ. ३·२८०).

**नैष्टिक ब्रह्मचारी** :– ब्रह्मचारी दोन प्रकारचे असतात. उपकुर्वाण (म्हणजे गुरूला काहीतरी मोबदला देऊ करीत असणारा) आणि नैष्ठिक (म्हणजे आमरणान्त विद्याभ्यास करीत राहणारा). आमरणान्त विद्याभ्यास करीत राहण्याच्या कल्पनेचा उल्लेख छांदोग्य उप. [त्रयी धर्मस्कन्धा... ... द्वितीयो ब्रह्मचर्याचार्य कुलवासी तृतीयोऽत्यन्तमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन् ... । छां. उप. २·२३·१·] (२·२३·१) मध्ये केला आहे. अशा विद्यार्थ्यांनी अग्नीची उपासना, वेदाभ्यास करणे, निर्वाहाकरिता अन्नाची भिक्षा मागणे, जमिनीवर झोपणे आणि आत्मसंयमन ही कर्तव्ये जन्मभर पाळली पाहिजेत. त्याने आमरण गुरूकडे राहून त्याची सेवा करावी आणि उरलेल्या वेळात वेदांचा अभ्यास करावा. गुरू मरण पावल्यावर गुरुपुत्र अध्यापन करण्यास अधिकारी असल्यास त्याच्याकडे राहावे अथवा गुरुपत्नीकडे राहावे अथवा मृत गुरूने स्थापन केलेल्या अग्नीची उपासना करावी. एका स्मृतिवचनात (अपरार्क पा. ७२) असे म्हटले आहे की खुजे, अवयवात खोड असणारे, क्लीब, असाध्य रोगाने पीडित असलेले अशा व्यक्तींना वैदिक विधीचा अधिकार नसतो आणि त्यांना वारसाचाही हक्क नसतो म्हणून त्यांनी नैष्ठिक ब्रह्मचारी व्हावे. परंतु दुसऱ्या काही ग्रंथकारांनी म्हटले आहे की, नैष्ठिक ब्रह्मचार्य हे केवळ अंध, अवयवहीन अशा व्यक्तींनीच करावे असे नसून सदृढ प्रकृतीच्या मनुष्यांनीदेखील त्यांना वाटल्यास नैष्ठिक ब्रह्मचर्याचा स्वीकार करावा (अपरार्क पा. ७२, स्मृतिचं. मदनपारि. पा. १११; परा. माध. १·२ पा. ५१; मनु. २·२४३।४४).

**पतित सावित्रिक** (म्हणजे उपनयन न झाल्यामुळे ज्यांना गायत्री मंत्राचा उपदेश झाला नाही आणि म्हणून जे पतित झाले आणि ज्यांचा आर्यांच्या समाजात समावेश होत नाही असे लोक). अशा व्यक्तींना **सावित्रीपतित** अथवा **व्रात्य** असेही म्हणतात. (मनु. २·३८।३९; याज्ञ. १·३७।३८ इ.). अशा व्यक्तींना कोणी वेद शिकवू शकत नाही, त्यांना पौरोहित्य करता येत नाही आणि त्यांच्याशी विवाहासारखा सामाजिक व्यवहारही कोणाला करिता येत नाही. अशा व्यक्तीला मागाहून उपनयन करण्याची इच्छा झाल्यास त्याने प्रायश्चित्त म्हणून काही विशिष्ट प्रकारचे आचरण विशिष्ट कालपर्यंत केल्यावर त्याचे उपनयन करावे. त्यानंतर काही प्रकारचे आचरण त्याने केल्यावर त्याला वेद शिकवावा असे आपस्तंबाने (१·१·१·२४।२७) सांगितले आहे. काही ग्रंथकारांनी ह्यापेक्षा कठीण प्रायश्चित्ते सांगितली आहेत. (ब. ध. सू. ११·७६।७९; वैखा. स्मार्त २·३) आणि गौतमप्रभृतींनी (गौ. २१·११; याज्ञ. ३·२३४; मनु ११·११७) पतितसावित्रिक हे उपपातक असल्याचे मानून सोपी प्रायश्चित्ते सांगितली आहेत. कठीण प्रायश्चित्तांत उद्दालक व्रत करणे, व्रात्यष्टोम यक्ष करणे अशांचा समावेश होतो.

एकाद्या व्यक्तीचा पिता आणि पितामह आणि त्यांचेही पूर्वज ह्यांचे देखील उपनयन केले गेले नसले तर त्यांना आलेली व्रात्यता नाहीशी करण्याकरिता काही प्रायश्चित्ते करून त्या व्यक्तीचे उपनयन करिता येत असे (आ. ध. सू. १·१·१·२८ ते १·१·२·१।४). अशा प्रकारचे ऐतिहासिक उदाहरण मराठी साम्राज्याचे

संस्थापक शिवाजी महाराजांचे आहे. त्यांना राज्याभिषेक करण्यापूर्वी काशी येथील पंडित गागाभट्ट याने महाराजांचे उपनयन केले होते. त्यावेळी महाराजांचे वय सुमारे ४५ वर्षांचे असून त्यांना दोन पुत्रही झाले होते.

मध्ययुगीनकाळातील ग्रंथकारांना ज्या एका अतिशय महत्त्वाच्या प्रश्नाने व्यग्र केले होते तो प्रश्न म्हणजे कलियुगात क्षत्रिय आणि वैश्य ह्यांचे अस्तित्व आहे किंवा नाही हा होय. काही पुराणांतील भविष्यसूचक वर्णनांच्या आधारावर कलियुगात फक्त ब्राह्मण आणि शूद्र हे दोनच वर्ण शिल्लक राहिले आहेत असे बरेच ग्रंथकार मानतात (विष्णुपुराण ४·२३·४।५; मत्स्य. २७२·१८।१९; भागवत १२·१·६।९). ह्याच्या उलट मत असणारेही काही ग्रंथकार आहेत. हा प्रश्न आता केवळ तात्विक चर्चेचा राहिला आहे. तथापि दत्तविधान, वारसा इत्यादी कायदेशीर व्यवहारांच्या बाबतीत त्या प्रश्नाला महत्व प्राप्त होते आणि ब्रिटिशांच्या अंमलातील वरिष्ठ न्यायालयांनी सर्व दाव्यात चार वर्ण अस्तित्वात असल्याचे मान्य केले होते आणि एकादी विवक्षित जात द्विजातीय आहे किंवा शूद्र आहे ह्या प्रश्नाचा निर्णय पुराव्यावरून ठरविला जात असे. ह्याबाबतीत त्यांनी काही कसोट्याही ठरविल्या होत्या.

यवन, शक ह्यांच्या सारख्या काही म्लेच्छ जाती हिंदु समाजाच्या सर्वसाधारण जनतेत एकरूप होऊन गेल्या असल्याचे आणि त्यामुळे अनेक राजघराणी शुद्ध आर्यवंशाची नसल्याचे काही विद्वानांनी प्रतिपादन केले आहे. ह्याबाबतीत अस्तित्वात असलेल्या पुराव्यावरून असे दिसते की शेकडो वर्षांपूर्वी काय झाले असेल हे सांगता येत नसले तरी निदान गेल्या एक हजार वर्षांच्या अवधीत तरी असा वर्णसंकर झालेला नाही.

परधर्मात गेलेल्या लोकांना शुद्ध करून परत हिंदुधर्मात घेण्यासंबंधी चळवळ आधुनिक काळी निघाली आहे आणि काही थोड्या प्रसंगी पाश्चिमात्य देशांत जन्म पावलेल्या लोकांना व्रात्यस्तोम आणि इतर विधी करून हिंदुधर्मात घेण्यात आले आहे. शिवाजी आणि पेशवे ह्यांच्या अंमलात मुसलमानांनी बाटविलेल्या पुष्कळ लोकांना प्रायश्चित्त देऊन आपआपल्या जातीत परत घेतले असल्याचे आढळते. परंतु अशी शुद्धी फारच थोड्या ठिकाणी केली जाई. जो एकवेळ हिंदु होता परंतु नंतर हिंदुत्व सोडून गेला होता त्याला परत हिंदु करून घेण्याला देवल आणि इतर स्मृतींचा आणि निबंधकारांचा आधार आहे. ह्याबद्दल थोडेसे विवेचन करू.

हिंदुधर्म हा उघडपणे दुसऱ्या धर्मातील लोकांचे धर्मांतर करून त्यांना हिंदु करून घेणारा धर्म नाही.तात्विकदृष्ट्या तो तसा असणे शक्य नव्हते. सुमारे दोन हजार वर्षे जातिसंस्थेचे वर्चस्व चालत आले आहे आणि तात्विकदृष्ट्या जो हिंदु समाजात जन्मला नसेल त्याला हिंदु समाजात प्रवेश मिळणे शक्य नाही. एकाद्या हिंदू मनुष्याने भयंकर स्वरूपाची पातके केली आणि स्मृतींनी सांगितलेली प्रायश्चित्ते घेण्याचे नाकबूल केले तर तो जातिभ्रष्ट होईल, समाज त्याच्यावर बहिष्कार घालील आणि तो हिंदुत्वालाही मुकेल. अशा अपराध करणाऱ्याला गौतमा (२१·७) सारख्या प्राचीन ग्रंथकारांनी देहान्त हेच प्रायश्चित्त सांगितले होते. परंतु (काही विशिष्ट अपवाद वर्ज्य केल्यास) हिंदुसमाज अत्यंत सहिष्णु आणि उदार मताचा आहे. त्याच्या अंगी शांतपणे आणि नम्रपणे दुसऱ्या लोकांना आपल्यात समावेश करून घेण्याची विलक्षण शक्ती आहे. जर एकादा परकीय वंशातील मनुष्य बाह्य आचरणात हिंदु समाजातील चालीरीती पाळू लागला तर कालांतराने अशा मनुष्याचे वंशज विस्तीर्ण अशा हिंदुसमाजात मिसळून जातात.

अनुक्रमणिका

बलात्काराने धर्मांतर केलेल्या व्यक्तींना हिंदुधर्मात परत घेण्याच्या प्रश्नाचा काही स्मृतींनी विचार केला आहे. देवल स्मृतींचा आरंभ असा आहे की, देवल ऋषी सिंधु नदीच्या तीरावर स्वस्थमनाने बसले असताना ऋषींनी त्यांना असा प्रश्न विचारला की ब्राह्मण आणि इतर वर्णांच्या लोकांना म्लेच्छांनी पकडून नेले असता त्यांना शुद्ध कसे करावे आणि परत आपल्या जातीत कसे घ्यावे. देवलस्मृतीत ह्यासंबंधी काही नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, जर एकाद्या ब्राह्मणाला म्लेच्छांनी पकडून नेला आणि जर त्याने निषिद्ध अन्न भक्षण केले अथवा निषिद्ध पेयाचे प्राशन केले अथवा जिच्याबरोबर संभोग करण्यास निषेध आहे अशा स्त्रीबरोबर त्याने संभोग केला तर त्याची शुद्धी चांद्रायण आणि पराक प्रायश्चित्ते घेतल्याने होते; अशाच स्थितीत क्षत्रियांची, वैश्यांची आणि शूद्रांची शुद्धी त्यापेक्षा सौम्य प्रायश्चित्ताने होते असे सांगितले आहे. अशा प्रकारची स्थिती किती काळ चालत राहिली तरी शुद्धी होऊ शकते ह्याबद्दल देवलस्मृतीने म्हटले आहे की एकाद्याला म्लेच्छांनी बलात्काराने पकडून नेऊन चार वर्षे ठेवला तर तो म्लेच्छासमान होतो आणि मग त्याला कोणतेही प्रायश्चित्त देता येत नाही. पुढे असे म्हटले आहे की, एकाद्याला बलात्काराने पकडून नेऊन पाचपासून वीस वर्षेपर्यंत अडकवून ठेविले असेल त्याची शुद्धी दोन प्राजापत्य प्रायश्चित्ते केल्याने होते. **ह्या कालानंतर (कोणतेही प्रायश्चित्त घेऊन) शुद्धी होऊ शकत नाही**. ह्या नियमाचा अर्थ बहुधा असा असावा.की जर इतक्या अवधीत निषिद्ध गोष्टी केल्या नसल्या तर त्याला इतक्या कालांतरानंतर देखील परत स्वधर्मात घेता येते.

**पुनरुपनयन** :- काही विशिष्ट परिस्थितीत उपनयनाचा संस्कार पुन्हा करावा लागतो. आश्वलायनाने (१·२२·२२।२६) म्हटले आहे की पुन्हा उपनयन करताना केस कापणे आणि मेधाजनन हे विधि वैकल्पिक (करावे अथवा करू नये असे) असतात आणि असे उपनयन केव्हाही करावे आणि त्यात परिदान (देवतांच्या स्वाधीन करणे) हा विधी करण्याची आवश्यकता नसते. पुनः उपनयन करण्याचे प्रसंग पुढीलसारखे असतात:- (१) स्वतःच्या वेदाचे अध्ययन झाल्यानंतर दुसऱ्या वेदाचे अध्ययन करावयाची इच्छा असल्यास त्यापूर्वी पुन्हा उपनयन करावे लागते, तथापि आपस्तंबाच्या (१·१·१·१० आणि त्यावरील हरदत्ताची टीका) मताप्रमाणे एकामागून एक अशा तीन वेदांचे अध्ययन करण्याला एकवार केलेले उपनयन पुरेसे असते, परंतु कोणत्याही एका वेदाचे अध्ययन केल्यावर कोणाला अथर्ववेदाचे अध्ययन करण्याची इच्छा झाली तर मात्र पुनरुपनयन करावे लागते. (२) एक वार केलेले उपनयन अयोग्य ऋतूत अथवा वर्ज्य सांगितलेल्या काळी झाले असले अथवा त्यातील एकादा महत्त्वाचा विधी चुकून करावयाचा राहून गेला असेल तर पुनरुपनयन करावे लागते. (३) एकाद्या पापाच्या निवृत्तीकरता अथवा एकाद्या दुराचरणाच्या निवृत्तीकरता पुनरुपनयन करावे लागते (गौ. २३·२।५; वसिष्ठ २३-३० इ०) (४) जर कोणी एकाद्या निषिद्ध मानलेल्या (सौराष्ट्र,सिंधु,सौविर, इत्यादी) देशात तीर्थयात्रेहून अन्य कारणाकरिता जाऊन आला तर ताला पुनरुपनयन करावे लागते (बौ.गृ परिभाषा १·१२·४।६). (५) वयात आलेल्या मनुष्याने मेंढी, गाढवी, उंटिण, अथवा स्त्री यांचे दूध प्राशन केले तर त्याला पुनरुपनयन करावे लागते (पैठीनसी—अपरार्क पा.११६०).

**अनध्याय** (वेदाभ्यासाला सुट्टी) :- फार प्राचीन काळापासंन निरनिराळ्या कारणांनिमित्त वेदाच्या अध्ययनाचा खंड करीत असत. अशा दिवसाला अनध्याय म्हणतात. तै. आरण्यकामध्ये (२·१५) म्हटले आहे की ब्रह्मयज्ञाच्या बाबतीत करावयाच्या वेदाध्ययनाला दोन कारणांनी म्हणजे कर्म करणारा अशुचि असल्यास आणि कर्म करावयाचे स्थळ अशुचि असल्यास, खंड पडतो. वादळ सुटले असता, अथवा अकाली पाऊस पडत असताना, प्रतिपदा, अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा आणि अमावास्या ह्या तिथींना अनध्याय असतो. वर्षातील दुसऱ्या काही विशिष्ट दिवशी अनध्याय असतो. उदाहरणार्थ, आश्विन शुद्ध

नवमी, अक्षय्य तृतीया (वैशाख शुद्ध तृतीया), युगादी आणि मन्वादी मानलेल्या तिथी ह्या दिवशी अनध्याय असतो. काही आकस्मिक प्रसंगी तात्कालिक अनध्याय असतो. उदाहरणार्थ, काही पशूंच्या अथवा पक्ष्यांच्या ओरडण्याने, सामगायन होत असल्याने, संकटग्रस्तांच्या ओरडण्याने गोंगाट होत असल्यास अनध्याय करावा. घरी एकादा पाहुणा आला असल्यासही (शिष्टागमने अनध्यायः) अनध्याय करावा.

काही अनध्याय एक दिवसाचे, काही त्याहून अधिक दिवसांचे आणि काही दिवसाच्या काही विशिष्ट भागापुरतेच असतात. स्वतःचे मातापिता आणि आचार्य ह्यांच्या मृत्यूनिमित्त १२ दिवस अनध्याय पाळावा असे आप.ध.सू. (१·३·१०·४) मध्ये सांगितले आहे. श्रावणातील पौर्णिमेला उपाकर्म (श्रावणी) केले तर त्यानंतर एक महिनापर्यंत रात्रीच्या पूर्वार्धात वेदाध्ययन करू नये. (उत्तरार्धात करण्यास प्रत्यवाय नसतो) (आप.ध.सू.१·३·९·१).

अनध्यायांची संख्या इतकी मोठी आहे की इतके अनध्याय पाळल्यास फलप्रद असे शिक्षण शीघ्र काळात होणे कठीण होईल. ह्याकरिता अशा अनध्यायांच्या दिवशी कोणकोणत्या गोष्टी वर्ज्य कराव्यात ह्याविषयी काही नियम घालून दिले. पहिली गोष्ट अशी की काही अनध्याय वाचिक असल्याचे आणि काही मानसिक असल्याचे ठरविण्यात आले आणि वाचिक अनध्यायात वेदवचने मोठ्याने उच्चारण्यास आणि मानसिक अनध्यायात वेदवचने मनातल्या मनात म्हणण्यालाही प्रतिबंध घालण्यात आला. आपस्तंबाने (श्रौतसू. २४·१·३७) म्हटले आहे की अनध्यायाचे नियम फक्त वेदमंत्रांच्या अध्ययनाला लागतात परंतु त्यांचा निरनिराळ्या विधीमध्ये उपयोग करण्याला प्रतिबंध नसतो. मनूने (२·१०५) सांगितले आहे की वेदांचे ज्ञान होण्याला उपयोगी पडणाऱ्या व्याकरण, निरुक्त इत्यादी वेदांगाच्या अध्ययनाला तसेच ब्रह्मयज्ञात करावयाच्या वेदपठणाला अनध्यायाचे नियम लागत नाहीत. इतिहास (महाभारत), पुराणे, धर्मशास्त्रे आणि इतर शास्त्रे ह्यांच्या अध्ययनाला कोणताही अनध्याय नसतो असे कूर्मपुराणात (उत्तरार्ध १४·८२।८३) सांगितले आहे. परंतु पर्वांच्या दिवशी अशा ग्रंथांच्या अध्ययनाला अनध्याय असे. हल्लींच्या काळीदेखील वैदिक आणि पंडित लोक आपआपल्या संस्कृत विद्यालयात नित्य अनध्याय (विशेषतः अमावास्या) पाळतात. एकंदरीने बहुतेक अनध्याय सयुक्तिक आणि सहज कळून येण्यासारख्या तत्त्वांवर ठरविलेले असल्याचे दिसून येईल. ज्याच्या अध्ययनाला पूर्ण लक्ष आणि मनाची एकाग्रता अवश्य असतात अशा विषयांच्या अध्ययनाला मनात चंचळता अथवा गोंधळ उत्पन्न होईल असे प्रसंग अनध्यायाचे ठरविण्यात आले.

**केशान्त अथवा गोदान :-** ह्या संस्कारामध्ये मस्तकावरील आणि (कांख हनुवटी ह्यांच्यासारख्या) शरीराच्या दुसऱ्या भागांवरील केस काढण्याचा समावेश होतो. पारस्करगृह्यासारख्या काही ग्रंथांत केशान्त हा शब्द योजला असून दुसऱ्या काही ग्रंथांत गोदान हा शब्द योजला आहे. बहुतेक स्मृतिकारांनी हा संस्कार १६ व्या वर्षी केला जात असल्याचे सांगितले आहे. काही ग्रंथकारांनी वर्णांना अनुसरून १६ ते २२ व्या वर्षी हा विधी करावयास सांगितले असून कोणी तो विवाहाच्या पूर्वी करावयास सांगितला आहे. ही वर्षे गर्भधारणेपासून मोजावी किंवा जन्मापासून मोजावी ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. गोदान अथवा केशान्त संस्कार यात थोड्याशा फरकाने चूडाकरणाप्रमाणेच विधी केला जातो. ह्याविषयी सर्व सूत्रकारांत एकवाक्यता आहे. दाढी करण्यापूर्वी एक वर्षपर्यंत गोदानिक नावाचे व्रत करावे असे गोभिल (३·१·११।२९) आणि खादिर (२·५·७/१६) यांनी सांगितले आहे.

केशान्त विधी मुलींचाही करावा असे शांख्यायनगृह्यात (१·२८·२२) सांगितले आहे. हा संस्कार हळुहळू प्रचारातून इतका नाहीसा झाला की स्मृतिचंद्रिका, निर्णयसिंधू ह्यांच्यासारख्या मध्ययुगात झालेल्या निबंधग्रंथांनी ह्याच्यासंबंधी बहुतेक काहीच सांगितलेले नाही.

**स्नान अथवा समावर्तन** (म्हणजे वेदांचे अध्ययन पूर्ण झाल्यावर विधिपूर्वक स्नान करणे आणि गुरुगृहाहून परत येणे.) गौतमासारख्या काही सूत्रकारांनी ह्या संस्काराला '**स्नान**' अशी संज्ञा दिली आहे. (गौ. ८·१६; आप.गृ. १२·१ इ.) आणि आश्व.गृ. (३·८·१) बौ.गृ. (२·६·१ इ.) सारख्या काही सूत्रकारांनी '**समावर्तन**' हा शब्द योजला आहे. स्नान म्हणजे विधिपूर्वक स्नान याच्या योगाने विद्याध्ययनाचा कालावधी पूर्ण झाल्याचा बोध होतो आणि समावर्तन ह्याचा अर्थ गुरूच्या घरून स्वतःच्या घरी परत येणे असा आहे. समावर्तन हे विवाहाचे एक अंग असून विधिपूर्वक स्नान हाच समावर्तनाचा विधी असतो असे काहींचे मत आहे. ज्याने असे विधिपूर्वक स्नान केले असते त्याला **स्नातक** असे म्हणतात. स्नातक तीन प्रकारचे असता : एक **विद्यास्नातक** अथवा वेदस्नातक (ज्याने वेदांचे अध्ययन पुरे केले असते परंतु वेदव्रते पुरी केली नसतात असा), दुसरा **व्रतस्नातक** (ज्याने वेदांचे अध्ययन पुरे केले नसते परंतु व्रताचरण पूर्ण केलेले असते असा) आणि तिसरा **विद्या व्रतस्नातक** (ज्याने वेदाध्ययन आणि व्रताचरण दोन्ही पूर्ण केलेली असतात असा).ह्यांत विद्याव्रतस्नातक सर्वात श्रेष्ठ असतो. (आप.ध.सू. १·११·३०·१।५).

एकाद्याने विधिपूर्वक स्नान केल्यापासून त्याचा एकाद्या स्त्रीबरोबर विवाह होईपर्यंत मध्यंतरी बराच अवधी जाणे संभवनीय आहे. ह्या दरम्यानच्या काळात त्याला **स्नातक** म्हणतात आणि त्याचा विवाह झाल्यावर त्याला **गृहस्थ** [आ. जायासङगमात्स्नातका भवन्त्यऊर्ध्वं गृहस्थाः । बौ. गृ. परिभाषा १·१५·१०·] म्हणतात (बौ.गृ.परि.१·१५·१०), विधिपूर्वक स्नान केल्यानंतर विवाह होईपर्यंत त्याने स्नातकाचे नियम तसेच त्याच्या स्थितीला लागू पडतील असे गृहस्थाचे नियम पाळले पाहिजेत परंतु ब्रह्मचाऱ्याचे नियम पाळता कामा नये. ब्रह्मचाऱ्याकरिता घातलेल्या नियमांपैकी जे नियम इतर आश्रमांच्या विशिष्ट नियमांच्या विरुद्ध नसतील ते सर्वांनी पाळावे. (गौ. ३·२)

समावर्तनाच्या विधीचे वर्णन आश्व. गृ. सूत्रात (३·८ व ९) थोडक्यात पुढील-सारखे केले आहे. गुरूच्या घरून परत जाण्यास निघणाऱ्या विद्यार्थ्याने आपल्या स्वतःकरिता आणि त्याच्या गुरुला देण्याकरिता, गळ्यात घ्यालण्याकरिता एक रत्न, कानात घालण्याकरिता दोन कुंडले, दोन वस्त्रे, छत्री, पादत्राणांची जोडी, काठी, हार, अंगाला चोळवयाचे उटणे, काजळ, पागोटे अशा वस्तु जमवाव्या. दोघांकरिता ह्या वस्तू मिळाल्या नाही तर गुरूला देण्याला लागणाऱ्याच फक्त मिळवाव्या.पळसाच्या अथवा वडाच्या वृक्षाच्या समिधा आणाव्या. ज्या विद्यार्थ्याला अन्न, ऐश्वर्य, सौंदर्य अशा प्रकारच्या फलांची प्राप्ती व्हावी अशी इच्छा असेल त्याने ओल्या समिधा घ्याव्या, ज्याला आध्यात्मिक फलप्राप्तीची इच्छा असेल त्याने वाळलेल्या समिधा घ्याव्या, ज्याला दोन्ही प्रकारची फले प्राप्त व्हावी अशी इच्छा असेल त्याने अर्धा भाग ओला आणि बाकीचा भाग वाळलेला असणाऱ्या समिधा घ्याव्या. समिधा जमिनीवर न ठेवता उंचावर ठेवाव्या. ब्राह्मणाला अन्न आणि एक गाय दान दिल्यावर विद्यार्थ्याने गोदान विधीत सांगितलेली कृत्ये (काही वगळून) करावी. गोदान विधीतील मंत्र स्वतःला लागू पडतील असे त्यात बदल करावे. करंजाच्या बीचे चूर्ण अंगाला चोळून कोंबट पाण्याने स्नान करावे. कोरी आणि न वापरलेली अशी दोन वस्त्रे परिधान करावी. डोळ्यांत काजळ घालावे, कानांत कुंडले घालावी. उटणे अंगाला चोळावे, हार गळ्यात घालावा. पादत्राणे पायात घालावी. बांबूची काठी घ्यावी. छत्री घ्यावी. गळ्यात रत्न घालावे आणि डोक्याला पागोटे गुंडाळून उभे राहून अग्नीवर समिधा अर्पण करावी (ऋ. १०·१२८ ह्या सूक्ताच्या नऊ ऋचा म्हणून नऊ समिधा अर्पण

करावा). नंतर त्या विद्यार्थ्याने ज्या ठिकाणचे लोक त्याचा (मधुपर्क अर्पण करून) सत्कार करतील अशा एकाद्या ठिकाणी रात्रभर राहावे. वर सांगितलेली कृत्ये करताना काही विशिष्ट मंत्र म्हणावयाचे असतात. काही गृह्य सूत्रांत काही अधिक कृत्ये सांगितली आहेत. उदाहरणार्थ, गोभिलाने (३·४·३१।३४) सांगितले आहे की वरील विधी पूर्ण झाल्यावर विद्यार्थ्याने बैलांच्या गाडीत बसावे आणि पूर्वेच्या किंवा उत्तरेच्या बाजूला काही अंतर गाडीतून जाऊन परत गुरूकडे यावे आणि गुरूने त्याला मधुपर्क देऊन त्याचा सत्कार करावा. लघु आश्वलायनाने (प्रकरण १४) असे सांगितले आहे की समावर्तनाचा होम केल्यावर ऋग्वेदाचे अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्याने मुंज गवताची मेखला सोडून टाकावी. ह्यामुळेच महाराष्ट्रात समावर्तनाला 'सोडमुंज (म्हणजेच मुंज गवताची मेखला ज्यात सोडून टाकली जाते तो विधी) असे म्हणतात.

ह्या विधीला शुभ दिवस कोणते ह्याबद्दलचे नियम काही गृह्यसूत्रांत सांगितले आहेत. उदाहरणार्थ, हिरण्य.गृ. (१·९·३) मध्ये असा नियम सांगितला आहे की ह्या विधियुक्तस्नानाला उत्तरायणातील कोणत्याही महिन्याच्या शुक्लपक्षात ज्या दिवशी रोहिणी, मृगशीर्ष, पुष्य, उत्तराफल्गुनी, हस्त, चित्रा अथवा विशाखा नक्षत्रात चंद्र असेल तो दिवस योग्य मुहूर्त होय.

स्मृतींमध्ये आणि निबंधग्रंथांत स्नातकाने पाळावयाच्या नियमांचे वर्णन केले आहे. त्यातील बरेचसे नियम गृहस्थाला देखील लागू पडण्यासारखे असतात. ह्या नियमांपैकी काही अनध्यायासंबंधी, शौचविधीसंबंधी, कोणाकडील अन्न भक्षण करावे ह्या संबंधी, संभोगासंबंधी, नित्य करावयाच्या पंचमहायज्ञासंबंधी, उपाकर्म आणि उत्सर्जनासंबंधी आणि नित्याच्या आचरणासंबंधी आहेत.

स्नातकाच्या नियमांचे पालन न केल्यास प्रायश्चित्त म्हणून एक दिवस उपोषण करावे असे मनूने (११·२०३) सांगितले आहे. हरदत्ताने (गौ. ९·२ वरील टीका) म्हटले आहे की स्नातकाचे नियम फक्त ब्राह्मण आणि क्षत्रिय वर्णांच्या स्नातकांनाच लागतात आणि त्या नियमांचा भंग केल्यास करावयाचे प्रायश्चित्त हेही ब्राह्मण आणि क्षत्रिय स्नातकांनीच करावे. वैश्य स्नातकांनी हे नियम पाळलेच पाहिजेत असे त्याच्यावर बंधन नसते.

आधुनिक काळी समावर्तनाचा विधी उपनयनानंतर थोड्याच दिवसांनी करण्यात येतो आणि कधीकधी तो उपनयनानंतर ४ थ्या दिवशी अथवा दुसऱ्या दिवशी देखील करतात. बहुतेक ब्राह्मण वेदाचा एकादाही भाग शिकत नाहीत, त्यामुळे त्यांच्या बाबतीत समावर्तन हा निव्वळ एक पोकळ विधी होऊन राहिला आहे.

(आपल्या स्वतःच्या मातापित्याव्यतिरिक्त) इतर कोणा नातलगाच्या मृत्यूबद्दल ब्रह्मचाऱ्याला अशौच येत नाही. म्हणून (उपनयनानंतर समावर्तनापर्यंतच्या अवधीत कोणी नातलग मरण पावले असले तर) समावर्तन झाल्यावर स्नातकाने तीन दिवस अशौच (सुतक) पाळावे. कोणा नातलगांना त्या अवधीत अपत्ये झाली असली तर त्याबद्दल सुयेर पाळावयाचे कारण नाही असे मनुप्रभृतींनी सांगितले आहे (मनु. ५·८८, विष्णु ध. सू. २२·८७).

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ३२

## आश्रम

(मू.ग्रं.पा. २.४१६-४२६)

आश्रम हा शब्द श्रम् धातूपासून बनला असून त्या धातूचा अर्थ खटपट करणे, प्रयत्न करणे असा आहे आणि त्यावरून आश्रम ह्या शब्दाचा धात्वर्थ 'ज्या स्थितीत कोणी आपण होऊन प्रयत्न करतो अशी स्थिती' असा आहे.

अत्यंत प्राचीन अशा धर्मसूत्रांच्या काळापासून आश्रमांची संख्या चार असल्याचे समजण्यात येते, मात्र त्यांच्या नावांत आणि त्यांच्या अनुक्रमात किंचित् भेद आढळतात. उदाहरणार्थ, आप. ध.सू. (२·९·२१·१) मध्ये आश्रमांची [चत्वार आश्रमा गार्हस्थ्यमाचार्यकुलं मौनं वानप्रस्थ्यमिति। आप. ध.सू.२·९·२१·१] नावे गृहस्थाश्रम, गुरुच्या घरी राहण्याचा आश्रम, मुनी होण्याचा आश्रम आणि वानप्रस्थाश्रम ह्या क्रमाने सांगितली आहेत. गौतमाने (३·२) ब्रह्मचारी, गृहस्थ, भिक्षु आणि वैखानस असे चार आश्रम दिले आहेत. बऱ्याच धर्मसूत्रांच्या आणि स्मृतींच्या मताप्रमाणे ब्रह्मचर्य हा चार आश्रमांपैकी पहिला असतो आणि विवाह हा संस्कार दुसऱ्या म्हणजे गृहस्थाश्रमाचा आरंभ असतो. म्हणून विवाह संस्काराचा विचार करण्यापूर्वी आश्रमांची कल्पना कशी उत्पन्न झाली आणि तिची पुढे वाढ कशी झाली ह्या संबंधी थोडक्यात विवेचन ह्या प्रकरणात केले आहे.

वेदाच्या संहिता आणि ब्राह्मणग्रंथ यांत 'आश्रम' हा शब्द आलेला नाही. तथापि ब्रह्मचारी, गार्हपत्य, वैखानस, मुनी, यती असे निरनिराळ्या आश्रमांच्या नावांशी जुळते असे शब्द वैदिक वाङ्मयात आले आहेत. ह्यावरून असे दिसते की आश्रम शब्दाने आयुष्याच्या निरनिराळ्या विभागांचा बोध जसा सूत्रग्रंथात सूचित केला जातो तशा प्रकारच्या विभागांची कल्पना त्या काळीही माहित असावी.छांदोग्य उप. (२·२३·१) मध्ये धर्माच्या तीन शाखांचा उल्लेख केला आहे. त्यात म्हटले आहे की धर्माच्या पहिल्या शाखेत यज्ञ, अध्ययन आणि दान ह्यांचा समावेश होतो (म्हणजे गृहस्थाश्रम), दुसऱ्या शाखेत तपाचरणाचा समावेश होतो (म्हणजे वानप्रस्थ) आणि तिसऱ्या शाखेत गुरुगृही राहून आमरण शरीर झिजविणारा ब्रह्मचारी याचा समावेश होतो. बहुधा छां.उप. च्या काळी वानप्रस्थाश्रम आणि संन्यास ह्यांच्या मर्यादा स्पष्ट झाल्या नसाव्या आणि ते दोन्ही आश्रम एकमेकात मिश्रित होत असावेत. मुंडक उप. (३·२-६) मध्ये 'संन्यास, हा शब्द आला आहे. अत्यंत प्राचीन अशा उपनिषदांच्या काळी चार नसले तरी निदान तीन आश्रम प्रख्यात होते. जाबालोपनिषदात

[ब्रह्मचर्य परिसमाप्य गृही भवेद् गृही भूत्वा वनी भवेद्वनी भूत्वा प्रव्रजेत्।
यदि चेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद् गृहाद्वा वनाद्वा। जाबालोपनिषद् ४. ]

चारी आश्रमांचे स्पष्ट वर्णन केले आहे. पाणिनीला भिक्षुसूत्रे माहित होती आणि त्याने मस्करिन शब्दाचा अर्थ 'परिव्राजक' असा सांगितला [मस्करमस्करिणौवेणुपरिव्राजकयोः । पाणिनि ६·१·१५४.] आहे (पाणि ६·१·१५४). ह्यावरून पाणिनीच्या पूर्वी (ख्रि.पू. ३०० हून पूर्वी) भिक्षु आश्रमाची व्यवस्था समाजात रूढ झाली असली पाहिजे. बुद्ध धर्माने भिक्षु संप्रदाय ब्राह्मणप्रणित धर्मापासून स्वीकारला होता.

मनूने आश्रमांची उपपत्ती पुढीलप्रमाणे दिली आहे. आयुष्याची मर्यादा शंभर वर्षांची असते. (शतायुर्वै पुरुषः). सर्व लोक त्या वयापर्यंत जगत नाहीत परंतु जास्तीत जास्त तोपर्यंत जगण्याची अपेक्षा करिता येते. त्याकाळाचे चार भाग पाडावे. हे चार भाग प्रत्येकी २५ वर्षांचेच असतील असे नाही, कोणाच्या

बाबतीत ते २५ वर्षाहून कमी असतील आणि कोणाच्या बाबतीत २५ वर्षांहून अधिक मुदतीचे असतील. मनुष्याच्या आयुष्यातील पहिला भाग ब्रह्मचर्य आश्रम असतो आणि त्या तो गुरूच्या घरी राहून अध्ययन करतो (मनु. ४·१). अध्ययन पुरे केल्यावर आयुष्याच्या दुसऱ्या भागात तो विवाह करून गृहस्थ होतो आणि पुत्रांना जन्म देऊन पितरांचे आणि यज्ञ करून देवांचे ऋण फेडतो (मनु. ५·१६९). डोक्यावरील केस पांढरे झाल्यावर तो वनाचा आश्रय करतो म्हणजे वानप्रस्थ होतो (मनु. ६·१।२). आणि आयुष्याचा तिसरा भाग वनात राहून काढल्यावर उरलेले आयुष्य तो संन्यासी होऊन घालवितो (मनु. ६·३३).

बौधायन ध.सू. मध्ये (२·६·२९।३१) आश्रमांच्या उत्पत्तीविषयी पुढीलप्रमाणे मनोरंजक माहिती दिली आहे. त्यात म्हटले आहे की वास्तविक रीतीने गृहस्थाश्रम हाच एक आश्रम असतो. त्याचे चार भेद प्रल्हादाचा पुत्र कपिल ह्या असुराने देवांच्या द्वेषाने केले आहेत. तेव्हा त्या भेदांकडे शाहण्या लोकांनी लक्ष देऊ नये. असे चार भेद करण्यात कपिलाचा हेतु देवाची शक्ती कमी करण्याचा होता. मनुष्यांनी यज्ञ केले म्हणजे देवांना हविर्भाग मिळून त्यांची शक्ती वाढते. कपिलाचा हेतु असा होता की जे वानप्रस्थ आणि संन्यासी (परिव्राजक) होतील ते यज्ञ करणार नाहीत आणि त्यामुळे देवांची शक्ती कमी होईल.

आश्रमांची दुसऱ्या प्रकाराने उपपत्ती लावता येईल. आयुष्यातील अंतिम ध्येये (पुरुषार्थ) धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ही असून त्या सर्वांत श्रेष्ठ ध्येय मोक्ष हे समजण्यात येते. सुख आणि दुःख ह्यांनी भरलेल्या ह्या जगात पुन्हा यावयास न लागावे म्हणजेच मोक्ष. मोक्षप्राप्तीला आशात्याग करणे अवश्य असते. एकाद्याने जगाचा त्याग केला तरी त्याची सुखाविषयीची आसक्ती नाहीशी व्हावी लागते आणि तशी आसक्ती राहू नये ह्याकरिता भारतातील प्राचीन ग्रंथकारांनी त्यांच्या मताप्रमाणे चार आश्रम असलेली समाजरचना आखली. ब्रह्मचर्यामध्ये मनुष्य आपल्या मनोवृत्तीचे आणि भावनांचे नियमन करतो, पूर्वजांनी करून ठेवलेल्या वाङमयरूपी ठेव्याचा तो परिचय करून घेतो, आणि आज्ञापालन, आदर, साधी राहणी आणि उच्चविचारसरणी ह्या गोष्टी शिकतो; नंतर तो विवाह करतो आणि गृहस्थ होतो, आयुष्यातील सुखांचा अनुभव घेतो, ऐश्वर्य भोगतो, त्याला संतती होते आणि संतती, मित्र,नातलग, शेजारी ह्यांच्या संबंधीची आपली कर्तव्ये तो पार पाडतो, देशातील एक उपयुक्त नागरिक बनतो, आपल्या कुलाचा आधारस्तंभ होतो; ५० वर्षांच्या सुमाराचा झाल्यावर त्याला मानवी आकांक्षांची आणि जगातील सुखांची विफलता पटते आणि म्हणून ह्या जन्मानंतर पुढे काय होणार ह्या गूढप्रश्नाचा विचार करण्याकरिता आणि आत्मसंयमन, तपश्चर्या आणि अहिंसा ह्यांचा अभ्यास करण्याकरिता त्याने अरण्यात राहण्यास जावे असा नियम घालण्यात आला आणि ह्या आचरणाची परिणती शेवटला आश्रम जो संन्यास त्यात व्हावी. मोक्षप्राप्तीचे ध्येय एकाद्याला ह्याच जन्मात प्राप्त होईल, कोणाला आध्यात्मिक बळ सतत वाढत राहून अनेक जन्मांच्या अंती त्याचे ध्येय साध्य होईल. वर्ण विभागाच्या तत्त्वात मनुष्याचा समाजाचा एक घटक ह्या नात्याने विचार केला आहे आणि असा घटक म्हणून असलेले मनुष्याचे हक्क कोणते, त्याचे हेतु, अधिकार, जबाबदाऱ्या कोणत्या आणि कर्तव्ये कोणती ह्याबद्दलचे नियम वर्णव्यवस्थेत घालून दिले आहेत. आश्रमव्यवस्थेत मनुष्याचा व्यक्ति ह्या नात्याने विचार केला आहे. आश्रम विभागाच्या मागील कल्पना खरोखरच थोर, उदात्त तत्वांवर आधारलेली होती आणि निरनिराळ्या कारणांनी जरी ती आश्रमव्यवस्था पार नाहीशी झाल्यासारखी दिसत असली तरी त्याचा दोष ती कल्पना ज्यांनी काढली त्यांना लागत नाही. ड्यूसन ह्या पाश्चिमात्य ग्रंथकाराने (Encyclopaedia of Religion & Ethics ह्या ग्रंथात) असे म्हटले आहे की सबंध मानवजातीच्या इतिहासात ह्या कल्पनेच्या उदात्तपणाची बरोबरी करू शकेल अशी दुसरी एकही गोष्ट क्वचितच सापडेल.

अनुक्रमणिका

ह्या चार आश्रमांसंबंधी निरनिराळ्या ग्रंथकारांची तीन प्रकारची मते आढळतात. काहींच्या मते हे आश्रम एकामागून एक असेच स्वीकारता येतील आणि त्यांतील कोणताही आश्रम सोडून देता येणार नाही अथवा संन्यासानंतर गृहस्थ होता येणार नाही (समुच्चय). दुसऱ्या काहींच्या मते ब्रह्मचर्यानंतर कोणालाही पर्याय स्वीकारता येईल म्हणजे ब्रह्मचर्यानंतर परिव्राजक होता येईल अथवा गृहस्थाश्रमानंतर एकदम परिव्राजक होता येईल (विकल्प). तिसऱ्या प्रकारचे मत असे आहे की वास्तविकरीत्या गृहस्थाश्रम हाच एक आश्रम आहे. (ब्रह्मचर्य ही गृहस्थाश्रमाची पूर्वतयारी असते आणि बाकीचे आश्रम गृहस्थाश्रमापेक्षा कमी योग्यतेचे असतात) (बाघ).आप.ध.सू. (२·९·२१·२) मध्ये म्हटले आहे की कोणताही आश्रम स्वीकारून शास्त्रात सांगितल्याप्रमाणे आपली कर्तव्ये केली म्हणजे सुखाची प्राप्ती होते. चार आश्रमांत एक दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ असा त्यांच्यात भेद नाही. (आप ध.सू. २·९·२४·१४). दुसऱ्या काही टीकाकारांनी ह्या तीन प्रकारच्या मतांचा समन्वय करण्याचा प्रयत्न केला आहे आणि त्या तीन मतांपैकी प्रत्येक मत कोणकोणत्या प्रकारच्या (योग्यतेच्या) मनुष्यांना लागू पडते हे त्यांनी दाखविले आहे. (मनु.६·३५ वरील सर्वज्ञनारायणाची टीका).उदाहरणार्थ, गृहस्थाश्रम हाच एक आश्रम आहे हे मत ज्या लोकांची लौकिक सुखाविषयीची तृष्णा आणि लौकिक व्यवहाराविषयीची आवड तीव्र असतात त्यांना लागू पडते.

———–—

**अनुक्रमणिका**

# प्रकरण ३३

## विवाह

(मू. ग्रं. पा. २.४२७-५४१)

सर्व संस्कारात विवाह संस्कार अत्यंत महत्त्वाचा असतो. ज्या ज्या कालातील वाङ्मय उपलब्ध अशा सर्व काळांत भारतामध्ये विवाहाला फार महत्त्व दिलेले होते. ज्या समाजात विवाहसंस्था अस्तित्वात नव्हती आणि स्त्री-पुरुषांचे व्यवहार स्वेच्छाचाराने आणि अनिर्बंधपणे चालत होते अशा समाजांचा निर्देश वैदिक वाङ्मयात आलेला नाही. तथापि महाभारतात (आदि आणि सभापर्वात) अशा प्रकारचा समाज पूर्वीच्या काळी काही ठिकाणी अस्तित्वात होता असे उल्लेख आले आहेत. आदिपर्वात (अ. १२२·४ आणि ७) पंडू राजा कुंतीला म्हणतो की पूर्वयुगात स्त्रिया कोणाच्या बंधनात नसत, त्या इच्छेला येईल त्याप्रमाणे वर्तन करीत, एका पुरुषाचा त्याग करून दुसऱ्याच्या मागे जात आणि अशी स्थिती पंडूच्या वेळेला सुद्धा उत्तर कुरु देशात अस्तित्वात होती. सभापर्वात (३१·३७।३८) असे वर्णन केले आहे की माहिष्मती नगरीतील स्त्रिया अग्नीच्या वराने स्वेच्छाचाराने वागत आणि त्यांचे नियमन करता येत नसे. महाभारतात असाही उल्लेख आला आहे की उद्दालकाचा पुत्र श्वेतकेतु ह्याने स्त्रियांच्या स्वेच्छाचाराला बंदी घातली. ह्या उल्लेखांवरून स्त्री-पुरुष संबंध स्वेच्छाचाराने चालत असत असे सिद्ध करता येणार नाही. कदाचित अशा प्रकारचा समाज त्याकाळी प्रत्यक्ष अस्तित्वात नसून हजारो वर्षांपूर्वी समाजस्थिती कशा प्रकारची होती ह्याबद्दलची ही कविकल्पना असण्याचा संभव आहे. अनिर्बंध असे स्त्री-पुरुष संबंध आरंभीच्या समाजात अस्तित्वात होते अशी कल्पना आता शिष्टसंमत राहिलेली नाही.

ऋग्वेदात (१०·८५.१६; ५·३·२; ५·२८·३ इ.) जी विधाने केली आहेत त्यांवरून असे दिसते की गृहस्थाश्रमी होऊन मनुष्याला देवांप्रीत्यर्थ यज्ञ करता यावे आणि संतती उत्पन्न करता यावी हाच विवाह करण्याचा हेतु असे. स्मृतिकार आणि निबंधग्रंथकारांच्या मतांप्रमाणे धर्माचरण, प्रजा (आणि त्यांच्या अनुषंगाने नरकापासून संरक्षण) आणि रति (संभोगजन्य आणि इतर सुखे) ह्या गोष्टी प्राप्त होणे हे विवाहाचे तीन प्रमुख हेतु असतात. आप. ध. सू. (२·६·१३·१६।१७) मध्ये असे निक्षून [जांयापत्योर्न विभागो विद्यते । पाणिग्रहणाद्धि सहत्वं कर्मसु । आप. ध. सू. २·६·१३·१६-१७] सांगितले आहे की ज्या अर्थी विवाहानंतर पती आणि पत्नी यांनी धार्मिक कृत्ये दोघांनी मिळून करावयाची असतात, त्याअर्थी पती आणि पत्नी यांची ताटातूट करणे शक्य नाही.

विवाहासंबंधी सांगावयाची पहिली गोष्ट म्हणजे वरयोजना आणि योग्य वराच्या ठिकाणी कोणकोणते गुण असले पाहिजेत ही होय. निरनिराळ्या ग्रंथकारांनी (आश्व. गृ. १·५·२; आप. गृ. ३·२० इ.) वराच्या अंगी कोणते गुण असले पाहिजेत हे सांगताना त्याची बुद्धि, कुल, शील, शरीरसामर्थ्य, कीर्ती, धन, नातलग आणि मित्र ह्यांचा पाठिंबा, महत्त्वाकांक्षा इत्यादी गुणांचा उल्लेख केला आहे. आश्वलायन श्रौत (९·३) मध्ये वराच्या आईच्या बाजूच्या आणि बापाच्या बाजूच्या दहा पिढ्यांतील पुरुष विद्या, तप आणि सदाचरण ह्यांनी युक्त ब्राह्मणजातीचे असतील ते कुल चांगले असल्याचे म्हटले आहे. चांगली संतती होण्याच्या दृष्टीने उत्तम कुल असणे ही सर्वात अधिक महत्त्वाची गोष्ट असते असे मनूचे (४·२४४) मत होते. मनूने असेही म्हटले आहे की आपल्या कुलाचा गुणोत्कर्ष व्हावा आणि ते मान्यतेला पोचावे अशी इच्छा असणाऱ्याने नेहमी सर्वात श्रेष्ठ असणाऱ्या व्यक्तीबरोबर विवाहसंबंध करावे, कमी प्रतीच्या व्यक्तींशी विवाह

संबंध टाळावे. हर्षचरितामध्ये (प्र. ४) म्हटले आहे की वराच्या बाबतीत त्याच्या अंगात दुसरे गुण असले तरी शाहणे लोक सामान्यतः उत्तम कुलाकडे पहिल्याने लक्ष देतात. तथापि वधूच्या बाबतीत मनूने (२·२३८) सांगितले आहे की एकादी मुलगी स्त्रीजातीतील रत्नासारखी असली तरी तिचे कुल हलके अथवा वाईट असले तरी तिच्याशी विवाह करण्यास प्रत्यवाय नाही.

वधूची निवड करण्यासंबंधीचे नियम वराच्या निवडीसंबंधीच्या नियमांहून अधिक तपशीलवार असतात. तथापि उत्तम कुल, रोगांचा अभाव इत्यादी काही बाबातींतील नियम दोघांनाही सारखेच लागू पडतात. कन्येच्या ठिकाणी शुभ लक्षणे असावीत. ती बुद्धी, सौंदर्य, सच्छील, आरोग्यसंपन्न असावी (आश्व. गृ. १·५·३; शां. गृ. १·५·६; मनु. ३·४.; याज्ञ १·५२). ही लक्षणे दोन प्रकारची असतात. पहिली बाह्य (दिसून येणारी) आणि दुसरी अभ्यंतर (न दिसणारी). भारद्वाजगृह्यात (१·११) म्हटले आहे की एकाद्या मुलीशी विवाह करण्याचा प्रवृत्त करणाऱ्या चार गोष्टी असतात : त्या म्हणजे संपत्ती, सौंदर्य, बुद्धि आणि कुल. ह्या चारही गोष्टी मिळत नसल्या तर संपत्ती ही त्यांतल्या त्यात कमी महत्त्वाची समजून सोडून द्यावी; त्यानंतर बुद्धि आणि उत्तम कुल ह्या गोष्टी असतील तर सौंदर्य नसले तरी चालेल; बुद्धि आणि कुल ह्यांच्यापैकी अधिक महत्त्वाचे काय असा प्रश्न पडल्यास काहींचे मत बुध्दी अधिक महत्त्वाची मानावी आणि काहींचे मत कुलाला अधिक महत्त्व द्यावे असे आहे. मानव गृह्य (१·७·६।७) मध्ये विद्या ही पाचवी गोष्ट विवाहाला प्रवृत्त करणारी असल्याचे सांगितले असून तिचे महत्त्व सौंदर्याहून कमी आणि बुद्धीहून अधिक मानावे असे म्हटले आहे. काही गृह्यसूत्रांत वधूची निवड करण्याच्या काही गूढ स्वरूपाच्या पद्धती सुचविल्या आहेत. निरनिराळ्या ठिकाणाहून गोळा केलेल्या मातीचे गोळे करून त्यांपैकी एक गोळा उचलण्यास त्या मुलीला सांगावे आणि ती जो गोळा उचलील त्याप्रमाणे ती कशी निघेल ह्याचे अनुमान बांधावे (आश्व. गृ. १·५·५·६). गृहस्थरत्नाकरासारख्या निबंधग्रंथात (पा. १३।२२) मुलीच्या शारिरिक चिन्हांवरून शुभ आणि अशुभ लक्षणे कशी ओळखावी ह्याचे विवेचन केले आहे.

वरापेक्षा वधु लहान (यवीयसी) असावी असे अनेक ग्रंथांत (गौ. ४·१; वसि. ८·१ इत्यादी) सांगितले असून त्याचा अर्थ वयाने लहान आणि उंचीने ठेगणी असा मिताक्षरेने सांगितला आहे. पसंत करावयाची मुलगी भ्रातृहीन नसली पाहिजे असा नियम बऱ्याच ग्रंथांत सांगितला आहे (मानव गृ. १·७·८; मनु. ३·११; याज्ञ. १·५३). तथापि तो नियम शेकडो वर्षे तरी पाळण्यात येत नाही. ह्या नियमाच्या मागे बरीच मोठी ऐतिहासिक घटना आहे. प्राचीन काळी जेव्हा एकाद्या मनुष्याला पुत्र नसे तेव्हा त्याला आपल्या कन्येची पुत्राच्या जागी योजना करता येई म्हणजे ती कन्या त्याची पुत्रिका होत असे आणि त्या कन्येबरोबर विवाह करणाऱ्या मनुष्याबरोबर तिच्या पित्याला असा करार करता येत असे की त्या मुलीला होणार पुत्र हा त्या मुलीच्या पित्याचा पुत्र होईल आणि तो आपल्या आईच्या पित्याला त्याच्या सख्या मुलाप्रमाणे पिंड देईल. अशा रीतीने त्या मुलीला होणारा पुत्र आपल्या (जनक) पित्याला पिंड देत नसे आणि त्या पित्याच्या वंशाची परंपरा न चालविता मातेच्या पित्याचा पुत्र बनून त्याचा वंश चालवी. ह्याकरिता भ्रातृविहीन (बंधु नसलेली) कन्या कोणी पसंत करीत नसत. मध्ययुगीन काळात ह्या निषेधाकडे हळूहळू दुर्लक्ष्य करण्यात येऊ लागले आणि आधुनिक काळात तर भ्रातृविहीन कन्येचा पिता श्रीमंत असला तर ती कन्या लोभ उत्पन्न होण्यासारखी होऊन बसली आहे. मध्ययुगीन काळात असा समज होता की, अविवाहित स्त्रीला स्वर्गप्राप्ती होत नाही आणि त्यामुळे जिला स्वर्गाची इच्छा असेल अशी कोणतीही मुलगी अविवाहित राहणे शक्य नाहीसे झाले होते.

विवाहाकरिता कन्येची निवड करण्यासंबंधी आणखीही दुसरे काही निर्बंध असत. स्वतःच्या जातीच्या मुलीबरोबर विवाह करावा; पसंत करावयाची वधु वराच्या गोत्राची अथवा समान प्रवराची असू नये, ती वराची सपिंड असू नये अथवा वराच्या आईच्या नात्याची असू नये, असे निर्बंध अनेक स्मृतींनी सांगितले आहेत (हि. गृ. १·१९·२; गोभि. गृ. ३·४·४; मनु. ३·५ इ०). वेदव्यासस्मृतीने तर मुलीच्या मातेचे गोत्र वराच्या गोत्राशी समान नसावे असे सांगितले आहे.

सगोत्र, सप्रवर आणि सपिंड मुलीबरोबर विवाह करण्याविषयी सांगितलेले हे नियम अतिशय महत्त्वाचे आहेत. मीमांसाशास्त्राच्या सिद्धांताप्रमाणे ज्या नियमांचा हेतु उघड अथवा सहज समजण्यासारखा नसेल त्या नियमांचा भंग झाल्यास ते मूळचे कृत्य अशास्त्रीय आणि निष्फल ठरते. सगोत्र, सप्रवर आणि सपिंड मुलींसंबंधाच्या निषेधाचे कारण उघड नाही म्हणून ते नियम मूलभूत आणि अवश्य ठरतात आणि एकाद्याने एकाद्या सगोत्र अथवा सप्रवर अथवा (वर्ज्य पिढ्यांच्या आतील) सपिंड अशा मुलीबरोबर विवाहाचा विधी जरी केला असला तरीही ती त्याची कायदेशीर पत्नी मुळीच होत नाही असे मेधातिथी (मनु. ३·११) आणि मिताक्षरा (याज्ञ. १·५३) ह्यांनी सांगितले आहे.

पुरुषांचे, आणि स्त्रियांचे लग्नाच्या वेळचे वय निरनिराळ्या काळी, निरनिराळ्या प्रांतांत आणि निरनिराळ्या जातींत भिन्नभिन्न असे. पुरुषांच्या बाबतीत त्यांनी अमूक वर्षापूर्वी विवाह केलाच पाहिजे अशाविषयी स्पष्ट नियम सांगितलेले नाहीत. एकादा पुरुष आजन्म ब्रह्मचारी राहू शकेल परंतु निदान मध्ययुगीन आणि आधुनिक काळात प्रत्येक मुलीचे लग्न होणे ही अत्यंत आवश्यक गोष्ट मानली जात असे आणि मानली जाते. सामान्यतः प्राचीन काळी (ब्राह्मणाच्या बाबतीत) उपनयन ८ व्या वर्षी होत असे. आणि त्यानंतर १२ वर्षे ब्रह्मचर्यात घालविली जात. त्यामुळे विवाहाच्या वेळी पुरुषाचे वय साधारणपणे २० वर्षांचे अथवा त्याहून अधिक इतके असे. ह्याच कारणाकरिता मनूने (९·९४) म्हटले आहे की तीस वर्षे वयाच्या पुरुषाने बारा वर्षे वयाच्या मुलीबरोबर विवाह करावा अथवा एकाद्या २४ वर्षे वयाच्या पुरुषाला गृहस्थाश्रमी होण्याची उतावीळ झाली तर त्याने आठ वर्षे वयाच्या मुलीबरोबर विवाह करावा. महाभारतात (अनु. ४४·१४) वर आणि वधु ह्यांची वये ३० आणि १० अथवा २१ आणि ७ असणे प्रशस्त असल्याचे सांगितले आहे.

विवाहाच्या वेळी मुलींचे वय किती असे ह्याविषयी ऋग्वेदात स्पष्ट उल्लेख नाही. परंतु पुष्कळ मुलींचे विवाह त्या बऱ्याच प्रौढ झाल्यावर होत असत (निदान ८ व्या वर्षा इतक्या कोवळ्या वयात होत नसत) असे अनुमान काढण्यासारखी वर्णने त्यात [सम्राज्ञीश्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वा भव । ननान्दरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी अधिदेवृषु ॥ ऋ. १०·८५·४६·] आहेत. ऋ. (१०·८५·४६). ऋग्वेदाच्या काळी मुलींची लग्ने कोणत्याही वयात (रजोदर्शनापूर्वी अथवा नंतर) होत असत आणि कधी कधी काही मुली जन्मभर अविवाहित राहत असत असे दिसते (ऋ. १·१२४·७). ऋग्वेदाशिवाय इतर संहिता आणि ब्राह्मणग्रंथ ह्यांत मुलींच्या लग्नाच्यावेळी त्यांचे वय काय असावे ह्यासंबंधी फारशी माहिती मिळत नाही.

प्राचीन अशा गृह्य आणि धर्मसूत्रांवरून असे दिसून येते की त्यांच्या काळी अनेक कारणाकरिता मुलीचे विवाह त्यांना रजोदर्शन होण्याच्या जरा अगोदर अथवा रजोदर्शन झाल्यानंतर लौकरच करण्यात येत असत. पुष्कळशा गृह्यसूत्रकारांनी (हि. गृ. १·१९·२; गोभि. गृ. ३·४·६ इ.) वधु 'नग्निका' असावी असे सांगितले आहे. त्या शब्दाच्या अर्थाविषयी मतवैचित्र्य आहे. कोणी नग्निका म्हणजे 'जी कपड्यांशिवायही सुदर दिसते अशी मुलगी' असा अर्थ केला आहे तर कोणी 'जिचे रजोदर्शनाचे वय समीप आले आहे अशी मुलगी' असा केला आहे.

अनुक्रमणिका

बहुतेक गृह्यसूत्रांनी असा नियम सांगितला आहे की विवाहित दांपत्याने विवाहानंतर निदान तीन रात्रीपर्यंत तरी ब्रह्मचर्य व्रताने राहावे. ह्यावरून असे अनुमान होते की लग्नाच्या वेळी मुली साधारणपणे रजोदर्शन होण्याच्या अतिशय जवळ आलेल्या असाव्यात अथवा त्यांना नुकतेच रजोदर्शन झालेले असावे. बहुतेक गृह्यसूत्रात 'चतुर्थीकर्म' नावाचा (विवाहानंतर चौथ्या दिवशी करावयाचा) एक विधी सांगितला आहे आणि त्या विधीत दांपत्याने एकत्र राहण्याविषयी स्पष्ट सांगितले आहे. ह्यावरून लग्नाच्या वेळी मुली साधारणपणे बऱ्याच प्रौढ वयाच्या असल्या पाहिजेत असे अनुमान होते. विवाह विधी चालत असताना मुलीला रजोदर्शन झाले तर त्याबद्दल काही स्मृतींनी बारीकसे प्रायश्चित्त सांगितले आहे.

गौतमस्मृतीच्या काळापूर्वी (ख्रि. पू. ५०० अथवा ६०० वर्षे) देखील आपल्या अंगावर कपडे न वापरणाऱ्या अशा कोवळ्या मुलींचे (म्हणजे ज्या मुलींना कपडे न वापरले तरी लाज वाटत नसे अशा मुलींचे) विवाह करावे असे मत प्रतिपादन करणारे काही लोक असत आणि त्यांचे मत गौतमाला पसंत नव्हते आणि त्याने एवढाच नियम सांगितला होता की मुलींचा विवाह त्यांना रजोदर्शन होण्यापूर्वी करावा आणि रजोदर्शनानंतरही काही काळ मुलींचा विवाह झाला नाही तरी गौतमाला त्यात भिण्यासारखे वाटत नव्हते (गौ. १८·२०।२३). रजोदर्शनानंतर विवाह झाल्याने त्या मुलीला अथवा तिच्या पतीला काही दोष लागत नाही परंतु रजोदर्शनापूर्वी मुलीचा विवाह न केल्यास तिच्या पित्याला दोष लागतो अशी कल्पना त्यावेळीदेखील उत्पन्न झाली होती. जिला रजोदर्शन झाले आहे अशा कुमारिकेने मरेपर्यंत आपल्या बापाच्या घरी काढले तरी चालेल परंतु बापाने तिला एकाद्या सद्‌गुणहीन पुरुषाला कधीही देऊ नये असे मनूने (९·८९।९०) म्हटले आहे. तथापि लोकांच्या समजुतीत आणि विचारात बदल होऊन याज्ञवल्क्यस्मृतीच्या काळी (इ. स. २०० च्या सुमारास) रजोदर्शनापूर्वी मुलीचा विवाह झाला पाहिजे असे जोराने लोकमत झाले. हा फरक का पडला ह्याची कारणे तितकीशी स्पष्ट नाहीत. कदाचित मध्यंतरच्या काळात बुद्धधर्माचा प्रसार होऊन त्यातील भिक्षुणीचे नैतिक वर्तन बरेच शिथिल असे त्यामुळे लोकांना मुलींचे विवाह लौकर व्हावे असे वाटू लागले असावे. तसेच त्या सुमारास मुली मुळीच विद्याभ्यास करीनाशा झाल्यामुळेही असे झाले असेल. विवाह हेच स्त्रियांचे उपनयन असते असे मानण्यात येऊ लागल्यामुळेही साहजिक उपनयनाचे वय (८ वे वर्ष) हेच मुलींच्या विवाहाचे योग्य वय मानण्यात येऊ लागले. जर एकादी स्त्री अविवाहित स्थितीत मरण पावली तर तिला स्वर्गप्राप्ती होत नाही ह्या मताचाही परिणाम झालेला असेल. अशा अनेक कारणांनी मुलींच्या लग्नाचे वय कमी करण्याच्या प्रवृत्तीला इ. स. च्या पहिल्या ५।६ शतकात उत्तेजन मिळाले. पराशराने (७·१२) म्हटले आहे की जर एकाद्याने आपली कन्या १२ वर्षांची होईपर्यंत तिचा विवाह केला नाही तर तिच्या माता-पितरांना आणि ज्येष्ठ बंधूंना नरकात जावे लागते आणि अशा मुलींबरोबर विवाह करणारा ब्राह्मण वृषलीचा पती होतो आणि इतर ब्राह्मणांनी त्याच्या पंक्तीला भोजनाला बसू नये. ह्याच्याच बरोबर आठ वर्षे वयाच्या म्हणजे गौरी संज्ञा असणाऱ्या मुलीबरोबर विवाह करणाऱ्याची प्रशंसा करण्यात येऊ लागली. जर एकादा अत्यंत योग्य असा वर मिळत असेल तर लहान वयात मुलीचा विवाह करावा अशी मनूने (९·८८) देखील शिफारस केली आहे. ब्राह्मण मुलीचे विवाह ८ ते १० वर्षांच्या दरम्यान केले पाहिजेत हा नियम इ.स.च्या ६ व्या अथवा ७ व्या शतकाच्या सुमारास सर्वमान्य झाला आणि तो आधुनिक काळापर्यंत चालत आला, गेल्या २५।३० वर्षांत अनेक कारणांनी आणि विशेषतः प्लेगच्या साथीमुळे आणि मध्यमवर्गाच्या आर्थिक परिस्थितीमुळे मुलींच्या लग्नाचे वय फार वाढले आहे आणि आता गरीब ब्राह्मणांच्या मुलींचे विवाह सोळाव्या वर्षापूर्वी क्वचितच होतात. बालविवाह प्रतिबंधक कायद्याने (१९३८ च्या १९ व्या कायद्याने) मुलींच्या विवाहाचे किमान वय १४ वर्षे ठरविले आहे. प्राचीन काळच्या ग्रंथकारांनी लहान वयात विवाह करण्याचा पुरस्कार केला ह्याबद्दल त्यांना हासण्याचे कारण नाही. यूरोपातील सर्व देशात बालविवाह प्रचलित होते आणि खुद्द इंग्लंड देशात इ.स. १९२९ पर्यंत मुलामुलींच्या

विवाहाची वये अनुक्रमे १४ आणि १२ होती आणि त्यावर्षी ती कायद्याने दोघांच्याही बाबतीत १६ वर्षे ठरविण्यात आली.

मुलीच्या विवाहयोग्य वयासंबंधीचे नियम फक्त ब्राह्मणांनाच लागत असत. क्षत्रियांच्या अथवा वैश्यांच्या बाबतीत रजोदर्शनाचे वय होऊन गेलेल्या मुलीबरोबर विवाह करण्यास प्रतिबंध नसल्याचे संस्कारप्रकाशात (पा. ७७१) स्पष्टपणे सांगितले आहे. पौराणिक काळात देखील प्रौढ असलेल्या अविवाहित मुली लोकांना अज्ञात नसाव्या.

आंतरजातीय मिश्र विवाह हा दुसरा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. अनुलोम विवाह कसे मान्य धरले जात, प्रतिलोम विवाह कसे निंद्य मानीत आणि अशा मिश्र विवाहापासून निरनिराळ्या पोटजाती कशा निर्माण झाल्या ह्याचे वर्णन मागे आलेच आहे. ब्राह्मण आणि क्षत्रिय अथवा ब्राह्मण आणि वैश्य ह्यांच्यामधील विवाहांना प्राचीन स्मृतीकारांनी मोकळेपणाने मान्यता दर्शविली होती. परंतु ब्राह्मणाच्या शूद्र स्त्रीबरोबर झालेल्या विवाहाबद्दल त्यांच्यात एकमत नव्हते. असे विवाह घडून येत परंतु ते मान्य समजले जात नसत. इ.स. ९ व्या अथवा १० व्या शतकापासून अनुलोम विवाह कमी कमी होऊ लागले आणि गेल्या काही शतकात तर ते क्वचितच झाले आणि त्या त्या जातींनी अशा विवाहांना सशास्त्रीय मानले नाहीत. शिलालेखांवरूनही अशा आंतरजातीय विवाहाची विश्वसनीय उदाहरणे मिळतात (एपि. इं. खं. १५ पा. ३९; एपिं. इं. खं १५ पा. ३०१ इ.). द्विजातीयांमधील मिश्रविवाहांनादेखील स्मृतींनी आणि निबंधकारांनी नक्की कोणत्या काळापासून निषेध केला हे सांगणे अतिशय अवघड आहे. मध्ययुगीन काळात होऊन गेलेल्या स्मृतिचंद्रिका, हेमाद्री ह्यांच्या सारख्यांनी आदित्यपुराण अथवा ब्रह्मपुराण यातील म्हणून उद्धृत केलेल्या श्लोकांत आंतरजातीय विवाहाचा कलियुगात वर्ज्य करावयाच्या कृत्यांत समावेश केला आहे.

वराशी सपिंड असलेल्या मुलीबरोबर विवाह करू नये ह्या निर्बंधाचा आता विचार करू.सपिंडसंबंध ज्या तीन बाबतींत विशेष महत्त्वाचा असतो त्या म्हणजे विवाह, वारसा आणि आशौच (सुयेर आणि सुतक). सपिंड संबंधाच्या मुलीबरोबर विवाह न करण्याचा निर्बंध शूद्रासह सर्व वर्णांना लागू पडतो. कोणातरी एका व्यक्तीच्या शरीराचे अंश, दोन व्यक्तींमध्ये असल्याकारणाने त्यांच्यामध्ये सपिंड संबंध उत्पन्न होतो. बापाच्या शरीराचे काही अंश मुलाच्या ठिकाणी वसत असल्याकारणाने मुलाचा बापाच्या बरोबर सपिंडसंबंध असतो. अशाच रीतीने पितामह आणि पितामहासारखे नाते असलेल्या व्यक्तींबरोबर नातू आणि नातवासारखे नाते असणाऱ्या व्यक्तींचा सपिंड संबंध असतो. अशाच रीतीने मुलाचा आपल्या आईबरोबर आणि आजोळच्या आजोबाप्रभृति व्यक्तींबरोबर आईच्याद्वारा सपिंड संबंध असतो. अनादि कालापासून उत्पन्न झालेल्या ह्या जगात अशा प्रकारचे नाते कोणत्या ना कोणत्या प्रकाराने सर्वच व्यक्तींच्या दरम्यान असणे शक्य आहे. ह्याकरिता याज्ञवल्क्याने (१·५२।५३) असे सांगितले की आईच्या बाजूने ५ व्या पिढीनंतर आणि बापाच्या बाजूने ७ व्या पिढीनंतर सपिंड संबंध राहत नाही. ह्या पिढ्या कशा मोजाव्या ह्यासंबंधी बरेच तपशीलाचे नियम मिताक्षरेत सांगितले आहेत. एकाद्या पूर्वजाने निरनिराळ्या वर्णांच्या स्त्रियांबरोबर विवाह केले असतील त्यांच्या संततीच्या बाबतीत सपिंड संबंध फक्त तीन पिढ्यांपर्यंतच लागतो.

ह्या बाबतीत रूढी आणि चाली भारतातील निरनिराळ्या प्रांतांत आणि जातींत भिन्न प्रकारच्या आहेत आणि अमूक एक नियम सर्वत्र लागू पडतो असे सांगता येत नाही. सपिंड संबंधामुळे विवाहाला घातलेले निर्बंध विशेषतः असा सपिंड संबंध स्त्रियांच्या द्वारा उत्पन्न झालेला असला तर भारतातील बऱ्याच भागांत पुष्कळ प्रसंगी फार प्राचीन काळापासून मानला जात नाही. ह्याचे ठळक उदाहरण म्हणजे मामाच्या

अथवा आतेच्या मुलीशी केलेल्या विवाहाचे आहे. ह्या बाबतीत फार प्राचीन काळापासून तीव्र मतभेद आहेत. बौद्धायनाने (१·१·१९।२६) असे म्हटले आहे की मामाच्या अथवा आतेच्या मुलीशी विवाह करण्याच्या रूढी स्मृतींच्या आणि शिष्टांच्या मताविरुद्ध असल्यामुळे कोणीही त्या रूढींचे अनुकरण करू नये. तरीही मद्रास प्रांतातील कित्येक जातीत असा विवाह मान्य समजला जातो इतकेच नव्हे तर तोच जास्त प्रशस्त मानतात. कर्नाटकातील काही देशस्थ ब्राह्मण आणि कऱ्हाडे ब्राह्मण ह्यांच्यासारख्या काही ब्राह्मण जातीतही सांप्रत काळी ही रूढी पाळण्यात येते. काही ग्रंथकारांनी ह्या रूढींचे समर्थन केले आहे (स्मृतिचं., परा.माध. १·२ पा. ६३।६४). त्यांनी म्हटले आहे की असा निषेध ज्या पुरुषाच्या मातेचा विवाह गांधर्व, आसुर आदी काही प्रकारांनी झालेला असेल त्यांनाच फक्त लागतो कारण त्या प्रकारच्या विवाहांमुळे स्त्री पतीच्या गोत्रात समाविष्ट न होता तिच्या पित्याच्याच गोत्रात राहते.

अशा पुरातन कालापासून चालत आलेल्या कुलाचारांच्या,जातीच्या रिवाजांच्या अथवा स्थानिक प्रघातांच्या बाबतीत सपिंड संबंधाचा संकोच करण्याची (म्हणजे ५ व्या, ७ व्या पिढ्यांपेक्षा कमी पिढ्या मान्य करण्याची) सवलत दिली आहे. सपिंड संबंधाच्या निर्बंधामुळे आधुनिक काळात अतिशय अडचणी उत्पन्न होतात. मुलामुलींच्या सहशिक्षणामुळे आणि विवाहाची वयोमर्यादा वाढल्यामुळे प्रीतिविवाह बरेच वेळा होऊ लागले आहेत आणि असे प्रणयी लोक सपिंड संबंधासारख्या (त्यांच्या दृष्टीने) क्षुद्र गोष्टींचा विचार करीत नाहीत. परंतु कायदा कित्येक वेळा अति निर्दय असतो. अशा प्रकारचे विवाह अगदी अलीकडेच झाले आहेत. वरील मत धोक्याची सूचना देण्याकरिताच व्यक्त केले आहे. एवढे तरी ध्यानात ठेवणे इष्ट आहे की ज्या जातीत अशी रूढी प्रचलित नाही त्या जातीत असे विवाह झाल्यास त्यांचा कायदेशीरपणा विवादित आहे.

स्त्रीचे गोत्र कोणते आणि कोणत्या वेळी बदलते ह्यासंबंधी धर्मशास्त्रावरील ग्रंथांत पुष्कळ विवेचन केलेले असते. विवाहापूर्वी मुलगी तिच्या पित्याच्या गोत्राची असते. विवाहानंतर ती पतीच्या गोत्रात प्रविष्ट होते असा सर्वसामान्य नियम असला तरी जर ती स्त्री पुत्रिका असली अथवा तिचा विवाह आसुर, पिशाच इत्यादी विधीने झालेला असला तर ती पिंडदानाच्या बाबतीत विवाहानंतरही पित्याच्या गोत्रातच राहते. विवाहानंतर कोणत्या विशिष्ट वेळेपासून ती पतीच्या गोत्राची होते ह्याबद्दल भिन्न मते आहेत. आश्व. गृ. च्या मताप्रमाणे (१·८·१२) ती विवाहानंतर एक वर्षाने एकाच गोत्राची होते. काहींच्या मताने ती विवाहानंतर चौथ्या रात्री, काहींच्या मताने सप्तपदीतील सातवे पाऊल टाकल्यावर पित्याच्या गोत्राचा त्याग करते. (यम ८६; ७८; लिखित १५; २६).

सपिंड संबंधाच्या बाबतीतही अनेक तपशीलाचे प्रश्न असतात. मामाच्या मुलीबरोबर विवाहाला निषेध केला आहे. तोच नियम सापत्न मातेच्या कुलातील मुलीला लागतो किंवा नाही असा प्रश्न उपस्थित होतो आणि त्याबद्दल मतवैचित्र्य आहे. कोणाच्या मताप्रमाणे सापत्न मातेच्या बंधूच्या मुली आणि अशा मुलींची मुले, सापत्न मातेच्या बहिणीच्या मुली आणि अशा मुलींच्या मुली ह्यांच्यामध्ये सापिंड्य असते, आणि त्यांच्याबरोबर विवाह करता येणार नाही; परंतु स्वतःच्या मुलीचा विवाह सापत्न मातेच्या भावाच्या मुलाबरोबर होऊ शकेल (निर्णयसिन्धु पा.२८९, धर्मसिं. पा. २३०). दुसऱ्या मताप्रमाणे असे विवाहही सापिंड्य विस्ताराच्या नियमाविरुद्ध होतात (संस्कारप्रकाश).

काही विशिष्ट मुलींबरोबर केलेले विवाह 'विरुद्ध संबंधाच्या' कारणास्तव काही ग्रंथकारांनी निषिद्ध सांगितले आहेत. अशा मुलींच्या बाबतीत सपिंड संबंधाचा प्रश्न नसतो. उदाहरणार्थ, स्वतःच्या पत्नीच्या

बहिणीची मुलगी, किंवा स्वतःच्याच चुलतीची बहिण. ज्या ठिकाणी नियोजित वधु आणि वर ह्यांचे नाते परस्परांचे माता किंवा पिता अथवा बहिण आणि भाऊ ह्यांच्या सारखे असते त्या ठिकाणी 'विरुद्ध संबंध' उत्पन्न होतो. आधुनिक काळी असे विवाह सर्रास होतात. विरुद्ध संबंधाचा नियम शिफारसवजा असल्याचे न्यायालयांनी ठरविले आहे.

दत्तक पुत्राच्या विवाहाच्या बाबतीतील सापिंड्यासंबंधी बरेच मतवैचित्र्य आहे आणि त्या दत्तकाचे उपनयन मूळच्या कुटुंबात झाले अथवा दत्तक घेणाऱ्याच्या कुटुंबात झाले ह्यावर सापिंड्य संबंधाच्या पिढ्या अवलंबून असतात (सं. कौस्तुभ). काही ग्रंथांनी (निर्णय सिं. ३ पूर्वार्ध पा. ३०२) स्वतःच्या मातेच्या गोत्राशी सगोत्र असणाऱ्या मुलीबरोबर विवाह करण्यास निषेध केला आहे. कोणी (सं. कौ. पा.६९३ आणि धर्मसिंधु) तो निषेध माध्यंदिन शाखेपुरताच धरला आहे.

दायभाग सांप्रदायाप्रमाणे ज्या व्यक्तीचा श्राद्धात दिल्या जाणाऱ्या पिंडाच्या बाबतीत दुसऱ्या व्यक्तीशी संबंध आहे ती सपिंड ठरते. कोणीही मनुष्य जिवंत असताना आपल्या स्वतःच्या तीन पुरुष पूर्वजांना पिंड अर्पण करतो. परंतु तो स्वतः मृत झाल्यावर त्याचा पुत्र सपिंडीकरण श्राद्ध करून त्या व्यक्तीचे त्याच्या पितरांशी एकत्रीकरण करतो आणि त्यानंतर ती व्यक्ती त्याच्या पुत्राने त्याच्या तीन पूर्वजांना दिलेल्या पिंडात स्वतःच्या पित्याबरोबर आणि पितामहाबरोबर अंशभागी होते. पूर्वजांपैकी चौथा व त्याच्यापुढील दोन पुरुष हे पिंड अर्पण करणाऱ्याच्या हाताला जे शिजलेल्या भाताचे अंश लागून राहतात त्या अंशांत भागीदार होतात. अशा रीतीने पिंड अर्पण करणाऱ्याला धरून सात पिढ्यांपर्यंत सापिंड्याचा विस्तार असतो. ज्यांना पितृबंधु आणि मातृबंधु म्हणतात त्यांच्यामधीलही काही पिढ्यांपर्यंत विवाहाचा निषेध असतो. अशा रीतीने सापिंड्याची मर्यादा सर्वसाधारणपणे जितकी सांगितली असते त्याहून पुष्कळच पलिकडे पोचते आणि असे करण्याला काही सयुक्तिक आधार नाही. बंगालमधील सांप्रदायात वर आणि वधु ही दोन्ही सपिंड संबंधाच्या पलिकडली असण्याची आवश्यकता नसते, फक्त वधु अशा संबंधापलिकडील असली तरी पुरेसे होते. दायभागात सांगितलेल्या सपिंड संबंधाच्या उपपत्तीला कोणत्याही वैदिक वचनांचा आधार घेतलेला नाही.

निकटच्या सपिंड संबंधाच्या व्यक्तीमध्ये विवाह कोणत्या कारणास्तव निषिद्ध सांगितला आहे ह्याबद्दल मानवशास्त्रवेत्त्यांनी वेगवेगळ्या उपपत्ती पुढे केल्या आहेत. निदान भारतामध्ये तरी सदरहू निर्बंध दोन कारणास्तव घातला असावा असे वाटते. पहिले कारण असे की जर निकट संबंधाच्या व्यक्तीचे विवाह झाले तर त्या व्यक्तीमधील दोष त्या संततीत उत्पन्न होतात आणि दुसरे कारण म्हणजे जर अति निकटच्या रक्तसंबंधाच्या नातलगांत विवाह करण्याची मोकळिक दिली तर गुप्त प्रेमसंबंध उत्पन्न होतील. जवळच्या अथवा दूरच्या चुलत चुलत संबंधांच्या मुली एकत्र घरात राहत असतील त्यांना बाहेरचे वर मिळविणे कठीण होईल.

सपिंड हा शब्द वैदिक वाङ्मयात क्वचितच आला आहे. धर्मसूत्रांत सपिंड हा शब्द पुष्कळ वेळा वापरण्यात येतो आणि त्या सूत्रांत पिंड अर्पण करण्याचा आणि संपत्तीच्या वारसाचा निकट संबंध असल्याचे दिसते (गौ. १४·१३; २८·२१; आप. ध.सू. २·६.१४·२; वसि. ४·१६।१८).

अनुक्रमणिका

जिच्याबरोबर विवाह करावयाचा ती मुलगी सगोत्र अथवा सप्रवर नसली पाहिजे असा नियम अनेक ग्रंथकारांनी सांगितला आहे. ह्याकरिता गोत्र आणि प्रवर ह्यांच्याविषयी काही महत्त्वाच्या मुद्यांचा थोडक्यात विचार करू.

गोत्र हा शब्द ऋग्वेदामध्ये आला आहे आणि काही स्थळी (ऋ. २·२३·१८; ६·६५·५) त्याचा अर्थ 'समूह' इतकाच बहुधा असावा. अथर्ववेदामध्ये (५·२१·३) 'गोत्र' शब्दाचा अर्थ '(रक्त संबंधाने) एकमेकांशी जोडलेल्या मनुष्यांचा समूह' असा स्पष्टपणे आहे. श्रेष्ठ ऋषींचे वंशज त्या त्या ऋषींच्या नावांनी संबोधले जात असत. पितापुत्रांप्रमाणे गुरुशिष्य ह्या नात्यानेही वंशज धरले जात असतील. पुष्कळ पुरोहित कुटुंबाचे निरनिराळे गट बनले होते आणि त्या गटांची नावे त्या त्या गटांच्या (मानलेल्या अथवा वास्तविक) मूळपुरुषावरून पडत असत आणि निरनिराळ्या गटांतील पूजाविधानांच्या तपशीलात थोडथोडा भेद असे. ऐतरेय ब्राह्मणांच्या काळात गोत्रसंबंध जन्मावरून ठरत असे (आणि गुरुशिष्य ह्या नात्याने ठरत नसे).उपनिषदांत शिष्यांना ब्रह्मज्ञानाचा उपदेश करतेवेळी ऋषी त्यांना त्यांच्या गोत्रनावाने संबोधित असत (प्रश्न उप. १.१; छां. उप. ५·१४·१; ५·१६·१ इ.). निरनिराळ्या उपनिषदांत भारद्वाज प्रभृती गोत्रांचे उल्लेख आले आहेत. ह्या सर्वांवरून असे दिसून येते की गोत्रव्यवस्था आणि त्या गोत्रांचे पोटभेद ह्या गोष्टी ब्राह्मणग्रंथ आणि प्राचीन उपनिषदे ह्यांच्या काळात सुप्रतिष्ठित झाल्या होत्या. तथापि गोत्रांचा विवाहाशी संबंध असल्याचे त्या ग्रंथांत स्पष्टपणे म्हटलेले क्वचितच आढळते. लाट्यायन श्रौत सूत्रात (८.२.८ आणि १०) 'जन' हा शब्द आला आहे आणि त्या शब्दाच्या अर्थाविषयी निरनिराळी मते सांगितली आहेत. त्यांतील एका मताप्रमाणे ज्याच्याबरोबर (म्हणजे ज्याच्या मुलीबरोबर) विवाह करणे शक्य आहे तो जन आणि जो **सगोत्र** असतो तो **'समानजन'** होय.ह्यावरून असे निर्विवाद सिद्ध होते की लाट्यायन श्रौतसूत्रे होण्याच्या पुष्कळ पूर्वीपासून सगोत्राशी विवाह निषिद्ध मानला जात होता. ह्याशिवाय पुष्कळ गृह्यसूत्रांनी सगोत्र मुलीबरोबर विवाह निषिद्ध सांगितला आहे. सगोत्र विवाहाच्या निषेधाची मूळ कल्पना पुष्कळच पूर्वी निघाली असली पाहिजे.

अनेक आवश्यक बाबतीत गोत्राला महत्त्व असे आणि प्राचीन काळच्या आर्यांच्या अनेक रीतिरिवाजांत गोत्राचा संबंध येत असे. उदाहरणार्थ, विवाहविधीतील 'लाजा होमा' त जामदग्न्य गोत्राहून इतर सर्वांना दोन आहुती द्याव्या लागतात आणि जामदग्न्य गोत्राच्या व्यक्तींना तीन आहुती द्याव्या लागतात (आश्व.गृ. १·७·८।९); श्राद्धा करिता बोलवायचे ब्राह्मण शक्य तर बोलावणाऱ्याच्या गोत्राचे नसावे असे आप.ध.सू. (२·७·१७·४) मध्ये सांगितले आहे; काही दीर्घ कालपर्यंत चालणारी सत्रे फक्त ब्राह्मणांनाच करिता येतात आणि भृगु, शुनक आणि वसिष्ठ ह्या गोत्रांच्या ब्राह्मणांना करिता येत नाहीत (जमि. ६·६·२४।२६).

फार प्राचीन काळापासून प्रवरांचा गोत्रांशी अत्यंत निकट संबंध आहे. प्रवर ह्याचा धात्वर्थ 'पसंत करणे', अथवा 'प्रार्थना' असा असला तरी पुढे त्याचा अर्थ 'यज्ञ करणाऱ्याचे एक अथवा अधिक श्रेष्ठ असे पूर्वज ऋषी' असा होऊ लागला. प्रवराचा समानार्थी शब्द **आर्षेय** अथवा **आर्ष** हा आहे. प्रवरांचा अनेक गृह्यसंस्कारांत आणि प्रघातांत समावेश झाला. उदाहरणार्थ, उपनयनाच्या वेळी मुलाच्या प्रवरात जितके ऋषी असतील त्याप्रमाणे त्याच्या मेखलेला एक, तीन अथवा पाच गाठी मारावयाच्या असतात (शां. गृ.२·२) चौल संस्कारात मुलाच्या प्रवरातील ऋषींच्या संख्येइतक्या शिखा राखावयाच्या असतात (आप. गृ. १६·६).

**अनुक्रमणिका**

बौधायनश्रौतसूत्रात (प्रवराध्याय ५४) असे सांगितले

[गोत्राणां तु सहस्राणि प्रयुतान्यर्बुदानि च ।
ऊनपश्चाशदेवैषां प्रवराऋषिदर्शनात्॥ बौश्रो. (प्रवराध्याय) ५४.]

आहे की गोत्रांची संख्या अनेक सहस्र, दशसहस्र आणि दशलक्ष अशी आहे, परंतु प्रवर फक्त ४९ आहेत. गोत्रासंबंधी सर्वसाधारण उपपत्ती अशी आहे की ज्या एका मूळपुरुषापर्यंत अविच्छिन्न अशा पुरुषपरंपरेने ज्या व्यक्तींची वंशावळी पोचू शकते त्या सर्व व्यक्ती त्या मूळ पुरुषाच्या गोत्राच्या समजाव्या. फार प्राचीन काळापासून असे मूळ पुरुष आठ (सात सप्तर्षी आणि अगस्त्य आठवा) धरण्यात येत असत. महाभाष्यात (खं. २ पा २३३) म्हटले आहे की ह्या आठांच्या अपत्यांना गोत्र म्हणतात आणि त्यांच्या खेरीज इतरांना **गोत्रावयव** असे म्हणतात. प्रत्येक गोत्राचा एक, दोन, तीन, अथवा पाच ऋषींशी संबंध असतो आणि ते ऋषी त्या गोत्राचे प्रवर बनतात. काहींनी प्रवराची अशी व्याख्या केली आहे की 'एका

[प्रवरः गोत्रप्रवर्तकस्य मुनेर्व्यावर्तको मुनिगण इत्यर्थः ।
परा. माघ. १ भाग २ पा. ७०]

गोत्राच्या प्रवर्तकाचे **दुसऱ्या** गोत्राच्या प्रवर्तकापासून भिन्नत्व ज्या ऋषींच्या समूहावरून कळून येते तो ऋषिसमूह हा त्या गोत्राचा प्रवर होय' (परा. माघ. १ भाग २ पा. ७०).

जरी प्रवर हा शब्द ऋग्वेदात आलेला नाही तरी आर्षेय हा शब्द त्यात आला आहे आणि प्रवराची प्रथा जवळजवळ ऋग्वेदाइतकीच प्राचीन आहे.

प्रवरात असणाऱ्या ऋषींचा निर्देश करण्याच्या दोन पद्धती आहेत. एका प्रकारात सर्वात प्राचीन पूर्वजाच्या नावाचा तद्धित रूपात पहिल्याने निर्देश करून त्यापुढे त्याच्या पुत्राचा निर्देश करतात आणि अशा क्रमाने यज्ञकर्त्याच्या सर्वात जवळच्या नात्याच्या ऋषीचा सर्वात शेवटी निर्देश करतात. दुसऱ्या प्रकारात प्रत्येक प्रवर-ऋषीच्या नावापुढे 'वत्' असा प्रत्यय लावून सर्वात प्राचीन पूर्वजाचा निर्देश शेवटी करतात. उदाहरणार्थ, 'भृगु-वत्स' गोत्राच्या प्रवरांचा उच्चार पहिल्या प्रकाराने 'भार्गव-च्यवन-आप्तवान-और्व-जामदग्न्येति' असा करतात आणि दुसऱ्या प्रकाराने जमदग्निवत्-ऊर्ववत्-आप्तवानवत्-च्यवनवत्-भृगुवत्' असा करतात. यज्ञातील नरनिराळ्या कार्यांच्या वेळी ह्या वेगवेगळ्या प्रकारांचा उपयोग करण्यात येतो. ज्या व्यक्तीला (प्रख्यात) पूर्वजांची परंपरा नसते त्याने अर्पण केलेल्या आहुती देव स्वीकारीत नाहीत म्हणून यज्ञकर्त्याच्या प्रवरऋषींचा उच्चार करतात असे कौषितकी ब्राह्मणात (३.२) म्हटले आहे.

जेव्हा सगोत्र अथवा सप्रवर मुलीबरोबर विवाह करण्याचा निषेध केलेला असतो तेव्हा त्यापैकी प्रत्येक (म्हणजे गोत्र आणि प्रवर) विवाहाच्या कामात अडथळा आणित असतो. त्यामुळे एकादी मुलगी सप्रवर नसली तरी सगोत्र असू शकते आणि म्हणून विवाहाला अयोग्य ठरते अथवा सगोत्र नसली तरी सप्रवर असल्यामुळे विवाहाला अयोग्य ठरते. दोन गोत्रांच्या प्रवरात कोणता तरी एक ऋषी समान असल्यामुळे सप्रवरत्व येते अथवा दोन किंवा तीन किंवा त्याहून अधिक ऋषी समान असल्यामुळे सप्रवरत्व येते. सर्वसाधारण नियम असा आहे की जेव्हा दोन गोत्रांच्या प्रवरात एक ऋषी देखील समान असेल तर ती दोन गोत्रे **सप्रवर** होतात. ह्या नियमाला भृगुगण आणि अंगिरागण हे अपवाद आहेत. त्या दोन गणांतील गोत्रांच्या प्रवरात (पाच प्रवरऋषी असल्यास) कमीतकमी तीन आणि (तीन प्रवरऋषी असतील तेव्हा) कमीत कमी दोन ऋषी समान असले तर सप्रवरपणा येतो आणि तसे नसल्यास विवाहाला प्रतिबंध नसतो.

बहुसंख्य गोत्रांचे प्रवरऋषी तीन असतात. तथापि काही थोड्या गोत्रांच्या प्रवरांचा ऋषी एक, अथवा दोन अथवा पाच असतात. चार ऋषींचा प्रवर चालत नाही अथवा पाचाहून अधिक ऋषींचा प्रवरही

चालत नाही. विवाहाच्या बाबतीत दत्तक दिलेला पुत्र जनक पित्याच्या गोत्रात सहभागी असतो. म्हणजे त्याच्या जनक पित्याच्या गोत्राशी सगोत्र अथवा सप्रवर असलेल्या मुलीशी त्याला विवाह करता येत नाही.

मेधातिथीने (मनु ३·५) म्हटले आहे की गोत्र आणि प्रवरांचा भेद हा मुख्यत्वेकरून ब्राह्मणात असतो, क्षत्रिय आणि वैश्यांना तो लागत नाही. आश्वलायनाने

[पुरोहितप्रवरो राज्ञाम् । अथ यदि सार्ष्टप्रवृणीरन् मानवैल पौरूरवसेति ।
आश्वलायन श्रौत.]

असा एक पर्याय सांगितला होता की धार्मिक कृत्ये करताना राजांनी (क्षत्रियांनी) आपल्या पुरोहितांच्या प्रवरांचा उपयोग करावा अथवा सर्व क्षत्रियांनी 'मानवऐल-पौरुरवस' ह्या प्रवराचा उपयोग करावा. तथापि प्राचीन वाङ्मय आणि शिलालेख यांच्यावरून राजांना त्यांची स्वतःची विशिष्ट गोत्रे असत

[विराटाकडे गेल्यावर युद्धिष्ठिराने आपले गोत्र वैयाघ्रपाद असल्याचे सांगितले होते (विराट ७.८।१२). कांची येथील पल्लव राजाचे गोत्र भारद्वाज होते (एपि. इं.खं. १ पा. ५)]

असे दिसून येते.

(विराट ७·८।१२; एपि. इं.खं. १ पा. ५ इ.). आपस्तंबाने (२४·१०·१६) वैश्यांचा 'वात्सप्र' असा एकच प्रवर असल्याचे सांगितले आहे. बौधायनाने (प्रवराध्याय ५३) त्यांचे तीन प्रवर असल्याचे सांगितले आहे. संस्कारप्रकाशात (पा.६५९) भालंदन हे वैश्यांचे गोत्र असल्याचे म्हटले आहे. शिवाय त्यांना पुराहितांचे प्रवरही वपारता येत असत.

एकाद्या व्यक्तीला त्याचे गोत्र आणि प्रवर माहित नसले तर त्याने वेद शिकविणाऱ्या आचार्याचे गोत्र आणि प्रवर स्वीकारावे (आप. श्रौ. २४·१०·१७). असे त्याने केले असले तरी त्याला त्या आचार्याच्या मुलीशी विवाह करता येत नाही. परंतु आचार्यांच्या गोत्राच्या इतर मुलींबरोबर विवाह करण्यास प्रत्यवाय नसे. काही निवंधग्रंथांत उद्धत केलेल्या एका श्लोकात सांगितले आहे की जेव्हा एकाद्याला आपले स्वतःचे गोत्र माहित नसते तेव्हा त्याने आपण काश्यप गोत्राचे असल्याचे सांगावे (सं.कौ., सं.प्रकाश पा. ६५०).

विवाहाच्या बाबतीत गोत्र आणि प्रवर ह्यांच्यासंबंधी एवढी माहिती पुरेशी आहे. सगोत्र अथवा सप्रवर व्यक्तींमध्ये झालेला विवाह हा विवाहच होत नाही आणि अशा विवाहातील स्त्री त्या पुरुषाची पत्नी होत नाही असे धर्मग्रंथांत सांगितले आहे. अशा निरर्थक संबंधाचे परिणाम काय होतात ह्याचेही विवेचन धर्मग्रंथांत केलेले असते. अशा स्त्रीचा त्याग न करिता तिला आईसारखी अथवा बहिणीसारखी मानून तिचे पालन पोषण करावे; अशा स्त्रीच्या पोटी अपत्य जन्माला आले तर त्याला कोणताही दोष लागत नाही आणि त्याने काश्यप गोत्राचा स्वीकार करावा असे बौधायनाने (प्रव. ५४) सांगितले आहे. पुरुषाने मात्र प्रायश्चित्त घ्यावे. त्या स्त्रीशी विवाह जाणून बुझून केला असल्यास अधिक कडक नियम सांगितले आहेत. अशा मुलीचा दुसऱ्या एकाद्या पुरुषाबरोबर विवाह करावा असे एका वचनात म्हटले होते परंतु ते वचन कलियुगात लागू पडत नाही असेही एका ग्रंथात

[विकर्मस्थः सगोत्रो वा दासो दीर्घमयोऽपि वा ।
ऊढापि देया सान्यस्मै सप्रावरणभूषणा ॥
इति कात्यायनीयं सगोत्रोढायाः पुनर्विवाहस्मरणं तद्युगान्तरविषयम् ।
संस्कारप्रकाश पा. ६८१.]

म्हटले आहे (संस्कारप्रकाश पा ६८१). अशा प्रकारे त्या बिचाऱ्या मुलीला तिचा काही अपराध नसताना, सर्व आयुष्य धड कुमारी नाही अथवा त्या पुरुषाची विधवाही नाही अशा स्थितीत सक्तीने ब्रह्मचर्यात् काढावे लागत असे.

अनुक्रमणिका

हजारो वर्षांपूर्वीच्या काळी काय परिस्थिती असेल ती असो, ज्यावेळी दळणवळणाची साधने नव्हती आणि समाजही लहान लहान असत, अशा वेळी सगोत्र विवाहाला घातलेली बंदी काहीतरी सयुक्तिक असे, परंतु आता त्या बंदीत कांहीच अर्थ राहिला नाही. वादाकरिता असेही जरी मान्य केले की गोत्रऋषी हा त्या गोत्रातील सर्वांचा समान मूळपुरुष असतो, तरीही त्याच्या आणि विवक्षित वर अथवा वधू यांच्या दरम्यान किती पिढ्या होऊन गेल्या असाव्या हे कळत नाही आणि मूळपुरुषाच्या शरीराचे अंश जरी कदाचित त्या वधुवरांच्या शरीरांत असले तरी ते अत्यंत सूक्ष्म प्रमाणांत असले पाहिजेत. बहुतेक सर्व लोकांनी प्राचीन काळचे श्रौत आणि गृह्याग्नीसंबंधाचे विधी सोडून दिले आहेत आणि पूर्वीच्या आचार विचारांत शेकडो नव्या नव्या गोष्टी शिरल्या असून त्याच्या विरुद्ध कोणी ब्रही काढीत नाही. अशा परिस्थितीत प्राचीन काळच्या आचारांपैकी एकाद्या अवशेषाला चिकटून राहण्यात फारसा सयुक्तिकपणा नाही. काही जवळच्या सपिंड नातलगांबरोबरच्या विवाहाला सांगितलेला निषेध सर्वांनाच इष्ट वाटतो आणि म्हणून तो मानावा.

विवाहासंबंधी आणखी काही निर्बंध असतात. कोणीही आपली मुलगी दुसऱ्याच्या मुलाला देऊन तिच्या मोबदल्यात त्या मनुष्याची मुलगी आपल्या मुलाला करून घेऊ नये; आपल्या दोन मुली (एकाच वेळी) एकाच मनुष्याला देऊ नये किंवा दोन मुली दोघा सख्ख्या भावाना देऊ

[प्रत्युद्वाहो नैव कार्यो नैकस्मै दुहितृद्वयम् ।
न चैक जातयोः पुंसोः प्रयच्छेदुहितृद्वयम् ॥
स्मृतिमुक्ताफल (वर्णाश्रमधर्म) पा. १४८.]

नये असे सांगितले आहे (स्मृतिमुक्ता. वर्णाश्रम पा. १४८). परंतु ही वचने आता फक्त शिफारशीच्याच स्वरूपाचीच मानली जातील.

मुलीचा विवाह कोणाला ठरविता येतो म्हणजे तिच्या पालकत्वाचा अधिकार कोणाला प्राप्त होतो याबद्दलचे नियम निरनिराळ्या धर्मग्रंथांत दिले आहेत (विष्णू ध. सू. २४·३८।३९; याज्ञ. १·६३।६४; नारद-स्त्रीपुंस २०।२२ इ०). सामान्यतः पालकत्वाच्या क्रमात पिता हा पहिला असतो. त्यानंतर थोड्याशा क्रमभेदाने पितामह, बंधु, मातामह, मामा, कुटुंबातील व्यक्ती वगैरे नातलग येतात आणि शेवटी माता असते. वरीलपैकी कोणीही नसल्यास मुलीने स्वयंवर करावे (आपणच आपला पती पसंत करावा) असे सांगितले आहे. स्वयंवराची प्रथा सुप्रसिद्ध आहे परंतु ती मुख्यत्वे करून राजघराण्यात प्रचलित असे. एकाद्या पुरुषाचा विवाह कोणी ठरवावा याबद्दल स्मृतींत काहीही नियम सांगितले नाहीत, कारण प्राचीन काळी अल्पवयी मुलांचा विवाह करण्याचा प्रश्नच उद्भवत नसे.

मुलीचे लग्न करण्याच्या अधिकाराच्या बाबतीत तिच्या मातेला फार गौण स्थान देण्याचे कारण बहुधा असे असावे की स्त्रियांना समाजात स्वातंत्र्य असत नसे आणि कन्यादानाचा विधी मातेला स्वतः करता येत नसे, तो कोणातरी पुरुष नातलगाच्या हातून करून घ्यावा लागे. अलिकडील काळात न्यायालयांनी असे ठरविले आहे की मुलीचा पितामह जिवंत असला तरीही तिच्या मातेला वरयोजना करण्याचा अधिकार असतो, मात्र प्रत्यक्ष कन्यादान कोणीतरी पुरुषाने केले पाहिजे. धर्मसिंधु (३. पूर्वार्ध पा. २५१) ह्या ग्रंथाने असा नियम सांगितला आहे की जेव्हा एकादी मुलगी स्वयंवर करते अथवा तिची माता तिचे कन्यादान करते त्यावेळी विवाहातील मुख्य संकल्प त्या मुलीने अथवा तिच्या मातेने स्वतः उच्चारावा आणि बाकीचा सर्व विधी एकाद्या ब्राह्मणाच्या द्वारा करावा. एकाद्या मुलीचा विवाह एकाद्या अनधिकारी व्यक्तीने ठरविला असला तर असा नियम सांगितला आहे की सप्तपदी होऊन विवाह पूर्णपणे झाला असला तर कन्यादान करणाराला तसे करण्याचा अधिकार नव्हता ह्या कारणास्तव तो विवाह रद्द मानता येत नाही. परंतु विवाह होण्यापूर्वी

अनुक्रमणिका

अधिक अधिकार असलेल्या व्यक्ती अस्तित्वात असून देखील जर एकादा दुसरा कोणी मनुष्य मुलीचे कन्यादान करू इच्छित असला तर त्याला तसे करण्यास प्रतिबंध करता येतो. (उद्वाहतत्त्व पा. १२७; निर्णयसिंधु. ३ पूर्वार्ध ३०७).

विवाहात मुलीचा विक्रय करण्यात येतो काय ह्या विषयावर धर्मग्रंथात जे उल्लेख आले आहेत त्यांवरून असे अनुमान काढता येते की इतर पुष्कळ देशांतल्या प्रमाणे प्राचीन काळी ह्या देशातही कधी कधी लग्नाकरिता मुली विकत घेत असत. परंतु हळूहळू लोकमत सर्वस्वी बदलले आणि बापाने अथवा भावाने मुलीचा विक्रय करणे ही गोष्ट निंद्य मानण्यात येऊ लागली इतकेच नव्हे तर त्यांनी मुलीच्या मोबदला काही नजराणा घेणे ही गोष्टही कमीपणाची समजू लागले (बौ. ध. सू. १·११·२०।२२). वराने मुलीच्या नातलगांना दिलेल्या देणग्या त्यांनी आपल्या स्वतःकरता राखून न ठेवता त्या मुलीला दिल्या तर त्यामुळे त्या मुलीचा विक्रय केला असे होत नाही असे मनूने (३·५१,३· ५४।५५) म्हटले आहे. काही काही जातींत आणि शूद्रांमध्ये सध्यादेखील जेव्हा मुलीचा विवाह होतो तेव्हा द्रव्य अथवा द्रव्याच्याऐवजी त्या किंमतीचा काही माल पुष्कळदा घेतला जातो. परंतु सामान्यतः असे द्रव्य त्या मुलीची काही तरी तरतूद करण्याकरिता आणि मुलीच्या बापाला होणारा खर्च भागविण्यासाठी घेतलेले असते.

बापाने मुलीच्या विवाहानिमित्त द्रव्य घेणे ह्या गोष्टीचा फार प्राचीन काळापासून बापाची त्याच्या अपत्यावर किती सत्ता असते ह्या गोष्टीशी संबंध असतो. मातापित्यांना त्यांच्या अपत्यांचे दान करण्याची, विकण्याची अथवा त्याग करण्याची सत्ता असते असे वसिष्ठाने (ध. सू. १५·१।३) म्हटले आहे. परंतु क्रमाक्रमाने आपल्या अपत्यावरील पित्याच्या अधिकाराला आळा घातला गेला. याज्ञ. (२·१७५; नारद—दत्ताप्र. ४) प्रभृति ग्रंथकारांनी आपला स्वतःचा पुत्र दुसऱ्या कोणाला दान देण्यास अथवा त्याचा विक्रय करण्यास निषेध सांगितला आहे.

काही पाश्चात्य ग्रंथकारांनी म्हटले आहे की वेदाच्या काळी लहान अर्भकांची हत्या करण्याची आणि त्याना उघड्यावर फेकून देण्याची प्रथा होती. ह्या विधानाला ज्या वेदवचनांचा (ऋ. २·२९·१) आधार दिला आहे त्या वचनात एकाद्या अविवाहित स्त्रीला गुप्त रीतीने राहिलेल्या गर्भाचा त्याग करण्याचा उल्लेख आहे; विवाहसंबंधापासून उत्पन्न झालेल्या अर्भकाच्या हत्येचा निर्देश केलेला नाही. प्राचीन वाङ्मयात स्त्रियांविषयी कोठेही उपेक्षेची अथवा तिरस्काराची भावना व्यक्त केलेली नाही. मनूने स्त्रियांसंबंधी काही कडक विचार प्रकट केले असले तरी त्यालाही स्त्रियांना द्यावयाच्या सन्मानाची जाणीव होती आणि त्याने असे स्त्रीदाक्षिण्याचे उद्‌गार काढले आहेत की ज्या ठिकाणी स्त्रियांचा सन्मान केला जातो तेथे देव वास्तव्य करतो आणि ज्या ठिकाणी स्त्रियांचा सन्मान केला जात नाही तेथे सर्व धर्मकृत्ये संपुष्टात येतात (मनु. ३·५६).

आता विवाहाला शुभ काल कोणता ह्याविषयी थोडेसे विवेचन करू. ऋग्वेदात (१०·८५·१३) आलेल्या उल्लेखावरून असे दिसते की जेव्हा चंद्र मघा नक्षत्रात असेल त्या दिवशी विवाह करावा. ह्याशिवाय रोहिणी, मृगशीर्ष, उत्तरा फल्गुनी, स्वाती ही नक्षत्रे विवाहाला शुभ असल्याचे बौधायनाने (१·१·१८।१९) सांगितले आहे. आणखीही काही नक्षत्रे विवाहाला शुभ असल्याचे दुसऱ्या ग्रंथांनी (मानव गृ. १·७·५; काठक गृ. १४·९।१० इ०) सांगितले आहे. कोणी उत्तरायण शुभ असल्याचे सांगितले आहे तर कोणी कोणत्याही काली विवाह करावा असे म्हटले आहे. महिन्यांपैकी माघ, फाल्गुन आणि आषाढ हे वर्ज्य असल्याचे आपस्तंबाने (२·१२।१३) सांगितले आहे तर कार्तिक पौर्णिमेपासून वैशाख पौर्णिमेपर्यंतच्या काळात विवाहविधी करावा अथवा चैत्र संपूर्ण अथवा त्याचा एक पक्ष वगळून इतर कोणत्याही महिन्यात मनाला

वाटेल तेव्हा विवाहविधी करावा असे कौशिकसूत्रात (७५·२।४) सांगितले आहे. जेव्हा एकादी मुलगी फार मोठी झालेली असेल तेव्हा शुभ महिन्याकरिता न थांबता ज्यावेळी चंद्र आणि लग्न अनुकूल असतील त्या वेळेवर विवाह करावा; शुभ अयन, महिना, तिथी इत्यादिकांचा विचार दहा वर्षांच्या आंतील मुलींच्या बाबतीत फक्त करावा असे काहींनी सांगितले आहे (भुजबलभीम, राजमार्तंड, उद्वाहतत्त्व पा. १२४). ह्या शिवाय अलिकडील काळात झालेल्या ग्रंथांत ज्योतिषशास्त्राच्या आधारावर काही तपशीलाचे नियम सांगितलेले असतात. उदाहरणार्थ, ज्येष्ठ पुत्राचा विवाह दुसऱ्या कोणाच्या ज्येष्ठ कन्येबरोबर ज्येष्ठ महिन्यात (अथवा ज्येष्ठा नक्षत्रावर) करू नये; बुधवार, सोमवार, शुक्रवार, आणि गुरुवार हे विवाहाला उत्तम वार असतात; मुलीचा चंद्र उच्च स्थानी असला पाहिजे; जन्मराशीपासून ४ था, ८ वा अथवा १२ वा गुरू विवाहाला वर्ज्य करावा; गुरू सिंह राशीत असताना उपनयन आणि विवाह करता येत नाही, परंतु हा नियम फक्त गंगा आणि गोदावरी ह्यांच्या दरम्यानच्या प्रदेशालाच लागतो इत्यादी.

मलाच्या आणि मुलीच्या जन्मकाळी असणाऱ्या नक्षत्रावरून आणि लग्नावरून (म्हणजे जन्मकाळी आकाशातील सूर्याच्या स्थानावरून) ज्योतिषशास्त्राप्रमाणे गणना करून आठ प्रकारची फले काढतात. त्यांना वर्ण, वश्य, नक्षत्र, योनि, ग्रह (बारा राशींचे अधिपती), गण, राशी आणि नाडी अशा संज्ञा असतात आणि त्यांच्यापैकी प्रत्येकाला त्या संबंधाच्या अटी पुऱ्या झाल्यास १ ते ८ पर्यंत गुण असतात. ह्यांपैकी **गण** आणि **नाडी** ह्यांना हल्लीच्या काळीही ब्राह्मणांत आणि इतर जातींत देखील अधिक महत्त्व दिले जाते. सत्तावीस नक्षत्रांचे प्रत्येकात नऊ नक्षत्रे असलेले तीन विभाग करतात आणि त्यांपैकी एका विभागाचा देवगण, दुसऱ्याचा मनुष्यगण, आणि तिसऱ्या विभागाचा राक्षसगण मानला जातो. वर आणि वधु ह्या दोघांचा समान गण असेल तर सर्वोत्तम. तसे नसेल तेव्हा वराचा देवगण आणि वधूचा मनुष्यगण अथवा वराचा देवगण अथवा राक्षसगण असून वधूचा मनुष्यगण असेल तर ती मध्यम स्थिती समजतात. परंतु वधूचा राक्षसगण आणि वराचा मनुष्यगण असेल तर अशा विवाहापासून मृत्यू घडून येईल, आणि वधुवरांचे गण अनुक्रमे देव आणि राक्षस असतील तर दोघांत वैर उत्पन्न होईल.

नाडीच्या बाबतीत देखील नऊ नऊ नक्षत्रांचे (परंतु निराळ्या क्रमाने) तीन विभाग करतात आणि त्यांना आद्य नाडी, मध्यनाडी आणि अंत्य नाडी सांगितलेली असते. वधुवरांची नक्षत्रे एकाच नाडी-विभागातील असल्यास त्यांचा विवाह होत नाही.

विवाह ठरल्यानंतर परंतु प्रत्यक्ष होण्यापूर्वी दोघांच्याही कुटुंबांतील कोणी नातलग मरण पावला तर तो विवाह रद्द करावा असे कांहीं ग्रंथकारांचे मत आहे. परंतु ह्या बाबतीत काही समंजसपणाचे अपवाद सांगितले असून काही विवक्षि नात्याच्या व्यक्तिखेरीज इतर कोणाला मृत्यू आल्यास त्यामुळे विवाहात अडथळा येत नाही.

विवाहविधीला प्रारंभ होण्यापूर्वी (म्हणजे नांदीश्राद्ध करण्यापूर्वी) जर वधूची अथवा वराची माता मासिक रजोमती झाली तर ती शुद्ध होईपर्यंत (म्हणजे रजोदर्शनापासून पाचव्या दिवसापर्यंत) तो विवाह तहकूब करावा असे सांगितले आहे.

आता विवाहाच्या प्रकारांचे आणि विवाहविधीतील कृत्यांचे थोडक्यात विवेचन करू.

अनुक्रमणिका

### विवाहाचे प्रकार

गृह्यसूत्रे, धर्मसूत्रे आणि स्मृति ह्यांच्या कालापासून विवाहाचे आठ प्रकार असल्याचे सांगितले आहे. ह्या प्रकारांची नावे ब्राह्म, प्राजापत्य, आर्ष, दैव, गांधर्व, आसुर, राक्षस आणि पैशाच अशी आहेत. कांही ग्रंथात ह्यांच्यापैकी पहिल्या चारांची नावे निराळ्या क्रमाने दिली आहेत; काही ग्रंथात सहा प्रकारची नावे दिली आहेत (आप. ध. सू. २·५·११·१७।२०; वसिष्ठ ध. सू. १·२८।२९) आणि काही ग्रंथात (मानवगृह्य) फक्त दोनच प्रकार सांगितले आहेत. ह्या सर्व प्रकारात ब्राह्म हा सर्वात चांगला मानला असून पैशाच हा सर्वात कमी दर्जाचा आणि अत्यंत पापयुक्त असतो. ह्या निरनिराळ्या प्रकारच्या विवाहांच्या निरनिराळ्या ग्रंथकारांनी दिलेल्या व्याख्या सर्वसाधारणरीत्या सारख्या आहेत. मनुस्मृतीत (३·२७—३४) दिलेल्या व्याख्या थोडक्यात पुढीलप्रमाणे आहेत. ज्या विवाहात मुलीला वस्त्रालंकारांनी विभूषित करून तिचे दान तिच्या पित्याने स्वतः होऊन आमंत्रण केलेल्या एकाद्या विद्यासंपन्न आणि सदाचरणी पुरुषाला दिले जाते त्याला **ब्राह्मविवाह** म्हणतात. ह्या ठिकाणी 'दान' ह्या शब्दाचा अर्थ 'एकाद्या कुमारिकेचे पालन करण्याचा आणि तिचे नियंत्रण करण्याचा तिच्या पित्याचा अधिकार तिच्या पतीकडे सोपविणे' हा असतो. ज्या विवाहात एकादा यज्ञ चालत असताना त्या यज्ञात ऋत्विजाचे काम करणाऱ्या पुरोहिताला एकाद्या मुलीचा पिता वस्त्रालंकारांनी सुशोभित करून तिचे दान देतो त्या विवाहाला **दैवविवाह** म्हणतात. ज्या विवाहात शास्त्राज्ञेचे पालन करण्याकरिता गुरांची एक जोडी किंवा दोन जोड्या मुलाकडून घेऊन मुलीचे दान दिले जाते तो **आर्षविवाह** होय. ज्या विवाहात कन्येचा पिता वराचा सत्कार करून आणि तुम्ही दोघे मिळून धार्मिक कृत्ये करीत जा असे वरवधूंना सांगून कन्येचे दान देतो त्याला **प्राजापत्य विवाह** अथवा '**काय विवाह**' (प्रजापतीला 'क' अशी संज्ञा आहे म्हणून) असे म्हणतात. ज्या विवाहात वराने त्याला शक्य असेल तितके धन वधूच्या नातलगांना आणि त्या वधूला दिल्यानंतर तिचा पिता आपल्या इच्छेप्रमाणे तिचा विवाह करून देतो त्याला आसुरविवाह म्हणतात. वधु आणि वर ह्यांचे त्यांच्याच संमतीने विषयसुखाकरिता जेव्हा मीलन होते त्यावेळी त्याला **गांधर्वविवाह** म्हणतात. एकादी मुलगी रडत आणि आक्रोश करीत असताना, तिच्या नातलगांचा पराभव करून त्या मुलीला बलात्काराने पळवून नेली जाते त्या प्रकाराला **राक्षसविवाह** म्हणतात. जेव्हा एकादा पुरुष निजलेल्या अथवा गुंगीत असलेल्या अथवा बेशुद्ध असलेल्या मुलीशी चोरून संभोग करतो त्या प्रकाराला **पैशाच विवाह** म्हणतात. राक्षस आणि पैशाच असे विवाहाचे प्रकार प्राचीन ऋषींनी सांगितले असले तरी ते प्रकार ऋषींना संमत होते असे मानू नये. हे दोन प्रकार विवाहाच्या प्रकारांत समाविष्ट करण्यातील त्यांचा हेतु स्त्रिया प्राप्त करून घेण्याचे ते मार्ग आहेत एवढेच सांगण्याचा होता. ऋषींनी पैशाच विवाहाचा अत्यंत तीव्र निषेध केला आहे. काही ग्रंथांनी राक्षस आणि पैशाच ह्यांचा निर्देश केला नाही ह्यावरून त्यांच्या काळी त्या प्रकारांना विवाह असे लोक मानित नसावे असे दिसते. बलात्काराने पकडून नेलेल्या मुलीला सशास्त्र पत्नीत्व प्राप्त होत नाही असे वसिष्ठाने

[बलाच्चेत्प्रहृताकन्या मन्त्रैर्यदि न संस्कृता।
अन्यस्मै विधिवद्देया यथा कन्या तथैव सा ॥ वसिष्ठ १७·७३]

(१७.७३) सांगितले आहे. आणि जर अशा मुलीचा विधिपूर्वक विवाह झाला नसला तर तिला कुमारिका मानून तिचा दुसऱ्या एकाद्या पुरुषाबरोबर शास्त्रोक्त विधीने विवाह करता येईल असे म्हटले आहे.

ह्या आठ प्रकारांपैकी ब्राह्मप्रभृति पहिले चार (अथवा सहा) ब्राह्मणांना योग्य असतात, शेवटले चार क्षत्रियांना आणि गांधर्व, आसुर आणि पैशाच हे वैश्यांना आणि शूद्रांना योग्य मानावे असे बौधायनाने (१·११·१०) सांगितले आहे. ह्याविषयीही मतवैचित्र्य आहे. धर्मशास्त्रात स्वयंवर असा ज्याचा उल्लेख केलेला असतो तो प्रकार म्हणजे गांधर्व विवाहच असे म्हणण्यास हरकत नाही. तथापि स्वयंवराचे अनेक प्रकार असतात. सर्वात साधे स्वयंवर म्हणजे जेव्हा योग्य काळ होऊन जाईपर्यंत पित्याने जिच्या योग्य वराची

अनुक्रमणिका

निवड केलेली नसल्यामुळे ती मुलगी आपण स्वतःच पतीची निवड करते ते होय. हे साध्या प्रकारचे स्वयंवर सर्व जातींच्या मुलींना करता येई. जेव्हा काही विशिष्ट कौशल्य दाखवील अशा पुरुषाला देण्याची अट असते तेव्हा त्या मुलीच्या इच्छेवर तिचा विवाह अवलंबून नसतो.

ज्या प्रकारच्या विधीने एकाद्या दांपत्याचा विवाह झालेला असतो त्या विधीला अनुरूप त्या दांपत्याची संतती चांगल्या अथवा वाईट प्रकारची निपजते. तसेच अशा संततीमुळे त्याच्या पितृवंशातील आणि मातृवंशातील काही विशिष्ट कमी अथवा अधिक पिढ्यांपर्यंतचे पुरुष पावन होतात असेही निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहे. विश्वरूपाने म्हटले आहे की ह्या विधानांचा खरा उद्देश विवाहाच्या उदात्त हेतूंचे, नीतिमत्तेचे आणि शिष्टसंमत आणि शांततेच्या आयुष्यक्रमाचे महत्त्व वंशाच्या आणि समाजाच्या भविष्यकाळच्या हिताच्या दृष्टीने किती असते ही गोष्ट लोकांच्या मनात बिंबविण्याचा आहे.

आधुनिक काळात ब्राह्म आणि आसूर हे दोन प्रकार अस्तित्वात आहेत. गांधर्वविधीचा विवाह आता लुप्त झाल्यासारखा आहे. जर एकाद्या विधवेने पुनर्विवाह केला तर त्या विवाहाला सामान्यतः गांधर्व विवाह समजता येईल कारण (वधू विधवा असल्याने) त्या विवाहात कन्यादान होत नाही आणि बहुधा ती विधवाच अशा तऱ्हेचा विवाह जुळवीत असते.

### विवाहविधी

विवाहातील धार्मिक विधींच्या बाबतीत अतिशय प्राचीन काळापासून फारच भिन्न भिन्न प्रघात चालत आले आहेत. निरनिराळ्या देशांत आणि गावांत भिन्न भिन्न रूढी असतात. त्यांतील काही विशिष्ट विधी सर्वसाधारण असून वैदिक मंत्रांनी केले जातात, दुसरे काही विधी वेदमंत्ररहित केले जातात. आश्वलायन गृह्यसूत्रात (१·७·३ ते १·८) दिलेले विवाहविधीचे वर्णन बहुधा सर्वात त्रोटक आहे आणि बहुधा ते गृह्यसूत्र अतिप्राचीन गृह्यसूत्रांपैकी एक असावे असे वाटते. म्हणून त्या सूत्रात सांगितलेल्या महत्त्वाच्या बाबींचे त्रोटक वर्णन देऊन सध्याच्या काळी विशेषेकरून उच्च वर्णीयांत विवाहविधी कसे केले जातात हेही सांगण्यात येईल. महत्त्वाच्या विधींच्या अनुक्रमाच्या बाबतीतही मतवैचित्र्य आहे. विवाहसंस्कारातील मुख्य मुख्य विधींचे स्वरूप ऋग्वेद कालापासून तो आधुनिक काळापर्यंत होऊन गेलेल्या कित्येक सहस्त्रवर्षेपर्यंत अबाधितपणे तसेच राहिले हे विशेष उल्लेखनीय आहे.

अग्नीच्या बाजूला एक अश्मा (सहाण) आणि दुसऱ्या बाजूला पाण्याचा कलश ठेवावा. वराने अग्नीत आहुती द्याव्या आणि त्यावेळी वधूने त्याच्या उजव्या हाताला स्पर्श करावा. वधु पूर्वाभिमुख बसलेली असून वर पश्चिमाभिमुख उभा असावा आणि त्याने वधूचा हात आपल्या हातात धरतेवेळी ज्या प्रकारच्या संततीची इच्छा असेल त्याप्रमाणे हाताची बोटे पकडावी. नंतर अग्नीला आणि पाण्याच्या कलशाला तीन प्रदक्षिणा घालाव्या. प्रदक्षिणा घालताना वधूने सहाणेवरून चालत जावे. नंतर वधूच्या ओंजळ केलेल्या हातांवर तूप घालून तिच्या बंधूने अथवा अन्य मनुष्याने त्या ओंजळीत दोन वेळा लाह्या ओताव्या. (वराचे गोत्र जमदग्नि असल्यास तीन वेळा लाह्या ओताव्या). नंतर वराने उरलेल्या हविर्द्रव्यावर आणि काढून घेतलेल्या भागावर तूप ओतावे आणि वधूची ओंजळ स्त्रुवापळी असे समजून त्या लाह्या अग्नीमध्ये अर्पण कराव्या. नंतर अग्निसभोवती प्रदक्षिणा न घालता चौथ्या वेळी वधूने काही न बोलता अग्नीला लाह्या अर्पण कराव्या. वधूच्या केसाचे दोन भाग करून ते दोन बाजूला लोकरीच्या दोन धाग्यांनी बांधून ठेवलेले असले तर पती तिचे केस बंधमुक्त करतो. नंतर पती वधूला ईशान्येकडे सात पावले टाकावयास सांगतो आणि

त्यावेळी विशिष्ट मंत्र म्हणतो. सात पावले टाकल्यानंतर पती तिला म्हणतो की तुझ्या सातव्या पावलाबरोबर तू माझी सखी (मैत्रीण) हो; माझ्यावर तुझी निष्ठा राहो; आपणा दोघांना पुष्कळ पुत्र होवोत आणि ते वृद्धावस्थेतपर्यंत जगोत. नंतर वर आणि वधु ह्यांची मस्तके एकमेकांजवळ आणून त्यांच्यावर आचार्य पाणी शिंपडतो. वधूने त्या रात्री एकाद्या सुवासिनी आणि पुत्रवती अशा वृद्ध ब्राह्मण स्त्रीच्या घरी राहावे. ध्रुवाचा तारा, अरुंधती आणि सप्तर्षींचे तारे पाहिल्यानंतर वधूने आपले मौन सोडावे आणि 'माझा पती जिवंत राहो आणि मला अपत्यांची प्राप्ती होवो' असे म्हणावे. नंतर त्या नूतन दांपत्याला परगावी असलेल्या आपल्या घरी जाण्याकरिता प्रवास करावयाची आवश्यकता असली तर पतीने वधूला रथात बसवावी. नावेतून जावयाचे असल्यास विशिष्ट मंत्र म्हणून पत्नीला नावेत चढण्यास सांगावे आणि दुसरा एक मंत्र म्हणून तिला नावेतून उतरण्यास सांगावे. विवाहातील अग्नी त्या दांपत्याने नेहमी आपल्यापुढे धरावा. घरी पोचल्यावर तिला घरात प्रवेश करावयास सांगावे. अग्नि प्रज्वलित केल्यावर त्याच्या पश्चिम बाजूला बैलाच्या कातड्यावर वधूने बसावे आणि पतीचा हात धरावा. चार आहुती अग्नीमध्ये अर्पण कराव्या. नंतर वराने दही भक्षण करावे, उरलेले पत्नीला द्यावे. हवन करून उरलेले तूप दोघांच्या छातीला चोळावे. त्या वेळेपासून तीन रात्री, अथवा बारा रात्री अथवा एक वर्ष पर्यंत दोघांनी क्षार आणि लवण भक्षण करू नये, ब्रह्मचर्याने राहावे. ब्राह्मणांना भोजन घालून त्यांना आशीर्वाद देण्यास सांगावे. वर दिलेल्या वर्णनात ज्या विधींचा समावेश केला आहे ते करते वेळी निरनिराळे मंत्र म्हणावयाचे असतात. ह्या विधींपैकी काही विधी प्राथमिक स्वरूपाचे असतात. पाणिग्रहण, होम, अग्नीला प्रदक्षिणा घालणे, सप्तपदी ह्यांच्यासारखे काही थोडे विधी विवाहसंस्काराचे मुख्य भाग असतात आणि ध्रुवदर्शन इत्यादी काही विधी मुख्य विधींच्या मागून करावयाचे असतात. मुख्य विधींचा निर्देश सर्व सूत्रांत केलेला असतो परंतु आधी करावयाच्या आणि मागून करावयाच्या विधींच्या तपशीलात पुष्कळ वैचित्र्य आढळते. मुख्य विधींच्या बाबतीत देखील त्यांचा क्रम निरनिराळ्या सूत्रांत निरनिराळा दिलेला असतो. पुष्कळशा कृत्यांचा आश्वलायन गृह्यात मुळीच निर्देश केलेला नाही. उदाहरणार्थ, मधुपर्क, कन्यादान ह्यांचा त्या गृह्यसूत्रात स्वतंत्र रीतीने निर्देश केलेला नाही.

निरनिराळ्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विवाहसंस्कारात ह्या क्रिया करावयास सांगितल्या आहेत त्यातील प्रमुख पुढे दिल्या आहेत :

**वधूवर—गुणपरीक्षा**— ह्या संबंधी वर्णन वर आले आहे.

**वरप्रेषण**— मुलगी मिळविण्यासंबंधी खटपट करण्याकरिता लोक धाडणे.

आधुनिक काळात ब्राह्मणात आणि दुसऱ्या पुष्कळ जातींत, मुलीच्या पित्याला वराचा शोध करावा लागतो, परंतु शूद्रात आणि दुसऱ्या पुष्कळ जातींत ही (वराने मुलीची मागणी करण्याकरिता लोक धाडण्याची) प्राचीन रूढी अजून चालत आहे.

**वाग्दान अथवा वाङ्निश्चय**— (विवाह निश्चित करणे).

**मंडप-करण**— मांडव तयार करणे. विवाह, चौल, इत्यादी विधी घराबाहेर एकाद्या मंडपात करावयाचे असतात.

**नांदीश्राद्ध** आणि **पुण्याहवाचन**— ह्यांचे वर्णन मागे आले आहे.

**वधूगृहागमन**—वराने वधूच्या गृही जाणे.

अनुक्रमणिका

**मधुपर्क**—वधूच्या घरी वराचे स्वागत. ह्याचे वर्णन पुढील प्रकरणात येईल. कोणाच्या मते विवाहापूर्वी आणि विवाहानंतर घरी परत आल्यावर असे दोन मधुपर्क असतात. परंतु सर्व देशांत मधुपर्क, विवाहाच्या पूर्वीच दिला जातो.

**स्नापन, परिधापन** आणि **संनहन**—वधूला स्नान घालणे, तिला नूतन वस्त्रे धारण करावयास सांगणे आणि तिच्या कमरेभोवती एकादी रज्जु बांधणे. एका ग्रंथात (गोभि. गृ. २·१·१०) वधूच्या मस्तकावर सुरा सिंचन करावी असे सांगितले आहे.

**समंजन**— वर आणि वधु ह्यांना उटी लावणे.

**परिसरबंध**— वधूच्या हातात मंतरलेली दोरी बांधणे.

**वधूवरनिष्क्रमण**— वधु आणि वर यांनी घरातून मंडपात येणे.

परस्परसमीक्षण— एकमेकांकडे अवलोकन करणे. आश्वलायनाने (गृह्यपरि. १·२३) सांगितले आहे की आधी वर आणि वधु ह्यांच्या दरम्यान एक वस्त्र धरावे आणि ते ज्योतिषशास्त्रानुसार योग्य मुहूर्तावर दूर करावे आणि वधुवरांनी परस्परांकडे अवलोकन करावे. ही रूढी अद्यापीही पाळण्यात येते. वस्त्र धरले असताना ब्राह्मण मंगळाष्टक संज्ञा असलेले श्लोक म्हणतात.

कन्यादान (वधूचे दान) — ह्या विधीत वराने वधूबरोबर धर्म, अर्थ आणि काम ह्यांच्या बाबतीत प्रतारणा करू नये असे वधूचा पिता म्हणतो आणि तशी प्रतारणा मी करणार नाही (नातिचरामि) असे वर उत्तर देतो. हा प्रकार हल्लीही करण्यात येतो.

**अग्निस्थापना** आणि **होम**— अग्नीची स्थापना करणे आणि तुपाच्या आहुती देणे. आहुती किती द्याव्या ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे.

**पाणिग्रहण**— (वधूचा हात वराने धरणे).

**लाजाहोम**— वधूने अग्नीमध्ये लाह्यांच्या आहुती देणे.

**अग्निपरिणयन**— वर पुढे आणि वधु मागे असे दोघांनी अग्नी आणि उदकपात्र ह्यांच्या सभोवती फिरणे.

**अश्मारोहण**— वधूला सहाणेवरून चालत जाण्यास लावणे.

लाजाहोम, अग्निपरिणयन आणि अश्मारोहण ही तीन कृत्ये एकामागून एक अशी तीन वेळा करतात.

**सप्तपदी**— सात पावले बरोबर चालणे. हे कृत्य अग्नीच्या उत्तरेच्या बाजूला करतात. तांदुळाच्या सात पुंज्या घालतात आणि वर वधूला प्रथम पश्चिमेकडील पुंजीवर उजवे पाऊल ठेवावयास सांगतो. त्यानंतर त्याच अनुक्रमाने सातही पुंज्यांवर तिच्या उजव्या पावलाने चालावयास लावतो.

**मूर्धाभिषेक**— काहींच्या मते वधुवरांच्या दोघांच्या आणि काहींच्या मते वधूच्या फक्त मस्तकावर जलाचे सिंचन करणे.

**सूर्योदीक्षण**— वधूला सूर्याकडे पहावयास लावणे.

**हृदयस्पर्श**— एक मंत्र म्हणून वराने वधूच्या हृदयाला स्पर्श करणे.

**प्रेक्षकानुमंत्रण**— नववधूच्या संबंधी प्रेक्षकांना उद्देशून भाषण करणे.

**दक्षिणादान**— आचार्याला दक्षिणा देणे. वर्णानुसार निरनिराळ्या दक्षिणा द्यावयास सांगितलेले असते. काही ग्रंथात फक्त एक गाय दक्षिणा द्यावी असे म्हटले आहे. (गोभि. गृ. २·३·३३).

**गृहप्रवेश**— वराच्या घरात प्रवेश करणे.

**गृहप्रवेशनीय होम**— प्रवेश केल्यावर करावयाचा होम.

**ध्रूवारुंधती-दर्शन**— विवाहाच्या दिवशी रात्री वधूला ध्रुवाचा तारा आणि अरुंधतीचा तारा दाखविणे. काही ग्रंथांत इतर नक्षत्रांचाही निर्देश केला आहे आणि काहींनी फक्त ध्रुवाचाच निर्देश केला आहे. (गोभि. गृ. २·३·८।१२). एका ग्रंथाने हे कृत्य गृहप्रवेशापूर्वी करावयास सांगितले आहे.

**आग्नेयस्थालीपाक**— शिजलेल्या अन्नाच्या आहुती अग्नीला समर्पण करणे.

**त्रिरात्रव्रत**— विवाहानंतर तीन रात्रीपर्यंत काही काही नियम पालन करणे. काही ग्रंथांत सांगितलेल्या नियमांत असा एक नियम आहे की नूतन दांपत्याने तीन रात्री भूमीवर एकाच शय्येवर निजावे परंतु दोघांच्या दरम्यान उंबराची एक काठी ठेवावी. त्या काठीला सुवासिक अत्तरे लावावी आणि तिच्या सभोवती एकादे वस्त्र किंवा दोरी गुंडाळावी. चवथ्या रात्री ती काठी उचलून उदकात टाकावी (आप. गृ. ८·८।१०; बौ. गृ. १·५·१६।१७).

**चतुर्थीकर्म**— विवाहानंतर चौथ्या रात्री करावयाचा विधी. ह्याचे वर्णन मागे आले आहे. मध्ययुगीन काळात झालेल्या निबंधग्रंथांत ज्या विशिष्ट विधींची वर्णने दिली आहेत आणि जे आधुनिक काळीही करण्यात येतात त्यांचे वर्णन पुढे आले आहे.

**सीमान्तपूजन**— वर आणि त्याच्या बरोबरची मंडळी वधूच्या गावी आल्यावर त्यांचा सत्कार करणे. आधुनिक काळी हा विधी वाङ्निश्चयाच्या पूर्वी करतात.

**गौरीहर पूजा**— शिव आणि त्याची पत्नी गौरी ह्यांचे पूजन. गौरी आणि हर ह्यांच्या सोन्याच्या अथवा चांदीच्या मूर्ती करतात अथवा त्यांची चित्रे भिंतीवर अथवा कपड्यावर अथवा दगडावर काढतात आणि त्यांची पूजा भावी वधु पुण्याहवाचनानंतर आणि कन्यादानापूर्वी करते.

**इंद्राणी-पूजा**—इंद्राची पत्नी इंद्राणी हिचे पूजन. कालिदासाने रघुवंशामध्ये ह्याचा उल्लेख केला आहे त्यावरून हा प्रघात प्राचीन काळापासून चालत आलेला असावा.

**तैलहरिद्रारोपण**—वधूच्या अंगाला लावून उरलेली हळदीची पूड वराच्या अंगाला लावणे.

**आर्द्राक्षतारोपण**— वधूवरांनी परस्परांच्या अंगावर ओल्या अक्षता फेकणे. चांदीसारख्या एखाद्या धातूच्या भांड्यात थोडेसे दूध आणि तूप घालून त्या भांड्यात ओल्या अक्षता ओततात. वर वधूच्या ओंजळ केलेल्या हातांना दूध आणि तूप दोन वेळा चोपडतो आणि जी ओंजळ भरेपर्यंत तीन वेळा अक्षता घालतो आणि तिच्या जोडलेल्या हातावर दोन वेळा तूप शिंपडतो. दुसरा कोणी अशाच रीतीने वराच्या ओंजळीत अक्षता भरतो आणि वधूचा पिता दोघांच्या ओंजळीत एक सोन्याचा तुकडा ठेवतो. नंतर वर आपली ओंजळ वधूच्या ओंजळीवर ठेवतो आणि वधूचा पिता एक मंत्र म्हणून वधूला वर उचलतो. नंतर ती आपल्या ओंजळीतील तांदूळ वराच्या मस्तकावर ओतते आणि वरही तिच्यासारखेच करतो. ही कृती प्रत्येकजण तीन वेळा करतो आणि शेवटी वधू आणखी एका वेळ करते. नंतर पुरोहित वधु-वरांच्या मस्तकावर उंबराची डहाळी आणि दूर्वांकुर ह्यांनी पाणी शिंपडतो. नंतर वधूवर परस्परांच्या कपाळावर तिलक लावतात, परस्परांना माळा घालतात आणि परस्परांच्या हातात एक एक हळकुंड दोरीने बांधतात. (ह्या कृत्याला कोणी 'कंकण बंधन' म्हणतात आणि कोणी 'कौतुक बंधन' म्हणतात).

**मंगलसूत्र-बंधन**— सोन्याचे मणी आणि इतर दुसरे मणी ओवलेली दोरी वधूच्या गळ्याभोवती बांधणे. सांप्रतकाळी स्त्रिया मंगळसूत्र हा सर्वात श्रेष्ठ असा अलंकार समजतात आणि पती जिवंत असेपर्यंत त्या अलंकाराचा केव्हाही त्याग करीत नाहीत. परंतु सूत्रग्रंथात ह्याविषयी मुळीच उल्लेख केलेला नाही. ह्याचा सर्वात प्राचीन उल्लेख शौनकस्मृतीमध्ये केला असून लघु आश्वलायन स्मृतीमध्येही (१५·३३) ह्याचे विधान सांगितले आहे. अर्कविवाहात मांगल्यसूत्राचा उल्लेख बौधायनाने (शेषसूत्र ५·५) केला आहे. परंतु ते मांगल्यसूत्र आणि हल्ली विवाहित स्त्रिया गळ्यात बांधतात ते मंगलसूत्र एकच किंवा काय हे स्पष्ट होत नाही. सांप्रतकाळी सौभाग्यवती स्त्रिया नथ अथवा नाकातील अलंकार ह्याला अत्यंत महत्त्व देतात. परंतु सूत्रग्रंथ, स्मृति आणि प्रारंभी झालेले निबंधग्रंथ ह्यांत ह्या अलंकाराचा मुळीच उल्लेख केलेला नाही. इ. स. १००० च्या सुमारास झालेल्या ग्रंथांत ह्या अलंकाराचा उल्लेख येतो.

**उत्तरीयप्रांत-बंधन**— वधूवरांच्या दोघांच्याही अंगावरील पांघरण्याच्या वस्त्राच्या शेवटांना हळकुंडे व सुपाऱ्या बांधणे आणि त्या दोघांच्या वस्त्रांची एक गाठ बांधणे.

**ऐरिणी-दान**— एका मोठ्या वेळूच्या परडीत जळते दिवे ठेवून त्यात वराच्या मातेला निरनिराळ्या वस्तूंचे दान करणे आणि वराच्या मातेची आणि वराच्या मातेची आणि वराच्या आप्तांची वधूला प्रेमाने वागण्याविषयी प्रार्थना करणे. वेळूची (वंशवृक्षाची) परडी वापरण्याचे कारण बहुधा त्याच्याद्वारा वराचा वंश पुढे चालत राहो असे सूचित करणे हा असावा. हा विधी विवाहानंतर वधु ज्यावेळी आपल्या पित्याच्या घरून वराच्या घरी जाण्यास निघते त्यावेळी करतात.

**देवकोत्थापन आणि मंडपोद्वासन**— विवाहविधींना प्रारंभ करण्यापूर्वी ज्या देवतांचे आवाहन केले असेल त्यांना निरोप देणे आणि मंडप मोडणे.

**विवाहसंस्कार पुरा केव्हा होतो**— विवाहसंस्कार पुरा होऊन मग त्यात बदल करता येत नाही असे केव्हा होते जर विवाह जबरदस्तीने अथवा लबाडीने घडवून आणला असेल तर त्याचा परिणाम काय होऊ शकतो ह्या दोन प्रश्नांसंबंधी निरनिराळी मते प्रदर्शित केली आहेत. निरनिराळ्या ग्रंथांतील वचनांवरून असा

अनुक्रमणिका

निष्कर्ष निघतो की सप्तपदीचा विधी झाला म्हणजे विवाहसंस्कार पूर्ण होतो आणि नंतर त्यात काही बदल करता येत नाही. परंतु तो विधी होईपर्यंत मागे परत फिरण्याचा अथवा दिलेले वचन घेण्याचा अधिकार असतो. सप्तपदीचा विधी होण्यापूर्वी जर वर मृत्यु पावला तर ती मुलगी कुमारिकाच राहते.

[नोदकेन न वाचा वा कन्यायाः पतिरिष्यते ।
पाणिग्रहणसंस्कारात् पतित्वं सप्तमे पदे । यम (गृ. र. पा. ५५).
एवं च सप्तमपदादर्वाक् परिणेतुर्मरणेपि न विधवात्वमित्युक्तं भवति ।
स्मृ. चं. १· पा. ८२]

(यम-गृह. रत्ना. पा. ५५ स्मृतिचं. १ पा. ८२) आणि विधवा होत नाही आणि तिचा पुन्हा विवाह करता येतो. अग्निसाक्ष झालेला विवाह रद्द करिता येत नाही असे कामसूत्रात (३·५·१३) सांगितले आहे. काही निबंधग्रंथांत (गृह. रत्ना. पा. ५७) म्हटले आहे की शूद्रांच्या विवाहाच्या बाबतींत जेव्हा ती शूद्रकन्या आपल्या पतीच्या अंगावरील वस्त्राचा शेवट आपल्या हातात धरते तेव्हा विवाह पुरा होतो.

जर एखाद्या मनुष्याने एकाद्या मुलीबरोबर विवाह करण्याचे कबूल केले आणि त्यानंतर त्याला त्या मुलीत काही दोष आढळले अथवा ती मुलगी आजारी पडली अथवा तिचा अगोदरच कौमार्यभंग झालेला अथवा तिला फसवून दिली जात असली तर त्या मनुष्याने त्या मुलीबरोबर विवाह करण्याचे नाकबूल करावे असे मनूने (९·७२) सांगितले आहे. एकाद्या मुलीच्या पित्याने त्या मुलीमध्ये असलेले दोष न सांगता तिचे दान केले असले आणि तिच्यातील दोष पुढे उघडकीला आले तर त्या पित्याला अथवा पालकाला मोठ्यात मोठा दंड करावा (याज्ञ. १·६६, नारद स्त्रीपुंस. ३३). तसेच जर एकाद्या विवाहेच्छूने दोषरहित असलेल्या मुलींशी विवाह करण्याचे नाकारले तर त्यासही जास्तीत जास्त दंड करावा (याज्ञ. १·६६; नारद-स्त्रीपुंस ३४). एकाद्या निर्दोष मुलीचा जो त्याग करतो त्याला शासन करावे आणि त्याला त्याच मुलीबरोबर विवाह करण्यास भाग पाडावे असे नियम नारदप्रभृतींनी (स्त्रीपुंस. ३५) सांगितले आहेत.

विवाहविधी चालू असताना आणि होम करण्याला आरंभ होणार इतक्यात जर वधूला रजोदर्शन झाले तर काही स्मृतींनी (अत्रि. ५) असा नियम सांगितला आहे की त्या मुलीला स्नान घालावे आणि दुसरी वस्त्रे परिधान करावयास द्यावी आणि एक विशिष्ट मंत्र म्हणून तुपाची एक आहुती अग्नीमध्ये द्यावी आणि विधी पुढे चालू करावे. स्मृत्यर्थसार ह्या ग्रंथात (पा. १७) वरील नियम सांगून पुढे असा पर्याय सुचविला आहे की वधु आणि वर ह्यांनी तीन दिवसपर्यंत वेगवेगळे राहावे आणि चौथ्या दिवशी समारंभपूर्वक स्नान करून त्याच अग्नीमध्ये होम करावा.

———

अनुक्रमणिका

# प्रकरण ३४

## मधुपर्क आणि इतर रूढी

(मू. ग्रं. पा. २.५४२-५४९)

**मधुपर्क** म्हणजे सन्मान्य अतिथीचा सत्कार करण्याकरिता त्याला मध अर्पण करणे. ज्या विधीमध्ये (एकाद्या व्यक्तीच्या हातावर) मध घालतात किंवा ओततात तो विधी असा मधुपर्क ह्या शब्दाचा अक्षरशः अर्थ आहे. हा विधी अतिशय प्राचीन असून त्याचा उल्लेख ब्राह्मणग्रंथात

[तं. होवाच किं विद्वान्नो दाल्भ्यानामन्त्र्य मधुपर्कं पिबसीति ।
(जैमि. उपनिषद् ब्राह्मण १८·४)]

आलेला आहे. (जैमि. उप. ब्राह्मण १८·४). सर्व गृह्यसूत्रांत ह्या विधीचे सविस्तर वर्णन केलेले असते. त्यातील बहुतेक तपशील सारखाच असतो परंतु त्यावेळी म्हणावयाचे बहुतेक मंत्र भिन्न असतात. मधुपर्क अर्पण देण्याला योग्य असणाऱ्या व्यक्तींमध्ये यज्ञात काम करण्यास नमलेला ऋत्विज, स्नातक, आपल्या देशाचा राजा, आपला श्वशुर, चुलता, मामा, वर, अतिथी इत्यादी व्यक्तींचा समावेश निरनिराळ्या ग्रंथांत केला आहे. (आश्व. गृ. १·२४·१।४, बौ. गृ. १·२·६५). ह्या व्यक्तींपैकी कोणी एकादा मनुष्य एकदा मधुपर्क अर्पण केल्या वेळेपासून एक वर्षाच्या आत पुन्हा आला तर पुन्हा मधुपर्क अर्पण करण्याची आवश्यकता नसते तरी काही अपवादात्मक प्रसंगी पुन्हा मधुपर्क केलाच पाहिजे.

**मधुपर्क अर्पण करण्याचा विधी** थोडक्यात पुढीलप्रमाणे असतो :- (आश्व. गृ. १·२४·५।२६). मधुपर्क देणाऱ्याने दह्यात मध (अथवा मधाच्या अभावी तूप) ओतावा. आलेल्या अतिथीला आसन, पाय धुण्यास पाणी, अर्घ्य म्हणून सुवासिक जल, आचमनाकरिता जल, मधाचे मिश्रण, एक गाय ह्यांच्यापैंकी प्रत्येक वस्तु तीन वेळा निवेदन करावी. अतिथीने उत्तरेकडे अग्रे असलेल्या दर्भाच्या आसनावर बसावे. सत्कार करणाऱ्याने त्याचे पाय धुवावे. नंतर त्याच्या ओंजळीत अर्घ्यजल घालावे आणि त्याने ते प्राशन करावे. नंतर त्याच्या ओंजळीत मधुपर्क द्यावे. पाहुण्याने आपल्या बोटांनी मधुपर्क ढवळावा आणि त्यातील काही भाग तीन वेळा वर उडवावा. नंतर त्याने तीन आचमने घ्यावी. पाहुण्याने सर्व मधुपर्क प्राशन करू नये आणि उरलेला एकाद्या ब्राह्मणाला द्यावा अथवा पाण्यात ओतावा अथवा पाहुण्यानेच सर्व पदार्थ भक्षण करावे. नंतर त्याने आचमन करावे. नंतर त्याला गाय निवेदन करावी आणि पाहुण्याच्या इच्छेप्रमाणे तिचा वध करावा अथवा ती तशीच सोडून द्यावी आणि 'मधुपर्क मांसविरहित नसो' असे म्हणावे.

बऱ्याच गृह्यसूत्रांनी मधुपर्क हा विवाहविधीचा एक भाग म्हणून वर्णन केला आहे. काहींनी त्याचे स्वतंत्र वर्णन केले आहे. मधुपर्कामध्ये मिश्रण करावयाच्या पदार्थांच्या बाबतीत मतवैचित्र्य आहे. कोणाच्या मते मध, आणि दही अथवा मध आणि तूप ह्यांच्या बरोबरच लोणी, जवाच्या लाह्या, सातु, पाणी, धान्याचे पीठ असे एक अथवा अधिक पदार्थ मधुपर्कात मिसळावे. कौशिकसूत्र (९२) मध्ये नऊ प्रकारची मिश्रणे सांगितली आहेत. मधुपर्क मांसरहित नसावा असे वेदवचन असल्यामुळे गाईचा वध न केला तर बकऱ्याचे मांस अथवा पायस ह्यांपैकी एक पदार्थ अर्पण करावा असा पर्याय सांगितला आहे. (मानवगृ. १·९·२२; बौ. गृ. १·२·५१।५४; हि. गृह्य. १·१३·१४). मांस अर्पण करणे ही गोष्ट तिरस्करणीय ठरू लागली तेव्हा पायसासारखे पदार्थ देण्यास सांगण्यात आले. आधुनिक काळी विवाहाखेरीज दुसऱ्या कोणत्याही प्रसंगी बहुधा मधुपर्क दिला जात नाही आणि विवाहविधीतही मधुपर्क अगदी साध्या प्रकारचा असतो.

अनुक्रमणिका

विवाहाशी संबंध असलेल्या काही चमत्कारिक विधींचे थोडक्यात वर्णन करू.

**कुंभविवाह**– एकाद्या मुलीला ज्योतिषशास्त्राप्रमाणे अकाली वैधव्य येणार असल्यास ते टाळण्याकरिता हा विधी करतात. विवाहाच्या आदल्या दिवशी मातीच्या एका कुंभात (भांड्यात) पाणी भरून त्यात सोन्याची विष्णुप्रतिमा टाकून ठेवतात आणि त्याला फुलांनी सुशोभित करतात. त्या मुलीच्या सभोवती दोऱ्याची जाळी लपेटतात. वरुण आणि विष्णु ह्यांचे पूजन करून नियोजित वराला दीर्घायुष्य प्राप्त व्हावे अशी त्यांची प्रार्थना करतात. नंतर तो कुंभ घराबाहेर नेऊन एकाद्या जलाशयात फोडतात. त्या मुलीच्या अंगावर पाच पल्लव घेऊन पाणी सिंचन करतात आणि नंतर ब्राह्मणांना भोजन घालतात. (सं. प्रकाश पा. ८६८; निर्णय. सिं. पा. ३१० इ०).

**अश्वत्थविवाह**– हा विधीही वैधव्ययोग टळावा म्हणून करतात आणि तो कुंभविवाहासारखाच असतो. त्या विधीत मातीच्या कुंभाऐवजी अश्वत्थाचे झाड आणि सोन्याची विष्णुप्रतिमा ह्यांचे पूजन करतात आणि नंतर ती प्रतिमा ब्राह्मणाला दान देतात (सं. प्र. पा. ८६८।६९).

**अर्कविवाह**– एकाद्या मनुष्याच्या एकीपाठोपाठ दुसरी अशा दोन पत्न्या मृत झाल्या तर तिसऱ्या वधूबरोबर विवाह करण्यापूर्वी तो अर्काच्या म्हणजे रुईच्या झाडाबरोबर विवाह करतो. (सं. प्रकाश पा. ८७६।८८९; निर्णयसिं. पा. ३२८; बौ. गृ. शेषसूत्र ५·५).

जुन्या धर्मशास्त्रग्रंथात **परिवेदना** ह्या विषयावर बराच ऊहापोह केलेला असतो. परंतु सध्याच्या काळी त्याचे मुळीच महत्त्व राहिलेले नाही. एकाद्या पुरुषाचा विवाह त्याच्यापेक्षा वयाने मोठा असणाऱ्या बंधूच्या विवाहापूर्वी होतो अथवा एकाद्या मुलीचा विवाह तिच्यापेक्षा वयाने मोठी असणाऱ्या बहिणीच्या विवाहापूर्वी होतो तेव्हा त्या कृत्याला **परिवेदना** असे म्हणतात. हे कृत्य पातक मानले असून त्याचा निषेध केला आहे. ह्याप्रमाणेच ज्येष्ठ बंधूच्या अथवा पित्याच्या पूर्वी अग्निहोत्राची स्थापना करणे, सोमयाग करणे ही कृत्येही निंद्य समजली आहेत. अशी कृत्ये करणाऱ्या व्यक्तींना **परिवेत्ता, परिविविदान, परिर्विदक, परिवित्त, परिविन्न, परिवित्ती, अग्रेदिधीषु, दिधीषु, परिदायी, परिदाता**, अशा निरनिराळ्या
[परिवेत्ता अथवा परिविविदान अथवा परिर्विदक–
(मनु. ३·१७१; याज्ञ १·२२३)
परिवित्त अथवा परिविन्न अथवा परिवित्ति– (मनु. ३·१७१)
अग्रे दिधिषू अथवा परिवेदिनी– (गौ. १५·१५; वसिष्ठ १·१८)
दिधिषू, परिदायी अथवा परिदाता ,,
पर्याधातृ, पर्याहित (गौ. १५·१८);] संज्ञा लागतात. (मनु. ३·१७१; गौ. १५·१५; वसि. १·१८ इ०).

काही काही प्रसंगी ज्येष्ठ बंधूच्या आधी कनिष्ठ बंधूने विवाह करणे, अथवा अग्निहोत्र धारण करणे ही कृत्ये निंद्य समजली जात नाहीत. उदाहरणार्थ ज्येष्ठ बंधु वेडा, पापिष्ठ, क्लीब, क्षयरोगी असेल तर कनिष्ठ बंधूने स्वतःचा विवाह करण्यापूर्वी वाट पहाण्याची [उन्मत्तः किल्बिषी कुष्ठी पतितः क्लीब एव च । राजयक्ष्मामयावी च न योग्यः स्यात् प्रतीक्षितुम्॥ –(मनु ३·१७१ वरील मेधा. टीकेतील अवतरण)] गरज नाही.

–––––

अनुक्रमणिका

# प्रकरण ३५

## बहुपत्नीत्व, बहुभर्तृकत्व आणि विवाहामुळे प्राप्त होणारे अधिकार आणि कर्तव्ये

(मू. ग्रं. पा. २.५५०-५८२).

**बहुपत्नीत्व**— जरी एकपत्नीत्व हे ध्येय मानले जात असे आणि बहुधा आचारही तसाच असे, तरीही बहुपत्नीत्वाचे उल्लेख वैदिक वाङ्मयात पुष्कळ सापडतात. तैतिरीय संहितेत (६·६·४·३) बहुपत्नीत्वाची निश्चित स्वरूपाची उपपत्ती दिली आहे. 'ज्याप्रमाणे एका यज्ञस्तंभासभोवती दोन दोरखंडे गुंडाळतात त्याप्रमाणे एक पुरुष दोन स्त्रिया मिळवितो; ज्या प्रमाणे एक दोरखंड दोन यज्ञस्तंभासभोवती गुंडाळीत नाहीत त्याप्रमाणे एका स्त्रीला दोन पती मिळत नाहीत.' शतपथ ब्राह्मणात (१३·४ १·९) राजाच्या चार प्रकारच्या पत्न्यांचा उल्लेख केला आहे. त्यात म्हटले आहे की 'चार पत्न्या पतीची सेवा करीत असतात. एक **महिषी** (अभिषिक्त पत्नी), दुसरी **वावाता** (आवडती पत्नी), तिसरी **परिवृक्ता** अथवा **परिवृक्ती** (टाकून दिलेली) आणि चौथी **पालागली** (कनिष्ठ वर्णाची स्त्री).' बहुपत्नीत्वाची रूढी फक्त राजे लोकात आणि सरदार लोकांतच होती असे नसून महान् तत्त्ववेत्ता याज्ञवल्क्य याला दोन पत्न्या होत्या. एक कात्यायनी आणि दुसरी मैत्रेयी. (बृ. उप. ४·५·१।२ आणि २·४·१).

सूत्रग्रंथांच्या काळी काही काही ऋषींनी समाजापुढे एकपत्नीत्वाचे उच्च ध्येय ठेवण्याचा प्रयत्न केला होता. जर एकाद्या पुरुषाची भार्या धर्म आणि संतती यांनी युक्त असेल तर त्याने दुसऱ्या स्त्रीबरोबर विवाह करू नये. परंतु ह्या दोहोंपैकी कोणतीही एक गोष्ट त्याच्या पत्नीच्या ठिकाणी नसेल तर त्याने श्रौताग्नीची स्थापना करण्यापूर्वी दुसऱ्या एकाद्या स्त्रीबरोबर विवाह करावा असे आपस्तंबाने (ध. सू. २·५·११·१२।१३) म्हटले आहे. नारदाने (स्त्रीपुंस ९५) म्हटले आहे की आज्ञाधारक, कर्कश भाषण न करणारी, गृहकृत्यात दक्षता ठेवणारी, पतिव्रता आणि पुत्रवती अशा पत्नीचा जो पती त्याग करील त्याला राजाने दंड करून सरळ मार्गावर आणावे. अशा रीतीने काही शास्त्रकारांनी एकपत्नीत्वाचे ध्येय समाजापुढे ठेवले होते आणि योग्य कारणाशिवाय दुसरी स्त्री करणाऱ्या पुरुषाला दंड करावा असा नियम सांगितला होता तरीही तसे करण्याबद्दल राजांनी कोणाला दंड केला असेल किंवा काय ह्याविषयी बळकट शंका येते. देवलाने

[एका शूद्रस्य वैश्यस्य द्वे तिस्त्रः क्षत्रियस्य च ।
चतस्त्रो ब्राह्मणस्य स्युर्भार्या राज्ञो यथेच्छतः ॥
देवल (गृह रत्नाकर पा. ८५)]

(गृ. रत्ना. पा. ८५) म्हटले आहे की शूद्राला फक्त एकच पत्नी करता येते, वैश्याला दोन पत्न्या करता येतात, क्षत्रियाला तीन पत्न्या करता येतात आणि ब्राह्मणाला चार स्त्रिया असू शकतात, परंतु राजाला त्याच्या इच्छेला येईल तितक्या स्त्रिया करता येतात. कृष्णाला सोळा सहस्त्र स्त्रिया होत्या, ऐतिहासिक काळातील कित्येक राजांना शंभरापर्यंत स्त्रिया होत्या. तथापि त्या काळी एका पुरुषाने अनेक स्त्रिया करणे हा सर्वसामान्य प्रघात नसून तसे वर्तन कमी प्रतीचे मानले जात असे. आधुनिक काळातील सुशिक्षितांचे मत एकपत्नीला अतिशय अनुकूल आहे आणि कायद्याने संपूर्णपणे एकपत्नीत्व अमलात आणावे अशाविषयी प्रयत्न केले जात आहेत.

**बहुभर्तृकत्व**— प्राचीनकाळी बहुभर्तृकत्व लोकांना माहित नव्हते असे वर उद्धृत केलेल्या वचनांवरून (तै. सं. ६·६·४·३ इ०) दिसते. ज्यात बहुभर्तृकत्वाच्या रूढीचा स्पष्ट निर्देश केला आहे असे

अनुक्रमणिका

एकही वेदवचन दाखविता येणार नाही. संस्कृत वाङ्मयातील बहुभर्तृकत्वाचे ठळक उदाहरण पाच पांडवांची पत्नी असलेल्या द्रौपदीचे आहे. त्या विवाहाच्या वेळीही ती गोष्ट अपूर्व वाटली आपण ती टाळण्याविषयी धृष्टद्युम्नाने जोराचा प्रयत्न केला होता असे महाभारतात (आदि. १९५·२७।२९) वर्णन केले आहे. युधिष्ठिराला आपल्या निश्चयाच्या समर्थनार्थ जवळजवळ दंतकथेच्या स्वरूपाचे असे फक्त दोनच पूर्वीचे दाखले सांगता आले. ह्या गोष्टीवरून पुष्कळ विद्वान असे मानतात की पांडव हे अनार्य वंशातील असावे. कुमारिलभट्टानी (तंत्र. वार्ति. पा. २०९) ह्या कूटप्रश्नाच्या ज्या उपरत्त्या सांगितल्या आहेत त्यांतील एक अशी आहे की एकमेकींशी सारख्या असणाऱ्या पाच द्रौपद्या होत्या आणि त्यांचे पांच पांडवांबरोबर पृथकपणे विवाह झाले आणि म्हणून महाभारतात अलंकारिकरीत्या एकाच द्रौपदीचा निर्देश केला आहे. धर्मशास्त्रावरील ग्रंथांत बहुभर्तृकत्वाचा प्रघात त्या ग्रंथांच्या कर्त्यांना ज्ञात असल्याचे दर्शविणारी काही स्थळे आहेत. आपस्तंबाने (ध. सू. २·१०·२७·२।४) नियोगाच्या बाबतीत असे म्हटले आहे की शास्त्रांनी असे सांगितले आहे की वधु ही (अनेक बंधु असलेल्या) एका कुलाला अर्पण केलेली असते (त्या भावांपैकी कोणा एका विविक्षित भावाला दिलेली नसते). बृहस्पतीने

[कुले कन्याप्रदानं च देशेष्वन्येषु दृश्यते ।
बृहस्पति (स्मृतिचं. १·१०).]

म्हटले आहे की काही देशांत एक मुलगी **सर्व कुटुंबाला** देण्याची चाल आहे. (स्मृतिचं. १·१०). बहुभर्तृकत्व दोन प्रकारचे असते. **एका प्रकारात** एक स्त्री एकाच वेळी एकमेकांचे बंधु नसलेल्या दोन अथवा अधिक पुरुषांबरोबर संबंध जोडते आणि म्हणून त्या प्रकारात वारसा स्त्रियांच्या द्वारा ठरविला जातो. ह्या प्रकाराला मातेच्या बाजूने होणारे बहुभर्तृकत्व म्हणतात. **दुसऱ्या प्रकारात** एक स्त्री अनेक बंधूंची भार्या होते. पहिला प्रकार मलबार किनाऱ्यावरील नायर लोकात पूर्वी प्रचलित होता, परंतु ती चाल आता नामशेष झाली आहे. दुसऱ्या प्रकारचे बहुभर्तृकत्व काही थोड्या प्रमाणात कुमाऊन, गढवाल ह्या प्रांतात आणि आसामपर्यंतच्या हिमालयातील प्रदेशात अद्यापिही प्रचलित आहे. त्यांची अपत्ये ही जिवंत असलेल्या ज्येष्ठ भावाची मुले मानली जातात. (इंपिरियल गॅझेटियर ऑफ इंडिया, खं. १ पा. ४८३, सन १९०७)

## पती आणि पत्नी यांचे परस्परांवरील अधिकार आणि परस्परांसंबंधीची कर्तव्ये

मनूने (९·१०१।१०२) म्हटले आहे की पती आणि पत्नी यांनी एकमेकांशी (धर्म, अर्थ आणि काम ह्यांच्या बाबतीत) आमरणान्त प्रतारणा करू नये आणि एकमेकांपासून अलग न होण्याचा आणि (जीवितातील तीन पुरुषार्थांच्या बाबतीत) एकमेकांशी निष्ठेने वागण्याचा सतत प्रयत्न करावा.

**पतीचे पहिले कर्तव्य** असे आहे की त्याने पत्नीला सर्व धार्मिक कृत्यांत त्याच्याशी सहकार्य करण्यास लावावे आणि पत्नीने तसे सहकार्य करावे हा तिचा **पहिला अधिकार** असतो. विवाहाच्या वेळेपासून धार्मिक कृत्यात पती आणि पत्नी यांनी बरोबर काम केले पाहिजे. त्यांनी अशा रीतीने केलेल्या कर्माचे फळ ती उभयता एकत्र भोगतात असे आपस्तंबाने (२·६·१३·१७।१९) सांगितले आहे. प्रसंगोपात्त पतीच्या गैरहजेरीत पत्नीला दान देता येते असेही त्याने म्हटले आहे. वेदमंत्र म्हणण्याचा स्त्रियांचा अधिकार क्रमाक्रमाने नाहीसा होत गेला तरी धार्मिक कृत्ये करण्यात तिला पतीशी सहकार्य करता येत असे यज्ञात पुष्कळशा गोष्टी तिला कराव्या लागत. सर्व धर्मकृत्यात पत्नीचे सहकार्य अवश्य असल्यामळे रामाला सीतेची सुवर्णाची प्रतिमा आपल्या बाजूला ठेवून यज्ञ करणे भाग पडले. पाणिनीने [पत्युर्नो यज्ञसंयोगे । (पाणिनि ४·१·३३)] (४·१·३३) म्हटले आहे की पत्नी हा शब्द फक्त ज्या स्त्रीला यज्ञात भाग घेता येतो (आणि यज्ञाच्या फलात भाग घेता येतो) तिलाच लागतो. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की ज्या स्त्रिया आपल्या पतीबरोबर यज्ञात

भाग घेत नाहीत अथवा ज्यांना असा भाग घेण्याचा अधिकार नसतो, त्या (पत्न्या नसून) केवळ **जाया** अथवा **भार्या** असतात. महाभाष्यात (खं. २ पा. २१४) म्हटले आहे की शूद्राच्या स्त्रीला पत्नी अशी संज्ञा केवळ साम्यत्वाच्या अर्थाने लावली जाते. तै. ब्रा. (३·७·१) मध्ये सांगितले आहे की ज्या यज्ञकर्त्याची पत्नी (ऋतुमती असल्यामुळे) यज्ञाच्या दिवशी उपस्थित नसते, त्या दिवशी केलेल्या त्या यज्ञाचा अर्धा भाग नष्ट होतो. परंतु पत्नीला पती विरहित एकटीने अथवा त्याच्या अनुमतीशिवाय स्वतंत्रपणे धार्मिक कृत्ये करण्याचा अधिकार नसतो. (मनु. ५·१५५).

जर एकाद्या पुरुषाने अनेक स्त्रिया केल्या असल्या तर त्या स्त्रियांमध्ये कोणाला **अग्रमान** द्यावयाचा ह्याविषयी अनेक नियम धर्मशास्त्रात दिले आहेत. (विष्णु ध. सू. २६·१।४). उदाहरणार्थ, जर सर्व स्त्रिया **एकाच जातीच्या** असतील तर जिचा विवाह प्रथम झाला असेल तिने सर्व धर्मकृत्यात पतीबरोबर भाग घ्यावा. **भिन्न भिन्न वर्णांच्या** स्त्रिया असल्यास **पतीच्या समान वर्णाची** स्त्री जरी तिचा विवाह मागून झालेला असला तरी पतीच्या बरोबर सहकार्य करते. द्विजातीयांपैकी कोणीही आपल्या शूद्र स्त्रीसह धार्मिक विधी करू नये. जरी ज्येष्ठ पत्नीलाच फक्त धर्मकार्यात भाग घेण्याचा अधिकार असला तरी (शूद्र स्त्रीखेरीज) सर्व स्त्रियांचे दहन श्रौत अग्नीमध्ये करावे. (याज्ञ. १·८८ वरील विश्वरूपटीका). समान जातीच्या पत्नीला आवश्यक अशा धार्मिक विधीतच नव्हे तर पतीच्या **शारीरिक शुश्रूषेत देखील अग्रमान** द्यावा आणि समान वर्णाची स्त्री समीप असूनही जो ब्राह्मणजातीचा पती अशीं कृत्ये अन्य वर्णाच्या स्त्रीकडून करवून घेईल तर तो चांडालासमान होतो (मनु. ९·८६।८७).

जन्माबरोबर घेऊन आलेल्या **तीन ऋणांपैकी** पितरांचे ऋण पुत्रोत्पादन करून फेडले जात असते अशी अत्यंत प्राचीन काळापासून लोकांची दृढ श्रद्धा आहे. पुत्राच्या योगाने पितरांचे ऋण फिटते, अमरत्व मिळते आणि स्वर्गप्राप्ती होते असे ऐ. ब्रा. त (३३·१) म्हटले आहे. पुत्राने आपल्या पित्याला आणि इतर मृत पूर्वजांना अर्पण केलेले पाणी आणि अन्नाचे पिंड ह्यांचा मृतांच्या आत्म्यांना शांति मिळण्याच्या कामी अतिशय उपयोग होतो अशी लोकांची भावना असे. पुत्रहीन स्त्रीला निर्ऋतीने (दुर्दैवाने) पछाडलेले असते असे श. प. ब्रा. (५·३·२·२) मध्ये म्हटले आहे. स्त्रियांची उत्पत्ती प्रजोत्पादनाकरिता झालेली आहे आणि पुरुषांना वंशवृद्धी करावयाची असते. ह्याकरिता स्त्री धार्मिक कृत्ये करण्यात आपल्या पतीच्या बरोबरीने भाग घेत असते. (मनु. ९·९६) स्त्रियांच्या आयुष्याच्या ध्येयाविषयी अशी कल्पना असल्याकारणाने आणि पुत्राचे अत्यंत महत्त्व मानले असल्याकारणाने स्मृतींनी आणि धर्मसूत्रांनी **पहिली स्त्री जिवंत असताही** पुरुषाने **दुसरा विवाह** करावा अशी शिफारस केलेली असते अथवा तसे करण्यास पुरुषाला परवानगी दिलेली असते.

सर्व धर्मशास्त्रग्रंथांत आणि निबंधग्रंथांत **पत्नीच्या कर्तव्या**संबंधी विस्तृत विवेचन केलेले असते. पतीची आज्ञा पालन करणे आणि त्याला देवासमान मान देणे हे पत्नीचे **सर्वात पहिले कर्तव्य** असल्याबद्दल सर्व ग्रंथांची एकवाक्यता आहे. पती नपुंसक असला, जातिबहिष्कृत असला, अवयवहीन, विषयलंपट अथवा सद्गुणहीन इत्यादी असला तरीदेखील सदाचार संपन्न पत्नीने त्याला देवासमान मानून त्याची सेवा करावी; (स्मृतिचं. व्यव. पा. २५१). पती हाच पत्नीचा देव आणि स्वामी असतो आणि पतीची सेवा केल्याने तिला सर्वश्रेष्ठ अशा स्वर्गाची प्राप्ती होते; (रामायण-अयोध्या. २४·२६।२७); पिता, बंधु, पुत्र इत्यादींनी दिलेले धन (अथवा सुखोपभोग) परिमित (मोजके) असते, परंतु पतीपासून मिळणारे सुख अमित असते (शांति. १४८· ६।७); असे उद्गार निरनिराळ्या ग्रंथांत आले आहेत. पत्नीची दुसरीही अनेक कर्तव्ये सांगितली आहेत. उदाहरणार्थ, पत्नीने नेहमी हसतमुख असावे (मनु. ५·१५०), घरातील पात्रे स्वच्छ ठेवावी, उधळपट्टीचा खर्च करू नये, स्त्रियांनी आपल्या पतीपासून दूर माहेरच्या नातलगांकडे फार दिवस

राहू नये (आदि. ७४·१२). तिने आपल्या सासू सासऱ्याचे पाय चेपून त्यांचा सत्कार करावा (याज्ञ १·८३ आणि ८७), सच्छील वर्तन करावे आणि आपल्या इंद्रियांचे नियमन करावे; पतीच्या आणि इतर वडील मंडळींच्या अगोदर निजून उठावे, त्यांनी भोजन केल्यानंतर अन्न आणि इतर भोज्य पदार्थ सेवन करावेत (स्मृतिचं. व्यव. पा. २५७), पतीने दूषण दिले तरी तीने मोठ्याने रडू नये, पतीने मार दिला तरी तिने हास्यमुख राहावे (स्कंदपु० ब्रह्मखंड, धर्मारण्य, अ. ७), हळद, कुंकू, सिंदूर, काजळ, चोळी, तांबूल आणि शुभसूचक अलंकार धारण करावे आणि आपल्या केसांची वेणी घालावी इ. इ. पद्मपुराणात (सृष्टिखंड ३७—५५) म्हटले आहे की जी पत्नी **काम** करण्याच्या बाबतीत एकाद्या गुलामाप्रमाणे वागते, **रति**सुखाच्या बाबतीत एकाद्या योषितेप्रमाणे पतीला सुख देते, पतीला **भोजन** घालण्यात त्याच्या मातेप्रमाणे त्याची काळजी घेते, आणि **संकटकाळी** पतीच्या सल्लागाराप्रमाणे वागते तिलाच **पतिव्रता** अशी संज्ञा असते. पती प्रवासानिमित्त घरापासून दूर गेलेला असताना तिने कसे वर्तन ठेवावे ह्याविषयी आणि परदेशी जाण्यापूर्वी पतीने काय तजवीजा करून ठेवाव्या ह्याविषयी विशेष नियम सांगितलेले असतात (अपरार्क पा. १०८; स्मृतिचं. व्यव. पा. २५३); पत्नीच्या चरितार्थाची तजवीज करून न ठेवल्यास मूळची सद्‌गुणी असलेलीही पत्नी वाईट मार्गाला जाण्याचा संभव असतो. पतीने तिच्या चरितार्थाची सोय करून ठेवली नसली तर पत्नीने ज्या व्यवसायात काही दोष नसतो असा (सूत काढण्यासारखा) व्यवसाय करून आपला उदरनिर्वाह करावा (मनु. ९·७४।७५). तसेच पती परदेशी असताना स्त्रीने शरीर सुशोभित करू नये, पोटभर भोजन करू नये, शरीर कृश करावे, पतीवर निष्ठा ठेवून असावे (वेदव्यासस्मृती २·५२) अशासारखे नियम सांगितलेले आहेत. पती परदेशी गेला असेल तेव्हा पत्नीने पुरोहिताच्या साहाय्याने अग्निहोत्राची नित्यकर्मे, आवश्यक इष्टी आणि पितृयज्ञ ह्या गोष्टी कराव्यात परंतु सोमयज्ञ करू नये. (त्रिकाण्डमण्डन १.८०।८१ आणि ८५).

जी स्त्री आपल्या पतीशी विचार, उच्चार आणि आचार ह्यांच्या योगाने नेहमी एकनिष्ठ राहते तिला तिच्या पतीसहवर्तमान **स्वर्गलोकांची** प्राप्ती होते आणि तिला साध्वी असे म्हटले जाते, परंतु जर तिने पतीशी अप्रामाणिकपणा केला तर तिची ह्या लोकात **निंदा** होते आणि (अन्य जन्मी) ती **कोल्हीच्या जन्माला** जाते आणि अत्यंत तापदायक **रोगांनी ग्रस्त** होते असे मनूने म्हटले आहे (९·२९।३० = ५·१६५ आणि १६४).

महाभारतात आणि पुराणात **पतिव्रता स्त्रियांच्या सामर्थ्याची** अतिशयोक्तीची वर्णने केली आहेत. उदाहरणार्थ, दमयंतीने दिलेल्या शापामुळे व्याध मरून पडला (वनपर्व ६३·३८।३९), सावित्रीने आपला पती यमाजवळून परत आणला, (वनपर्व २९३।२९९) इत्यादी.

पतीची सेवा करणे हे पत्नीचे सर्वश्रेष्ठ कर्तव्य असल्यामुळे तिने पतीसमवेत निरंतन राहणे अवश्य असे आणि तिला **घरात राहण्याचा अधिकार** असे. तसेच पतीकडून घरात तिच्या **उदरनिर्वाहाची सोय** करून घेण्याचाही तिला अधिकार असे. प्रत्येकाने आपल्या वृद्ध **मातापितरांचे, साध्वी स्त्रीचे** आणि अल्पवयी **पुत्राचे भरणपोषण** त्याकरता शंभर दुष्कृत्ये करावी लागली तरी करून, केले पाहिजे असे एका श्लोकांत
[वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या शिशुः सुतः ।
अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत् ॥
मनु. ३·६२ आणि ४·२५१ वरील मेधा. टीकेतील अवतरण)]
सांगितले आहे. याज्ञवल्क्या. (१·७४) ने सांगितले आहे की एकाद्या पतीने आपल्या पत्नीचे अतिक्रमण केले असले तरी तिचे पूर्ववत् पालनपोषण केले पाहिजे. तर एकाद्याने आपल्या आज्ञाधारक, दक्ष, पुत्रवती आणि प्रियभाषण करणाऱ्या पत्नीचा त्याग केला तर त्याला आपल्या संपत्तीचा तिसरा भाग त्या पत्नीला देण्यास भाग पाडावे आणि जरी त्या मनुष्याजवळ काहीही संपत्ती नसली तरी त्याने तिचे

पालनपोषण केले पाहिजे (याज्ञ. १·७६). (स्त्रियांनी चुकीच्या मार्गाला जाऊ नये म्हणून) स्त्रियांचे नियंत्रण करणे अवश्य असते. ह्यास्तव पतीने पत्नीवर प्रेम करावे (याज्ञ १·८१). विश्वरूपाने (याज्ञ. १·८०) म्हटले आहे की पत्नीचा कुमार्गापासून बचाव तिच्या पतीने तिच्यावर प्रेम करण्यानेच फक्त होऊ शकेल, तिला ताडन करून होणार नाही, कारण ताडन करण्याने तिच्या जीवाला धोका उत्पन्न होण्याचा संभव असतो. मनूने– (९·१०।१२) ही म्हटले आहे की स्त्रियांचे संरक्षण त्यांना कोंडून ठेवून अथवा बळजबरीने होणे शक्य नसते तर त्यांना पतीच्या उत्पन्नाचा आणि खर्चाचा हिशेब ठेवणे, घराची शोभा आणि स्वच्छता राखणे, स्वयंपाक करणे ही कामे करण्यात त्यांना गुंतवून आणि सद्‌गुण संपन्न अशा वर्तनाचे महत्त्व त्यांच्या मनावर बिंबवूनच स्त्रियांचे संरक्षण करण शक्य असते. अशा प्रकारचे नियम असले तरीही आपल्या पत्नीला कुमार्गापासून परावृत्त करण्याकरिता तिला देहदंड करण्याचे काही अधिकार पतींना असत. ज्याप्रमाणे विद्यार्थ्याला शिक्षा करण्याचा अधिकार त्याच्या शिक्षकाला असतो अथवा पुत्राला शिक्षा करण्याचा अधिकार त्याच्या पित्याला असतो तशाच स्वरूपाचे पत्नीला शिक्षा करण्याचे अधिकार तिच्या पतीला असत. मनूने सुमारे २००० वर्षांपूर्वी **सांगितलेले पतीचे हे अधिकार** अठराव्या शतकात इंग्लंडमध्ये कायद्याने पतीला दिलेल्या अधिकारांपेक्षादेखील अधिक नव्हते.

पत्नीच्या राहण्याची आणि पोषणाची व्यवस्था करण्याची जबाबदारी पतीवर असे आणि पतीच्या समागमात राहणे पत्नीचे कर्तव्य असे. जर पती अथवा पत्नी ह्यांच्यापैकी कोणी एकाने विवाहानंतर आपली जबाबदारी उचलण्याचे किंवा कर्तव्य पुरे करण्याचे नाकबूल केले तर ती जबाबदारी उचलण्यास अथवा कर्तव्य पुरे करण्यास पतीला अथवा पत्नीला न्यायालयात जाऊन भाग पाडता येई. सध्याच्या काळी पतीला अथवा पत्नीला दुसऱ्या पक्षावर आपला वैवाहिक हक्क मिळाला म्हणून फिर्याद करता येते. अशी फिर्याद पत्नीने पतीवर केली तर तिला आपल्या उदरनिर्वाहाकरिता ठराविक पैसे ठराविक मुदतीकरिता मिळावे असा न्यायालयाकडून हुकूम मिळविता येतो, आणि जर अशी फिर्याद पतीने पत्नीवर केली असली तर पत्नीला आपल्या बचावाकरिता काही कारणे पुढे करता येतात, उदाहरणार्थ, पतीपासून पत्नीच्या जिवाला धोका आहे, पतीने धर्मांतर केले आहे. त्याला कुष्ठासारखा किळसवाणा रोग झाला आहे, इत्यादी.

एकाद्या स्त्रीने व्यभिचार केला तरीही तिला घरातून बाहेर हाकून देण्याचा आणि तिचा त्याग करण्याचा अधिकार धर्मशास्त्रकारांनी तिच्या पतीला दिलेला नाही. ह्यासंबंधीच्या धर्मसास्त्रातील वचनांचा निष्कर्ष असा आहे की व्यभिचार हे सामान्यतः एक उपपातक असून पत्नीने योग्य ते प्रायश्चित्त घेतल्यास त्या पातकाचा परिहार होऊ शकतो. असे प्रायश्चित्त केल्यावर तिचे पत्नीपणाचे सामान्य अधिकार सर्वही तिला परत दिले पाहिजेत. (वसि. २१·१२; याज्ञ. १·७२). व्यभिचार स्त्रीने प्रायश्चित्त केले नाही तर तिला जेमतेम जिवंत राहता येईल इतक्या बेताचे अन्नवस्त्र द्यावे आणि तिचे पत्नीपणाचे सर्व अधिकार काढून घ्यावे (याज्ञ १·७०). एकाद्या स्त्रीने शूद्राबरोबर व्यभिचार केला असेल आणि अशा संबंधापासून तिला अपत्य झाले असेल अथवा गर्भहत्येचा अपराध केला असेल अथवा पतीचा वध करण्याचा प्रयत्न केला असेल तर त्याबद्दल प्रायश्चित्त घेतल्यानंतरही तिचा धार्मिक कृत्यात भाग घेण्याचा आणि वैवाहिक सुखोपभोगाचा अधिकार काढून घेऊन तिला एका खोलीत कोंडून ठेवावी अथवा घराशेजारी एका झोपडीत ठेवावी आणि पोटही भरणार नाही इतके अन्न आणि हलक्या प्रतीची वस्त्रप्रावरणे तिला द्यावीत (वसिष्ठ २१·१०; मनु. ११·१७७; याज्ञ ३·२९७।९८). अशी कृत्ये करून प्रायश्चित्त घेण्याचे नाकबूल करणाऱ्या स्त्रीला वरील प्रकारचे अन्नवस्त्रही देऊ नये (याज्ञ. ३·२९८ वरील मिताक्षरा.) अन्नवस्त्रासंबंधी वर सांगितलेले सिद्धांत भारतातील न्यायालयांनी प्रचलित हिंदु कायदा म्हणून मान्य केले आहेत.

धार्मिक बाबतीत पतीपत्नींमध्ये अभिन्नत्व असल्याचे जरी धर्मशास्त्रकारांनी सांगितले असले तरी तसेच ऐक्य ऐहिक बाबतीत आणि कायदेशीर प्रश्नात प्राचीन ऋषींनी मान्य केले नव्हते. पतीने काढलेल्या कर्जाची जबाबदारी सामान्यतः त्याच्या पत्नीवर पडत नाही आणि पत्नीने काढलेल्या कर्जाची जबाबदारी असे कर्ज कुटुंबाच्या हिताकरिता काढलेले नसल्यास तिच्या पतीवर पडत नाही. पत्नीच्या वैयक्तिक मालमत्तेवर (म्हणजे तिच्या स्त्रीधनावर) पतीची कोणत्याही प्रकारची सत्ता असत नाही. ह्याला अपवाद म्हणजे काही विशेष अडचणीच्या प्रसंगी फक्त पतीला पत्नीच्या स्त्रीधनावर सत्ता चालविता येते (याज्ञ. २·४६). इंग्लंड देशात सन १८८२ पूर्वी ह्या बाबतीत जी स्थिती होती तिच्याशी ह्या फार पूर्वीच्या नियमांची तुलना केली तर ते नियम कितीतरी अधिक सयुक्तिक आणि समंजसपणाचे ठरतील.

पती आणि पत्नी ह्यांनी आपल्या नातलगांकडे अथवा राजाकडे परस्परांविरुद्ध तक्रार नेऊ नये असे नारदाने (स्त्रीपुंस. ८९) सांगितले आहे. तथापि आपण होऊन ज्या बाबींची चौकशी करण्याचा राजाला अधिकार असतो त्या बाबींत पतीपत्नींनी परस्परांविरुद्ध अन्याय्य वर्तन करणे, एकाद्या स्त्रीचा वध, व्यभिचार, पतीहून अन्य पुरुषापासून विधवेला झालेली गर्भधारणा इत्यादी गोष्टींचा समावेश होता (याज्ञ. २·२९४ वरील मिताक्षरा). सच्छील अशा पत्नीचा तिच्या पतीने त्याग केल्यास त्याने आपल्या मिळकतीपैकी तिसरा हिस्सा पत्नीला दिला पाहिजे अथवा दंड दिला पाहिजे (याज्ञ. १·७६; नारद स्त्रीपुंस ९५).

भारतात स्त्रियांचा— त्यातल्या त्यात पत्नीचा दर्जा निरनिराळ्या काळी निरनिराळ्या प्रकारचा होता. एकंदरीने विचार करता प्राचीन काळी स्त्रियांची सामाजिक स्थिती (मिळकतीवरील हक्काव्यतिरिक्त इतर बाबतीत) त्यानंतरच्या काळातल्या मानाने पुष्कळच चांगली होती. तथापि वेदांच्या काळी देखील स्त्रियांच्या विरुद्ध असणारा एक मतप्रवाह अस्तित्वात होता. नुसत्या घराला गृह ही संज्ञा नसून गृहिणी (पत्नी) हिलाच गृह अशी संज्ञा असते, गृहिणी नसलेले घर अरण्यासारखे असते (शान्ति. १४४·६); भार्येसारखा दुसरा कोणी नातलग नसतो (शान्ति १४४·१६), ज्यावेळी भार्या आणि पती एकमेकांच्या अनुरोधाने वागत असतात; तेव्हा धर्म, अर्थ आणि काम ह्या तिघांची युती होते (मार्कंडेय पुराण २१·६९।७१); अशासारखे स्त्रियांची प्रशंसा असलेले उद्गार निरनिराळ्या ग्रंथांत काढले आहेत. त्याच्या उलट स्त्रिया असत्यपणाच्या मूर्तिमंत पुतळ्या असतात (मैत्रा. स. १·१०·११), स्त्रियांच्या मनावर नियंत्रण घालणे शक्य नसते (ऋ ८·३३·१७), स्त्रिया सर्व अवस्थेत घरगुती बाबतीत देखील कोणत्या तरी पुरुषावर सतत अवलंबून असतात, चांगल्या कुलातील स्त्रियांचा त्यांना स्वातंत्र्य दिल्यास नाश होतो, म्हणून विधात्याने स्त्रियांना परतंत्र

[स्वातन्त्र्याद्विप्रणष्यन्ति कुले जाता अपि स्त्रियः ।
अस्वातन्त्र्यमतस्तासां प्रजापतिरकल्पयत् ॥
(नारद-दायभाग २८।३०)]

केले आहे. (नारद-दायभाग २८।३०), अशा प्रकारची स्त्रियांच्या विरुद्ध असणारी वचनेही निरनिराळ्या ग्रंथांत आली आहेत. प्राचीन काळीदेखील काही ग्रंथकारांना स्त्रियांची निष्कारण केलेली निंदा सहन होत नसे आणि ते अशा निंदेचा जोराने प्रतिकार करीत असत. उदाहरणार्थ, इ. स. च्या ६ व्या शतकात होऊन गेलेल्या वराहमिहिराने बृहत्संहिता ह्या ग्रंथात स्त्रियांना दोष देणारांचा निषेध करून असे विचारले आहे की स्त्रियांच्या अंगाला चिकटविल्या जाणाऱ्या दोषांपैकी कोणते दोष असे आहेत की जे पुरुष आचरीत नाहीत? तो पुढे म्हणतो की खरे पाहिल्यास पुरुषांच्यापेक्षा स्त्रियांच्याच ठिकाणी अधिक सद्गुण असतात (बृहत्सं. ७४·५, ६, ११, १५, १६).

स्त्रियांच्या संबंधी अशी उलट सुलट मते असली तरी त्यांना अनुकूल असे एक अत्यंत उज्वल स्थान आढळते. ते म्हणजे सर्व स्मृतिग्रंथांत **मातेची** केलेली प्रशंसा आणि मातेविषयी प्रदर्शित केलेला पूज्यभाव हे

होय. माता पतित झाली असली तरी पुत्राला ती केव्हाच बहिष्कृत [पतितः पिता परित्याज्यो माता तु पुत्रे न पतति । (वसिष्ठ १३·४७)] असू शकत नाही; (वसिष्ठ १३·४७). पित्याच्या सहस्र पटीहून अधिक मातेची योग्यता असते, (मनु २·१४५), मातेपेक्षा श्रेष्ठ गुरु कोणी नसतो, (वनपर्व ३१३·६०; शान्ति. ३४३·१८) इत्यादी उद्‍गार अनेक ग्रंथांत आढळतात. एकंदरीने असे म्हणता येईल की हिंदु समाजातील उच्च विचाराच्या लोकांना स्त्रियांच्या योग्यतेची जाणीव होती, शुद्ध वर्तन हा स्त्रियांचा सर्वात श्रेष्ठ गुण असल्याचे मानले जात असे. संन्यासमार्गाला श्रेष्ठ मानणारे आणि लोकांना संसाराच्या बंधनापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करणारे लोक स्त्रियांना हीन मानीत आणि त्यांच्या दोषांचे अतिशयोक्तीचे वर्णन करीत. पूर्वमीमांसेचा असा एक सिद्धान्त अशा दोषारोपाला लागतो (जै. २·४·२१ वरील शबरभाष्य). तो सिद्धान्त म्हणजे एकाद्या कृत्याची निंदा करणाऱ्या वचनाचा हेतु केवळ निंदा करावी एवढाच नसून ज्या कृत्याची निंदा केली असेल त्याच्याविरुद्ध असलेले कृत्य लोकांनी करावे असाही असतो. ह्या सिद्धान्ताप्रमाणे स्त्रियांची निंदा करणाऱ्यांचा हेतु केवळ स्त्रियांचे दुर्गुण लोकांपुढे मांडण्याचा नसून स्त्रियांच्या शुद्ध वर्तनाचे आणि आज्ञाधारकतेचे अतिशय महत्त्व लोकांच्या मनावर बिंबविण्याचा होता असे धरले पाहिजे.

स्त्रियांकडे त्यांच्या मृतपतीचा वारसाहक्क येत नाही असे प्राचीन काळी समजत असत. मध्ययुगीन काळात विधवांच्या मालमत्तेवरील हक्काला प्राचीन काळच्या पेक्षा अधिक मान्यता मिळत असे. परंतु धार्मिक आणि इतर बाबतीत मध्ययुगीन काळात स्त्रियांचा दर्जा खालावला, कारण त्यांची योग्यता शूद्रांच्या बरोबरीची मानण्यात येऊ लागली. यास्काचार्याच्या (निरुक्त ३·५) एका विधानावरून असे दिसते की उत्तरेकडील देशात विधवांना त्यांच्या मृतपतींची मालमत्ता मिळत नसे परंतु दक्षिणेकडील देशात काही विवक्षित गोष्ट घडल्यास विधवेला तिच्या मृतपतीची मालमत्ता मिळत असे.

———–

अनुक्रमणिका

## प्रकरण ३६

# विधवेची कर्तव्ये, स्त्रियांचे काही हक्क आणि पडद्याची पद्धती

(मू. ग्रं. पा. २.५८३-५९८)

**विधवाधर्म**– विधवा हा शब्द ऋग्वेदामध्ये पुष्कळ ठिकाणी आला आहे. परंतु अशा स्त्रियांचा सामाजिक दर्जा काय होता ह्याचा त्या उल्लेखांवरून फारसा बोध होत नाही. पतीहीन स्त्रिया दुःखामुळे आणि दुसऱ्या कोणाकडून पीडा होईल आणि वाईट वागणूक मिळेल ह्या भितीने कापत असत असे एका ठिकाणच्या वर्णनावरून दिसते (ऋ. १·८७·३).

पती मृत झाल्यानंतर विधवेने काही कालपर्यंत (एक वर्षभर अथवा सहा महिने पर्यंत) निरनिराळे नियम पाळावे असे धर्मसूत्रांत आणि स्मृतींत सांगितले आहे. त्या अवधीनंतर ज्या विधवेला पुत्र नसेल तिने स्वतःच्या कुटुंबातील वडील मंडळीच्या अनमतीने आपल्या दिराकडून पुत्राचे उत्पादन करून घ्यावे असे काही धर्मसूत्रांत सांगितले आहे (बौ. ध. सू. २·२·६६।६८; वसि. ध .सू. १७·५५।५६). विधवेने आमरण पालन करावयाचे जे नियम सामान्यतः बहुतेक सर्व स्मृतींनी सांगितले आहेत त्यांचा उद्देश तिचे आचरण शुद्ध राहावे हाच असे. विधवेने परपुरुषाशी संबंध ठेवू नये, उपास करावे, शारीरिक सुखोपभोग घेऊ नये, देवाची उपासना करावी, सद्‌गुणी लोकांच्या संगतीत राहण्याचा नेहमी प्रयत्न करावा इत्यादी अनेक नियम सांगितले असून अशा रीतीने आमरणान्त राहणाऱ्या विधवेला तिच्या मृत पतीची मालमत्ता तिच्या हयातीपर्यंत उपभोगता येईल आणि ती मरण पावल्यावर पुत्रहीन असली तरी स्वर्गाला जाईल असे सांगितले आहे. (स्वतःच्या विधवा मातेव्यतिरिक्त इतर) विधवा स्त्रीचे दर्शन अशुभसूचक असल्याचे समजत असत आणि म्हणून विधवा स्त्रीला विवाहासारख्या कोणत्याही समारंभात भाग घेता येत नसे (स्कंद पुराण, ब्रह्मारण्य. ७·५०।५१). जरी ती बालवयात विधवा झाली असली तरी तिला पूर्ण ब्रह्मचर्याने आयुष्य घालवावे लागे, इतकेच नाही तर अपुरे अन्न (दिवसातून एक वेळ फक्त) खाऊन आणि अपुऱ्या वस्त्रानिशी संन्याशासारखे वर्तन करावे लागे. प्राचीन काळी पुत्रहीन मरण पावलेल्या पुरुषाच्या विधवेला तिच्या पतीच्या मालमत्तेवर वारसा मिळत नसे. नंतरच्या काळात वारसाहक्काच्या बाबतीत विधवेचा दर्जा सुधारला, परंतु तरी देखील तिला सामान्यतः पतीच्या मिळकतीच्या उत्पन्नाचाच उपभोग घेता येई आणि फक्त तिच्या आणि तिच्या कुटुंबाच्या कायदेशीर जरूरीकरिता अथवा पतीच्या पारलौकिक हिताकरिता अशी मिळकत दुसऱ्या कोणास देता येई. एकत्र कुटुंबातील विधवेला फक्त अन्नवस्त्राचाच हक्क असे आणि जर त्या विधवेने दुर्वर्तन केले आणि तशाच प्रकारचे वर्तन पुढे करीत राहिली तर हक्कही नष्ट होत असे. जर ती पुन्हा सदाचरण करू लागली तर तिला जेमतेम प्राण रक्षणाला अवश्य इतके अन्नवस्त्र मिळण्याचा हक्क प्राप्त होई. अशी स्थिती सन १९३७।३८ पर्यंत चालत होती. त्यानंतर एकत्र हिंदु कुटुंबातील विधवेची आणि जिच्या पतीने स्वतंत्र मिळकत ठेवली आहे अशा विधवेची स्थिती सुधारली आहे.

ब्राह्मणातील आणि इतर काही जातीतील विधवांच्या केसांचे वपन करण्याची रूढी बरीच प्रचारात होती आणि ती रूढी आता प्रचारातून जात चालली असली तरी अद्यापीही ती थोड्या प्रमाणात अस्तित्वात आहे. त्या रूढीला शास्त्राधार आहे किंवा नाही त्याबद्दल मागे बरेच कडाक्याचे वादविवाद होत असत. त्या

वादविवादात पुढे मांडण्यात येत असलेल्या आधारांची आणि कोटिक्रमांची थोडक्यात माहिती पुढे दिली आहे. ही रूढी केव्हा आणि कशी अस्तित्वात आली ह्याविषयी निश्चित निर्णय करता येत नाही.

विधवांच्या केशवपनाच्या रूढीच्या बाजूच्या लोकांचे म्हणणे असे आहे की, ज्याप्रमाणे पित्याच्या मृत्यूच्या वेळी त्याच्या पुत्राचे क्षौर करतात त्याप्रमाणेच पतीच्या मृत्यूच्या वेळी त्याच्या विधवेचे केशवपन केले पाहिजे आणि असे करण्याला वेदातील आणि स्मृतीतील काही वचनांचा आधार आहे. त्या वादातील विरुद्ध पक्षाला हे आधार मान्य नव्हते आणि त्यांच्या मते जरी असे आधार असले तरी ज्याप्रमाणे पित्याच्या मृत्यूच्या वेळी क्षौर करणाऱ्या पुत्राला त्यानंतर वेळोवेळी क्षौर करावे लागत नाही त्याप्रमाणे विधवांनाही आपल्या आयुष्याच्या अंतापर्यंत वरचेवर केसांचे वपन करण्याची आवश्यकता नाही. ह्या वादात मांडण्यात येणाऱ्या वचनांची चिकित्सा केल्यास त्यावरून पुढीलप्रमाणे निर्णय निघतात.

विधवांच्या केशवपनाला वेदांचा आधार नाही आणि गृह्य आणि धर्मसूत्रात तसेच मनु याज्ञ. यांच्यासारख्या महत्त्वाच्या स्मृतींत देखील अशा वपनाचा निर्देश केलेला नाही. ज्यांचा अर्थ संशयित आहे अशा एक दोन स्मृतिवचनात

[विधवाकबरी बन्धो भर्तृबन्धाय जायते ।
शिरसो वपनं तस्मात् कार्यं विधवया सदा ॥ (स्कंद पुराण, काशी खण्ड).
मृतं भर्तारमादाय ब्राह्मणी वह्निमाविशेत् ।
जीवन्ती चेत् त्यक्तकेशा तपसा शोषयेद् वपुः ॥ वेदव्यास २·५३] (वेद व्यासस्मृ. २·५३; स्कन्दपुराण) अशा वपनाचा निर्देश केला असला तरी वृद्धहारीतासारख्या (११·२०५।२१०) दुसऱ्या काही स्मृती ह्या गोष्टीच्या विरुद्ध मताच्या आहेत. विधवांनी वारंवार वपन करावे असे स्पष्टपणे एकाही स्मृतिवचनात सांगितलेले नाही. मिताक्षरा आणि अपरार्क ह्यांनी ह्याविषयी काही सांगितलेले नाही. इ.स.च्या १४ व्या शतकात झालेल्या मदनपारिजात ह्या निबंधग्रंथात स्कंद पुराणातील ('विधवा कबरी बंधो॰' ह्या) श्लोकाचा उल्लेख आला आहे त्यावरून ही रूढी त्या काळाच्या पूर्वी निदान काही शतके प्रचारात आली असावी. पुष्कळशा नियमांत विधवांना यती (संन्याशी) सारख्या मानीत आणि यती आपल्या केसांचे मुंडण करीत त्यावरून विधवांनीही वपन केले पाहिजे असे क्रमाक्रमाने धरले गेले. त्यांना कुरूप करण्यात त्या सदाचरणी राहाव्या असाही हेतु असावा. बुद्धधर्मातील आणि जैन धर्मातील भिक्षुणींवरूनही ही क्रूर रूढी सुचली असावी. ह्या रूढीचे ताबडतोब निर्मूलन होणे अगत्याचे आहे.

स्त्रियांना असणाऱ्या काही हक्कांचा येथे उल्लेख करू. कोणत्याही कारणाकरिता स्त्रियांचा वध करू नये अशी शत.[स्त्री वैषा यच्छ्रीर्न वै स्त्रियं घ्नन्युत त्वस्या जीवन्त्या एवाददत इति । श. ब्रा. ११·४·३·२] ब्रा. सारख्या (११·४·३२) फार प्राचीन काळापासून कल्पना असे. काही अतिशय गर्ह्य अपराधाबद्दल एकाद्या स्त्रीला देहान्ताची शिक्षा देण्याचा फक्त राजालाच अधिकार असे आणि राजाला देखील अशी शिक्षा दिल्यास लागणाऱ्या दोषाकरिता बारीकसे प्रायश्चित्त करावे लागे. (मनु. ८·३७१ याज्ञ ३·२६८).

स्त्रियांकडून लिहून घेतलेले दस्तऐवज अथवा दान, विक्री, गहाण ह्यांच्यासारखे व्यवहार बळजबरीने अथवा फसवून केलेल्या व्यवहारांप्रमाणे पोकळ स्वरूपाचे ठरविता येतात, (नारद-ऋणादान २६·३७१; याज्ञ २·३१); स्त्रियांमध्ये असलेल्या अशिक्षितपणामुळे हा नियम त्यांची नालायकी दाखविणारा न होता त्यांच्या फायद्याचाच होता.

अनुक्रमणिका

रस्त्यावरून जाताना स्त्रियांना इतरांपेक्षा पुढे चालण्याचा अधिकार असे. (गौ. ६·२१।२२; आप. ध. सू. २·५·११· ५।९). कर्मलोपाबद्दल स्त्रियांना करावे लागणारे प्रायश्चित्त पुरुषांच्या निम्मे असते. (विष्णु ध. सू. ५४·३३; देवल ३०).

स्त्रियांचे वय केवढेही असले तरी त्यांना पतीच्या वयानुसार मान मिळतो. (आप. ध. सू. १·४·१४·१८) प्रतिलोम जातीव्यतिरिक्त सर्व वर्णाच्या स्त्रियांना कर द्यावे लागत नाहीत; (आप ध .सू. २·१०·२६·१०।११). नदीवरील तरीचे भाडे द्यावे लागत नाही (मनु. ८·४०७; विष्णु ५·१३२); स्त्रीधनावरील वारसाच्या बाबतीत मुलांपेक्षा मुलींना अधिक अधिकार असे (याज्ञ. २.२५; नारद-ऋणादान ८२।८३); आजारांच्या आणि रूढींच्या बाबतीत नेहमी स्त्रियांचा सल्ला घेतला पाहिजे (आप. ध. सू. २·११·२९·१५; आप. गृ. २·१५). एकाद्या वादात स्त्री वादी असली तर तिला आपले म्हणणे सिद्ध करण्याकरिता दिव्य करावे लागत नसे आणि लागलेच तर फक्त तुलेचेच दिव्य तिने करावे (याज्ञ. २·९८ व त्यावरील मिताक्षरा).

**पडद्याची रूढी**- सांप्रत काळी मुसलमान लोकात आणि काही प्रांतांतील हिंदुमध्येदेखील प्रचलित असलेल्या पडद्याच्या रूढीबद्दल थोडेसे विवेचन करू.

विवाहविधीतील वैदिक मंत्रांवरून (ऋ. १०·८५-३३;) असे दिसते की विवाहाच्या वेळी वधू पडद्यात राहत नसे आणि समाजात पडद्याशिवाय वावरत असे. वडील मनुष्यांच्या समोर असताना तरुण स्त्रियांना काही निर्बंध असत. तथापि समाजात वावरताना स्त्रिया अवगुंठन घेत असल्याचा गृह्य आणि धर्मसूत्रांत मुळीच उल्लेख केलेला नाही. राजघराण्यातील स्त्रिया सामान्यतः राजवाड्याच्या आवाराबाहेर जात नसत आणि सामान्य लोकांच्या दृष्टीस पडत नसत (अयोध्याकाण्ड ३३·८). परंतु अडचणींच्या वेळी, युद्धात, विवाहाच्या वेळी जर त्या लोकांच्या दृष्टीस पडल्या तर त्यात त्यांना दोष

[व्यसनेषु न कृच्छ्रेषु न युद्धेषु स्वयंवरे ।

न क्रतौ नो विवाहे वा दर्शनं दूष्यते स्त्रियः ॥ (युद्धकाण्ड ११६·२८)] लागत नसे (युद्धकाण्ड ११६·२८). सर्वसाधारण लोकांच्या स्त्रिया कोणत्याही प्रकारचे अवगुंठन वापरीत नसत. बुरखा घेणे ही गोष्ट पूर्वीच्या काळी भारतात अगदीच अज्ञात नसली तरी मुसलमानांचा येथे प्रवेश झाल्यानंतर उत्तर आणि पूर्व भारतात पडद्याची चाल हिंदु स्त्रियात सर्रास अंमलात आली असावी. बुद्धधर्मातील ग्रंथांतही पडद्याच्या चालीचा निर्देश आढळतो.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ३७

# नियोग

(मू. ग्रं. पा. २.५९९-६०७)

नियोग म्हणजे एकाद्याच्या पत्नीची अथवा विधवा स्त्रीची नियोजित पुरुषाबरोबर त्याने तिच्याशी संभोग करून पुत्राचे उत्पादन करण्याकरिता केलेली नियुक्ती अथवा नेमणूक. ह्या प्रघाताच्या उत्पत्तीविषयी आणि उद्देशाविषयी बरीच मतभिन्नता अस्तित्वात आहे. अत्यंत प्राचीन असलेल्या स्मृतींपैकी गौतम स्मृतीने (१८.४।१४) ह्या प्रघाताला संमती दिली आहे आणि त्यासंबंधी तपशीलाचे नियम सांगितले आहेत. गौतमधर्मसूत्राइतक्याच प्राचीन असलेल्या दुसऱ्या काही धर्मसूत्रांनी आणि ग्रंथकारांनी ह्या प्रघाताबद्दल नापसंती दर्शवून त्याचा निषेध केला आहे (आप. ध. सू. २·१०·२७·५।७; बौ. ध. सू. २·२·३८; मनु. ९·६४।६८). मनूने. प्रथम नियोगाचे वर्णन करून मागाहून त्या रूढीचा निषेध केला आहे. धर्मसूत्रांमध्ये आणि स्मृतींमध्ये नियोगाविषयी घोटाळ्याचे आणि कित्येक वेळा परस्परविरोधी असे नियम दिले असल्यामुळे असे दिसते की त्यांच्याकाळी देखील तो प्रघात फारसा प्रचारात नसावा आणि तशी उदाहरणे फारच विरळा सापडत असावी (याज्ञ. २·२३४; नारद-स्त्रीपुंस ८४।८५; मनु. ९·५८·६३). नियोग करू देण्याला पुढील अटींची आवश्यकता असे:- (१) जिवंत असलेल्या अथवा मृत असलेल्या पतीला एकही पुत्र नसला पाहिजे; (२) कुटुंबातील वडील मंडळींनी एकत्र जमून अशा पतीकरिता अपत्य प्राप्त करून घेण्याकरिता त्याच्या विधवेची योजना करण्याचे निश्चित केले असले पाहिजे; (३) अशा प्रकारे नियुक्त केलेला पुरुष त्या विधवेच्या मृतपतीचा बंधु अथवा सपिंड अथवा सगोत्र असावा अथवा (गौतमाच्या मताप्रमाणे सप्रवर अथवा सजातीय असावा); (४) नियुक्त केलेला पुरुष आणि ती विधवा ह्यांच्या ठिकाणी विषयवासना नसावी आणि केवळ कर्तव्य बुद्धी असावी; (५) नियुक्त केलेल्या पुरुषाच्या शरीराला तूप अथवा तेल लावले पाहिजे; त्याने त्या विधवेबरोबर संभाषण करता कामा नये अथवा तिचे चुंबन घेण्यासारख्या शृंगारचेष्टा करता कामा नये; (६) त्या दोघांचा अशा प्रकारचा संबंध एक पुत्राची (अथवा काहींच्या मते दोन पुत्रांची) उत्पत्ती होईपर्यंत चालावा; (७) ती विधवा तुलनेने तरुण असावी वृद्ध अथवा वंध्या नसावी, तिचे अपत्य होण्याचे वय निघून गेलेले नसावे अथवा ती रोगग्रस्त अथवा नाखूष नसावी, अथवा गरोदर नसावी; (८) एक पुत्र जन्मल्यानंतर त्या परस्परांचे श्वशुर आणि सून असे नाते मानावे. ह्या अटी पूर्ण होत नसतील तर त्या स्त्री-पुरुषांचा संबंध अनैतिक स्वरूपाचा होतो आणि राजाने त्यांना तीव्र शासन केले पाहिजे असे निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहे. अशा संबंधापासून झालेला पुत्र अनैतिक व्यवहारापासून झालेल्या पुत्रासारखा होईल. त्याला कोणत्याही संपत्तीचा वारसा मिळणार नाही आणि तो पुत्र त्याला उत्पन्न करणाऱ्याचा होईल.

महाभारतात नियोगाची पुष्कळ उदाहरणे आहेत. सत्यवतीने भीष्माला त्याचा कनिष्ठ बंधु विचित्रवीर्य मृत झाल्यावर त्याच्या विधवा राण्यांच्या ठिकाणी पुत्रांचे उत्पादन करण्याचा आग्रह केला आणि भीष्माने ते म्हणणे नाकबूल केल्यावर सत्यवतीने तिचा पुत्र जो व्यास त्याची ह्या कामाकरिता योजना केली होती. पंडूने श्रेष्ठ तपाचरणाच्या एकाद्या ब्राह्मणाकडून नियोगपद्धतीने आपल्या करिता पुत्रांची उत्पत्ती करून घे असे कुंतीला सांगितले होते. जेव्हा परशुरामाने क्षत्रियांचा निःपात करण्याचा प्रयत्न केला तेव्हा

हजारो क्षत्रिय विधवांनी पुत्रोत्पादनाकरिता ब्राह्मणांना विनंती केली होती अशा कथा महाभारतात वर्णन केल्या आहेत. आणि आणखीही नियोगाची दुसरी उदाहरणे दिली आहेत.

मनूने (९·६४—६८) म्हटले आहे की नियोगाची रूढी पशुतुल्य वर्तनाची असून तिचा उपक्रम पहिल्याने वेन राजाने केला होता आणि तसे करून त्याने वर्णसंकर केला; त्या वेळेपासून जो कोणी अपत्य उत्पन्न करण्याकरिता एकाद्या विधवेची योजना करतो त्याची चांगले लोक निंदा करतात. मनूने आणखी असे सांगितले आहे की नियोगाबद्दलचे नियम आणि त्यासंबंधी प्राचीन शास्त्रवचने फक्त पुढील प्रसंगाला लागू पडतात. तो प्रसंग म्हणजे एकादी मुलगी एकाद्या वराला देण्याचे वचन दिल्यानंतर जर तो नियोजित वर मृत्यू पावला तर त्या नियोजित वराच्या भावाला त्या मुलीबरोबर तिला एक पुत्र होईपर्यंत प्रत्येक मासिक रजोदर्शनानंतर फक्त एक वेळा संभोग करण्यास सांगतात आणि अशा रीतीने झालेला पुत्र हा त्या मृत पुरुषाचा होतो. अशा पुत्राला 'क्षेत्रज' अशी संज्ञा आहे.

नियोगाचा प्रघात कसा उत्पन्न झाला ह्याबद्दल निरनिराळी मते प्रतिपादन करण्यात येतात. काही पाश्चिमात्य विद्वानांनी (मॅक्लेनानसारखे) असा तर्क केला आहे की बहुपत्नित्वाच्या चालीमुळे नियोगाची रूढी अस्तित्वात आली असावी; कोणी (जॉलीसारखे) तिच्या मुळाशी आर्थिक कारण असावे असे म्हटले आहे; दारिद्र्य, स्त्रियांची कमतरता आणि एकत्र कुटुंब पद्धती ही ह्या रूढीची कारणे असल्याचे कोणी (विंटरनित्झ सारखे) प्रतिपादन केले आहे. परंतु ह्यापैकी कोणतेही कारण सयुक्तिक दिसत नाही. एवढेच म्हणता येईल की नियोगाची रूढी हा प्राचीन काळचा एक अवशेष होता, ती रूढी दिवसेंदिवस कमी होत गेली आणि इ.स. च्या आरंभीच्या शतकात तिला कलिवर्ज्य मानून पूर्ण प्रतिबंध घालण्यात आला. नियोगाच्या रूढीची कारणे बहुधा अनेक असतील आणि ती आता आपल्यास अज्ञात झाली असतील, परंतु त्यांपैकी एक कारण पुत्राविषयी उत्कंठा हे होते.

—————

अनुक्रमणिका

# प्रकरण ३८

## विधवांचा पुनर्विवाह

(मू. ग्रं. पा. २.६०८-६२३).

पुनर्भू ही संज्ञा सामान्यतः ज्या विधवेने पुन्हा विवाह केला असेल तिला लावतात. पुनर्भू स्त्रियांचे पुढीलप्रमाणे तीन प्रकार असल्याचे नारदाने म्हटले आहे.:- (१) जिचे पाणिग्रहण झालेले असते परंतु विवाहविधी (पतिसंयोगाने) पुरा झालेला नसतो अशी कुमारिका; हिच्याबाबत विवाहविधी पुन्हा एकदा करावा लागतो; (२) आपल्या पूर्ववयातील पतीचा त्याग करून जी स्त्री दुसऱ्या एकाद्या पुरुषाचा स्वीकार करते आणि नंतर पुन्हा आपल्या पहिल्या पतीच्या घरी राहण्यास येते ती; (३) (पतीच्या मृत्यूनंतर) ज्या स्त्रीला तिच्या पतीच्या नातलगांनी दिराच्या अभावी तिच्या पतीच्या एकाद्या सपिंडाच्या अथवा सजातीच्या एकाद्या पुरुषाच्या स्वाधीन केलेली असते अशी स्त्री (हा नियोग होय आणि अशा प्रकारात कोणताही विधी करावा लागत नाही). दुसऱ्याही काही ग्रंथकारांनी पुनर्भू स्त्रीचे निरनिराळे प्रकार वर्णन केले आहेत आणि त्यांपैकी बहुतेक प्रकारांत विवाहविधी कमी अधिक प्रमाणात पुरा झाल्यावर पती मृत झाल्या असल्याचे अथवा त्या विधींच्या पुढचे विधी वराने केले नसल्याचे गृहीत धरले आहे. काही प्रकारांत ज्या मुलीने विवाहापूर्वी अथवा विवाहानंतर पुरुषसंभोग केलेला असतो, अथवा गर्भधारणा झालेली असते अथवा अपत्य झालेले असते. वैदिक काळात एकाद्या मुलीला विवाहात देण्याचे वचन दिले असले आणि कोणतेही विधी झालेले नसले तरी देखील त्या मुलीचा विवाह झाल्यासारखाच धरले जात असे. वसिष्ठधर्मसूत्रात (१७·१९।२०) पौनर्भव ह्या शब्दाची व्याख्या अशी सांगितली आहे की ज्या स्त्रीने आपल्या पूर्ववयातील पतीचा त्याग केल्यानंतर दुसऱ्या पुरुषाबरोबर वास्तव्य केले असेल आणि नंतर जिने पुन्हा आपल्या पतीच्या घरात प्रवेश केला असेल अशा स्त्रीचा जो पुत्र पौनर्भव होय; अथवा पहिला पती मृत झाल्यानंतर जी स्त्री दुसरा पती वरते अशा स्त्रीचा जो पुत्र तो पौनर्भव. बौधायनधर्मसूत्रात (२·२·३१) म्हटले आहे की क्लीब अथवा बहिष्कृत अशा पतीचा त्याग करून जी स्त्री दुसरा पती वरते, अशा स्त्रीचा पुत्र तो पौनर्भव होय. पती नष्ट (बेपत्ता) झाला, मृत झाला, संन्याशी झाला, क्लीब अथवा पतित (बहिष्कृत) असला तर अशा पाच संकटांत स्त्रियांना दुसरा पती करण्यास शास्त्राची संमती आहे अशा अर्थाचा एकच

[नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ ।

पञ्चस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥ (नारद. स्त्रीपुंस. ९७).] श्लोक निरनिराळ्या ग्रंथांत दिला असून त्याच्या अर्थासंबंधी मोठमोठे वादविवाद झाले आहेत. कोणी कोणी हा श्लोक अन्य युगातील समाजाला अनुलक्षून सांगितला असून तो कलियुगाला लागू पडत नाही असे प्रतिपादन केले आहे (परा. माध. २·१ पा. ५३). कोणी पती ह्याचा अर्थ (मनु. ५·१५७ वरील मेधातिथी) पालक असा होतो असे म्हटले आहे. मनूने (५·१६२) म्हटले आहे की साध्वी स्त्रियांना दुसरा पती असतो असे शास्त्रात कोठेही म्हटलेले नाही. विवाहविधीत विधवांच्या पुनर्विवाहासंबंधी एकही वाक्य दिलेले नाही (मनु. ९·६५). पाणिग्रहणाच्या वेळचे वैदिक मंत्र फक्त कुमारिकांनाच लागू पडतात (मनु ८·२२६). ब्रह्म आदि पुराणांत (अपरार्क पा. ९७) विधवांचा पुनर्विवाह कलियुगात वर्ज्य सांगितला आहे. काही प्रसंगी एकाद्या मुलीचा विवाहसंस्कार पुनः करण्यास मनूने (९·१७६) संमती दर्शविली असली तरी मनूला पुनर्विवाह मान्य नव्हता आणि एकाद्या विधवेच्या पुनर्विवाह त मंत्रांचा उच्चार केला असला तरी तेवढ्याने तो विवाह धर्मसंमत होत नाही असे त्याचे मत असावे असे दिसते. अपरार्काने (पा. ९७) उद्धृत केलेल्या ब्रह्मपुराणातील

[यदि सा बालविधवा बलात्त्यक्ताथवा क्वचित् ।

अनुक्रमणिका

तदा भूयस्तु संस्कार्या गृहिता येन केनचित् ॥

ब्रह्मपुराण (अपरार्क पा. ९७).] एका वचनात म्हटले आहे की एकादी बालविधवा असल्यास तिचा विवाहसंस्कार पुन्हा करावा आणि ज्या मुलीचा कोणी बलात्काराने त्याग केला असेल अथवा तिला हरण करून नेली असेल अशा मुलीचा विवाहसंस्कार पुन्हा करावा.

विवाह झाल्यानंतर जिचा पती अनेक वर्षे परदेशी गेला असेल अशा पत्नीने काय करावे ह्याविषयीचे काही नियम स्मृतींत (नारद-स्त्रीपुंस ९८।१०१; मनु ९·७६) सांगितले आहेत. सामान्यतः अशा स्त्रीने काही विवक्षित काळपर्यंत वाट पहावी आणि त्या अवधीनंतर अन्य पुरुषाचा आश्रय करावा अशा स्वरूपाचे हे नियम आहेत. किती काळापर्यंत वाट पहावी हे वर्णानुसार आणि त्या स्त्रीला अपत्य झालेले आहे किंवा नाही अशा परिस्थितीनुसार ठरविले आहे. अशाअवधीनंतर त्या स्त्रीने काय करावे हे मनूने सांगितले नाही. आपला पती जिकडे गेला आहे तिकडे त्याच्याकडे तिने जावे असे वसिष्ठाने (१७·७५।७६) म्हटले आहे. परंतु पतीची काहीच बातमी लागत नसली तर तिने त्याच्याकडे कसे पोचावे ह्याचा खुलासा त्याने केला नाही. कौटिल्याने (३·४) अशा स्त्रीने आपल्या पतीच्या सख्या भावाबरोबर विवाह करावा असे सांगून त्यासंबंधी तपशीलाचे नियम दिले आहेत.

विधवेचा पुनर्विवाह करावयाच्या वेळी तिचे गोत्र कोणते धरावे ह्याबद्दल प्राचीन स्मृतींत अथवा टीकाग्रंथांत काहीही सांगितले नाही. विद्यासागर ह्यांचे मत विधवेच्या पुनर्विवाहात तिच्या बापाच्या गोत्राचा विचार करावा असे होते.

विधवांच्या पुनर्विवाहाच्या बाबतीत अथर्ववेदातील काही वचने (५·१७·८।९; ९·५·२७।२८) विचार करण्यासारखी आहेत. त्या वचनांत पुनर्भू हा शब्द आला आहे आणि त्याच्या अर्थाविषयी भिन्न मते असली तरी त्यांवरून असे दिसते की अथर्ववेदाच्या काळी स्त्रियांना पुनर्विवाहाला प्रतिबंध नव्हता. गृह्यसूत्रांत पुनर्विवाहाबद्दल काहीही सांगितलेले नाही. ह्यावरून सूत्रांच्या काळी पुनर्विवाहाचे प्रकार तुरळक होत असले तरी त्याला सर्वसाधारण बंदी घालण्यात आली असावी. ब्राह्मण आणि तत्सम जातीत विधवांच्या विवाहाला अनेक शतके बंदी घातलेली आहे. शूद्रात आणि इतर खालच्या दर्जाच्या जातीत विधवांचा पुनर्विवाह रूढीने मान्य समजला जात असला तरी तो कुमारिकेच्या विवाहापेक्षा हलक्या दर्जाचा समजला जातो. त्या जातीत पहिल्या नवऱ्याच्या मृत्यूनंतर पुनर्विवाह करता येतो अथवा नवऱ्याच्या हयातीतही त्याच्या संमतीने त्याने सोडचिठी लिहून दिल्यावर पुनर्विवाह करता येतो. अशा विवाहाला मराठीमध्ये **'पाट'** म्हणतात; गुजरातीत **नत्र** आणि कानडीमध्ये **उडकी** म्हणतात. मुख्यत्वेकरून पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांच्या प्रयत्नाने सन १८५६ मध्ये पास झालेल्या हिंदु विधवांच्या कायद्याने असे पुनर्विवाह कायदेशीर मानण्यात आले आहेत. तथापि शेकडो वर्षे चालत आलेल्या लोकमतामुळे विधवांचा पुनर्विवाह हा अद्यापिही गौण मानला जातो आणि वर उल्लेख केलेल्या कायद्याचा फारशा विधवांनी फायदा घेतलेला नाही. सन १९३१ च्या खानेसुमारीवरून असे आढळून येते की भारतात १ वर्षांच्या आतील वयाचे ७९६ विधुर आणि १५१५ विधवा होत्या; ५ ते १० वर्षांच्या दरम्यानच्या वयाच्या हिंदु विधवांची संख्या ८३,९२० होती. आर्थिक परिस्थितीमुळे, सामान्य लोकांत शिक्षणाचा प्रसार झाल्यामुळे आणि इ.स. १९२९ च्या बालविवाह प्रतिबंधक कायद्यामुळे मुलीच्या लग्नाचे वय झपाट्याने वाढत आहे आणि अशी आशा करण्यास जागा आहे की बालविधवांची संख्या नजीकच्या भविष्यकाळात बरीच कमी होईल. परंतु हिंदु समाजात पाश्चिमात्य देशातल्याप्रमाणे वृद्ध कुमारिकांची समस्या उत्पन्न होईल अशी चिन्हे दिसू लागली आहेत. विवाहाचा प्रश्न हल्लीच मोठा बिकट झाला आहे आणि विवाहेच्छु कुमारिकांची त्यात गर्दी झालेली आहे. तेव्हा अशा स्थितीत कुमारिकांच्या बरोबर विधवांना विवाहाच्या कामात स्पर्धा करू देऊ नये असे पुष्कळ हिंदूंना वाटते.

**अनुक्रमणिका**

ऋग्वेदातील
[इमा नारीरविधवाः सुपत्नीराञ्जन्यनेन सर्पिषा संविशन्तु।
अनश्रवोऽनमीवाः सुरत्ना आरोहन्तु जनयो योनिमग्रे॥
उदीर्ष्व नार्यभिजीवलोकं गतासुमेतमुप शेष एहि।
हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभि सं बभूथ॥
ऋ १०—१८-७।८.
'इमा नारी' ही ऋचा थोड्या भेदाने—अथर्ववेद १२·२·३१ आणि १८·३·५७ मध्ये आली आहे.] (१०·१८·७।८) आणि अथर्ववेदातील काही वचनांते भिन्न (अधर्व. १२·२·३१; १८·३·५७; १८·३·२) भिन्न अर्थ करण्यात आले आहेत आणि त्यामुळे ती वचने नियोगाविषयी आहेत अथवा विधवांच्या पुनर्विवाहाविषयी आहेत अथवा त्यात विधवांचे बलिदान करण्याच्या (म्हणजे सतीच्या) रूढीचा उल्लेख आहे ह्याविषयी मतवैचित्र्य उत्पन्न झाले आहे. प्राचीन काळी मृताची पत्नी स्मशानात पतीच्या प्रेताच्या शेजारी निजे आणि नंतर तिला उठण्यास सांगत आणि तिला म्हणत की मृत्यूच्या द्वारापर्यंत पतीच्या मागोमाग जाऊन अपेक्षित असे तुझे कर्तव्य तू पुरे केलेस, आता परत फिर. अतिशय प्राचीन काळी पत्नी आपणास पतीबरोबर जाळून घेत असे. तो प्रघात ऋग्वेदाच्या काळी पूर्णपणे नामशेष झाला होता परंतु त्याचे वर सांगितल्याप्रमाणे प्रतीकात्मक अनुकरण करण्याची त्यावेळी चाल असे. ऋग्वेदातील त्या ऋचांवरून फार तर एवढेच अनुमान काढता येईल की जिचा पती मृत झाला आहे अशा स्त्रीला एक तर आपल्या मृत पतीच्या भावाबरोबर विवाह करावा लागे अथवा पती अपत्यरहित मृत झाला असल्यास नियोगाचे अवलंबन करावे लागे आणि ह्या दोन अनुमानांपैकी दुसरे अनुमान अधिक संभवनीय आहे. सतीच्या रूढीचा पुढे एका स्वतंत्र प्रकरणात विचार करण्यात येईल.

**घटस्फोट**:- विधवांच्या पुनर्विवाहाला अनुलक्षून आहेत असे ज्या वचनांबद्दल म्हणता येईल अशी निदान थोडी तरी वचने वैदिक वाङ्मयात आहेत आणि त्या वाङ्मयात 'पुनर्भु' हा शब्दही आढळतो. परंतु वैदिक ग्रंथांत घटस्फोटाचा मुळीच उल्लेख आलेला नाही आणि वेदांच्या मागाहून झालेल्या वाङ्मयातही त्याचा उल्लेख केलेला आढळत नाही. धर्मशास्त्रकारांचे मत असे आहे की होम आणि सप्तपदी होऊन विवाह पुरा झाला म्हणजे मग तो रद्द करता येत नाही; विवाह हा एक संस्कार आहे आणि जरी पती अथवा पत्नी पतित झाली तरी त्यामुळे एकवार झालेला संस्कार रद्द होत नाही; जरी एकाद्या पत्नीने व्यभिचार केला तरीही ती पत्नीच राहते आणि तिने त्या अपराधाबद्दल प्रायश्चित्त घेतले म्हणजे तिला विवाहसंस्कार पुन्हा करावा लागत नाही. काही ग्रंथकारांच्या (नारद, पारस्कर इ०) मताप्रमाणे काही विशिष्ट परिस्थितीत पत्नीला पुनर्विवाह करता येत असे तरी निबंधग्रंथकार आणि टीकाकार तो नियम पूर्वयुगाला लागत असे असे समजत. खालच्या दर्जाच्या जातींत रूढीप्रमाणे घटस्फोटाला मान्यता दिली असली तरी धर्मशास्त्रांना आणि हिंदु समाजाला सुमारे दोन हजार वर्षे तरी घटस्फोट हा शब्द विवाहबंधनापासून मुक्तता ह्या सर्वसाधारण अर्थाने माहित नव्हता. पत्नीला कोणत्याही कारणास्तव पतीचा सर्वस्वी त्याग करता येत नसे आणि पत्नीच्या चुकीकरता तिचा त्याग करण्याची पतीला जरी मोकळिक दिली होती तरी बहुतेक सर्व प्रसंगी तिला पतीकडून निदान कमीत कमी अन्नाच्छादन मिळण्याचा अधिकार असे. आधुनिक काळातील भारतातील न्यायालयांनी असे ठरविले आहे की एकाद्या हिंदु पतीने अथवा पत्नीने आपला धर्म बदलला अथवा तो किंवा ती धर्मभ्रष्ट झाली अथवा दोघे विभक्त राहत असली अथवा कोणी व्यभिचार केला असला तरी तेवढ्या कारणाने हिंदु विवाह रद्द होत नाही. ख्रिस्ती धर्माचा स्वीकार दोघांपैकी कोणी केला तर त्याबद्दल काही विशिष्ट योजना कायद्याने केली आहे आणि विशिष्ट प्रकारचा विवाह करणाऱ्यांना घटस्फोट करता येतो. दुसऱ्याही काही परिस्थितीत घटस्फोटाला परवानगी दिली आहे. कौटिल्याने (३·३) घटस्फोटासंबंधी असे म्हटले आहे की धर्मशास्त्राला अनुसरून केलेले (म्हणजे ब्राह्म, प्राजापत्य, आर्ष आणि दैव ह्या चार प्रकारचे) विवाह रद्द करता येत नाहीत. परंतु इतर चार प्रकाराने झालेल्या विवाहाचे बंधन दोघेही परस्परांचा द्वेष करीत असतील तर दोघांच्या संमतीने तोडता येईल. कोणत्याही प्रकाराने विवाह

झालेला असला तरी जर दोघांपैकी एकाला एकट्याच्या इच्छेप्रमाणे विवाहबंधनापासून मुक्त होता येत नाही असे जरी त्याचे मत असले तरी जर पती अथवा पत्नी यांना दुसऱ्यापासून शारीरिक अपाय होईल अशी भीती वाटत असली तर त्यांना एकट्याच्या इच्छेप्रमाणे देखील मुक्तता मिळू शकेल.

------

अनुक्रमणिका

# प्रकरण ३९

## सती (विधवांनी आपल्या स्वतःचे केलेले बलिदान)

(मू. ग्रं.पा. २-६२४-६३६)

इ.स. १८२९पासून ब्रिटिश हिंदुस्थानात विधवांनी आपले बलिदान करण्याला कायद्याने प्रतिबंध करण्यात आला आणि तसे करणे हा गुन्हा ठरविण्यात आला. ह्यामुळे ह्या विषयाचे विवेचन आता फक्त तात्त्विक चर्चात्मक महत्वाचे राहिले आहे.सन १८२९मध्ये ब्रिटिश हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल लॉर्ड विल्यम बेंटिंग ह्याने पास केलेल्या कायद्यात (रेग्युलेशन १७ सन१८२९) असे म्हटले आहे की 'हिंदु विधवांनी सती जाण्याची अथवा आपल्या स्वतःला जिवंतपणी जाळून किंवा पुरून घेण्याची चाल ही मनुष्यस्वभावाला किळस उत्पन्न करणारी असून असा प्रकार करणे हे अवश्य कर्तव्य असल्याचे हिंदूंच्या धर्मात कोठेही सांगितलेले नाही; उलटपक्षी विधवांनी पवित्राचरणाने आणि संन्यस्त वृत्तीने राहावे असे विशेषेकरून त्यांच्या मनावर बिंबविण्यात येते. . . . असा दुर्लौकिक आहे की पुष्कळ प्रसंगी भयंकर आणि बेकायदेशीर व दुष्ट प्रकार करण्यात येतात.''

विधवांनी आपणास जाळून घेण्याची चाल केवळ भारतातच होती असे नसून प्राचीन ग्रीक, जर्मन, स्लाव आणि इतर समाजात प्रचलित होती परंतु ती चाल सामान्यतः वरच्या दर्जाच्या लोकात, राजे आणि सरदार ह्यांच्यातच पाळण्यात येत असे. वेदांच्या काळी ही चाल प्रचलित होती असे निर्विवादपणे सिद्ध करण्याला आधार सापडत नाही. प्राचीन गृह्यसूत्रांत ह्या विधीचे काहीही वर्णन केलेले नाही. ह्यावरून ही चाल भारतातील ब्राह्मणांच्या वर्चस्वाखाली वागणाऱ्या समाजात बहुधा ख्रिस्तपूर्व काही थोडी शतके निघाली असावी. विष्णु ध.सू.व्यतिरिक्त कोणत्याही धर्मसूत्रांत सतीचा मुळीच उल्लेख केलेला नाही. विष्णु धर्म सूत्रात (२५·१४) म्हटले आहे की 'पती मरण पावला असता त्याच्या विधवेने ब्रह्मचर्य व्रताने राहावे अथवा पतीच्या मागोमाग त्याच्या चितेवर आरोहण करावे.' महाभारतात (आदि.९५·६५; मौसल ७·१८; ७·७३।७४). विधवांच्या दहनासंबंधी काही थोडे उल्लेख आले आहेत. पंडु राजाची पत्नी माद्री, वसुदेवाच्या आणि कृष्णाच्या राण्यांपैकी काही थोड्या राण्या ह्या आपल्या पतीबरोबर सती गेल्याचे त्या ग्रंथात सांगितले असले तरी भारतीय यद्धात पतन पावलेल्या वीरांच्या विधवांपैकी एकीनेही आपल्यास जाळून घेतल्याचा त्या ग्रंथात उल्लेख आलेला नाही. ह्यावरून असे दिसून यते की ही सतीची चाल भारतात देखील आरंभी फक्त राजघराण्यात आणि मोठ्या योध्यांतच प्रचलित होती आणि अशी उदाहरणे अगदी थोडी असत. पैठीनसि प्रभृती अनेक स्मृतींनी (अपरार्क पा. ११२) ब्राह्मणविधवांनी आत्मबलिदान करण्यास स्पष्टपणे बंदी केली आहे. निबंधग्रंथकारांनी अशा वचनांचा असा खुलासा केला आहे की ब्राह्मण विधवेने पतीच्या चितेहून भिन्न असणाऱ्या चितेत सती जाण्यालाच फक्त प्रतिबंध केला आहे (अपरार्क पा.११२). ह्यावरून असे दिसते की ब्राह्मण विधवांनी सती जाण्याची चाल क्षत्रिय विधवांच्या नंतर पुष्कळ काळाने प्रचारात आली असावी. रामायणात (उत्तरकाण्ड १७·१५) एका ब्राह्मणस्त्रीने आपणास अग्नीत जाळून घेतल्याचे वर्णन केले आहे. वेदव्यासस्मृतीत (२·५३) ब्राह्मण स्त्रीने पतीच्या मृत देहाला आलिंगन देऊन अग्नीत प्रवेश करावा असे सांगून पुढे म्हटले आहे की जर ती पतीच्या पश्चात जिवंत राहिली तर तिने केसांचा शृंगार करण्याचे सोडून देऊन तपश्चर्येने आपला देह कृश करावा.

जेव्हा एकादी विधवा पतीच्या चितेवर चढून त्याच्या प्रेताबरोबर जळून जाते तेव्हा त्या कृत्याला **सहमरण** अथवा **सहगमन** अथवा **अन्वारोहण** असे म्हणतात; जेव्हा पतीचे अन्य ठिकाणी दहन केलेले असते आणि त्याची विधवा पतीच्या अस्थीं बरोबर अथवा पादुकांबरोबर अथवा दुसरे काही स्मारक नसेल तर नुसतीच जाळून घेते त्या क्रियेला **अनुमरण** म्हणतात.

निरनिराळ्या शिलालेखांत मध्ययुगीन कालात सती गेलेल्या अनेक स्त्रियांचे उल्लेख आहेत. ऐतिहासिक काळातील अगदी अलिकडील सतीचे उदाहरण सन १७७२ मध्ये पहिले माधवराव पेशवे ह्यांची पत्नी रमाबाई हिचे आहे. विजयी झालेल्या मुसलमानांच्या हातून होणाऱ्या अत्याचारापासून आपले रक्षण करण्याकरिता चितोड आणि इतर ठिकाणी रजपूत स्त्रियांनी केलेले जौहार सुप्रसिद्धच आहेत. धन्यावरील स्वामीभक्तीमुळे आणि इतर कारणांनी आपणास मारून घेतलेल्या पुरुषांचीही अनेक उदाहरणे अस्तित्वात आहेत. सती जाणाऱ्या राणीबरोबर पालखी वाहून नेणारे आणि दुसरे काही लोक आणि दासी ह्यांनी तिच्याबरोबर सहगमन केल्याची उदाहरणे आहेत. ऐतिहासिक काळातील सतींपैकी जोराच्या लोकमतामुळे सती गेल्याची काही उदाहरणे असू शकतील. पराजय झालेल्या राजांच्या आणि सरदारांच्या स्त्रियांची अवस्था सर्व देशांत अत्यंत दुःखदायक असे. त्यांच्या पतींनी केलेल्या क्रूरपणाचा सूड त्यांच्या स्त्रियांवर उगवला जाई आणि त्यांना गुलामाप्रमाणे काम करावे लागे.

सतीची चाल बंद होण्यापूर्वी कित्येक शतके ती चाल भारतातील इतर प्रांतांपेक्षा बंगालमध्ये अधिक प्रचलित होती. सन १८१५ ते १८१८ ह्या चार वर्षांत सती गेल्याच्या २३६६ प्रकारांपैकी एकट्या कलकत्ता विभागात १४८५ प्रकार घडून आले होते. बंगालखेरीज सर्व भारतात अविभक्त हिंदु कुटुंबातील विधवांना फक्त अन्न-वस्त्राचा अधिकार असतो. परंतु बंगालमध्ये जेथे जेथे दायभाग पद्धती चालते तेथे अविभक्त हिंदु कुटुंबातील पुत्रहीन असलेल्याही विधवांना अविभक्त कुटुंबाच्या मिळकतीत त्यांच्या मृत पतींना जेवढा हक्क मिळाला असता तेवढा हक्क असतो. ह्या कारणाने पतीमरणाच्या अत्यंत दुःखद प्रसंगी त्याच्या विधवेला तिच्या पतीवरील प्रेमाची आणि भक्तीची आठवण करून देऊन तिची वाट लावण्याचा लोभ मृताच्या कुटुंबातील बाकीच्या लोकांना पुष्कळ वेळा झाला असण्याचा संभव आहे. कोणत्याही काळात मध्यम स्थितीतील सती जाणाऱ्या स्त्रियांची संख्या फार मोठी असे आणि सती जाणाऱ्यांपैकी पुष्कळ स्त्रियांवर सती जाण्याची बळजोरी करण्यात येत असे असे मानणे अशक्य आहे. विशेषतः भारतातील दुसऱ्या प्रांतांत उपलब्ध झालेल्या शिलालेखांवरून आणि इतर पुराव्यावरून असे दिसते की विधवांचे नातेवाईक त्यांना सती जाण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत. आधुनिक काळातील भारतीय लोक सतीच्या चालीचे समर्थन करीत नाहीत, तथापि सती जाण्यात ज्या हिंदु स्त्रियांनी दृढ आणि अचल धैर्य दाखविले त्याबद्दल त्यांना आदरपूर्वक अभिमान वाटल्यास त्याबद्दल त्यांना दोष देता येणार नाही.

सर्व विधवांना लागणारे काही निर्बंध स्मृतींनी सांगितले आहेत. ज्या पत्न्यांना अल्पवयाची अपत्ये असतात, अथवा त्या गरोदर असतात, अथवा ज्यांना रजोदर्शन झालेले नसते अथवा ज्या रजस्वला अवस्थेत असतात त्या पत्न्या पतीच्या चितेवर आरोहण करीत नाहीत असे बृहन्नारदीय

[बालापत्याश्च गर्भिण्यो अदृष्टऋतवस्तथा ।
रजस्वला राजसुते नारोहन्ति चितां शुभे ॥

(नारद पुराण–परा. माघ. २ भाग, पा ५८)] पुराणात (परा. मा. २·१ पा. ५८) म्हटले आहे. रजस्वला असलेल्या पत्नीला चौथ्या दिवशी स्नान करून शुद्ध झाल्यावर सती जाण्याची परवानगी देत.

अनुक्रमणिका

जी स्त्री चितेवर जाळून घेण्याचा प्रथम निश्चय करून मागाहून शेवटल्या क्षणाला परत फिरते तिला प्राजापत्य प्रायश्चित्त करावे लागते (अपरार्क पा. ११९३).

शुद्धितत्त्व ह्या ग्रंथात सतीच्या कार्यपद्धतीविषयी वर्णन केले आहे. त्या विधवेने स्नान करून दोन शुभ्र वस्त्रे परिधान करावी; हातात दर्भ घेऊन आचमन करावे आणि देशकालाचा उल्लेख करून संकल्प करावा; आठ लोकपाल, चंद्र, सूर्य, अग्नी इत्यादींना त्या कृत्याला साक्षी होण्याची विनंती करावी; नंतर अग्निसभोवती तीन प्रदक्षिणा घालाव्या आणि पेटविलेल्या चितेवर चढावे.

सती जाणाऱ्या स्त्रीला स्वर्गलोकी अनेक फळे मिळतात अशी वर्णने आहेत. तिची स्वर्गात स्तुती केली जाते, तिच्या पतीने ब्रह्महत्येसारखी पातके केली असली तरी ती स्त्री त्या पातकांपासून पतीची मुक्तता करते. तिला पुन्हा स्त्रीजन्म येत नाही. ती मातेची, पित्याची आणि पतीची अशी तीन कुले उद्धरते इ. इ. (याज्ञ. १·८६ वरील मिताक्षरा; अपरार्क पा. ११०; शुद्धितत्त्व पा २३४; इ.).

\-\-\-\-\-

अनुक्रमणिका

## प्रकरण ४०

## वेश्या

(मू. ग्रं. पा. २.६३७-६३९)

ह्या ग्रंथात भारतातील स्त्रियांच्या दर्जासंबंधी विवेचन केले असल्यामुळे जर त्यात वेश्या आणि रखेली स्त्रियांसंबंधी काहीच सांगितले नाही तर तो ग्रंथ अपुरा राहील. वेश्या ही संस्था इतिहास कालाच्या आरंभापासून सर्व देशात अस्तित्वात आहे. ऋग्वेदात (१·१६७·४; २·२९·१; १·६६·४ इत्यादी) वेश्या अथवा वारांगना यांचे उल्लेख आले असून तरुण पुरुष अशा स्त्रियांशी संयुक्त होत असत अशी वर्णने केली आहेत. स्मृतिग्रंथांत आणि पुराणांत वेश्याव्यवसायाबद्दल पुष्कळ उल्लेख आले आहेत आणि त्यासंबंधी नियम दिले आहेत.

याज्ञ.ने (२·२९०) रखेली स्त्रियांचे दोन प्रकार सांगितले आहेत. एक **अवरुद्धा** (म्हणजे जिला घरातच बाळगलेली असून दुसऱ्या कोणत्याही पुरुषाबरोबर संभोग करण्याची बंदी असते) आणि दुसरी **भुजिष्या** (म्हणजे जिला कोणा एका पुरुषाने आपल्याकरिता खास बाळगलेली असते परंतु तिला घरात न ठेवता दुसरीकडे ठेवलेली असते). ब्राह्मणेतर जातीच्या स्वैरिणीबरोबर, वेश्येबरोबर, दासीबरोबर अथवा आपल्याहून कमी दर्जाच्या जातीच्या एकाद्या स्त्रीबरोबर जर तिच्या स्वामीचा प्रतिबंध नसेल तर संभोग करण्यास मोकळीक असते, परंतु जर ती कोणा एका पुरुषाची रखेली असेल तर तिच्याबरोबर संभोग करता कामा नये, आणि ते कृत्य दुसऱ्या एकाद्या पुरुषाच्या पत्नीबरोबर संभोग करण्याइतके दोषास्पद असते असे नारदाने (स्त्रीपुंस. ७८।७९) म्हटले आहे. ज्या वेश्या कोणत्याही एका विशिष्ट पुरुषाने राखलेल्या नसतात त्यांनी त्यांच्याच जातीतील अथवा त्यांच्यापेक्षा वरिष्ठ जातीतील पुरुषांबरोबर संभोग केला तर त्यांना पातक लागत नाही अथवा राजाकडून दंड होत नाही. अशा पुरुषालाही राजाकडून शासन होत नाही. परंतु आपल्या पत्नीशी एकनिष्ठ न राहता वेश्येबरोबर संभोग करणाऱ्या पुरुषाला पातक लागते आणि त्याबद्दल प्रायश्चित्त करावे लागते. एकाद्या वेश्येने गिऱ्हाईकाकडून मोबदला घेऊन त्याला तिच्याबरोबर संभोग करण्यास मनाई केली अथवा एकाद्या पुरुषाने वेश्येकडून संभोग करून कबूल केलेला मोबदला तिला दिला नाही तर राजाने त्यांना शासन करावे असे याज्ञ. (२·२९२) आणि मत्स्यपुराण (२२७·१४४।१४५) यांत म्हटले आहे. अत्यंत हुशार आणि ६४ कलांत निपुण असणाऱ्या वेश्येला गणिका म्हणतात (कामसूत्र १·३·२०).

रखेली स्त्रियांच्या पालनपोषणाबद्दलचे नियम स्मृतींनी सांगितले आहेत. अशा रखेलीला त्या पुरुषाच्या हयातीत त्याच्यावर फिर्याद करता येत नाही परंतु मृत ब्राह्मणाने स्वतःकरिता बाळगिलेल्या सर्व प्रकारच्या रखेल्यांना जर त्या त्या पुरुषाच्या मृत्यूनंतर त्याच्याशी सतत एकनिष्ठ राहत असतील तर त्या पुरुषाच्या मिळकतीतून पालनपोषण मिळण्याचा हक्क असतो. (नारद-दायभाग. ५२; कात्यायन; मिताक्षरा याज्ञ. २·१३५ इ०).

———

अनुक्रमणिका

# प्रकरण ४१

## आह्निक कर्मे आणि आचार

(मू. ग्रं. पा. २.६४०-६९५)

(प्रतिदिवशी आणि नियमित कालावधीने करावयाची कर्तव्ये आणि विधी).

हा धर्मशास्त्राचा एक फार महत्त्वाचा विषय आहे. प्रस्तुत प्रकरणात मुख्यत्वे स्नातक आणि गृहस्थ ह्यांच्या कर्तव्यांचा विचार केला आहे. गृहस्थाश्रमाची महती धर्मसूत्रे, स्मृती, पुराणे इत्यादी धर्मशास्त्रावरील ग्रंथांत अनेक ठिकाणी वर्णन केलेली आहे. गृहस्थाश्रम हा इतर सर्व आश्रमांचा

[तेषां गृहस्थो योनिरप्रजनत्वादितरेषाम् । (गौ ३·३).
यथा मातरमाश्रित्य सर्वे जीवन्ति जन्तवः ।
एवं गार्हस्थ्यमाश्रित्य वर्तन्त इतराश्रमाः ॥ शान्ति. २७०· ६।७]

आधार असतो (गौ. ३·३०; शान्ति. २७०·६।७). ब्राह्मण गृहस्थाश्रमीयांचे निरनिराळ्या दृष्टींनी निरनिराळे प्रकार सांगितले आहेत. गृहस्थाच्या आर्थिक दृष्टीने बौधा. ध. सू. (३·१·१) मध्ये गृहस्थाचे **शालीन** आणि **यायावर** असे दोन प्रकार सांगितले आहेत आणि त्यांपैकी शालीनापेक्षा यायावर श्रेष्ठ असतो असे म्हटले आहे. धान्य संचयाच्या दृष्टीने मनूने (४·७) ब्राह्मण गृहस्थाचे चार प्रकार केले आहेत. ज्याच्याजवळ धान्याचे कोठार असते; ज्याच्याजवळ घागरभर धान्य असते, ज्याच्याजवळ तीन दिवस पुरेल इतकेच धान्य असते आणि ज्याच्याजवळ आज पुरेल इतकेच धान्य असते असे हे चार प्रकार आहेत. उपजीविकेच्या व्यवसायांच्या दृष्टीने याज्ञ. ने (याज्ञ. १·१२८ वरील मिताक्षरा) शालीनाचे चार पोटभाग केले आहेत. वार्तावृत्ती, शालीन, यायावर आणि घोराचारिक असे चार प्रकारचे गृहस्थाश्रमी असल्याचे वैखानसाने (गृह्य ८·५) सांगितले आहेत.

प्राचीन काळापासून दिवसाचे विभाग करण्याचे अनेक प्रकार अस्तित्वात आहेत. (ऋ. ६·९·१; १०·३४·११; इ०). अहः म्हणजे दिवस, ह्याचा अर्थ एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काल (प्रकाशाचा दिवस आणि काळोखाचा दिवस). प्रकाशाच्या विभागाचे प्रातःकाल, मध्याह्न आणि सायंकाल असे तीन पोटविभाग करतात. कोणी प्रातः, संगव, माध्यंदिन अथवा माध्याह्न, अपराह्न, सायाह्न असे पाच विभाग करतात. हा प्रत्येक विभाग तीन मुहूर्ताएवढा असतो. २४ तासांच्या दिवसात ३० मुहूर्त असतात. स्मृतींत बहुधा दिवसाचे आठ विभाग सांगितलेले असतात.

(दक्ष २·४·५; वसि. ११·३६, अपरार्क पा. ६०१ इ.). ह्या प्रत्येक विभागात कोणकोणती कर्मे करावी ह्यांचे स्मृतींत वर्णन केलेले असते. (मनु. ४·१५२= अनुशा. १०४·२३).

**आह्निक** (म्हणजे दिवसात) करावयाच्या गोष्टीतील प्रमुख गोष्टी अशा असतात : निजून उठणे, शौच (शरीरशुद्धी), दंतधावन, स्नान, संध्या, तर्पण, पंचमहायज्ञ (ह्यात ब्रह्मयज्ञ आणि अतिथिसत्कार ह्यांचा समावेश होतो), अग्नीची उपासना, भोजन (माध्याह्नकाळचे), द्रव्यप्राप्तीचे व्यवसाय, अध्ययन आणि अध्यापन, सायंकाळची संध्या, दान देणे, झोपणे आणि विशिष्ट काळी करावयाचे यज्ञ.

अनुक्रमणिका

व्यवहाराच्या दृष्टीने सूर्योदयापूर्वी चार नाडी (घटिका) आणि सूर्यास्तानंतर चार नाडी ह्यांचा समावेश **दिनमानात** होतो. जर कोणी सूर्योदयापूर्वी स्नान केले तर ते स्नान सूर्योदयानंतर आरंभ होणाऱ्या दिवसाचे धरले जाते (आह्निकतत्त्व पा. ३२७). सूर्योदयाच्या पूर्वीच्या एक प्रहरात दोन मुहूर्त असतात. त्यांतील पहिल्या मुहूर्ताला **ब्राह्ममुहूर्त** अशी संज्ञा आहे. ह्यावेळी मनुष्याची बुद्धी आणि ग्रंथरचनेची शक्ती अतिशय चांगल्या स्वरूपात असतात म्हणून त्या मुहूर्ताला ब्राह्म अशी संज्ञा दिली आहे (मनु. ४·९२ वरील कुल्लूक टीका). सामान्यतः सर्व लोकांनी आणि विशेषतः विद्यार्थ्यांनी सूर्योदयाच्या पूर्वी ब्राह्ममुहूर्तावर निजून उठावे असा नियम फार प्राचीन काळापासून सांगण्यात आला आहे (गौ. २३·२१; आप. ध. सू. २·५·१२·१३). निजून उठल्यानंतर प्रत्येकाने आपले डोळे धुवावे आणि देवाचे ध्यान करावे. ह्या **प्रातःस्मरणात** कोणकोणते श्लोक म्हणावे ह्याविषयी नियम सांगितले आहेत. ब्रह्मा मुरारिः प्रभृती पाच श्लोक वामन पुराणात दिले आहेत ते प्रातःस्मरणात म्हणावयाचे असतात. तसेच महाभारतात दिलेले भारतसावित्री संज्ञा असलेले चार श्लोक, नल दमयंतीप्रभृतीची नावे असलेला श्लोक, अश्वत्थामाप्रभृती सुप्रसिद्ध चिरजीविनांची व अहल्याप्रभृती पाच प्रसिद्ध स्त्रियांची नावे असणारे असे निरनिराळे श्लोक म्हणावे असे सांगितले आहे (आह्निकप्रकाश पा. १६; आह्नि. तत्त्व पा. ३२७ इ०). अजूनही सनातनी वळणात वाढलेले वृद्ध लोक हे श्लोक निजून उठल्यावर म्हणतात.

निजून उठल्यावर वेदवेत्ता ब्राह्मण, सधवा स्त्री, गाय प्रभृती **शुभदायक व्यक्तींचे दर्शन घ्यावे** (गोभि. स्मृ. २·१६३ आणि १६५). विधवा स्त्री, पापी मनुष्य, नग्न मनुष्य ह्यांच्यासारख्या अशुभ व्यक्तींना पाहिले तर ते दुश्चिन्ह समजावे. राजा, संन्याशी, महासागर, काळी गाय इत्यादी वस्तु दर्शनाबरोबर मनुष्याला शुद्ध करतात म्हणून प्रत्येकाने त्यांचे नेहमी दर्शन घ्यावे (पराशर १२·४७). त्यानंतर करावयाचे कृत्य म्हणजे **मलमूत्र विसर्जन** हे होय. ह्याविषयी अनेक ग्रंथांत विस्तृत नियम सांगितले आहेत. त्यांपैकी पुष्कळसे नियम आरोग्याच्या दृष्टीचे असतात. उभ्याने मूत्र विसर्जन करण्याला अथर्ववेदाच्या काळी (अथर्व ७·१०२·१) निषेध केला होता असे दिसते. मलमूत्र विसर्जन केल्यावर शरीराचा जो भाग पाण्याने आणि मातीच्या गोळ्यांनी इतक्या वेळा धुवावा की कोणतीही दुर्गंधी अथवा घाण यणारा पदार्थ त्यावर चिकटलेला राहणार नाही (मनु. ५·१२·६; याज्ञ. १·१७). मलमूत्र विसर्जन करतेवेळी पादत्राण घातलेले नसावे आणि यज्ञोपवीत उजव्या कानावरच लोंबते ठेवावे अथवा निवीत करून पाठीवर टाकावे (स्मृतिचं. १ पा ८९).

अशा रीतीने प्रातःकाळी करावयाची **शरीराची शुद्धता** ही एकंदर राखावयाच्या शुद्धतेचा फक्त एक भाग असतो. शुद्धता हा आत्मगुण असल्याचे गौतमाने (८·२४) म्हटले आहे. शुद्धता दोन प्रकारची असते: **बाह्य** आणि **अभ्यंतर**. पहिल्या प्रकारची शुद्धता पाणी आणि माती ह्या साधनांनी करता येते आणि दुसऱ्या प्रकारची शुद्धता स्वतःच्या विचारांची शुद्धता ठेऊन करता येते (बौ. ध. सू. ३·१·२६; हारीत; दक्ष (५·३ इ०). बाह्य शुद्धतेचे कुल, अर्थ, शरीर यांची शुद्धी असे तीन प्रकार आणि अभ्यंतर शुद्धतेचे मानस, चाक्षुष (नेत्रांची), घ्राण्य (नाकाची), वाच्य (भाषणाची), स्वाद्य (जिव्हेची) असे पाच पोटभाग पाडले आहेत. शरीरातून चरबी, रेत, रक्त इत्यादी बारा प्रकारचे मल बाहेर पडत असतात (मनु. ५·१३५; विष्णु ध. सू. २२·८१ इ०).

हातपाय धुतल्यावर **पाण्याच्या गुळण्या** करून तोंड स्वच्छ केले पाहिजे आणि त्यानंतर **आचमन** केले पाहिजे. उडदाचा दाणा बुडेल इतके पाणी तळहातावर ओतून आणि आंगठा व तर्जनी शिवाय बाकीची तीन बोटे जुळून आंगठ्याच्या मुळाकडील बाजूने ते पाणी प्यावे. ह्या भागाला **ब्राह्मतीर्थ** अशी संज्ञा आहे.

आचमनाचे पौराणिक, स्मार्त, श्रौत, आगम असे निरनिराळे प्रकार सांगितले आहेत. हल्ली बहुतेक ब्राह्मण ज्या प्रकारचे आचमन करतात ते **पौराणिक**

[अच्युताद्यैः समाचामेत्केशवाद्यैस्तु नामभिः।
अङगानां स्पर्शनं कुर्यादेतत्पौराणिकं मतम्॥
स्मृतिमुक्ताफल (आह्निक) पा. २२१.] प्रकारचे असते. त्यात केशव, नारायण, माधव इत्यादी नावे उच्चारून पाणी प्यावयाचे असते. (आपस्तंब स्मृति).

शौच आणि आचमन ह्यांच्यानंतर **दंतघावन** (दात घासणे) हे कृत्य करावयाचे असते. दंतघावन स्नानाच्यापूर्वी करावयाचे असते. प्रतिदिवशी दात घासण्याची चाल भारतात अत्यंत प्राचीन काळापासून चालत आलेली आहे (तै. सं. २·५·१·७).

ह्याविषयीही काही अपवाद असतात. रजस्वला स्त्रियांनी दात घासू नये. ब्रह्मचाऱ्याने दात घासण्यासारखी वेळ लागणारी कृत्ये करण्यात गुंतू नये (तर चूळ भरून तोंड स्वच्छ करावे), दंतघावनाकरिता काही विशिष्ट झाडांची सालीसह असलेली डाहाळी घ्यावी, ती डाहाळी कोणत्या झाडाची असावी, किती लांबीची असावी ह्याविषयी विस्तृत नियम सांगितले आहेत (स्मृतिचं. २ पा. १०५।१०६). विटेच्या तुकड्याने, मातीच्या डिखळाने, दगडाने अथवा नुसत्या बोटांनी दात घासू नये, काही विशिष्ट पर्वदिवशी दात घासू नये, चौथ्या बोटाशिवाय बाकीच्या बोटांनी दात घासावे, डाहाळीने जीभ घासावी इत्यादी. काही ग्रंथांत (विष्णु ध. सू. ६१·५६) प्रातःकाळाखेरीज भोजन झाल्यावर दाढांना चिकटून राहिलेले अन्नाचे कण काढून टाकण्याकरिता दात घासावे असे सांगितले आहे.

दंत घावनानंतर **स्नान** हे कृत्य येते. आचमन, स्नान, जप (वेदमंत्रांचा), होम आणि दुसरे विधी उजव्या हातात कुश घेऊन करावयाचे असतात (स्मृतिचं. १ पा. १७८). दर्भ अथवा यज्ञोपवीत ह्यांच्या विरहित जे जे कृत्य केले असेल ते निरर्थक होते आणि त्याचे फळ इहलोकी अथवा परलोकी प्राप्त होत नाही असे कूर्म पुराणात (कृत्यरत्ना. पा ४७) सांगितले आहे. आचमन इत्यादी कृत्ये करताना नेहमी दर्भाचे **पवित्र** (आंगठीसारखी दर्भाची केलेली गुंडाळी) उजव्या हाताच्या अनामिकेत किंवा दोन्ही हातांच्या अनामिकेत घातलेले असावे अथवा उजव्या हातात कुश घेतलेले असावेत. श्रावण महिन्यातील अमावस्येच्या दिवशी दर्भ गोळा करून आणावे. अशा रीतीने गोळा केलेला दर्भ केव्हाही शिळे होत नाहीत आणि त्यांचा पुनः पुनः उपयोग करता येतो,

[मासे नभस्यमावास्या तस्यां दर्भोच्चयो मतः।
अयातयामास्ते दर्भा नियोज्याः स्युः पुनः पुनः॥
हारीत—स्मृतिचं. १ पा. १०७.] (स्मृतिचं. १ पा. १७७). ज्या दर्भाच्या पातीतून आणखी पाती निघत नाहीत त्यांना केवळ **दर्भ** असे म्हणतात आणि ज्या दर्भाच्या पातीतून आणखी पाती निघतात त्यांना **कुश** म्हणतात. मुळासकट असणाऱ्या पात्यांना **कुतप** म्हणतात आणि ज्या दर्भांची अग्रे खुडलेली असतात त्यांना **तृण** (गवत) म्हणतात. कुश मिळत नसतील तर त्यांच्याऐवजी **काश** अथवा दूर्वा ह्यांचा उपयोग करावा (वृद्धहारीत ७·४४; कौशिक-स्मृतिचं. १ पा. १०८ इ०).

स्नान हे मुख्य अथवा गौण असे दोन प्रकारचे असते. पहिल्या प्रकारचे स्नान पाण्याने करता येते आणि दुसऱ्या प्रकारचे स्नान पाण्याशिवाय करता येते. दक्षाने (२·४८) स्नानाचे नित्य, नैमित्तिक, आणि काम्य असे तीन प्रकार सांगितले आहेत. सर्व वर्णांच्या लोकांनी प्रति दिवशी पाण्यामध्ये अथवा पाणी घेऊन शिरासहित शरीर धुतले पाहिजे आणि द्विजातीयांनी स्नान करताना वैदिक मंत्र म्हटले पाहिजेत असे

बौधायनाने (२·४·४) म्हटले आहे. देह मलिन असतो आणि त्याच्यापासून रात्रंदिवस निरनिराळे द्रव पाझरत असतात आणि प्रातःकाळी केलेल्या स्नानाने शरीर शुद्ध आणि पवित्र होते अशी स्नानाची दृश्य आणि अदृश्य (आध्यात्मिक) फले असतात (दक्ष-अपरार्क पा. १२५).

काही ग्रंथांत असे सांगितले आहे की ब्राह्मण गृहस्थाने एकदा सूर्योदयापूर्वी आणि पुन्हा मध्याह्नसमयी असे दोन वेळा स्नान करावे (याज्ञ. १·९५; १००; लघुआश्वला. १·१६). हिंदूंचा सर्वसाधारण नियम दिवसातून एक वेळा स्नान करण्याचा असतो आणि अनेक शतकांपासून तोच सर्वसाधारण प्रघात चालत आला आहे. सांप्रत काळी स्नान हे सामान्यतः मध्याह्नापूर्वी केले जाते. प्रातःकाळी करावयाचे स्नान दंतधावनानंतर लागलीच सूर्योदय होण्यापूर्वी केले पाहिजे असे विष्णु ध. सू. (६४·८) म्हटले आहे. दिवसाचे आठ भाग केले असता चौथ्या विभागात **माध्याह्नस्नान** केले पाहिजे. जो रोगग्रस्त असेल त्याने माध्याह्न स्नान करू नये. **तिसरे स्नान** सूर्यास्तापूर्वी केले पाहिजे, परंतु सूर्यास्तानंतर अथवा रात्री (रात्रीच्या मध्य भागातील दोन प्रहर) करू नये. ह्याला अपवाद ग्रहण, संक्रांत, विवाह, कोणाचा जन्म अथवा मृत्यू झाल्यावेळी अथवा कामना धरून केलेले स्नान अशा वेळी रात्री स्नान करावे.

**नित्य** (आवश्यक) स्नान थंड पाण्याने केले पाहिजे आणि सामान्यतः गरम पाणी घेऊ नये कारण गरम पाण्याने शरीर स्वच्छ होईल परंतु स्नानाचे आध्यात्मिक फल मिळणार नाही. **नैमित्तिक** आणि **काम्य** स्नाने थंड पाण्यानेच केली पाहिजेत. (थंड अथवा गरम असा पर्याय फक्त नित्य स्नानाच्या बाबतीत चालतो). नित्य करावयाचे स्नान **निसर्गजन्य** पाण्यात (म्हणजे नद्यामध्ये, पुष्करिणीमध्ये, तलावात, खोल जलाशयात, डोंगरातील झऱ्यात) केले पाहिजे. श्रावण आणि भाद्रपद महिन्यात नद्या रजस्वला (चिखलाने भरलेल्या) असतात म्हणून त्या महिन्यात (स्वतंत्रपणाने समुद्राला मिळणाऱ्या नद्या व्यतिरिक्त इतर) नद्यांत स्नान करू नये. ह्याला अपवाद उपाकर्म, उत्सर्जन, ग्रहण, कोणी मनुष्य मृत झाला असताना गढूळ पाणी असलेल्या नद्यात देखील स्नान करावे (गोभिलस्मृति १·१४१-१४३).

प्रातःकाळच्या आणि माध्याह्न काळच्या स्नानाचा विधी सारखाच असतो. स्नान करणाऱ्याने पाणी आणि कोरडी माती घेऊन आपल्या शरीरावरील मळ काढावा आणि नंतर पाण्यात बुडी मारावी, निरनिराळे मंत्र म्हणून पाण्याची प्रार्थना करावी, अवमर्षणसूक्त, पुरुषसूक्त इत्यादी मंत्र म्हणावे; अंगावरील कपडे ओले असताना देवांचे आणि पितरांचे तर्पण करावे.

वरील विधी विष्णु. ध. सू. च्या (६४·१८।२२) आधाराने सांगितला आहे. निरनिराळ्या सूत्रांत ह्या तपशीलात भेद आहेत. संपूर्ण विधियुक्त स्नान करणे एकाद्याला शक्य नसेल तेव्हा त्याने फक्त पुढीलप्रमाणे करावे. पाण्याची प्रार्थना करावी, नंतर आचमन करावे, नंतर कुश घेऊन मार्जन करावे, नंतर स्नान करावे आणि तीन वेळा अवमर्षणसूक्त म्हणावे. शूद्रांनी वेदमंत्र म्हणू नयेत (योगीयाज्ञ. - अपरार्क पा. १३४). स्नान करतेवेळी काही विशिष्ट नियम पाळावयाचे असतात. उदाहरणार्थ नग्न होऊन स्नान करू नये, कपडे अंगात घालून स्नान करू नये (फक्त नेसलेले वस्त्र अंगावर असावे), भोजन झाल्यावर स्नान करू नये, पाण्यात अंग चोळू नये (तीरावर आल्यावर चोळावे), पायांनी अथवा हातांनी पाण्यावर ताडन करू नये, पाण्यानेच पाण्यावर ताडन करू नये इ०.

स्नानामुळे पुढील दहा प्रकारचे लाभ होतात असे अनेक ग्रंथांत सांगितले आहे. स्नानामुळे शक्ती, सौंदर्य, त्वचाशुद्धी, आवाजशुद्धी, सुखकारक स्पर्श, शरीराला सुखकारक वास, शुद्धता, ऐश्वर्य, नाजूकपणा आणि सुंदर स्त्रियांची प्राप्ती हे लाभ होतात (उद्योग ३७·३३; दक्ष २·१३ इ०).

शंखस्मृतीत (८·१।११) जलस्नानाचे नित्य, नैमित्तिक, काम्य, क्रियांग, मलापकर्षण (अथवा अभ्यंग) आणि क्रिया स्नान असे सहा प्रकार सांगून त्यांच्या व्याख्या दिल्या आहेत.

पाण्याने केलेल्या स्नानाला **वारुणस्नान** म्हणतात आणि वारुणस्नान हा स्नानाचा **मुख्य** प्रकार होय. **गौण**स्नानाचे सहा प्रकार असतात. मंत्रस्नान, भौम, आग्नेय, वायव्य, दिव्य आणि मानस. (योगीयाज्ञ.; दक्ष २·१५।१६; पराशर १२·९।१०) ह्याशिवाय कोणी सारस्वत स्नान हा एक गौणप्रकार सांगितला आहे.

कोणी मनुष्य अथवा स्त्री आजारी असताना स्नान करणे अवश्य असेल तेव्हा करावयाचा स्नानाचा पुढील प्रकार सांगितला आहे (उशनस-स्मृतिचं. १ पा. १२१). आजारी नसणाऱ्या एकाद्या मनुष्याने आजारी मनुष्याला स्पर्श करून स्नान करावे, पुन्हा स्पर्श करून स्नान करावे, असा प्रकार दहा अथवा बारा वेळा करावा आणि शेवटी आजारी व्यक्तीच्या अंगावरील सर्व वस्त्रे काढून दुसरी वस्त्रे घ्यावी म्हणजे ती आजारी व्यक्ती शुद्ध होते.

**तर्पण**– तर्पण हे जसे ब्रह्मयज्ञाचे अक अंग असते त्याप्रमाणेच ते स्नानाचेही एक अंग असते. जेव्हा कोणी मनुष्य डोक्यासह आपले सर्व शरीर पाण्यात बुडवितो त्यावेळी त्याला पाण्यात असतानाच तर्पण करावे लागते असा नियम मनुप्रभृतींनी (मनु. २·१७६; विष्णु ध. सू. ६४-२३।२४ इ०.) सांगितला आहे. त्याने आपल्या दोन हातांची ओंजळ करून त्यात पाणी घ्यावे आणि तो ज्या प्रवाहात उभा असतो त्या प्रवाहात ते पाणी सोडावे. त्याने वस्त्रे बदलली असली तर तीरावर येऊन तर्पण करावे. तर्पण दिवसातून एकदाच करावे किंवा दोनदा करावे ह्याविषयी भिन्न मते आहेत. पाण्यात उभे राहून तर्पण करीत असेल त्याने तर्पण पुरे होईपर्यंत अंगावरील वस्त्राच्या टोकातील पाणी पिळू नये. तर्पण पुरे झाल्यावर त्याने वस्त्राचे टोक पिळावे आणि अशा रीतीने पिळून पडलेले पाणी स्नान करणाऱ्याच्या कुळात जन्मलेल्या निपुत्रिक मृत्यव्यक्तींकरता दिले आहे असे समजले जाते. तशा अर्थाचा श्लोक त्याने म्हणावयाचा असतो.

**वस्त्रधारण**– स्नान केल्यानंतर पाणी झटकून टाकण्याकरिता आपले डोके हालवू नये अथवा आपल्या अंगावरील पाणी आपल्या हाताने झाडून टाकू नये. केस वाळविण्याकरिता डोक्याभोवती एक कपडा गुंडाळावा व पूर्वी धुवून वाळविलेली दोन वस्त्रे धारण करावी. ती वस्त्रे दुसऱ्या कोणी न वापरलेली असावी (विष्णु. ध. सू. ६४·९।१३).

वेदांच्या काळी विणण्याच्या कलेची आणि विणलेल्या कापडाची माहिती होती. लोकरीचे अथवा तागाचे केलेले वस्त्र लोक वापरीत असत. रेशमी (अथवा कुशाचे केलेले) वस्त्र अतिशय महत्त्वाच्या प्रसंगी वापरीत असत. कृष्णमृगाचे कातडे (कृष्णाजिन) ही अंगावर घेत. कापडाला लाल रंग देत असत. कापसाच्या वस्त्राचा उल्लेख वेदात आलेला नाही. त्याचा उल्लेख सूत्रांत (विष्णु. ध. सू. ७१·१५; ६३-२४) आणि मनुस्मृतीमध्ये (८·३२६ आणि १२·६४) केला आहे. म्हणून कापसाच्या कापडाचा वापर सूत्रग्रंथांच्या

पूर्वी कित्येक शतके होत आला असला पाहिजे. अंगावरील दोन वस्त्रांखेरीज स्नातकाने एक शिरोभूषण (पागोटे) धारण करावे, पादत्राणे घालावी आणि छत्री बाळगावी असे बौधायनाने (१·३·२) सांगितले आहे.

वस्त्रधारणासंबंधी अनेक नियम सांगितले आहेत. गृहस्थाने नेसलेल्या वस्त्राच्या जोडीला एक पांघरावयाचे वस्त्र नेहमी वापरले पाहिजे (आप ध. सू. २·२·४·२२।२३). परंतु जर तो गरीब असला तर पांघरावयाच्या वस्त्राऐवजी फक्त यज्ञोपवीत घातले तरी चालेल. वसिष्ठाने (१२·१४) म्हटले आहे की स्नातकाने नेहमी एक नेसावयाचे वस्त्र, एक पांघरावयाचे वस्त्र, दोन यज्ञोपवीते धारण केली पाहिजेत. जर कोणाला धुतलेले वस्त्र मिळाले नाही तर त्याने लोकरीची घोंगडी (घाबळी) अथवा तागाचे कापड वापरावे. स्नातक आणि गृहस्थ याने शुभ्र वस्त्रे परिधान करावी. प्रजापतीने (परा. माध.) म्हटले आहे की तर्पण करताना काठ असलेले रेशमी वस्त्र अथवा नारिंगी रंगांचे वस्त्र वापरावे परंतु भपकेदार वस्त्रे केव्हाही वापरू नयेत. जेवण्याच्या वेळी आणि पूजा करतेवेळी रेशमी वस्त्रे वापरण्याची चाल बहुधा वरीलसारख्या नियमावरूनच निघाली असावी आणि अशी चाल अद्यापिही भारतातील पुष्कळ विभागांत प्रचलित आहे. नेसलेले वस्त्र तीन ठिकाणी खोचलेले असले पाहिजे, म्हणजे ते बेंबीजवळ खोचले असले तर डाव्या बाजूला आणि पाठीकडील बाजूलाही खोचले पाहिजे.

स्नान केल्यावर **आचमन** करावे लागते आणि आपल्या जातीप्रमाणे अथवा पंथाप्रमाणे कपाळावर तिलक अथवा **मुद्रा** लावावी लागते. मुद्रा लावण्याला घ्यावयाची माती कोणत्या ठिकाणची घ्यावी, मुद्रा कोणत्या बोटाने लावावी, तिचा आकार कसा असावा ह्यासंबंधी विस्तृत नियम आह्निकप्रकाश (पा. २४८।२५२; स्मृतिमुक्ताफल-आह्निक पा. २९२।३१०) प्रभृति ग्रंथात दिले आहेत. कपाळावर एक अथवा अधिक उभ्या रेघा काढतात त्याला **ऊर्ध्वपुंड्र** म्हणतात. तीन आडव्या रेघा काढतात त्यांना **त्रिपुंड्र** म्हणतात. वैष्णव संप्रदायाचे लोक शरीराच्या बारा भागावर ऊर्ध्वपुंड्र मुद्रा करतात. ऊर्ध्वपुंड्र करण्याकरिता विष्णूमुळे पवित्र झालेल्या क्षेत्रातील, गंगा, सिंधु, ह्यांच्यासारख्या पवित्र नद्यांच्या काठची, इत्यादी ठिकाणची माती घ्यावी अथवा गोपीचंदन घ्यावे. त्रिपुंड्र मुद्रा भस्माच्या करतात आणि **तिलक** मुद्रा चंदनाच्या गंधाच्या करतात. मध्वाचार्यांचे अनुयायी निष्ठावान वैष्णव मुद्रांच्या आकाराच्या तापलेल्या धातूंच्या तुकड्यांनी शंख, चक्र आदी विष्णूच्या आयुधांची चिन्हे आपल्या हातावर आणि अंगावर उठवून घेतात. काही ग्रंथांत अशा तप्तमुद्रा घेण्याचा निषेध केला आहे. मुद्रांच्या समर्थनपर अशीही निरनिराळ्या पुराणांत वचने आहेत. शैव आणि वैष्णव पंथांच्या ग्रंथांनी परस्परांच्या आचारांची निंदा केली आहे तर स्मृतिमुक्ताफलासारख्या ग्रंथात (आह्नी. पा. ३१० वर) दोघांना एकमेकांची निंदा न करण्याचा शहाणपणाचा उपदेशही केला आहे.

स्नानानंतर **संध्या** हे आह्निक कृत्य करावयाचे असते. त्यासंबंधी विवेचन मागे उपनयनाच्या प्रकरणात केले आहे.

संध्येनंतर करावयाचे **कृत्य** होम हे होय. प्रातःकाळचा होम सूर्योदयापूर्वी करावा असे काहींचे मत आहे आणि सूर्योदयानंतर करावा असे काहींचे मत आहे, परंतु ह्या दुसऱ्या प्रकारच्या मताप्रमाणे देखील सूर्य उदयाचलावर एक हातभर येण्यापूर्वी होम केला पाहिजे (गोभिलस्मृ. १·१२३). सायंकाळचा होम आकाशात तारका स्पष्ट दिसू लागल्यावर करावयाचा असतो. मनुष्याला जन्मतः जी तीन ऋणे असतात त्यांपैकी देवांचे ऋण यज्ञ केल्याने फिटते आणि (म्हणून) प्रत्येक मनुष्याने आमरण **अग्निहोत्र** [एतद्वै जरामर्यं सत्रं यदग्निहोत्रम्। शत. ब्रा. १२·४·१·१·] बाळगले पाहिजे (शत. ब्रा., १२·४·१·१). अग्निहोत्रात ज्या अग्नींची उपासना करता ते दोन प्रकारचे असतात, एक श्रौत आणि दुसरा स्मार्त. काही विशिष्ट वय असलेल्या व्यक्तीलाच श्रौत अग्नीची

अनुक्रमणिका

स्थापना करता येते. म्हणजे त्याला एकदा पुत्र झाला असला पाहिजे अथवा पुत्र होण्याइतके त्याचे वय झाले असले पाहिजे आणि त्याचे केस काळे असले पाहिजेत. प्रत्येक ब्राह्मणाने तीन श्रौत अग्नीचे **आधान** अवश्य केले पाहिजे असे वसिष्ठाने (११·४५।४८) सांगितले आहे. आधान हे नित्य (म्हणजे आवश्यक) कर्म आहे किंवा काम्य कर्म (विशिष्ट हेतू साधण्याकरिताच करावयाचे कर्म) आहे ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. अत्यंत प्राचीन काळीदेखील श्रौत अग्नीचे आधान केलेले लोक फार नसत.

आधान करावयाच्या तीन अग्नींची नावे **आहवनीय, गार्हपत्य** आणि **दक्षिणाग्नि** अशी आहेत. पुष्कळवेळा त्यांना **त्रेता** असे म्हणतात. आहवनीय अग्नीचे कुंड चौकोनी असते, गार्हपत्य अग्नीचे (पृथ्वी वर्तुळ असल्याकारणाने) वर्तुळ आकाराचे असते आणि दक्षिणाग्नीचे कुंड अर्ध चंद्राकृती असते. श्रौत अग्नीत दर्शपूर्णमास यज्ञ (अमावास्येला आणि पौर्णिमेला करावयाचे यज्ञ), आग्रयण, इष्टि, चातुर्मास्य यज्ञ, पशुयज्ञ आणि सोमयज्ञ करावयाचे असतात. गेल्या दोन हजार वर्षांत क्वचितच एकादा पशुयज्ञ अथवा सोमयज्ञ झाला असेल. मध्ययुगीन काळात दर्शपूर्णमासादि यज्ञ करणारे ब्राह्मण पुष्कळ असत, परंतु आधुनिक काळी अशा प्रकारचे अग्निहोत्री देखील दुर्मिळ झाले आहेत.

ज्याने अग्नीचे आधान केले असेल त्यानेच नव्हे तर प्रत्येक गृहस्थाने दिवसातून दोन वेळा, सकाळी आणि सायंकाळी अग्नीमध्ये अग्निहोत्र (म्हणजे तुपाच्या आहुती) अर्पण केलेच पाहिजे असे मनु प्रभृतींनी (मनु. ४·२५; याज्ञ. १·९९ इ०) सांगितले आहे. जेव्हा एकाद्या पुरुषाचा विवाह होतो तेव्हा पासून त्याने अग्निहोत्र, अतिथि सत्कार इत्यादी विहितकृत्ये नित्य केली पाहिजेत असे आप. ध. सू. (१·४·१४·१) म्हटले आहे ज्यांनी अग्निहोत्र घेतलेले असते त्यांच्याशिवाय बाकीचे लोक ज्या अग्नींत त्यांना नित्य द्यावयाच्या आहुती अर्पण करतात त्या अग्नींना **औपासन, आवसथ्य, औपसद, वैवाहिक, स्मार्त**, किंवा **गृह्य** अथवा **शालाग्नि** अशा संज्ञा असतात. बहुसंख्य ग्रंथकारांच्या मताप्रमाणे विवाहाच्या दिवशी नूतन दांपत्याने स्थापन केलेला जो अग्नी [यस्मिन्नग्नौ पाणिं गृह्णीयात्स गृह्यः । खादिरगृह्य १·५·१] तोच गृह्याग्नी असतो (खादि. गृ. १·५·१). पाणिग्रहणाच्या वेळेपासून वराने स्वतः अथवा त्याच्या पत्नीने, पुत्राने अथवा कन्येने अथवा शिष्याने गृह्याग्नीची उपासना सतत चालविली पाहिजे. विवाहाच्या वेळचा अग्नी विझला असला अथवा त्याची पत्नी मृत होऊन तो विधुर राहिला असला तर अशा परिस्थितीत ज्या अग्नीवर अन्न शिजविले जाते त्या **लौकिक** अथवा **पचन** अग्नीत त्या मनुष्याने नित्य द्यावयाच्या आहुती अर्पण कराव्या. ह्याशिवाय '**सभ्य**' नावाचा एक (सहावा) अग्नी असतो. शीत निवारण्याकरिता जो अग्नी श्रीमंत मनुष्याच्या घरात ठेवलेला असतो त्याला **सभ्य अग्नी** म्हणतात (मनु. ३·१७५ वरील मेधातिथि टीका). प्रत्येक गृहस्थाने सहा, पाच, चार, तीन, दोन अथवा एक अग्नी बाळगावे परंतु केव्हाही अग्निरहित राहू नये. जर कोणाजवळ लौकिक अग्नीशिवाय दुसरा कोणताच अग्नी नसला तर त्याने सर्व प्रकारचे विधी त्याच अग्नीमध्ये करावे. अग्नीच्या उपासनेला इतके महत्त्व देण्याच्या मागील कल्पना अशी असावी असे दिसते की अग्नीत दिलेल्या आहुती सूर्याला पोचतात, सूर्य पर्जन्याला पृथ्वीवर पाठवतो, पर्जन्यामुळे धान्य पिकते आणि धान्यामुळे सर्व जीवांचे पोषण होते (मनु. ३·७६).

सकाळी आणि सायंकाळी अग्नी आणि प्रजापती ह्या देवतांना उद्देशून आहुती अर्पण करतात. ह्या आहुती शिजविलेल्या धान्याच्या असतात. असे धान्य हविष्यान्न म्हणजे हवि म्हणून अर्पण करण्यास पात्र असलेले पाहिजे. अशा धान्यात यव (जवस), हे मुख्य असून त्याच्या खालोखाल तांदूळ येतात. उडीद, कोद्रव आणि गौर ही धान्ये निषिद्ध असतात. जवस आणि तांदूळ उपलब्ध नसल्यास दही, दूध आणि

त्यांच्या अभावी **यवागु** (कांजी) अथवा पाणी घेतल्यास चालते. काही यज्ञांत मांसाच्या आहुती देता येतात तथापि सकाळी आणि सायंकाळी करावयाच्या होमात मांसाचा उपयोग करता येत नाही.

गृह्याग्निसंबंधी अनेक नियम सांगितले आहेत. ज्या अग्नीत आहुती अर्पण करावयाच्या तो उत्तम प्रकारे पेटलेला असला पाहिजे. त्यातून धूर निघत नसला पाहिजे आणि निखारे तापून लाल झालेले असले पाहिजेत. अग्नीवर आपले पाय शेकू नयेत अथवा निजले असताना तो पायाकडील बाजूला ठेवू नये. अग्नीवर तोंडाने, सुपाने अथवा हाताने वारा घालू नये, तर पंख्याचा उपयोग करावा. गृह्याग्नी प्रथम स्थापन करतेवेळी अथवा पूर्वीचा अग्नी विझला असल्यास पुन्हा स्थापन करतेवेळी एखाद्या वैश्याच्या घरातून अथवा ज्याने पुष्कळ यज्ञ केले असतील अशा व्यक्तीकडून अग्नी आणावा अथवा घर्षण करून अग्नी निर्माण करावा. घर्षण करून तयार केलेल्या अग्नीबद्दल गोभिलगृह्यात (१·१·१५।१९) म्हटले आहे की असा अग्नी पवित्र असतो परंतु त्याच्या योगाने वैभव प्राप्त होत नाही.

संध्या वंदनाचे एक अंग म्हणून गायत्री आणि इतर धार्मिक मंत्रांचा **जप** करावयास शास्त्रात सांगितले आहे. सूर्याला उद्देशून म्हटलेल्या मंत्रांचा जप प्रातर्होमानंतर करावा आणि उपनिषदादी तत्त्वज्ञानाच्या ग्रंथांचा जप मध्याह्न कालच्या स्नानानंतर करावा असे याज्ञ. (१·९९ आणि १·१०१) मध्ये सांगितले आहे. पवित्र सूक्तांचा (आणि विशेषतः गायत्री आणि पुरुषसूक्त ह्यांचा) जपात समावेश करावा. जपाच्या योगानेच फक्त पूर्णत्व प्राप्त होते असे मनूने (५५·२१) म्हटले आहे. जप तीन प्रकारचा असतो. — **वाचिक** (मोठ्याने म्हटलेला), **उपांशु** (मनातल्या मनात म्हटलेला) आणि **मानस** (मनात चिंतन केलेला).

जप कुशासनावर बसून घरात अथवा नदीतीरावर अथवा गाईच्या गोठ्यामध्ये, अग्निशाळेत, तीर्थावर, देवाच्या मूर्तीसमीप, इत्यादी ठिकाणी करावा. ब्रह्मचाऱ्याने अथवा अग्नीची स्थापना केलेल्या गृहस्थाने गायत्री मंत्र १०८ वेळा जपावा. जपाच्या मंत्रात ॐ नमो विष्णवे, ॐ नमो वासुदेवाय इत्यादी मंत्रांचाही समावेश होतो. गणना केल्याशिवाय केलेला जप निष्फल होतो. जपाची गणना हाताच्या बोटांनी, रेघा ओढून, अथवा माळेचे मणी ओढून करावी. माळेचे मणी सोन्याचे, रत्नाचे, स्फटिकाचे, रुद्राक्षाचे, पद्माक्षाचे, इंद्राक्षाचे केलेले असावे.

होम आणि जप झाल्यावर काही काळ **शुभसूचक कृत्ये** करण्यात अथवा शुभ वस्तूंकडे पाहण्यात घालवावा. वडील मंडळींची भेट घेणे, आरशात अथवा तुपात आपले प्रतिबिंब पाहणे, केशभूषा करणे, अंजन अथवा काजळ डोळ्यात घालणे इत्यादी कृत्ये शुभसूचक असतात. ब्राह्मण, गाय, अग्नी, राजा प्रभृती व्यक्ती अथवा वस्तु मंगलकारक असतात (नारद—प्रकीर्णक ५४।५५).

शौचविधीपासून जपापर्यंतची कृत्ये करण्यात दिवसाचा पहिला अष्टमांश भाग निघून जाईल. दिवसाच्या **दुसऱ्या अष्टमांश** भागात ब्राह्मण गृहस्थाने आपल्या वेदाध्ययनाची उजळणी करावी, समिधा, फुले, कुश इत्यादी पदार्थ गोळा करावे. (दक्ष २·३३।३५). दिवसाच्या **तिसऱ्या अष्टमांश** भागात गृहस्थाने काम करावे आणि चरितार्थाला लागणारे द्रव्य मिळवावे (दक्ष २·३५). माता, पिता, गुरु, भार्या, अपत्ये, आश्रयाला आलेला दीन मनुष्य, अतिथि आणि अग्नि ह्यांचे पालनपोषण करणे अवश्य असते. ह्याशिवाय **संपन्न** गृहस्थाने ज्ञातिबंधु, सपिंड, निराश्रयी, अनाथ इत्यादिकांचे पालनपोषण केले पाहिजे (दक्ष. २·३६।३७). जे लोक आपले स्वतःचे पोट भरतात ते जिवंत असूनही वास्तविक मेल्यासारखेच असतात असे दक्षाने (२·४०) म्हटले आहे.

अनुक्रमणिका

दिवसाच्या **चौथ्या अष्टमांश** भागात (म्हणजे मध्याह्नापूर्वी) माध्याह्नस्नान व तर्पण करावे आणि नंतर माध्याह्न संध्या, देवपूजा, पंचमहायज्ञ ही कृत्ये करावी. बहुतेक ब्राह्मण प्रातःकाळी अथवा मध्याह्नापूर्वी एकदाच स्नान करतात.

**तर्पण** (पाणी अर्पण करून तृप्त करणे). प्रत्येकाने प्रतिदिवशी देव, ऋषी आणि पितर यांचे तर्पण केलेच पाहिजे असे मनूने (२·१७६) सांगितले आहे. प्रत्येकाने आपल्या स्वतःच्या वेदशाखेच्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणे तर्पण करावे.

**देवतर्पण** म्हणजे देवतांना उद्देशून सोडावयाचे पाणी तळहाताच्या ज्या भागाला **देवतीर्थ** म्हणतात त्या भागातून सोडावे. आश्वलायन गृह्यसूत्रात (३·४·१।५) दिलेल्या देवतातर्पणात एकूण ३१ देवतांची नांवे येतात. देवतेच्या नावापुढे जर एक देवता असेल तर 'तृप्यतु', दोन देवता असल्यास 'तृप्येताम्' आणि दोहोपेक्षा अधिक देवता असतील तर 'तृप्यन्तु' असे पद घालतात. (उदाहरणार्थ, प्रजापतिस्तृप्यतु, द्यावापृथिवीतृप्येताम् आणि सांख्याः तृप्यन्तु).

**ऋषितर्पण**– आश्वलायन गृह्याप्रमाणे ज्या ऋषींना पाणी अर्पण करतात त्यांचे दोन भाग केलेले असतात. पहिल्या भागात 'शतर्चिनः' प्रभृति बारा ऋषि असतात आणि त्यांना पाणी अर्पण करताना यज्ञोपवीत निवीत प्रकाराने धारण करतात. हे बारा ऋषी ऋग्वेदाच्या निरनिराळ्या मंडलांचे ऋषि आहेत. दुसऱ्या भागातील ऋषींचे दोन पोटविभाग आहेत. पहिल्या पोटविभागात पाच गट अथवा पदे आहेत. त्यात गर्गी, वडवा आणि सुलभा ह्या तीन स्त्रियांची नावे आहेत आणि इतर ऋषींत सुमन्तु प्रभृती व्यासांच्या चार शिष्यांची नावे आली आहेत. दुसऱ्या पोट विभागात १७ अलग अलग ऋषी आहेत आणि १८ वे तर्पण 'इतर सर्व आचार्यांना' उद्देशून आहे. ह्या सर्व ऋषींचा ऋग्वेद, ऋग्वेदाचे ब्राह्मण आणि आरण्यक ग्रंथ आणि प्रातिशाख्य सूत्रासारखे ऋग्वेदाशी संलग्न असलेले इतर ग्रंथ ह्यांच्याशी संबंध आहे. आधुनिक काळी दक्षिण भारतात ह्यापैकी प्रत्येक ऋषीला अथवा ऋषींच्या समूहाला दोन दोन वेळा पाणी देण्याचा प्रघात आहे.

**पितृतर्पण**– आश्वलायन गृह्यात (३·४·५) पितृतर्पण फारच त्रोटकपणे वर्णन केले आहे. पितृतर्पण हे ज्याचा पिता मृत असेल त्यानेच करावे. त्यावेळी पाण्यात तीळ मिसळावे आणि यज्ञोपवीत डाव्या हाताखालून घेऊन उजव्या खांद्यावरून लोंबते ठेवावे.

अलीकडील काळात ज्या पितरांना उद्देशून पाणी अर्पण करण्यात येते त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत : पिता, पितामह, प्रपितामह; माता, पितामही, प्रपितामही; मातामह, मातेचा पितामह, मातेचा प्रपितामह (पत्न्यांसह); सापत्नमाता; पत्नी; पुत्र (पत्नीसह); कन्या (पतीसह); चुलता (पत्नीसह); मामा (पत्नीसह); बंधु (पत्नीसह); पितृभगिनी (पतीसह); मातृभगिनी (पतीसह); भगिनी (पतीसह); श्वशुर (पत्नी आणि पुत्रासह); गुरु (गायत्री मंत्र आणि वेद शिकविणारा ह्या नात्याने पिता); शिष्य.

पितामह, पितामही ह्यांना रुद्ररूप आणि प्रपितामह आणि प्रपितामही ह्यांना आदित्यरूप अशा संज्ञा लावतात; आईच्या तीन पूर्वजांना अनुक्रमे वसु, रुद्र आणि आदित्य अशा संज्ञा लावतात आणि बाकीच्या सर्व पुरुष आणि स्त्री पूर्वजांना वसुरूप म्हणतात. स्त्रियांच्या नावापुढे 'दा' हा शब्द लावतात. माता, पितामही, प्रपितामही आणि सर्व पुरुष पूर्वजांना पितृतीर्थाने तीन वेळा पाणी देतात आणि इतर सर्व स्त्रीपूर्वजांना दोन वेळा पाणी देतात. पाणी देताना त्या व्यक्तीचे आपल्याबरोबरचे नाते, नाव आणि गोत्र ह्यांचा उच्चार करतात

आणि पुढे 'स्वधानमस्तर्पयामि' (मी स्वधा अर्पण करून आणि नमस्कार करून माझ्या अमुक पूर्वजाला संतुष्ट करतो) असे शब्द घालतात. निरनिराळ्या सूत्रांत ह्या तपशीलांत आणि देवतांच्या, ऋषींच्या नावांत भिन्नता आढळते आणि पितरांच्या बाबतीत काही पूर्वजांचा समावेश केलेला नसतो.

एकाद्या मनुष्याला एवढे विस्तृत तर्पण करावयास सवड नसल्यास त्याच्या करिता धर्मसिंधुप्रभृति निबंधग्रंथांनी एक अतित्रोटक विधी सांगितला आहे तो असा : त्याने 'आब्रह्मस्तंबपर्यंतम् ०' प्रभृति

[आब्रह्मस्तम्बपर्यन्त देवर्षिपितृमानवाः ।
तृप्यन्तुपितरः सर्वे मातृमातामहादयः ॥
अतीत कुलकोटीनां सप्तद्वीपनिवासिनाम् ।
आब्रह्मभुवनाल्लोकानिदमस्तु तिलोदकम् ॥] दोन श्लोक म्हणावे आणि तीन वेळा पाणी द्यावे. तर्पणात सामान्यतः उजव्या हातानेच पाणी सोडावयाचे असते. परंतु काही ग्रंथांत दोन्ही हातांनी म्हणजे ओंजळ करून पाणी सोडावयास सांगितले आहे.

आधुनिक काळी आह्निक तर्पण फारच क्वचित केले जाते. परंतु सामान्यतः बहुतेक ब्राह्मण वर्षातून एक वेळ श्रावण महिन्यात ब्रह्मयज्ञाचे एक अंग म्हणून तर्पण करतात. आह्निक तर्पणाशिवाय कोणत्याही महिन्याच्या वद्य चतुर्दशीला मंगळवार असल्यास अथवा नसल्यास **यमाप्रीत्यर्थ** एक विशिष्ट तर्पण करावयास सांगितले आहे. तसेच माघ महिन्यातील शुद्ध अष्टमीला महायोद्धा **भीष्म** ह्याच्या प्रीत्यर्थ एक तर्पण करावयाचे असते.

आश्वलायनाने स्वाध्यायाच्या (अथवा ब्रह्मयज्ञाच्या) पाठोपाठ तर्पण करावे असे सांगितले आहे. गोभिलाने (२.२९) तर्पणापूर्वी ब्रह्मयज्ञ करावा अथवा प्रातर्होमानंतर अथवा वैश्वदेवानंतर ब्रह्मयज्ञ करावा असे सांगितले आहे आणि काही विशेष कारण असल्याशिवाय ब्रह्मयज्ञ करू नये असे म्हटले आहे.

———–—

**अनुक्रमणिका**

## प्रकरण ४२

## पंचमहायज्ञ

(मू. ग्रं. पा. २.६९६-७०४)

**पंचमहायज्ञ**– म्हणजे प्रतिदिनी करावयाची पाच मोठी व्रते अथवा पाच मोठे यज्ञ. महायज्ञ अशी संज्ञा असलेली पाच कृत्ये प्रत्येक दिवशी केली पाहिजेत असा नियम अतिप्राचीन अशा वेदांच्या काळापासून अस्तित्वात होता. शतपथब्राह्मणात (११·५·६·१) ह्यांचा उल्लेख केला आहे. तैत्तिरीय आरण्यकात (२·१०) म्हटले आहे की देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, आणि ब्रह्मयज्ञ ह्या पाच महायज्ञांचा खरोखरच अविच्छिन्नपणे विस्तार झालेला आहे. कोणीही अग्नीत फक्त एका समिधेचे देखील हवन केले म्हणजे **देवयज्ञ** पुरा होतो; कोणी पितरांना स्वधा (श्राद्धभोजन) अर्पण केले, मग ते भोजन केवळ पाण्याच्या स्वरूपाचे असले तरीही त्याच्या योगाने **पितृयज्ञ** होतो; कोणी भूतमात्रांना (अन्नाचा) बलि अर्पण केला म्हणजे **भूतयज्ञ** होतो; कोणी ब्राह्मणांना अन्न दिले म्हणजे **मनुष्ययज्ञ** होतो; कोणी स्वाध्यायाचे अध्ययन केले, मग एक ऋचा किंवा एक यजुर्मंत्र अथवा एक साम म्हटले तरीही त्याच्या योगाने **ब्रह्मयज्ञ** होतो. ह्या पाच कृत्यांना 'महा' हे विशेषण त्यांची प्रशंसा करण्याच्या उद्देशाने लावले असून 'यज्ञ' ही संज्ञा आलंकारिक दृष्टीने लावली आहे असे आपस्तंबाने (१·४·१२·१३—१·४·१३·१) म्हटले आहे. ह्या पाच यज्ञांत आणि श्रौत यज्ञांत दोन बाबतींत भेद असतो. ह्या कृत्यांच्या बाबतींत पुरोहिताची मदत लागत नाही, त्यांत मुख्य कर्ता तो गृहस्थच स्वतः असतो. दुसरा भेद म्हणजे श्रौत यज्ञांचा हेतु स्वर्गप्राप्तीची इच्छा अथवा ऐश्वर्य, पुत्र आदी फलांची इच्छा हा असतो, परंतु ह्या पाच कृत्यांचा हेतु सृष्टिकर्ता परमेश्वर, प्राचीन ऋषी, पितर आणि इतर कोट्यावधी प्राणिमात्र ह्यांच्या संबंधी असलेल्या आपल्या कर्तव्याचे पालन करणे हा असतो. म्हणून श्रौतयज्ञांपेक्षा हे यज्ञ नैतिक आणि आध्यात्मिक दृष्टीने अधिक प्रगमनशील आणि उदात्त असतात. भक्ति, कृतज्ञता, आदर, प्रेमळ स्मृती, दया, सहिष्णुता या भावनांच्या योगानेच प्राचीन काळच्या आर्यांना हे पाच यज्ञ प्रतिदिवशी करण्याची प्रेरणा झाली असावी. नंतरच्या काळात ह्या दैनिक पाच यज्ञांच्या योजनेला दुसरेही हेतु चिकटवले गेले असावे असे दिसते. मनुप्रभृतींनी (मनु. ३·६८|७१; विष्णु ध. सू. ५९·१९|२० इ०) असे सांगितले आहे की प्रत्येक गृहस्थ चूल, जाते, केरसुणी, सूप ह्यांच्यासारख्या घरातील वस्तु, उखळ – मुसळ आणि पाणी भरण्याचे पात्र ह्या पाच ठिकाणी प्रत्येक दिवशी सचेतन प्राण्यांची हत्या करीत असतो अथवा त्यांना दुखापत करीत असतो. अशा हत्यांमुळे अथवा अपायांमुळे जे पाप लागते त्या पापाच्या (सूनांच्या) क्षालनाकरिता थोर ऋषींनी आह्निक पाचयज्ञांची योजना केली आहे. हे यज्ञ ज्या अनुक्रमाने केले जातात त्या कालानुक्रमाच्या दृष्टीने पाहिल्यास प्रथम ब्रह्मयज्ञ येतो, नंतर देवयज्ञ, त्यानंतर भूतयज्ञ, नंतर पितृयज्ञ आणि सर्वात शेवटी मनुष्ययज्ञ येतो. ह्या क्रमाने त्यांचे विवेचन ह्या ग्रंथात केले आहे.

**ब्रह्मयज्ञ**– प्रत्येकाने करावयाच्या वेदांचा अभ्यास (म्हणजे स्वाध्याय) हाच ब्रह्मयज्ञ होय. ब्रह्मयज्ञात पठन करावयाच्या ग्रंथांची नावे अनुशासन (वेदांगे), विद्या (देवजनप्रभृती विद्या), वाकोवाक्य (धार्मिक प्रवचने), इतिहासपुराण (परंपरागत इतिहास आणि आख्यायिका), गाथा, नाराशंसि (वीर पुरुषांच्या स्तुतीपर श्लोक) अशी शत. ब्रा. मध्ये (११·५·६·३|८) दिली आहेत. तैत्ति. आरण्यकात (२·१०|१३) ब्रह्मयज्ञ कसा आणि कोठे करावा हे सांगितले आहे. त्यात म्हटले आहे की ब्रह्मयज्ञ करण्याकरिता गावाबाहेर दूर जावे, यज्ञोपवीत उपवीत प्रकाराने धारण करून दर्भाच्या आसनावर बसावे,

डावा पाय खाली आणि उजवा पाय मांडीवर घेऊन पूर्वेकडे तोंड करून बसावे आणि नंतर वेदांचे अध्ययन करावे. त्याने डावा हात उताणा करून उजव्या मांडीवर ठेवावा आणि त्यावर उजवा हात झाकणासारखा ठेवावा. तै. आ. मध्ये म्हटले आहे की एखाद्याला गावाबाहेर जाणे शक्य न झाले तर त्याने गावातच दिवसा अथवा रात्रीदेखील वेदांचे मनातल्या मनात चिंतन करून ब्रह्मयज्ञ करावा. एकाद्याला बसवत नसेल तर त्याने उभ्याने अथवा निजून देखील ब्रह्मयज्ञ करावा, कारण वेदांचे अध्ययन करणे ही मुख्य गोष्ट असते (काळ आणि स्थळ ह्या गौण गोष्टी आहेत).

आधुनिक काळी ब्रह्मयज्ञ प्रत्येक दिवशी क्वचितच केला जातो. ब्रह्मयज्ञाचा एक ठरीव कार्यक्रम दक्षिणेतील बहुतेक ब्राह्मण वर्षातून एकदा श्रावण महिन्यात करतात. ऋग्वेदाच्या अनुयायांचा ब्रह्मयज्ञाचा कार्यक्रम पुढीलप्रमाणे असतो. प्रथम ओम् भूः भुवः स्वः ह्या व्याहृ ती आणि गायत्री मंत्र म्हणतात; नंतर ऋग्वेदाच्या आरंभीच्या ९ ऋचा म्हणतात; नंतर ऐतरेयब्राह्मणातील पहिले वाक्य म्हणतात; नंतर ऐत. आरण्यकाच्या पाच भागांपैकी प्रत्येक भागाचे पहिले वाक्य म्हणतात; नंतर कृष्ण आणि शुक्ल यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद यांची पहिली वाक्ये म्हणतात; नंतर निघंटु आणि सहा वेदांगे म्हणजे आश्वलायन श्रौत, निरुक्त, छंद, निघंटु, ज्योतिष्, शिक्षा, पाणिनीचे व्याकरण ह्यांची पहिली वाक्ये म्हणतात; नंतर यजुर्वेदातील पहिला पाद, आणि महाभारत, न्याय, पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा यांची पहिली सूत्रे म्हणतात; नंतर 'तच्छंयोरावृणीमहे०' हा आशीर्वाद मंत्र म्हणतात; आणि सरते शेवटी 'नमो ब्रह्मणे०' हा मंत्र तीन वेळा म्हणतात. हा ब्रह्मयज्ञ झाल्यानंतर देव, ऋषी आणि पितर ह्यांना उद्देशून तर्पण केले जाते.

धर्मसिंधु (३-पूर्वार्ध पा. २२९) ह्या ग्रंथात म्हटले आहे की तैत्तिरीय शाखेच्या लोकांनी ब्रह्मयज्ञाच्या प्रारंभी 'विद्युदसिविद्यमे पाप्मानमृतात् सत्यमुपैमि' हे शब्द म्हणावे आणि शेवटी 'वृष्टिरसि वृश्चमे पाप्मानमृतात् सत्यमुपैमि' हे शब्द म्हणावे. तैत्ति. आणि वाजस. शाखेचे लोक ब्रह्मयज्ञाच्या पूर्वी तर्पण करतात अथवा ब्रह्मयज्ञाच्या नंतर देखील काही वेळाने तर्पण करतात, कारण त्यांच्या प्रघाताप्रमाणे तर्पण हे ब्रह्मयज्ञाचे अंग नसते.

―――――

अनुक्रमणिका

## प्रकरण ४३

## देवयज्ञ

(मू. ग्रं. पा. २.७०५-७४०)

मनूने (३·७०) होमालाच देवयज्ञ असे मानले आहे. मागाहून झालेल्या स्मृतिग्रंथांत होम अथवा देवयज्ञ आणि देवपूजा ह्यात भेद केलेला असतो. मध्ययुगीन काळातील ग्रंथकार वैश्वदेवालाच देवयज्ञ मानू लागले परंतु देवांप्रीत्यर्थ केलेला होम हा वैश्वदेवाहून निराळा असतो असे काही ग्रंथकारांचे मत होते. मध्ययुगात आणि अर्वाचीन काळी होमाची कल्पना मागे पडली आणि होमाच्या जागी घरात ठेवलेल्या प्रतिमांची विस्तारपूर्वक पूजा करण्यात येऊ लागली.

प्राचीन वेदांच्या काळी देवांच्या प्रतिमांची पूजा सर्वत्र केली जात असे किंवा काय हे निश्चित सांगता येत नाही. ऋग्वेदात आणि इतर वेदांमध्ये अग्नी, सूर्य, वरुण, प्रभृती अनेक देवतांच्या पूजेचे उल्लेख आले आहेत. अशा देवतांना निरनिराळे अवयव असल्याचे दर्शविणारी काही वर्णने ऋग्वेदात आली आहेत ही गोष्ट खरी आहे. ह्यातील बहुतेक वर्णने काव्यमय आणि अलंकारिक स्वरूपाची आहेत असे म्हणता येईल. क्वचित् ठिकाणी (ऋ. ४·२४·१०; ऋ. ८·१·५) देवतांच्या प्रतिमांचे अस्तित्व दाखविणारी वर्णने केलेली
[क इमं दशभिर्ममेन्द्रं क्रीणाति धेनुभिः ।
यदावृत्राणि जङ्घनदथैनं मे पुनर्ददत् ॥ ऋ ४·२४·१०;
महे चन त्वामद्रिवः पराशुल्काय देयाम् ।
न सहस्राय नायुताय वज्रिवो न शताय शतामघ ॥ ऋ. ८·१·५] आहेत ही गोष्टही नाकबूल करता येणार नाही. तै. ब्राह्मणात (२·६·१७) तीन देवतांच्या सुवर्णाच्या मूर्तीच्या पूजेचा उल्लेख केला [होता यक्षस्पेशस्वतीः । तिस्रो देवीः हिरण्मयीः । भारतीर्बृहतीर्महीः । तै. ब्रा. २·६·१७] आहे. तथापि वेदकालातील आर्यांतील वरच्या दर्जाच्या लोकांच्या धार्मिक उपासनेत घरातील अथवा देवालयांतील मूर्तीचा समावेश होत नसे असे म्हटल्यास फारसे चुकीचे होणार नाही. त्या काळातील समाजातील खालच्या दर्जाच्या लोकात अथवा अशिक्षित अशा बहुजन समाजात धार्मिक उपासनेचे कोणते प्रकार प्रचलित होते ह्या गोष्टीचा निर्णय करता येईल असे वाङ्मय प्रायः मुळीच उपलब्ध नाही.

ऋग्वेदात (४·२१·५) 'शिश्नदेव' [मा शिन्शदेवा अपि गुर्ऋतं नः ॥ ऋ ७·२१·५.] असा शब्द आलेला आहे. परंतु त्याचा अर्थ 'विषयोपभोगात रत असणारा मनुष्य' असा आहे. जननेंद्रियाची चिन्हे असलेल्या वस्तु मोहेंजोदेरो येथील प्राचीन अवशेषांत सापडल्या आहेत. परंतु ते अवशेष वगळल्यास आतापर्यंत उपलब्ध झालेले सर्वात जुनी म्हणून प्रसिद्ध असलेली लिंगे इ.स. च्या पहिल्या शतकाच्या पूर्वीच्या काळातील नाहीत. इ.स.च्या पूर्वी अनेक शतके मूर्तीची पूजा भारतात सर्वत्र प्रचलित होती. गृह्य आणि धर्मसूत्रांत देवाच्या मूर्तींचे उल्लेख आले आहेत (मानवगृह्य २·१५·६; विष्णु ध. सू. २३·३४ इ०). हे ग्रंथ ख्रि. पूर्व ५ व्या अथवा ४ थ्या शतकाच्या पूर्वी झालेले आहेत. ख्रि. पूर्व ३०० च्या सुमारास झालेल्या कौटिल्याच्या अर्थशास्त्रात (२·४) शिव, वैश्रवण, लक्ष्मी, जयन्त इत्यादी देवतांच्या देवालयांचा उल्लेख केला आहे. मूर्तिपूजेचा प्रघात वैदिक आर्यांत कसा उत्पन्न झाला असावा ह्याबद्दल निरनिराळी मते अस्तित्वात आहेत. कोणाच्या मते हा प्रघात बुद्धधर्माच्या अनुकरणाने अथवा शूद्र आणि द्रविडवंशाच्या लोकांपासून घेतला असावा. परंतु ह्या दोन्ही उपपत्या सयुक्तिक वाटत नाहीत. बुद्ध ख्रि. पू. ४८३ च्या सुमारास मृत्यू पावला

अनुक्रमणिका

आणि बुद्धाच्या मूर्ती त्याच्या निर्याणानंतर बऱ्याच काळपर्यंत करण्यात येत नसत आणि तोपर्यंत त्याची उपासना काही प्रतिकात्मक चिन्हांनी करण्यात येत असे. परंतु वर सांगितल्याप्रमाणे ख्रि. पूर्व. ४ थ्या अथवा ५ व्या शतकात देवालये आणि देवतांच्या मूर्ती ह्यांचा प्रसार सर्व भारतभर झालेला होता. शूद्रांपासून हा प्रघात उचलला असावा असे गृहीत धरण्यास पुरेसा आधार मिळत नाही. तेव्हा हा प्रघात दुसऱ्या कोणाजवळून न घेता स्वाभाविकपणेच भारतात उत्पन्न झाला असण्याचा संभव आहे. देवतेला उद्देशून आहुती अर्पण करताना त्या देवतेचे ध्यान करावे असे ऐत. ब्रा. मध्ये (७·१·१·८) सांगितले आहे. ह्या वरून आहुती देणारा त्या देवतेला मनुष्यासारखा आकार आणि भावना असल्याची कल्पना करू लागला असावा. वैदिक मंत्रांत उल्लेख केलेल्या देवतांच्या स्वरूपाविषयी निरुक्तामध्ये (७·६।७) जी निरनिराळी मते वर्णन केली आहेत त्यांत एक असे आहे की त्या देवतांना वास्तविकपणे मनुष्यासारखा आकार नसतो परंतु काही विशिष्ट हेतूच्या सिध्यर्थ त्या देवता निरनिराळे आकार धारण करतात.

[अथाकारचिन्तनं देवतानाम् । - - - अपि वा अपुरुष-

विधानामेव सतामेते कर्मात्मानः स्युः । निरुक्त ७·६।७.] ह्या मतामध्ये अवताराच्या कल्पनेचा उगम आहे. निरनिराळ्या कारणांनी आणि विशेषतः अहिंसेच्या तत्त्वामुळे, निरनिराळ्या उपासनांच्या मुळे, आणि उपनिषदांत प्रतिपादन केलेल्या ब्रह्मासंबंधी तत्त्वज्ञानाच्या योगाने वैदिक यज्ञांचा जेव्हा क्रमाक्रमाने लोप होत गेला तेव्हा मूर्तिपूजेचा सांप्रदाय उत्पन्न झाला. तथापि प्रारंभी त्या सांप्रदायाचा प्रसार मध्ययुगीन आणि अर्वाचीन काळच्या सारखा सार्वत्रिक अथवा विस्तृत प्रमाणावर झाला नव्हता.

हिंदुधर्मात **अधिकारभेद** हे एक विशिष्ट तत्त्व आहे. प्रत्येकाला एकाच प्रकारची शिस्त अथवा एकाच प्रकारचे खाण्यापिण्यासंबंधी नियम पालन करणे शक्य नसते. ह्याकरिता प्रत्येकाच्या बुद्धिमत्तेप्रमाणे, भावनेप्रमाणे, आणि आध्यात्मिक योग्यतेप्रमाणे त्याच्या अधिकारात, कर्तव्यात, विधीत आणि पूजनात भिन्नता राखण्यात येते मूर्तिपूजा ही प्रत्येक व्यक्तीने केलीच पाहिजे अशी गोष्ट नसे. एकत्र कुटुंबात देवपूजा आणि वैश्वदेव हे विधी सर्व कुटुंबाकरिता एकत्रच करावे असे शास्त्रात सांगितले आहे. मूर्तिपूजेमध्ये आपण एकाद्या भौतिक पदार्थाचा आदर करीत नसून पुढे असलेल्या मूर्तीच्या रूपात श्रेष्ठ परमात्म्याचे ध्यान करीत आहो अशी भावना असते. अशा मूर्तीच्या अथवा चिन्हाच्या योगाने सामान्य मनुष्याला आपले चित्त देवाच्या ठिकाणी एकाग्र करण्याला साहाय्य होते. देवाची पूजा मूर्तीच्या ठिकाणी जशी करता येते तशीच ती ज्याच्या त्याच्या आध्यात्मिक योग्यतेप्रमाणे पाण्यामध्ये, अग्नीत, सूर्याच्या ठिकाणीं, ब्राह्मणांच्या ठिकाणीही करता येते असे निरनिराळ्या ग्रंथांत

[अर्चायां स्थण्डिलेऽग्नौ वा सूर्ये वाप्सु हृदि द्विजे ।

द्रव्येण भक्तियुक्तोर्चेत् स्वगुरुं मानमायया ॥ भागवत ११·२७·९·] सांगितले आहे (भाग. ११·२७·९).

रत्ने, सुवर्ण, रुपे, तांबे, पितळ, लोखंड, दगड, लाकूड, माती इत्यादी पदार्थांच्या मूर्ती करतात. त्यांपैकी रत्नाची मूर्ती सर्वात श्रेष्ठ असून मातीची मूर्ती सर्वात निकृष्ट प्रकारची असते. एकाद्या पदार्थावर काढलेले चित्र आणि मनातल्या मनात केलेले ध्यान हेही मूर्तीचे प्रकार असतात. पाषाणांपैकी गंडकी नदीत सापडणारा काळ्या रंगाचा शालग्राम, द्वारकेत मिळणारा चक्रांकित ह्यांची विष्णूच्या मूर्ती म्हणून पूजा करतात; नर्मदा नदीतील बाणलिंगाचा शिवपूजेमध्ये उपयोग करतात; धातुमय पाषाणाचा दुर्गेच्या पूजेत उपयोग करतात; स्फटिकाचा सूर्याच्या पूजेत उपयोग करतात; लाल रंगाच्या पाषाणाचा गणेशाच्या पूजेमध्ये उपयोग करतात. देवांच्या मूर्ती किती मोजमापाच्या कराव्या ह्याचे मत्स्यपुराणात (२५८·२३।३५) वर्णन केले आहे.

ज्या देवतांची पूजा करतात त्यांत विष्णु (आणि त्याचे निरनिराळे अवतार), शिव, दुर्गा, गणेश आणि सूर्य ह्या देवता प्रमुख आहेत. ह्या देवतांच्या पूजेला पंचायतन पूजा म्हणतात आणि तो प्रघात आद्य श्रीशंकराचार्य ह्यांनी रूढ केला अशी आख्यायिका आहे. पूजेकरिता ह्या पाच देवतांची मांडणी उपासकाच्या आवडीप्रमाणे निरनिराळ्या प्रकारची करतात.

मध्ययुगीन काळापासून असे मानण्यात येते की, जगाचे आणि जगातील संस्कृतीचे रक्षण करण्याकरिता विष्णूने मत्स्य, कूर्म, वराह प्रभृती दहा अवतार पृथ्वीवर धारण केले होते. ह्या अवतारांच्या कल्पनेच्या अंधुक खुणा सर्वात जुन्या अशा वैदिक वाङ्मयात (ऋ. ८·१७·१३; ४·२६·१; शत. ब्रा. १·८·१·५) देखील दिसून येतात. विष्णूच्या अवतारांची कल्पना इ.स. च्या पूर्वी काही शतके प्रचलित होती. दुष्टांचे शासन करण्याकरिता, सज्ञनांचे संरक्षण करण्याकरिता आणि धर्माची स्थापना करण्याकरिता देव भूतलावर अवतार घेतो असे महाभारत आणि रामायण (शान्ति. ३३९·१०३।४; अयोध्या १·७) ह्यांत वारंवार सांगितले आहे. अशा अवतारांची संख्या सामान्यतः दहा असल्याचे मानण्यात येते आणि त्यात बुद्ध हा एक अवतार असल्याचे काही पुराणांत (मत्स्य २८५·६।७; अग्नि, अध्या. २।१६; वराह ४·२) सांगितले आहे. ह्यावरून असे दिसते की इ.स. च्या सातव्या शतकाच्या सुमारास सर्वसाधारण हिंदु लोक बुद्धाला विष्णूचा अवतार मानीत असत. ज्यावेळी बुद्धाचे अनुयायी त्याला देव मानू लागले त्यावेळी पशुयज्ञ बहुतेक लुप्त झाले होते, तसेच सर्व भूतांवर दया करावी, सर्वांना दानधर्म करावा, आत्मसंयमन करावे ही बुद्धाची विशेष मते वैदिक धर्माच्या अनुयायांवर मान्य झाली होती. त्यामुळे बुद्धधर्म हा भिन्नधर्म मानण्याचे कारणच नष्ट झाले आणि बुद्धाला विष्णूचा अवतार मानू लागले. बुद्धधर्म पुढे भारतातून समूळ नाहीसा झाला ह्याचे कारण त्या धर्माचा छळ झाला असे कोणालाही म्हणता येणार नाही. अशोकाच्या वेळेपासून भारतातील राजे आणि स्थानिक सत्ताधारी सामान्यतः सर्व धर्मांच्या लोकांशी सहिष्णुतेने वागत असत. बुद्ध धर्मातील भिक्षु आणि भिक्षुणी ह्यांचा नैतिक अधःपात झाल्याने बुद्ध धर्माचा ऱ्हास होऊ लागला आणि पुढे इ.स. १२०० च्या सुमारास मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊ लागून बुद्ध धर्माचा पुरता नाश झाला.

**राम** आणि **कृष्ण** ह्यांची पूजा ते विष्णूचे अवतार म्हणून ख्रि. पूर्व अनेक शतकांपासून करण्यात येत असे. **त्रिमूर्ती**
[सृज्यते ब्रह्ममूर्तिस्तु रक्षते पौरुषी तनुः।
रौद्रीभावेन शमयेत्तिस्रोऽवस्थाः प्रजापतेः ॥ वनपर्व २७२·४८] म्हणजे ब्रह्मा, विष्णु आणि शिव ह्या तिघांची संयुक्त देवता ही कल्पनादेखील फार प्राचीन काळची आहे. (वनपर्व २७२·४८). तथापि ब्रह्मदेवाची देवालये सांप्रत काळी फारच तुरळक आढळतात. त्यापैकी अजमीर जवळचे पुष्कर येथील देवालय सर्वात अधिक प्रसिद्ध आहे. सध्या प्रचलित असलेल्या पूजासांप्रदायात शिवपूजेचा सांप्रदाय सर्वात जुना असल्याचे दिसून येते. मोहेंजोदरो येथील प्राचीन अवशेषात एका योग्याची आकृती सापडली आहे आणि ती शिवाची असावी असे वाटते. नंतरच्या काळात विष्णु आणि शिव ह्यांचे अनुयायी परस्परांची निंदा करू लागले. तथापि महाभारत
[शिवाय विष्णुरूपाय विष्णवे शिवरूपिणे। वनपर्व ३९·७६;
एकं निन्दति यस्तेषां सर्वानेव स निन्दति।
एकं प्रशंसमानस्तु सर्वानेव प्रशंसति ॥ वायु ६६·११४] (वन ३९·७६) आणि काही पुराणे (वायु. ६६·११४) ह्यांनी शिव आणि विष्णुमध्ये भेद केला नाही असेच म्हटले आहे. **सूर्याची** मूर्ती कशी करावी ह्याचे वर्णन मत्स्यपुराणात (११·३१।३३) केले आहे. गणेशाची पूजा जैन धर्मात देखील करीत असत. निरनिराळ्या **ग्रहांच्या** प्रतिमांच्या पूजेची रूढी बरीच प्राचीन काळची आहे. (याज्ञ. १·२९६।२९८). विद्येची देवता **सरस्वती** हिचे सर्वशुक्ला असे वर्णन इ.स. ६०० च्या पूर्वी होऊन गेलेल्या दण्डि कवीने केले आहे. दक्षिण भारतात **दत्तात्रेय** हे दैवत अतिशय लोकप्रिय आहे आणि दत्तपूजेचा सांप्रदाय इ.स. च्या आरंभीच्या शतकांपूर्वी

**अनुक्रमणिका**

प्रचलित झाला असावा. जाबाल उपनिषद, मार्कंडेय पुराण (अ. १६।१९), भागवत (९·२३), मत्स्यपुराण (४७·२४२), आणि दुसऱ्याही काही पुराणांत दत्तात्रेयाचे उल्लेख आलेले आहेत.

विष्णुधर्मोत्तर पुराणात (अ. ६५) केलेले वासुदेव अथवा विष्णूच्या पूजेचे वर्णन सर्वात प्राचीन वर्णनांपैकी एक आहे. बौधायन गृह्य परिशेष सूत्रात (२·१४) देखील विष्णूच्या नित्यपूजेचे वर्णन केले आहे आणि त्याच ग्रंथात (२·१७) शिवाच्या पूजेचाही विधी वर्णन केला असून काही थोड्या भेदाने तो विधी विष्णूच्या पूजेच्या सारखाच असतो.

देवपूजेच्या संपूर्ण विधीमध्ये काही प्रकार अथवा टप्पे असतात. (पूजाप्रकाश पा. ९७-१४९). त्यांना **उपचार** असे म्हणतात. सामान्यतः हे उपचार सोळा असल्याचे सांगितलेले असते. आवाहन, आसन, पाद्य, अर्ध्य, आचमन, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, अनुलेपन अथवा गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, नमस्कार, प्रदक्षिणा, आणि विसर्जन अथवा उद्वासन हे ते **सोळा उपचार** होत. काही ग्रंथांत ह्या उपचारांच्या नावात थोडे भेद आहेत. ज्याला सोळा उपचार अर्पण करण्याचे सामर्थ्य नसेल त्याने त्यांपैकी दहा अथवा पाच अथवा एक उपचार करावा. पुरुषसूक्ताच्या १६ ऋचा आहेत. प्रत्येक उपचारापूर्वी त्यांपैकी क्रमाने एक एक ऋचा म्हणतात. स्त्रिया आणि शूद्र ह्यांनी 'शिवाय नमः' अथवा 'विष्णवे नमः' असे शब्द म्हणावे. ह्या उपचारांपैकी आवाहन आणि विसर्जन हे उपचार स्थिर मूर्ती असल्यास असत नाहीत आणि त्यांच्या पूजेत १४ च उपचार असतात. ह्या उपचारांपैकी आसन, अर्ध्य, गंध ह्यांच्यासारखे काही उपचार श्राद्धाला आमंत्रण केलेल्या ब्राह्मणांच्या बाबतीत असतात. जेव्हा मूर्तिपूजेचा सर्वत्र प्रचार झाला तेव्हा आमंत्रित ब्राह्मणांना जे उपचार करीत असत तेच उपचार देवांच्या मूर्तींना करू लागले.

ह्या उपचारांपैकी काहींविषयी थोडेसे विवेचन करू.

**अर्ध्य**– विष्णूला अर्पण करावयाच्या अर्ध्यामध्ये चंदनाचे गंध, फूल आणि अक्षता हे पदार्थ पाण्यामध्ये मिसळलेले असावे आणि असे पाणी शंखातून द्यावे.

**पंचामृत**– दूध, दही, तूप, मध आणि साखर ह्या पांच पदार्थांनी अनुक्रमे प्रतिमेला स्नान घालावे. सर्वात शेवटी साखर हा पदार्थ घ्यावा म्हणजे त्याच्या योगाने प्रतिमेला लागलेला ओषटपणा निघून जातो. देवतेचे चित्र अथवा मातीची मूर्ती असल्यास पाण्याने अथवा पंचामृताने स्नान घालावयाचे नसते. पंचामृत शक्य नसल्यास तुळशीची पाने मिसळलेल्या पाण्याने प्रतिमेला स्नान घालावे कारण तुळशीचे झाड विष्णूला प्रिय असते. स्नान घातलेल्या पाण्याला **तीर्थ** म्हणतात आणि ते फार पवित्र मानले जाते. पूजा करणारा, त्याच्या कुटुंबातील मंडळी आणि मित्र त्या पाण्याचे आचमन करतात आणि आपल्या मस्तकावर देखील शिंपडतात.

**अनुलेपन**– चंदन, दारुक, कस्तुरी, कापूर, केशर, जायफळ ह्यांच्यापैकी कोणत्याही पदार्थाचे अनुलेपन असावे.

**फुले**– विष्णूच्या पूजेला जाईचे फूल सर्वात उत्तम. शिवाच्या पूजेला रुईची फुले, बिल्व, द्रोणाची फुले, धोतऱ्याची फुले घ्यावी. नीलकमल सर्वांच श्रेष्ठ असते.

अनुक्रमणिका

आदल्या दिवशी वाहिलेली फुले नवी वाहण्यापूर्वी बाजूला करावी. त्यांना **निर्माल्य** म्हणतात. निर्माल्य मस्तकावर धारण केल्यास फार पुण्य लागते.

**नैवेद्य**– निषिद्ध पदार्थ नैवेद्यात अर्पण करू नये. म्हशीचे आणि बकरीचे दूध निषिद्ध नसते तरीही ते नैवेद्याला घेऊ नये.

**तांबूल**– तांबूलाचा प्रघात इ.स. च्या पूर्वी अथवा आरंभीच्या शतकांच्या सुमाराला बहुधा दक्षिण भारतात प्रचलित होऊन तेथून तो उत्तरेकडे पसरला असावा. तांबूलात नागवेलीची पाने, सुपारी, चुना, कापूर, वेलदोडे, लवंगा, कंकोळ, खोबरे, बदाम, जायफळ, जायपत्री, केशर, कात हे तेरा पदार्थ असतात आणि त्याचे तेरा गुण असतात म्हणून तांबूलाल **त्रयोदशगुणी म्हणतात.**

**सूर्याच्या उपासनेत** सूर्याला १२ अथवा १२ च्या पटीइतके नमस्कार घालण्याचा सांप्रदाय आहे. ह्या नमस्कारांचा तृचाकल्प म्हणून एक प्रकार असतो. त्यात सूर्याच्या नावापूर्वी ओम् हा शब्द आणि ऱ्हाँ, ऱ्हीँ ह्यांच्यासारखी गूढार्थसूचक काही अक्षरे आणि सौरसूक्तातील काही ऋचा घालतात.

**शिवाची पूजा** लिंगाच्या रूपाने अथवा मूर्तीच्या स्वरूपात केली जाते. असा समज आहे की शिवभक्त असलेल्या बाणासुराने निरनिराळ्या स्थळी १४ कोटी लिंगांची स्थापना केली होती. अशा लिंगांना **बाणलिंगे** म्हणतात. नर्मदा, गंगा आदि पुण्य नद्यात जी बाणलिंगे सापडतात ती अशा बाणलिंगाच्या आकाराची असतात. सुप्रसिद्ध **१२ ज्योतिर्लिंगे** निरनिराळ्या ठिकाणी [ओंकार (मांधाता येथे), महाकाळ (उज्ञयिनी येथे), त्र्यंबक (नासिकाजवळ), घृष्णेश्वर (वेरूळ येथे), नागनाथ (अहमदनगरच्या पूर्वेस), भिमाशंकर (सह्याद्रीवर भीमेच्या उगमाजवळ), केदारनाथ (गढवाल प्रांतात), विश्वेश्वर (काशी येथे), सोमनाथ (सौराष्ट्रात), वैद्यनाथ (परळी जवळ), मल्लिकार्जुन (श्रीशैल्यावर), रामेश्वर (दक्षिणभारतात).] आहेत त्यांच्यापैकी बरीचशी लिंगे मध्यभारतात आणि पश्चिम भारतात आहेत. शिवभक्ताला रुद्राक्षाच्या माळा हातात, दंडात, गळ्यात अथवा मस्तकावर धारण करणे अवश्य असते. प्राचीन काळापासून प्रत्येक महिन्याची वद्य चतुर्दशी हा दिवस शिवाला पवित्र मानला आहे.

**दुर्गेची पूजा**– प्राचीन काळापासून प्रचलित आहे. (भविष्यपु. कृत्यरत्ना. पा. ३२७). तिला रक्त आणि मद्य प्रिय

[स्वमांसरुधिरैर्दत्तेर्देवी तुष्यति वै भृशम् ।
महिषीछागमेषाणां रुधिरेण तथा नृप ॥
एवं नानाम्लेच्छगणैः पूज्यते सर्वदस्युभिः ।
अङगवङगकलिङगैश्च किंनरैः बर्बरैः शकैः ॥

भविष्यपुराण, कृत्यरत्नाकर पा. ३५७.] असतात. दुगची **शवती** ह्या नावानेही पूजा केली जाते. शक्तिपूजेचे प्राबल्य सर्व भारतभर पसरलेले आहे.

**देवपूजेची विधाने**– प्रांताप्रांतात आणि जाती जातीत देखील भिन्न असतात. पश्चिम भारतातील ब्राह्मणांत प्रचलित असलेल्या देवपूजेच्या विधानात पुढील निरनिराळी अंगे असतात : आचमन, प्राणायाम, महागणपती आणि दुसऱ्या काही विशिष्ट देवतांची स्तुती, गणेशाची बारा नावे, गणेश, गौरी, विष्णु यांची स्तुती असलेले श्लोक, देशकाल, ह्यांचा उच्चार आणि १६ उपचारांनी युक्त पूजा करण्याचा संकल्प, गणेशाचे ध्यान, आसन विधी आणि पृथ्वीची स्तुती; शरीराच्या १६ अंगांवर पुरुषसूक्ताच्या १६ ऋचांनी न्यास, देवतांचे आणि पुण्य नद्यांचे उदकपात्राच्या ठिकाणी आवाहन आणि त्या पात्रांची गंध, पुष्प आणि अक्षतांनी पूजा; तशाच प्रकाराने शंख, घंटा, यांची पूजा, स्वतःच्या अंगावर आणि पूजासामुग्रीवर पाणी

अनुक्रमणिका

शिंपडणे, हातात फुले घेऊन विष्णु, शिव, गणेश, सूर्य आणि दुर्गा ह्यांचे ध्यान; पुरुषसूक्ताच्या १६ ऋचा म्हणून आपल्यास प्रिय असलेल्या देवतेला सोळा उपचार अर्पण करणे; शेवटी ह्या पूजेने देवता तृप्त होवोत आणि सर्व कर्म ब्रह्माला अर्पण असो असा संकल्प करणे.

एकाहून अधिक देवतांची पूजा करावयाची असताना पूजेचे उपचार अर्पण करण्याचे दोन प्रकार असतात. आवाहनापासून नमस्कारापर्यंत सर्व उपचार प्रथम कोणत्या तरी एका देवतेला अथवा प्रमुख देवतेला अर्पण करावे आणि नंतर तेच उपचार एकामागून एक असे दुसऱ्या देवतेला अथवा अनेक देवतांना अर्पण करावे. ह्या प्रकाराला **कांडानुसमय** अशी संज्ञा आहे; दुसऱ्या प्रकारात अनेक देवतांचे आवाहन क्रमाने केले जाते; नंतर सर्वांना आसन दिले जाते; नंतर पाद्य इत्यादी नमस्कारापर्यंतचे उपचार अर्पण केले जातात. ह्या प्रकाराला **पदार्थानुसमय** अशी संज्ञा आहे. सर्वसाधारणपणे ह्या दुसऱ्या प्रकाराचाच अवलंब करण्यात येतो. (आश्व. गृ. १.२४.७ वरील नारायणाची टीका).

इ. स. च्या प्रारंभीच्या शतकांपासून देवपूजेच्या विधानावर तंत्रशास्त्रातील ग्रंथांचा फार मोठा परिणाम झाला आहे आणि मुद्रा आणि न्यास नावाच्या गूढार्थाच्या रचना करण्यात पूजकाचे मन गुंतून राहू लागले. भागवत पुराणात (११·२७·७) देवपूजेचे वैदिकी, तांत्रिकी आणि मिश्र असे तीन प्रकार सांगितले असून वैदिकी आणि मिश्र ह्या दोन प्रकारच्या पूजा तीन वर्णांकरिता असतात आणि तांत्रिकी पूजा शूद्रांकरिता असते असे म्हटले आहे.

देवपूजेचा विहित काल माध्याह्नकाली तर्पणानंतर आणि वैश्वदेवाच्या पूर्वी असतो. परंतु कोणाच्या मते देवपूजा वैश्वदेवानंतर करावी. सर्व प्रकारची देवाप्रीत्यर्थ करावयाची कर्तव्ये आणि विधी दिवसाच्या पूर्वार्धात केले पाहिजेत असे दक्षाने सांगितले आहे.

―――――

# प्रकरण ४४

## वैश्वदेव

(मू. ग्रं. पा. २.७४१-७४८)

दिवसाच्या ५ व्या विभागात गृहस्थाने आपल्या शक्तीप्रमाणे देव, पितर, मनुष्ये यांना आणि जीवजंतूंना देखील अन्न वाटले पाहिजे असे दक्षस्मृतीत (२·५६) सांगितले आहे. मध्ययुगीन काळातील काही ग्रंथांत (स्मृत्य. सार ४७; परा. मा. १·१· पा ३८९) म्हटले आहे की वास्तविकपणे वैश्वदेवात देवयज्ञ, भूतयज्ञ आणि पितृयज्ञ ह्या तीन आह्निक यज्ञांचा समावेश होतो. ह्या विधीला वैश्वदेव

[यत्र विश्वे देवा इज्यन्ते तद्वैश्वदेविकं कर्म ।

परा. माधवीय १ भाग १ पा. ३८९] असे म्हणण्याचे कारण त्यात सर्व देवांना उद्देशून हवन करण्यात येते अथवा सर्व देवांप्रीत्यर्थ अन्न शिजविले जाते. (परा. मा. पा ३८९). तथापि प्राचीन गृह्यसूत्रांत हे तीन यज्ञ पृथक्पणे सांगितले आहेत. एकदा सकाळी आणि नंतर सायंकाळी असा दोन वेळा वैश्वदेव करावा असे सर्व प्राचीन स्मृतींत सांगितले आहे. (मनु. ३·१२१; विष्णु ध. सू. ५९·१३). तथापि नंतरच्या काळात वैश्वदेव एक वेळा प्रातःकाळीच फक्त करण्यात येऊ लागला आणि संकल्पामध्ये दोन्ही वेळच्या वैश्वदेवांचा समावेश करण्यात येऊ लागला.

वैश्वदेवाच्या विधीमध्ये पुढील अंगे असतात : अग्नीचे आवाहन, अग्नीचे ध्यान, शिजविलेल्या अन्नापैकी काही अन्न दुसऱ्या पात्रात घेऊन त्यावर तूप ओतणे, डावा हात हृदयावर ठेऊन उजव्या हाताने त्या अन्नातून सूर्य, प्रजापती, सोम वनस्पती, अग्नीषोम, इंद्राग्नी, द्यावापृथिवी, धन्वंतरी, इंद्र, विश्वेदेव, ब्रह्मा, ह्या देवतांना उद्देशून अग्नीमध्ये हवन करणे, नंतर अग्नीमधील विभूती (राख) काढून ती कपाळ, कंठ, छाती, नाभी, उजवा आणि डावा खांदा आणि मस्तक ह्या ठिकाणी लावणे आणि शेवटी बुद्धी, स्मृती, यश इत्यादी देण्याबद्दल अग्नीची प्रार्थना करणे.

शूद्रानेही पाचही यज्ञ वैदिक अथवा पौराणिक मंत्र न म्हणता फक्त 'नमः' असे म्हणून अर्पण करावे आणि वैश्वदेवाकरिता अपक्व अन्न उपयोगात आणावे (याज्ञ. १·१२१ वरील मिताक्षरा).

**बलिहरण अथवा भूतयज्ञ**—वैश्वदेवाकरिता घेतलेल्या अन्नापैकी एका भागातून पुढील देवतांना बली अर्पण करावयाचे असतात. भूतयज्ञात बलि अग्नीत न देता जमिनीवर द्यावयाचे असतात. बली द्यावयाची जमीन हाताने पुसून त्या जागेवर पाणी शिंपडावे आणि नंतर बलि ठेवून त्यावर पाणी ओतावे. बलि अर्पण करावयाच्या देवतांमध्ये वर सांगितलेल्या वैश्वदेवांतील देवतांखेरीज पाणी, औषधी, वनस्पती, गृह, गृहदेवता, वास्तुदेवता, इंद्र आणि इंद्रपुरुष, यम आणि यमपुरुष, वरुण आणि वरुणपुरुष, सोम आणि सोमपुरुष, ब्रह्म आणि ब्रह्मपुरुष, विश्वेदेव, दिवाचारी (अथवा नक्तंचारी), रक्षस् ह्या देवतांचा समावेश करतात. इंद्रापासून रक्षस् पर्यंतच्या देवतांना द्यावयाचे बलि विशिष्ट दिशांना ठेवावयाचे असतात. ह्यानंतर उरलेले अन्न दक्षिण दिशेला जमिनीवर पितरांना स्वधा असे म्हणून ओतावे आणि त्यावेळी यज्ञोपवीत अपसव्य करावे.

अनुक्रमणिका

वैश्वदेवाकरिता शिजविलेल्या अन्नामध्ये कुत्री, चांडाल, पतित ह्यांसहित सर्वांना सहभागी करावे [देवेभ्यश्च हुतादन्नाच्छेषाद्भूतबलिं हरेत् । अन्नं भूमौ श्वचाण्डालवायसेभ्यश्च निक्षिपेत् ॥ याज्ञ. १·१०३] (याज्ञ. १·१०३). ह्या नियमाच्या मुळाशी सर्वभूतमात्रांवर दया करावी, त्यांच्यावर उपचार करावा, अत्यंत क्षुद्र जंतूंना देखील परमेश्वराकडून चेतना मिळत असते आणि अशा रीतीने त्यांचा आपल्याशी संबंध असतो अशा उदात्त भावना आणि कल्पना असतात.

**पितृयज्ञ**– पितृयज्ञ तीन प्रकारांनी करता येतो. पहिला प्रकार तर्पण करणे (मनु. ३·७०), दुसरा प्रकार बलिहरण करून उरलेले अन्न पितरांना अर्पण करणे (मनु. ३·९१) आणि तिसरा प्रकार प्रतिदिवशी एकतरी ब्राह्मण भोजनाला बोलावून त्याला अन्न अर्पण करून श्राद्ध करणे. (मनु. २·८२।८३). ह्या नित्य करावयाच्या श्राद्धामध्ये शिजलेल्या अन्नाचे पिंड अर्पण करावयाचे नसतात, तसेच पार्वण श्राद्धाचेही कित्येक नियम आणि विधी ह्या श्राद्धाला लागत नाहीत. (स्मृतिमुक्ता. आह्निक पा. ४०२).

———–—

अनुक्रमणिका

## प्रकरण ४५

## नृयज्ञ अथवा मनुष्ययज्ञ

(मू. ग्रं. पा. २.७४९-७५६)

अतिथीचा सत्कार करणे म्हणजेच नृयज्ञ अथवा मनुष्ययज्ञ असे मनूने (३·७०) सांगितले आहे. अतिथिसत्काराची कल्पना निरनिराळ्या वेदांत आणि ब्राह्मण ग्रंथांत आढळते. तै. उप. मध्ये (१·११·२) विद्यार्थ्याला केलेल्या उपदेशात 'अतिथि देवो भव' (अतिथीचा सत्कार कर) असे एक वाक्य आहे.

अतिथी दुसऱ्याकडे संपूर्ण तिथी (म्हणजे दिवस) वस्ती करीत नाही म्हणून त्याला अतिथी म्हणतात; जो ब्राह्मण (दुसऱ्याकडे) फक्त एक रात्रपर्यंतच पाहुणा राहतो तो अतिथी अशा व्याख्या पराशराने (१·४२) सांगितल्या आहेत.

अतिथिसत्कार हे कृत्य बलिहरणानंतर करावयाचे असते. बलिहरण केल्यानंतर गृहस्थाने आपल्या घराच्या आंगणापुढे गाईचे दूध काढण्याला जितका वेळ लागतो तितका वेळ अतिथीचा सत्कार करण्याकरिता त्याची मार्गप्रतीक्षा करीत उभे राहावे असे बौधायन (गृ. २·९·१।२) प्रभृतींनी सांगितले आहे. कोणी मुहूर्ताचा अष्टमांश असा निश्चित काळ सांगितला आहे. (मार्क. पु. २९·२४।२५).

निरनिराळ्या वर्णांचे अतिथी आले असल्यास त्यांना त्यांच्या वर्णाप्रमाणे अथवा त्यांच्या योग्यतेप्रमाणे अग्रमान द्यावा. (वसि. ध. सू. ११·६). क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र हे वास्तविकरीत्या ब्राह्मणाचे अतिथी होत नाहीत. तथापि जर असे अतिथी ब्राह्मणाच्या घरी भोजनाच्या वेळी आले तर त्यांचाही सत्कार ब्राह्मण अतिथींच्या नंतर करावा. (मनु. ३·११०·११२). वैश्वदेवाच्या अंती आलेल्या सर्व व्यक्तींना, चांडालाला देखील, गृहस्थाने अन्न द्यावे असे आपस्तंबाने (ध. सू. २·४·९·५) सांगितले आहे. सामर्थ्य असून सत्पात्र अतिथीला अन्न न दिल्यास पाप लागते, परंतु अपात्र अतिथीला अन्न दिले नाही तर पाप लागत नाही. तथापि त्यालाही अन्न दिल्यास पुण्य लागते. एकादा शत्रू देखील अतिथी म्हणून एकाद्याच्या घरी आला तर त्याला सत्कारपूर्वक वागविले पाहिजे असे (शान्तिपर्व १४६·५ मध्ये) सांगितले आहे. तथापि एकाद्या अतिथीचे यजमानाशी वैर असेल तर त्या अतिथीने त्या यजमानाने दिलेले अन्न भक्षण करू नये असे मनुप्रभृतींनी (४·२१३) सांगितले आहे.

अतिथीच्या सत्कारात पुढील कृत्ये करावयाची असतात. अतिथीला सामोरे जाणे, पाय धुण्याकरिता पाणी देणे, आसन देणे, त्याच्यासमोर दिवा लावून ठेवणे, त्याला अन्न देणे आणि रहाण्यास जागा देणे, स्वतः त्याची सेवा करणे, निजण्याकरिता शय्या देणे आणि तो जेव्हा जाईल तेव्हा त्याच्याबरोबर काही थोडे अंतर पोचवावयास जाणे. सत्काराच्या ह्या तपशीलाविषयीही अनेक नियम सांगितले आहेत. मनु-(३·१०१) प्रभृतींनी असे म्हटले आहे की जर एकाद्याजवळ सर्व अतिथींना देण्यास पुरेल इतके अन्न नसेल तर त्याने सर्व अतिथींना निदान पाणी, राहण्यास जागा, निजण्याकरिता गवत आणि मधुर भाषण इतक्या तरी गोष्टी द्याव्या.

अतिथिसत्काराविषयीच्या नियमांचा हेतु सर्व भूतमात्रावर दया करणे हाच होता. तथापि त्या कर्तव्याचे पालन करण्याचे महत्त्व लोकांच्या मनावर बिंबविण्याकरिता स्मृतींनी अतिथिसत्काराचे पुण्य-प्राप्तीसारखे दुसरेही उद्देश सांगितले आहेत. ब्रह्मचारी आणि संन्यासी हे अन्नाचे स्वामी असतात (म्हणजे त्यांचा अन्नावर प्रथम अधिकार असतो) म्हणून त्यांना दिलेल्या भोजनाचे फार महत्त्व सांगितले आहे. (परा. १·४६।४७). घरमालकाने अतिथींच्या आधी भोजन करू नये. अतिथी आणि ब्राह्मण ह्यांनी भोजन केल्यावर जे अन्न शिल्लक राहते त्याला 'विघस' अशी संज्ञा असते आणि प्रत्येकाने अशा अन्नाचेच नित्य सेवन करावे. (मनु. ३·२८५). अतिथिविषयी अशा भावना हिंदूंच्या मनात असल्यामुळे भारतात इतर देशांप्रमाणे गरिबांकरिता निराळा कायदा करण्याची आवश्यकता वाटली नाही.

अतिथी परत जाण्यास निघेल तेव्हा त्याला कोठपर्यंत पोचविण्यास जावे ह्याबद्दल अनेक मते आहेत. (आप. ध. सू. २·४·९·२-४). त्याचे वहान जेथे सोडले असेल तेथपर्यंत, अथवा एकाद्या तलावापर्यंत अथवा देवालयापर्यंत अथवा नदीपर्यंत अथवा सीमेपर्यंत त्याच्याबरोबर जावे आणि तेथे त्याला प्रदक्षिणा घालून 'पुन्हा भेट होईपर्यंत मी आपला निरोप [समेत्य न्यायतो निवर्तेत । आरामसभाप्रपातडागदेवगृहमहाद्रुमनदीनामन्यतरस्मिन् प्रदक्षिणं कुर्याद्वाचमुस्तृज्य पुनर्दर्शनायेति । शङ्खलिखित (गृहस्थ रत्ना. पा. २९२)] घेतो' असे म्हणावे. (शंखलिखित).

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ४६

## भोजन

(मू. ग्रं. पा. २.७५७-८०६)

धर्मशास्त्रावरील ग्रंथांत ज्या अत्यंत महत्त्वाच्या विषयांचे विवेचन केलेले असते त्यांपैकी भोजन हा एक विषय असतो आणि त्या ग्रंथांत कोणते अन्न ग्राह्य आणि कोणते त्याज्य ह्या विषयीच्या नियमांना (विवाहासंबंधीच्या नियमांच्या खालोखाल) फारच महत्त्व देण्यात येते. अत्यंत प्राचीन काळापासून अन्नाच्या शुद्धतेला फार महत्त्व देण्यात येते असे. छां. उप. (७·२६·२) मध्ये म्हटले आहे [आहारशुद्धौ सत्वशुद्धिः सत्वशुद्धा ध्रुवा स्मृतिः स्मृतिलम्भे सर्वग्रन्थीनां विप्रमोक्षः ।] की "अन्नात शुद्धता असली म्हणजे मन शुद्ध होते, मन शुद्ध असले म्हणजे शुद्ध आत्मज्ञानाची स्मृती प्राप्त होते आणि तसे झाले म्हणजे जीवाला संसारात गुंतवून ठेवणाऱ्या बंधांपासून मुक्तता होते."

भोजनासंबंधी जे निरनिराळे उल्लेख वैदिक वाङ्‌मयात आढळतात त्यांपैकी काही पुढे दिले आहेत. ऋग्वेदातील (६·३०·३) उल्लेखावरून असे दिसते की खाली बसून भोजन करण्याचा प्रघात होता. तैत्ति. ब्रा. (१·४·९) आणि शत. ब्रा. (२·४·२·६) यांत सांगितले आहे की मनुष्याने दिवसातून फक्त दोन वेळा भोजन करावे. गाय व्याल्यानंतर पहिले दहा दिवस तिचे दूध पिऊ नये असे तै. ब्रा. मध्ये (२·१·१) म्हटले आहे. छां. उप. मध्ये उषस्ति चाक्रायणीची जी कथा आली आहे त्यावरून असे दिसून येते की महान संकाटाच्या वेळी जेव्हा कोणतेच अन्न मिळेनासे होईल तेव्हा कोणतेही अन्न-दुसऱ्याने भोजन केलेल्या पात्रात उरलेले अन्नदेखील भक्षण करण्यास प्रत्यवाय [सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये तद्दर्शनात् । वेदान्तसूत्र ३·४·२८।३१ हे सूत्र उषस्ति चाक्रायणाच्या छां. उ. मधील कथेला अनुलक्षून आहे.] नसतो. (वेदा. सू. ३·४·२८।३१). कौषीतकी ब्रा. (२१·३१) मध्ये असा उल्लेख आला आहे की दासीपुत्राच्या संगतीने भोजन करू नये.

कोणत्या दिशेकडे तोंड करून भोजन करावे ह्यासंबंधी निरनिराळे नियम सांगितले आहेत. आपस्तंब (१·११·३१·१) प्रभृती धर्मसूत्रांत सांगितले आहे की भोजन करतेवेळी पूर्वेकडे तोंड करावे. ज्याची माता जिवंत असेल त्याशिवाय इतरांनी दक्षिणेकडे तोंड करून भोजन करण्यास प्रत्यवाय नाही. (आप. ध. सू. २·८·१९·१।२). निरनिराळ्या दिशांकडे तोंड करून भोजन करणाऱ्याला काही विवक्षित लाभ होतात असे मनु (२·३२) आणि अनुशासन पर्व (१०४·५७) यात सांगितले आहे. वामन आणि विष्णु पुराणांत म्हटले आहे की दक्षिणेकडे आणि पश्चिमेकडे तोंड करून भोजन करू नये. (गृह रत्ना. पा. ३१२). प्रत्येकाने एकान्तात भोजन करावे, स्वतःच्या नातलगांच्या अथवा ब्राह्मणांच्या समवेत देखील भोजन करू नये असेही काही ग्रंथकारांनी म्हटले असून बृहस्पतीने असे करण्याचे कारण असे सांगितले आहे की जेव्हा अनेक लोक एकाच सलग पक्तींत भोजनाला बसतात तेव्हा त्या पंक्तीत बसलेल्या एका व्यक्तीच्या पातकात त्या पंक्तीत बसलेले सर्व इतर लोक वाटेकरी होतात. (स्मृतिचं. १ पा. २२८). आधुनिक काळात देखील उत्तर भारतातील पुष्कळ लोक ह्या मताप्रमाणे चालतात. 'नऊ भय्ये आणि दहा चुली' ही म्हण सुप्रसिद्ध आहे.

दक्षाने (२·५६ आणि ६८) सांगितले आहे की दिवसाच्या पाचव्या विभागात म्हणजे दिनमध्यानंतर १॥ तासाच्या अवधीत गृहस्थाने भोजन करावे. रात्रीचे भोजन सूर्यास्तानंतर १॥ प्रहर (म्हणजे ४॥ तास)

अनुक्रमणिका

झाल्यानंतर करावे असे गोभिल स्मृतीत (२·३३) सांगितले आहे. कोणीही सकाळी अति लौकर भोजन करू नये. तसेच मध्यरात्री अथवा दिवसरात्रीच्या संधिकाळात भोजन करू नये. दोन भोजनांच्या मध्यंतरच्या काळात फळे आणि मुळे ह्यांच्या व्यतिरिक्त काही खाऊ नये.

भोजन करावयाचे पात्र सुवर्णाचे, चांदीचे, तांब्याचे, कमळाच्या पानांचे अथवा पळसाच्या पानांचे केलेले असावे असे वेदव्यासाने (३·६७।६८) सांगितले आहे; परंतु त्या बाबतीत काही भिन्न मते आहेत. गृहस्थाने तांब्याचे पात्र वापरण्यास निषेध केला असून त्याने कास्य (काशाचे) पात्र वापरावे असे काहींनी म्हटले आहे. संन्यासी, ब्रह्मचारी आणि विधवा यांना कांस्यपात्र घेण्यास निषेध केला आहे. लोखंडाच्या अथवा मातीच्या पात्रात भोजन करू नये असे हारीताने (स्मृती चं. १ पा. २२२) सांगितले आहे. त्यालाही काही पर्याय सांगितले आहेत. उत्तम प्रकारे तासलेले असेल तर लाकडाचे पात्र देखील भोजनास घेता येते. सांप्रत काळीदेखील (विशेषतः ज्ञातिभोजनात आणि विवाहसमारंभात) भोजनाकरिता केळीची पाने अधिक पसंत करतात. सन्माननीय पाहुण्यांकरिता अथवा श्राद्धाच्या ब्राह्मणांकरिता चांदीची ताटे अधिक पसंत करतात अथवा निरनिराळ्या झाडांच्या पानांच्या टांचलेल्या पत्रावळींचा उपयोग करतात.

भोजनाला बसण्यापूर्वी भोजन करावयाच्या जागेच्या बाहेर दोन वेळा आचमन केले पाहिजे आणि भोजन पुरे झाल्यावर एकदा आचमन केले पाहिजे. ही रूढी फार प्राचीन काळापासून चालत आली आहे कारण तिचा उल्लेख छां. (५·२·२) आणि बृहदा. (६·१·१४) उपनिषदांत केला आहे. भोजन करताना यज्ञोपवीत उपवीत प्रकाराने धारण केले पाहिजे आणि अंगावर पांघरण्यास एक वस्त्रही घेतले पाहिजे. भोजन करताना गृहस्थाने आपल्या हातात सुवर्ण अथवा रत्न (आंगठी वगैरे) धारण करावे. अन्न वाढावयास आणले म्हणजे भोजन करणाऱ्या मनुष्याने त्या अन्नाला वंदन करावे. (मनु. २·५४।५५). पात्रात अन्न वाढले म्हणजे भोजन करणाऱ्याने अन्नाच्या सभोवती पाणी शिंपडावे. त्यावेळी म्हणावयाचा मंत्र [ऋतं त्वा सत्येन परिषिञ्चामीति सायं परिषिञ्चति । सत्यं त्वर्तेन परिषिञ्चामीति प्रातः । तै. ब्रा. २·१·११·] सकाळी आणि सायंकाळी निरनिराळा असतो. (तै. ब्रा. २·१·११). त्यानंतर पात्रात वाढलेल्या अन्नापैकी काही अन्न भोजनपात्राच्या उजव्या बाजूला जमिनीवर पश्चिमेकडे सुरुवात करून पूर्वेकडे यम, चित्रगुप्त, प्रेत यांना अर्पण करावे. (स्मृति चं. १. पा. २२४). ह्या नावांत काही भेद आहेत. आधुनिक काळी हे बली चित्र, चित्रगुप्त, यम आणि यमदूत, सर्व भूते ह्यांना अर्पण करतात. त्यानंतर थोडेसे पाणी प्राशन करावे आणि त्यावेळी तू अमृताचे वसतिस्थान आहेस अशा अर्थाचा मंत्र म्हणावा. ह्या कृतीला '**आपोषण**' अशी संज्ञा आहे. त्यानंतर भोजन करणाऱ्याने तूपमिश्रित अन्नाचे पाच घास प्राणांना अर्पण करावे. ह्या प्राणांची नावे प्राण, व्यान, अपान, समान, आणि उदान अशा क्रमाने घ्यावी आणि ह्या प्राणाहुतीं नंतर ब्रह्मन्च्या नावाने एक सहावा घास घ्यावा असे बृहत्पराशराने (आह्निकप्रकाश पा. ४६९) सांगितले असून सध्याच्या काळी तसाच प्रघात आहे. ह्या प्राणाहुती देत असताना पूर्णपणे मौन धारण करावे.

भोजन करीत असताना कसे बसू नये ह्याविषयी काही निर्बंध सांगितले आहेत. उदाहरणार्थ, भोजन करताना आपला पाय ताणून लांब करू नये अथवा दुसऱ्या एकाद्या आसनावर ठेऊ नये, आपला हात स्वतःच्या डाव्या पायावर ठेऊ नये, पादत्राणे अथवा खडावा घालून भोजनास बसू नये, चामड्याच्या पदार्थाला स्पर्श करू नये. आपल्या स्वतःच्या पत्नीसमवेत भोजन करू नये असेही काहींनी सांगितले आहे आणि कोणी त्यासंबंधी अपवाद सांगितले आहेत. स्मृत्यर्थसारात (पा. ६९) म्हटले आहे की विवाहात स्वतःच्या पत्नीसमवेत एकाच पात्रात भोजन करता येते. किती अन्न भक्षण करावे ह्याविषयी अनेक नियम आहेत. संन्याशाने आठ घास भक्षण करावे, वानप्रस्थाने १६ घास भक्षण करावे, गृहस्थाने ३२ घास भक्षण

करावे आणि वेदाध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्याने किती घास भक्षण् करावे ह्याला मर्यादा नाही असे आप. (२·४·९·१३) प्रभृती धर्मसूत्रांत उद्धृत केलेल्या श्लोकात सांगितले आहे. परंतु आपस्तंबाने म्हटले आहे की गृहस्थाला आपले काम योग्य प्रकारे करता यावे ह्याकरिता त्याने भोजनात कसर करू नये. आहिताग्नि पुरुषाने दिवसातून अनेक वेळा भोजन करण्यास प्रत्यवाय नाही.

एका सलग पंक्तिमध्ये बसून भोजन करणाऱ्याला अनेक नियम पाळावे लागतात. उदाहरणार्थ, त्या पंक्तीमधील कोणीही एकाने इतरांच्या अगोदर आचमन घेतले अथवा तो पात्रावरून उठला तर त्या पंक्तीतील इतरांना आपआपल्या पात्रातील अन्न भक्षण करण्याचे बंद करावे लागते. असा अडचणीचा प्रसंग येऊ नये म्हणून निरनिराळे उपाय योजण्यात येतात. जर भोजन करणाऱ्या दोन व्यक्तींमध्ये अग्नी, भस्म, खांब, मार्ग अथवा दार आले अथवा त्यांच्यामधील जमीन कमीअधिक उंचीची असली तर ती पंक्ती सलग होत नाही. अनेक पुरुष एकाच रांगेत बसलेले असले तरी जर एकाच्या आणि दुसऱ्याच्या दरम्यान भस्माचा पट्टा ओढलेला असला आणि ते एकमेकांना शिवलेले नसले तर अशा पुरुषांना सहभोजनाचा दोष लागत नाही असे बृहस्पतीने (अपरार्क पा. ४७६) म्हटले आहे. (म्हणजे असा पट्टा ओढला असला तर निरनिराळ्या जातीचे लोकही एका पंक्तीत बसले तरी चालेल). ज्यांच्या समवेत एकाच पंक्तीमध्ये भोजन करणारे लोक पावन होतात त्यांना **पंक्तिपावन** [पङ्क्तिर्येन पाव्यते स पङ्क्तिपावनः । गौ. १५·२८ वरील हरदत्तटीका] अशी संज्ञा आहे (गौतम १५·२८ वरील हरदत्ताची टीका) आणि ज्यांच्या समवेत एकाच पंक्तीत भोजन करणारे लोक भ्रष्ट होतात त्यांना **पंक्तिदूषण** म्हणतात. अशा प्रकारच्या पंक्तिपावन ब्राह्मणांच्या विस्तृत याद्या निरनिराळ्या ग्रंथांत (गौतम १५·२९ इ०) दिल्या आहेत. उदाहरणार्थ, ज्याला वेदाची सहा अंगे येत असतात, ज्याला त्रिसुपर्णसूक्ते पाठ येतात, धर्मशास्त्राचे ज्याने अध्ययन केले आहे, ज्याच्या मातेचा विवाह ब्राह्मविधीने झाला आहे अशांचा पंक्तिपावनांमध्ये समावेश होतो. पंक्तिदूषणांमध्ये कुष्ट रोगी, व्यभिचारी, ब्राह्मणांना विहित नसणारे व्यवसाय करणारा, वेदांचा, यज्ञांचा, पितरांचा अथवा गुरूचा त्याग करणारा इत्यादिकांचा समावेश होतो.

जेव्हा भोजन करणारे एका पंक्तीमध्ये बसलेले असतील तेव्हा त्या सर्वांना सारख्या प्रकारचेच अन्न वाढले पाहिजे आणि त्यांच्यामध्ये **पंक्तिभेद** करता कामा नये. डाव्या हाताने कोणीही भोजन करू नये, पाणी पिऊ नये अथवा भोजन करीत असताना ओंजळ करून पाणी पिऊ नये, भोजन करीत असताना एक ब्राह्मण दुसऱ्या ब्राह्मणाला शिवला तर त्याने भोजन करण्याचे थांबवावे अथवा भोजन पूर्ण झाल्यावर प्रायश्चित्त म्हणून १०८ वेळा गायत्री मंत्राचा जप करावा. सध्याच्या काळी अशा प्रसंगी सामान्यतः डोळ्याला पाणी लावतात.

पात्रात वाढलेले सर्व अन्न भक्षण करू नये. दही, मध, तूप ह्यासारख्या काही पदार्थाव्यतिरिक्त इतर पदार्थांचा काही तरी अंश पात्रात वगळावा. असे वगळलेले अन्न स्वतःच्या पत्नीला, सेवकाला अथवा दासाला द्यावे. ह्याबद्दलही मतवैचित्र्य आहे. भोजन पुरे झाल्यावर आपोशनाचा मंत्र म्हणावा आणि थोडेसे पाणी प्यावे. भोजनानंतर हळूहळू दात घासावे, चूळ भरावी आणि नंतर तांबूल भक्षण करावा. ब्राह्मणाचे भोजनाचे पात्र ब्राह्मणाव्यतिरिक्त कोणी उचलू नये.

सूर्यग्रहण व चंद्रग्रहण यांत अन्न भक्षण करू नये. इतकेच नव्हे तर लहान मुले, अत्यंत वृद्ध आणि आजारी ह्यांच्या व्यतिरिक्त इतर कोणी प्रत्यक्ष ग्रहणाच्या पूर्वी अनुक्रमे चार आणि तीन प्रहर भोजन करू नये. ग्रहणाला सुरुवात झाली म्हणजे प्रत्येकाने स्नान करावे, दाने द्यावी, तर्पण करावे अथवा श्राद्ध करावे.

ग्रहण सुटले म्हणजे स्नान करून मग भोजन करावे. एकाद्या गाईला अथवा ब्राह्मणाला अपघात झाला असताना अथवा राजा संकटात सापडला असताना (मृत झाला असताना) कोणीही भोजन करू नये.

निरनिराळे पदार्थ खाण्यास निषेध का असतात ह्याची कारणे भविष्यपुराणात दिली आहेत. (अपरार्क पा २४१). काही पदार्थ **जातिदुष्ट** अथवा **स्वभावदुष्ट** असतात, उदाहरणार्थ, लसुण, कांदा, वगैरे; काही पदार्थ **क्रियादुष्ट** असतात म्हणजे त्यांच्यावर केलेल्या क्रियेमुळे निषिद्ध मानलेले असतात, उदा० पतित, चांडालादिकांनी पाहिलेले अन्न; काही पदार्थ **कालदुष्ट** असतात, उदा० शिळे अन्न; काही पदार्थ संसर्गदुष्ट असतात, उदा० कुत्र्याचा स्पर्श झालेले अन्न; काही पदार्थ **सहृल्लेख** असतात म्हणजे मनाला किळसवाणे असतात, उदा० विष्टा इ०; काही पदार्थ **रसदुष्ट** असतात म्हणजे त्यांची चव नष्ट झालेली असते, उदा० एकाच दिवशी पायस अथवा खीर भक्षण करणे; काही पदार्थ **परिग्रहदुष्ट** असतात, उदा० पतितासारख्या व्यक्तीचे स्वामीत्व असणारे.

मांसभक्षणाच्या बाबतीत मागील इतिहास पाहता असे दिसून येते की ऋग्वेदाच्या काळी बैल, वंध्या गाई, मेंढ्या ह्यांच्यासारख्या पशूंचे मांस यज्ञात देवतांना अर्पण करण्यात येत असे. यज्ञाकरिता अथवा मांसाकरिता फक्त वंध्या गाईचा वध करण्यात येत असे आणि दुभत्या गाई ह्या वध करण्यास अपात्र मानल्या जात असत. हा प्रघात ब्राह्मण ग्रंथांच्या काळीही चालू होता. त्याचबरोबर गाईबद्दलची पूज्य भावनाही वेदांच्या काळापासून अस्तित्वात आहे. गाईला ऋग्वेदात 'देवी' असे म्हटले असून तिचे दूध, दही, तूप, मूत्र आणि शेण ह्या पाच वस्तूंचे पाण्यात केलेले मिश्रण– **पंचगव्य**– अनेक पातकांपासून शुद्ध करते असे मानले जात असे. ब्राह्मणांच्या आणि गाईच्या संरक्षणाकरिता आपला स्वतःचा प्राण देणारा ब्रह्महत्येच्या पातकातून मुक्त होतो असे मनूने (११·७९) सांगितले आहे. धार्मिक विधींशिवाय इतर कोणत्याही कृत्यात प्राण्यांची हिंसा करणे कमी प्रतीचे असल्याचे मानण्यात येऊ लागले. मांसभक्षणाने अशुचित्व येते असे वाटू लागले. आर्य लोकांचा भारताच्या मध्य, पूर्व आणि दक्षिण भागांत प्रसार होत गेल्यावर तेथील हवामानाच्या योगाने आणि धान्य व भाजीपाला ह्यांच्या विपुलतेमुळे मांसभक्षण करणे अनावश्यक होऊ लागले. त्या काळात देखील सर्व प्राचीन धर्मशास्त्रकारांनी आहाराकरिता आणि यज्ञाकरिता जीवांची हत्या करावयास अनुमती दिली होती. इतकेच नव्हे तर श्राद्ध, मधुपर्क, देव, पितृकार्य ह्यांच्यासारख्या काही विशिष्ट प्रसंगी गाईची हत्या करण्यात येत असे.

निरनिराळ्या पशूंच्या आणि पक्षांच्या मांसासंबंधी आणि मत्स्यांसंबंधी धर्मशास्त्रावरील ग्रंथांत अनेक नियम सांगितले आहेत. साळई, ससा, कासव, ह्याच्या सारखे पाच नखे असणारे काही प्राणी वगळून बाकीचे सर्व पाच नखी प्राणी निषिद्ध मानले आहेत. गाई आणि बैल ह्यांचेही मांस भक्षण करू नये असे कोणी सांगितले असून कोणी ते भक्षण करण्यास प्रत्यवाय नाही असेही म्हटले आहे. मनुस्मृतीतही मांसभक्षणासंबंधी भिन्न भिन्न मते प्रतिपादन केली आहेत. प्रथमतः काही विशिष्ट विधींत पशूची हत्या करावयास अनुमती दिली असून त्या व्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रसंगी पशुहत्या करू नये असे म्हटले आहे (मनु. ५·४१). पुढे यज्ञात देखील पशुहत्या करू नये आणि मांसभक्षण वर्ज्य करावे असे म्हटले आहे. (५·४६·५५) आणि शास्त्रात मुभा दिलेल्या प्रसंगी देखील पशुहत्येपासून आणि मांसभक्षणापासून निवृत्त झाल्यास फार मोठे पुण्य प्राप्त होते असेही शेवटी [न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने । प्रवृत्तिरेषा भूतांना निवृत्तिस्तु महाफला ॥ मनु ५·५६·] म्हटले आहे (५·५६). ह्यावरून असे दिसते की त्या ग्रंथाच्या काळी मांस भक्षणाच्या विरुद्ध असणारे आणि काही विरोध नसणारे असे लोक होते. हळूहळू भारतातील लोकसंख्येपैकी बऱ्याच लोकांनी मांसभक्षण सोडून दिले आणि मांसभक्षण निषिद्ध मानणारे लोक देखील क्वचित प्रसंगी मांसभक्षण करू

अनुक्रमणिका

लागले अथवा आपण करतो ते चुकीचे आहे परंतु आपणास त्याचा त्याग करवत नाही अशी भावना ठेऊन मांसभक्षण करू लागले.

प्राचीन कालापासून क्षत्रिय हे मांसभक्षक आहेत आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथांत त्यांना बकरा, मेंढा, मृग ह्यांच्यासारख्या काही विशिष्ट प्राण्यांचे मांस भक्षण करण्यास अनुमती दिली आहे. तसेच गाई, गाढव, उंट, घोडे, हत्ती प्रभृती काही विशिष्ट प्राण्यांचे मांस वर्ज्य सांगितले आहे. पक्ष्यांच्या बाबतीत गृध्रासारखे कच्च्या मांसावर उपजीविका करणारे सर्व पक्षी, चातक, पोपट, हंस, बगळे इत्यादी पक्षी निषिद्ध असतात आणि वनकोंबडे, मोर ह्यांचे मांस भक्षण करण्यास अनुमती असते. मत्स्यांपैकीही काही मत्स्य निषिद्ध असतात आणि काही मत्स्य भक्षणीय सांगितलेले असतात. मत्स्य खाणे हा मांसभक्षणातील सर्वात वाईट प्रकार आहे असे सांगून सर्व प्रकारचे मासे निषिद्ध असल्याचे मनूने (५·१४।१५ आणि ५·१६) म्हटले आहे आणि त्याला अपवादही सांगितले आहेत.

दुधासंबंधी अनेक नियम सांगितले आहेत. शेळी, उंट आणि एक खूर असणारे सर्व पशू ह्यांचे दूध सर्वदा निषिद्ध असते. वायुपुराणात (७८·१७) म्हशीचे दूध देखील निषिद्ध सांगितले आहे. गाय, म्हैस, मेंढी ह्यांचे दूध प्रसूतीनंतर पहिले दहा दिवस निषिद्ध असते. कपिला गाईचे दूध ब्राह्मणांखेरीज इतर सर्वांना निषिद्ध असते. फार प्राचीन काळापासून अनेक प्रकारच्या वनस्पती आणि शाकभाज्या निषिद्ध मानल्या आहेत. लशुन, पलांडु (कांदा), गृंजन, भोंकर इत्यादींचा निषिद्ध पालेभाज्या आणि वनस्पतींमध्ये समावेश केला आहे. (व. ध. सू. १४·३३; मनु. ५·५।६). कोणी अलांबु (वाटोळा भोपळा) देखील निषिद्ध मानला आहे. काही स्मृतींनी हिंग निषिद्ध मानला आहे.

कडधान्यांपैकी राजमाष, स्थूलमुद्ग (मेथी), मसुर, कोद्रव, कुलथ्थ, इत्यादी निषिद्ध सांगितली आहेत. शिळे झालेले अथवा आंबुस झालेले पदार्थ खाऊ नयेत. क्रियादुष्ट अन्नाच्या बाबतीत बरेच अन्न असल्यास काही विशिष्ट प्रकाराने ते शुद्ध करण्याविषयी नियम सांगितले आहेत.

कोणाकडील अन्न भक्षण करावे ह्याविषयी अनेक नियम सांगितले आहेत. गेल्या २ हजार वर्षांच्या अवधीत ह्या बाबतीत रूढीमध्ये अतिशय फेरफार झाले आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ह्या तीन उच्च वर्णाच्या व्यक्तींच्या घरी अन्नग्रहण करण्यास ब्राह्मणाला प्रत्यवाय नाही असे गौतमाने (१७·१) सांगितले आहे. अलिकडच्या काळात तेलात अथवा तुपात बनविलेले पदार्थ अथवा दुधापासून बनविलेले पदार्थ ह्यांच्या बाबतीत फारसे निर्बंध पाळीत नाहीत. तथापि पाण्यात शिजविलेले अन्न स्वतःच्या जातीहून अन्य जातींच्या व्यक्तीकडून अथवा आपल्याच जातीतील पोटविभागातील व्यक्तीकडून देखील स्वीकारीत नाहीत. शहरांत आणि मोठ्या गावांत हे निर्बंध शिथिल करण्याकडे जोराची प्रवृत्ती आढळून येते. प्राचीन काळच्या स्मृतींनी काही विशिष्ट प्रकारच्या शूद्राकडील शिजविलेले अन्न भक्षण करण्यास ब्राह्मणाला मोकळीक दिली होती. अशा शूद्रांना **भोज्यान्न** अशी संज्ञा होती. (गौ. १७·६ मनु ४·२५३). नंतरच्या काळात झालेल्या हरदत्तासारख्या ग्रंथकारांनी देखील असे सांगितले आहे की अशा शूद्रांकडील अन्न एकाद्या ब्राह्मणांने अत्यंत आपत्तीच्या वेळीच फक्त भक्षण करण्यास प्रत्यवाय नाही. कोणकोणत्या व्यक्तींच्या घरी अन्न ग्रहण करावे अथवा करू नये ह्याविषयी अनेक नियम असले तरी गृहस्थाश्रमीयाने आपल्यापुढे असा आदर्श ठेवावा की शक्य तोवर दुसऱ्याच्या घरी अन्न ग्रहण करावयाचे नाही. (मनु. ३·१०४; याज्ञ. १·११२).

**मद्यपानाच्या** बाबतीत असे आढळून येते की ऋग्वेदामध्ये सोम आणि सुरा (मद्य) ह्यांच्याविषयी उल्लेख आले आहेत. **सोम** हे कैफ येणारे पेय असे परंतु त्याचा उपयोग फक्त देवतांना (पवित्र पेय म्हणून) अर्पण करण्याकडे आणि ऋत्विजांनी पिण्याकडे करण्यात येत असे. **सुरा** हे सामान्य लोकांना पिण्याचे एक पेय असून साधारणपणे ते देवांना अर्पण करण्यात येत नसावे. सोम आणि सुरा ह्यांच्यामध्ये भेद करण्यात येत असे. शत. ब्रा. मध्ये (५·१·५·२८) म्हटले आहे की सोम हा सत्य, ऐश्वर्य, प्रकाश असतो आणि सुरा असत्य, दुर्भाग्य, अंधकार असते. काठकसंहितेतील (१२·१२) उल्लेखावरून असे दिसून येते की सुराप्राशन केली तर पातक लागेल असा विचार करून ब्राह्मण सुराप्राशन करीत नसत. सुरा ही क्षत्रियांकरिता असून ती क्षत्रियाने प्राशन केल्यास ती त्याला अपाय करीत नाही असे मानीत. छा. उपनिषदात (५·१०·९) सुरा प्राशन करणे हे पंचमहापातकांपैकी एक असल्याचे सांगितले आहे.

काही गृह्यसूत्रांत (आश्व. गृ. २·५·५; पार. गृ. १·३) श्राद्धकार्यात स्त्रीपूर्वजांच्या पिंडावर सुरा ओतावी असे सांगितले आहे. ह्या विधीची उपपत्ती लावणे अवघड आहे. कदाचित काही टीकाकारांनी म्हटल्याप्रमाणे मद्यप्राशनाची बंदी ब्राह्मण स्त्रियांना लागत नसावी अथवा त्या (कदाचित गुप्तपणे) सुरापान करीत असाव्या. ब्राह्मणांनी सर्व प्रकारची मादक द्रव्यें वर्ज्य करावी असे सूत्रग्रंथांत [सर्व मद्यमपेयम् । आप. ध. सू. १·५·१७·२१·] सांगितले असले तरी उत्तरभारतातील ब्राह्मण उसाच्या रसापासून तयार केलेले मद्य प्राशन करित असत असे बौधा. ध. सू. (१·२·४) मधील उल्लेखावरून दिसते. मनूने (११-९३।९४) तीन प्रकारच्या सुरेचा उल्लेख केला आहे : एक काकवीपासून तयार केलेली, दुसरी पिठापासून तयार केलेली आणि तिसरी मधुक वृक्षाच्या फुलांपासून तयार केलेली. ब्राह्मणाने त्यांपैकी कोणत्याही प्रकारची सुरा प्राशन करू नये असेही मनूने [गौडी पैष्टी च माध्वी च विज्ञेया त्रिविधा सुरा । यथैवेका तथा सर्वा न पातव्या द्विजोत्तमैः ॥ मनु ११·९४] म्हटले आहे. सुरा हा शब्द मुख्यत्वेकरून पैष्टी (पिठापासून तयार केलेल्या) मद्याला लावला जात असे आणि ते मद्य प्राशन करण्याचा सर्व ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांना निषेध असे. पैष्टीव्यतिरिक्त इतर मद्यांच्या प्राशनाला क्षत्रिय आणि वैश्य ह्यांना निषेध नव्हता. मादक पदार्थ शूद्रांना निषिद्ध नसतात परंतु काही ग्रंथकारांनी सदाचरणी शूद्रांनी सुरापान देखील वर्ज्य करावे असे म्हटले आहे. ब्रह्मचाऱ्यांनी सर्व प्रकारच्या मादक पदार्थांचा सर्वस्वी त्याग करावा. विष्णु धर्मसूत्रात (२२·८३।८५) **दहा** प्रकारची मद्ये ब्राह्मणांना वर्ज्य असल्याचे सांगितले आहे. ही दहा प्रकारची मद्ये क्षत्रियांना आणि वैश्यांना वर्ज्य नसतात असेही सांगितले आहे. मद्यप्राशनाच्या विरुद्ध असणारी भावना अद्यापिही ब्राह्मणांत अति प्रबल आहे आणि सर्व जातींचे लोक मद्यप्राशन हे निंद्य समजतात. मद्यप्राशन करीत असणाऱ्या पत्नीचा त्याग करावा असे मनूने (९·८०) म्हटले आहे. तीन वर्णाच्या लोकांपैकी एकाद्या मनुष्याने अज्ञानाने सुरा प्राशन केल्यास त्याने कृच्छ्रप्रायश्चित्त केल्यास आणि पुन्हा उपनयन केल्यास तो शुद्ध होतो (मनु ११·१४६; याज्ञ ३·२६५).

राजाच्या आठ व्यसनांत सुरापानाचा समावेश मनूने (७·४७।५२) केला असून सर्व व्यसनांत ते अधिक वाईट असल्याचे सांगितले आहे. कौटिल्यानेही (८·३) तसेच म्हटले आहे. ब्राह्मणाने सुरेची विक्री करण्याचा व्यवसाय करू नये असेही मनूने (१०·८९) सांगितले आहे.

**दोनप्रहरचे भोजन झाल्यानंतर करावयाची कृत्ये.**

दोन प्रहरचे भोजन झाल्यावर **तांबूल** अथवा **मुखवासाचे** चर्वण करावे. प्राचीन काळी लोक सुवासिक वनस्पतींपासून आणि औषधींपासून तयार केलेल्या विशिष्ट पदार्थांचे **धूम्रपान** देखील करीत असत असे दिसते. भोजनानंतर ज्याच्या योगाने शरीराला श्रम होतील असे कोणतेही कृत्य करू नये; स्वस्थ बसावे

अनुक्रमणिका

आणि अन्नाचे पचन होऊ द्यावे. **दिवसाच्या ६ व्या आणि ७ व्या भागांत** इतिहास आणि पुराणे वाचावी अथवा श्रवण करावी. **दिवसाच्या ८ व्या भागात** गृहस्थाश्रमीयाने आपल्या खाजगी लौकिक व्यवहारात लक्ष घालावे आणि नंतर घराच्या बाहेरच्या जागी **सायंसंध्योपासना** करावी. त्यानंतर गृहस्थाने कोणी अतिथि रात्रीकरिता मुक्कामाला आले असतील त्यांना भोजन घालावे. त्यानंतर आपल्या मुलांच्या आणि सेवकांच्या समवेत सायंकाळचे भोजन करावे, वेदाचा काही भाग पठण करावा आणि नंतर दोन प्रहर (म्हणजे ६ तास) झोप घ्यावी. रात्रीच्या पहिल्या प्रहरातील आणि शेवटच्या प्रहरातील काही काळ पूर्वी पाठ केलेल्या वेदाची उजळणी करण्यात घालवावा.

**निद्रे**संबंधी स्मृतींनी आणि निबंधग्रंथांनी अनेक नियम घालून दिलेले आहेत. त्या नियमांत डोके कोणत्या बाजूला करावे, कोणत्या प्रकारच्या शय्येचा उपयोग करावा, कोणत्या स्थळी झोपावे आणि कोणकोणते मंत्र म्हणावे इत्यादि गोष्टींचा विचार केला आहे. उदाहरणार्थ, विष्णुधर्मसूत्र (अ. ७०) ह्या सर्वात जुन्या ग्रंथातील आणि इतर थोडेसे नियम सांगू : पाण्याने पाय ओले असताना निजू नये; निजताना मस्तक उत्तरेकडे आणि पश्चिमेकडे करू नये; एकाद्या तुळईच्या लांबीच्या भागाखाली अथवा उघड्या जागी झोपू नये; ओसाड घरात अथवा देवालयात झोपू नये; पळस, उंबर प्रभृती पांच प्रकारच्या झाडांच्या लाकडाच्या शय्येवर झोपू नये; वडिल मनुष्यांच्या शय्येवर झोपू नये; विस्तवाच्या वरच्या भागी झोपू नये; आपल्या उपास्यदेवतेला वंदन करावे; बांबूची काठी शय्येजवळ ठेवावी; रात्रिसूक्त पठण करावे.

रात्री निद्रा करण्यासंबंधीच्या नियमांत पतीपत्नी ह्यांच्यामधील मैथुनाविषयी विवेचन केलेले असते. अशा नियमांपैकी बहुतेक नियम सुप्रजाजनन शास्त्रावर अथवा आरोग्यशास्त्रावर आधारलेले असतात, तथापि काही थोडे नियम धर्मावर अथवा धर्मसमजुतींवर आधारलेले असल्याचे म्हणता येईल. गृहस्थाने आपल्या पत्नीशी समागम विहित दिवशी करावा अथवा निषिद्ध मानलेले दिवस सोडून कोणत्याही वेळी अथवा जेव्हा पत्नी इच्छा करील तेव्हा करावा. पत्नी आजारी असताना अथवा रजस्वला असताना तिच्याशी संभोग करू नये. गरोदर स्त्रीबरोबर संभोग करू नये. संभोगानंतर पती आणि पत्नी यांनी स्नान करावे अथवा निदान हातपाय धुवावे, आचमन करावे, शरीरावर पाणी शिंपडावे आणि पृथक् शय्यांवर झोपावे.

**रजस्वला** स्त्रीने कसे वर्तन करावे आणि तिचा पती आणि इतर लोक ह्यांनी तिच्याशी कसे वर्तन करावे ह्यासंबंधीचे नियम तैत्तिरीय संहितेच्या (२·५·१) कालापासून घालण्यात आले आहेत. रजस्वला स्त्रीने हे नियम तीन रात्रीपर्यंत पालन करावयाचे असतात. तीन रात्री गेल्यानंतर त्या स्त्रीने स्नान करावे आणि तिला भात कांडावयास सांगावे. एकाद्या स्त्रीला साधारणपणे एका महिन्याने रजोदर्शन होत असले आणि जर तिला एका पाळीनंतर १७ दिवसांच्या आत पुन्हा रजोदर्शन झाले तर तिला कोणताही अपवित्रपणा लागत नाही. तीन दिवसाच्या कालात तिच्या समवेत बसू नये, तिने केलेले अन्न भक्षण करू नये इत्यादी.

आतापर्यंत सामान्य मनुष्यांच्या आणि विशेषेंकरून ब्राह्मणांच्या आह्निक कर्तव्यांविषयीं विवेचन केले. मनु, कौटिल्य प्रभृति कांहीं ग्रंथकारांनीं **राजाच्या आह्निक कर्तव्यां**विषयी विस्तारपूर्वक विवेचन केले आहे. कौटिल्याने (१—१९) दिवस आणि रात्र ह्यांचे प्रत्येकी आठ विभाग करून त्या भागांत कोणकोणती कृत्ये करावी हे सांगितले आहे, त्याने म्हटले आहे की दिवसाच्या **प्रथम** विभागात राजाने आपल्या स्वतःच्या संरक्षणाचे उपाय योजावे आणि जमाखर्चाचा विचार करावा; **दुसऱ्या** विभागात त्यांनी नगरवासी आणि गावात राहणाऱ्या लोकांच्या तंट्यांच्या कारणांचा विचार करावा; **तिसऱ्या** विभागात स्नान, वेदपठन अथवा वेदाभ्यास आणि भोजन ही कृत्ये करावी; **चौथ्या** विभागात राज्यातील वसूल सोन्यामध्ये स्वीकारावा आणि

अनुक्रमणिका

अधिकाऱ्यांच्या नेमणुका कराव्या; **पाचव्या** विभागात मंत्रीमंडळाबरोबर विचारविनिमय करावा आणि हेरांनी आणलेल्या गुप्त बातम्या ऐकाव्या; **सहाव्या** विभागात आपल्याला आवडणाऱ्या मनोरंजनाच्या कृत्यांत आणि खेळांत भाग घ्यावा; **सातव्या** विभागात हत्ती, घोडे, रथ आणि शिपाई ह्यांची पाहणी करावी; **आठव्या** विभागात आपल्या सेनापतीच्या साहाय्याने स्वारीचे बेत ठरवावे; **सूर्यास्त** झाला म्हणजे त्याने संध्योपासना करावी; रात्रीच्या **प्रथम** भागात गुप्त हेरांची गाठ घ्यावी; **दुसऱ्या** भागात स्नान, वेदाची उजळणी आणि भोजन करावे; **तिसऱ्या** भागात त्याने तुतारी झाल्यावर निजावे आणि **चौथ्या** आणि **पांचव्या** भागांत निद्रा घ्यावी; **सहाव्या** भागात त्याला तुतारीच्या नादाने जागे करण्यात यावे आणि त्याने शास्त्राच्या आज्ञांचा आणि त्या अमलात आणण्याच्या उपायांचा विचार करावा; **सहाव्या** भागात त्याने गुप्त हेरांशी खलबत करावे आणि त्यांची रवानगी करावी; **आठव्या** भागात त्याने ऋत्विज, आचार्य आणि पुरोहित ह्यांच्या समवेत शुभाशीर्वाद ग्रहण करावे आणि आपला वैद्य, मुख्य आचारी आणि ज्योतिषी ह्यांची भेट घ्यावी आणि नंतर एका सवत्स गाईला आणि बैलाला प्रदक्षिणा घालून त्याने राजसभेत जावे.

**वैश्य आणि शूद्र** ह्यांच्या आह्निक कृत्यांसंबंधी विशेष नियम स्मृतीत सांगितले नाहीत. ब्राह्मणांकरिता जी कर्तव्ये सांगितली आहेत त्यात वैश्यांना आणि शूद्रांना आपआपल्या परिस्थितीला अनुरूप फेरबदल करावे लागत असत. वैश्य हा द्विजातीयांपैकी एक असल्यामुळे जर त्याच्या मनात आले तर त्याला (याजन, अध्यापन आणि प्रतिग्रह ह्यांच्या व्यतिरिक्त) ब्राह्मणाला करता येणारी प्रत्येक गोष्ट करता येत असे. शूद्रांवर असणाऱ्या निर्बंधांचे आणि त्यांच्या अधिकारांचे विवेचन मागे एका प्रकरणात केले आहे.

―――――

# प्रकरण ४७

## उपाकर्म अथवा उपाकरण आणि उत्सर्जन अथवा उत्सर्ग

(मू. ग्रं. पा. २.८०७–८१८)

उपाकरण ह्याचा अर्थ 'उघडणे, सुरू करणे' असा असून उत्सर्जन ह्याचा अर्थ 'वेदाभ्यास काही विशिष्ट कालपर्यंत बंद ठेवणे' असा आहे. निरनिराळ्या ग्रंथांत उपाकर्माला **उपक्रम, अध्यायोपकरण, अध्यायोपाकर्म, वार्षिक** अशी नावे दिली असून उत्सर्जनाला **समापन** असे नाव दिले आहे. पूर्वीच्या काळी हे दोन विधि निरनिराळ्या महिन्यांत करण्यात येत. परंतु मध्ययुगीन कालात वेदाध्ययनाला उतरती कळा लागल्यानंतर हे दोन विधी एकाच दिवशी एका मागून एक असे करण्यात येऊ लागले. सांप्रतकाळी हे दोन्ही विधि साधारणपणे श्रावण महिन्यात पौर्णिमेच्या दिवशी अथवा श्रवण नक्षत्र असेल त्या दिवशी अथवा श्रावण शुद्ध पक्षात पंचमीच्या दिवशी केले जातात म्हणून त्या दोन्ही विधींना '**श्रावणी**' अशी संज्ञा दिली जाते.

उपकर्माचा विहित काल निरनिराळ्या सूत्रांत आषाढी पौर्णिमा (बौ. गृ. ३·१·१।२), श्रावण महिन्यातील पौर्णिमा (वसिष्ठ. १३·१), अथवा १५ वा दिवस, श्रावण महिन्यात चंद्र श्रवण नक्षत्रात असेल तो दिवस (आश्व. गृ. ३·५·१।२), श्रावण महिन्यात चंद्र हस्त नक्षत्रात असेल तो दिवस (हिरण्य. गृ. २·१८·२), भाद्रपद महिन्यातील पौर्णिमा (खादि. गृ. ३·२·१४।१५) असा भिन्नभिन्न प्रकारचा सांगितला आहे आणि त्या त्या सूत्राचा ज्या वेदशाखेशी संबंध असतो त्या वेदशाखेचे लोक हा विधि निरनिराळ्या दिवशी करतात. ह्या विधीच्या बाबतीत श्रावण महिन्याला आणि श्रवण नक्षत्राला एवढे महत्त्व का देण्यात आले आहे हे गूढ आहे. श्रवण नक्षत्राचा उपकर्माशी प्रत्यक्ष काहीही संबंध नसतो ही गोष्ट अनेक सूत्रांत श्रवण नक्षत्राचा उल्लेखही केलेला नाही ह्यावरून सिद्ध होते. स्मृति आणि सूत्रग्रंथ ह्यांच्यानंतर झालेल्या ग्रंथकारांनी सूर्य कोणत्या राशीत असावा ह्या तपशिलाचा समावेश करून अधिक गुंतागुंत उत्पन्न केली आहे. सामवेदीयांनी आणि नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेशात राहणाऱ्या लोकांनी सूर्य सिंह राशीत असेल त्या अवधीतच उपाकर्म केले पाहिजे असे गर्गाने सांगितले आहे. तसेच एकाद्या मुलाचे उपनयन झाल्यानंतर **प्रथमच उपाकर्म** करावयाचे असेल तेव्हा गुरु आणि शुक्र ह्या ग्रहांचा अस्त असता कामा नये.

उपाकर्म हा विधि ब्रह्मचारी, गृहस्थाश्रमी आणि वानप्रस्थ ह्यांनी देखील करावयाचा असतो. आचार्य तो विधि आपल्या शिष्यांसमवेत आपल्या स्वतःच्या गृह्याग्निमध्ये करतो. निरनिराळ्या गृह्यसूत्रांत वर्णन केलेल्या विधींमध्ये मंत्र, देवता, हवनीय द्रव्ये ह्यांत अनेक भेद असतात. सांप्रत काळी ऋग्वेदानुयायी लोकांच्या उपाकर्मात (आश्व. गृ. ३·५·४।१२) पुढील कृत्यांचा समावेश होतो.

आचमन, प्राणायाम, देशकालाचा उच्चार करून उपाकर्म करण्याचा संकल्प, नंतर गणपतिपूजन, स्थंडिल तयार करणे आणि अग्नीची स्थापना, नंतर सावित्री प्रभृति दहा देवतांना उद्देशून तुपाच्या आहुती अग्नीमध्ये अर्पण करणे, दह्यात कालविलेल्या सातूच्या पिठाच्या वीस आहुती वीस देवतांना उद्देशून देणे, उरलेले सातूचे पीठ अग्निस्विष्टकृत्‌ला उद्देशून हवन करणे आणि भक्षण करणे, आचमन आणि मार्जन, नंतर यज्ञोपवीताचा अग्नीमध्ये होम करणे, यज्ञोपवीते आणि दक्षिणा ब्राह्मणांना देणे, नंतर यज्ञोपवीताचे

अभिमंत्रण करून ते स्वतः धारण करणे, जीर्ण यज्ञोपवीत काढून टाकणे, नंतर हातात दर्भ घेऊन ब्रह्मयज्ञ करणे, नंतर 'उपाकृता वै वेदाः' (वेदांचा अभ्यास सुरू झाला) असे म्हणणे, नंतर प्रायश्चित्तासारखी उरलेली कृत्ये आचार्य करतो. सर्वजण ब्राह्मणांना यथाशक्ति दक्षिणा आणि भोजन देण्याचा संकल्प करतात, आचार्य अग्नीला निरोप देतो, विष्णुस्मरण करतो आणि दोन वेळा आचमन करतो.

उपाकर्म केल्यावर अनध्याय करावा असे गृह्यसूत्रात सांगितलेले असते. ह्या अनध्यायाची मर्यादा एक दिवसापासून तीन दिवस आणि तीन रात्रींपर्यंत निरनिराळ्या गृह्यांनी निरनिराळी सांगितली आहे. (पार. गृ. २-१०; शां. गृ. ४·५.१७; गोभि ३·३·९). त्यानंतर एक महिन्यापर्यंत वेदांचे अध्ययन सायंकाळी करू नये असे भारद्वाज गृह्यात (३·८) सांगितले आहे.

**उत्सर्जन** म्हणजे वेदाच्या अध्ययनाच्या सत्राच्या समाप्तीचा विधि. हा विधि उपाकर्मानंतर साडेचार महिने अथवा पाच महिने अथवा सहा महिने वेदाचा अभ्यास केल्यानंतर करावा असे निरनिराळ्या सूत्रांत सांगितले आहे. उपकर्माचा विधि निरनिराळ्या काली होऊ शकत असल्यामुळे उत्सर्जन विधीचा विहित कालही निरनिराळ्या सूत्रांत निरनिराळा सांगितला आहे. उदाहरणार्थ, शांख्यायन गृह्यात (४·६·१) सांगितले आहे की माघ महिन्याच्या शुद्ध पक्षातील प्रतिपदेला उत्सर्जन विधि करावा. याज्ञ. ने (१—१४३) पौष महिन्यात रोहिणी नक्षत्रावर चंद्र असताना अथवा पौष वद्य ८ मीचे दिवशी उत्सर्जन करावे असे सांगितले आहे. तथापि क्रमाक्रमाने पौष अथवा माघ महिन्यात करावयाचा उत्सर्जनाचा विधि बंद पडत गेला. मानवगृह्यावर (१-५-१) टीका करताना अष्टावक्राने असे उद्‌गार काढले आहेत की सांप्रतकाळी सूत्रकारांनी सांगितलेल्या दिवशी उत्सर्जनाचा विधि करणारा क्वचितच आढळतो. त्याप्रमाणेच स्मृत्यर्थसार ग्रंथांत (पा. ११) उत्सर्जनाच्या विधीचे विधान सांगून पुढे असे म्हटले आहे की 'एकवर्षपर्यंत वेदाध्ययन केल्यानंतर उपाकर्माच्या दिवशी उत्सर्जन करावे अथवा करू नये.' सांप्रतकाळी उत्सर्जन हा विधि उपाकर्माच्याच दिवशी करण्यात येतो परंतु तो उपाकर्माच्या आधी करतात.

सांप्रतकाळी ऋग्वेदानुयायी लोक करीत असलेल्या **उत्सर्जनाच्या विधी**मध्ये पुढील कृत्यांचा समावेश होतो :—

आचमन, दर्भाचे पवित्र अनामिका बोटात घालून प्राणायाम, देशकालाचा उच्चार करून उत्सर्जन विधी करण्याचा संकल्प, नंतर पंचगव्य प्राशन करणे, गणपति पूजन, स्थंडिल तयार करून त्यावर बलवर्धन नांवाच्या अग्नीची स्थापना, अग्नीचे ध्यान, अग्नीवर दोन समिधा अर्पण करणे, नंतर सावित्री आदि (उपाकर्मात सांगितलेल्या) देवतांना उद्देशून तुपाच्या आहुती अर्पण करणे, नंतर अग्नि आदि २० देवतांता उद्देशून शिजलेल्या भाताच्या आहुती अर्पण करणे आणि उरलेला भात अग्निस्विष्टकृत् ह्याला उद्देशून हवन करणे, नंतर आचमन आणि प्राणायाम करून ब्रह्मयज्ञ करणे, नंतर सर्वांनी 'उत्सृष्टा वै वेदाः' (वेदांचा अभ्यास थांबविला आहे) असे म्हणणे, नंतर अग्नि, वायु, सूर्य प्रभृति देवतांना उद्देशून व्याहृती पृथक् पृथक म्हणून आणि नंतर सर्व व्याहृती एकत्र म्हणून आहुती अर्पण करणे, नंतर ओम् आणि व्याहृती म्हणून सर्वप्रायश्चित्त करणे, नंतर मार्जन करून गंगादि पुण्य नद्यांचे स्मरण करणे, अग्नीला गंध, पुष्प इत्यादि उपचार अर्पण करणे, नंतर अग्नीमधील विभूति घेऊन ती ललाट, कंठ, नाभी, उजवा आणि डावा खांदा आणि मस्तक ह्याठिकाणीं लावणे, नंतर श्रद्धा, मेधा इत्यादि देण्याबद्दल अग्नीची प्रार्थना आणि ह्या कर्माने परमेश्वर संतुष्ट होवो आणि हे कर्म सत्य **ब्रह्मा**ला अर्पण असो इत्यादि प्रकारचा उत्सर्जनविधीचा समारोप करणे.

अनेक महिनेपर्यंत वेदाभ्यास पूर्णपणे बंद ठेवणे बहुधा इष्ट वाटले नसावे म्हणून मनु (४·९८), वसि. घ. सू. (१३·६।७) प्रभृती ग्रंथकारांनी असा नियम सांगितला आहे की उत्सर्जनानंतर पुढील उपाकर्मापर्यतच्या महिन्यांतील शुद्ध पक्षात वेदांचे अध्ययन करावे आणि कृष्ण पक्षात अथवा इच्छेप्रमाणे वेदाच्या अंगांचे अध्ययन करावे. गोभिल स्मृतीत (३·१३४) असे सांगितले आहे की दक्षिणायनानंतर सहा महिनेपर्यंत उपनिषदे आणि रहस्य ग्रंथ ह्यांचे अध्ययन कोणीही करू नये.

\-\-\-\-\-\-

अनुक्रमणिका

# प्रकरण ४८

## गौणस्वरूपाचे गृह्य आणि इतर विधी

(मू. ग्रं. पा. २.८१९–८३६)

वर्षातून काही विशिष्ट दिवशी करावयाच्या काही विशिष्ट विधींचे वर्णन गृह्य सूत्रांत केलेले असते. त्या विधींपैकी बहुतेक विधी आधुनिक काळी बंद झाले आहेत. परंतु ज्या काही विधींचे अस्तित्व अजूनही दृष्टोत्पत्तीस येते, त्यांपैकी काही विधींचे संक्षिप्त वर्णन ह्या प्रकरणात केले आहे.

### पार्वण स्थालीपाक.

हा विधी गौतमाने (८·१९) वर्णन केलेल्या सात पाकयज्ञांपैकी एक आहे. हा विधि जेव्हा एकाद्या मनुष्याचा विवाह होऊन तो आपल्या नूतन विवाहित पत्नीसह स्वतःच्या घरी परत येतो तेव्हा त्यानंतर येणाऱ्या पौर्णिमेला करावयाचा असून त्यानंतर प्रत्येक पौर्णिमेला आणि अमावास्येला जन्मभर चालवावयाचा असतो. ह्या विधीमध्ये पत्नीने साळी कांडून त्याचे तांदूळ करावयाचे असून त्या तांदुळाचा भात शिजवावयाचा असतो. भात शिजल्यानंतर पती त्या अन्नाच्या आहुती दर्शपूर्णमासातील देवता आणि अग्निस्विष्टकृत् ह्यांना उद्देशून देतो; उरलेल्या अन्नाचे एका ब्राह्मणाला भोजन घालून एक बैल दान देण्यात येतो. त्यानंतर प्रत्येक पौर्णिमेला आणि अमावास्येला करावयाच्या स्थालीपाकात बैलाची दक्षिणा देत नाही.

### चैत्री

हा विधि आणि आपस्तंबाने (१९·१३) सांगितलेला **ईशान बली** नावाने प्रसिद्ध असलेला **शूलगव** हे एकच होत. हा विधि चैत्र महिन्यातील पौर्णिमेच्या दिवशी करतात. त्या दिवशी अग्नीमध्ये तुपाच्या दोन आहुती देतात आणि देवतांप्रीत्यर्थ भात शिजवून त्या अन्नाच्या आहुती मधु, माधव प्रभृति देवतांना उद्देशून देतात. नंतर अन्नसूक्ताचा पाठ करून चैत्र्य अन्न ब्राह्मणांना वाढतात आणि यजमान आपल्या सपिंडासमवेत भोजन करतो.

### सीतायज्ञ

म्हणजे नांगरलेल्या शेताला उद्देशून केलेला यज्ञ. हा यज्ञ शेताची नांगरणी करावयाच्या वेळी करावयाचा असतो. एकाद्या शुभ नक्षत्रावर यजमानाने यज्ञाकरिता अन्न शिजवावे आणि त्या अन्नाच्या आहुती इंद्र, मरुत, पर्जन्य, अशनि, भग ह्या देवतांना उद्देशून द्याव्या आणि सीता, आशा प्रभृती देवतांना उद्देशून तुपाच्या आहुती द्याव्या. (गोभि. गृ. ४.४·२७).

अनुक्रमणिका

### श्रावण अथवा श्रावणकर्म आणि सर्पबलि

हे दोन विधि श्रावण महिन्यातील पौर्णिमेच्या दिवशी करावेत असे अनेक गृह्य सूत्रांत (आश्व. गृ. २·१·१।१५; पार. गृ. २·१४ इ.) सांगितले आहे. श्रावण विधीमध्ये सातूच्या लाह्या आणि खापरावर भाजलेला पुरोडाश (पोळी) ह्यांचे अग्नीमध्ये हवन करावयाचे असते. उरलेल्या लाह्या यजमानाने आणि त्याच्या पुत्रादि स्वजनांनी भक्षण करावयाच्या असतात. सातूच्या पिठाचा घराच्या बाहेर एका स्वच्छ जमिनीवर सर्पांना उद्देशून बलि अर्पण करतात. नंतर त्या बलीला नमस्कार आणि प्रदक्षिणा केल्यावर यजमान आपल्या पुत्रादिकांना आणि शेवटी आपणास सर्पांना अर्पण करतो. ह्या अर्पण करण्याच्या विधीला **परिदान** विधि म्हणतात. सर्पदंशापासून होणाऱ्या प्राणघातक परिणामांच्या भीतीमुळे सर्पपूजा करण्याचा संप्रदाय निर्माण झाला आणि हा संप्रदाय फार प्राचीन काळचा आहे. पावसाळ्यात सर्प मनुष्यवस्तीस्थळांचा आश्रय घेतात म्हणून हा सर्पांना बलि अर्पण करावयाचा विधि श्रावण महिन्यातील पौर्णिमेला केला जाई आणि त्या दिवसापासून मार्गशीर्ष पौर्णिमेपर्यंत चार महिने जमिनीवर न झोपता पलंगाचा उपयोग करण्यात येत असे आणि मार्गशीर्ष पौर्णिमेच्या दिवशीं पलंगावरून खाली उतरून जमिनीवर निजण्यास प्रारंभ करण्याचा समारंभ करीत. त्या समारंभाला **प्रत्यवरोहण** म्हणत. प्रत्यवरोहणापर्यंत सर्पबलीचा विधि प्रतिदिवशीं करण्यात येई.

सर्पपूजेचा सांप्रदाय भारतात आणि विशेषतः दक्षिण भारतात अद्यापिही प्रचलित आहे. परंतु नागांची पूजा श्रावण पौर्णिमेला न करिता श्रावण शुद्ध पंचमीला करतात. त्या दिवसाला **नागपंचमी** म्हणतात.

### नागबलि

ह्या नांवाच्या एका विधीचे वर्णन मध्ययुगीन काळात झालेल्या काही निबंधग्रंथांत केलेले असते. (संस्कार कौस्तुभ पा. १२२). ह्या विधीचा हेतु दोन प्रकारचा असतो. एक अथवा अधिक सर्पांची हत्या केल्याच्या दोषांची निवृत्ती करणे आणि हत्या केलेल्या सर्पांच्या क्रोधामुळे संततीला होणारा प्रतिबंध दूर करणे. ह्या विधीमध्ये तांदुळाच्या अथवा गव्हाच्या अथवा तिळाच्या पिठाची सर्पाची एक प्रतिमा करून एका सुपामध्ये ठेवतात आणि त्या प्रतिमेची षोडशोपचार पूजा करून नंतर ती प्रतिमा अग्नीमध्ये टाकतात. यजमान आणि त्याची पत्नी तीन अथवा एक दिवस आशौच पाळतात. नंतर त्या दहन केलेल्या सर्पाचे प्रतिनिधि म्हणून आठ ब्राह्मणास आमंत्रण करून पूजेचे उपचार अर्पण करतात, भोजन घालतात आणि दान देतात. नंतर एक सोन्याची सर्पाची प्रतिमा पाण्याच्या कलशात ठेवून तिची प्रार्थना करतात आणि ती प्रतिमा अथवा तिची किंमत अथवा एक गाय ब्राह्मणाला दान देतात. हा विधि सिनीवालीच्या अथवा पौर्णिमेच्या दिवशी अथवा आश्लेषा नक्षत्र असलेल्या पंचमीला अथवा नवमीच्या दिवशी करण्यात येतो.

### इंद्रयज्ञ

हा विधि प्रोष्ठपद (भाद्रपद) पौर्णिमेच्या दिवशी करावयाचा असतो. (पार. गृ २·१५). ह्या विधीमध्ये इंद्राप्रीत्यर्थं पायस आणि पोळ्या अर्पण करावयाच्या असतात. राजांनी इंद्राचा सत्कार करण्याकरिता एक उत्सव भाद्रपद अथवा आश्विन महिन्यातील शुद्ध ८ मीला प्रारंभ करून काही दिवस करावयाचा असतो. त्या दिवशी एक ध्वज उभारतात. हा ध्वज कोणत्या दिवशी उभारावा आणि कोणत्या दिवशी खाली उतरावा ह्याविषयी अनेक नियम सांगितले आहेत. त्या दोन्ही दिवशी अनध्याय पाळला जात असे. इंद्राने उपरिचर

अनुक्रमणिका

वसु नावाच्या राजाला प्रेमाची भेट म्हणून एक बांबूची काठी दिली होती आणि राजाने ती काठी जमिनीत पुरली होती अशी कथा महाभारतात (आदि. ६३·१७।१९, २१।२२) वर्णन केली आहे. त्याकाळापासून वर्ष समाप्त झाले म्हणजे राजे (आणि सामान्य लोकही) एक बांबूची काठी उभी करतात. प्रतिवर्षी चैत्र महिन्याच्या प्रतिपदेला एक बांबूची काठी उभी करण्याची जी चाल महाराष्ट्रात आणि इतर ठिकाणी अस्तित्वात आहे ती ह्या प्राचीन उत्सवाची सूचक असण्याचा संभव आहे. बृहत्संहितेमध्ये (अ. ४३) **इंद्रमह** नावाच्या उत्सवाचा उल्लेख केला आहे.

## अश्वयुजी

हा सात पाकयज्ञांपैकी एक आहे. आश्वलायनाने (२·२·१।३) हा विधि आश्विन पौर्णिमेच्या दिवशी करावयास सांगितले आहे आणि त्यात पशुपतीच्या (शिवाच्या) प्रीत्यर्थ शिजलेले अन्न अर्पण करावे आणि नंतर दूध, तूप, एकत्र करून त्याचे हवन करावे असे म्हटले आहे. गोभिल गृह्यात (३.८.१) ह्या विधीला 'पृषांतक' म्हटले असून त्यात ऐश्वर्यप्राप्तीकरिता लाखेचे केलेले ताईत आणि निरनिराळ्या वनस्पती दंडात बांधाव्या असे सांगितले आहे.

## आग्रयण

हा विधि बहुतेक सर्व गृह्यसूत्रांनी अश्वयुजीनंतर लागलीच सांगितलेला आहे. कोणी त्याला '**नवयज्ञ**' म्हटले असून मनूने (४·२७) त्याला '**नवसस्येष्टि**' असे नाव दिले आहे. आग्रयण हा विधि साळी, जवस आणि श्यामाक ह्या तीन धान्यांच्याच बाबतीत करावा असे आश्व. श्रौ. २·९·१ प्रभृति सूत्रांत सांगितले असून ती इष्टि केल्याशिवाय त्या तीन प्रकारच्या नूतन धान्यांचा उपयोग कोणी करू नये असेही म्हटले आहे. ह्या इष्टीमध्ये शिजलेल्या अन्नाच्या आहुती गृह्याग्नीमध्ये इंद्राग्नि, विश्वेदेव प्रभृति देवतांना अर्पण करावयाच्या असतात. सांप्रतकाळी ह्या नवयज्ञाचा थोडासा अवशेष अस्तित्वात आहे. आश्विन महिन्यातील पौर्णिमेला महाराष्ट्रात सध्या 'नव्याची पौर्णिमा' म्हणतात आणि त्यादिवशी शेतात वाढणाऱ्या धान्यांची थोडीशी कणसे आणून ती फुलांमध्ये शोभिवंत रीतीने गुंफून घराच्या प्रवेशद्वारावर अथवा दाराच्या वरच्या भागी अडकवितात.

## आग्रहायणी

हाही सात पाकयज्ञांपैकी एक आहे. मार्गशीर्ष महिन्यातील पौर्णिमेला आग्रहायणी संज्ञा असून त्या दिवशी केलेल्या कृत्यालाही तीच संज्ञा लागते. मागे सांगितल्याप्रमाणे त्या दिवशी **प्रत्यवरोहण** (म्हणजे जमिनीवर निजण्यास प्रारंभ करण्याचा) विधि करावयाचा असतो. हा विधि सांप्रतकाळी पूर्णपणे लुप्त झाला आहे. ह्या विधीमध्ये सूर्यास्तानंतर पायस तयार करून त्याच्या आहुती द्याव्या; हेमन्त ऋतूचे स्मरण करावे; अग्नीच्या पश्चिम दिशेला जमिनीवर गवताचा थर रचावा आणि घराच्या स्वामीने आणि त्याच्या कुटुंबातील सर्व मंडळींनी त्या गवतावर क्रमाक्रमाने निजावे असे आश्वा.ने (२·३·३।१२) म्हटले आहे.

अनुक्रमणिका

## शूलगव अथवा ईशान बलि.

ह्या विधीचे मूळ स्वरूप शिवाला उद्देशून बैलाच्या मांसाचा बलि देणे हे होते. हा विधि केव्हा करावा ह्याबद्दल मतवैचित्र्य होते. हा विधि शरद ऋतूच्या आरंभी, वसंत ऋतूच्या आरंभी, मार्गशीर्ष पौर्णिमेला, अथवा गुरांना पीडा होत असेल तेव्हा करावा असे निरनिराळ्या ग्रंथांनी सांगितले आहे आणि काही ग्रंथांनी कोणत्याही महिन्यातील शुक्ल पक्षात एकाद्या शुभ नक्षत्रावर करावा असे सांगितले आहे. ह्या विधीमध्ये बैलाला शूलाने खूण करतात असे हरदत्ताने (आश्व. गृ. ४·९·१ वरील टीकेत) म्हटले आहे. गृह्यसूत्रांच्या काळी देखील बैलाच्या मांसाचा उपयोग केलेला विधि लोकांना आवडत नसे म्हणून बैल उपलब्ध न झाला तर बोकड अथवा मेंढा यांचा उपयोग करावा असा पर्याय सांगितला आहे. बैलाच्या रक्ताने आठ द्रोण भरून त्या रक्ताच्या आहुती शिवाला उद्देशून अग्नीमध्ये अर्पण करावयाच्या असत आणि पशूचा अवशेष भाग आणि कातडे जमिनीत पुरीत असत. मानव गृ. (२·५· १।६). हा विधि सांप्रतकाळी पूर्णपणे प्रचारातून गेलेला आहे.

## वास्तुप्रतिष्ठा

नूतन घर बांधण्यासंबंधी अनेक नियम (आश्व. गृ. २·७·९; आप. गृ. १७·१।१३ प्रभृति) निरनिराळ्या गृह्यसूत्रात दिले आहेत आणि जमीन कशा प्रकारची असावी, माती कोणत्या रंगाची असावी इत्यादि तपशील त्यांत दिले आहेत. मत्स्यपुराणात (२५६·१०।११) म्हटले आहे की घराच्या बाबतीत पुढील पाच प्रसंगी **वास्तुयज्ञ** करावा लागतो :— (१) पायाभरणी अथवा घराची आंखणी करते वेळी, (२) पहिला खांब उभा करते वेळी, (३) पहिला दरवाजा उभा करते वेळी, (४) गृहप्रवेश करते वेळी आणि (५) अरिष्ट अथवा अनिष्ट लक्षणे दिसून आल्यास त्यांच्या निरसनार्थ वास्तुशांति करतेवेळी. एकाद्या **शुभ** दिवशी आणि शुभ मुहूर्तावर रत्नांच्या आणि सर्व प्रकारच्या बीजांच्यावर पायाचा दगड बसवावा, ब्राह्मणांकडून खांबाची पूजा करवावी, आणि उभा करण्यापूर्वी त्याला स्नान घालावे, त्याला वस्त्रालंकारानी भूषित करावा, मध आणि तूप यांचा होम करावा, ब्राह्मणांना दुध भाताचे भोजन घालावे. पायाचा दगड ईशान्य कोपऱ्यावर घालावा आणि पहिला खांब आग्नेय दिशेला उभा करावा.

अलिकडील काळात नूतन गृहाचा प्रवेशविधि हा एक महत्वाचा समारंभ समजला जातो. गृहप्रवेश चांगल्या शुभ मुहूर्तावर करतात. त्या दिवशी अथवा आधींच्या दिवशी **वास्तुशांति** करतात आणि त्या शांतीत **ग्रहमख** हा एक भाग असतो. घराच्या आग्नेय कोपऱ्यात एक खड्डा खणून त्यात एक भाजलेल्या विटांची पेटी पुरतात. त्या पेटीत सात प्रकारची धान्ये, शेवाळ, फुले इत्यादि पदार्थ ठेवतात. **घराचा स्वामी** आपल्या पत्नीसह, पुत्रांसह आणि ब्राह्मणांसह वाद्ये वाजत असता गृहात प्रवेश करतो. त्यावेळी त्याच्या हातात एक उदक भरलेला कलश असतो. तो कलश धान्याच्या राशीवर ठेवतात. नंतर पुण्याहवाचन करतात, ब्राह्मणांनी आशीर्वाद दिल्यावर त्यांना भोजन घालण्यात येते आणि नंतर घराचा स्वामी आपल्या इष्टमित्रांसह भोजन करतो.

―――――

# प्रकरण ४९

## दान

(मू. ग्रं. पा. २.८३७-८८८)

कलियुगामध्ये धर्माचे मुख्य लक्षण दान हे असते असे मनुप्रभृतींनी [तपः परं कृतयुगे त्रेतायां ज्ञानमुच्यते । द्वापरे यज्ञमेवाहुर्दानमेकं कलौयुगे ॥ मनु १·८६ = शान्ति २३२·२८ = पराशर १·२३] (१.८६) म्हटले असून दान देणे हे गृहस्थाश्रमाचे विशिष्ट लक्षण असल्याचे ['दानमेव गृहस्थानाम्' यम (हेमाद्रि. दानखंड पा. ६] यमाने (हेमाद्रि. दान. पा. ६) सांगितले आहे. ऋग्वेदात तसेच निरनिराळ्या सूत्रग्रंथांत दानाची आणि दान देणाऱ्याची मोठी प्रशंसा केलेली असते. त्या ग्रंथांच्या काळी दान देण्यात येणाऱ्या वस्तूंमध्ये गाई, घोडे, उंट, अन्न ह्या प्रमुख असत. यज्ञातील दक्षिणा सर्व साधारणपणे एक अथवा अनेक गाईच्या रूपात असे. अश्वाचे (घोड्याचे) दान गाईच्या दानापेक्षा कमी प्रतीचे मानीत असल्याचे ऋग्वेदावरून दिसून येते. तै. सं. (२·३·१२·१) मध्ये ही असे सांगितले आहे की जो मनुष्य घोड्याचे दान स्वीकारतो त्याला खरोखरच वरुण पकडतो (म्हणजे त्याला जलोदराची पीडा होते) म्हणून त्याने जितक्या घोड्याचे दान स्वीकारले असेल तितक्या पुरोडाशांच्या आहुती वरुणाला उद्देशून अर्पण कराव्या.

दानासंबंधी अतिशय विस्तृत वाङ्मय अस्तित्वात आहे. महाभारत, अग्निपुराण, मत्स्यपुराण, वराह पुराण ह्या ग्रंथांत दानासंबंधी अनेक श्लोक आले आहेत. तसेच हेमाद्रिकृत दानखंड, मित्रमिश्रकृत दानप्रकाश ह्यांच्यासारखे दानविषयाचेच मुख्यत्वेकरून विवेचन केलेले विस्तृत आणि महत्वाचे निबंधग्रंथ आहेत.

एकाद्या वस्तूवरील स्वतःचे स्वामित्व नष्ट करून तिच्यावर दुसऱ्या कोणाचे स्वामित्व निर्माण करणे ह्याला **दान** [स्वस्वत्वनिवृत्तिः परस्वत्वापादनं च दानम् ... । याज्ञ २·२७ वरील मिताक्षरा.] म्हणतात आणि अशी वस्तू स्वीकारणे ह्याला **प्रतिग्रह** म्हणतात. दान दिलेली वस्तू दुसरा मनुष्य जेव्हा स्वीकारतो तेव्हा त्याचे स्वामित्व सुरू होते. केवळ एकादी वस्तु दुसऱ्या जवळून घेणे एवढ्यानेच धर्मशास्त्राप्रमाणे प्रतिग्रह होत नाही. तो शब्द काही विशिष्ट प्रकाराने केलेल्या स्वीकाराला लागतो. जेव्हा एकादा दाता आपल्याला काही अदृष्ट फल अथवा पुण्य प्राप्त व्हावे ह्या हेतूने एकादी वस्तु दुसऱ्या कोणाला वेदमंत्र उच्चारून देतो तेव्हा अशी वस्तू स्वीकारण्याच्या क्रियेला प्रतिग्रह हा शब्द लावण्यात येतो. वस्तूचा स्वीकार त्या वस्तूच्या स्वरूपाप्रमाणे आपल्या स्वतःच्या हातात घेऊन अथवा त्या वस्तूला स्पर्श करून अथवा तिच्या फलाचा अंशतः उपभोग घेऊन इत्यादि अनेक प्रकारांनी होऊ शकतो. (याज्ञ २·२७ वरील मिताक्षरा).

देवलाने (हेमाद्रि. दान. पा. १३ व १४) दान ह्या शब्दाची शास्त्राला धरून अशी व्याख्या केली आहे की जेव्हा शास्त्रात सांगितल्याप्रमाणे दान स्वीकारण्यास पात्र असणाऱ्या व्यक्तीला पोचावी ह्या हेतूने काही संपत्ती शास्त्रोक्त विधीने दिली जाते तेव्हा अशा कृत्याला **दान** असे म्हणतात. आणि दिलेल्या दानापासून काही विशिष्ट फल प्राप्त व्हावे अशी अपेक्षा न ठेवता केवळ कर्तव्य म्हणून जे दान देण्यात येते त्या दानाला **'धर्मदान'** असे म्हणतात.

दानाच्या बाबतीत विशेष विचार करण्यासारखा **'इष्टापूर्त'** हा शब्द ऋग्वेदासारख्या वेदात फार प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे. (१०·१४·८). ह्या [सङ्गच्छस्व पितृभिः सं यमेन इष्टापूर्तेन परमे व्योमन् । ऋ १०·१४·८·] शब्दाचा अर्थ 'एकाद्या मनुष्याने केलेल्या यज्ञाचे आणि उदारपणाने केलेल्या क्रियांचे संचित फल' असा असावा असे दिसते. ह्या शब्दाची **इष्ट** (यजन केलेले) आणि **पूर्त** (पुरे भरलेले) अशी दोन पदे आहेत. जे काही गृह्य आणि श्रौत अग्नीमध्ये हवन केलेले असते आणि श्रौतयज्ञांतील वेदीच्या अंतर्भागी दान दिलेले असते त्याला **इष्ट** असे म्हणतात आणि विहिरी, तलाव, देवालय अर्पण करणे, अन्नदान देणे, सार्वजनिक उद्याने पालन करणे ह्यांच्या सारख्या कृत्यांना **पूर्त** असे म्हणतात असे महाभारतात (अपरार्क पा. २९०) सांगितले आहे. प्रत्येकाने नेहमी दक्षतापूर्वक इष्ट आणि पूर्त कृत्ये केली पाहिजेत आणि अशी कृत्ये श्रद्धापूर्वक आणि न्यायाने मिळविलेल्या संपत्तीच्या साधनाने केल्यास ती अक्षय्य होतात असे मनूने (४·२२६।७) म्हटले आहे.

स्त्रिया आणि शूद्र ह्यांच्यासकट सर्वांना दान देता येते. अनेक स्मृतींनी असे सांगितले आहे की इष्ट आणि पूर्त हे सर्व द्विजातीयांचे सामान्य धर्म असतात. शूद्राला यज्ञादि वैदिक कर्माचे आचरण करण्याचा (म्हणजे इष्ट धर्मांचा) अधिकार नसतो, परंतु त्याला पूर्त धर्माचे आचरण करण्याचा अधिकार असतो. [इष्टापूर्तौ द्विजातीनां धर्मः सामान्य इष्यते । अधिकारी भवेच्छूद्रो पूर्ते धर्मे न वैदिके ॥ - अत्रि ४६.] (अत्रि ४६, लिखित ६)

दान देणारा दाता शुद्ध आचरणाचा आणि निर्दोष व्यवसायाने उपजीविका करणारा असावा. तो एकाद्या असाध्य अथवा घाणेरड्या रोगाने पीडित नसावा, धार्मिक वृत्तीचा, दयाशील, दुर्व्यसनरहित असा असावा. (देवल-अपरार्क पा. २८८). अनेक स्मृतींत स्वतः मिळविलेल्या संपत्तीचे दान देणाऱ्या मनुष्याची फार प्रशंसा केली आहे.

कपटी, स्तुतिपाठक, कुविद्येने कालक्रमणा करणारा, पहेलवान, ढोंगी, चोर, कुष्टरोगी, ब्राह्मणांना विहित अशा प्रतिज्ञांचा भंग करणारा, विषयसुखात गढलेला इत्यादि प्रकारच्या व्यक्ति **दान स्वीकारण्यास अपात्र** असतात. स्वतःचे मातापिता, गुरु, मित्र, सदाचरणी मनुष्य, ज्याने दात्यावर पूर्वी उपकार केले आहेत असा मनुष्य, दरिद्री, अनाथ इत्यादि प्रकारच्या व्यक्ति **दान स्वीकारण्यास पात्र** असतात (दक्ष. ३·१७।१८ इ०). वैश्वदेवाच्या अंती येणाऱ्या सर्वांना अन्नदान करणे हे प्रत्येकाचे कर्तव्य असते. (आप. ध .सू. २·४·९·५।६) अन्न आणि वस्त्र ह्यांच्या बाबतीत दान घेणारा भुकेलेला आहे किंवा नाही आणि त्याला वस्त्राची गरज आहे किंवा नाही एवढ्याच गोष्टींचा विचार करावा, दान घेणाऱ्याची जात अथवा त्याच्या अंगचे गुण ह्यांचा विचार करू नये असे विष्णुधर्मोत्तरपुराणात (दानमयूख पा. ५) म्हटले आहे. जो दाता आदरपूर्वक दान देतो आणि जो याचक आदरपूर्वक दान स्वीकारतो ते दोघेही स्वर्गाला जातात आणि याच्या उलट स्थिती असेल तर दोघेही नरकात पडतात असे मनूने (४·२३५) म्हटले आहे.

जे धन दात्याने दुसऱ्याला दुःख न देता अथवा दुसऱ्याची हानि न करता अथवा स्वतःला त्रास न देता अथवा चिंता न करता मिळविलेले असते ते धन थोडे असो वा विपुल असो **दान देण्यास योग्य** असते. ज्या वस्तूवर देणाऱ्याचे स्वामित्व असेल तीच वस्तु त्याला दान देता येते. दान देण्यास पात्र अशा वस्तूंमध्ये उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ असे भेद असतात. अन्न, संरक्षण, गाय, जमीन, सुवर्ण, इत्यादि वस्तु **उत्तम** असतात; विद्या, निवाऱ्याकरिता घर, घरातील सामान, औषधे इत्यादि वस्तु **मध्यम** असतात आणि पादत्राणे, गाडी, आसने, दिवे, जुने आणि जीर्ण झालेले पदार्थ इत्यादि **कनिष्ठ** असतात. (देवल. हेमाद्रि दान. पा. १६). ह्या वर्गवारीबद्दलही मतवैचित्र्य आहे.

अनुक्रमणिका

दानाचे नित्य, नैमित्तिक आणि काम्य असे तीन विभाग असतात. वैश्वदेवाच्या अंती दिल्या जाणाऱ्या अन्नासारखे जे दान प्रतिदिवशी दिले जाते ते **नित्यदान** होय; ग्रहणासारख्या विशिष्ट प्रसंगी अथवा एकाद्या दोषाबद्दल प्रायश्चित्त म्हणून जे दान दिले जाते ते **नैमित्तिकदान** होय आणि संतती, विजय, ऐश्वर्य, स्वर्ग इत्यादि फलांची प्राप्ती व्हावी म्हणून कामनेने जे दान दिले जाते ते **काम्यदान** होय. (देवल-हेमाद्रि दान पा. १६). भगवद्गीतेत (१७-२०।२२) दानाचे सात्विक, राजस आणि तामस असे देणाऱ्याची भावना, दान घेणाऱ्याची पात्रता आणि दान देण्याचे स्थळ आणि काळ ह्यांच्या दृष्टीने तीन प्रकार सांगितले आहेत.

गुप्तपणे दिलेल्या दानाची प्रशंसा निरनिराळ्या ग्रंथकारांनी केली आहे. (योगीयाज्ञ. गृह. रत्ना. पा. २४३). दिलेल्या दानाचे संरक्षण करण्यासारखे एकादे योग्य कारण नसताना स्वतः केलेल्या सत्कार्याचा गाजावाजा करू नये असे देवलाने म्हटले आहे. (हेमाद्रि. दान. पा. १७).

काही विशिष्ट वस्तु जर एकाद्याने स्वइच्छेने आणि आपल्या स्वतःच्या हाताने दिल्या तर सामान्यतः प्रतिग्रह न करणाऱ्याने देखील त्यांचा अव्हेर करू नये असे मनु (४·२४७।२५०; याज्ञ. १·२१४।२१५) प्रभृतींनी सांगितले आहे. अशा वस्तूंमध्ये कुश (दर्भ), कच्च्या फळभाज्या, दूध, सुगंधी, पदार्थ, फुले, दही, मध, अन्न, आसन, रत्ने, पाणी इत्यादी पदार्थाचा समावेश होतो. ह्या नियमाला अपवाद म्हणून वेश्या, नपूंसक, पतित अशा सारख्यांनी दिलेल्या वस्तु हा असतो.

दान देताना एकाद्याने किती उदारपणा करावा ह्याबद्दलही काही मर्यादा घालून दिल्या आहेत. मनूने (११.९।१०) म्हटले आहे की ज्या व्यक्तीच्या स्वतःच्या कुटुंबातील लोक आपत्तीत रहात असतानाही ज्याच्याजवळ त्रयस्थ लोकांना दान करावयास विपुल संपत्ती असते त्याने केलेला धर्म हा खरा धर्म नसून धर्माचा मिथ्या आभास असतो. एका ग्रंथात म्हटले (शिवधर्म हेमाद्रि दान पा. ४४) आहे की मनुष्याने आपण स्वतः मिळविलेल्या धनाचे पाच विभाग करून त्यापैकी तीन विभाग स्वतः करिता आणि आपल्या कुटुंबाकरिता राखून ठेवावे आणि दोन विभाग धर्माकरिता द्यावे.

काही विशिष्ट वस्तूंचे **दान स्वीकारण्यास निषेध** सांगितला आहे. उदाहरणार्थ, विषारी पदार्थ आणि मादक पेये ह्यांचे दान ब्राह्मणांनी स्वीकारू नये असे वसिष्ठाने (१३·५५) सांगितले आहे. तसेच सुवर्ण, भूमि, गाय, घोडे, अन्न, वस्त्र, तीळ, तूप ह्या वस्तूंचे दान विद्याहीन ब्राह्मणाने स्वीकारू नये असे मनूने (४·१८८) सांगितले आहे.

**दान देण्यास योग्य काल.** काही वस्तु प्रतिदिवशी द्यावयाच्या असतात; काही वस्तु विशिष्ट दिवशी देणे अवश्य असते. अशा दिवसांमध्ये अयनांचे आरंभदिन, सूर्यचंद्रांच्या ग्रहणाचे दिवस, क्षयतिथि, व्यतिपात, अमावास्या, संक्रांत, रविवार इत्यादि प्रसंगांचा समावेश होतो, तसेच काही विशिष्ट तिथि काही विशिष्टवारी आल्या तर ते दिवसही ग्रहणाच्या सारख्या योग्यतेचे समजले जातात. रात्री दान देऊ नये असा सर्वसाधारण नियम असला तरीदेखील ग्रहण, विवाह, संक्रांत, पुत्रजन्म ह्यांच्यासारख्या प्रसंगी रात्री केलेले दानही प्रशस्त असते.

अशा प्रकारच्या विशिष्ट प्रसंगी दिलेल्या दानांचे उल्लेख शिलालेखांत आणि ताम्रपटांत पुष्कळ सापडतात. त्यांपैकी बरीचशी दाने सूर्य आणि चंद्र ग्रहणाच्या वेळी दिलेली असतात. एपि. इं. खं ११ पा. २७९ (सूर्यग्रहण); एपि. इ. खं १ पा ३४१ (चंद्रग्र.); इंडि ॲटि. खं १२ पा १९३ (अयनदिन).

**दान देण्यास योग्य स्थळ.** स्कंद पुराणात (हेमाद्रि. दान पा ८३) वाराणसी, कुरुक्षेत्र प्रभृति अनेक पुण्य क्षेत्रांचा नामनिर्देश करून पुढे असे म्हटले आहे की सर्व पर्वत, सर्व नद्या आणि सागर ही स्थळे पवित्र असून त्या स्थळी केलेल्या दानांचे फल अंतरहित असते.

कोणत्याही वस्तूचे दान देताना दान घेणाऱ्याच्या हातावर उदक ओतावे लागते. वेदोक्त यज्ञांच्या वेळी करावयाच्या दानांव्यतिरिक्त इतर **सर्व दाने उदकपूर्वक दिली पाहिजेत** असे आपस्तंबाने (२·४·९·९।१०) सांगितले आहे सर्वही दानांबरोबर पृथक पृथक **दक्षिणा दिली पाहिजे**. ह्या नियमाला काही **अपवाद** आहेत. उदाहरणार्थ, सुवर्ण, रुपे ह्यांच्या सारखी काही दाने दक्षिणारहित दिल्यास चालतील असे अग्निपुराणात (२११·३१) सांगितले आहे.

निरनिराळ्या पदार्थांच्या **अधिष्ठात्र्या देवतांची** नावे विष्णुधर्मोत्तर पुराणात (हेमाद्रि दान. पा ९६।९७) दिली असून ज्या पदार्थाची अधिष्ठात्री देवता पृथक् सांगितलेली नसेल त्या पदार्थाची देवता विष्णु समजावी असे सांगितले आहे.

**दान देण्याचे सामान्य विधान.** दान देणाऱ्याने स्नान, आचमन इत्यादि सर्व विधीत सामान्य असणारी कृत्ये केल्यानंतर दानाचा संकल्प करावा. ह्या संकल्पामध्ये दान द्यावयाच्या वस्तूचे नाव, त्या वस्तूची अधिष्ठात्री देवता, दान देण्याचा उद्देश ह्यांचा उच्चार करावा आणि आपले स्वतःच्या नावाचा उच्चार करून ही वस्तु मी तुला दान देत आहे असे म्हणून दान घेणाऱ्याच्या हातावर उदक सोडावे. दान घेणाऱ्याने 'दे' असे म्हणावे. दात्याने त्या वस्तूवर पाणी शिंपडून ती वस्तु दान घेणाऱ्याच्या हातात द्यावी. दान घेणाऱ्याने 'ओम् स्वस्ति' असे म्हणावे. नंतर दान घेणाऱ्याला दक्षिणा द्यावी. दान द्यावयाची वस्तु जमीन, घर ह्यांच्यासारखी हातात देण्यासारखी नसेल तर दान घेणारा त्या जमिनी सभोवती चालतो अथवा घराच्या बाबतीत त्या घरात प्रवेश करतो.

राजाने प्रतिदिवशी वेदवेत्त्या ब्राह्मणांना दुभत्या गाई, जमीन, घर, विवाहाची साधने इत्यादि वस्तूंची दाने द्यावी असे याज्ञ. (१·१३३) मध्ये सांगितले आहे. हा नियम फार प्राचीन काळापासून राजे लोक पाळीत असल्याचे शिलालेखांवरून आणि ताम्रपटांवरून आढळून येते. एपि. इ. खंड ७ पा. ५७ (कार्ले लेणी); एपि. इ. खं. ८ पा ७८ (नासिक लेणी इ०). इतर वर्णाच्या मानाने ब्राह्मण वर्णाचे लोक गरिबीत राहून देशातील धार्मिक वाङ्मयाचा परंपरागत अभ्यास करीत असत आणि ते ग्रंथ इतरांना शिकवीत असत. त्यांना आपण होऊन अंगावर घेतलेले हे कार्य त्यांना पार पाडणे शक्य व्हावे ह्याकरिता आवश्यक असणारी सर्व साधनसामग्री ब्राह्मणांना पुरविणे हे आपले कर्तव्य असल्याचे प्राचीन काळचे राज्यकर्ते मानीत असत.

सर्व प्रकारच्या दानांत भूमिदान हे अत्यंत पुण्यदायक असल्याचे प्राचीन काळापासून सांगितले आहे. (वसि. ध. सू. २९।१६; अनुशासन ६२·१९ इ०). भूमिदान इतके महत्त्वाचे मानले जात असे की स्मृतींनी त्यासंबंधी अनेक नियम घालून दिले आहे. (याज्ञ १·३१८।२०; बृहस्प; व्यास, अपरार्क पा ५७९।८०). दानपत्र कसे तयार करावे, त्यात काय तपशील असावा, ते कोणाला उद्देशून लिहिलेले असावे इत्यादि संबंधी स्मृतींनी सांगितलेल्या नियमांचे पालन करण्यात येत असे असे आतापर्यंत उपलब्ध झालेल्या सहस्त्रावधि ताम्रपटांवरून आणि शिलालेखांवरून दिसून येते. (गुप्त घराण्याचे लेख, ऋ. ५, ८, १६३ इ.; एपि. इ. खं १ पा. ७). अशा दानपत्रात दानाची प्रशंसा करणारे आणि दान परत घेण्याची निंदा केलेले आणि शाप दिलेले काही श्लोकही घातलेले असतात. (एपि. इ. खं ११ पा. १०७,१११,२२१ इ.). असे शाप

घातलेले असूनही पूर्वीच्या राजांनी दिलेली इनामे त्यांच्या वंशजांनी केव्हा केव्हा रद्द केल्याचीही उदाहरणे आढळून येतात. (एपि. इ. खं ९ पा. २४).

संपूर्ण गावाचे दान देताना पूर्वी देवालयांना आणि ब्राह्मणांना दान दिलेल्या जमिनी वगळण्यात येत असत. राजांनी दिलेल्या दानपत्रांत जमिनीवरील कर माफ केलेला असे. पुष्कळ वेळी दान दिलेल्या जमिनी **आठ भोगांसह** दिल्या आहेत असे दानपत्रात लिहिलेले असून त्या भोगांची वर्णनेही दिलेली असतात. एका ताम्रपटात [निधिनिक्षेपवार्यश्म अक्षिण्यागामि संज्ञकम् । सिद्धसाध्यमिति ख्यातमष्टभोगैश्च संयुतम् ॥ एपि. इं. खं १५ पा. २२.] (एपि. इं. खंड १५ पा. २२) हे आठ भोग पुढीलप्रमाणे सांगितले आहेत : **निधि** (जमिनीत पुरलेले धन), **निक्षेप** (जमिनीवर ठेवलेले धन), **वारि** (पाणी), **अश्मन्** (दगड, खनिज पदार्थ), **अक्षिणी** (विद्यमान हक्क), **आगामी** (पुढे मिळणारे लाभ), **सिद्ध** (लागवडीला आलेली जमीन), **साध्य** (लागवडीला आणता येण्यासारखी जमीन). मराठी राज्याच्या काळी जमीन अथवा गाव इनाम देताना 'जल, तरु, काष्ठ, पाषाण, निधी, निक्षेप' असे शब्द घालण्याची चाल होती. ह्या शब्दांच्या योगाने प्रत्यक्ष जमिनीचे स्वामित्व प्राप्त होते आणि ते शब्द नसल्यास दान घेणाऱ्याला प्रत्यक्ष जमिनीचे स्वामित्व दिलेले नसून फक्त त्या जमिनीवरील कर मिळण्याचा राजाला असणारा अधिकार मात्र दिला आहे असे सांप्रत काळची न्यायालये ठरविण्याचा संभव असतो.

राजाला त्याच्या राज्यातील सर्व जमिनीवर स्वामित्व असते किंवा नाही ह्याविषयी फार प्राचीन काळापासून मतवैचित्र्य होते. जैमिनीचे (६·७·३) असा सिद्धांत प्रतिपादन केला आहे की विश्वजित् यज्ञात (म्हणजे ज्या यज्ञात यज्ञकर्त्याचे स्वामित्व असणाऱ्या सर्व वस्तूंचे दान करावयाचे असते) सम्राटाला देखील त्याच्या राज्यातील सर्व जमिनीचे दान देता येत नाही, कारण **पृथ्वीवर सर्वांचे स्वामित्व असते** (म्हणजे ती जशी राज्यकर्त्याची असते त्याप्रमाणेच ती लागवड करणाऱ्यांची आणि तिचा उपभोग घेणाऱ्यांचीही असते. व्यव. मयूख पा. ९१). ह्या बाबतीत **दुसरे मत** असे होते की, **राजा हा जमिनीचा स्वामी असून प्रजानन केवळ त्या जमिनी धारण करणारे असतात.** (याज्ञ १.३१८ वरील मिताक्षरा). हे मत सोईचे आणि फायदेशीर असल्यामुळे ब्रिटिश राज्यकर्त्यांनी आपल्या धोरणात आणि कायद्यात त्या मताचा स्वीकार केला होता.

निदान लागवडीस आणलेल्या जमिनींच्या बाबतीत त्या जमिनींचे स्वामित्व त्या जमिनी कसणाऱ्याकडे असते आणि राजाला तो देत असलेल्या संरक्षणाचा मोबदला म्हणून त्या जमिनीत उत्पन्न होणाऱ्या **पिकाचा काही अंश कर म्हणून घेण्याचा अधिकार** असतो असे मनु (७·१३०।१३२, १०·११८ इ.) प्रभृति स्मृतिकारांचे मत होते आणि असा कर किती प्रमाणात बसवावा ह्यासंबंधी काही नियम स्मृतींनी सांगितले आहेत. जमिनीवर बसविलेला महसूल हा त्या जमिनीच्या उपभोगाबद्दल मोबदल्याच्या म्हणजे खंडाच्या स्वरूपाचा असतो किंवा कराच्या स्वरूपाचा असतो ह्याबद्दल आधुनिक काळी बरेच मतभेद आहेत. जमिनीच्या पिकाचा सहावा, आठवा अथवा बारावा अंश राजाने घ्यावा असे मनूने सांगितले आहे.

प्राचीन काळचे मोठे पराक्रमी राजे एकादी लागवडीला असलेली जमीन दान करावयाची झाल्यास ती जमीन धारण करणाऱ्या जवळून विकत घेऊन करीत असत.

ब्राह्मणांना दान दिलेल्या जमिनींना अथवा गावांना **अग्रहार** ही संज्ञा फार प्राचीन काळापासून देण्यात आली आहे. तो शब्द महाभारतात (वन ६८·४; आश्रम २·२ इ०) अनेक ठिकाणी आला आहे.

**महादाने**. काही विशिष्ट प्रकारच्या दानांना 'महादाने' म्हणतात. अशा महादानांची संख्या काही पुराणात (अग्नि २०९. २३।२४) दहा सांगितली आहे तर इतर काही पुराणांत (मत्स्य २७४, लिंग इ०) सोळा सांगितली आहे. ह्या सोळा महादानांची नावे, (निदान त्यांच्यापैकी काही नावे तरी) ख्रि. पू. काही शतकांइतकी जुनी आहेत. ह्या महादानांची विस्तृत वर्णने मत्स्यप्रभृती पुराणांत केली आहेत. सर्वही महादानांच्या विधानात मंडप उभारणे, वेदी तयार करून अग्नीची स्थापना करणे, काही विशिष्ट देवतांना उद्देशून त्या अग्नीमध्ये हवन करणे ह्याच्या सारखे विधि सामान्य असतात. प्रत्येक महादानात कोणत्या पदार्थाचे दान द्यावयाचे असते हे खाली सांगितले आहे.

**तुलापुरुष** (मत्स्य अ. २७४). ह्या दानामध्ये दान देणाऱ्याच्या वजनाइतके सुवर्ण, रुपे, तांबे, कापूर इत्यादि पदार्थांचे दान द्यावयाचे असते. त्या पदार्थापैकी अर्धा भाग गुरूला (मुख्य पुरोहिताला) द्यावा आणि बाकीचा अर्धा भाग इतर ब्राह्मणांना वाटावा. तसेच इतर आदरणीय लोक, दरिद्री आणि अनाथ लोक ह्यांनाही देणग्या देऊन त्यांचा सत्कार करावा. अशा प्रकारच्या सुवर्णतुला राजे लोक तसेच त्यांचे अधिकारी देखील केव्हा केव्हा करीत असत.

**हिरण्यगर्भ** (मत्स्य अ. २७५).अष्टदळी कमळाच्या अंतर्भागासारखा आकार असलेले एक सुवर्णाचे पात्र, **ब्रह्मांड** (मत्स्य २७६). भूगोलाच्या दोन अर्ध्या भागासारखी दिसणारी दोन सुवर्णाची पात्रे, **कल्पतरु** अथवा **कल्पवृक्ष** (मत्स्य २७७) एक मोठा आणि चार लहान असे सुवर्णाचे वृक्ष, **गोसहस्त्र** (मत्स्य २७८). वस्त्रालंकारयुक्त एक हजार गाई आणि सुवर्णाची केलेली एक नंदिकेश्वराची प्रतिमा, **कामधेनु** (मत्स्य २७९). सुवर्णाची एक गाय आणि तिचे वासरू, **हिरण्याश्व** (मत्स्य २८०). सुवर्णाचा केलेला एक घोडा, **हिरण्यरथ** (मत्स्य २८१). सात अथवा चार घोडे असलेला चार चाकाचा एक सुवर्णाचा रथ, **हेमहस्तिरथ** (मत्स्य २८२). चार चाकांचा सुवर्णाचा लहान रथ आणि त्याला जोडलेले सुवर्णाचे चार हत्ती, **पंचलांगल** (मत्स्य २८३). लांकडाचे पाच नांगराचे फाळ, सुवर्णाचे नांगराचे पाच फाळ, दहा उत्तम जातीचे बैल आणि शक्तीप्रमाणे जमीन अथवा गांव, **धरा** अथवा **हेमधरा** (मत्स्य २८४). जंबुद्वीपाच्या सारखी सुवर्णाची पृथ्वीची प्रतिमा, **विश्वचक्र** (मत्स्य २८५). निरनिराळ्या देवतांच्या प्रतिमा कोरलेले एक सुवर्णाचे चाक, **महाकल्पलता** (मत्स्य २८६). निरनिराळ्या फळांची आणि फुलांची चित्रे असलेल्या सुवर्णाच्या दहा वेली, **सप्तसागरक** (मत्स्य २८७). सुवर्णाची सात कुंडे दूध, तूप इत्यादि पदार्थानी भरून रत्नांसह, **रत्नधेनु** (मत्स्य २८८). रत्नांची केलेली एक गाय आणि तिचे वासरू, **महाभूतघट** (मत्स्य २८९). दुधाने अथवा तुपाने भरलेला सुवर्णाचा घट.

वर सांगितलेल्या महादानांसारखीच दुसरी काही दाने असतात. धान्य, मीठ, गूळ, तीळ इत्यादि पदार्थांचे पर्वताच्या आकाराचे ढीग घालून त्यांचे दान करावयाचे असते. अशा दानांना मत्स्य पुराणात (८३-९२) **पर्वत दाने** अथवा **मेरुदाने** अशा संज्ञा दिल्या आहेत आणि दुसऱ्या काही ग्रंथांत (हेमा—दान पा. ३४६-३९६) त्यांना **शैल** अथवा **अचल** अशा संज्ञा दिल्या आहेत. ह्याशिवाय निरनिराळ्या ग्रंथांत हत्ती, घोडे, रेडे, हरणांची कातडीं, छत्र्या इत्यादि अनेक पदार्थांची दाने सांगितली आहेत. चैत्र महिन्यापासून तीन अथवा चार महिने प्रवाशांना **पाणी वाटण्या**करिता नगराच्या मध्यभागी अथवा निर्जळ वाळवंटात अथवा देवालयाच्या शेजारी एक मंडप उभारावा आणि पाणी देण्याकरिता एक ब्राह्मण ठेवावा असे काही पुराणांत (भविष्योत्तर—अपरार्क पा. ३७५।७६) सांगितले आहे.

अनुक्रमणिका

दुसरे एक महत्वाचे दान म्हणजे महाभारत, रामायण आदि प्राचीन ग्रंथ, धर्मशास्त्रे आणि पुराणे ह्याच्या **हस्तलिखित प्रतीचे** दान हे होय. (अपरार्क पा. १८९—४०३).

एक अथवा अनेक **गाईच्या दानाची** फार मोठी प्रशंसा स्मृतिग्रंथांत केलेली असते. गाईच्या दानाची विशेष प्रशंसा करण्याचे कारण महाभारतात (अनु. ८३· १७।१८) असे सांगितले आहे की गाय ही यज्ञाचे एक मूलभूत असते, ती दूध देऊन लोकांचे पोषण करते आणि तिची संतती शेतीला उपयोगी असते. गाईंमध्ये **कपिला** (पिंगट) रंगाची गाय सर्वात श्रेष्ठ समजली जाते (अनुशा. ७३·४२). मृत्यूच्या दारात असलेल्या मनुष्याने विशेषेकरून गाईचे (आणि त्यांतल्या त्यात कृष्ण वर्णाच्या गाईचे) दान द्यावे म्हणजे त्याला यमलोकातील वैतरणी नावाची जळती नदी उतरून पार जाण्यास साह्य होते असे अग्नि पुराणात (२१०·३४) म्हटले आहे आणि त्यामुळे त्या गाईला **वैतरणीगाय** असे म्हणतात. **उभयतोमुखी** म्हणजे वासराला जन्म देण्याच्या स्थितीत असलेली गाय दान देण्याचे विशेष पुण्य सांगितले आहे. (याज्ञ १·२०·६।७).

गाईच्या दानाचे अनुकरण करून गूळ, तूप, तीळ इत्यादि काही विशिष्ट पदार्थांचे दान करण्यात येत असे आणि अशा पदार्थांना देखील 'धेनु' अशी संज्ञा लावित असत. ह्यांच्या जोडीला **सुवर्णधेनु** आणि **रत्नधेनु** ह्यांचाही काही ग्रंथकारांनी समावेश केला आहे. (मत्स्य ८२·१७।२२; अग्नि २१०·११।१२ इ.). दान द्यावयाची गाय म्हातारी, अशक्त, निरुपयोगी [न कृशां नापवत्सां वा वन्ध्यां रोगान्वितां तथा । न व्यङ्गां न परिश्रान्तां दद्याद् गां ब्राह्मणाय वै ॥ अनुशासन ६६·५३.] नसावी. (कठ उप १·१·३; अनुशा. ६६·५३).

मध्ययुगीन काळात **ग्रहांच्या संतोषाकरिता दाने** देण्यात येत असत आणि सांप्रतही अशी दाने दिली जातात. ही भावना (गौत ११·१५।१६, आश्व. गृ. ३·१२·१६ इ.) सूत्रग्रंथांच्या कालाइतकी प्राचीन असल्याचे दिसून येते. याज्ञ. स्मृतीमध्ये (१.२९५।३०८) **ग्रहशांतीचे** वर्णन केले आहे. आधुनिक काळीही ग्रहांच्या प्रीत्यर्थ **ग्रहमख** नावाचा एक विधि केला जातो. हा विधि नित्य, नैमित्तिक आणि काम्य अशा तीन प्रकारचा असतो. विषुवदिनासारख्या दिवशी केलेला ग्रहमख **नित्य**स्वरूपाचा असून उपनयनासारख्या प्रसंगी करण्यात येणारा ग्रहमख **नैमित्तिक** असतो. ह्याशिवाय संकट निरसनार्थ करावयाचा ग्रहमख **काम्य** असतो.

**आरोग्यशाला** अथवा **औषधालये** यांची स्थापना करून तेथे निपुण वैद्याची नेमणूक करून रोग्यांना **विनामूल्य औषधे** देण्याची व्यवस्था करणे हेही एक प्रकारचे दान असते. चारी पुरुषार्थ आरोग्यावर अवलंबून असल्यामुळे आरोग्य मिळवून देण्याची जो व्यवस्था करील त्याने सर्वही पदार्थांचे दान दिल्यासारखे होते असे नंदिपुराणात (अपरार्क पा. ३६५।३६६) म्हटले आहे.

ज्या वस्तूचे दान स्वीकारू नये असे शास्त्रांत सांगितले आहे अशा वस्तूचा स्वीकार केल्यास लागणाऱ्या पातकाचा परिहार ती वस्तु टाकून दिल्याने, गायत्री सारख्या वेदमंत्रांचा जप केल्याने अथवा तपाने म्हणजे प्रायश्चित्त केल्याने होतो. (मनु. ११—१९३). अशा प्रकारचे पातक 'असत्परिग्रहा'मुळे उत्पन्न होत असते आणि हा **असत्परिग्रह** (मनु. ११-१९४; याज्ञ. ३-२८९) दान देणाराची जात, अथवा दान दिल्याचा काळ, अथवा दान दिलेल्या वस्तूचे स्वरूप ह्यांच्यामुळे होत असतो. अशा प्रकारची दाने देणाऱ्याला पातक लागत नाही परंतु ती दाने स्वीकारणाऱ्याला पातक लागते. पद्मपुराणात (दानचंद्रि. पा १०) म्हटले आहे की एखाद्या ब्राह्मणाला आपला चरितार्थ चालविणे कठीण झाले तर त्याने गंगा आदि पुण्यनद्यांच्या तीरावर दान स्वीकारावे तथापि अशाप्रकारे स्वीकारलेल्या पदार्थांचा दहावा भाग त्याने स्वतः

दान द्यावा म्हणजे त्याला पातक लागणार नाही. असे दान स्वीकारणे हा असत्परिग्रह असतो. (दानक्रि. कौ. पा. ८४।८५).

दान देणे आणि त्यापासून पुण्यप्राप्ती होणे हा देवांच्या आणि मनुष्यांच्या मध्ये होणारा एक **देवघेवीचा व्यवहार** असतो अशा अर्थाचे एक वाक्य [धेहि मे ददामि ते नि मे देहि निते दधे । तै. सं. १·८·४·१.] तैत्ति. सं. (१·८·४·१) मध्ये आहे. अशाच स्वरूपाच्या भावना आणि कल्पना अगदी अलिकडील काळापर्यंत चालत आल्या असून त्यांना अनेक प्रकारच्या दानांपासून मिळणाऱ्या निरनिराळ्या फलांच्या वर्णनाने पुष्टि मिळत आहे.

दिलेल्या दानाचा एकदा स्वीकार केला म्हणजे ते दान फिरविता येत नाही. इतकेच नव्हे तर जो पदार्थ देण्याचे अभिवचन दिले असेल तो पदार्थ दिला पाहिजे आणि जो पदार्थ दान केला असेल तो परत घेऊ नये असे याज्ञ. स्मृतीत (२· १७६) म्हटले आहे. मिळालेल्या पदार्थाचे मूल्य, कामाबद्दल वेतन, पूर्वी केलेल्या उपकाराबद्दल कृतज्ञता दर्शित करण्याकरिता दिलेली देणगी, धार्मिक आणि आध्यात्मिक हेतूने दिलेली दाने, वधु मिळविण्याकरिता तिच्या नातलगांना दिलेले द्रव्य ह्यांच्यासारखी देणी फिरविता येत नाहीत. तथापि एकादे दान देण्याचे अभिवचन दिले असले तरी ज्याला दान द्यावयाचे तो मनुष्य अधार्मिक अथवा (वेश्यागमनासारखी) अयोग्य कृत्ये करणारा असला तर ते अभिवचन पुरे करण्याची आवश्यकता नाही, अशा प्रकारचे नियम नारद, मनु प्रभृतींनी सांगितले आहेत. (नारद दत्ता. श्लोक ८; मनु ८·२१२). अतिशय रागाच्या अथवा आनंदाच्या भरात अथवा आपत्ती ओढवेल ह्या भीतीने अथवा अशाच प्रकारच्या कारणाने दिलेली अभिवचने त्या मनुष्यांना परत घेता येतात आणि असे केल्याने त्यांना पातक अथवा दोष लागत नाही. (गौ. ५-२२). एकाद्या आजारी अथवा संकटात सापडलेल्या मनुष्याने दिलेले दान त्याला परत घेता येते. मात्र असा मनुष्य त्याने दिलेले अभिवचन पुरे करण्यापूर्वी मरण पावला तर त्याच्या पुत्राने अथवा वारसाने ते अभिवचन अमलात आणले पाहिजे कारण धार्मिक हेतूकरिता देणगी देण्याची इच्छा असल्याचे केवळ वचनही त्या मनुष्याच्या मृत्यूनंतर कायद्याने अमलात आणता येते असे [स्वस्थेनार्तेन वा देयं श्रावितं धर्मकारणात् । अदत्त्वा तु मृते दाप्यस्तत्सुतो नात्र संशयः ॥ कात्यायन (अपरार्क पा. ७८२).] कात्यायनाने (अपरार्क पा. ७८२) म्हटले आहे. ह्या वचनात **मृत्युपत्र करण्याच्या कल्पनेचा उगम** आढळतो.

आधुनिक काळात जर एकाद्या मनुष्याने धर्मदायाकरिता एकादी देणगी दिली असली अथवा तशी देणगी देण्याचे आपल्या मृत्युपत्रात लिहून ठेवले असले आणि ती कोणत्या विशिष्ट कार्याकडे खर्च करावयाची ह्याबद्दल काही खुलासा केलेला नसला तर ती देणगी **अनिश्चित स्वरूपाची** असल्याच्या सबबीवर **निरर्थक** ठरविण्यात येते. तथापि देणगी देणाऱ्याचा परोपकार करण्याचा हेतु स्पष्ट दिसत असल्यावर त्याने धर्मादायाकरिता दिलेल्या अथवा मृत्युपत्रात देण्याचे योजलेल्या मिळकतीचा विनियोग **पूर्त** स्वरूपाच्या अनेक कार्यांपैकी कोणत्यातरी कार्याकडे होईल अशी योजना राजाचा प्रतिनिधि ह्या नात्याने न्यायालयांनी का करू नये आणि अनिश्चित परिस्थिती असल्यास मूळ हेतूशी शक्य तितकी जुळेल अशी गोष्ट करावी ह्या तत्वाचे अवलंबन का करू नये हे समजत नाही.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ५०

## प्रतिष्ठा आणि उत्सर्ग

(मू. ग्रं. पा. ८८९—९१६)

**प्रतिष्ठा** आणि **उत्सर्ग** म्हणजे देवालये बांधणे आणि विहिरी, तलाव, उद्याने इत्यादिक सार्वजनिक उपयोगाकरिता देऊन टाकणे. अशा प्रकारच्या कृत्यांचा **पूर्त** धर्मात समावेश होतो आणि अशा प्रकारचा धर्म करण्याचा स्त्रियांना आणि शूद्रांना देखील अधिकार असतो. फार प्राचीन [धन्वन्निव **प्रपा** असि त्वमग्न इयक्षवे पूरवे प्रत्न राजन् ॥ ऋ. १०·४·१. — ह्यात अग्नीला वाळवंटातील प्रपेची (पाणपोईची) उपमा दिली आहे.] काळापासून अशी परोपकाराची कृत्ये प्रशस्त मानण्यात आली आहेत. (ऋ. १०·४·१). अशी सार्वजनिक उपयोगाचीं कृत्ये करणे हे लोकांचे कर्तव्य असल्याचे स्मृतींनीही सांगितले आहे. (विष्णु ध. सू. ९१·१।२). क्रमाक्रमाने अशी कृत्ये यज्ञापेक्षाही अधिक पुण्यदायक असल्याचे मानण्यात येऊ लागले कारण यज्ञात दिलेल्या दानाचा लाभ केवळ ब्राह्मणांनाच होतो. (कृत्यरत्नाकर पा. १०).

एकादी विहीर अथवा तलाव सार्वजनिक उपयोगाकरिता दान करण्याचे विधान प्राचीन सूत्रांत सांगितले आहे. शांख्यायन गृह्यसूत्रात (५·२) दिलेले विधान अति प्राचीन काळच्या विधानांपैकी एक आहे आणि त्यात पुढील प्रमुख कृत्यांचा समावेश केलेला आहे :

शुद्ध पक्षातील अथवा एकाद्या शुभतिथीवर जव दुधात शिजवून चरु तयार करावा आणि दान देणाऱ्याने अग्निमध्ये होम करावा. नंतर अग्नीच्या मध्यभागी दुधाच्या आहुती द्याव्या. नंतर दान देणाऱ्याने पाण्यात बुडी मारावी. एक गाय आणि दोन वस्त्रे अशी दक्षिणा द्यावी आणि नंतर ब्राह्मणांना भोजन घालावे.

दुसऱ्या काही गृह्यसूत्रांत मासे, कासव ह्यांच्यासारखे जलचर प्राणी त्या तलावात सोडावे आणि एका गाईला त्या जलाशयात प्रवेश करावयास लावावे असेही नियम सांगितले आहेत. (पार. गृ. परिशिष्ट). तलावाच्या ऐवजी विहीर दान करावयाची असल्यास गाईला पाण्यात न सोडता फक्त विहिरीच्या सभोवती फिरावयास लावावी.

कालांतराने पुराणात सांगितलेली विधानेच अधिकाधिक प्रचारात आली आणि शेवटी अशी स्थिति आली की प्रतिष्ठेच्या बाबतीत पुराणोक्त विधानच करावे, दुसऱ्या कोणत्याही प्रकारचे करू नये असे अपरार्काने (पा. १५) सांगितले आहे.

**प्रतिष्ठा** ह्याचा सामान्यतः अर्थ एकादी विशिष्ट गोष्ट सार्वजनिक उपयोगाकरिता शास्त्रोक्त विधीने दान करणे असा आहे. **उत्सर्ग** ह्या शब्दाचा अर्थ एकाद्या वस्तूवरील आपल्या स्वामित्वाचा त्याग करून ती सर्व लोकांच्या उपयोगाकरिता देऊन टाकणे असा आहे. (दानक्रिया कौ. पा. १६६). दान आणि उत्सर्ग ह्या दोन शब्दांच्या पारिभाषिक अर्थामध्ये भेद आहे. उत्सर्ग केलेली वस्तु सर्व लोकांच्या उपयोगाकरिता देत असल्यामुळे समाजाचा एक घटक ह्या नात्याने दान देणाऱ्याला त्या वस्तूचा उपयोग करण्याचा अधिकार राहतो परंतु दान दिलेल्या वस्तूच्या बाबतीत उपभोग घेण्याचा अधिकार दात्याला राहत नाही.

अनुक्रमणिका

भारतात वृक्ष फार मौल्यवान असल्याचे नेहमीच मानले जात आले आहे. त्यांचा उपयोग यज्ञामधील यूप, समिधा, यज्ञपात्रे इत्यादि करण्याकडे होत असे. आंब्यासारख्या काही वृक्षांची पाने शुभसूचक मानली जात आणि अद्यापिही त्यांच्या डाहाळ्या शुभ समारंभात टांगून ठेवण्यात येतात. वृक्ष लावण्याचे फार मोठे फल सांगितले असून अश्वत्थासारखे वृक्ष तोडण्याला निषेध केला आहे. सार्वजनिक उपयोगाकरिता निरनिराळ्या जातीची झाडे दिल्यास काय पुण्य प्राप्त होते ह्याचे वर्णन हेमाद्रीने दानखंडात (पा. १०२९–१०५५) केले आहे. पुत्रप्राप्तीसाठी वृक्षाची पूजा करण्याची स्त्रियांची चाल असल्याचे कादंबरी ह्या ग्रंथात सांगितले आहे. एकादे **उद्यान** सार्वजनिक उपयोगाकरिता **द्यावयाचा विधि** विहिरी, तलाव **दान करण्याच्या विधीच्या धर्तीवरच** असतो. ह्या दानाची दक्षिणा सुवर्णाची असावी असे शांख्या. गृह्यात (५·३) सांगितले आहे.

**देवता प्रतिष्ठा**. कोणत्याही प्रमुख गृह्य अथवा धर्मसूत्रात देवालयात मूर्तीची स्थापना करण्याचा विधि वर्णन केलेला नाही. ह्याच्या उलट काही पुराणात देवता प्रतिष्ठा ह्या विषयाला बरीच जागा दिलेली आढळते. देवाची उपासना काही चिन्ह पुढे न मांडता करता येते अथवा काही तरी प्रतीक पुढे मांडून करता येते. तथापि प्रतीक मांडून उपासना करणाऱ्याला देखील अशी पूर्ण जाणीव असते की देव वास्तविक रीत्या निरवयव्र, चित्स्वरूप असून प्रतीकाची अथवा प्रतिमेची योजना उपासकाच्या सोईकरिता केलेली असते. प्रतिमेच्या द्वारा करावयाच्या पूजेचे दोन प्रकार असतात : एक आपल्या घरात पूजा करणे आणि दुसरा प्रकार सार्वजनिक देवालयात पूजा करणे. देवालयात निरनिराळे उत्सव करता येतात आणि देवाला निरनिराळे उपचार अर्पण करणेही शक्य होते. म्हणून देवालयात केलेली पूजा अधिक चांगली आणि पूर्ण स्वरूपाची असते असे बऱ्याच ग्रंथांत म्हटले आहे. देवालयात मूर्ती स्थापना करण्यामध्येही दोन प्रकार असतात. एक प्रकार **चलप्रतिष्ठा** म्हणजे अशी मूर्ती हालविता येते आणि दुसरा प्रकार **स्थिरप्रतिष्ठा** म्हणजे अशी मूर्ती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी हालवावयाची अथवा उचलावयाची नसते. ह्या दोन्ही प्रकारच्या स्थापनांच्या काही काही तपशीलांत भेद असतो.

देवालयात **मूर्तीची स्थापना करण्याचे जे विधान** मत्स्यपुराणात (अ. २६४–२६६) सविस्तर वर्णन केले आहे त्यातील प्रमुख कृत्ये पुढीलप्रमाणे आहेत : देवालयाच्या बाहेर दोन मंडप उभारावे; त्यापैकी एका मंडपात लोकपालांची निरनिराळ्या दिशांना स्थापना आणि पूजा करावी. दुसऱ्या मंडपात मूर्ती आणून ती एका शय्येवर निजवावी; मूर्तीच्या मस्तकाकडील बाजूला होम करावा; प्रहराप्रहराला पूजा करावी आणि रात्री नृत्यगायनादि महोत्सव करावा. असा उत्सव एक ते सात दिवसपर्यंत करून नंतर ती मूर्ती देवालयाच्या अंतर्भागात आणावी आणि ठरविलेल्या जागी ती घट्ट बसवावी. त्या मूर्तीजवळ त्या देवतेच्या अनुचरांच्या मूर्ती स्थापन कराव्या. नंतर आवाहन करून मूर्तीला पंचामृत, सुगंधी पाणी इत्यादिकांनी स्नान घालावे. मूर्तीच्या निरनिराळ्या अंगांना उदकाचा स्पर्श करावा. आचार्याला दक्षिणा आणि वस्त्रालंकार द्यावे, दरिद्री, अपंग, अंध ह्यांनाही वस्त्रादि द्यावे. लोकपालांच्या शांत्यर्थ शांतिविधि करावा. आणि अनुरूप दाने द्यावी. नंतर तीन, पाच अथवा सात दिवस उत्सव करावा. ह्या निरनिराळ्या कृत्यांच्या वेळी वेदमंत्रांचा मुख्यत्वे करून उपयोग करावयाचा असतो आणि कांही थोडे पुराणोक्त मंत्रही असतात. मध्ययुगीन काळात झालेल्या निबंधग्रंथांत दिलेल्या विधानात तंत्र ग्रंथांतील काही भागांचा समावेश करण्यात आला. मत्स्यपुराणातील विधीमध्ये **प्राणप्रतिष्ठा** हा शब्दच मुळी आलेला नाही. देवीपुराणात (प्रतिष्ठातत्तव) असे सांगितले आहे की मूर्तीच्या गालांना उजव्या हाताने स्पर्श करून मग प्राणप्रतिष्ठा करता येते आणि अशी प्राणप्रतिष्ठा केल्याशिवाय कोणत्याही मूर्तीला पूजेला पात्र असणाऱ्या देवतेची योग्यता प्राप्त होत नाही. तंत्र

ग्रंथांतून घेतलेल्या भागात **तीन प्रकारचे न्यास** म्हणजे मातृकान्यास, तत्त्वन्यास आणि मंत्रन्यास करावयास सांगितले आहेत आणि निरनिराळ्या शक्तींना उद्देशून हवन करावयास सांगितले आहे.

वैखानसस्मार्तसूत्रात (४·१०।११) विष्णुमूर्तीच्या स्थापनेचा विधि वर्णन केला आहे आणि तो सध्या उपलब्ध असलेल्या प्राचीन काळच्या विधींपैकी सर्वात जुना असावा असे वाटते. तथापि तो विधी मुख्यतः कोणा एकाद्या मनुष्याच्या खाजगी घरात स्थापन केलेल्या मूर्तीच्या स्थापनेसंबंधी अथवा कोणा एकाच मनुष्याने पूजा करावयाच्या मूर्तीच्या स्थापनेसंबंधी आहे. त्या विधीमधील विशेष उल्लेखनीय कृत्ये म्हणजे सुवर्णाच्या सुईने मूर्तीचे नेत्र उघडणे, एकाद्या नदीत अथवा जलाशयात अथवा जलपूर्ण पात्रात देवाची मूर्ती आडवी निजविणे, मूर्तीच्या उजव्या हातात एक वस्त्राची पट्टी (प्रतिसर) बांधणे, योजलेल्या आसनावर रत्ने, सुवर्ण ठेवून त्या आसनावर मूर्तीची स्थापना करणे, मूर्तीच्या मस्तकावर, नाभीवर, पायावर आणि हृदयाचे ठिकाणी न्यास करणे ही आहेत.

देवालयांत **नर्तकी स्त्रिया** ठेवण्याचा प्रघात फार प्राचीन काळापासून चालत आलेला आहे. राजतरंगिणी (४·२६९) सारख्या प्राचीन ग्रंथांत आणि निरनिराळ्या शिलालेखांत त्याचा उल्लेख केलेला असून अशा नर्तकीच्या नेमणूकीची तजवीज केलेली आहे. (ए. पि. इ. खं. ११ पा २६।२७, ए. पि. इ. खं. १३ पा. ५८ इ०). आधुनिक काळच्या न्यायालयांनी **देवदासींची** आणि **भाविणींची** चाल अनीतिकारक असल्याचे ठरविले आहे. मुंबई प्रांतात सन १९३४ मध्ये झालेल्या देवदासींच्या संरक्षणाविषयीच्या (१० व्या) कायद्याने एकाद्या मूर्तीला अथवा देवालयाला अविवाहित स्त्रिया अर्पण करणे गैरकायदा ठरविले आहे.

**पुनःप्रतिष्ठा**. काही विशिष्ट परिस्थितीत देवालयात एकदा स्थापन केलेल्या मूर्तीची पुन्हा स्थापना करावी लागते. जेव्हा एकाद्या मूर्तीचे तुकडे होतात, तिचे चूर्ण होते, ती दग्ध होते अथवा ती आसनावरून उचलण्यात येते अथवा तिची विटंबना करण्यात येते अथवा तिची पूजा होण्याचे बंद होते अथवा गाढवासारख्या अपवित्र पशूचा तिला स्पर्श होतो, अथवा ती मूर्ति अपवित्र जागेत पडते अथवा एकाद्या जातिबहिष्कृत व्यक्तीचा तिला स्पर्श होतो अशासारख्या प्रसंगी त्या मूर्तीत देवाचे वास्तव्य होण्याचे थांबते. मूर्ति विटाळते तेव्हा तिची पुनः प्रतिष्ठा करावी; मूर्तीचे तुकडे अथवा चूर्ण झाल्यास ती मूर्ति उचलून तिच्या जागी अन्य मूर्तीची स्थापना करावी; मूर्तीला चोराचा, चांडालाचा स्पर्श झाला तर तिला शास्त्रोक्त पद्धतीने शुद्ध करून तिची पुन्हा प्रतिष्ठा करावी; तिची पूजा होण्याचे बंद झाले अथवा तिला शूद्र, रजस्वला स्त्री इत्यादिकांचा स्पर्श झाला तर तिला जलात ठेवावे आणि नंतर पंचगव्याने स्नान घालावे, पुरुषसूक्ताचा जप करावा, नंतर शुद्ध जलाने स्नान घालून गंधपुष्पादिकांनी तिची पूजा करावी. अशाप्रकारचे मूर्तीच्या पुनःप्रतिष्ठेसंबंधीचे नियम ब्रह्मपुराणात (निर्णय सिंधु) सांगितले आहे.

**जीर्णोद्धार.** जेव्हा एकादे देवालय अथवा एकादी मूर्ती अथवा लिंग दग्ध होते अथवा चूर्ण होते अथवा एका ठिकाणाहून दुसरे ठिकाणी हालविण्यात येते त्यावेळी जीर्णोद्धाराचा विधि करावा लागतो. एकादी मूर्ती अथवा लिंग प्रवाहात वाहून गेले तर त्या मूर्तीची अथवा लिंगाची दुसऱ्या स्थळी पुनःप्रतिष्ठा करावी; एकादी काष्ठाची मूर्ति अत्यंत जीर्ण झाल्यास तिचे दहन करावे; पाषाणाची मूर्ति अतिशय झिजल्यास ती पाण्यात टाकून द्यावी; धातूची अथवा रत्नाची मूर्ति अतिशय झिजल्यास ती खोल जलाशयात अथवा समुद्रात टाकावी आणि त्याच दिवशी त्याच आकाराची आणि त्याच पदार्थाची मूर्ति करून तिची शुद्धि करून स्थापन करावी. एखादे देवालय, विहीर अथवा तलाव भंग पावला अथवा एखाद्या उद्यानाची अथवा

सार्वजनिक सभागृहाची भिंत नादुरुस्त झाली तर त्यांची पुनः स्थापना करावी (अग्निपु. अ. ६७ आणि १०३, निर्णयसिंधु ३ पूर्वार्ध पा ३५३).

**मठप्रतिष्ठा.** मठांच्या स्थापनेचा प्रघात फारसा प्राचीन असल्याचे दिसत नाही. अमरकोशात मठ शब्दाचा अर्थ 'जेथे विद्यार्थी (आणि त्यांचा गुरु) वास करतात अशी जागा' असा दिला आहे. देवालयांची स्थापना मुख्यत्वेकरून देवाचे भजन आणि पूजन करण्याकरिता केलेली असते. तसेच धार्मिक प्रवचन, रामायणादि पुराणग्रंथांचे पठण आणि कीर्तन ह्यांच्या करिताही देवालयांचा पुष्कळ वेळा उपयोग करण्यात येतो. परंतु हे दुसऱ्या प्रकारचे उपयोग देवालयांच्या बाबतीत केवळ दुय्यम प्रकारचे असतात. मठांच्या बाबतीत त्यांचा मुख्य उद्देश त्याठिकाणी एकाद्या मोठ्या आचार्याने शिष्यांना आणि सामान्यजनांना एकाद्या सांप्रदायाच्या तत्त्वांचे अथवा आध्यात्मिक सिद्धांतांचे शिक्षण द्यावे अथवा व्याकरण, मीमांसा इत्यादि विद्येच्या शाखेचे अध्यापन करावे हा असतो. एकाद्या विशिष्ट देवतेची पूजा करणे हा मठांचा मुख्य उद्देश नसतो. बहुधा बुद्धधर्मीयांचे विहार पाहून वैदिक धर्मानुयायांनी मठांची स्थापना करण्यास प्रारंभ केला असावा. आद्य शंकराचार्यांच्या काळानंतर मठांच्या स्थापनेला फार प्रोत्साहन मिळाले. जेव्हा संन्यासी आपल्या गांवात येतील तेव्हा त्यांना उतरण्याकरिता तेथील लोकांनी आश्रम बांधले आणि अशा आश्रमांना बहुधा प्रारंभी मठ अशी संज्ञा मिळाली. क्रमाक्रमाने मोठमोठ्या पंथांच्या आचार्यांच्या, त्यांच्या शिष्यांच्या आणि अनुयायांच्या निष्ठेने आणि भक्तींने अशा मठांना स्थावर आणि जंगम मिळकत मिळाली. अशी मिळकत त्या पंथाच्या विद्यमान आचार्याच्या ताब्यात राहते. मठाच्या मुख्याला स्वामी, मठपती अथवा महंत असे म्हणतात. मठाच्या मुख्याची स्थापना बहुधा प्रत्येक मठाच्या सांप्रदायाला अनुसरून करण्यात येते. सामान्यतः अशी स्थापना पुढील तीन प्रकारापैकी कोणत्या तरी एका प्रकाराने होते : (१) मठाचा मुख्य आपल्या शिष्यांमधून मठपती होण्यास योग्य अशा शिष्याची निवड करतो, (२) मठाधिपतीच्या मृत्यूनंतर त्याचे शिष्य आपल्यापैकी एका शिष्याची निवड करतात, (३) मठाधिपतीची जागा रिकामी पडल्यास स्थानिक राज्यकर्ता अथवा मठाची स्थापना करणारा अथवा त्याचे वारस मठपतीची नेमणूक करतात. ज्यांना विपुल देणग्या दिलेल्या आहेत अशी देवालये आणि मठ सर्व भारतभर अनेक शतके अस्तित्वात आहेत. धर्मशास्त्रावरील ग्रंथांत आणि तदनुषंगीय इतर लेखांत जे थोडे उल्लेख आले आहेत (मनु ११·२६, याज्ञ २·२२८ कौटि ३·९ इ.) त्यांवरून असे दिसून येते की त्या काळचे राज्यकर्ते देवालयाच्या मिळकती, तलाव, विहिरी ह्यांच्यासारख्या सार्वजनिक उपयोगाकरिता दिलेल्या वस्तु ह्यांचे संरक्षण करीत असत, त्यांच्यावर देखरेख करीत असत, आणि कोणी त्या मिळकतीला अपाय करील त्याचे शासन करीत असत. आधुनिक काळच्या राज्यकर्त्यांनी अशा धार्मिक आणि लोकोपयोगी संस्थांचे नियंत्रण करणारे अनेक कायदे केले आहेत. (१८६३ चा २० वा, १८८० चा १ ला, इ०).

एकाद्या देवस्थानाला दान दिलेल्या मिळकतीला **'देवोत्तर'** असे म्हणतात.

**योगक्षेम**. योगक्षेम **अविभाज्य** असतो. असे मनूने (९·२१९) म्हटले आहे. लौगाक्षीने (याज्ञ. ११८।१९ वरील मिता.) ह्या शब्दाचा अर्थ 'इष्ट आणि पूर्त' असा केला आहे. देवालयांना दिलेल्या आणि लोकोपयोगी कार्याकरिता दिलेल्या मिळकती सामान्यतः विकता येत नाहीत अथवा गहाण वगैरे प्रकारांनी दुसऱ्यास देता येत नाहीत असे कायद्यांनी आणि न्यायालयांनी ठरविलेले असते.

सार्वजनिक उपयोगाकरिता दान दिलेल्या वस्तूवरील दान देणाऱ्याचे स्वामित्व नष्ट होते परंतु त्याला त्या त्या वस्तूचे संरक्षण करण्याचा अधिकार निरंतर राहतो आणि अशा वस्तूवर दुसरा कोणी

स्वामित्व प्रस्थापित करू लागले तर त्याला तसे करण्यास प्रतिबंध करण्याचा मूळच्या दात्याला अधिकार असतो असे वीरमित्रोदयात (व्यवहार) म्हटले आहे.

एकाद्या सार्वजनिक देवालयातील मूर्ती जुन्या जागेतून काढून एकाद्या नव्या इमारतीत स्थापन करण्याचा अधिकार विशेषतः जर त्या देवाच्या भक्तांपैकी बहुसंख्य लोकांचा विरोध असेल तर त्या देवालयाच्या व्यवस्थापकांना नसतो असे न्यायालयांनी ठरविले आहे.

अनुक्रमणिका

# प्रकरण ५१

## वानप्रस्थ

(मू. ग्रं. पा. ९१७—९२९)

**वानप्रस्थ** म्हणजे वनामध्ये राहणारा तापसी अथवा मुनि. वानप्रस्थ आणि वनप्रस्थ हे दोन्ही समानार्थी शब्द आहेत. **वैखानस** हे वानप्रस्थाचे प्राचीन नाव असावे. ऋग्वेदातील काही सूक्तांचे (९·६६ आणि १०·९९) ऋषि वानप्रस्थ होते. वानप्रस्थांचे नियम ज्यात दिले आहेत असा **वैखानसशास्त्र** नावाचा एक ग्रंथ प्राचीन काळी अस्तित्वात असावा. जो वैखानस शास्त्रातील नियमांना अनुसरून वागतो तो वैखानस अशी [वानप्रस्थो वैखानसशास्त्रसमुदाचारः । बौ. ध. सू. २·६·१९.] व्याख्या बौधायनाने (२·६·१९) दिली आहे. संपत्तीच्या मागे लागण्यापेक्षा संपत्तीचा संचय करण्याची इच्छा न करणे हे अधिक चांगले असे वैखानसाचे मत असल्याचे महाभारतात म्हटले आहे. (शान्ति २०·६।७, २६·६). वैखानस हा तिसरा आश्रम असल्याचे वेदान्त सूत्र (३·४·२०) वरील भाष्यात श्री शंकराचार्यांनी म्हटले आहे. शूद्राव्यतिरिक्त सर्वांना वानप्रस्थ होता येते.

बौधा. ध. सू. (३·३) मध्ये वानप्रस्थांचे निरनिराळे सूक्ष्म भेद वर्णन केले आहेत. त्यांत **पचमानक** (शिजविलेले अन्न आणि पक्व फले भक्षण करणारा) आणि **अपचमानक** (तसे न करणारा) असे दोन प्रमुख भेद सांगून पुढे त्यांचे **सर्वारण्यक, वैतुषिक** इत्यादि अनेक पोटभेद सांगितले आहेत. बृहत्पराशराने (अध्या. ११ पा. २९०) **वैखानस, उदुंबर, वालखिल्य** आणि **वनवासी** असे चार भेद सांगितले आहेत. वैखानस सूत्रात (८·७) **सपत्नीक** आणि **अपत्नीक** असे दोन प्रकार सांगून त्यांचे औदुंबर, वालखिल्य इत्यादि पोटभेद सांगितले आहेत. रामायणात (अरण्य १०·२।६) वालखिल्य, **अश्मकुट्टक** इत्यादि तापसांची नावे दिली आहेत.

वानप्रस्थ होण्याचा **विहित काल दोन** प्रकारानी संभवतो. ब्रह्मचर्याचा अवधि झाल्यावर लागलीच वानप्रस्थ होता येते अथवा गृहस्थाश्रमात काही वर्षे काढल्यानंतर वानप्रस्थ होता येते. वानप्रस्थ केव्हा होता येते ह्याविषयी मनूने (६·२) असे सांगितले आहे की जेव्हा एकाद्या मनुष्याला आपल्या शरीरावर सुरकुत्या पडण्यासारखी आणि केस पांढरे होण्यासारखी चिन्हे दिसतील आणि तो आपल्या पुत्राचा पुत्र अवलोकन करील तेव्हा त्याने वनाचा आश्रय करावा. ह्या अटीवरून मनुष्याच्या वयाचा केवळ बोध होतो म्हणजे वानप्रस्थ होण्यापूर्वी मनुष्य वृद्ध झालेला असला पाहिजे. ५० वर्षांच्या वयानंतर कोणाही मनुष्याला वनाचा आश्रय करता येतो अशा अर्थाचे एक स्मृतिवचन आहे. (मनु. ३·५० वरील कुल्लूकटीका).

वानप्रस्थासंबंधी अनेक **नियम** स्मृतींनी आणि धर्मसूत्रांनी सांगितले आहेत. वानप्रस्थाने आपल्या शरीराला हालांची सवय करून कडक तपश्चर्या करावी. (मनु. ६·२३।३४). आपल्या गावात असताना भक्षण करीत असलेली अन्ने वर्ज्य करावी. (मनु ६·५ आणि १३). शय्येसारखी घरगुती साधने वर्ज्य करावी. पूर्ण ब्रह्मचर्याने राहावे. आत्मसंयमन करावे. (गौ. ३·२६ आणि २८). निरनिराळ्या उपनिषदांचा अभ्यास करावा. (मनु. ६·२९।३०). दानशील असावे परंतु दान स्वीकारू नये. (मनु. ६·८) इत्यादि नियमांचा त्यांत समावेश होतो.

वानप्रस्थ झालेल्या ययाती, धृतराष्ट्र ह्यांच्या सारख्या राजपुरुषांची उदाहरणे महाभारतात दिली आहेत. स्त्रियांना देखील वनात जाता येत असे. पांडूच्या मृत्यूनंतर सत्यवती आपल्या दोन सुनांसह तपश्चर्येकरिता अरण्यात गेली आणि तेथे मरण पावली. श्रीकृष्णाने देहत्याग केल्यावर त्याच्या सत्यभामा प्रभृती स्त्रियांनी तीव्र तपश्चर्या करण्याच्या उद्देशाने वनात प्रवेश केला होता.

वानप्रस्थाला एकाद्या असाध्य रोगाची पीडा होऊन आह्निक कृत्ये नीटपणे पार पाडता येईनासे झाल्यावर अथवा मृत्यु समीप आला असे वाटल्यावर त्याने **महाप्रस्थानाला** निघावे आणि पाणी आणि वायु भक्षण करून देहपतन होईपर्यंत चालावे अथवा जलात अथवा अग्नीमध्ये प्रवेश करावा अथवा कड्यावरून उडी मारावी. (अत्रि २१८।२१९). सामान्यतः आत्महत्या करणे अथवा आत्महत्येचा प्रयत्न करणे हे कृत्य धर्मशास्त्रकार महापातकांपैकी एक असल्याचे मानतात. तथापि वानप्रस्थाने मृत्युप्राप्तीकरिता महाप्रस्थानाला निघण्यास स्मृतींनी संमती दिली होती.

महाप्रस्थानाला निघणे आणि अग्निप्रवेश करून अथवा कड्यावरून उडी घेऊन आत्महत्या करणे ह्या गोष्टी पुराणांच्या कालात निषिद्ध मानण्यात येऊ लागल्या आणि त्यांचा कलिवर्ज्यात समावेश करण्यात आला. [महाप्रस्थानगमनं गोमेधश्च तथा मखः । एतान् धर्मान् कलियुगे वर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥ बृहन्नारदीयपुराण, पूर्वार्ध २४·१६.] (बृहन्नारदीय पूर्वार्ध अ. २४·१६).

वानप्रस्थाकरिता जी कर्तव्ये आणि नियम शास्त्रात सांगितले आहेत त्यांपैकी इंद्रियनिग्रह करणे, आहाराचे नियमन करणे, उपनिषदांचा अभ्यास करणे, ह्यांच्यासारखी काही कर्तव्ये आणि नियम संन्याशांनाही लागू पडणारे आहेत. वानप्रस्थानंतर क्रमाने संन्यासाश्रम घेता येतो अथवा वानप्रस्थाश्रमाचीच परिणती संन्यासाश्रमात होते. अर्थात काही काही बाबतींत वानप्रस्थ आणि संन्यासी ह्यांच्यामध्ये भेदही असतो. उदाहरणार्थ, वानप्रस्थाला निदान प्रारंभी तरी आपली पत्नी बरोबर घेऊन जाता येते, अग्नि बाळगावा लागतो, यज्ञ करावे लागतात. वानप्रस्थाचे उद्दिष्ट तीव्र तप करणे हे असते आणि संन्यासाचे उद्दिष्ट परब्रह्माचे चिंतन करणे हे असते.

ह्या दोन्ही आश्रमांत असणाऱ्या अत्यंत साम्यामुळे आणि दोहोंचे परस्परांत जवळ जवळ एकत्रीकरण झाल्यामुळे वानप्रस्थाश्रमाकडे क्रमाक्रमाने दुर्लक्ष्य होऊ लागले आणि लोक एकदमच संन्यासाश्रमात प्रवेश करू लागले. कोणीही मनुष्य, वानप्रस्थ होईनासा झाला आणि म्हणून वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करणे [मांसादनं तथा श्राद्धे वानप्रस्थाश्रमस्तथा । ... एतान् धर्मान् कलियुगे वर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥ बृहन्नार. पूर्वार्ध २४·१४.] ही गोष्ट कलियुगात निषिद्ध मानण्यात यऊ लागली. (बृहन्नारदीय पूर्वार्ध २४·१४).

———————

अनुक्रमणिका

# प्रकरण ५२

# संन्यास

(मू. ग्रं. पा. २.९३०–९७५)

संन्यास म्हणजे यति होण्याचा आश्रम. ऐहिक ऐश्वर्याचा त्याग करून, भिक्षा मागून परब्रह्माचे चिंतन करणे आणि त्याची प्राप्ती करून घेणे अशी स्थिती असणाऱ्या आश्रमाची माहिती बृहदारण्यकासारख्या अत्यंत प्राचीन उपनिषदांना होती असे दिसते. मात्र अशी स्थिती चौथ्या आश्रमात असे अथवा ती ब्रह्मचर्याश्रमात अथवा गृहस्थाश्रमात देखील मिळविता येई ह्याविषयी निश्चित माहिती जुन्या उपनिषदांवरून मिळत नाही. संन्यास हा विकल्पेकरून चौथा आश्रम मानावा अथवा पहिल्या दोन आश्रमांपैकी कोणत्याही एका नंतर लागलीच संन्यासाचा स्वीकार करावा असे जाबालोपनिषदात (४) म्हटले आहे. बृहदारण्यक उपनिषदात (२·४·१) वर्णन केलेल्या याज्ञवल्क्याच्या कथेवरून असे दिसते की त्यावेळी देखील परिव्राजकाला (म्हणजे संन्याशाला) घराचा आणि पत्नीचा त्याग करावा लागे आणि आपले सर्वस्व देऊन टाकावे लागे. त्याच उपनिषदात दुसरे एका जागी [एतं वै तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति । बृह. उप. ३·५·१.] (३·५·१) असे म्हटले आहे की ज्यांना आत्मज्ञान झालेले असते ते संतती, वित्त आणि स्वर्गलोक ह्याच्याविषयी लोभ सोडून देतात आणि भिक्षा वृत्तीने राहतात.

निरनिराळ्या स्मृती, महाभारत (आदि. ११९·७, शान्ति अ. २४६, २७९ इ०), विष्णु ध. सू. (९६), कूर्मपुराण (उत्तरार्ध अ. २८), इत्यादि ग्रंथांत यति धर्माचे म्हणजे संन्याशांच्या कर्तव्यासंबंधी विवेचन केले आहे. त्यांतील काही मुख्य मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत :

संन्यासाश्रमात प्रवेश करण्यास पात्र होण्याकरिता प्रजापतीला उद्देशून एक यज्ञ करावा लागतो आणि त्या यज्ञामध्ये त्या मनुष्याजवळ असणाऱ्या सर्व वस्तूंचा त्याग करावयाचा असतो. दैव, आर्ष, मानुष प्रभृती आठ श्राद्धे करावी लागतात. (मनु ६–३८, याज्ञ ३–५६।५७). संन्याशाने गावाच्या बाहेर वास्तव्य करावे आणि एका ठिकाणापासून दुसऱ्या ठिकाणी असे कोणत्याही सोबतीशिवाय भ्रमण करीत राहावे. फक्त पावसाळ्यात चार अथवा दोन महिने एके ठिकाणी राहाण्यास प्रत्यवाय नसतो आणि गंगातीरावर त्याने निरंतरही राहण्यास प्रत्यवाय नाही. ध्यान, शुद्धि, भिक्षा आणि नेहमी एकटे राहणे ह्या चारच क्रिया संन्याशाला योग्य असतात. त्याने केव्हाही आणि कोणत्याही प्रकारचा अग्नि पाळू नये आणि भिक्षा मागून मिळेल त्या अन्नावर निर्वाह करावा. तृप्ती होईपर्यत अन्न भक्षण करू नये तर केवळ प्राण आणि शरीर एकत्र राहण्यास अवश्य तेवढेच अन्न भक्षण करावे. कशाचाही संग्रह करू नये. अंगावरील जीर्ण वस्त्रे, पाण्याचा कलश आणि भिक्षापात्र ह्याखेरीज कोणत्याही पदार्थावर स्वामित्व ठेवू नये. तीन अथवा एक दंड धारण करावा. सत्य, अक्रोध, अस्तेय, नम्रता इत्यादि गुणांचा अंगीकार करावा, दृष्टिपूत चालावे, वस्त्रपूत पाणी प्यावे, सत्यपूत शब्द बोलावे, मनःपूत वर्तन करावे.

**संन्याशांचे चार भेद** केले आहेत (अनु शा. १४१–८९). **कुटीचक** (म्हणजे स्वतःच्या घरी अथवा पुत्रादि नातलगांनी बांधलेल्या झोपडीत वास्तव्य करणारा), **बहूदक** (हा आपल्या जवळ पाण्याचा कमंडलू, तीन दंड बाळगतो, भगव्या रंगाची वस्त्रे परिधान करतो, सदाचरणी लोकांकडे अन्नाची भिक्षा मागतो), **हंस**

(हा फक्त एक दंड बाळगतो, भिक्षेकरिताच फक्त गावात प्रवेश करतो आणि इतरवेळी एखाद्या झाडाखाली अथवा गुहेत अथवा नदीतीरावर वास्तव्य करतो), **परमहंस** (हा नेहमी झाडाखाली अथवा ओसाड घरात अथवा स्मशानात राहतो, वस्त्र परिधान करतो अथवा नग्न राहतो). परमहंसाचे **विद्वत्** आणि **विविदिषु** असे दोन प्रकार असतात. ज्यांना ब्रह्मज्ञान झाले असते ते विद्वत् आणि जे ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीचा प्रयत्न करीत असतात ते विविदिषु. विद्वत् संन्यासाच्या योगाने **जीवन्मुक्ति** (देहधारण करीत असतानाच मुक्त होणे) मिळते आणि विविदिषु संन्यासाच्या योगाने **विदेहमुक्ति** (देहपातानंतर मुक्त होणे) मिळते असे जीवन्मुक्तविवेक ह्या ग्रंथात (पा. ४) सांगितले आहे.

संन्यासोपनिषदात (१३) ह्याखेरीज **तुरीयातीत** आणि **अवधूत** हे आणखी दोन प्रकार सांगितले आहेत. जो परमहंस संन्यासी तुरीया ह्या चौथ्या अवस्थेच्या पलीकडे गेलेला असतो तो **तुरीयातीत**. तो ज्याप्रमाणे गाय आपले भक्ष्य खाते त्याप्रमाणे केवळ फळे खाऊन राहतो (म्हणजे तो फळे हातात घेऊन खात नाही), शिजविलेले अन्न भक्षण केले तर फक्त तीन घरी मिळेल तेवढेच खातो आणि वस्त्र वापरीत नाही, त्याला शरीराची जाणीव नसते, तो आपल्या देहाला मढ्याप्रमाणे मानतो. **अवधूत** संन्यासी हा सर्व नियमांच्या पलीकडे गेलेला असतो. तो पतित आणि जातिबाह्य सोडून बाकीच्या सर्व वर्णाच्या व्यक्तीकडील अन्न भक्षण करतो. आणि अजगराप्रमाणे पडून राहून आयास न करता तोंड उघडून अन्नभक्षण करतो आणि परब्रह्माच्या सत्यस्वरूपाच्या चिंतनात केवळ मग्न असतो.

आप. ध. सू. च्या पूर्वी (म्हणजे ख्रि. पू. ५।६ शतकांपूर्वी) पुष्कळ लोकांची अशी समजूत झाली होती की संन्यासी हा सर्व प्रकारच्या विधिनिषेधांच्या पलीकडे गेलेला असतो आणि त्याला आत्मज्ञान प्राप्त झाले म्हणजे त्याची सर्व पातके त्या ज्ञानाने नाश पावतात. ह्या समजुतीचा उद्भव बृह.; कौषीतकी, छांदोग्य प्रभृति निरनिराळ्या उपनिषदांच्या (बृ. उप. ४·४·२३; कौषी. उप ३·१ इ०) शिकवणीमुळे झालेला होता. ती समजूत चुकीची असल्याचे आपस्तंबाने (२·९·२१·१३।१७) सांगितले असून असे म्हटले आहे की आत्मज्ञान झाले म्हणजे संन्यासी आपल्या कृतकर्माच्या परिणामापासून मुक्त होत नाही अथवा शरीरधारणामुळे जे परिणाम होतात त्यांच्यापासूनही तो सुटत नाही. वेदान्त सूत्रांतही (३·४·२७।३१) असे प्रतिपादन केले आहे की सनातन सत्याचे ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करणाराने इंद्रियनिग्रह केला पाहिजे, त्याचे मन निश्चल पाहिजे आणि त्याने मनाला वाटेल तसे आचरण करता कामा नये आणि सर्व नीतिबंधने झुगारून देता कामा नयेत. श्री शंकराचार्यांनीही (वे. सू. २·३·४८ वरील) आपल्या भाष्यात ही गोष्ट स्पष्ट केली आहे.

संन्यास तीनही वर्णाच्या लोकांना घेता येतो अथवा फक्त ब्राह्मणांनाच घेता येतो ह्याबद्दल तीव्र मतभेद होते. केवळ ब्राह्मणांनाच संन्यास घेता येतो हे मत श्री शंकराचार्यांनी बृह. उप. (३·५·१ आणि ४·५·१५) वरील भाष्यात मान्य केले आहे. तसेच मत मध्ययुगीन काळातील बहुतेक ग्रंथकारांनी आणि ग्रंथांनीही मान्य केले आहे. स्मृतिचंद्रिकेसारख्या (१ पा ६५) काही थोड्या ग्रंथांत दुसऱ्या प्रकारचे म्हणजे तीनही वर्णांना संन्यास घेता येतो हे मत मांडले आहे. ह्या संबंधात उल्लेखनीय गोष्ट अशी आहे की सुरेश्वराचार्यांनी ब्राह्मणांनाच संन्यास घेता येतो ह्या मताचे खंडन केले असून विश्वरूपाने (याज्ञ ३·६१ वरील) फक्त ब्राह्मणांनाच संन्यास घेता येतो ह्या मताचे समर्थन केले आहे. सुरेश्वराचार्य आणि विश्वरूप हे दोघे एकच असल्याचा सर्वसाधारण समज आहे. तेव्हा तो समज तरी खरा नसला पाहिजे अथवा सुरेश्वराचार्यांनी आपले मत मागाहून बदलले तरी असले पाहिजे.

स्मृती आणि मध्ययुगीन काळातील ग्रंथ ह्यांच्या मताप्रमाणे शूद्राला संन्यास घेता येत नाही. प्राचीन काळात काही तुरळक प्रसंगी स्त्रियांनादेखील संन्यस्तवृत्तीचा अंगीकार करता येत असे. तथापि स्त्रियांनी घरादाराचा त्याग करणे अथवा संन्यस्तवृत्ती स्वीकारणे या गोष्टीच्या विरुद्ध हिंदुधर्माचा सर्वसाधारण कल आहे असे म्हणावे लागते. यमाच्या (स्मृतिचं. व्यव. पा. २५४) एका वचनात म्हटले आहे की वेदांनी [स्त्रियाः श्रुतौ वा शास्त्रे वा प्रव्रज्या न विधीयते। प्रजा हि तस्याः स्वो धर्मः सवर्णादिति धारणा॥ यम (स्मृति चं. व्यवहार पा. २५४).] अथवा धर्मशास्त्रांनी स्त्रियांना प्रवृज्या (म्हणजे संन्यास) विहित नसल्याचे सांगितले असून स्वतःच्या समान वर्णाच्या पुरुषापासून प्रजेची उत्पत्ती करणे आणि संगोपन करणे हाच स्त्रियांचा विहित धर्म आहे आणि हाच सुप्रतिष्ठित नियम आहे.

संन्यास ह्या शब्दाने दोन गोष्टी सूचित केल्या जातात. एक गोष्ट म्हणजे काम्य कर्माचा (कोणता तरी हेतु पूर्ण करण्याच्या इच्छेने उद्‌भवणाऱ्या सर्व क्रियांचा त्याग करणे आणि दुसरी गोष्ट म्हणजे दंडधारणादी बाह्य चिन्हे असणाऱ्या आणि ज्याचा स्वीकार करताना काही प्रेष शब्दांचा उच्चार करावा लागतो अशा एका विशिष्ट आश्रमाचे पालन करणे. उपनिषदांच्या (कैव. उप., बृह. उप. ४·५·३।४) मतांप्रमाणे अमृतत्त्व (मोक्ष) हे त्यागावर अवलंबून असते. भगवद्‌गीतेमध्येही (१८·२) काम्यकर्माचा त्याग करणे म्हणजे संन्यास असे सांगितले आहे. तेव्हा विशिष्ट बाह्य चिन्हे असणारा संन्यास जरी स्त्रियांना आणि शूद्रांना स्वीकारता आला नाही तरी सर्व कर्माचा त्याग तसेच ऐहिक सुखांचा आणि वासनांचा त्याग स्त्रिया, शूद्र आणि संकर जातीचे लोक ह्यांनाही करता येतो.

काही ग्रंथकारांचे असे मत होते की संन्यास हा केवळ अंध, पंगु आणि पौरुषहीन अशा व्यक्तींकरिताच म्हणजे ज्यांना वैदिक विधी करण्याचा अधिकार नसतो त्यांच्या करिताच असतो. ह्या मताचे खंडन श्रीशंकराचार्य यांनी वेदान्तसूत्रा (३·४·२०) वरील भाष्यात केले आहे. अशा व्यक्तींना ज्याप्रमाणे वैदिक विधी करता येत नाहीत त्याप्रमाणेच त्यांना संन्यास आश्रमाचेही विशिष्ट नियम आणि आचार पाळता येणार नाहीत.

संन्याशाने पूर्णपणे आत्मसंयमन केले पाहिजे आणि स्त्रीसंभोगापासून अलिप्त राहिले पाहिजे आणि कोणतीही संपत्ती जवळ बाळगता कामा नये असे नियम आहेत. (अत्रि. ८·१६ आणि १८; दक्ष ७·३३ इ०). हे नियम आरंभी आरंभी निष्ठापूर्वक पाळले जात असत. नंतरच्या काळात श्री शंकराचार्यांनी आपल्या मताचा प्रसार करण्याकरिता भारताच्या चार टोकांना चार मठ स्थापन केले. त्या मठांना पुढे मोठमोठ्या देणग्या मिळाल्या. अशा मठांची संख्या वाढत गेली आणि त्यांच्यामध्ये परस्परांच्या अधिकारक्षेत्रांसंबंधी आणि गुरुदक्षिणा मागण्याच्या अधिकारासंबंधी वाद उपस्थित होऊन ते न्यायालयांकडे जाऊ लागले.

अद्वैत मताच्या संन्याशांचे पुढीलप्रमाणे दहा सांप्रदाय उत्पन्न झाले : तीर्थ, आश्रम, वन, अरण्य, गिरी, पर्वत, सागर, सरस्वती भारती आणि पुरी, आणि हे दहा संप्रदाय आद्य शंकराचार्यांच्या चार शिष्यांचे परंपरागत शिष्य असल्याचे समजले जाते. शंकराचार्यांच्या मठांप्रमाणेच रामानुज आणि मध्व ह्यांच्या शिष्यांचेदेखील अनेक स्वतंत्र मठ आहेत. वल्लभाचार्य आणि त्यांचे शिष्य हे संन्यास-दीक्षा घेत नाहीत. अशा मठांच्याही मोठमोठ्या मिळकती आणि उत्पन्ने असतात आणि त्यांचा विनियोग थाटामाटाकडे आणि देखाव्यांकडे केला जातो. अशा मठांच्या गादीचा वारसा मिळविण्यात पुष्कळवेळां लबाड्या आणि कारस्थाने केली जातात. ह्या मठांचा वारसा ठरविण्याच्या पद्धतीत मोठी सुधारणा झाल्याशिवाय ह्या मठांची खरी सुधारणा होणार नाही. अशा मठपतींनी मेधातिथीचे पुढील शब्द ध्यानात ठेवावे. (जीवनमुक्ति विवेक पा. १५८।१५९) “एकाद्या संन्याशाला निरंतर राहण्याचे ठिकाण म्हणून एकादा मठ मिळाला आणि त्या मठाच्या

अनुक्रमणिका

स्वामित्वाची भावना त्याच्या मनात उत्पन्न झाली तर त्या मठाची हानी झाली अथवा वृद्धी झाली असता त्या संन्याशाच्या मनाची चलबिचल होऊ लागेल. ह्याकरिता कोणीही संन्याशाने मठ करू नये अथवा आपल्या उपयोगाकरिता सोन्या-चांदीची भांडी बाळगू नयेत". आपल्या सेवेकरिता अथवा आपला सन्मान करण्याकरिता अथवा आपली कीर्ती पसरविण्याकरिता अथवा द्रव्य मिळवून आणण्याकरिता आपल्या सभोवती शिष्यसमुदाय गोळा करू नये, त्याने शिष्यांचे अज्ञान दूर करण्याकरिताच केवळ शिष्यसमुदाय गोळा करावा.

मुसलमानी अमलात सशस्त्र मुसलमान फकीर हिंदु संन्याशांना त्रास देत. त्यामुळे त्यांचा प्रतिकार करण्याकरिता संन्याशांच्या काही संप्रदायांनी क्षत्रिय आणि वैश्य लोक आपल्यामध्ये समाविष्ट करून त्यांना सशस्त्र बनविले. अशा सशस्त्र संन्याशांच्या फकिरांबरोबर आणि आपसातही लढाया होऊ लागल्या. संन्याशांनी अहिंसा व्रताने राहावे ह्या नियमाचा कसा विपर्यास झाला हे ह्यावरून दिसून येते. उत्तर भारतात तीर्थ, आश्रम आणि सरस्वती हे तीन सांप्रदायच शुद्ध वैराग्यमार्गी राहिले आहेत. गिरी आणि पुरी ह्या सांप्रदायात ब्राह्मणेतर स्त्रियांचाही प्रवेश झाला आहे.

संन्याशी म्हणविणाऱ्या लोकांना स्त्रिया अथवा रखेल्या बागळण्यास येऊ देण्यास जेव्हा सुरुवात झाली तेव्हा संन्याशांच्या सांप्रदायावर अत्यंत गंभीर स्वरूपाचा आघात झाला. अशा संन्याशांना **घरबारी गोसावी** म्हणतात. न्यायालयात गेलेल्या एका तंट्यात असा निर्णय करण्यात आला होता की एकाद्या महंताचा शिष्य ह्या नात्याने वारस ठरलेल्या गोसाव्याने पुढे विवाह केला तरी त्यामुळे त्याचा हक्क रद्द होत नाही. (गोसावी रामभारती वि. महंत सूरजभारती ५ मुंबई ६८२).

जेव्हा एकादा मनुष्य संन्यास घेतो तेव्हा कायद्याप्रमाणे त्याचा त्याच्या कुटुंबाबरोबरच संबंध तुटतो आणि त्याचे मिळकतीवरील सर्व हक्क नष्ट होतात. संन्याशाजवळ त्याचे कपडे, पुस्तके, पादुका ह्यांच्यासारख्या ज्या काही वस्तु असतील त्यांचा वारसा त्याच्या धार्मिक वारसाकडे म्हणजे त्याच्या शिष्याकडे जातो. (याज्ञ. २.१३७ वरील मिताक्षरा). तथापि हे नियम संन्यास घेतलेल्या शूद्राला लागत नाहीत आणि तशी रूढी असल्याशिवाय एकाद्या शूद्राने संन्यास घेतल्यावर त्याचे त्याच्या कुटुंबाबरोबर असलेले संबंध तुटत नाहीत. (सोमसुंदरम् वि. वैथिलिंग, ४० मद्रास ८४६).

एका व्यासवचनात (स्मृ. मुक्ता. पा १७६) कलियुगात संन्यास निषिद्ध असल्याचे म्हटले असून त्या नियमाला असा अपवाद सांगितला आहे की जोपर्यंत वर्णव्यवस्था अस्तित्वात आहे आणि वेदांचे अध्ययन चालू आहे तोपर्यंत कलियुगात संन्यास ग्रहण करता येईल. दुसऱ्या एका ग्रंथात (व्रात्यप्रायश्चित्त निर्णय पा. ४६) असे विधान केले आहे की कलियुगाची ४४०० वर्षे होऊन गेल्यानंतर (म्हणजे इ. स. १२९९ नंतर) कोणीही सूज्ञ ब्राह्मणाने संन्यास घेऊ नये. असा नियम घालण्यास मुसलमानांच्या स्वाऱ्यांनी झालेली त्यावेळची परिस्थिती कारण झाली असावी.

**संन्यास ग्रहण करण्याचे विधान** बौधा. धर्म. सू. (२·१०·११।३०), बौधा गृह्यशेषसूत्र (४·१६) इत्यादी ग्रंथांत वर्णन केले असून त्यांपैकी बौ. ध. सू. मधील वर्णन आज उपलब्ध असलेल्या ग्रंथांपैकी बहुधा सर्वात प्राचीन असावे. त्या वर्णनात पुढील प्रमुख कृत्यांचा समावेश केला आहे.

ज्याला संन्यास घ्यावयाचा असेल त्या मनुष्याने आपल्या मस्तकावरील, मुखावरील आणि शरीरावरील केस काढावे, नखे काढावी, तीन काठ्या, शिंके, पाणी गाळण्याकरिता एक वस्त्राचा तुकडा, एक कलश आणि एक भिक्षापात्र इतक्या वस्तु तयार करून ठेवाव्या; आदल्या दिवशी गावाच्या सीमेपलिकडे अथवा अग्निशालेच्या टोकाकडे जाऊन तेथे तूप, दूध आणि दही एकत्र करून भक्षण करावे आणि उपवास करून अथवा पाणी पिऊन राहावे. नंतर "सावित्री प्रवेश" संज्ञा असणारा विधी करावा. (ह्या विधीत गायत्री मंत्राचे निरनिराळे चरण म्हणून त्यांच्यापुढे "मी सावित्रीमध्ये प्रवेश करतो" असे म्हणावयाचे असते). नंतर **'ब्रह्मान्वाधान'** (म्हणजे ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होण्याकरिता अग्नीत समिधा अर्पण करण्याचा) विधी करावा.

दुसऱ्या दिवशी योग्यवेळी नित्यहोम करावा तसेच पुरुषसूक्त आणि विरजाहोम, करावे आणि दगडाच्या आणि मातीच्या पात्रांव्यतिरिक्त इतर सर्व यज्ञपात्रे अग्नीमध्ये टाकावी; अग्नी उत्पन्न करावयाच्या दोन अरणीदेखील अग्नीत टाकाव्या आणि अग्नीमधील धूर नाकात ओढून घेऊन मनाने तीनही अग्नी आपल्या स्वतःच्या ठिकाणी धारण करावे. नंतर संन्यासाश्रमात प्रवेश केल्याची घोषणा करावी आणि अहिंसेची प्रतिज्ञा करावी. नंतर दंड, शिंके, पाणी गाळण्याचे वस्त्र, पाण्याचा कलश, भिक्षापात्र ह्यांचा क्रमाक्रमाने स्वीकार करावा. जेथे पाणी मिळेल तेथे जाऊन स्नान करावे. बाहेर येऊन दुसरी वस्त्रे धारण करावी, तर्पण करावे. त्या वेळेपासून पुढे शुभ्र वर्णाची वस्त्रे वापरू नयेत, एक अथवा तीन दंड धारण करावे, अहिंसा, सत्य, अस्तेय ह्या तीन प्रतिज्ञांचे तसेच अक्रोध, गुरुशुश्रूषा इत्यादी पाच गौण प्रतिज्ञांचे पालन करावे, भिक्षा मागून आणलेले अन्न प्रथमतः सूर्याला अर्पण करावे आणि नंतर भिक्षेचा ब्रह्माला नैवेद्य दाखवावा, भिक्षेपैकी काही अन्न जीवजंतूंना अर्पण करावे आणि उरलेले अन्न औषधासारखे मानून भक्षण करावे.

निरनिराळ्या ग्रंथांत वर्णन केलेल्या विधानांत काही काही भेद असतात. धर्मसिंधू ह्या ग्रंथामधील विधानात असे सांगितले आहे की स्नानाच्या वेळी शिखा उपटावी, यज्ञोपवीत काढावे आणि पाण्यात टाकावे. अंगावरील सर्व वस्त्रे दूर करून, पाच पाउले चालावे. नंतर त्या मनुष्याला आचार्याने वंदन करावे आणि एक लंगोटी, अंगावर घ्यावयाचे वस्त्र आणि दंड अर्पण करावा. नंतर त्याने गुरूला शरण जाऊन ब्रह्माचा उपदेश करण्याबद्दल विनंती करावी. नंतर गुरूने आपला आत्मा ब्रह्मरूपी आहे असे चिंतन करून ओम् हा मंत्र शिष्याच्या कानात उच्चारावा आणि संप्रदायाप्रमाणे वेदान्तामधील चार महावाक्यांपैकी एकाचा शिष्याला उपदेश करावा. संप्रदायाप्रमाणे एक नाव शिष्याला द्यावे. नंतर **पर्यकशौच** विधी करावा आणि शिष्याला **योगपट्ट** द्यावा.

**पर्यकशौच** म्हणजे एका आसनावर बसवून शुद्धी करणे. ह्या विधीमध्ये एकाद्या गृहस्थाने यतीला आपल्या सन्मुख लाकडाच्या चौरंगावर अथवा आसनावर बसवून त्या यतीच्या निरनिराळ्या अवयवांना माती लावून ते पाण्याने धुवावयाचे असतात.

**योगपट्ट** ह्याचा अक्षरशः अर्थ योगाचे वस्त्र असा असून त्याचा पारिभाषिक अर्थ आत्म्याशी ऐक्य असा आहे. यतीचा पर्यकशौच विधी पुरा झाला म्हणजे त्याने आपली कंबर स्वच्छ करावी, कंबर आणि लंगोटी ह्यांच्यावरून एक दोरी गुंडाळावी आणि कंबर एका वस्त्राने आच्छादन करावी. नंतर शिष्ययतीने गुरूची आज्ञा घेऊन एका उंच आसनावर बसावे आणि जमलेल्या लोकांना उद्देशून एकाद्या वेदान्ताच्या विषयावर प्रवचन करावे. गुरुयतीने शिष्ययतीचा वस्त्रे, गंध, पुष्प, इत्यादी देऊन सत्कार करावा, शिष्याच्या

मस्तकावर एक वस्त्र धरावे आणि इतर यतींच्या समेवत गीतेतील काही श्लोक म्हणावे. नंतर शिष्याला पूर्वसंकल्पित नाव द्यावे आणि म्हणावे की यापुढे तू कोणाही सत्पात्र व्यक्तीला संन्यास आश्रमात प्रविष्ट करून घेण्याला, त्याला उपदेश करण्याला आणि त्याला योगपट्ट देण्याला पात्र झाला आहेस. नंतर गुरुयतीने शिष्याला एक करगोटा आणि एक दंड द्यावा आणि त्याला वंदन करावे. नंतर शिष्याने उंच आशनावरून उतरून गुरूला त्या आसनावर बसवावे आणि त्याला वंदन करावे.

रोगपीडित आणि आसन्नमरण मनुष्यालाही संन्यास घेता येतो. (जाबा. उप. ५). अन्य संन्यासाला **'आतुर संन्यास'** अशी संज्ञा [यद्यातुरः स्यान्मनसा वाचा संन्यसेत् । जाबालोपनिषद् ५.] आहे. अशा संन्यासात अत्यंत आवश्यक असणाऱ्या गोष्टी म्हणजे संकल्प, प्रैषाचा उच्चार, आणि सर्व जीवांना अभयदान एवढ्याच गोष्टी करावयाच्या असतात आणि बाकीचे विधी परिस्थितीप्रमाणे करावे अथवा करू नये असे धर्मसिंधूने (३. उत्तरार्ध) सांगितले आहे. सांप्रतकाळी देखील धार्मिक प्रवृत्तीचे लोक केव्हा केव्हा अशा प्रकारचा संन्यास अगदी शेवटल्या क्षणी घेतात. अशा संन्यासात संकल्प, मस्तकाचे मुंडन, सावित्री प्रवेश आणि प्रैषोच्चार एवढ्याच गोष्टी केल्या जातात.

संन्याशाने शिखा (शेंडी) आणि सूत्र (यज्ञोपवीत) ह्यांचा देखील त्याग करावा किंवा करू नये ह्या प्रश्नासंबंधी अतिशय प्राचीन काळापासून मतवैचित्र्य आहे. बृहदा. उप. (३—५—१) वरील आपल्या भाष्यात श्री शंकराचार्यांनी दोन्ही पक्षांची मते विस्तारपूर्वक वर्णन करून संन्याशाने शिखासूत्रांचा त्याग करावा असे आपले स्वतःचे मत सांगितले आहे. आधुनिक काळी संन्यासी शिखासूत्र ह्या दोहोंचा त्याग करतात.

**संन्याशाने करावयाचे आह्निककर्म**. (यतिधर्मप्रकाश, पा. ९५; मनु. ५·१३७; अत्रि ९७ इ०). संन्याशच्या शरीरशुद्धी, दंतधावन, स्नान ह्या क्रिया गृहस्थाश्रमी पुरुषांच्या सारख्याच असतात. तथापि त्याने गृहस्थाश्रमी पुरुषाच्या चौपट शौच (शरीरशुद्धी कार्य) करावे. संन्याशाने दिवसातून एक वेळ भोजन करावे, पुरुषोत्तम, व्यास इत्यादिकांची पूजा करावी, देवांना वंदन करावे, अधिक वयाच्या दुसऱ्या यतींना वंदन करावे, गृहस्थाश्रमी व्यक्तींना त्याने वंदन करू नये आणि दुसरे कोणी वंदन केल्यास त्याला काहीही आशीर्वाद न देता केवळ 'नारायण' हा शब्द उच्चारावा. यती मृत्यू पावल्यावर त्याचे दहन न करता त्याला पुरावे. त्याच्याकरिता अशौच पाळू नये. ११ व्या दिवशीच्या पार्वण श्राद्धाव्यतिरिक्त कोणतेही श्राद्ध त्याच्यानिमित्त करू नये. इतर नातलगांच्या मृत्यूबद्दल यतीला अशौच येत नाही. तथापि स्वतःच्या मातेच्या अथवा पित्याच्या मृत्यूची वार्ता समजल्यावर यतीने स्नान केले पाहिजे.

आधुनिक काळी निरनिराळ्या मठांचे संन्यासाश्रमी मठपती आपआपल्या सांप्रदायाच्या अनुयायांच्या बाबतीत जाती संबंधाच्या वादात बहिष्कार घालणे आणि अपराधांबद्दल प्रायश्चित्त देणे ह्या कामांत आपणास अधिकार असल्याचे प्रतिपादन करतात. धर्मशास्त्राच्या प्रमेयाप्रमाणे धार्मिक आणि आध्यात्मिक संस्थांचे नियमन आणि पालन करण्याचा अंतिम अधिकार राजाकडेच असतो. (गौ. ११·९।११; अत्रि १७।२०; मनु ७·१३). लोक धर्माचे पालन करतात किंवा नाही ह्यावर लक्ष ठेवणे, लोकांनी धार्मिक आणि आध्यात्मिक नियमांचा भंग केल्यास त्याबद्दल त्यांना शासन करणे आणि त्यांना यथायोग्य प्रायश्चित्ते दिली जात आहेत किंवा नाही हे पाहणे ह्यांचाही राजाच्या कर्तव्यांत समावेश होतो, तथापि, ह्याबाबतीत राजा अनियंत्रित सत्ता न चालविता आपल्या पुरोहितांच्या आणि मंत्र्यांच्या सल्ल्यानुसार आणि विद्वानांच्या परिषदेत मत घेऊन निर्णय करीत असे. निरनिराळ्या धर्मसूत्रांत (आप. ध. सू. १·३.११·३४; बौ. ध. सू. २·१·४४।४५; वसि. ध. सू. १·४।५) ह्यासंबंधी जे नियम सांगितले आहेत त्यांवरून असे दिसून येते की इ. स. च्या पूर्वी निदान पाच

शतकांइतक्या प्राचीनकाळी एखाद्या अपराध्याला प्रायश्चित्त देण्याचा आणि नंतर त्याला सहभोजनादि सर्व सामाजिक व्यवहारांत भाग घेऊ देण्याचा अधिकार विद्वान ब्राह्मणांच्या सभांकडे असे. आद्य शंकराचार्यांनी (बृ. उप. ४·३·२ वरील भाष्यात) स्वतः अशा परिषदांचा अधिकार मान्य केला होता. अशा परिषदांसंबंधी अनेक नियम धर्मसूत्रात सांगितले आहेत. मध्ययुगीन कालात झालेले हिंदुराजे हे नियम अक्षरशः पाळीत असत. परिषदा करीत असलेल्या ह्या कार्यात शंकराचार्यांच्या गादीवर आलेले त्यांचे वारसदार केव्हापासून हात घालू लागले हे निश्चित ठरविता येत नाही. मराठी राज्याच्या काळात धार्मिक प्रश्नांत पैठण, नाशिक, कराड ह्यांच्यासारख्या क्षेत्रांतील विद्वान ब्राह्मणांचा सल्ला राजे अथवा त्यांचे मंत्री [भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे ह्या संस्थेने प्रसिद्ध केलेला राजवाडे खंड २१ पा. २५६।२५८ वरील पत्र क्र. २०५ (शके १७७८ म्हणजे सन १८५६) ह्यात करवीर मठाच्या शंकराचार्यांच्या अधिकाराबद्दल म्हटले आहे की "मठाधिकारी वगैरे यांची वहिवाट पाहून निग्रह ठेवणे अगर शुद्ध करणे हा अधिकार मठ करवीर संस्थानचा आहे. कराडकर यांनी दरम्यान धांदल करून पत्र लिहिले हे बरोबर नाही". ह्याच्या उलट पत्र क्रमांक २२७ (शके १७७८) करहाट (कऱ्हाड) येथील ब्रह्मसभेला लिहिलेल्या पत्रात म्हटले आहे : की पूर्वीपासून आचार व्यवहार "पद प्रायश्चित्त करण्याचा अधिकार क्षेत्राचा पूर्वापार असून" इ०. (पान. २७६).] घेत असत (राजवाडे खंड २१ पा. २५६-५८, २७६ इ०). क्वचितप्रसंगी संकेश्वर आणि करवीर येथील आणि दुसऱ्या ठिकाणच्या गादीवर असलेल्या शंकराचार्यांचाही सल्ला घेण्यात येई आणि ब्रिटिशांच्या हातात सत्ता आल्यानंतरच अशा गोष्टींचा एकमेव अधिकार आपणाकडे असल्याचे निरनिराळ्या पीठांवरील शंकराचार्य म्हणू लागले.

भारतीयांना संन्यासाश्रमाबद्दल सर्वात अधिक आदर वाटतो असे म्हणण्याचा प्रघात आहे. तथापि ते विधान अर्धसत्य स्वरूपाचे आहे. ऐहिक विषयोपभोगाचा त्याग करणे आणि संपत्तीला तुच्छ मानणे ह्यासारख्या संन्यासाश्रमाच्या लक्षणांपैकी कोणत्यातरी लक्षणांनी युक्त असा संन्यासाश्रम सर्व धर्मात सामान्यत्वे करून अस्तित्वात असतो. अशाच प्रकारची ख्रिस्ताची शिकवण असून ती अनेक शतकेपर्यंत मानण्यातही येत असे. अलिकडे तीन चार शतकांत पाश्चिमात्य लोक यशस्वी कार्यकर्ते आणि वीर पुरुष ह्यांना आदर्श पुरुष मानू लागले आहेत. भारतात देखील राम, कृष्ण, शिवाजी महाराज ह्यांच्या सारख्या रणशूर पुरुषांना अवताराची योग्यता दिली जाते.

तथापि अशी योग्यता त्यांनी आपल्या स्वतःच्या उपभोगाकरिता अथवा आपला बडेजाव वाढावा अशा हेतूने पृथ्वीचा लहान मोठा भाग आपल्या सत्तेखाली आणला होता ह्याकरिता दिली जात नसून त्यांची जुलुमाचा आणि निष्ठुरपणाचा प्रतिकार केला होता ह्याकरिता दिली जाते.

-----

# प्रकरण ५३

## श्रौत (वैदिक) यज्ञ

[श्रौतयज्ञासंबंधीच्या ह्या प्रकरणात श्रौतसूत्रांचाच मुख्यत्वे संबंध येतो. म्हणून त्यात दिलेले सूत्रांचे संदर्भ श्रौतसूत्रांचे समजावे.]
(मू. ग्रं. पा. २•९७६-१००८)

वैदिक वाङ्मयाचे यथार्थ ज्ञान होण्याकरिता आणि त्या वाङ्मयाचा निरनिराळ्या वर्णावर काय परिणाम झाला हे समजण्याकरिता वैदिक यज्ञांच्या सखोल अभ्यासाची आवश्यकता आहे. आरंभीच्या काळातील युरोपिअन पंडितांनी अशा अभ्यासाकडे दुर्लक्ष करून वेदांचा अर्थ मुख्यत्वेकरून व्याकरण आणि तुलनात्मक भाषाशास्त्र ह्यांच्या आधारावर करण्याचा प्रयत्न केला. वैदिक सूक्तांची रचना ख्रि. पू. १४०० च्या पूर्वी झालेली असणे शक्य नाही असे मानण्याकडे त्यांचा कल असे. ह्या कारणांनी त्यांनी तयार केलेली वैदिक वाङ्मयाची कालगणना चुकीची झाली आहे. वैदिक वाङ्मयातील निरनिराळ्या भागांच्या कालगणनेविषयी विवेचन करणे ही गोष्ट प्रस्तुत ग्रंथाच्या कक्षेत येत नसली तरी एवढे सांगणे अवश्य आहे की वैदिक सूक्तांची रचना ख्रि. पू. १४०० च्या पूर्वी कित्येक सहस्र वर्षे निश्चितपणे झाली असली पाहिजे.

वैदिक यज्ञांचे सम्यक् ज्ञान होण्याकरिता निरनिराळ्या वेदसंहिता, ब्राह्मणग्रंथ, श्रौतसूत्रे ह्या ग्रंथांचा काळजीपूर्वक अभ्यास केला पाहिजे. ह्या विषयावर प्रा. एग्लिंग, प्रा. कीथ प्रभृतींचे इंग्रजी भाषेत, वेबर, हिलब्रँड ह्यांचे जर्मन भाषेत आणि कॅलंड, हेनरी ह्यांचे फ्रेंच भाषेत अनेक उपयुक्त ग्रंथ अस्तित्वात आहेत. ह्या संबंधात कै. डॉ. श्री. व्यं. केतकर ह्यांनी आपल्या ज्ञानकोशात समाविष्ट केलेल्या संशोधनात्मक मराठी लेखांचाही विशेष उल्लेख करणे अवश्य आहे कारण त्या लेखांत युरोपियन ग्रंथकारांच्या काहीशा एकतर्फी मतांना अत्यंत अवश्य असे प्रत्युत्तर दिले गेले आहे.

जैमिनीने आपल्या पूर्वमीमांसाशास्त्राचे सिद्धांत अनेक शास्त्रवचनांना लावून निरनिराळ्या यज्ञांच्या तपशीलासंबंधी काही निर्णय काढले आहेत. अशा अनेक निर्णयांचा प्रस्तुत ग्रंथात समावेश करण्याचा प्रयत्न केला आहे. असा प्रयत्न धर्मशास्त्रावरील आणि श्रौतयज्ञावरील कोणाही ग्रंथकाराने आतापर्यंत बहुधा केला नसावा.

यज्ञासंबंधीची मूलभूत कल्पना भारतीय आर्यवंशाच्या लोकांचे आणि युरोपियन आर्यवंशाच्या लोकांचे पूर्वज ज्या काळी एकत्र राहत होते त्या काळाइतकी जुनी आहे. त्याकाळी ती कल्पना काहीशी अस्पष्ट असली तरी भारतीय आर्यवंशाच्या लोकांचे आणि इराणमधील आर्यवंशाच्या लोकांचे ज्याकाळी एकत्र राहत होते त्या काळात यज्ञसांप्रदाय निश्चितपणे बऱ्याच परिणत अवस्थेला गेला होता. वैदिक यज्ञविधीमध्ये आणि पारशी लोकांच्या होमविधीमध्ये साम्य आढळून येते आणि अथर्वन्, आहुती, उक्थ, सोम, सवन ह्यांच्यासारखे यज्ञसंबंधी अनेक शब्द वैदिक वाङ्मयात आणि प्राचीन पारशी धर्मातील ग्रंथांत आले आहेत. ह्यावरून वरील अनुमान खरे ठरते.

श्रौत (वैदिक) यज्ञ सांप्रतकाळी फारच क्वचित केले जात असले तरी ख्रि. पू. अनेक शतके ते यज्ञ फार प्रचारात होते. बौद्धधर्माच्या प्रचारानंतर शेकडो वर्षे होऊन गेल्यानंतर देखील अश्वमेध, राजसूय, अग्निष्टोम, वाजपेय ह्यांच्यासारखे प्राचीन वैदिक यज्ञ भारतात पुष्कळ वेळी केले जात असत असे

शिलालेखांवरून (एपि. इं खं. २० पा. ५४, खंड २० पा. ७९ इ०) आणि पुराणांतील (हरिवंश ३·२·३९।४०) उल्लेखांवरून दिसून येते. आरंभीची अग्निपूजा वैयक्तिक आणि सामुदायिक अशा दोन्ही स्वरूपाची असे. प्रतिदिवशी करावयाचे अग्निहोत्र हे कृत्य एका व्यक्तीने करावयाचे असे. परंतु दर्शपूर्णमास यज्ञासारख्या विधींना अनेक ऋत्विजांची आवश्यकता असे आणि त्यांच्या तयारीला खर्चही फार लागत असे. त्यामुळे अशा यज्ञांना सामुदायिक स्वरूप येई. बहुतेक ब्राह्मण दरिद्री असल्यामुळे त्यांना आह्निक अग्निहोत्रदेखील चालविण्याचे सामर्थ्य नसे आणि त्यामुळे प्राचीन काळी देखील अग्निहोत्री तुरळकच असले पाहिजेत. सोमयाग तर केवळ राजे, सरदार आणि सधन लोक ह्यांनाच करता येत असे. अग्निहोत्र इत्यादी आह्निक कर्मे चालविण्याकरिता राजे आणि सधन लोक ब्राह्मणांना देणग्या देत असल्याचे प्राचीन काळच्या शिलालेखांवरून (एपि. इं. खं. ६ पा. २९८; खं. १५ पा. ११३, १३० इ०) आणि दानपत्रांवरून दिसून येते. पुढे मुसलमानी सत्तेच्या दीर्घ काळात अशा प्रकारची मदत राजांकडून मिळणे शक्य नसल्यामुळे श्रौतयज्ञसंस्था संपुष्टात आली. गेल्या शंभर वर्षांत शास्त्रोक्त वैदिक यज्ञ फारच क्वचित करण्यात आले आहेत. तथापि गृह्यसूत्रात वर्णन केलेल्या अनेक गृह्य संस्कारांत वैदिक यज्ञामधील विधींचे अनुकरण केलेले असते ह्याकरिता आणि यज्ञ हेच आद्यधर्म (प्रथमानि धर्माणि) होते ह्याकरिता वैदिक यज्ञांचे विवेचन प्रस्तुत ग्रंथात मुळीच न केल्यास तो ग्रंथ अपूर्ण स्वरूपाचा होईल. ह्याकरिता श्रौत यज्ञांची केवळ रूपरेषा पुढे वर्णन केली आहे.

प्राचीन काळी करण्यात येणाऱ्या निरनिराळ्या यज्ञांचा सर्व तपशील श्रौतसूत्रांत दिलेला असतो. ही सूत्रे यज्ञात काम करणाऱ्या निरनिराळ्या ऋत्विजांच्या उपयोगाकरिता तयार केलेल्या लहान टिपणांच्या स्वरूपाची असून ती प्राचीन ब्राह्मण ग्रंथांच्या आधारावर तयार केलेली असतात. प्रस्तुत ग्रंथात केलेले विवेचन मुख्यत्वेकरून आश्वलायन, आपस्तंब, कात्यायन, बौधायन, सत्याषाढ ह्या श्रौतसूत्रांच्या आधारावर केले आहे. ऋग्वेद संहितेतील सूक्ते ज्या प्राचीन काळात रचली गेली आणि संकलित केली गेली त्याकाळी देखील यज्ञसांप्रदायाच्या प्रमुख अंगांची उत्पत्ती झालेली होती असे ऋग्वेदामधील उल्लेखांवरून दिसून येते. यज्ञात लागणारे अग्नी, निरनिराळे ऋत्विज, यज्ञपात्रे, यज्ञातील निरनिराळी कृत्ये, यज्ञाशी संबंध असणाऱ्या संज्ञा इत्यादिकांचे उल्लेख ऋग्वेदामध्ये आले आहेत. (ऋ. २·१·२; २·३६·४; ५·६·९; ८·९३·२३ इ०).

सर्व श्रौत विधींना लागू पडणारे काही सामान्य नियम गृह्यसूत्रात दिलेले असतात. तसेच सर्व यज्ञांना लागू पडणारे सामान्य सिद्धांतही गृह्यसूत्रांत दिलेले असतात. उदाहरणार्थ, मंत्र ऋक्, यजुः, सामन् आणि निगद असे चार प्रकारचे असतात (कात्या. १·३·२); गार्हपत्य, आहवनीय आणि दक्षिणाग्नी असे तीन प्रमुख अग्नी असतात; इष्टीला अथवा दुसऱ्या एकाद्या विधीला प्रारंभ करताना पाच भूमिसंस्कार (परिसमूहन, गोमय उपलेपन, रेषा काढणे इत्यादी) असतात; द्रव्य, देवता आणि त्याग मिळून यज्ञ सिद्ध होतो इत्यादी. निरनिराळ्या यज्ञपात्रांची नावे, वर्णन आणि ती कोणकोणत्या कामाकरिता वापरावयाची हेही सूत्रांत सांगितलेले असते.

**अग्न्याधेय अथवा अग्न्याधान.** गौतमाने (८·२०।२१) सांगितलेल्या सात हविर्यज्ञांमधील हा पहिला यज्ञ असतो. हा यज्ञ एक **इष्टि** म्हणजे यजमान आणि त्याची पत्नी ह्यांनी चार ऋत्विजांच्या साहाय्याने केलेला यज्ञ असतो. ह्या विधीला दोन दिवस लागतात. पहिल्या दिवसाला **उपवसथ** अशी संज्ञा असून त्या दिवशी प्रास्ताविक कृत्ये करण्यात येतात आणि दुसऱ्या दिवशी मुख्य विधी करण्यात येतो. यज्ञ करणाऱ्याच्या वर्णाला अनुसरून आणि त्याला पाहिजे असलेल्या फलाला अनुसरून ह्या यज्ञाचा

**विहितकाल** (नक्षत्र, ऋतु, तिथी) वेगवेगळा असतो (आप. श्रौत. ५·३·३।१४; शत. ब्रा. २०·१·२·१७ इ.). अग्न्याधान करणारा पुरुष अति लहानवयी नसावा आणि अतिवृद्ध नसावा. त्याला एक अथवा अधिक पुत्र झालेले असावेत आणि त्याचे केस कृष्ण वर्णाचे असावे. (जै. १-३-३ वरील शबरभाष्य). अग्नी उत्पन्न करण्याकरिता लागणाऱ्या **दोन अरणि** शमीवृक्षाच्या अंतर्भागी वाढणाऱ्या अश्वत्थ (पिंपळ) वृक्षाच्या खांद्यापासून तयार करतात. (आश्व. श्रौ. २·१·१७). एका अरणीला मध्यभागी एक भोक पाडून त्यात दुसरी अरणि बसवितात आणि त्यांचे घर्षण (मंथन) करून अग्नी उत्पन्न करतात. अग्नी उत्पन्न होण्याच्या त्या स्थानाला 'देवयोनि' म्हणतात. अरणी आणण्यापासून पूर्णाहुती अर्पण करण्यापर्यंतच्या अनेक क्रियांचा ह्या यज्ञविधीमध्ये समावेश होतो. पूर्णाहुती झाल्यावर यज्ञ करणाऱ्याला 'आहिताग्नि' ही पदवी प्राप्त होते आणि मग त्याला सर्व प्रकारचे यज्ञविधी करता येतात. अग्नीची स्थापना करण्याकरिता एक गृह उभारून त्यातील वेदीवर तीन मुख्य अग्नि मांडण्याकरिता **आयतने** (स्थाने) तयार करतात. त्याशिवाय **सभ्य** आणि **आवसथ्य** असे दोन अग्नी असून त्यांची स्थापना दुसऱ्या ठिकाणी करावयाची असते. अगदी प्राचीन काळापासून सभ्य आणि आवसथ्य अग्नींची स्थापना न करणारे काही अग्निहोत्री असत. ह्या तीन वेदोक्त अग्नींचा उपयोग सामान्य स्वयंपाक करण्याकरिता अथवा इतर लौकिक कृत्ये करण्याकरिता करू नये असा नियम आहे. (जै. १२·२·१।७).

प्रास्ताविक कृत्यांमध्ये संकल्प, ऋत्विजांची नेमणूक, घर्षणाने उत्पन्न केलेल्या अथवा औपासन अग्नीमधून घेतलेल्या अग्नीची स्थापना (त्याच्यावर ब्रह्मौदन शिजवितात म्हणून त्याला ब्रह्मौदनिक अग्नी अशी संज्ञा आहे,) चार पात्रांत तांदुळाचे अथवा जवाचे दाणे शिजविणे, (हे दाणे पाण्यात अथवा दुधात शिजवितात. आणि ह्या अन्नाला ब्रह्मौदन अशी संज्ञा आहे) आणि त्यापैकी थोड्याशा अंशाची ब्रह्मौदनिक अग्नीत आहुती देणे, नंतर ते शिजलेले अन्न चार पृथक पात्रात ठेवून ती पात्रे ऋत्विजांसन्निध ठेवणे, उरलेले अन्न बाहेर काढून त्यात समिधा बुडवून त्या अग्नीमध्ये अर्पण करणे, समिधा अर्पण केल्यानंतर अध्वर्यूला आणि ब्रह्मौदन भक्षण करणाऱ्या ब्राह्मणांना तीन तीन कालवडी दान देणे इत्यादिकांचा समावेश होतो. ही सर्व कृत्ये अग्न्याधेयाच्या पूर्वी एक वर्षभर प्रतिदिवशी करावी. तीन अग्नींची स्थापना करण्याची इच्छा असणाऱ्या पुरुषाने अग्न्याधेयाच्यापूर्वी १२ दिवस, ३ दिवस, २ दिवस अथवा एक दिवस ह्या समिधा अग्नीमध्ये अर्पण करणे अवश्य असते. ब्रह्मौदनाचे हवन केल्यापासून एक वर्षात (अथवा १२ दिवस इत्यादी मुदतीत) यज्ञकर्त्याला काही कारणाने अग्न्याधान करणे शक्य न झाले तर त्याने ह्या क्रिया पुन्हा कराव्या आणि त्यानंतर शक्य होईल तेव्हा अग्न्याधान करावे.

अग्न्याधानाचे पूर्वी रात्री अध्वर्यूला काही नियम पाळावे लागतात. काळे ठिपके असलेला एक बोकड गार्हपत्य अग्नीच्या जागेच्या जवळ बांधून ठेवतात. यजमान मौनव्रत धारण करतो, रात्रभर जागरण करतो आणि त्या ब्रह्मौदन अग्नीत इन्धनाचे तुकडे टाकीत रहातो अथवा लाकडाचे ओंडे एकदम अग्नीत टाकून झोपतो. उजाडल्यावर अध्वर्यू दोन अरणि त्या अग्नीवर गरम करतो आणि नंतर तो ब्रह्मौदन अग्नी विझविण्यात येतो. त्या अरणी घेऊन यजमान त्यांचे घर्षण करून अग्नी उत्पन्न करतो. अग्नी उत्पन्न करण्याची क्रिया चालू असताना पांढऱ्या अथवा तांबड्या रंगाचा आणि गुडघा काळ्या वर्णाचा असलेला एक घोडा तयार ठेवतात. अग्नी उत्पन्न झाला म्हणजे त्या अग्नीची स्थापना **गार्हपत्य** अग्नीच्या स्थानावर करतात. गार्हपत्य अग्नीवर समिधा पेटवून घेऊन त्यांची स्थापना **आहवनीय** अग्नीच्या स्थानावर करतात. हा अग्नी नेत असताना त्या घोड्याला बरोबर न्यावयाचा असतो. **दक्षिणाग्नीची** स्थापना घरातील अग्नी घेऊन अथवा मंथन करून अग्नी उत्पन्न करून करतात. सभ्य आणि **आवसथ्य** अग्नींची स्थापना

अनुक्रमणिका

करण्याकरिता लागणारा अग्नी घरातील अग्नी घेऊन अथवा मंथनाने उत्पन्न करून अथवा आहवनीय अग्नीमधून घेतात.

तीन (अथवा पाच) अग्नींची उपासना झाल्यानंतर यजमान **पूर्णाहुती** अर्पण करतो. चार ऋत्विजांना काही विशिष्ट दाने यजमानाच्या वर्णानुसार द्यावयाची असतात. यजमानाने त्यानंतर १२, ६ अथवा निदान ३ रात्रींपर्यंत काही नियम पालन करावयाचे असतात. (कात्या. ४·१०·१६; बौ. २·२०).

**पुनराधेय.** श्रौताग्नींची स्थापना केल्यानंतर एक वर्षाच्या आत यजमानाला मोठे दुखणे आले अथवा द्रव्य नष्ट झाले अथवा पुत्रादिक कोणी नातलग मृत झाला अथवा अन्य मोठ्या आपत्ती उत्पन्न झाल्या तर त्याने त्या अग्नींची पुनरपि स्थापना (**पुनराधेय**) करावी. ह्याचा विधी थोड्याशा भेदाने अग्न्याधेयासारखा असतो. जैमिनीने (६·४·२६।२७) म्हटले आहे की गार्हपत्य आणि आहवनीय हे दोन्ही अग्नी विझले अथवा त्यांच्यामध्ये खंड पडला तर प्रायश्चित्त म्हणून पुनराधेय हा विधी करावयाचा असतो. काही विशिष्ट हेतूने पुनराधेय विधी केला असेल तर त्याची दक्षिणा काही निराळ्या प्रकारची असते. (जै. १०·३·३०।३३).

**अग्निहोत्र.** गौतमाने सांगितलेल्या सात हविर्यज्ञांपैकी अग्निहोत्र हा दुसरा असतो. अग्न्याधेय केल्याच्या दिवसाच्या सायंकाळपासून गृहस्थाने आमरणान्त अथवा संन्यास ग्रहण करीपर्यत प्रत्येक दिवशी सायंकाळी आणि प्रातःकाळी असे दोनदा अग्निहोत्र (म्हणजे दूध आदी पदार्थांचे अग्नीमध्ये हवन करण्याचा
[दीर्घसत्रं ह वा एत उपयन्ति येऽग्निहोत्रं जुह्वत्येतद्वै जरामर्य सत्रं यदग्निहोत्रं जरया वाव ह्मेवास्मान्मुच्यते मृत्युना वा । शत. ब्रा. १२·४·१·१.]
विधी) केला पाहिजे. (शत. ब्रा. १२·४·१.१; जै. २·४·१।७). पत्नी नसणाऱ्या मनुष्यालाही अग्निहोत्रविधी करता येतो असे ऐत. ब्रा. (३२·८) मध्ये म्हटले आहे. सायंकाळच्या अग्निहोत्राला सूर्यास्त होण्यापूर्वी प्रारंभ करावा आणि प्रातःकाळी करावयाच्या अग्निहोत्राला सूर्योदय होण्यापूर्वी प्रारंभ करावा. (आप. श्रौ. ६·४·७।९).

केवळ पवित्र कर्तव्य ह्या बुद्धीने अग्निहोत्र करीत असल्यास गाईच्या दुधाचा होम करतात. परंतु काही विशिष्ट हेतू धरून अग्निहोत्र करीत असल्यास यवागु (कांजी), शिजविलेल्या तांदुळाचा भात, दही अथवा तूप ह्यांचा होम करतात. (आश्व. श्रौ. २·३·१।२). अग्निहोत्राच्या गाईचे दूध काढण्यासंबंधी, ते तापविण्यासंबंधी, त्या दुधाचे हवन कोणत्या यज्ञपात्राने करावे, किती आहुती द्याव्या इत्यादीसंबंधी तपशीलाचे नियम असतात. थोड्याशा तपशीलाच्या भेदाने दोन्ही वेळच्या अग्निहोत्रांची विधाने एकसारखी असतात.

क्षत्रियाने करावयाच्या अग्निहोत्रासंबंधी काही मजेदार नियम आपस्तंबाने (६·१५·१०।१३) सांगितले आहेत. उदाहरणार्थ, त्याने म्हटले आहे की क्षत्रियाने आहवनीय अग्नि निरंतर बाळगावा, परंतु प्रत्येक दिवशी अग्निहोत्र करू नये तर साधारणपणे ज्यावेळी अग्निहोत्र करण्यात येते त्यावेळी त्याने आपल्या घरून एकाद्या ब्राह्मणाच्या घरी अन्न पाठवावे आणि असे केल्याने त्याला अग्निहोत्र केल्याचे श्रेय मिळते. आश्वलायनाने (२·१·३।५) देखील अशाच सारखा नियम सांगितला आहे आणि म्हटले आहे की क्षत्रियाने (आणि वैश्याने) अमावास्या आणि पौर्णिमा ह्या दिवशी अग्निहोत्र करावे आणि इतर दिवशी आपस्तंबाने सांगितल्याप्रमाणे एकाद्या धर्मनिष्ठ ब्राह्मणाकडे अन्न पाठवावे. ह्या नियमाचा हेतु बहुधा क्षत्रिय आणि वैश्य ह्यांना त्यांचे प्रमुख व्यवसाय करण्याकरिता अधिक वेळ मिळावा असा असावा.

अनुक्रमणिका

जेव्हा एकाद्या गृहस्थाश्रमी पुरुषाला पत्नी घरी ठेवून घर सोडून एक रात्र अथवा त्याहून अधिक काळपर्यंत जावे लागेल तेव्हा त्याने तीनही अग्नि प्रज्वलित करून त्यांची पूजा करून मग प्रवासाला प्रारंभ करावा. (शत. ब्रा. २·४·१·३।१४). घरी परत आल्यावर (पुत्राने अथवा शिष्याने प्रज्वलित केलेल्या) अग्नीमध्ये समिधा अर्पण कराव्या. तो घरापासून दूर असताना त्याला (आचमनासारखी) जी कृत्ये अग्नीशिवाय करण्यासारखी असतात ती सर्व कृत्ये अग्निहोत्राच्या वेळी आणि दर्शपूर्णमासाच्या वेळी त्याने केली पाहिजेत आणि अग्निहोत्राचा आणि दर्शपूर्णमासाचा सर्व विधी त्याने मनात आठवला पाहिजे, आणि जी व्रते आणि नियम प्रसंगानुसार पालन करावयाचे असतील त्यांचे पालन केले पाहिजे. (आप. श्रौ. ४·१६·१८). त्याने आपले अग्नि आपल्या पत्नीच्या स्वाधीन केले पाहिजेत आणि आवश्यक विधी करण्याकरिता एका ऋत्विजाची नेमणूक केली पाहिजे.

जेव्हा तो आपल्या पत्नीला समागमे घेऊन प्रवासाला निघेल तेव्हा त्याने आपले अग्नी आपल्या बरोबर घेतले पाहिजेत. जर पती आणि पत्नी दोघेही आपले अग्नि बरोबर न घेता प्रवासाला जातील तर त्यांच्या अनुपस्थितीत ऋत्विजाला त्यांच्या वतीने अग्निहोत्र होम अर्पण करता येत नाही आणि प्रवासातून परत आल्यावर त्या गृहस्थाला पुनराधान करावे लागते. (गोभिलस्मृति. ३·१।२).

\-\-\-\-\-

अनुक्रमणिका

# प्रकरण ५४

## दर्शपूर्णमास

(मू. ग्रं. पा. २-१००९।१०९०)

**दर्शपूर्णमास** म्हणजे अमावास्येला आणि पौर्णिमेला करावयाचा यज्ञ. ह्या इष्टीला इतर सर्व इष्टींची **प्रकृती** (**नमुना** अथवा आदर्श) समजतात आणि इतर इष्टी ह्या यागाच्या **विकृती** (म्हणजे मूळच्या नमुन्यात फेरबदल करून तयार केलेले याग) समजतात. ज्या यज्ञामध्ये यजमान चार ऋत्विजांची योजना करतो त्या यज्ञाला **इष्टि** अशी संज्ञा आहे.

कोणी एकाद्या पुरुषाने अग्न्यावेय केले म्हणजे त्या दिवसानंतर येणाऱ्या पहिल्या पौर्णिमेपासून त्याने **दर्शपूर्णमास इष्टि** करण्याला प्रारंभ करावा. पौर्णिमेच्या दिवशी करावयाच्या इष्टीला दोन दिवस लागतात, परंतु त्यात करावयाची सर्व कृत्ये एका दिवसात देखील करिता येतात. जर ती इष्टि दोन दिवस करावयाची असली तर ती पौर्णिमा आणि तिच्या पाठोपाठ येणाऱ्या वद्य प्रतिपदा ह्या दिवशी करितात. पहिल्या दिवसाला **उपवसथ** अशी संज्ञा असून दुसऱ्या दिवसाला **यजनीय दिन** अशी संज्ञा असते. (कात्यायन श्रौ. २·१·१६।१७).

पौर्णिमेच्या दिवशी करावयाच्या इष्टीत पहिल्या दिवशी **अग्न्यन्वाधान** (अग्नीमध्ये समिधा अर्पण करावयाचा विधी) आणि **परिस्तरण** (अग्नीभोवती दर्भ पसरण्याचा विधी) हे विधी करतात आणि बाकीचे विधी यजनीयदिनी करतात. पहिल्याच पूर्णमास इष्टीच्या अथवा दर्शइष्टीच्या वेळी यजमानाला **अन्वारंभणीया इष्टि** करावी लागते. ह्या इष्टीमध्ये प्रथम दोन आहुती सरस्वतीप्रीत्यर्थ देऊन नंतर अकरा कपालांवर भाजलेला पुरोडाश (पोळी) अग्नि आणि विष्णु ह्यांना उद्देशून हवन करावयाचा असतो; तसेच सरस्वतीला उद्देशून चरू आणि बारा कपालांवर भाजलेला पुरोडाश सारस्वत आणि आठ कपालांवर भाजलेला पुरोडाश अग्निभगिन् ह्यांना उद्देशून हवन करावयाचा असतो. ही अन्वारंभणीय इष्टि एकदाच पहिल्या पूर्णमासाच्या अथवा दर्श इष्टीच्या वेळी करावयाची असते.

पौर्णिमेच्या आणि दर्शाच्या दिवशी करावयाच्या इष्टीमध्ये यजमान गार्हपत्य अग्नीच्या पश्चिमेकडे पत्नीसह बसून संकल्प करतो. नंतर तो अध्वर्यु, ब्रह्मा, होता आणि आग्नीध्र ह्या चार ऋत्विजांची नेमणूक करतो. नंतर तीन अग्नींवर (आणि पाच अग्नी ठेवले असल्यास पाच अग्नींवर) **समिधा** अर्पण करण्यात येतात. यजमानाने पूर्वी सोमयाग केलेला असेल तर त्याला **शाखाहरण** संज्ञा असलेला विधी करावा लागतो. त्या विधीमध्ये सान्नाय्याचे हवन करावयाचे असते. **सान्नाय** म्हणजे ताज्या तापलेल्या दुधात पूर्व रात्री काढलेल्या दुधाचे ताक अथवा दही मिसळून केलेला पदार्थ; **शाखाहरण** विधी फक्त एकदाच आणि फक्त दर्शइष्टीच्या वेळी करावयाचा असतो. ह्या विधीमध्ये एकाद्या पळसाच्या अथवा शमीच्या झाडाची शाखा (खांदी) आणावयाची असते. तिचा उपयोग यजमानाच्या सहा वासरांना त्यांच्या मातांपासून दूर करताना अध्वर्यु करतो. शाखाहरण सायंकाळी आणि प्रातःकाळी दूध काढतेवेळी करावयाचे असते. (जै. ३·६·२८।२९).

अनुक्रमणिका

ह्यानंतर **बर्हिराहरण** (म्हणजे दर्भ तोडून आणण्याचा विधी) आणि **इध्माहरण** (म्हणजे समिधा आणण्याचा विधी) हे विधी करण्यात येतात. बर्हिराहरणामध्ये अध्वर्यु एकाद्या कोयत्याने अथवा घोड्याच्या बरगडीच्या हाडाने अथवा बैलाच्या बरगडीच्या हाडाने दर्भ तोडतो आणि त्याचा भारा दोरीने बांधून घेऊन येतो. ह्या दर्भामध्ये **प्रस्तर, परिभोजनीय** आणि **उलपराजि** (म्हणजे वाळलेले) अशा संज्ञा असलेले दर्भ असतात. ह्यातील परिभोजनीय दर्भाचा उपयोग यजमान आणि त्याची पत्नी ह्यांच्याकरिता आसने तयार करण्याकडे करितात.

ह्या इष्टीकरिता पळसाच्या अथवा खैराच्या २१ समिधा लागतात. ह्या २१ समिधांचा एक जुडगा करून तो दर्भाच्या दोरीने बांधून ठेवतात. समिधा तोडताना जे लाकडांचे तुकडे टाकून देतात त्यांना **इध्मप्रव्रश्चन** अशी संज्ञा आहे. दर्भ दुमडून आणि एका दोरीने बांधून केलेल्या जुडग्याला वेद अशी संज्ञा आहे. त्या जुडग्याचा उपयोग वेदी झाडण्याकरिता करावयाचा असतो. **वेद** करताना दर्भाचे जे भाग कापलेले असतात त्यांना **वेदपरिवासन** अशी संज्ञा आहे. झाडाची एक खांदी घेऊन तिचे एक टोक तासून फावड्याच्या आकाराचे करितात. त्या फावड्याला **उपवेश** अशी संज्ञा आहे. त्या उपवेशावर तीन दर्भाची केलेली तिपेडी दोरी अशा रीतीने ठेवतात की त्या दोरीचे अग्र आणि बुंधा ही दोन्ही एकमेकाला लागलेली असतात परंतु त्यांची गाठ मारलेली नसते. ह्या दोरीला '**पवित्र**' अशी संज्ञा आहे.

ह्यानंतर अपराह्न काळी दर्शेष्टीमध्ये **पिंड-पितृयज्ञ** ह्या नावाचा विधी करितात. तो विधी पूर्णमास इष्टीमध्ये करीत नाहीत. ह्या विधीमध्ये यजमानाच्या मृतपूर्वजांना उद्देशून शिजलेल्या चरूचे तीन पिंड अग्नीमध्ये अर्पण करावयाचे असतात. हा चरू दक्षिणाग्नीवर शिजवितात आणि त्याच्या आहुती त्याच अग्नीमध्ये देतात. ह्या चरूकरिता लागणारे तांदूळ तयार करण्याकरिता यजमानपत्नी एका उखळात साळी कांडते. शिजलेल्या चरूपैकी काही अंशाची एक आहुती दक्षिणाग्नीमध्ये देतात आणि बाकीच्या अन्नाचे तीन पिंड करून ते यजमानाच्या तीन मृत पूर्वजांना उद्देशून गार्हपत्य आणि दक्षिणाग्नी ह्यांच्या दरम्यानच्या जमिनीवर काढलेल्या एका रेषेवर अर्पण करतात. ज्या यजमानाचा पिता जिवंत असेल त्याने फक्त होम केल्यावर थांबावे. त्या रेषेवर मांडलेल्या पिंडांची पूजा करतात. त्यानंतर त्यांतील मधला पिंड यजमानाने मला वीरपुत्र देण्याबद्दल पितरांना विनंती करून उचलावा आणि आपल्या पत्नीला खाण्यास लावावे. बाकीचे दोन पिंड पाण्यात अथवा अग्नीत टाकावे अथवा एकाद्या अन्नद्वेष झालेल्या मनुष्याने ते भक्षण करावे अथवा एकाद्या असाध्य रोग झालेल्या मनुष्याने ते भक्षण करावे; तो मनुष्य एक तर बरा होईल अथवा मरण पावेल. (आश्व. श्रौ. २·७·१३).

ज्या गृहस्थाने तीन श्रौत अग्नींची स्थापना केली नसेल त्यालादेखील अमावास्येला पिंडपितृयज्ञ करावा लागत असे परंतु तो यज्ञ गृह्याग्नीमध्ये करीत. (आश्व. २·७·१८).

यज्ञकर्त्याने पूर्वी सोमयाग केला असल्यास त्याला **सायंदोह** नावाचा विधी करावा लागतो. ह्या विधीमध्ये तीन अथवा सहा गाईचे दूध काढून त्यापासून सान्नाय्य करावयाचा असतो. इष्टीच्या मुख्य दिवशी प्रातःकाळी दूध काढतानाही तसाच विधी करावा लागतो.

पूर्णमास इष्टी दोन दिवसपर्यंत करावयाची असली तर पौर्णिमेच्या दिवशी फक्त अग्न्यन्वाधान आणि परिस्तरण एवढ्याच क्रिया करतात आणि बर्हि आणि इध्मा आणणे, वेद तयार करणे आणि बाकीचे सर्व विधी

दुसऱ्या दिवशी करतात. जर पूर्ण मास इष्टि एकाच दिवशी करावयाची असली तर वेद तयार करून झाल्यानंतर परिस्तरण करतात.

**इष्टीच्या मुख्य दिवशी** यज्ञकर्ता आह्निक अग्निहोत्राचे हवन सूर्योदयापूर्वी करतो आणि सूर्योदय झाल्यावर पूर्णमास इष्टीला प्रारंभ करितो. दर्शइष्टीच्या बाबतीत सूर्योदय होण्यापूर्वी त्या इष्टीच्या विधीला प्रारंभ करण्यात येतो. त्यानंतर करण्यात येणाऱ्या निरनिराळ्या विधींची नावे आणि थोडेसे वर्णन पुढे दिले आहे.

आहवनीय अग्नीच्या दक्षिणेस ब्रह्मा आणि यजमान ह्यांच्याकरिता आसने तयार करतात नंतर **पात्रासादन** म्हणजे दर्भ पसरून यज्ञपात्रे मांडण्याची क्रिया करतात. नंतर **ब्रह्मावरण** म्हणजे ब्रह्माऋत्विजाची नेमणूक करण्याचा विधी करतात. ब्रह्मा ऋत्विज वेदविद्येत अत्यंत पारंगत असावा लागतो. (आप. श्रौ. ३·१८·१). मंत्र म्हणत असताना त्याला मौन धारण करावे लागते आणि सर्व कृत्यांवर देखरेख करावी लागते. **प्रणीताप्रणयन**. एका चमसात पवित्र संज्ञा असणारे दोन दर्भ ठेवून त्या चमसात पाणी ओतून त्यावर **स्फ्य** (एक लाकडी तलवार) झाकण ठेवतात आणि ते **प्रणीतापात्र** म्हणजे पाणी भरलेले पात्र आहवनीय अग्नीच्या उत्तरेकडे दर्भावर ठेवतात. ह्या कृत्याला **प्रणीताप्रणयन** अशी संज्ञा आहे. प्रणीताजलाचा मुख्य उद्देश धान्य दळून अथवा कुटून तयार केलेले पीठ भिजवून त्याचा पुरोडाश करण्याकरिता मऊ गोळा करणे हा असतो. (जै. ४·२·१४।१५).

**निर्वाप विधी** (आप. १·१७·१० वरील टीका) म्हणजे कुंभीमध्ये भरलेले साळीचे धान्य अथवा इतर यज्ञद्रव्य मुठीने काढून **अग्निहोत्रहवणी** नावाच्या एका पात्रात काढणे. हा विधी यज्ञात हवन करावयाचा चरु (शिजलेला भात) तयार करण्याकरिता धान्य काढते वेळी करतात. तसेच तो विधी पुरोडाश करण्याकरिता लागणारे धान्य अथवा इतर यज्ञद्रव्य बाहेर काढते वेळीही करतात.

**पत्नीसंन्नहन** [एतद्वै पत्नियै व्रतोपनयनम् । तेनैवैनां व्रतमुपनयति । तै. ब्रा. ३·३·३.] म्हणजे यजमानपत्नीच्या कमरेभोवती एक दोरी गुंडाळण्याचा विधी. ही दोरी मुंज गवताची केलेली असून तिला **योक्त्र** अशी संज्ञा आहे. ती दोरी आग्नीध्र नावाचा ऋत्विज गुंडाळतो. आधुनिक काळी यजमानपत्नी स्वतःच आपल्या कमरेभोवती योक्त्र गुंडाळते. (तै. ब्रा. ३·३·३).

**बर्हिस्तरण**. अध्वर्यु बर्हीचा (म्हणजे दर्भांचा) जुडगा हातात घेऊन त्याची दोरी सोडून ते दर्भ वेदीवर अशा रीतीने दाट पसरतो की त्यांच्या खालची जमीन सहज दिसणार नाही.

**सामिधेनी ऋचांचे पठण.** अग्नीमध्ये समिधा घातलीत असताना अथवा तो पेटवीत असताना ह्या ऋचा म्हणतात म्हणून त्यांना सामिधेनी [अग्नेः समिन्धनार्था ऋचः सामिधेन्यः । ३. आश्व १·२·३ वरील टीका, ऋ ३·२७·१, ६·१६. १०-१२, ३·२७· १३-१५, १·१२·१, ३·२७·४, ५·२८·५-६ मिळून ११ ऋचा. (आश्व १·२·७).] अशी संज्ञा मिळाली आहे. (आश्व. १·२·३ वरील टीका). ह्या ऋचांची संख्या ११ असते. परंतु दर्शपूर्णमास इष्टीमध्ये १५ सामिधेनी ऋचा म्हणावयाच्या असतात म्हणून ती संख्या पुरी करण्याकरिता पहिली आणि शेवटली ह्या दोन ऋचा तीन तीन वेळा म्हणतात. प्रत्येक ऋचा म्हणून झाली म्हणजे अध्वर्यु आहवनीय अग्नीमध्ये एक समिधा अर्पण करतो.

सामिधेनी ऋचा म्हणून झाल्यावर होतृ ऋत्विज यजमानाच्या **प्रवरऋषींच्या** नावांचा उच्चार करून त्यांना आवाहन करतो. प्रवरऋषींपैकी सर्वात प्राचीन असणाऱ्या ऋषींचा उच्चार प्रथम करून त्यानंतर त्याच्या अलिकडील काळच्या ऋषींचा उच्चार करतात. क्षत्रिय आणि वैश्य वर्णांच्या यजमानांच्या बाबतीत त्यांच्या पुरोहिताच्या प्रवरऋषींच्या नावांचा अशाच क्रमाने उच्चार करतात.

त्यानंतर अग्नी, सोम, प्रजापतीप्रभृती **देवतांचे आवाहन** करतात. देवतांना आवाहन केल्यानंतर ध्रुवा संज्ञा असणाऱ्या पळीतून स्रुवा पळीने तूप काढून घेऊन ते वेद नावाच्या कुंचावर धरतात आणि आहवनीय अग्नीच्या वायव्य कोनापासून दोन पुरोडाश ठेवलेल्या जागेपर्यंत आहवनीय अग्नीवर तुपाची सतत आणि सरळ धार धरतात. अशा रीतीने तूप ओतण्याच्या क्रियेला **'आघार'** अशी संज्ञा आहे. अशी धार दोन वेळा ओतावयाची असते.

त्यानंतर **होतृ ऋत्विजाची नेमणूक** करण्याचा विधी करण्यात येतो. नंतर **प्रयाज** संज्ञा असणाऱ्या आहुती द्यावयाच्या असतात. ह्या आहुती पाच असतात. पहिली आहुती आघारांच्या दोन धारा जेथे मिळतात तेथे देऊन बाकीच्या चार आहुती पूर्वकडे देत येतात (आप. २·१७·१) अथवा त्या चार आहुती चार दिशांना देऊन शेवटली आहुती आहवनीय अग्नीच्या मध्यभागी देतात. (सत्या. ब्रा. २·२ पा १९९). जेव्हा पांचांपेक्षा अधिक प्रयाज असतात तेव्हा ४ थी, ७ वी आणि १० वी आहुती वर सांगितल्याप्रमाणे देतात.

**आज्यभाग.** ह्या विधीमध्ये अध्वर्यूच्या आज्ञेवरून होतृ ऋत्विज अग्नीला आमंत्रण करणारा **अनुवाक्या** मंत्र म्हणतो. नंतर तोच **याज्यामंत्र** म्हणतो. त्या मंत्रांच्या शेवटी 'वौ३षट्' असे शब्द असतात. ते शब्द ऐकल्यावर अध्वर्यु आहवनीय अग्नीमध्ये आज्याची (तुपाची) आहुती देतो. ह्या आहुतीला '**आज्यभाग** [आज्यं भागो भागधेयं ययोस्तौ । सत्या. २·२. वरील टीका.] अशी संज्ञा आहे. (सत्या. २·२ पा. २०१). दुसरा आज्यभाग सोमाला अर्पण करतात. पूर्णमास इष्टीमध्ये ह्या दोन आज्यभागांना '**वार्तध्न**' असे म्हणतात. आणि दर्श इष्टीमध्ये त्यांना '**वृधन्वन्ती**' असे म्हणतात (आश्व. १·५·३२ आणि ३५).

त्यानंतर **पुरोडाशाच्या तुकड्यांच्या मुख्य यज्ञाला** प्रारंभ होतो. वर उल्लेख केलेल्या पिठाच्या गोळ्या **कपालांवर** म्हणजे खापराच्या तुकड्यावर भाजून तयार केलेल्या भाकऱ्यांना **पुरोडाश** अशी संज्ञा आहे. ही कपाले निरनिराळ्या विधीमध्ये आठ, अकरा अथवा त्याहून कमीअधिक असतात. आधुनिक काळी पुष्कळ अग्निहोत्री आठ अथवा अकरा कपालांचा उपयोग न करता सर्व कपाले मांडल्यावर त्यांचा जसा आकार होईल तशा आकाराच्या एकाच विटेचा उपयोग करतात आणि त्या विटेवर कपालांची संख्या दर्शविणाऱ्या रेघा काढलेल्या असतात. ही कपाले गार्हपत्य अग्नीवर मांडतात. अध्वर्यु ऋत्विज ह्या दोन पुरोडाशांचे आहुती देण्याकरिता तुकडे काढतो. मुख्य आहुती दोन आधार ज्या ठिकाणी एकमेकांस मिळतात त्या जागेवर देतात आणि त्यानंतरची प्रत्येक आहुती पूर्वीच्या आहुतीच्या पूर्वेकडे अथवा ईशान्येकडे परंतु पूर्वीच्या आहुतीला लागेल अशा रीतीने देतात. अग्नीमध्ये अग्नीप्रीत्यर्थ **पुरोडाशाची आहुती** दिल्यानंतर प्रजापतीला अथवा अग्नीषोमांना अथवा विष्णूला उद्देशून एक **उपांशुयाज** (मुकाट्याने करावयाचा होम) करतात. उपांशुयाज फक्त पौर्णिमासी इष्टीमध्ये करतात. अशाच रीतीने पूर्णमास इष्टीमध्ये **दुसरा पुरोडाश** अग्नी आणि सोम यांना अर्पण करतात आणि दर्श इष्टीमध्ये इंद्राग्नींना अर्पण करतात. सान्नाय्याचे हवन करावयाचे असेल तेव्हा वरील तपशीलात काही भेद असतो.

**अनुक्रमणिका**

मुख्य आहुती दिल्यानंतर अग्निस्विष्टकृत देवतेला उद्देशून आहुती देतात. नंतर अग्नीला अर्पण करावयाच्या पुरोडाशामधून आणि दुसऱ्या पुरोडाशामधून जवाच्या दाण्याएवढे दोन तुकडे कापून काढतात. ह्या तुकड्यांना '**पाशित्र**' अशी संज्ञा आहे. हे तुकडे ज्या पात्रात ठेवतात त्याला '**प्राशित्रहरण**' अशी संज्ञा आहे. हे प्राशित्र संज्ञा असणारे तुकडे ब्रह्मा ऋत्विजाने भक्षण करावयाचे असतात.

नंतर अग्नीला अर्पण करावयाच्या पुरोडाशाच्या दक्षिणेकडील अर्ध्या भागातून अध्वर्यु **इडेचा पहिला तुकडा** कापतो. त्याच पुरोडाशाच्या पूर्वेकडील अर्ध्या भागातून एक पातळ परंतु लांबट तुकडा कापून काढतात. तो तुकडा यजमानाला द्यावयाचा असतो. अशाच प्रकारे उत्तरेकडील पुरोडाशाचा एक भाग **इडा** म्हणून कापून काढतात. इडेचा आणखी एक तुकडा काढतात. त्याला **अवांतर इडा** म्हणतात.

नंतर **इडेची प्रार्थना** करण्याचा विधी करतात. ह्या विधीला **इडोपह्वानम्** अथवा इळोप असे म्हणतात. ह्या प्रार्थनेच्या योगाने इडा देवता यजमानाला अनुकूल होते अशी समजूत आहे.

नंतर ब्रह्मा प्राशित्र भक्षण करतो. ब्रह्म्याने प्राशित्र भक्षण केल्यावर होता अवांतर इडा भक्षण करतो. चारही ऋत्विज आणि यजमान त्यानंतर इडा भक्षण करतात. अग्नीला अर्पण करावयाच्या पुरोडाशाचे चार भाग करतात. हे चार भाग चार ऋत्विजांना वाटून देतात आणि ते ते भाग भक्षण करतात.

दक्षिणाग्नीवर पुष्कळ चरु शिजवितात. ह्या चरूला '**अन्वाहार्य**' अशी संज्ञा आहे. ह्या चरूचे चार वाटे करून ते चार ऋत्विजांना देतात आणि ते ऋत्विज ते वाटे स्वीकारतात.

नंतर तीन **अनुयाज** आहुती अर्पण करतात. नंतर **सूक्तवाक स्तोत्र** म्हणण्यात येते. नंतर अध्वर्यु **प्रस्तर** आणि **शाखा** आहवनीय अग्नीवर टाकतो. नंतर **शंयुवाक मंत्र** म्हटला जातो. नंतर अध्वर्यु **परिधि** अग्नीमध्ये टाकतो. त्यानंतर **पत्नी संयाजाच्या** आहुती देण्यात येतात. नंतर **फलीकरण** आणि **पिष्टलेप** अशा संज्ञा असलेल्या दोन आहुती दक्षिणाग्नीमध्ये अर्पण करतात.

अनुक्रमणिका

## दर्शपूर्णमास – विहार
## (पुणे येथील मिमांसा विद्यालयात दिसणारे दृश्य)




यजमान संचर = क ख ग घ छ
अध्वर्यु संचर = क ख ग घ च
ब्रह्मा संचर = क ख ज झ ट
होतृ संचर = क ख ग ठ ड
आग्नीध्र संचर = क ख ढ
प्र = प्रणीता

अनुक्रमणिका

नंतर **संस्थाजप** [ओं च मे स्वरश्च मे यज्ञोप च ते नमश्च । यत्ते न्यूनं तस्मै त उप यत्तेऽतिरिक्तं तस्मै ते नम इति **संस्थाजपः** । आश्व. १·११·१५] (आश्व. १·११·१५) म्हणजे कर्म समाप्त झाल्यावर म्हणावयाची प्रार्थना करण्यात येते. हा जप होता ऋत्विज करतो. नंतर **समिष्टयजुः** संज्ञा असलेले तीन होम अर्पण करण्यात येतात. नंतर यजमान आपल्या वाट्याचे यज्ञसंबंधी अन्न भक्षण करतो. सान्नाय्याचे हवन करावयाचे असेल तर यजमान उकळलेले दूध आणि दही हे पदार्थ पृथक भक्षण करतो. ब्राह्मण नसणाऱ्या यजमानाने सान्नाय्य भक्षण करू नये असे आपस्तंबाने (४·१४·२) सांगितले आहे.

ह्यानंतर अध्वर्यु यज्ञ समाप्त करतो, कपाले सुटी करतो आणि मोजून ठेवून यज्ञशालेच्या बाहेर जातो. ब्रह्मा ऋत्विजही अग्नीची पूजा झाली आहे अशा अर्थाचा मंत्र म्हणून अग्नीवर एक समिधा ठेवून आलेल्या मार्गाने यज्ञशालेच्या बाहेर जातो. यजमान आपल्या स्थानावरून उठून **विष्णुक्रमा** (विष्णूची पाऊले) अशी संज्ञा असणाऱ्या चार ढेंगा टाकतो. नंतर क्रमाने आहवनीय, दक्षिणाग्नी आणि गार्हपत्य ह्यांच्या प्रार्थना करतो, यज्ञाच्या आरंभी घेतलेल्या व्रतांपासून स्वतःची मुक्तता करतो आणि यज्ञशालेच्या बाहेर जातो, ब्राह्मणांना (भोजन देऊन) संतुष्ट केले पाहिजे अशी आज्ञा करतो आणि नंतर यज्ञातील **अंतिम प्रार्थना** करतो.

दर्शपूर्णमास इष्टीमध्ये बदल (विकृती) करून केलेले दाक्षायण, वैमृध, **साकंप्रस्थीय** इत्यादी अनेक यज्ञ आहेत. (जै. २·३·५।११).

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ५५

# चातुर्मास्य याग

[चातुर्मास्ययागांसंबंधी माहिती पुढील ग्रंथांत दिलेली आहे : तै. सं. १·८·२–७, तै. ब्रा. १·४·९–१० आणि १·५·५–६; सत्या ब्रा. २·५·१–३ आणि ११·५–२, आपस्तं ८, कात्या. ५, आश्व. २·१५–२०, बौधा. ५.] (मू. ग्रं. पा. २-१०९१-११०८)

**(ऋतुपरत्वे करावयाचे यज्ञ)**

चातुर्मास्य याग हे कोणाच्या मते तीन आणि कोणाच्या मते चार असतात. त्यांची नावे **वैश्वदेव, वरुणप्रघास, साकमेध** (आणि **शुना सीरीय**) अशी आहेत. ह्या प्रत्येकाला चातुर्मास्य यागाचे **पर्व** (भाग अथवा पेर) असे म्हणतात आणि ते अनुक्रमे फाल्गुन (अथवा चैत्र), आषाढ, कार्तिक ह्या महिन्यांच्या पौर्णिमेला आणि साकमेध केल्यानंतर येणाऱ्या पाचव्या पौर्णिमेला (म्हणजे फाल्गुनी पौर्णिमेला) अथवा त्यांच्या आधी दोन तीन दिवस करण्यात येतात. तै. ब्रा. मध्ये (१·६·८) म्हटले आहे की वैश्वदेव यागाच्या योगाने प्रजा प्राप्त होते, वरुणप्रघासाच्या योगाने वरुणपाशातून मुक्तता होते आणि साकमेधापासून स्थैर्य प्राप्त होते.

चातुर्मास्य यागाच्या सर्वही पर्वाच्या बाबतीत यजमानाला काही विशिष्टव्रते (नियम) पाळावी लागतात. (आश्व. २·१६·२२।२७). त्याला आपल्या मस्तकावरील आणि मुखावरील केस काढावे लागतात, जमिनीवर निजावे लागते, मध, मांस, मीठ, स्त्रीसंभोग आणि शरीरशृंगार ह्या गोष्टी वर्ज्य कराव्या लागतात.

सर्वही चातुर्मास्य यागांत पुढील पाच आहुती सामान्य असतात : (१) अग्नीप्रीत्यर्थ आठ कपालांवर सिद्ध केलेला पुरोडाश, (२) सोमाप्रीत्यर्थ तांदुळाचा चरु, (३) सवित्याप्रीत्यर्थ १२ अथवा ८ कपालांवर सिद्ध केलेला पुरोडाश, (४) सरस्वतीप्रीत्यर्थ चरु आणि (५) पूषन् देवतेप्रीत्यर्थ तांदुळाच्या कण्यांचा चरु.

चातुर्मास्य इष्टि हे कृत्य सर्व आयुष्यभर करीत रहावे अथवा फक्त एक वर्षभर करावे.

### वैश्वदेवपर्व

चातुर्मास्य यागांना प्रारंभ करताना फाल्गुन पौर्णिमेच्या आदल्या दिवशी वैश्वानराला अथवा पर्जन्याला उद्देशून एक इष्टि करावयाची असते. त्या इष्टीमध्ये वैश्वानराकरिता १२ कपालांवर सिद्ध केलेला पुरोडाश असतो आणि पर्जन्याकरिता चरु असतो. वैश्वदेवपर्वइष्टीमध्ये सर्व पर्वांना सामान्य असणाऱ्या पाच आहुतींखेरीज मरुत्, विश्वेदेव आणि द्यावापृथिवी ह्या देवतांना द्यावयाच्या तीन अधिक आहुती असतात.

वैश्वदेवपर्वयाग पूर्वेकडे उतरत्या असणाऱ्या भूमीवर केला पाहिजे. यज्ञमंडपात यज्ञपात्रे मांडल्यानंतर अरणीपासून मंथनाने अग्नी उत्पन्न करतात. दर्शपूर्णमासात केवळ ५ प्रयाज आणि ३ अनुयाज असतात परंतु वैश्वदेव पर्वात ९ प्रयाज आणि ९ अनुयाज असतात. वैश्वदेव आणि शुनासीरीय ह्या पर्वात एकच समिष्टयजुः आहुती अर्पण करावी असे कात्या. (५·२·९ आणि १२) मध्ये सांगितले आहे.

वैश्वदेव यागाची दक्षिणा त्या ऋतूमध्ये प्रथमतः जन्मलेले वासरू असते असे शत. ब्रा. मध्ये (२·५·१·२१) सांगितले आहे.

**वरुणप्रघास पर्व**

यवांवर वरुणाचे स्वामित्व असते आणि ते यव ह्या विधीमध्ये भक्षण केले जातात म्हणून (घस्— भक्षण करणे ह्या धातूवरून) ह्या विधीला वरुणप्रघास असे म्हणतात अशी व्युत्पत्ती शत. ब्रा. (२·५·२·१) मध्ये दिली आहे. हा विधी वैश्वदेवयागानंतर चार महिन्यांनी पर्जन्यकाळात आषाढ अथवा श्रावण महिन्यातील पौर्णिमेला करण्यात येतो.

पूर्वेकडे उतार असणाऱ्या जमिनीवर आहवनीय अग्नीच्या दक्षिणेला एकीच्या दक्षिणेला दुसरी अशा दोन वेदि तयार करतात. त्यांपैकी उत्तरेकडील वेदि अध्वर्यूच्या स्वाधीन असते. आणि दक्षिणेकडील वेदि अध्वर्यूचा साहाय्यक **प्रतिप्रस्थातृ** ह्या संज्ञेच्या ऋत्विजाच्या स्वाधीन असते. उत्तरेकडील वेदीवर अध्वर्यु जी जी कृत्ये करील ती (त्यातील काही विशिष्ट कृत्ये वगळून बाकीची) सर्व कृत्ये अध्वर्यूचे अनुकरण करून प्रतिप्रस्थाता दक्षिणेकडील वेदीवर करतो. ह्या विधीमध्ये मेंढा आणि मेंढी ह्यांची जवाच्या पिठाची केलेली दोन चित्रे हवन करावयाची असतात. मेंढ्याचे चित्र अध्वर्यु तयार करतो आणि मेंढीचे चित्र प्रतिप्रस्थाता तयार करतो. ही चित्रे एडक्याव्यतिरिक्त इतर एकाद्या जनावराच्या लोकरीने अथवा तशी लोकर न मिळाल्यास ठेचलेल्या कुशाग्रांनी मढवितात.

सर्व पर्वांत सामान्य असणाऱ्या पाच आहुतींखेरीज ह्या यागात इंद्राग्नी, मरुत् वरुण आणि क म्हणजे प्रजापती ह्या देवतांना उद्देशून चार अधिक आहुती देण्यात येतात. ह्या यागाकरिता लागणारा अग्नी गार्हपत्य अथवा आहवनीय अग्नीमधून अध्वर्यु आणि प्रतिप्रस्थाता घेऊन येतात. ही अग्नी आणण्याची क्रिया फक्त वरुणप्रघास आणि साकमेध यागांमध्ये करतात.

ह्या यागामध्ये एक चमत्कारिक कृत्य असते. प्रतिप्रस्थाता यजमानपत्नीकडे जाऊन तिला तिचा प्रियकर (जार) कोण आहे असे विचारतो. ती तिचे जितके प्रियकर असतील त्यांची नांवे सांगते अथवा नांवे सांगण्याची लाज वाटल्यास जितके प्रियकर असतील तितक्या दर्भाच्या काड्या उचलून दाखविते. तिने आपला प्रियकर कोणी नाही असे सांगितले अथवा आपल्या प्रियकरांची नावे सांगितली अथवा त्यांची संख्या दर्शित केली म्हणजे प्रतिप्रस्थाता तिच्याकडून एक मंत्र म्हणवून घेतो. तिने जर सत्य लपवून ठेवले तर तिच्या प्रिय आप्तांना पीडा होईल असे तिला सांगण्यात येते. वरुणप्रघास यागाची दक्षिणा एक सवत्स गाय अथवा एक अश्व अथवा सहा अथवा बारा बैल इतकी असते.

ह्या विधीचा समारोप ऋत्विज, यजमान आणि यजमान-पत्नी एकाद्या नदीमध्ये अथवा त्यासारख्या जलाशयात **अवभृथ स्नानार्थ** जाऊन करण्यात येतो. अवभृथ स्नानाला जाताना ते आपल्याबरोबर वरुणाप्रीत्यर्थ केलेल्या पयस्यामधील अवशेष भाग आणि सोमाचा चोथा मानण्यात येणाऱ्या पणाचे तुकडे घेऊन जातात. पयस्याचा थोडासा भाग वरुणाला अर्पण करतात आणि उरलेला पयस्या अग्निस्विष्टकृत् ऐवजी अग्नि आणि वरुण ह्यांना अर्पण करतात आणि पणाचे तुकडे पाण्यात टाकून नंतर स्नान करतात. स्नान करून घरी परत आल्यावर यजमान एक समिधा आहवनीय अग्नीवर ठेवतो.

## साकमेध

साकमेधामध्ये अनेक विधींचा समावेश होतो आणि त्यात अनेक आणि पुष्कळ प्रकारच्या आहुती अर्पण करावयाच्या असतात. साकमेध ह्याचा अक्षरशः अर्थ (साकम् एध) एकत्र करणे अथवा एका वेळी अग्नि प्रज्वलित करणे असा आहे आणि ह्या यागाला हे नाव देण्याचे कारण बहुधा त्यातील पहिली आहुती अग्निअनीकवत् ह्या देवतेला उद्देशून ८ कपालांवर तयार केलेल्या पुरोडाशाची सूर्य उदयाबरोबरच [अथ पौर्णमास्या उपवसथेऽग्नयेऽनीकवते पुरोडाशमष्टाकपालं निर्वपति साकं सूर्येणोद्यता । बौ. ५·९;] द्यावयाची असते हे असावे. (बौ. ५·९).

हा याग वरुणप्रघासपर्वानंतर चार महिन्यांनी म्हणजे कार्तिक अथवा मार्गशीर्ष पौर्णिमेला करण्यात येतो. ह्या संपूर्ण पर्वाला दोन दिवस लागतात. ह्यात तीन सवनांच्या वेळी तीन देवतांना उद्देशून तीन इष्टि करावयाच्या असतात, आठ देवतांना अर्पण करावयाच्या आठ आहुती असणारा **महाहवि** संज्ञेचा एक विधी असतो. महाहवीनंतर पितृयज्ञ हा विधी करतात. ह्याला **महापितृयज्ञ** अशी संज्ञा आहे. तो विधी दक्षिणाग्नीच्या दक्षिण दिशेला एक नवी वेदी तयार करून तेथे करण्यात येतो. इतर यागात शेवटची आहुती अग्निस्विष्टकृत् ह्या देवतेला उद्देशून देण्यात येते. त्याऐवजी साकमेधामधील शेवटची आहुती 'अग्निकव्यवाहन' ह्या देवतेला अर्पण करण्यात येते. साकमेधामधील शेवटचा विधी '**त्रैयंबक होम**' हा असतो. हा होम रुद्राला अर्पण करावयाचा असतो.

ह्या यागाची दक्षिणा एक पांढरा घोडा अथवा एक पांढरा बैल अथवा पांढऱ्या केसांचा एक ठिपका असणारा बैल अशी असते.

## शुनासीरीय

सर्व चातुर्मास्य यागांत सामान्य असणाऱ्या पाच आहुतींखेरीज ह्या इष्टीमध्ये शुनासीरौ (वायु आणि सूर्य) ह्या देवतांना अर्पण करावयाच्या तीन अधिक आहुती असतात. ह्या विधीमध्ये उत्तरवेदि नसते आणि कोणताही अग्नी मंथन करून तयार करण्यात येत नाही. ह्यात पाच प्रयाज, तीन अनुयाज आणि एक समिष्टयजुः असतो. ह्या विधीची दक्षिणा सहा बैल अथवा दोन मोठे बैल जोडलेला नांगर आणि सूर्याच्या पुरोडाशाकरिता एक शुभ्रवर्णाचा घोडा अथवा शुभ्र वर्णाचा बैल असल्याचे कात्यायनाने (५·११·१२।१४) सांगितले आहे. परंतु दुसऱ्या ग्रंथांनी भिन्न प्रकारच्या दक्षिणा सांगितल्या आहेत.

'शुन' आणि 'सीर' ह्या शब्दांचे अर्थ अनुक्रमे वायु आणि सूर्य असल्याचे निरुक्तात (९·४०) सांगितले आहे. परंतु शत. ब्रा. (२·६·३·२) मध्ये 'शुन' शब्दाचा अर्थ भरभराट आणि 'सीर' शब्दाचा अर्थ 'रस अथवा सार' असा दिला आहे. ह्या इष्टीच्या योगाने यजमानाला भरभराट आणि रस ह्या दोहोंची प्राप्ती होते म्हणून तिला हे नाव दिले आहे.

## आग्रयण

(अथवा प्रथम फळाची आहुती देणे). ही इष्टि केल्याशिवाय आहिताग्नी पुरुषाला शेतातून काढलेले भात, जव, जोंधळा, बाजरी, नाचणी ह्यांच्यासारख्या धान्यांचा आणि उपधान्यांचा उपयोग करता येत नाही.

या इष्टीचे विधान अमावास्येला करावयाच्या इष्टीसारखे असते. ह्या इष्टीला आग्रयण म्हणावयाचे कारण तिच्यामध्ये प्रथम फळांचा (अग्रांचा) उपयोग करण्यात येतो अथवा ती अग्रे भक्षण केली जातात. ह्या विधीमध्ये १७ **सामिधेनि** ऋचा असतात. ह्या विधीमध्ये इंद्राग्नी, विश्वेदेव, द्यावापृथिवी आणि सोम ह्या देवता असून त्यांना निरनिराळ्या कपालांवर सिद्ध केलेले पुरोडाश आणि चरु ह्यांच्या आहुती द्यावयाच्या असतात.

ह्या विधीमध्ये द्यावयाच्या दक्षिणेबद्दल निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळे पर्याय सांगितले आहेत. जैमिनीने (१०.३.३४।३८) ही दक्षिणा रेशमी कापड आणि वासरू अशी सांगितली आहे.

## काम्येष्टि

काही विशिष्ट गोष्टी घडल्या असताना करावयाच्या अथवा काही विशिष्ट कामनांची प्राप्ती करून घेण्याकरिता करावयाच्या अनेक इष्टि असतात. (आश्व. २·१०।१४; २·१३·१।१३; आप. १९·१८।२७; २५·१६). उदाहरणार्थ, दीर्घ आयुष्य मिळविण्याकरिता **आयुष्कामेष्टि**, प्रवास सुखकर होण्याकरिता **स्वस्त्ययनी**, पुत्राची इच्छा असणाऱ्याने अथवा पुत्र दत्तक घेणाऱ्याने करावयाची **पुत्रकामेष्टि**, वितुष्ट आलेल्या व्यक्तींमध्ये सलोखा व्हावा म्हणून करावयाची **संज्ञानी इष्टि**, पाऊस पडावा म्हणून करावयाची **कारीरीष्टि** इत्यादी.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ५६

## पशुबंध अथवा निरूढ पशुबंध

[पशुबन्धासंबंधी माहिती पुढील ग्रंथात दिली आहे :– शत. ब्रा. ३·६·४ प्रभृति, ११·७·१. प्रभृति, तै. सं. १·३·५–११, ६·३–४, कात्या. ६, आप. ७, आश्व. ३·१–८, बौ. ४. ] (मू. ग्रं. पा. २-११०९-११३२)

(म्हणजे यज्ञामध्ये एकाद्या पशूचे बलिदान करणे.)

**पशुयज्ञ** हा एक स्वतंत्र यज्ञ असतो आणि तो सोमयागामध्ये त्या यागाचे एक अंग म्हणूनही करण्यात येतो. स्वतंत्र रीतीने केलेल्या पशुयज्ञाला **निरूढपशुबंध** अशी संज्ञा असून सोमयागामध्ये त्याचे अंग म्हणून केलेल्या पशुयज्ञाला **सौमिक** अशी संज्ञा आहे. (आश्व. श्रौ. ३·८·३।४).

निरूढ पशुबंध आहिताग्नीने आपल्या सर्व आयुष्यभर प्रति सहा महिन्यांनी अथवा प्रतिवर्षी करावयाचा असतो. जर तो प्रतिवर्षी एकदा केला तर तो वर्षा ऋतूमध्ये (म्हणजे श्रावण अथवा भाद्रपद महिन्यात) अमावास्येला अथवा पौर्णिमेला करावा. जर तो प्रति सहा महिन्यांनी केला तर तो दक्षिणायन आणि उत्तरायण ह्यांच्या प्रारंभी (तो दिवस पौर्णिमा अथवा अमावास्या असेलच असे नाही) करावा.

ह्या यज्ञामध्ये चातुर्मास्य यागात लागणाऱ्या पाच ऋत्विजांखेरीज **मैत्रावरुण** (अथवा प्रशास्तृ) ह्या नावाचा सहावा ऋत्विज लागतो. निरूढ पशुबंध याग दोन दिवस चालतो. तथापि तो एका दिवसातही करता येतो. तो याग दोन दिवस केला तर पहिल्या दिवसाला **उपवसथ** असे म्हणतात आणि त्या दिवशी वेदी तयार करणे, यूप आणणे ह्यांच्यासारखी प्रास्ताविक कृत्ये करण्यात येतात.

यज्ञापासून जशा प्रकारची फलप्राप्ती व्हावी अशी इच्छा असेल त्याप्रमाणे पळस, खदिर, बिल्व अथवा रौहितक ह्यांच्यापैकी कोणत्या तरी वृक्षाचा यूप तयार करतात. तो वृक्ष इतक्या उंचीवर तोडावयाचा असतो की त्याचा जमिनीवर उरलेला बुंधा त्या मार्गाने जाणाऱ्या गाडीच्या आसाला लागणार नाही. यूपाची लांबी किती असावी ह्याविषयी निरनिराळ्या ग्रंथांत मतवैचित्र्य आहे. आपस्तंबाने सांगितले आहे की यूपाची कमीत कमी लांबी यजमानाच्या उंची इतकी अथवा यजमानाने हात वर केले म्हणजे होणाऱ्या उंची इतकी असलीच पाहिजे. यूपाचा जो भाग जमिनीत पुरावयाचा असतो त्याला **उपर** अशी संज्ञा आहे. तो भाग एकंदर यूपाच्या पांचव्या हिश्याइतका असतो आणि तो तासावयाचा नसतो. बाकीचे खोड बुंध्यापासून शेंड्यापर्यंत अशा रीतीने तासतात की यूप अष्टकोणी होईल आणि शेंड्याकडे जरासा निमुळता होईल. यूप तयार करून उरलेल्या त्या वृक्षाच्या शेंड्याकडील भागाचे सुतार एक लाकडी शिरोभूषण बनवितो. ह्याची लांबी मनगटापासून बोटाच्या अग्राइतकी असावी. ह्या शिरोभूषणाला **चषाल** अशी संज्ञा आहे. ते पोकळ असून यूपाच्या मस्तकावर पागोट्यासारखे घट्ट बसते.

निरूढ पशुबंधामध्ये एकच **वेदी** असते आणि ती वरुणप्रघासइष्टीप्रमाणेच नेहमीच्या आहवनीय अग्नीच्या पूर्वेकडे तयार करतात. ही वेदी पश्चिमेच्या बाजूला तीन अथवा चार अरत्नी (कोपरापासून करंगळीपर्यंतचे अंतर) लांब असून पूर्वेच्या बाजूला कमी कमी होत गेलेली असावी. ह्या वेदीवर तिच्या पूर्वेकडील भागात एक **उत्तरवेदी** बैल जोडणीच्या शिवळेने (**शम्या**) मोजून तयार करतात. वेदीच्या उत्तरेकडे सुमारे एक प्रक्रम (पाऊल) अंतरावर चात्वाल नावाचा एक खड्डा खणतात. तो एक शिवळेइतका

लांब रुंद चौरस आकाराचा असतो. आणि गुडघ्या इतका खोल असतो हा चात्वाल उत्कराच्या समोर असतो आणि त्या दोहोंच्या दरम्यान महावेदीच्या उत्तर बाजूपर्यंत जाणारा एक अखंड मार्ग ठेवलेला असतो. उत्तरवेदीवर एक वीत लांबीरुंदी असणारी एक चौरस आकाराची खळी खणतात. तिला **उत्तरनाभी** अशी संज्ञा आहे.

निरूढ पशुबंध दोन दिवस करावयाचा असल्यास दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी उत्तरवेदीच्या आग्नेयी कोनापासून वायव्य कोनापर्यंत आणि नैऋत्य कोनापासून ईशान्य कोनापर्यंत तुपाच्या धारा ओततात. त्यावेळी एक सोन्याचा तुकडा त्या धारेतून अशा रीतीने सोडतात की तुपाची धार त्या तुकड्यावर पडावी. आहवनीय अग्नीवर इध्मा म्हणजे समिधांचा जुडगा पेटवून तो उत्तरवेदीकडे नेऊन नाभीवर ठेवतात. हा अग्नी पशुबंधातील सर्व कृत्यांकरिता आहवनीय अग्नी बनतो आणि मूळचा आहवनीय अग्नी गार्हपत्य अग्नी बनतो.

ह्या नव्या आहवनीय अग्नीच्या पूर्वेला यूप पुरण्याकरिता खड्डा खणतात. हा खड्डा अंशतः वेदीच्या आत आणि अंशतः वेदीच्या बाहेर असतो. ह्या खड्ड्यामध्ये यूप अशा रीतीने बसवितात की त्याचे अग्र आहवनीय अग्नीकडे झुकते राहील. नंतर दर्भाच्या दोन दोऱ्या तयार करतात. त्यांपैकी एक दोरी यूपाभोवती गुंडाळावयाची असते आणि दुसरी दोरी बळी द्यावयाच्या पशूकरिता असते. यजमानाला जशा प्रकारच्या पुत्र अथवा कन्या संततीची इच्छा असेल अथवा पर्जन्य पडावा अशी इच्छा असेल त्याप्रमाणे ही दोरी यूपाच्या निरनिराळ्या ठिकाणाभोवती गुंडाळतात.

बली द्यावयाचा पशू छाग (बोकड) असतो. तो शिंग मोडलेला, लंगडा, आंधळा, दंतहीन, पुच्छ हीन अशा प्रकारची व्यंगे असलेला असता कामा नये. त्या पशूला अशा प्रकारचे एकादे व्यंग असेल तर प्रायश्चित्त म्हणून एक आहुती विष्णु अथवा अन्य देवतेला उद्देशून अर्पण करण्यात येते. बलि द्यावयाच्या पशूला सुगंधी जलाने स्नान घालतात आणि त्याला चात्वाल आणि उत्कर ह्यांच्यामधून यूपासमोर पूर्वेकडे घेऊन येतात.

नंतर मंथन करून अग्नि उत्पन्न करून वैश्वदेवपर्वातील विधानाप्रमाणे होम अर्पण करण्यात येतो. नंतर बलीकरता तयार केलेली दोरी त्याच्या पायाला अडकवितात आणि ती दोरी यूपाभोवती बांधतात. पशूला अखेरच्या वेळी पाणी पाजण्यात येते आणि नंतर त्याचे डोके पश्चिमेकडे करून आणि त्याचे पाय उत्तरेकडे करून त्याचे तोंड अशा रीतीने घट्ट धरले जाते की त्याचा श्वासोच्छ्वास बंद होतो आणि त्याचा जीव गुदमरून त्याला मृत्यू येतो अथवा त्याच्या मानेभोवती एक काढणी आवळून त्याला ओरडू न देता त्याचा गळा दाबून त्याला मारण्यात येते. दोरी आवळल्यावर जर तो पशु ओरडला तर त्या कृत्याच्या क्षालनाकरिता एक आज्य आहुती अग्नीमध्ये अर्पण करतात. पशूला मारण्याचे हे कृत्य करणाऱ्याला **शमित्र** म्हणतात.

पशूचा वध झाल्यानंतर यजमानपत्नी त्या मृत पशूच्या समीप बसून त्याचे तोंड, नाक प्रभृति निरनिराळे अवयव धुते. त्या पशूच्या पोटावर चीर पाडून त्याच्या पोटातील वपा बाहेर काढतात आणि दोन शूलांवर (**वपास्त्रापणी**) अडकवून ती वपा शमित्र अग्नीवर तापवितात. नंतर तिच्यावर काही विशिष्ट क्रिया करण्यात येऊन ती वपा इंद्र आणि अग्नी यांना (अथवा सूर्य अथवा प्रजापती यांना) आहवनीय अग्नीमध्ये

अर्पण केली जाते. ह्याप्रसंगी एक बैल आणि तीन दुभत्या गाई अथवा इतर तीन गाई अशी दक्षिणा द्यावी असे आपस्तंब (७.२१.५) प्रभृतींनी सांगितले आहे.

ह्यानंतर **पशुपुरोडाश** करण्याची तयारी करतात. मृत पशूच्या देहापासून त्याचे हृदय, जीभ ह्यांच्यासारखे निरनिराळे अवयव बाजूला काढतात आणि काही विशिष्ट अवयव काही विशिष्ट देवतांना अर्पण करण्यात येतात. पशूच्या पोटातील पचन न झालेले गवत बाहेर काढून एका खड्ड्यात टाकतात आणि त्यावर त्या पशूचे रक्त ओततात. पशूच्या हृदयात एक शूल खुपसून ते हृदय शमित्र अग्नीवर भाजतात आणि ते **मनोता** देवतेला हवि म्हणून अर्पण करतात. हृदयाव्यतिरिक्त इतर अवयव एका (उखा नावाच्या) पात्रात घालून शिजवितात. त्या शिजत असलेल्या पदार्थातील भाग काढून त्यांच्या इंद्राग्नी आणि स्विष्टकृत् अग्नी ह्यांच्याकरिता आहुती देतात. पुरोडाश अर्पण करून उरलेल्या पदार्थांमधून काही अंश **इडा** म्हणून कापून काढून तो सर्व ऋत्विज भक्षण करतात. नंतर वपेच्या काही अंशाचे अग्नीमध्ये हवन करतात.

पशूच्या शेपटीच्या साहाय्याने **पत्नीसंयाजविधी** करण्यात येतो. शेपटीचे भाग पत्नीसंयाजमधील सर्वही देवतांना अर्पण करतात. शेपटीच्या निरनिराळ्या भागातून इडा कापून काढतात. उरलेली शेपटी यजमानपत्नीला देण्यात येते आणि ती ती अध्वर्यूच्या अथवा दुसऱ्या कोणा ब्राह्मणाच्या हातात देते. शमित्राला पशूचा स्कंध दिला जातो. तर शमित्र ब्राह्मण नसेल तर तो तो स्कंध एकाद्या ब्राह्मणाला देतो. ह्या कामाकरिता घेतलेला शूल जलाशयात बुडवून ठेवतात.

दर्शपूर्णमास यज्ञांप्रमाणेच पशुयागाची समाप्ती **संस्थाजपाने** होते.

काम्यपशवः ज्याप्रमाणे निरनिराळ्या कामनांची प्राप्ती व्हावी म्हणून निरनिराळ्या इष्टी करावयास सांगितलेल्या आहेत त्याप्रमाणे वैभव, ग्राम, वक्तृत्व इत्यादी गोष्टींच्या प्राप्तीकरता निरनिराळे पशुयज्ञ करावयाचे असतात. उदाहरणार्थ, वैभवाची इच्छा असणाऱ्यांने वायूला एक शुभ्र वर्णाचा पशु अर्पण करावा, एकाद्या ग्रामाची प्राप्ती व्हावी अशी इच्छा असणाऱ्याने वायुनियुतन्ला एका पशूचा बली द्यावा, ज्याला वक्तृत्वाची इच्छा असेल त्याने सरस्वतीला एका मेंढीचा बली द्यावा, असे तै. सं. (२·१·१·१) मध्ये सांगितले आहे. आश्वलायन श्रौ. (३·७) मध्ये अग्नी, सरस्वती, सोम, पूषन् बृहस्पती, विश्वेदेव, इंद्र, मरुत्, इंद्राग्नी, सविता आणि वरुण ह्या देवतांना उद्देशून करावयाच्या अकरा पशूच्या संयुक्त यज्ञामध्ये (ऐकादशिन् यज्ञामध्ये) म्हणावयाचे अनुवाक्या आणि याज्या मंत्र दिले आहेत, तसेच त्याच सूत्रात दुसऱ्या ठिकाणी (३·८·१) ह्याहून अधिक १८ पशुयज्ञांत म्हणावयाचे अनुवाक्या आणि याज्या मंत्र सांगितले आहेत.

ह्या सर्व पशुयज्ञांचे विधान निरूढ पशुबंधासारखेच असते.

———

अनुक्रमणिका

# प्रकरण ५७

## अग्निष्टोम

[अग्निष्टोमासंबंधी माहिती पुढील ग्रंथांत दिली आहे :– तै. सं. १·२–४, ३·१–३, ६·१–६; ७·१; तै. ब्रा. १·१·१, १·४·१ आणि ५–६, १·५·४, २·२-८; शत. ब्रा. ३–४, ऐत. ब्रा. १–१५, आपस्तं. १०–१३ आणि १४·८–१२, कात्या. ७–११, बौ. ६–१०, आश्व. ४–६, सत्याषाढ ७–९, लाट्यायन १–२.] (मू. ग्रं. पा. २-११३३-१२०३)

यज्ञांचे पुष्कळ वेळा **इष्टि, पशु,** आणि सोम असे विभाग पाडतात. त्यांपैकी सोमयागाचे **अग्निष्टोम, प्रत्यग्निष्टोम, उक्थ, षोडशिन, वाजपेय, अतिरात्र** आणि **अप्तोर्याम** असे सात प्रकार असतात. (गौ. ८·२१). सर्व सोमयागांचा अग्निष्टोम हा आदर्शभूत (प्रकृति असतो. ज्योतिष्टोम आणि अग्निष्टोम हे पुष्कळवेळा एकाच प्रकारचे असल्याचे मानण्यात येते. सोमयागाचे **एकाह** (एक दिवसात होणारे), **अहीन** (एकापेक्षा अधिक बारा दिवस चालणारे) आणि **सत्र** (बारापेक्षा अधिक दिवस चालणारे) असे विभाग करण्यात येतात.

ज्योतिष्टोमाला सामान्यतः पाच दिवस लागतात. त्या मुदतीत करावयाचे प्रमुख विधी पुढीलप्रमाणे असतात :

**पहिला दिवस :** ऋत्विजांची निवड करणे, मधुपर्क, दीक्षणीया इष्टि, यजमानाला दीक्षा देणे;

**दुसरा दिवस :** प्रायणीया (प्रारंभीची) इष्टि, सोमाची खरेदी, आतिथेया (सोमाच्या सत्कारार्थ) इष्टि, प्रवर्ग्य, उपसद (प्रातःकाळी आणि सायंकाळी अशी दिवसातून दोनदा उपासना);

**तिसरा दिवस :** पुन्हा दोन वेळा प्रवर्ग्य आणि उपसद;
**चौथा दिवस :** अग्निप्रणयन, हविर्धान प्रणयन, पशुयज्ञ;

**पाचवा दिवस :** (ह्याला सवनीय **सूत्य** अथवा **सवनीय** अशी संज्ञा आहे).

सोमाचा रस काढणे, त्याचे हवन आणि प्रातःकाळी, मध्याह्न आणि सायंकाळी सोमाचे प्राशन, उदयनीय (म्हणजे शेवटली) इष्टि, अवभृथ (संपूर्णानिमित्त करावयाचे शुद्धिकारक) स्नान.

ह्या यज्ञाला '**अग्निष्टोम**' नाव पडण्याचे कारण त्यात अग्नीची स्तुती केली आहे अथवा त्यातील शेवटचे स्तोत्र अग्नीला उद्देशून असते. हा यज्ञ प्रतिवर्षी वसंत ऋतमध्ये आणि अमावास्येला अथवा पौर्णिमेला करावयाचा असतो असे आपस्तंबप्रभृती सूत्रांत सांगितले आहे.

**ऋत्विजांची निवड.** यज्ञात आमंत्रकाचे काम करणाऱ्या मनुष्याला '**सोमप्रवाक**' असे म्हणतात. यज्ञ करू इच्छिणारा यजमान सोमप्रवाकाला ब्राह्मणांना आमंत्रण करण्यास पाठवितो. ह्या यज्ञाला १६ (अथवा सदस्यासहित १७) ऋत्विज लागतात आणि त्यातील चार प्रमुख ऋत्विज असतात. ऋत्विज म्हणून नेमावयाचे ब्राह्मण कसे असावेत ह्याविषयी निरनिराळे नियम ताण्ड्य ब्राह्मण (१·१·१) प्रभृति ग्रंथांत सांगितले आहेत. असे ब्राह्मण वेदविद्येत निष्णात असले पाहिजेत, ते अतिशय लहान नसावेत तसेच अतिवृद्ध नसावेत, त्यांचा आवाज स्पष्ट आणि मोठा असावा आणि त्यांच्या कोणत्याही अवयवात व्यंग नसावे.

अनुक्रमणिका

सोमप्रवाक चार प्रमुख ऋत्विजांना आमंत्रण करतो अथवा सर्वही १६ (अथवा १७) ऋत्विजांना आमंत्रण करतो.

**मधुपर्क**. ऋत्विज आले म्हणजे त्यांना मधुपर्क अर्पण करण्यात येतो. यज्ञकर्त्याजवळ जरी एकादी यज्ञभूमी पूर्वीच असली तरीही यजमान त्या देशाच्या राजाकडे जाऊन यज्ञभूमीची (**देवयजनाची**) याचना करतो. हे एक औपचारिक कृत्य असते, तथापि राजाला यज्ञ करावयाचा झाल्यास त्यालादेखील अशी याचना होतृ आणि इतर ऋत्विजांजवळ करावी लागते.

**दीक्षणीया इष्टि.** यज्ञ करावयाच्या जागेवर निरनिराळे मंडप आणि शाला (झोपड्या) उभारण्यात येतात. यज्ञमंडपाच्या आत एक वेदी तयार करतात आणि अरणीने मंथन करून अग्नी उत्पन्न करून त्याची स्थापना त्या वेदीवर करण्यात येते. नंतर दीक्षणीया इष्टि करण्यात येते. ह्या इष्टीच्या योगाने यज्ञ करणाऱ्या मनुष्यावर एक संस्कार घडतो आणि त्याला दीक्षित म्हणवून घेण्याची पात्रता येते म्हणून तिला दीक्षणीया इष्टि म्हणतात. दीक्षणीया इष्टीमध्ये सहा आहुती द्यावयाच्या असतात आणि ११ कपालांवर सिद्ध केलेला पुरोडाश अग्नि आणि विष्णु ह्या देवतांना अर्पण करण्यात येतो. पत्नीसंयाज आणि दुसऱ्या इडेचे भक्षण ही कृत्ये झाल्यावर ह्या इष्टीची समाप्ती होते.

**यजमानाला दीक्षा देणे**. ह्या विधीमध्ये यजमान आणि त्याची पत्नी ह्यांच्या कमरेसभोवती अंबाडी आणि मुंज गवत ह्यांची वळलेली एक **मेखला** गुंडाळण्यात येते. यजमानाला आपले अंग खाजविण्याकरिता एक कृष्णमृगाचे **शिंग** देण्यात येते आणि यजमानपत्नी आपले अंग खाजविण्याकरिता एकाद्या यज्ञीय वृक्षाची एक वीतभर लांबीची काडी घेते. यजमानाला दीक्षा दिल्याची घोषणा करण्यात येते. त्या घोषणेत अमुक ब्राह्मणाला दीक्षा दिली असल्याचे म्हणण्यात येते आणि यजमान क्षत्रिय अथवा वैश्य असला तरीही 'ह्या ब्राह्मणाला' दीक्षा दिली असल्याचीच घोषणा केली जाते. त्या वेळेपासून यजमान आणि त्याची पत्नी ह्यांना काही विशिष्ट नियम पालन करावे लागतात. इतरांना देखील दीक्षितांशी वागताना काही नियम पाळावे लागतात. सर्वही सूत्रांत असे सांगितले आहे की दीक्षा एका दिवसात समाप्त करू नये, तर ती १२ दिवस अथवा एक महिना अथवा एक वर्षपर्यंत चालू राहावी.

**प्रायणीया इष्टि.** ही इष्टि दीक्षेच्या (एक अथवा अधिक) दिवसानंतर येणाऱ्या दिवशी पहिल्याने करावयाची असते. ह्या इष्टीमध्ये दुधात शिजविलेला चरु अदितीला अर्पण करण्यात येतो आणि पथ्यास्वस्ति, अग्नि, सोम आणि सवितृ ह्या देवतांना उद्देशून अनुक्रमे पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर ह्या दिशांना चार आज्य आहुती अर्पण करण्यात येतात. अग्निस्विष्टकृत् ही सहावी देवता असते.

**सोमाची खरेदी.** सोमाला ब्राह्मणग्रंथात आणि सूत्रात 'राजन्' अशी संज्ञा दिली आहे, सोम एकाद्या कुत्स गोत्राच्या ब्राह्मणाकडून अथवा एकाद्या शूद्राकडून विकत घेतात. सोम विकणाऱ्याला त्यात मिसळलेल्या दुसऱ्या गवतप्रभृति वस्तु निवडून काढून टाकण्यास सांगण्यात येते. यज्ञमंडपाच्या बाहेर एक पिंगट वर्णाची कालवड उभी केलेली असते. ह्या कालवडीला '**सोमक्रयणी**' अशी संज्ञा आहे. ती कालवड दोन अथवा तीन वर्षांची असावी, ती अद्याप व्यालेली नसावी, तिला कोणतेही व्यंग नसावे. सोम एका चार चाकी गाडीत भरलेला असतो आणि त्या गाडीवर चटया वगैरे पदार्थांचे आच्छादन केलेले असते. नंतर सोम विकणारा आणि अध्वर्यु ह्यांच्या मध्ये सोमाच्या किंमतीबद्दल घासाघीस करण्याचे नाटक करण्यात येते. गाईची एक कला अथवा सोळावा हिस्सा अथवा गाईची एक तंगडी इतक्या किंमतीपासून सुरुवात करून

अखेरीला एक संपूर्ण गाय इतकी किंमत सागण्यात येते. एक सोन्याचे नाणेही सोम विकणाऱ्याला देऊ करण्यात येते. तो म्हणतो की सोम तुम्हाला विकला आहे परंतु दुसरे एकादे जनावर द्या. अध्वर्यु त्याला एक सोन्याचे नाणे, कापड, बकऱ्या, दुसरी एक गाय, एक गाय आणि एक बैल आणि आणखी तीन गाई असे देऊ करतो. सोम विकत घेऊन झाल्यावर तो सोन्याचा तुकडा आणि सोमक्रयणी गाय परत घेऊन तिच्याऐवजी दुसरी एक गाय सोम विकणाऱ्याला देण्यात येते आणि सोमक्रयणी गाय यजमानाच्या गुरांच्या कळपात पाठवून देतात. कोणाकोणाच्या मताप्रमाणे सोम विकणाऱ्याजवळून सोम बलात्काराने घेतल्याचा देखावा करण्याकरिता त्या विक्रेत्याला काठ्यांनी आणि मातीच्या डिखळांनी प्रहार करून हाकलून देण्यात येते.

**आतिथ्या इष्टि.** ही इष्टि सोम विकत घेतल्यानंतर त्याच्या सत्काराकरता करावयाची असते. ह्या इष्टीमध्ये विष्णु ही प्रमुख देवता असून त्या देवतेप्रीत्यर्थ नऊ कपालांवर सिद्ध केलेल्या पुरोडाशाची आहुती अर्पण करावयाची असते. दीक्षणीया इष्टीनंतरच्या सर्व इष्टींमध्ये अग्नी अन्वाधान नसते, व्रतग्रहण नसते, दाने नसतात, ब्रह्माऋत्विजाची नेमणूक करावी लागत नाही. अग्नी मंथन करून उत्पन्न करतात आणि पहिल्या इडेनंतर ही इष्टि समाप्त होते. ह्या इष्टीत केवळ पाच प्रयाज आहुती असतात आणि अनुयाज आहुती मुळीच नसतात. इडा भक्षण केल्यानंतर यजमान आणि ऋत्विज एकमेकांना पीडा न देण्याची प्रतिज्ञा तनून पात् (सर्व जीवांना साक्षी असणारा प्रबल सोसाट्याचा वारा) ह्याच्या नावाने करतात.

**प्रवर्ग्य आणि उपसद**. उपसद हा विधी प्रवर्ग्याच्या आधी केल्यासही चालतो असे आपस्तंब (११·२·५९) प्रभृति सूत्रांत म्हटले आहे. जर सोमाचा रस ५ व्या दिवशी काढावयाचा असला तर हे दोन्ही विधी निदान तीन दिवस (म्हणजे २, ३ आणि ४ ह्या दिवशी) प्रातःकाळी आणि अपराह्ण काळी असे दोनदा करण्यात येतात. प्रवर्ग्य हा एक गंभीर स्वरूपाचा स्वतंत्र विधी असून त्याच्या योगाने एका नवीन दिव्य देहाची प्राप्ती होते असे मानण्यात येते. हा विधी प्रत्येक अग्निष्टोम यागात करण्यात येतो असे नाही. शतपथ ब्रा. मध्ये असे सांगितले आहे की एकाद्या यजमानाने केलेल्या पहिल्या सोमयागामध्ये प्रवर्ग्य विधी करावयाचा नसतो आणि तो विधी प्रत्येक यजमानाच्या करिताही करावयाचा नसून केवळ सुप्रसिद्ध आणि वेदविद्येत पूर्ण निष्णात असणाऱ्या यजमानाकरिता करण्यात येतो. सोमाचा रस काढण्याच्या दिवसाच्या आदल्या दिवशी प्रवर्ग्य आणि उपसद हे दोन्ही विधी एकत्र रीतीने प्रातःकाळी करण्यात येतात.

एकावर एक अशी तीन भांडी ठेवल्यासारखे दिसणारे एक मातीचे पात्र असते. त्याला महावीर अशी संज्ञा असते. हे पात्र एक वीत उंचीचे असते. आणखीही दोन मातीची पात्रे असतात आणि त्यांनाही महावीर संज्ञा असते. ह्याशिवाय दोन पुरोडाश भाजण्याकरिता दोन 'रौहिण' संज्ञा असलेली वाटोळी ताटे असतात. रौहिणावर भाजलेले दोन पुरोडाश प्रातःकाळी आणि सायंकाळी अनुक्रमे दिवस आणि रात्र ह्यांना उद्देशून अग्नीमध्ये अर्पण करतात. महावीर पात्रांपैकी एक पात्र मातीच्या एका उंच ओट्यावर ठेवून त्याच्या सभोवती विस्तव पेटवितात. ते पात्र कढत झाले म्हणजे त्यात तूप ओततात. ते तूप उकळू लागल्यावर त्यात एका गाईचे दूध आणि पुरुषवत्स असलेल्या एका बकरीचे दूध टाकतात. अशा रीतीने मिसळलेल्या आणि महावीर पात्रात असलेल्या दुधाला '**धर्म**' अशी संज्ञा आहे. आणि त्याच्या आहुती अश्विनौ, वायु, (वसु, रुद्र आणि आदित्य ह्यांच्या सहित) इंद्र, सवितृ, बृहस्पती आणि यम ह्यांना अर्पण करण्यात येतात. उरलेले दूध यजमान प्राशन करतो (ऋत्विज त्याचा नुसता वास घेतात). महावीरपात्र उंच ओट्यावर ठेवतात त्या वेळेपासून कढत दुधाच्या आहुती देईपर्यंत होतृ ऋत्विज निरनिराळ्या प्रसंगी अनेक मंत्र म्हणत असतो आणि प्रस्तोतृ ऋत्विज सामगायन करीत असतो. ह्या सर्व समारंभाला '**प्रवर्ग्य**' अशी संज्ञा आहे. महावीर

संज्ञा असलेली दुसरी दोन पात्रे वस्त्राने आच्छादून सोम ठेवलेल्या घडवंचीच्या उत्तरेला आणि आहवनीय अग्नीच्या दक्षिणेला ठेवतात. त्यांच्यावर निरनिराळे संस्कार करावयाचे नसतात असे आपस्तंबाने सांगितले आहे.

कोणीही प्रवर्ग्यविधी केला म्हणजे त्याला एक वर्षभर काही विशिष्ट नियम पालन करावे लागतात. उदाहरणार्थ, त्याने मांसभक्षण करिता कामा नये, मातीच्या पात्रातून पाणी पिता कामा नये, शूद्र स्त्रीसमीप संभोगाकरता जाता कामा नये. ह्या विधीच्या दक्षिणेसंबंधी मतवैचित्र्य आहे.

**उपसद.** ही एक इष्टि असते. प्रणीताजल पुढे घेऊन जाण्याच्या कृत्यापासून त्या इष्टीचा प्रारंभ होतो. ह्या इष्टीमध्ये अग्नी, सोम आणि विष्णु ह्या देवतांना उद्देशून तुपाच्या आहुती देतात. ह्या आहुतींखेरीज दुसऱ्याही काही उपसद आहुती द्यावयाच्या असतात. उपसद इष्टि ह्या विशिष्ट प्रकारच्या (म्हणजे अपूर्व) इष्टि असतात आणि आदर्श इष्टीमधील जे जे भाग ह्या इष्टीमध्ये करावे असे वेदवचनात स्पष्टपणे सांगितले असेल तेवढेच भाग ह्या इष्टीमध्ये करावेत आणि बाकीचे भाग करू नयेत. उपसद इष्टीचा कार्यक्रम उपांशुयागासारखा असतो असे सत्याषाढसूत्रात (७·४ पा ६६६) सांगितले आहे.

**अग्निप्रणयन**. प्रवर्ग्याचे उद्वसन झाल्यानंतर आहवनीय अग्नीमधील अग्नी उत्तर वेदीपर्यंत घेऊन येण्याची क्रिया करण्यात येते. ह्या क्रियेला अग्निप्रणयन अशी संज्ञा आहे. सोमयागातील सर्व कृत्यांकरिता नाभीवरील अग्नी हा आहवनीय अग्नी बनतो आणि मूळचा आहवनीय अग्नी गार्हपत्य बनतो. (आप. श्रौ. ११·५·९।१०).

**हविर्धानप्रणयन.** (म्हणजे हविर्धान संज्ञा असलेल्या गाड्या घेऊन येण्याची क्रिया). अग्निशालेतून दोन गाड्या आणून त्या महावेदीमध्ये ठेवतात. ह्या गाड्यांना हविर्धान म्हणण्याचे कारण त्यांच्यावर (सोमयागात हवि असणारी) सोम वनस्पती ठेवावयाची असते. त्या गाड्यांवर नंतर गवताच्या चटयांचे अथवा बांबूच्या कांबींच्या तट्यांचे आच्छादन घालतात. त्या दोन गाड्यांच्या पुढच्या बाजूला आणि मागच्या बाजूला सहा सहा खांब पुरतात आणि त्या खांबावर दोन बांबू दक्षिणोत्तर ठेवून एक मंडप तयार करतात. ह्या मंडपाला **'हविर्धान मंडप'** असे म्हणतात. त्या गाड्यांच्या आसावर अनुक्रमे यजमानपत्नी आणि प्रतिप्रस्थातृ ऋत्विज निरनिराळे संस्कार करतात.

**पशुयज्ञ**. नंतर अग्नि आणि सोम ह्यांना (एकत्र रीतीने) अर्पण करावयाच्या पशुयज्ञाला प्रारंभ होतो. हा पशुयज्ञ मागे वर्णन केलेल्या निरूढ पशुबंधाच्या सारख्याच स्वरूपाचा असतो. परिस्तरण, यज्ञपात्रे मांडणे (पात्रासादन), प्रोक्षण ह्यांच्यासारखी निरनिराळी कृत्ये करण्यात येतात. यजमानपत्नीला तिच्या नेहमीच्या स्थानापासून (पत्नीशालेपासून) प्रतिप्रस्थातृ ऋत्विज (अथवा नेष्ट ऋत्विज) घेऊन येतो. सामान्यतः यजमानाच्याच घरात राहणाऱ्या त्याच्या निकट आप्तांना बोलावण्यात येते. निरूढ पशुबंधात आणि सोम पिळण्याच्या आधीच्या दिवशी करावयाच्या पशुयज्ञात काही थोड्या बाबतीत भेद असतात. अग्नीषोमीय पशुयज्ञात स्वरु अग्नीमध्ये अर्पण करण्यात येत नाही, तसेच त्या यज्ञात पशूची वपा भाजण्याकरिता घेतलेला शूळ टाकून देण्यात येत नाही, ह्या यागात प्रेष देणे आणि अनुवाक्या उच्चारणे ही दोन्ही कृत्ये मैत्रावरुण ऋत्विज करतो. अग्मीषोमीय विधीची समाप्ती पत्नीसंयाजाने होते असे सत्याषाढसूत्रात (७·८ पा ७५७) सांगितले आहे.

**सोमाचा रस काढणे.** सामान्यतः शेवटच्या दिवसाला **'सुत्या'** (म्हणजे सोमाचा रस काढावयाचा दिवस) अशी संज्ञा असते. आदल्या दिवशी केलेल्या अग्नीषोमीय पशुयज्ञाच्या धर्तीवर **सवनीय पशुयज्ञ** करण्यात येतो. सोमाच्या राशीमधील सोमाच्या काही काड्या काढून घे न त्या 'उपरा' वर ठेवतात, त्यावर थोडसे वसती वारी पाणी ओततात, त्या काड्या दगडांनी ठेचतात आणि सोमरस पिळून काढून तो एका पेल्यामध्ये भरतात आणि त्याची आहुती अर्पण करतात. ह्या पेल्याला **सोमग्रह** अशी संज्ञा आपस्तंब सूत्रात (१२·७·५।७) दिली आहे. निग्राभ्य जलाचा उपयोग करून सोमाचा रस काढून त्याने **उपांशुग्रह** हे पात्र भरतात आणि त्याच्या काही अंशाची अग्नीमध्ये आहुती देतात. त्यानंतर **महाभिषव** विधी (मोठा अथवा प्रमुख असा सोमरस काढण्याचा विधी) करण्यात येतो. सोमाच्या काड्यांपैकी बराचसा मोठा भाग प्रातःकाळी रस काढण्याकरिता घेतात आणि लहानसा भाग मध्याह्नकाळी रस काढण्याकरिता घेतात. उपर संज्ञा असलेला दगड अध्वर्यु अधिषवण चर्मावर ठेवतो, सोमाच्या काही काड्या त्याच्यावर ठेवतो, निग्राभ्य पाणी त्याच्यावर ओतले जाते, इतर ऋत्विज दुसरे काही दगड घेऊन त्यांनी सोमवल्ली ठेचतात. ह्या कृत्याला **रस काढण्याची पहिली पाळी** अथवा फेरी (**पर्याग**) असे म्हणतात. नंतर **दुसरी पाळी** अथवा फेरी करण्यात येते. पहिल्या फेरीच्या वेळी जे सोमवल्लीचे तुकडे इकडे तिकडे उडालेले असतील ते ह्या फेरीत गोळा करून पुन्हा कुटण्यात येतात. त्यानंतर **तिसरी फेरी** करण्यात येते. कुटलेले सोमवल्लीचे तुकडे गोळा करून **आधवनीय** संज्ञा असलेल्या कुंडात टाकतात. ह्या कुंडात अगोदरच पाणी असते. त्या कुंडातील सर्व पदार्थ चांगले ढवळतात, सोमवल्लीच्या काड्या धुतात, पिळतात आणि नंतर बाहेर काढून अधिषवण चर्मावर ठेवतात. दुसरे चार दगड ठेवून त्यावर सोमवल्लीचा तळाशी बसलेला घट्टभाग (ऋजीषा) ठेवतात. मोठी कुंडी (द्रोणकलश) आपल्या स्थानावरून उचलून त्या दगडावर ठेवतात. त्या कलशावर एक लोकरीचे गाळणे झाकण घालतात अथवा लाकडाच्या चौकटीत अथवा घडवंचीवर बसविलेली चाळण त्या कलशावर ठेवतात. नंतर आधवनीय कुंडीतील सोमरसाची धार लोकरीच्या गाळण्यावर धरण्यात येते आणि लोकरीच्या गाळण्यातून खाली गळणाऱ्या सोमरसाने निरनिराळे **चमस** (लाकडी पेले) भरण्यात येतात. द्रोणकलशात पडणाऱ्या सोमाला **शुक्र** अशी संज्ञा आहे. सोमरस भरलेल्या पेल्यांना ऐंद्र, वायव, मैत्रावरुण, शुक्र, मंथिन्, आग्रयण, उक्थ, ध्रुव अशी नावे असून ते पेले धारेखालून भरलेले असल्याकारणाने त्याना '**धाराग्रह**' असे म्हणतात. मैत्रावरुण आणि मंथिन्, पेल्यांमधील रसात अनुक्रमे दूध, जवसाचे पीठ मिसळतात. सोमाचा रस काढतेवेळी त्याचे थेंब इकडे तिकडे उडालेले असतात. असे थेंबही देवतांना पोचावे अशाकरिता आणि एक प्रकारचे प्रायश्चित्त म्हणून सोमाला उद्देशून एक आज्याची आहुती (तीनही सवनांत) देण्यात येते. त्यानंतर **सामगायन** करण्यात येते. निरनिराळ्या सवनांत निरनिराळ्या सूक्तांचे गायन करण्यात येते. प्रातःसवनाच्या वेळी म्हटलेल्या स्तोत्राला '**बहिष्पवमान**' असे म्हणतात, दुसऱ्या आणि तिसऱ्या वेळी रस काढताना म्हणावयाच्या स्तोत्रांना अनुक्रमे **'माध्यंदिन पवमान'** आणि '**आर्भव**' अथवा **'तृतीय पवमान'** अशी नावे आहेत. बाकीच्या स्तोत्रांना **'धुर्य'** अशी संज्ञा असते. बहुतेक सामगाने ऋग्वेदातून घेतलेली आहेत.

**सोमाचे हवन**. बहिष्पवमानसूक्ताचे गायन समाप्त झाले म्हणजे अध्वर्यु आग्नीध्र ऋत्विजाला अग्नी पेटविण्यास सांगतो आणि वेदीवर दर्भ पसरण्यास आणि पुरोडाश चढविण्यास सांगतो. तसेच प्रतिप्रस्थातृ ऋत्विजाला सवनीय पशु (म्हणजे सोमाचा रस काढण्याच्या दिवशी बलि द्यावयाचा पशु) घेऊन येण्यास सांगतो. आग्नीध्र ऋत्विज आग्नीध्रीय अग्नीमधील जळते निखारे आणून निरनिराळ्या **धिष्ण्यावर** (आसनांवर) विस्तव पेटवितो, कुश पसरतो आणि पुरोडाश चढवितो आणि नंतर आहवनीय, आग्नीध्रीय आणि मार्जालीय ह्या अग्नींमध्ये सोमाच्या आहुती देतो आणि इतर अग्नींमध्ये आज्याच्या आहुती देतो. त्यानंतर **सवनीय पशूचे** हवन करण्याचा विधी करण्यात येतो. **अग्निष्टोम** यागात सोमाचा रस काढण्याच्या

दिवशी अग्नीप्रीत्यर्थ एक बोकड बलि दिला जातो; **उक्थ्य** यागात अग्नी प्रीत्यर्थ द्यावयाच्या बोकडाखेरीज आणखी एक पशू इंद्र आणि अग्नि (ह्यांच्या) प्रीत्यर्थ बलि दिला जातो; **षोडशीन** यागात वरील दोघांच्या जोडीला तिसरा एक पशु (कात्यायनाच्या मताप्रमाणे मेंढा आणि आपस्तंबांच्या मताप्रमाणे बोकड) बलि दिला जातो आणि **अतिरात्र** यागात सरस्वतीप्रीत्यर्थ एक चौथा पशु (बोकड) बलि देण्यात येतो.

नंतर पात्रात भरलेल्या सोमाच्या आहुती इंद्र आणि वायु, मित्र आणि वरुण, आणि दोन अश्विनौ देवता ह्या जोड देवतांना अर्पण करण्यात येतात.

**सोमप्राशन.** सोमरसाचे हवन झाल्यानंतर निरनिराळे ऋत्विज आपआपल्या चमसातील सोम प्राशन करतात. ही सोमप्राशनाची पद्धती जराशी गुंतागुंतीची असते. उदाहरणार्थ होतृ ऋत्विज एकदा सर्वही चमसामधून सोमरस पितो आणि दोन वेळा आपल्या स्वतःच्या चमसातून पितो. मैत्रावरुण आणि इतर ऋत्विज आपआपल्या चमसातून दोनदा सोमरस प्राशन करतात. सोमरस प्राशन केल्यावर सर्व ऋत्विज 'आम्ही सोम प्राशन केले आहे आणि अमर झालो आहो.....' ह्या अर्थाचे मंत्र (ऋ ८·४८·३।४) म्हणून आपल्या मुखांना आणि हृदयांना स्पर्श करतात.

**प्रातःसवना**सारखाच कार्यक्रम **माध्यंदिन** आणि **सायंकाळच्या** सवनात करावयाचा असतो. काही काही बाबतीत थोडे थोडे भेद असतात. उदाहरणार्थ, माध्यंदिन सवनात **द्विदैवत्यग्रह** म्हणजे दोन दोन देवतांना अर्पण करावयाचे चमस नसतात. **ऋतुग्रह** म्हणजे निरनिराळ्या ऋतूंना उद्देशून अर्पण करावयाचे चमस नसतात; सायंकाळच्या सवनात प्रातःकाळी बलि दिलेल्या पशूच्या निरनिराळ्या अवयवांपासून तयार केलेला हवि अग्नीमध्ये अर्पण करण्यात येतो.

**अवभृथस्नान** म्हणजे शेवटी करावयाचे शुद्धिकारक स्नान करण्याचा विधी असतो. ह्या स्नानाचा कार्यक्रम ही एक इष्टी असते. तथापि जैमिनीने (१०·७·४७।५०) असे म्हटले आहे की अवभृथ हा एक विशेष प्रकारचा विधी असल्यामुळे दशपूर्णमास इष्टीमध्ये ज्या ज्या गोष्टी घडतात त्या सर्वही ह्या विधीमध्ये सर्वसाधारणपणे घडतातच असे नाही. एक समिध अग्नीवर ठेवण्यात येते. अग्नीच्या सभोवती कुश पसरतात म्हणजे परिस्तरण करतात. अवश्य लागणारी यज्ञपात्रे उपडी करून मांडण्यात येतात. इध्म आणीत नाहीत आणि कोणी कोणी वेदीदेखील तयार करीत नाहीत. पत्नीसंयाज नसतो. प्रणीता उदक नसते. यजमान औदुंबरी खांब त्याच्या खड्ड्यातून बाहेर काढतो. यजमान हरिणाचे कातडे चात्वाल खड्ड्यात टाकतो. अवभृथाकरिता निघताना आज्याच्या तीन आहुती देतो. अध्वर्यु प्रस्तोतृ ऋत्विजाला एका सामन्चे गायन करण्याची आज्ञा करतो. ह्यावेळी गायिलेल्या सामन्ला **'अवभृथसामन्'** अशी संज्ञा असते. सोमरसाच्या तळचा गाळ उदुंबराच्या खांदीसह पाण्यात टाकतात आणि त्यावर दही ओततात. सोमाने माखलेली सर्व पात्रे पाण्यात फेकून देतात. यजमानाची मेखला, आणि योक्त्र, त्याच्या पत्नीच्या मरतकावरील जाळी आणि तिचे हरणाचे कातडे ह्या वस्तु पाण्यात बुचकळण्यात येतात. यजमान पाण्याची प्रार्थना करून पाण्यात प्रवेश करतो. अशा स्नानाकरिता एकाद्या वाहत्या नदीचे खोल आणि शांत असणारे जल अधिक चांगले, तथापि त्याच्या अभावी कोणताही जलाशय चालतो. यजमान आणि त्याची पत्नी पाण्यात शिरून (बुडी न मारता) पाणी आपल्या डोक्यावर उडवितात; एकमेकांच्या पाठी चोळतात. मूठभर दर्भ पाण्यात फेकतात आणि अवभृथामध्ये द्यावयाच्या आहुतींकरता ह्या दर्भांचा आहवनीय अग्नीसारखा उपयोग करतात. पुरोडाशाची मुख्य आहुती पाण्यात देण्यात येते इतकेच नाही तर आघारासारख्या गौण आहुती देखील पाण्यात अर्पण करण्यात येतात. स्विष्टकृत् आहुती दिल्यानंतर अध्वर्यूच्या आज्ञेवरून उन्नेतृ

ऋत्विज सर्वांना पाण्याच्या बाहेर घेऊन येतो. ऋत्विज, यजमान आणि यजमानपत्नी आपल्या हातात एक एक उदुंबराची समिध घेऊन यज्ञभूमीकडे येतात आणि आपल्या हातातील समिधा आहवनीय अग्नीवर वाहतात.

**उदयनीया** (म्हणजे अखेरची) **इष्टि**. अवभृथस्नानानंतर ही इष्टी प्राग्वंशामध्ये करण्यात येते (मुद्दाम तयार केलेल्या उत्तरवेदीमध्ये करीत नाहीत). ह्या इष्टीचा कार्यक्रम प्रायणीया इष्टीसारखाच असतो. ज्या स्थालीमध्ये प्रायणीया आहुती शिजविली असते आणि ज्या स्थालीच्या बुंधाला काही अंश चिकटून राहिलेला असतो त्याच स्थालीमध्ये ह्या इष्टीमध्ये द्यावयाची आहुती घेतात. पत्नी आपल्या कमरेभोवती पुन्हा योक्त्र बांधत्ये. प्रायणीया आहुतीच्या वेळी जे मंत्र याज्या आणि अनुवाक्या असतात ते मंत्र ह्या इष्टीच्या वेळी अनुवाक्या आणि याज्या असतात आणि देवतांचा क्रम भिन्न असतो.

उदयनीया इष्टी समाप्त झाल्यावर एका वंध्या गाईचा मित्र आणि वरुण ह्यांच्या प्रीत्यर्थ बली द्यावयाचा विधी (**अनुबंध्या विधी**) करण्यात येतो आणि त्याचा कार्यक्रम निरूढ पशुबंधासारखा असतो. अनुबंध्या अर्पण केल्यानंतर **देविका** संज्ञा असलेल्या पाच आहुती देण्याचे कृत्य करण्यात येते. अग्नीचा अरणीमध्ये संग्रह करतात.

ह्यानंतर यज्ञभूमीचा त्याग करून यज्ञभूमीच्या उत्तरेला मंथन करून अग्नी पुन्हा उत्पन्न करतात, आणि **उद्वासनीया इष्टी** करण्यात येते. ह्या इष्टीमध्ये आठ कपालांवर अथवा पाच कपालांवर सिद्ध केलेला पुरोडाश अग्नीला अर्पण करण्यात येतो. एक बैल अथवा एक बैल विकत घ्यावयास लागेल इतके सोने ही ह्या इष्टीची दक्षिणा असते. ह्या इष्टीच्या ऐवजी कोणी कोणी बारा आज्याहुती देतात.

सोमयागात द्यावयाच्या **दक्षिणांसंबंधी** अनेक नियम सूत्रांत (आप. श्रौ. १३·५·१ ते १३·७·१५) सांगितले आहेत. यज्ञाकरिता ऋत्विजांना आमंत्रण करावयास सोमप्रवाक गेला म्हणजे ते ब्राह्मण त्याच्याजवळ उत्तम प्रकारची दक्षिणा मिळेल किंवा नाही ह्याविषयी पृच्छा करतात. शत० ब्रा. (४·३·४) मध्ये असे सांगितले आहे की शंभर गाईहून कमी दक्षिणेवर कोणाही ऋत्विजाने सोमयागात ऋत्विजाचे काम करू नये. आप. सूत्रात (१३·५.१।३) म्हटले आहे की दक्षिणा ७, २१, ६०, १००, ११२ अथवा १००० गुरे इतकी असावी अथवा अमर्याद असावी अथवा एकाद्याने आपल्या सर्वात मोठ्या पुत्राचा वाटा वगळून बाकीची आपली सर्व संपत्ती देखील दक्षिणा द्यावी आणि जर एकाद्याने एक सहस्र गुरे अथवा आपली सर्व संपत्ती दक्षिणा म्हणून दिली तर त्याने त्या गुरांच्या अथवा संपत्तीच्या जोडीला एक खेचरही दिले पाहिजे. ह्याप्रमाणेच दुसरेही काही पदार्थ दक्षिणा म्हणून देता येतात. आश्वलायनाने (५·१३·७) म्हटले आहे की, एकाद्याला आपल्या स्वतःच्या कन्येचा देखील दक्षिणा म्हणून एकाद्या ऋत्विजाशी दैवविधीने विवाह करून देता येतो. एकंदर दिलेल्या दक्षिणेची विभागणी निरनिराळ्या प्रमुख आणि इतर ऋत्विजांमध्ये कशी करावी ह्यासंबंधी अनेक नियम सांगितलेले आहेत.

**सामगायन.** सोमयागात निरनिराळ्या सवनात निरनिराळ्या सूक्तांचे सामगायन करावयाचे असते हे पूर्वी सांगितलेच आहे. म्हणून सामगायनासंबंधी थोडीशी माहिती पुढे दिली आहे. अग्निष्टोम यागामध्ये १२ **स्तोत्रे** आणि १२ **शस्त्रे** असतात. स्तोत्र आणि शस्त्र ह्या शब्दांचा धात्वर्थ 'स्तुति अथवा प्रशंसा' असा आहे. परंतु जी स्तुती सुरावर गायिली जाते तिला **स्तोत्र** असे म्हणतात आणि जी स्तुती नुसती उच्चारली जाते तिला **शस्त्र** असे म्हणतात. (जै. ७·२·१७ वरील शबरभाष्य) शस्त्रांचा नेहमी स्तोत्रांशी संबंध असतो आणि ते

स्तोत्रानंतर म्हटले जाते. निरनिराळ्या स्तोत्रांचे गायन निरनिराळ्या स्तोमांत करण्यात येते. **स्तोम** ह्याचा अर्थ ऋचांचा समूह आणि अशा समूहात सामान्यतः तीन ऋचा असतात. एकाद्या स्तोत्रगायनात किती ताना घ्यावयाच्या, त्या स्तोत्रातील ऋचांची संख्या किती असते आणि त्यांची रचना कशी करावयाची ह्या सर्व गोष्टी प्रस्तोतृ ऋत्विज दर्शित करतो. उदाहरणार्थ, पहिल्या आज्य स्तोत्रात (ऋ. ६·१६·१०·१२) तीन ऋचा असतात आणि ती संख्या वाढवून प्रत्येक पर्यायात पांच ऋचा असे तीन पर्याय मिळून १५ करण्यात येते. जर मूळच्या तीन ऋचांना आपण अ, आ, इ अशा संज्ञा दिल्या तर ह्या पंधरा ऋचा पुढील प्रमाणे होतील : अ, अ, अ, आ, इ (पहिला पर्याय); अ, आ, आ, आ, इ. (दुसरा पर्याय); आणि अ, आ, इ, इ, इ. (तिसरा पर्याय). पंचदश स्तोमाची ही पहिली विष्टुति झाली. दुसऱ्या विष्टुतीची रचना अ, अ, अ, आ, इ. (पहिला पर्याय); अ, आ, इ (दुसरा पर्याय); अ, आ, आ, आ, इ, इ, इ. (तिसरा पर्याय). तिसऱ्या विष्टुतीची रचना अ, आ, इ (पहिला पर्याय); अ, आ, आ, आ, इ (दुसरा पर्याय) आणि अ, अ, अ, आ, इ, इ, इ (तिसरा पर्याय) अशी होईल. **स्तोम** आणि **स्तोत्र** ह्या शब्दांचे अर्थ भिन्न भिन्न असतात. सामवेदातील गानामध्ये जे निरनिराळे राग दिले आहेत त्यांपैकी एकाद्या रागात बसवून काही विशिष्ट संख्या असलेल्या ऋचांचे जे गाणे तयार केलेले असते त्याला **स्तोत्र** अशी संज्ञा असते. सामगायन करताना 'हाइ', हाउ, इ, ऊ, हुं ह्यांच्यासारखे निरनिराळे शब्द उच्चारतात आणि ताना घेतात त्यांना '**स्तोभ**' असे म्हणतात. ज्या ऋचेचे गायन करावयाचे असते त्या ऋचेमधील शब्दांहून अधिक असणारी आणि त्या ऋचेतील वर्णापेक्षा भिन्न वर्ण असणारी जी अक्षरे घालण्यात येतात त्यांना '**स्तोभ**' म्हणतात. **सामन्** ह्या शब्दाचा अर्थ जरी 'गीत' अथवा गाणे असा असला तरी ते सामन् रागात बसविण्याकरिता आणि ते गाणे श्रुतिमनोहर बनविण्याकरिता स्तोभांची आवश्यकता असते. म्हणून स्तोभांचाही सामन् शब्दात अंतर्भाव होतो. (जै. २·१·३६; ९·२·३४।३८).

कोणत्याही एका शस्त्रासंबंधी जे मंत्र पठण करावयाचे असतात त्या सर्व मंत्रांत अनेक '**आहाव**' असतात आणि अनेक '**प्रतिगर**' असतात. 'शों ३ सावो ३ म्' (आपण दोघेजण प्रार्थना करू या) अशी हाक (**आहाव**) होतृ ऋत्विज अध्वर्यूला मारतो आणि 'शों ३ सामो दैव' असे प्रत्युत्तर (प्रतिगर) अध्वर्यु देतो.

एकाद्या ऋचेचे गाणे बनविताना त्या ऋचेमधील अक्षरांत फेरफार केले जातात. उदाहरणार्थ, 'अग्न आया हि वीतये' ह्या पदात आलेल्या 'अग्न' ह्या शब्दात गाण्यामध्ये 'ओग्नायि' असा बदल करण्यात येतो. तसेच त्या ऋचेचे विश्लेष, विकर्षण, अभ्यास, विराम, स्तोभ इत्यादी प्रकारही केले जातात. ऋग्वेदातील एकादी ऋचा म्हणताना तिच्यामधील उदात्त, अनुदात्त, आणि स्वरित अशा संज्ञा असणाऱ्या स्वरांकडे लक्ष द्यावे लागते. तीच ऋचा सामन् अशा स्वरूपात गाताना स्वरांबरोबरच ती कोणत्या सुरात म्हणावयाची ह्या गोष्टीकडेही लक्ष द्यावे लागते. ऋग्वेदातील ऋचेमधील स्वर दर्शित करताना जी पद्धती अवलंबण्यात येते तीच पद्धती तीच ऋचा सामवेदात समाविष्ट करिताना अवलंबित नाहीत. ऋग्वेदातील स्वरित सामवेदाच्या निरनिराळ्या हस्तलिखित प्रतींत निरनिराळ्या प्रकाराने दर्शित केलेला असतो. तथापि सामान्यतः त्या अक्षराच्या मस्तकावर २ हा अंक लिहून दर्शित केलेला असतो आणि एकाद्या उदात्त स्वराच्या पूर्वी येणारा अनुदात्त स्वर सामवेद संहितेमध्ये त्या अक्षरावर ३ हा अंक लिहून दर्शविला जातो आणि अनुदात्त स्वरामागून येणारा उदात्त स्वर त्या अक्षरावर १ चा अंक लिहून दर्शविला जातो. ह्यासंबंधी आणखीही सविस्तर नियम आहेत.

सामगायनातील **सूर** (अथवा **स्वर**) सात असतात. ते म्हणजे क्रुष्ट, प्रथम, द्वितीय, तृतीय, चतुर्थ, पंचम (अथवा मंद्र) आणि अंत्य (अथवा अतिस्वार्थ). (सामविधान ब्राह्मण १·१·८). नारदीय शिक्षा ह्या ग्रंथात सर्वप्रसिद्ध षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत आणि निषाद ह्या स्वरांचाही निर्देश केला

आहे. सामन् हे साध्या वीणावाद्याच्या स्वरांच्या साहाय्याने गाता येते, आणि आंगठा आणि हाताची बोटे ह्यांच्या हालचालींच्या साहाय्यानेही गाता येते. आधुनिक काळच्या सामगायकांना **प्राचीन नियमांची** आणि चिन्हांची सामान्यतः माहिती असत नाही आणि ते आपल्या गरूपासून जसे शिकले असतील त्याप्रमाणे गायन करतात. त्याप्रमाणेच ते जे गायन करतात ते गायन. अनेक हस्तलिखित प्रतींमध्ये दिलेल्या संकेतचिन्हांशी जुळत नाही. त्यांच्या गायनात एक प्रकारचा कंटाळवाणेपणा असतो आणि तेच तेच सूर पुन्हा पुन्हा येत असतात. ह्या गानांचे संपूर्ण संशोधन अद्यापी व्हावयाचे आहे आणि ह्या बाबतीत संपूर्ण भारतभर सामगायनाच्या ज्या पद्धती प्रचलित आहेत त्यांच्या ध्वनिमुद्रिका घेऊन त्यांचा संग्रह करणे आणि नंतर त्या पद्धतींची तुलना करणे ही गोष्ट प्रथम करणे अवश्य आहे. अशी भीती वाटते की आणखी एक दोन पिढ्या गेल्यावर, विद्वान सामगायक क्वचितच शिल्लक राहतील.

कोणत्याही स्तोत्रामधील प्रत्येक सामाचे पुढीलप्रमाणे पाच विभाग असतात : **प्रस्ताव** (हा भाग म्हणण्यापूर्वी सर्वही सामगायक ऋत्विज 'हूं' असा शब्द एकदम म्हणतात), **उद्‌गीथ, प्रतिहार, उपद्रव** आणि **निधन** (अंत्य भाग). हे पाच भाग अनुक्रमे प्रस्तोतृ, उद्‌गातृ, प्रतिहर्तृ; उद्‌गातृ आणि प्रस्तोसृ; उद्‌गातृ आणि प्रतिहर्तृ तीनही ऋत्विज मिळून गायन करतात. (लाट्या. श्रौ. ६·१०·१ वरील टीका).

**सोमयागाच्या उत्पत्तीसंबंधी उपपत्ती.** सोमयागाच्या उत्पत्तीसंबंधी प्रा. एग्लिंग, प्रा. कीथ प्रभृति अनेक युरोपीय विद्वानांनी कल्पक अशा उपपत्त्या सुचविल्या आहेत. त्या सर्व विद्वान आणि उद्योगी युरोपीय विद्वानांविषयी अत्यंत आदर प्रकट करून देखील असे म्हणणे प्राप्त आहे की त्यांनी मांडलेल्या निरनिराळ्या उपपत्तींपैकी एकीत देखील फारशी सत्यता दिसून येत नाही अथवा त्यांपैकी एकही बुद्धीला पटत नाही. सोमरसाचा सांप्रदाय हा निदान इंडो-इरानियन काळचा (म्हणजे जेव्हा भारतातील आणि इराणातील आर्य एकत्र होते त्याकाळचा) असावा आणि ह्या सांप्रदायाची उत्पत्ती कशी झाली ह्या विषयीचा निश्चयात्मक पुरावा प्राचीन भारतीय धर्मग्रंथात राहिलेला नाही. केवळ यज्ञसंस्था काय ती आपल्या दृष्टीसमोर आहे आणि त्याखेरीज बाकीच्या सर्व गोष्टी तर्कावर आणि कल्पनेवर आधारलेल्या आहेत. सोमवल्लीचा आणि चंद्राचा सबंध काय असावा हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. ऋग्वेदात एके ठिकाणी [यो अप्सुचन्द्रमा इव सोमश्चमूषु दृश्यते । ऋ. ८·८२·८] (ऋ. ८·८२·८) चंद्राला सोम म्हटले आहे. सामान्यतः चंद्राला ऋग्वेदामध्ये 'मास' अथवा 'चंद्रमस्' अशी संज्ञा दिलेली असते. अथर्ववेदात (११·६·७) असे म्हटले आहे की ज्या देवतेला लोक चंद्रमस् म्हणतात तो सोम आहे. अनेक ठिकाणी सोमाला 'इंदु' असे संबोधले आहे (आणि नंतरच्या काळात झालेल्या वाङ्‌मयात इंदु ह्याचा अर्थ निश्चयपूर्वक चंद्र असा असतो). सोम मूजवतावर वाढतो असे ऋग्वेदात एका ठिकाणी (१०·३४·१) म्हटले आहे. आणि तो सुषोमा नदीच्या काठी आर्जीकीय देशात वाढतो असे दुसऱ्या एका ठिकाणी (ऋ. ८·६४·११) वर्णन केले आहे. खुद्द ऋग्वेदामध्ये देखील सोम हा गूढ स्वरूपाचा झाला असल्याचे दिसून येते. सोम हा सुपर्णाने (म्हणजे गरुडाने अथवा एका पक्षाने?) स्वर्गातून आणल्याचे ऋग्वेदात एका ठिकाणी (९·८६·२४) म्हटले असून दुसऱ्या एका ठिकाणी (१·९३·६) तो श्येनाने (ससाण्याने) आणल्याचे वर्णन केले आहे. दुसरी एक लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे ब्राह्मणग्रंथांच्या काळात सोमवल्ली अप्राप्य नसली तरी निदान दुर्मिळ झाली होती. शत० ब्रा० (४·५·१०) मध्ये सोमाच्याऐवजी वापरावयाचे अनेक पर्याय सांगितले आहेत. त्यात पिवळी फुले असलेली फाल्गुन वनस्पती, दूब वनस्पती आणि हिरवट रंगाचे कुश ह्यांचा समावेश केला आहे. 'कोणाला सोम मिळू शकला नाही तर त्याने पूतिकांचा रस काढावा' असे ताण्ड्य ब्रा. मध्ये (९·५·३) सांगितले आहे. सोमवल्ली उपलब्ध नसल्यास पूतिका वल्लीचा आणि फाल्गुन वनस्पतीचा उपयोग करावा अथवा इतर वनस्पतीचा पूतिकांशी मिश्रण करून उपयोग करावा असे आश्व लायन गृ. सूत्रात (६·८·५।६) सांगितले असून त्या सूत्रावरील टीकेत अशा वनस्पतींमध्ये दूर्वा,

कुश ह्यांचा आणि ह्यांच्यासारख्या इतर वनस्पतींचा समावेश केला आहे. महाराष्ट्रात जेव्हा क्वचित्काळी सोमयाग करण्यात येतो त्यावेळी सोमाची प्रतिनिधी म्हणून जी वनस्पती घेतात तिला मराठीमध्ये 'रानशेर' असे म्हणतात आणि ती वनस्पती महाराष्ट्रात डोंगरावर उगवते.

———

**अनुक्रमणिका**

# प्रकरण ५८

# इतर सोमयाग

(मू. ग्रं. पा. २-१२०४-१२२३)

सूत्रग्रंथात सोमयागाचे सात प्रकार (संस्था) असल्याचे वर्णन केले आहे. (कात्या. १०·९·२७; आश्व. ६·११·१ इ०). हे सात प्रकार म्हणजे अग्निष्टोम, अत्याग्निष्टोम, उक्थ्य, षोडशीन, वाजपेय, अतिरात्र आणि अप्तोर्याम हे होत. त्यांच्यापैकी पहिल्या प्रकाराचे वर्णन मागील प्रकरणात दिले असून इतर प्रकारासंबंधी काही थोडेसे वर्णन ह्या प्रकरणात करावयाचे आहे. सर्वही सूत्रग्रंथांत सोमयागाची संस्था सारखीच दिलेली नसते.

## उक्थ्य

अथवा **उक्थ** [उक्थासंबंधी माहिती पुढील ग्रंथांत दिली आहे :– ऐत. ब्रा. १४·३, आश्व. ६·१·१–३, आपस्तंब १४·१, सत्या ९·७, इ०]. ह्या यागात सायंकाळच्या सवनात तीन अधिक स्त्रोत्रे आणि तीन अधिक शस्त्रे गायन आणि पठण करण्यात येतात. ह्यांना '**उक्थ स्त्रोत्रे**' आणि '**उक्थ शस्त्रे**' अशा संज्ञा आहेत. अशा रीतीने स्त्रोतांची आणि शस्त्रांची संख्या प्रत्येकी पंधरा होते. ज्यांना गुरे प्राप्त व्हावी अशी कामना असेल ते उक्थ्य याग करतात असे आपस्तंबाने (१४.१.२) म्हटले आहे. ह्या यागामध्ये अग्निष्टोमापेक्षा एक अधिक पशु (बकरा) इंद्र आणि अग्नि ह्यांच्या प्रीत्यर्थ सोमाचा रस काढावयाच्या दिवशी बली द्यावयाचा असतो.

## षोडशीन

[षोडशीन संबंधी अधिक माहिती पुढील ग्रंथांत दिली आहे :– ऐत. ब्रा. १६·१–४, आश्व. ६·२।३ आप. १४·२·३, सत्याषाढ ९·७. इ०]. ह्या यागात **षोडशीन** नावाचे एक अधिक स्त्रोत्र आणि एक अधिक शस्त्र तृतीय सवनात म्हणावयाची असतात. प्रातःकाळच्या अथवा कोणाच्या मताप्रमाणे सर्वही सवनात एक चमस अधिक असतो. ह्या यागात सोमवल्लीची खरेदी एक लाल रंगाची कमी उंचीची गाय देऊन करण्यात येते. इंद्राप्रीत्यर्थ एक अधिक पशू (मेंढा) बली देण्यात येतो. ह्या यागाची दक्षिणा एक पिंगट वर्णाचा घोडा अथवा एक खेचरी असते.

## अत्यग्निष्टोम

[अत्यग्निष्टोमासंबंधी माहिती पौ. ध. ग्रं. खं. ४१ पा १७ वर दिली आहे.]. अग्निष्टोमाच्या कार्यक्रमात षोडशीन स्तोत्र, षोडशीन चमस आणि इंद्राप्रीत्यर्थ बलि द्यावयाचा आणखी एक पशु, इतक्या गोष्टी मिळवून अत्यग्निष्टोम याग बनतो.

## अतिरात्र

[अतिरात्रासंबंधी माहिती ऐत. ब्रा. १४·३ आणि १६·५–७, आश्व. ६·४–५, सत्या. ९·७, आप. १४·३·८–१४·४·११, इ०.] हा याग एक दिवस आणि एक रात्र होऊन गेल्यानंतर पुरा होतो म्हणून ह्याला अतिरात्र असे म्हणतात. ह्यात २९

स्तोत्रे आणि २९ शस्त्रे असतात. ह्या यागात **आश्विन** नावाचे एक शस्त्र पठण करण्यात येते. त्याचा कार्यक्रम प्रातरनुवाकासारखाच असून त्यात किमान एक सहस्त्र ऋचा असाव्या लागतात आणि ते शस्त्र सूर्योदय होईपर्यंत पठण करावयाचे असते. सोमरस काढावयाच्या दिवशी एक चौथा पशु सरस्वतीला अर्पण करण्यात येतो. ह्या प्रकारच्या सोमयागाचा उल्लेख ऋग्वेदात केला आहे. (ऋ. ७·१०३·७).

## अप्तोर्याम

हा याग केल्याने कर्त्याला ज्या ज्या गोष्टींची इच्छा असेल त्या त्या गोष्टी प्राप्त होतात म्हणून ह्याला **अप्तोर्याम** असे म्हणतात. (ताण्ड्य ब्रा. २०·३·४।५). एकाद्याची गुरे जगत नसली अथवा त्याला चांगल्या जातीची गुरे प्राप्त व्हावी असे वाटत असेल तर त्याने अप्तोर्याम याग करावा असे (आश्व. ९·११·१ प्रभृती) निरनिराळ्या सूत्रांत सांगितले आहे. ह्या यागांत केवळ चार अधिक स्तोत्रे असतात ह्याची दक्षिणा एक सहस्त्राहून अधिक अथवा असंख्य गाई इतकी असते. होतृ ऋत्विजाला एक चांदीने मढविलेला आणि खेचऱ्या जोडलेला रथ मिळतो. (आश्वलायन ९·९·२२।२३). हा याग सामान्यतः दुसऱ्या कोणत्या तरी यागाच्या बरोबर करण्यात येतो.

## वायपेय

ह्या शब्दाचा धात्वर्थ अन्न आणि पेय, अथवा शक्तिवर्धक पेय अथवा त्वरा प्राप्त होणारे पेय असा आहे. [पानं वै पेयाः । अन्नं वाजः पानं वै पूर्वमेधान्नम् । तयोरुभयोराप्त्यै । शांखा. श्रौ. १५· १·४–६.] (शां. श्रौ. १५·१·४।६). हा याग जरी ज्योतिष्टोमाचाच एक प्रकार असल्याचे म्हटले जाते आणि जरी त्याचा कार्यक्रम षोडशीन यागासारखाच असतो, तरी ह्या यागामध्ये स्वतःच्या अशा इतक्या विशिष्ट गोष्टी असतात की त्याला स्वतंत्र यागच म्हणता येईल. ह्या यागामधील एक वैशिष्ट्य असे आहे की त्यात १७ ह्या संख्येचे प्राबल्य असते. उदाहरणार्थ, त्यात १७ स्तोत्रे आणि १७ शस्त्रे असतात, १७ पशूंचे बलिदान करण्यात येते, १७ प्रकारच्या वस्तु दक्षिणा म्हणून वाटण्यात येतात, यूपाची लांबी १७ अरत्नी असते. यूपाभोवती कापडाचे १७ तुकडे गुंडाळले जातात, हा याग १७ दिवस पर्यंत चालतो, त्यात १७ दीक्षा असतात, मद्याचे १७ चमस असतात, सोमाचे १७ चमस असतात, घोडे जोडलेले १७ रथ शर्यतीत असतात, १७ ढोल वाजविण्यात येतात. इ० इ०.

हा इतका बिकट असणारा याग ज्याला सार्वभौमत्वाची अथवा आधिपत्याची इच्छा असेल अथवा स्वाराज्य (इंद्रपद अथवा अनिर्बंध सत्ता) ह्यांची कामना असेल तो करीत असे. हा फक्त पर्जन्य काळातच केला जाई आणि तो वैश्याला करिता येत नसे. ब्राह्मणांच्या बाबतीत त्याचे ईप्सित फल अत्यंत विद्वत्ता अथवा संपन्नता प्राप्त होणे हे असे. रथाला जोडलेल्या घोड्यांना देवभाताच्या चरूचा वास घ्यावयाला लावतात. शर्यतीचे उद्दिष्ट स्थान एक उदुंबराचा खांब हे असते. यजमानाचा रथ सर्वात पुढे असतो आणि ऋत्विजांचे बाकीचे रथ मागाहून काही अंतरावर असतात. यूपाच्या बाजूला एक शिडी उभी करितात आणि त्या शिडीवरून यजमान यूपाच्या मस्तकापर्यंत चढतो आणि त्याचा यजमानपत्नीबरोबर दोघांनी स्वर्गात जाण्यासंबंधी संवाद होतो. त्यानंतर अध्वर्यु हा यजमान सम्राट (सार्वभौम अधिपती) झाला असल्याची घोषणा करतो. ही घोषणा तीन वेळा करण्यात येते. त्यानंतर त्याला शुभ्र वर्णाचे छत्र वापरण्याचा अधिकार प्राप्त होतो. त्याला क्षत्रियाप्रमाणे आचरण करिता येते (उदाहरणार्थ त्याला अध्ययन करता येते परंतु अध्यापन करिता येत नाही, दान देता येते परंतु दान स्वीकारता येत नाही). ह्या यागाच्या दक्षिणेसंबंधी

सूत्रग्रंथांत मतवैचित्र्य आहे. आश्वलायनाच्या (९·९·१४।१७) मताप्रमाणे १७०० गाई, घोडे जोडलेले १७ रथ, ज्यावर मनुष्ये बसतात असे १७ पशु, वाहनाच्या कामी उपयोगी पडणारे १७ बैल, सोन्याचे निष्क गळ्यात धारण केलेल्या १७ दासी, सोन्याचे पट्टे बांधलेले १७ हत्ती ही दक्षिणा असते. आश्वलायनाने (९·९·१९) असे सांगितले आहे की वाजपेय याग केल्यानंतर राजाने **राजसूय** यज्ञ करावा आणि ब्राह्मणाने **बृहस्पतिसव** करावा. आपस्तंबाने (१८·७·१५) वाजपेयानंतर **सौत्रामणि** याग करावा अशी शिफारस केली आहे.

अग्निष्टोम आणि वर सांगितलेले इतर याग **एकाह** याग असतात म्हणजे त्या यागांत सोमाचा रस एका दिवशी तीन वेळा हवन करण्यात येतो. तथापि आश्व. प्रभृती अनेक सूत्रांत बृहस्पतिसव, गोसव, श्येन, उद्भिद, विश्वजित्, व्रात्यस्तोम ह्यांच्यासारख्या अनेक एकाह सोमयागांचे उल्लेख केले आहेत.

ज्या यागांत सोमाचा रस काढण्याची कालमर्यादा १२ दिवस इतकी असते आणि ज्यांच्या अखेरीला नेहमी एक अतिरात्र याग करण्यात येतो आणि जे याग (दीक्षा आणि उपसद ह्यांचे दिवस धरून) एक महिन्यापेक्षा अधिक कालपर्यंत चालत नाहीत त्यांना **अहीन** याग असे म्हणतात. (शत. ब्रा. ४·५·४; आश्व. १०·१·११ प्रभृती). अशा यागांपैकी काही दोन दिवस, तीन दिवस, चार दिवस, पाच दिवस (ह्यांना पंचरात्र अशी संज्ञा आहे) अशा निरनिराळ्या कालपर्यंत चालणारे असून त्यांना निरनिराळी नावे आहेत. अहीन यागांपैकी विशेष उल्लेखनीय असे **अश्वमेध** आणि **द्वादशाह** हे आहेत. द्वादशाह याग अहीन असतो तसाच **सत्र** ही असतो आणि त्याचे **भरत द्वादशाह** ह्याच्यासारखे अनेक प्रकार असतात. अहीनद्वादशाह आणि सत्र स्वरूपाचा द्वादशाह ह्यांच्यामध्ये काही भेद असतात. उदाहरणार्थ, सत्रामध्ये सर्वच यजमान असतात आणि म्हणून सत्रामध्ये दक्षिणा नसतात; द्वादशाह सत्र फक्त ब्राह्मणानांच करिता येतो परंतु अहीन द्वादशाह त्रैवर्णिकांपैकी कोणालाही करिता येतो.

**राजसूय.** हा शुद्ध स्वरूपाचा सोमयाग नसून एक मोठा भानगडीचा आणि दीर्घकाल पर्यंत (दोन वर्षापेक्षा अधिक काळपर्यंत) चालणारा विधी असतो आणि त्यात अनेक इष्टींचा, सोमयागांचा आणि पशुयागांचा समावेश होतो. हा विधी केवळ क्षत्रियांनाच करता येत असे. काहींच्या मताप्रमाणे ज्याने वाजपेय याग केला असेल त्यालाच राजसूय यज्ञ करिता येतो. राजसूय केल्याने यज्ञ करणारा **राजा** होतो आणि वाजपेय केल्याने त्याला **सम्राटाचे** स्थान प्राप्त होते. राजाचे स्थान प्रथम प्राप्त होते आणि नंतर सम्राटाचे स्थान प्राप्त होते असे शत० ब्रा. (९·३·४·८) मध्ये म्हटले आहे.

फाल्गुन महिन्यातील प्रतिपदेला '**पवित्र**' संज्ञक सोमयागाची दीक्षा घेऊन राजसूय यागाच्या कार्यक्रमाला प्रारंभ होतो. त्यानंतर एक वर्षाने '**अभिषेचनीय**' नावाचा प्रमुख विधी केला जातो. त्यानंतर फाल्गुनी पौर्णिमेला अनुमतीप्रीत्यर्थ एक इष्टी असते. फाल्गुनी पौर्णिमेला **चातुर्मास्य** यागांना प्रारंभ करण्यात येऊन प्रथमतः **वैश्वदेव** इष्टि होते. त्यानंतर क्रमाने **वरुण प्रघास** प्रभृती चातुर्मास्ययागातील निरनिराळ्या इष्टी चार महिन्यांच्या अवधीने केल्या जातात. निरनिराळ्या पर्वाच्या दरम्यानच्या काळात प्रत्येक महिन्यात पौर्णिमेला **पूर्णमासइष्टि** आणि अमावास्येला **दर्शइष्टि** करण्यात येतात आणि शेवटी फाल्गुन शुद्ध प्रतिपदेला **शुनासीरीय** पर्व केले जाते. त्यानंतर '**पंचवातीया**' सारखे अनेक विधी करण्यात येतात. त्यानंतर '**रत्नीनांहवींषि**' ह्या नावाच्या बारा आहुती (राजा, राणी, राजकीय अधिकारी अशा) निरनिराळ्या 'रत्नीन्' [कात्यायनाच्या मताप्रमाणे १२ रत्नी अधिकाऱ्यांची नावे :— (१) यजमान, (२) सेनापति, (३) पुरोहित, (४) अभिषिक्त राणी, (५) सूत, (६) ग्रामणी (खेडेगावांचा प्रमुख), (७) क्षत्ता, (८) संग्रहितृ (कोशाध्यक्ष अथवा रथी, (९) अक्षवाप (द्यूताधिकारी), (१०) गोविकर्त (शिकारी, ?) (११) दूत अथवा पालागल, (१२) परिवृक्ति (त्याग केलेली राणी).] संज्ञा असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या घरी बारा दिवस देण्यात येतात. **अभिषेचनीय** हा राजसूयामधील मध्यवर्ती विधीनंतर करण्यात येतो. ह्या विधीचा कार्यक्रम

उक्थ्यासारखा असतो. उदुंबराच्या लाकडाच्या १७ पात्रांत भरून सतरा प्रकारची जले आणण्यात येतात आणि त्यांचा अभिषेक राजावर करण्यात येतो. त्यानंतर गाई लुटून आणण्याकरिता एक प्रतीकात्मक स्वारी करण्यात येते. यजमानाच्या हिताकरिता त्याला होतृ ऋत्विज शुनःशेपाची कथा सांगतो. नंतर खदिराच्या लाकडाच्या एका मंचकावर अथवा सिंहासनावर राजा बसतो, ऋत्विज आणि 'रत्नीन्' त्याच्या सभोवती आसनांवर बसतात. नंतर '**द्यूतक्रीडेचा**' समारंभ केला जातो. ह्या खेळात अशी योजना केलेली असते की सर्वात चांगले दान पडेल ते राजाकडे द्यावे आणि अत्यंत वाईट दान पडेल ते राजाच्या नातलगांकडे द्यावे. अभिषेचनीय विधीनंतर '**संस्पृपांहवींषि**' संज्ञा असणाऱ्या आहुती सवितृ प्रभृति देवतांना सतत दहा दिवस देण्यात येतात. त्यानंतर '**दशपेय**' हा विधी करण्यात येतो. ह्या विधीमध्ये सोमरसाने भरलेल्या दहा चमसांपैकी प्रत्येक चमस दहा ब्राह्मण प्राशन करतात. त्यानंतर एक वर्षानंतर '**केशवपनीय**' विधी करण्यात येतो. त्यानंतर **व्युष्टि द्विरात्र** नावाचे दोन विधी केले जातात. त्यापैकी एक अग्निष्टोम असतो आणि दुसरा अतिरात्र असतो. त्यानंतर **'क्षत्रधृति'** विधी होतो. तो अग्निष्टोमासारखा असतो. नंतर उद्वासनीया इष्टीच्या ऐवजी '**त्रैधतवी**' इष्टी केली जाते आणि त्याबरोबर राजसूयाची **समाप्ती** होते. तथापि त्यानंतर एक महिन्याचे '**सौत्रामणि**' इष्टी करण्यात येते.

राजसूयामधील बऱ्याच विधींच्या दक्षिणा सांगितल्या आहेत. उदाहरणार्थ, अभिषेचनीय विधीच्या वेळी निरनिराळ्या ऋत्विजांना दक्षिणा म्हणून द्यावयाच्या गाईंची बेरीज दोन लक्ष चाळीस सहस्त्र इतकी प्रचंड होते. [राजसूय यज्ञासंबंधी माहिती खालील ग्रंथांत दिली आहे :— तै. सं. १ ८·१—१७, तै. ब्रा. १·४·९.—१०, शत. ब्रा. ५·२·३—५, ऐत. ब्रा. ७·१३ आणि ८, ताण्ड्य ब्रा. १८-८—११, आप. १८-८—२२ कात्या. १५· १—९, आश्वला. ९. ३—४, लाट्या. ९· १—३, शांख्या. १५·१२ प्रभृति, बौ. १२ इ०, पौ. घ. ग्रं. खं. ४१ पा २४, खं ४४ पा १५ इ.]

——————

अनुक्रमणिका

# प्रकरण ५९

## सौत्रामणी आणि इतर यज्ञ

(मू. ग्रं. पा. २-१२२४-१२५५)

### सौत्रामणी

[सौत्रामणी यागासंबंधी माहिती पुढील ग्रंथांत दिली आहे :— तै. सं. १·८·२, वाजस. सं. १९ आणि २०, तै. ब्रा. १·४·२, १·८, ५—६, २·६—७, शत. ब्रा. ५·५·४—५, १२·७—८, आश्वला. ३-९, शांख्या. १५·१५, लाट्या. ५·४·११ प्रभृ, कात्या. १५· ९—१०, १९. आप. १९-१—१० इत्यादि.] गौतमाच्या (८.२०) मताप्रमाणे सौत्रामणी ह्या विधीचा सात हविर्यज्ञांमध्ये समावेश होतो. ह्या यागाचे विशिष्ट मुख्य लक्षण म्हणजे त्यात सुरा (मद्य) अर्पण करावयाची असते हे होय. आधुनिक काळी सौत्रामणी यागामध्ये सुरेच्या ऐवजी दूध अर्पण करतात. ह्या विधीचे **कौकिली** आणि **चरक-सौत्रामणी** (अथवा **सामान्य सौत्रामणी**) असे दोन प्रकार असतात. कौकिली सौत्रामणी हा एक स्वतंत्र विधी असतो परंतु सामान्य सौत्रामणी हा राजसूयानंतर (एक महिन्यांने) आणि अग्निचयनानंतर (यज्ञवेदी बांधण्याच्या कृत्याच्या अंती) करण्यात येतो. कौकिली सौत्रामणी यागातच फक्त सामगायन करण्यात येते. सामान्य सौत्रामणी यागाचा कार्यक्रम निरूढ पशुबंधासारखा असतो आणि कौकिली सौत्रामणी यागातदेखील तसाच कार्यक्रम असतो. ह्या यागात दोन अग्नी आणि वेदी असतात. ह्या विधीला चार दिवस लागतात. पहिल्या तीन दिवसांत निरनिराळ्या पदार्थांपासून सुरा तयार करण्यात येते आणि शेवटच्या दिवशी दुधाचे तीन चमस आणि सुरेचे तीन चमस अश्विनौदेव, सरस्वती आणि इंद्र ह्या देवतांना अर्पण करण्यात येतात. त्याचप्रमाणे त्या देवतांना उद्देशून अनुक्रमे एक बकरा, एक मेंढी आणि एक बैल ह्या पशूंचे बलिदान करण्यात येते.

सुरा कशी तयार करावी ह्याबद्दलची वर्णने (शत. ब्रा. ५·५·४; कात्या. १५·९·२८।३० प्रभृती) ग्रंथांत दिली आहेत. साळीचे मोड आलेले आणि मोड न आलेले धान्य, अथवा भाताच्या लाह्या आणि जवसाच्या अथवा श्यामाकाच्या लाह्या ह्यांच्यापासून सुरा तयार करावयाची असते. साळीचे दाणे पाण्यात शिजवितात आणि जवांच्या लाह्यांचे पीठ करून ते पाण्यात उकळतात. ते पाणी आणि त्यावर आलेली मळी लोकरीच्या कपड्यातून गाळतात. त्या मिश्रणात सिंहाचे, लांडग्याचे आणि वाघाचे केस टाकतात. तसेच हरडा, सुंठ, जायफळ ह्यांच्यासारख्या वनस्पतिजन्य पदार्थांची पूड करून पुष्कळ पाण्यात उकळण्यात येते. शिजविलेल्या साळीच्या पात्रावर आणि उकळलेल्या जवसाच्या पिठाच्या पात्रावर आलेली मलई दोन पात्रात काढून घेऊन त्यात हे हरडा आदी पदार्थ उकळलेले मिश्रण ओतण्यात येते. ह्या मिश्रणाला **मासर** अशी संज्ञा आहे. हे मिश्रण एका मोठ्या कुंभीमध्ये (बरणीत) घालून ती कुंभी एका खड्ड्यामध्ये तीन दिवस ठेवण्यात येते. शिजलेले साळीचे दाणे आणि जवस हे पदार्थही त्या मिश्रणात टाकतात. पहिल्या दिवशी एका गाईचे दूध ह्या बरणीत ओततात आणि भाताच्या लाह्यांची पूडही त्यात टाकतात. दुसऱ्या दिवशी दोन गाईंचे दूध त्या बरणीत ओततात आणि जवाच्या लाह्यांची (तोक्याची) पूड टाकतात. तिसऱ्या दिवशी तीन गाईंचे दूध त्या बरणीत ओततात आणि भाताच्या लाह्यांची पूड टाकतात. नंतर ते मिश्रण बांबूच्या चाळणीतून गाळून घेतात. अशा रीतीने तयार केलेल्या सुरेमध्ये कुवल, कर्कन्धु आणि बदर ह्या फळांची पूड टाकतात आणि त्या सुरेचे दक्षिणाग्नीमध्ये हवन करतात. हवन करून अवशिष्ट राहिलेली सुरा ऋत्विज प्राशन करीत नाहीत तर ते फक्त तिचा वास घेतात. (ह्या कृत्याला **प्राणभक्ष** अशी संज्ञा आहे). ती अवशिष्ट राहिलेली सुरा एक मुद्दाम पैसे देऊन आणलेला ब्राह्मण प्राशन करतो अथवा ती मुग्यांच्या वारुळावर ओततात. ह्यावरून

असे अनुमान होते की, सौत्रामणी हा विधी असुरांमध्ये (आर्येतर लोकात अथवा भिन्न पंथाच्या आर्यांत) प्रचलित असावा आणि त्यात योग्य ते फेरफार करून वैदिक आर्यांनी त्या विधीचा स्वीकार केला असावा. तथापि त्या काळी देखील ऋत्विजांनी सुरा प्राशन करणे हे कृत्य निषेधार्ह मानले जात असे.

हा विधी राजसूय यज्ञाच्या अंती अथवा अग्निचयनाच्या अंती करण्यात येई अथवा अतिरिक्त सोम प्राशन केल्यामुळे ज्याला जुलाब होऊ लागले असतील अथवा सोमाची वांती होत असेल अथवा ज्याच्या मुखाव्यतिरिक्त अन्य द्वारातून सोम वाहू लागला असेल अशा व्यक्तीकरिता करण्यात येत असे. स्वतंत्र (म्हणजे कौकिली) सौत्रामणी याग ऐश्वर्याची इच्छा असणारा ब्राह्मण अथवा स्वतःच्या राज्यातून घालवून दिलेला राजा अथवा ज्याच्याजवळ गुरे नाहीत असा मनुष्य करीत असे. ह्या विधीत सोमयागाप्रमाणेच **सर्वप्रायश्चित्तार्थ स्नान** असते. ह्या विधीच्या आरंभी आणि अंती अदितीप्रीत्यर्थ चरूची आहुती द्यावयाची असते. त्यानंतर मित्र आणि वरुण ह्यांना उद्देशून आमिक्षाची आहुती देण्यात येते आणि इंद्र वयोधः ह्या देवतेप्रीत्यर्थ एक पशुबलि देण्यात येतो. सौत्रामणीयागाचा सर्वसामान्य कार्यक्रम सोमयागासारखा नसून दर्शपूर्णमास इष्टिसारखा असतो असे जैमिनीने (८·२·१।९) प्रतिपादन केले आहे.

## अश्वमेधयज्ञ

[अश्वमेधासंबंधी माहिती खालील ग्रंथांत दिली आहे :– तै. सं. ४·६·६–९, ४·७·१५, ५.१–६, ७. १–५, तै. ब्रा. ३· ८–९, शत. ब्रा. १३·१–५, आप. २०·१–२३, कात्या. १४, आश्वला. १०, ६–१०, सत्या. २०, लाट्या. ९· ९–११, बौ १५, इ०] हा अत्यंत प्राचीन असणाऱ्या यज्ञांपैकी एक यज्ञ आहे. ह्याचा उल्लेख ऋग्वेदात (१·१६२ आणि १६३) केला आहे. ह्या यज्ञात बली दिलेला घोडा स्वर्गात जातो अशी श्रद्धा होती. ह्या विधीचे वर्णन शत. ब्रा. (१३·१।५) आणि तै. ब्रा. (३·८।९) ह्या ग्रंथात केले आहे. तै. ब्रा. मध्ये राष्ट्र आणि अश्वमेध एकच असल्याचे म्हटले आहे. (आश्व. श्रौ. १०·८·१ इत्यादी) सूत्रग्रंथांत असे सांगितले आहे की अश्वमेध याग हा तीन दिवस चालणारा 'अहीन' याग असून तो एकाद्या राजाने करावयाचा असे. आश्व. श्रौ. (१०, ६·१) मध्ये म्हटले आहे की ज्याला सर्व कामना पूर्ण व्हाव्या अशी इच्छा असेल, ज्याला स्वतःच्या इंद्रियांवर आणि सर्वांवर विजय संपादन करण्याची इच्छा असेल आणि सर्व ऐश्वर्य प्राप्त करून घेण्याची इच्छा असेल त्याने अश्वमेध यज्ञ करावा.

ह्या यज्ञाचा प्रारंभ फाल्गुन शु० ८ अथवा ९ ला अथवा ज्येष्ठ अथवा आषाढ महिन्यातील त्याच तिथींना अथवा चैत्र पौर्णिमेला करावा अशी भिन्न भिन्न मते निरनिराळ्या सूत्रग्रंथांत दिली आहेत. राजाच्या चार राण्या आणि राजकन्या आपल्या परिवारांसह राजाच्या समीप येतात आणि ते सर्व अग्निशाळेत प्रवेश करतात. त्या यागात सोडावयाचा घोडा संपूर्णपणे शुभ्रवर्णाचा असून त्याच्या अंगावर वाटोळे काळे ठिपके असावेत आणि तो अतिशय चपल असावा अथवा त्याची पुढची बाजू कृष्णवर्ण असून बाकीचे सर्व शरीर शुभ्र वर्णाचे असावे अथवा त्याच्या मस्तकावरील केसाची एक बट गडद काळ्या वर्णाची असावी. त्या घोड्यावर काही विशिष्ट संस्कार केल्यावर यजमान त्या घोड्याच्या उजव्या कानात घोड्याची अनेक नावे उच्चारतो आणि नंतर त्या घोड्याच्या संरक्षणाकरिता चारशे संरक्षक बरोबर देऊन आणि त्या घोड्यांचे संरक्षण करण्याबद्दल सर्व दिशांच्या स्वामींची प्रार्थना करून त्या घोड्याला सर्व देशभर फिरण्याकरिता मोकळा सोडतात. एक वर्षभर त्या घोड्याला स्वेच्छेने वाटेल तिकडे भटकू देतात आणि त्याला परत वळू देत नाहीत. घोडा बाहेर असेपर्यंतच्या अवधीत प्रतिदिवशी सवितृ देवतेला उद्देशून प्रातःकाळी, माध्याह्नकाळी आणि सायंकाळी तीन इष्टी करण्यात येतात. इष्टीनंतर एक ब्राह्मण आणि एक क्षत्रिय वीणा घेऊन राजाची प्रशंसा असलेल्या तीन गाथांचे गायन करतात. होतृ ऋत्विज '**पारिप्लव**' संज्ञा असलेल्या कथा राजाला

कथन करतो. अशा रीतीने राजा यज्ञ करण्यात आणि पारिप्लव कथा ऐकण्यात गुंतला असल्यामुळे अश्वमेध पुरा होईपर्यंत अध्वर्यु हा राजा बनतो आणि राजा तशी घोषणा करतो. दहा दिवसपर्यंत एकामागून एक अशा निरनिराळ्या विशिष्ट ग्रंथांचे पठण करण्यात येते. एक वर्षपर्यंत प्रतिदिवशी सायंकाळी 'धृती' संज्ञा असणाऱ्या चार आहुती देण्यात येतात. अशा रीतीने सावित्री इष्टी, गायन, पारिप्लवाचे श्रवण आणि धृतिसंज्ञक आहुती देणे ह्या गोष्टी वर्षभर चालतात. होतृ ऋत्विज आणि अध्वर्यु ह्यांना तसेच गवयांना मोठमोठ्या दक्षिणा दिल्या जातात.

जर तो घोडा मरण पावला तर अनेक शांतिकारक विधी करावे लागतात. जर तो घोडा शत्रूने हरण करून नेला तर यज्ञाचा नाश होतो. एक वर्षाचे अखेरीला तो घोडा परत तबेल्यामध्ये आणण्यात येतो आणि यजमान दीक्षा धारण करतो. ह्या यज्ञामध्ये १२ दीक्षा, १२ उपसद आणि ३ सूत्य (सोमाचा रस काढण्याचे) दिवस असतात. २१ अरत्नी उंचीचे २१ यूप असतात; त्यांना अनेक पशु बांधण्यात येतात आणि त्यांचे बलिदान करण्यात येते. डुकरासारखे वन्य पशु आणि पक्षी देखील बांधून यूपांच्या मध्यंतरच्या जागात धरून ठेवण्यात येतात आणि त्यांच्यापैकी काही पशू त्यांच्या सभोवती अग्नी फिरविल्यानंतर सोडून देण्यात येतात. सोमरस काढण्याच्या तीन दिवसांपैकी दुसरा दिवस सर्वांत महत्त्वाचा असतो आणि त्या दिवशी (अश्लील संवाद, ब्रह्मोद्य ह्यांच्यासारखी) अनेक चमत्कारिक कृत्ये केली जातात.

बलि द्यावयाचा घोडा दुसऱ्या तीन घोड्यांसह एका रथाला जोडण्यात येऊन तो रथ एकाद्या सरोवराकडे अथवा जलाशयाकडे नेण्यात येतो. घोडा यज्ञशालेत परत आला म्हणजे पट्टाभिषिक्त राणी, वावाता (म्हणजे आवडती) राणी आणि परिवृक्ती (म्हणजे टाकून दिलेली) राणी ह्या घोड्याच्या निरनिराळ्या अंगांना तूप लावतात. यूपाच्या जवळ होतृ आणि ब्रह्मा ऋत्विज ह्यांच्यामध्ये काही विशिष्ट प्रश्नोत्तरे होतात. नंतर घोड्याची स्तुती करण्यात येते आणि गवतावर एक वस्त्र पसरून त्यावर त्या घोड्याचा वध करण्यात येतो. घोड्याचा वध झाल्यावर राण्या त्या घोड्याच्या सभोवती तीन फेऱ्या घालतात आणि आपल्या वस्त्रांनी त्याला वारा घालतात. नंतर अभिषिक्त राणी मृत घोड्याच्या बाजूला शयन करते आणि ज्या वस्त्रावर घोडा पडलेला असतो ते वस्त्र राणी आणि तो घोडा ह्यांच्यावर घालण्यात येते आणि ती त्या घोड्याशी समागनम करते. नंतर होतृ ऋत्विज वेदीच्या बाहेर उभा राहून त्या अभिषिक्त राणीची अश्लील शब्दांनी निंदा करतो. ती राणी आणि तिच्याबरोबर असलेल्या १०० राजकन्या होतृ ऋत्विजाला अश्लील शब्दात उत्तर करतात. अशाच प्रकारचा संवाद चार प्रमुख ऋत्विज आणि त्या राण्या आणि त्यांच्या बरोबरच्या तरुण दासी ह्यांच्यामध्ये होतो. (हा संवाद वाज. सं. २३·२२।३१ मध्ये दिला आहे). अभिषिक्त राणीच्या बरोबरच्या राजकन्या त्या राणीला घोड्याजवळून उठवितात. नंतर तीन राण्या सोने प्रभृती तीन धातूंच्या सुया घेऊन त्या घोड्याला टोचून त्याची वपा काढून घेतात. त्या घोड्याचे रक्तही शिजविण्यात येऊन त्याची स्विष्टकृत् देवतेला उद्देशून आहुती देण्यात येते. प्रजापतीप्रीत्यर्थ बलि दिलेल्या पशूच्या वपेची आहुती देण्यापूर्वी सदसमध्ये बसलेल्या ऋत्विजांमध्ये **ब्रह्माद्य** (धर्मसंबंधी) संवाद होतो. त्यात अनेक गूढार्थ असलेले प्रश्न विचारण्यात येतात आणि त्यांची उत्तरे देण्यात येतात. त्यानंतर सर्व पशूंच्या वपेच्या आहुती निरनिराळ्या देवतांप्रीत्यर्थ अर्पण करण्यात येतात. मधु, माधव प्रभृती बारा महिन्यांना आणि वसंतादी ऋतूंना उद्देशून आहुती देण्यात येतात.

सोमाचा रस पिळण्याच्या तिसऱ्या दिवशी निरनिराळ्या आहुती दिल्यानंतर यजमान **अवभृथस्नान** करतो. अवभृथाच्या शेवटी एका टक्कल पडलेल्या, घाऱ्या डोळ्याच्या, दात पुढे आलेल्या, श्वेतकुष्ट झालेल्या आणि पाण्यात बुडी मारलेल्या मनुष्याच्या मस्तकावर 'जुंबकाय स्वाहा' म्हणून एक आहुती देतात.

अनुक्रमणिका

ही आहुती अश्वमेध यज्ञातील शेवटली आहुती असते. ‘जुंबक’ ह्याचा अर्थ वरुण असा असतो. त्या मनुष्याला शंभर गाई आणि बैल जोडलेली एक गाडी देण्यात येते. अवभृथस्नानानंतर यजमान पाण्यातून बाहेर पडला म्हणजे त्या पाण्यात ब्रह्महत्येसारखी घोर पातके केलेले लोक बुडी मारतात आणि अशा पातकांकरिता शास्त्रात सांगितलेली प्रायश्चित्ते न करताही त्याची शुद्धी होते. (कात्या. २०·८·१७।१८).

अश्वमेध यज्ञातील निरनिराळ्या गौण कृत्यांबद्दल निरनिराळ्या **दक्षिणा** द्यावयास सांगितले आहे. उदाहरणार्थ, आश्वलायनाने, (१०·१०·१०) म्हटले आहे की यजमानाने जिंकलेल्या चारी दिशातील भूमी आणि मनुष्ये ह्याखेरीज बाकीची ब्राह्मणेतरांची सर्व संपत्ती दान द्यावी, लाट्यायनाने (९·१०·१५ प्रभृती) सांगितले आहे की चार प्रमुख ऋत्विजांपैकी प्रत्येकाला कमीत कमी ४८ सहस्र गाई द्याव्या आणि त्यांच्या चार साहाय्यकांपैकी तीन साहाय्यकांना २४ सहस्र, १२ सहस्र आणि ६ सहस्र गाई द्याव्या.

प्राचीन काळी देखील हा यज्ञ विरळाच होत असला पाहिजे. तै. सं., (५·४·१२·३) शत. ब्रा. (१३·३·३·६), अथर्ववेद, (११·७·७।८), ह्या ग्रंथात हा यज्ञ **उत्सन्न** (म्हणजे प्रचारातून गेलेला) झाला असल्याचे मानले आहे. ह्या विधीचा उगम अज्ञात आहे आणि त्याच्यासंबंधी सांगण्यात आलेल्या उपपत्तींमध्ये एकवाक्यता नाही. महाभारतात (आश्वमे. अ. ७१ ते ८९) ह्या यज्ञाचे काहीसे विस्तृत वर्णन केले आहे. परंतु त्या वर्णनात अश्वमेध यज्ञामधील सविस्तर कार्यक्रम अथवा ठळककृत्ये ह्यांची प्रत्यक्ष वर्णने क्वचितच आली आहेत. त्या वर्णनावरून असा ग्रह होतो की ग्रंथकाराने प्रत्यक्ष पाहिलेल्या कृत्यांचे वर्णन केलेले नसून ऐकीव अथवा इतर ग्रंथांत वाचलेल्या गोष्टींचेच वर्णन केलेले असावे. रामायणात (बालकांड. अ. १३।१४) दशरथाने पुत्रप्राप्तीकरिता केलेल्या अश्वमेधाचे अधिक विस्तृत आणि प्रत्यक्ष पाहिल्यासारखे वर्णन केलेले असून त्या वर्णनात कल्पसूत्रांचा स्पष्ट निर्देश केला आहे. ऐतिहासिक काळात झालेल्या अनेक राजांनी केलेल्या अश्वमेधयज्ञांचे उल्लेख शिलालेखांत (इं. ॲटि. खं. ८ पा. २७८ वगैरे) आढळतात. १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात अंबरचा राजा सवाई जयसिंह ह्याने केलेल्या अश्वमेधाचे वर्णन कृष्णकवीच्या ईश्वरविलास काव्यात (डे. कॉ. हस्त. मु. २७३ सन १८८४।८६) केले आहे.

### सत्रे

[सत्रांसंबंधी माहिती पुढील ग्रंथांत दिली आहे :— तै. सं. ३·३·६, ३·५—१०, ७·५·५—७, तै. ब्रा. १·२·२—५, शत. ब्रा. ४·६·२, ताण्ड्य ब्रा. ४—५, ऐत. ब्रा. १७—१८, आपस्तंब २१, कात्या १३, आश्वला ११·७, सत्या. १६, बौ. १६·१३—२३, शांखा. १३·१९, पौ. घ. ग्रं. खं. ४१ पा २१ प्रभृति. इ०] सत्र हा यज्ञकर्मे करण्यात घालविलेला एक कालखंड असतो. हा कालखंड १२ दिवसांपासून एक वर्ष अथवा त्याहूनही अधिक असू शकतो. ह्या सत्रातील आदर्शभूत (प्रकृति) ‘**द्वादशाह यज्ञ**’ असतो. सोईसाठी सत्रांचे **रात्रिसत्रे** आणि **संवत्सर सत्रे** (एक वर्ष अथवा त्याहून अधिक कालपर्यंत चालणारी सत्रे) असे दोन भेद करिता येतील. सांवत्सरिक सत्रांचे आदर्शभूत सत्र ‘**गवांअयन**’ (गाईचा मार्ग म्हणजे सूर्याचे किरण अथवा दिवस) हे असते. सूत्रग्रंथांत **आदित्यानां अयन**, आंगिरसां अयन, कुंडपायिनां अयन, सर्पानां अयन, त्रैवार्षिक, द्वादशवार्षिक, षट्त्रिंशद्-वार्षिक, शतसंवत्सर, सहस्र संवत्सर ह्यांच्यासारख्या एक अथवा अधिक वर्षे चालणाऱ्या सत्रांची वर्णने आली आहेत. त्यांपैकी गवांअयन ह्या सत्राची त्रोटक माहिती पुढे दिली आहे.

**गवांअयन**

हे एक सांवत्सरिक (म्हणजे ३० दिवसाचा एक मास असे १२ मास असलेल्या अवधीपर्यंत) चालणारे सत्र असते. त्यातील पहिल्या सहा महिन्यांच्या अवधीमध्ये प्रायणीय अतिरात्र (प्रारंभाचा दिवस,), चतुर्विश दिन, तीन अभिप्लव, एक पृष्ट्य, अभिजित् दिन, तीन स्वरसामन् दिन इत्यादी विधींचा समावेश होतो आणि त्यामध्ये उक्थ्य, अग्निष्टोम ह्यांच्यासारखे यज्ञ केले जातात. त्यानंतर **विषुव** अथवा मध्य दिवस येतो आणि त्यादिवशी एकविंशस्तोम विधी असतो आणि सूर्याप्रीत्यर्थ अतिग्राह्य सोमाचा एक चमस अर्पण करण्यात येतो आणि एका पशूचे बलिदान करण्यात येते. त्यानंतर येणाऱ्या सहा महिन्यांच्या अवधीत तीन स्वर सामन् दिन, विश्वजित् दिन, उदयनीय इत्यादी विधी असून त्यांत गोष्ठोम, आयुष्टोम, दशरात्र अतिरात्र प्रभृती यज्ञ केले जातात.

गवांअयन हा यज्ञ संतती, ऐश्वर्य, मोठेपणा, उच्चाधिकार, स्वर्ग ह्यांच्यासारख्या निरनिराळ्या फलांची प्राप्ती व्हावी म्हणून केला जातो. ह्या यज्ञाची दीक्षा केव्हा घ्यावी ह्याविषयी मतवैचित्र्य आहे. गवांअयनामध्ये द्वादशाहासारखा कार्यक्रम करावयाचा असतो. ह्या यज्ञात कोणाच्या मताप्रमाणे १२ ऐवजी १७ दीक्षा असतात. ह्या सत्रात यजमान ह्या नात्याने अनेकांना काम करिता येते परंतु त्यात फक्त ब्राह्मणांनाच काम करिता येते. ह्या सत्रात वेगळे ऋत्विज नसल्याकारणाने ऋत्विजांची नेमणूक आणि त्यांना द्यावयाची दाने हे प्रकार नसतात. सत्रात दक्षिणा नसतात म्हणून लोकांकडून वर्गणी गोळा करण्याकरिता प्रतिनिधी (ह्यांना '**सनीहार**' अशी संज्ञा आहे) चोहोकडे पाठवावयाचे नसतात. सत्र चालत असताना कोणी एकादा यजमान मरण पावला तर त्याच्याजागी दुसऱ्या इसमाची योजना इतर यजमानांना करिता येते. ज्यांची कार्यपद्धती समान असते अशांनाच एका सत्रात भाग घेता येतो. एकाद्या सत्रात भाग घेण्याचा संकल्प केल्यानंतर अथवा सत्राला नुकताच आरंभ झाल्यानंतर कोणी सत्रात भाग घेण्याचा विचार सोडून दिला तर त्याला त्याबद्दल प्रायश्चित्त म्हणून **विश्वजित्** विधी करावा लागे. सत्रात जरी सर्वजण यजमान असले तरी त्यांच्यापैकी एक **गृहपती** होतो. दीक्षा ग्रहण करतेवे ळी अध्वर्यु प्रथम गृहपतीला आणि ब्रह्मा, होतृ, आणि उद्गातृ ह्यांना दीक्षा देतो आणि त्याचप्रमाणे निरनिराळे ऋत्विज निरनिराळ्या विशिष्ट ऋत्विजांना दीक्षा देतात. सर्वांच्या पत्न्यांनाही त्यांच्या पतींच्या बरोबरच दीक्षा देण्यात येतात. दहाव्या दिवशी अश्वमेधातल्या प्रमाणे **ब्रह्मोद्य** होते अथवा भुंगे आणि गांधिलमाशा ह्यांच्यासारखे त्रासदायक प्राणी आणि चोर ह्यांची उत्पत्ती केल्याबद्दल प्रजापतीला सर्वजण शिव्या देतात. सत्रामधील अत्यंत महत्त्वाचा दिवस **महाव्रत** हा असतो. हा सत्रातील उपान्त्य दिवस असतो. त्या दिवशी अनेक चमत्कारिक आणि विक्षिप्त विधी करण्यात येतात. ह्या दिवसाला 'महाव्रत' म्हणण्याचे कारण तो दिवस विशेषेकरून 'महान्' असणाऱ्या प्रजापतीकरिता योजलेला असतो. 'महाव्रत' ह्याचा अर्थ 'अन्न' हा असतो. ह्या दिवशी इतर चमसांबरोबर आणखी एक '**महाव्रतीय**' चमस हवन करण्यात येतो आणि एक पशु प्रजापतीप्रीत्यर्थ बली देण्यात येतो. त्या दिवशी एक आर्य आणि एक शूद्र ह्यांच्यामध्ये एकां वर्तुलाकार कातड्याकरिता स्पर्धा करण्यात येते. हे कातडे सूर्याचे प्रतीक मानण्यात येते आणि सूर्य आपणास मिळविण्याकरिता देव आणि असुर ह्यांच्यामध्ये पूर्वी युद्ध झाले होते त्याचे दर्शक ही स्पर्धा मानण्यात येते. ह्या स्पर्धेत आर्याचा विजय होईल अशी योजना केलेली असते. वेदीच्या उत्तरेकडील भागात एक वेश्या आणि एक ब्रह्मचारी परस्परांची निंदा करतात. यज्ञामध्ये भाग न घेतलेल्या एका त्रयस्थ पुरुषाचा आणि एका स्त्रीचा एका बंद केलेल्या मंडपात समागम घडविण्यात येतो. प्रजापतीने विश्वाची उत्पत्ती केल्याचे ह्या कृत्याने बहुधा दर्शित केले जात असावे. ढोल वाजवीत आणि आग्नीध्रीय मंडपाच्या पश्चिमेला ऋत्विज गायन करीत असताना त्यांच्या स्त्रिया त्याना साथ देण्याचे कार्य करितात आणि सेवक आणि सेविका मस्तकावर उदककुंभ ठेवून काही

विशिष्ट प्रकारचे नृत्य करतात. ह्या निरनिराळ्या कृत्यांवरून असे दिसून येते की अत्यंत प्राचीन काळी हा एक सामान्य लोकांचा उत्सव असावा आणि अनेक दिवस आणि महिने चालणाऱ्या कंटाळवाण्या वैदिक यज्ञांच्या अखेरीला करमणूक करण्याकरिता त्या उत्सवाचा ह्या गंभीर स्वरूपाच्या यज्ञाच्या कार्यक्रमात अंतर्भाव करण्यात आला असावा. **उदयनीय** दिवशी तीन अनुबंध्या गाई मित्रावरुण, विश्वेदेव आणि बृहस्पती ह्या तीन देवतांना अर्पण करण्यात येतात.

जरी सूत्रग्रंथांत शंभर वर्षे अथवा सहस्त्र वर्षे चालणाऱ्या सत्रांचा निर्देश केला असला तरी प्राचीन भारतात देखील अशा प्रकारची सत्रे अस्तित्वात नसावीत असे पतंजलीसारख्या काही ग्रंथकारांनी म्हटले आहे. जैमिनीने (६·७·३१।४०) असे स्पष्टपणे प्रतिपादन केले आहे की ज्या ठिकाणी श्रुतिवचनात सहस्त्र सवंत्सर चालणाऱ्या **विश्वसृजांअयनाचा** उल्लेख केलेला असतो त्या ठिकाणी संवत्सर ह्या शब्दाचा अर्थ 'एक दिवस' असा असतो. बाकीच्या सत्रात **सारस्वतसत्रे** अधिक उद्‌बोधक असतात. कारण या सत्रांत यज्ञ करणारे लोक यज्ञ चालू असताना अनेक प्रसंगी अत्यंत पवित्र सरस्वती आणि इतर नद्या ह्यांच्या समीप जात असतात.

## अग्निचयन

(अग्निकुंडाची रचना). अग्निकुंडाची रचना करणे हा एक विशिष्ट विधी असतो आणि तो सर्वही श्रौतयज्ञांपैकी अतिशय भानगडीचा आणि अत्यंत गूढ असतो. ह्या विधीच्या बुडाशी विश्वोत्पत्ती संबंधीच्या काही कल्पना आहेत.

पाच थर असलेले यज्ञकुंड रचणे हे कृत्य सोमयागाचे एक अंग असते. परंतु प्रत्येक सोमयागात चयन अवश्य नसते. कोणाला अग्निचयन करण्याची इच्छा झाली तर तो प्रथम फाल्गुन पौर्णिमेच्या इष्टीनंतर अथवा माघ महिन्यात अमावास्येला (एक मनुष्य, एक घोडा, एक बैल, एक मेंढी आणि एक बोकड हे) पाच प्राणी बली देतो. त्यांची मस्तके यज्ञकुंडाच्या बांधकामात घालावयाची असतात. त्यांची धडे पाण्यात टाकून ते पाणी विटा करण्याकरिता, लागणारा मातीचा चिखल करण्याकरिता उपयोगात आणतात. त्या प्राण्यांचा वध न करता त्यांची सोन्याची अथवा मातीची केलेली मस्तके घेतली तरी चालेल असा पर्याय कात्यायनाने सांगितला आहे. आधुनिक काळी जेव्हा केव्हा क्वचित प्रसंगी चयनाचा विधी केला जातो तेव्हा सुवर्णाच्या प्रतिमाच उपयोगात आणतात. ह्या विटांकरिता माती कोठून आणावी, कशी आणावी ह्याविषयी विशिष्ट नियम सांगितले आहेत. त्या चिखलामध्ये बोकडाचे केस पळसाच्या साली उकळलेल्या पाण्यासह मिसळण्यात येतात. तसेच वाळू, लोखंडाचा गंज आणि लहान दगडही मिसळतात. अशा रीतीने तयार केलेल्या चिखलापासून यजमानपत्नी पहिली वीट तयार करते. त्या विटेला **आषाढा** अशी संज्ञा आहे. यजमान तीन विटा तयार करतो. त्यांना **विश्वज्योती** अशी संज्ञा आहे. त्याच मातीची एक **उखा** बनविण्यात येते. नंतर आणखी विटा तयार करण्यात येतात आणि त्या लाल होईपर्यंत भाजण्यात येतात. ह्या विटा सामान्यतः यजमानाच्या पाऊलाइतक्या लांबीच्या असतात. कुंडाची रचना करण्याकरिता त्रिकोनी, चौकोनी, लंब चौरस अशा निरनिराळ्या आकाराच्या विटा लागतात आणि त्यांना निरनिराळी नांवे असतात. काही प्रकारच्या विटांना ऋषींची नावे असतात. त्या बहुधा त्या ऋषींनी प्रथमतः उपयोगात आणिल्या असाव्या. **स्वयमातृण्णा** नावाच्या विटा लांबट आणि चपट्या दगडांच्या असून त्यांना अंगची भोके असतात.



**श्येनचितिः प्रथमः प्रस्तरः**

अंतिम दीक्षेच्या दिवशी वेदीकरिता उपयोग करावयाची जागा मोजण्यात येते. ती जागा उदुंबराच्या नांगराने नागरण्यात येते आणि नांगराच्या तासात निरनिराळ्या प्रकारची धान्ये पेरण्यात येतात. निरनिराळ्या धान्यांपैकी ज्याचा पुढे यजमान आयुष्यभर त्याग करणार असतो ते धान्य वगळण्यात येते. विटा रचण्याचे काम प्रथम उपसदानंतर सुरू करण्यात येते. एक कमळाचे पान, सोन्याचा अलंकार आणि सोन्याची मनुष्याची प्रतिमा इत्यादी अनेक पदार्थ प्रथम ठेवतात. नंतर एक जिवंत कासव शेवाळात गुंडाळून ते खुंट्या मारून स्थिर करतात आणि त्याच्यावर कुंड रचतात. बली दिलेल्या पाच प्राण्यांची मस्तके काही विशिष्ट प्रकारांनी ठेवतात. त्यांच्यावर निरनिराळ्या आकाराच्या विटा रचून पहिला थर पुरा करतात. जेव्हा एकादा यजमान प्रथमच कुंडरचना करीत असेल तेव्हा सत्याषाढाच्या (११·५·२२) मताप्रमाणे प्रत्येक थराला फक्त २०० विटा लागतात (म्हणजे पाच थर मिळून १००० विटा लागतात). दुसऱ्या वेळी चयन करिताना सर्व थरांना मिळून २००० विटा लागतात आणि ही संख्या अग्निचयन पुन्हा पुन्हा करिताना वाढत जाते. परंतु इतर सूत्रकारांनी आणि शत. ब्रा. (पौ. ध. ग्रं. खंड ४३ पा. २२ टीप १) मध्ये पाच थर मिळून १०८०० विटा लागतात असे सांगितले आहे. रचनेला लागणारा काळही काही थोड्या दिवसांपासून एक वर्षपर्यंत भिन्नभिन्न असतो. सर्व थर पुरे झाले म्हणजे त्या कुंडावर आहवनीय अग्नीची स्थापना करितात. कुंड थंड करण्याचाही एक विशिष्ट प्रकार असतो.

त्यानंतर अनेक आहुती देण्यात येऊन काही थोड्या भेदाने सोमयागाचा कार्यक्रम अनुसरण्यात येतो. ज्याने अग्निचयन केले असेल त्याला एक वर्षपर्यंत काही काही व्रते पालन करावी लागतात. उदाहरणार्थ, त्याने कोणाला वंदन करू नये, कोणत्याही पक्ष्याचे मांस भक्षण करू नये, त्याने शूद्र स्त्री समीप जाऊ नये; एकाद्याने दुसऱ्या वेळी अग्निचयन केले तर त्याने स्वतःच्या स्वजातीच्या पत्नीव्यतिरिक्त

कोणत्याही स्त्रीसमीप जाऊ नये, आणि एकाद्याने तिसऱ्या वेळी अग्निचयन केले तर त्याने वर्षपर्यंत स्वतःच्याही पत्नीसमीप जाऊ नये.

अग्निचयन केल्यानंतर एक वर्षाच्या आत त्याची सुस्थिती राहिली नाही तर त्याने **पुनश्चिती** करावी. तसेच ऐश्वर्य, वेदविद्या आणि संतती ह्या तीन गोष्टींकरिताही पुनश्चिति करावी असे आप. (१७·२४·११) ने म्हटले आहे.

ह्याच्या पुढील खंडात यज्ञाच्या तत्त्वज्ञानविषयक अंगांसंबधी आणि यज्ञ कोणत्या कारणांनी मागे पडून त्यांच्या जागी दुसरी धार्मिक कृत्ये करण्यात येऊ लागली ह्याविषयी थोडी चर्चा करण्यात येईल.

**खंड २ रा समाप्त.**

———————

अनुक्रमणिका

# धर्मशास्त्राचा इतिहास

## खंड ३ रा

## प्रकरण ६०

## राजधर्म (राज्य आणि राज्यशासनाचे शास्त्र)

(मू. ग्रं. पा. ३·१—१६)

अतिशय प्राचीन काळापासून धर्मशास्त्रावरील ग्रंथांत विवेचन केलेल्या विषयांत राजधर्म हा एक विषय असतो. आप. ध. सूत्र, मनुस्मृति, महाभारत, कौटिलीय अर्थशास्त्र प्रभृति ग्रंथांत राजाच्या कर्तव्यांविषयी विस्तृत विवेचन केले आहे. राज्यकर्त्यांनी आपली कर्तव्ये करण आणि आपल्या जबाबदाऱ्या पार पाडणे ही गोष्ट समाजाच्या स्थैर्याच्या आणि समाजाच्या व्यवस्थित रीतीने विकास होण्याच्या दृष्टीने तसेच देशातील व्यक्तींना सुख प्राप्त होण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची असते आणि ह्यामुळेच राजधर्म हे सर्व धर्माचे मूलभूत अथवा सर्व धर्माचे सारसर्वस्व असल्याचे अनेक ग्रंथांत वर्णन केले आहे. 'सर्व धर्म राजधर्मात समाविष्ट होतात' (शान्ति. ६३·२५). 'प्रजेचा योगक्षेम, उत्तम पर्जन्यवृष्टी, रोग, व्याधि आणि मरण ह्या सर्वांचा उगम राजापासून होतो' (शान्ति १४१·९-१०) असे मानण्यात येत असे. स्मृतींनी निरनिराळ्या वर्णाचे आणि आश्रमांचे जे धर्म सांगितले आहेत त्या स्मृतिप्रणीत धर्माप्रमाणे राज्यातील लोक वागतात किंवा नाही हे पाहणे, लोकांना न्याय देणे, नियमभंगाकरिता शास्त्रात सांगितलेलीी प्रायश्चित्ते आचरणात आणण्याच्या कामात विद्वानांच्या परिषदांनी राजाचे साहाय्य मागितल्यास त्या कामात हात घालणे ही राजाची कर्तव्ये असत. अशा रीतीने आचार, व्यवहार (न्यायदान) आणि प्रायश्चित्त ह्यांबद्दलच्या सर्व नियमांचा राजधर्मात समावेश होतो. राजशासनाचा अथवा राजसत्तेचा असा सर्व व्यापक प्रभाव असल्यामुळे महाभारतात [कृतत्रेताद्वापरं च कलिश्च भरतर्षभ । राजवृत्तानि सर्वाणि राजैव युगमुच्यते ॥ शान्ति ९१·६; राजा कालस्य कारणम् । उद्योग १३२·१६.] अनेक वेळा म्हटले आहे की राजा हा युगाचे कारण असतो, तो आपल्या वर्तनाने देशात कृतयुग (अति भरभराटीचा काल) सुरू करू शकतो अथवा कलियुग (अति निकृष्टस्थिती असणारा काल) सुरू करू शकतो. (उद्योग १३२·१६; शान्ति. ६९·७९) ह्याप्रमाणे राजधर्म हा धर्मशास्त्राचा एक महत्त्वाचा भाग समजण्यात येत असला तरीही अत्यंत प्राचीन काळापासून धर्मशास्त्रावरील ग्रंथांखेरीज एकट्या राजधर्माचेच विवेचन केलेले स्वतंत्र ग्रंथही अस्तित्वात होते. शांतिपर्वात (अ.५९) म्हटले आहे की प्रारंभी कृतयुगात कोणी राजा नव्हता तसेच शासनही नव्हते. परंतु त्यानंतरच्या काळात जेव्हा मनुष्यांच्या मनात मोह, लोभ आणि काम ह्यांचा प्रादुर्भाव झाला तेव्हा धर्माचा पूर्ण नाश होऊ नये म्हणून ब्रह्मदेवाने धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या विषयांचे विवेचन केलेला एक ग्रंथ रचला. ब्रह्मदेवाने रचलेल्या ह्या ग्रंथाच्या धर्मविषयावरील भागाचा मनूने एक हजार अध्यायांत संक्षेप केला, अर्थविषयावरील भागाचा बृहस्पतीने एक हजार अध्यायांत संक्षेप केला आणि काम ह्या विषयावरील भागाचा नारदाने एक हजार अध्यायांत संक्षेप केला. अशा स्वरूपाच्या कथा थोड्याशा भेदाने कामसूत्र इत्यादी अनेक ग्रंथांतही दिल्या आहेत.

राज्यकारभाराविषयीच्या ह्या शास्त्राला निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळी नावे दिली आहेत. महाभारतात (शान्ति. ५८.१-३) त्याला 'राजशास्त्र' असे म्हटले असून बृहस्पती, भरद्वाज प्रभृतींना त्या

अनुक्रमणिका

शास्त्राचे प्रणेते (प्रवर्तक) म्हटले आहे. पंचतंत्रात (श्लो. १) मनु, बृहस्पति, शुक्र, पराशर, व्यास आणि चाणक्य ह्यांना 'नृपशास्त्राचे प्रणेते' म्हणून नमन केले आहे. ह्या शास्त्राला 'दंडनीति' असेही दुसरे नाव शांतिपर्वात (६९·७६) दिले आहे. हे जगत् दंडाच्या (शासन करण्याच्या सामर्थ्याच्या) योगाने योग्य मार्गाने नेले जाते अथवा हे शास्त्र शासनाचा दंड (काठी) धारण करते म्हणून ह्या शास्त्राला दंडनीती म्हणतात अशी त्याची व्याख्या दिली आहे. कौटिलीयात (१·४) असे प्रतिपादन केले आहे की 'आन्वीक्षिकी, त्रयी (वेद) आणि वार्ता ह्यांचा योगक्षेम चालण्याचे साधन तो दंड आणि त्याचे जे नियम ती दंडनीति. ह्या [अलब्धलाभार्था लब्धपरिरक्षणी रक्षितविवर्धनी वृद्धस्य तीर्थेषु प्रतिपादनी च ॥ अर्थशास्त्र १·४ (पा. ९)] दंडनीतीच्या योगाने न मिळालेली संपत्ती प्राप्त होते, मिळालेल्या संपत्तीचे रक्षण होते, रक्षण केलेल्या संपत्तीची वृद्धी होते आणि संचित संपत्तीचा पुण्यक्षेत्री आणि पुण्यकर्मात व्यय होतो.

'अर्थशास्त्र' हा शब्दही दंडनीतीचा समानार्थक समजला जातो. राजाने धर्म आणि अर्थ ह्यांत निपुण असणारा पुरोहित नेमावा असे आप. ध. सू. (२·५·१०·१६) मध्ये म्हटले आहे. कौटिलीयात म्हटले आहे की पृथ्वी जिंकण्याला आणि तिचे संरक्षण करण्याला उपयुक्त असे जर कोणते शास्त्र असेल तर ते अर्थशास्त्र हेच होय. शुक्रनीतिसार ह्या ग्रंथात (४·३·५६) सांगितले आहे की, 'ज्या शास्त्रात श्रुतिस्मृतींना विरोध न करता कसे आचरण करावे हे शिकविलेले असते आणि ज्या शास्त्रात कौशल्याने संपत्ती कशी संपादन करावी हे सांगितलेले असते ते अर्थशास्त्र होय'.

तथापि अर्थशास्त्र आणि दंडनीति हे शब्द राज्य चालविण्यासंबंधीच्या शास्त्राला दोन वेगवेगळ्या दृष्टीने लावण्यात येतात. सर्व प्रकारची संपत्ती आणि वैभव ह्या संबंधीचे विवेचन करण्याचा हेतु असणाऱ्या शास्त्राला अर्थशास्त्र म्हणतात आणि लोकांवर राज्य करणे आणि अपराध्यांना शासन करणे ह्या संबंधीचे विवेचन करण्याचा हेतु असलेल्या शास्त्राला दंडनीति म्हणतात.

राज्यकारभारासंबंधीच्या शास्त्राला 'नीतिशास्त्र अथवा राजनीति शास्त्र' असे आणखी एक नाव आहे. शांतिपर्वात (५९·७४) म्हटले आहे की ज्या ज्या उपायांनी लोक सन्मार्गापासून च्युत होणार नाहीत त्या त्या उपायांचे विवेचन नीतिशास्त्रात केलेले असते. पंचतंत्रात (श्लो. २) अर्थशास्त्र आणि नीतिशास्त्र हे समानार्थी शब्द असल्याचे मानले आहे. दुसरा एक उल्लेख करण्यासारखा शब्द 'नय' हा आहे. त्याचा अर्थ धोरण असा आहे. कौटिलीयात (१·२) म्हटले आहे की दंडनीतिमध्ये नय आणि अनय ह्यांचा विचार येतो.

अर्थशास्त्राचा आणि धर्मसास्त्राचा संबंध पुढीलप्रमाणे असतो. राज्यकर्त्यांचे अधिकार, त्यांचे विशेष हक्क आणि त्यांच्यावरील जबाबदाऱ्या ह्या विषयांचे विवेचन करणारे जे अर्थशास्त्र ते वास्तविकरीत्या धर्मशास्त्राचे एक अंगच असते. मागे सांगितल्याप्रमाणे धर्मशास्त्राप्रमाणे अर्थशास्त्रही देवप्रणीतच आहे. तथापि अर्थशास्त्रावरील ग्रंथात एकाद्या देशाच्या राज्यकारभाराच्या निरनिराळ्या अंगांचा अति विस्तृत विचार केलेला असतो आणि धर्मशास्त्रावरील ग्रंथात सामान्यतः राज्यशास्त्राच्या काही थोड्या प्रमुख अंगांचा विचार केलेला असतो. धर्म हा सर्वात श्रेष्ठ पुरुषार्थ (ध्येय) असून काम हा सर्वात कमी योग्यतेचा असतो. म्हणून अर्थशास्त्राच्या ग्रंथात देखील धर्माला सर्वात श्रेष्ठ असेच स्थान दिलेले असते. कौटिलीयात (३·१) म्हटले आहे की, 'जेव्हा एकाद्या बाबतीत धर्मशास्त्र आणि रूढी ह्यांच्यामध्ये अथवा धर्मशास्त्र आणि एकादा लौकिक व्यवहार ह्यांच्यामध्ये विरोध उत्पन्न होईल तेव्हा राजाने त्या गोष्टीचा निर्णय धर्माच्या आधारावर करावा. जेव्हा शास्त्र आणि एकादा तर्कशुद्ध आणि न्याय्य असा नियम ह्यांच्यात विरोध उत्पन्न होईल तेव्हा अशा नियमाला अधिक महत्त्व द्यावे आणि धर्मशास्त्राचे वचन बाजूला सारावे. उलटपक्षी, ऐहिक वैभवप्राप्तीकरिता

योजलेल्या लोभमूलक प्रयत्नात आणि केवळ अध्यात्मिक दृष्टीने सांगितलेल्या धर्मशास्त्राच्या वचनात विरोध उत्पन्न झाल्यास अर्थशास्त्राच्या नियमापेक्षा धर्मशास्त्राच्या वचनांना अधिक महत्त्व द्यावे असे धर्मशास्त्रावरील ग्रंथांत सांगितलेले असते. (आप. ध. सू. १·९·२४·२३, याज्ञ, २·२१ इ०).

तात्त्विकदृष्ट्या अर्थशास्त्राचा हेतु धर्माला अनुसरून चालावे असा असला तरी महाभारत आणि कौटिलीय ह्या ग्रंथांत अनेक ठिकाणी सरळ वर्तनाच्या आणि नीतीच्या नियमांशी पूर्णपणे विसंगत असे उपाय योजण्यास अनुमति दिली आहे. महाभारतात (आदि. अ. १४०) वर्णन केलेली कणिकनीति आणि राजाने आपत्काली कसे वर्तन करावे ह्याविषयीची भीष्मांनी सांगितलेली नीति (शांति अ. १४०) ही ह्या गोष्टीची उदाहरणे आहेत. भीष्म म्हणतात "कोणाला अत्यंत विपन्नावस्था प्राप्त झाल्यास त्याने सौम्य अथवा क्रूर कशाही उपायांनी त्या अवस्थेतून आपली मुक्तता करावी आणि सामर्थ्य प्राप्त झाल्यावर धर्माचे आचरण करावे (शांति १४०·३८). " अशा प्रकारचा उपदेश ऐकून जेव्हा युधिष्ठिर चकित झाला तेव्हा भीष्म म्हणाले, "राजधर्म केव्हाही एकांतिक असू शकत नाही आणि राजाने अनुसरावयाचे धोरण शास्त्राच्या वचनावरच आधारलेले असून चालत नाही तर ते तर्काला आणि बुद्धीलाही धरून असावे लागते." ह्यावरून असे उघड होते की काही विशिष्ट परिस्थितीत राजाला धर्मशास्त्राचे काटेकोर नियम सोडून देण्यास आणि नीतीला सोडून असणारे आडवळणाचे मार्ग स्वीकारण्यास महाभारताची अनुमती होती.

संस्कृत भाषेत राजशास्त्रावर विपुल ग्रंथ आहेत. प्रस्तुत ग्रंथात राजधर्माच्या कक्षेत येणाऱ्या निरनिराळ्या गोष्टींच्या मूलभूत कल्पनांचा आणि तत्त्वांचाच फक्त निर्देश करणे शक्य आहे. प्राचीन ग्रंथांच्या आधारावर अतिप्राचीन काली आणि मध्ययुगीन कालात भारतामध्ये राज्यकारभाराचे स्वरूप कशा प्रकारचे होते ह्याचेही थोडेसे दिग्दर्शन करण्यात येईल. भारतातील राजकारणाचा निदान ख्रि. पू. ४ थ्या शतकापासूनचा दोन हजारावर वर्षांचा लेखी इतिहास उपलब्ध आहे. त्या राजकारणाचा विकास क्रमाक्रमाने झाला असला तरी त्याची उद्दिष्टे आणि मूलभूत तत्त्वे शेकडो वर्षांपासून एकसारखीच आहेत. पाश्चिमात्य देशांतील इतिहासाशी तुलना केल्यास ती उद्दिष्टे आणि तत्त्वे भारतीयांना कोणत्याही प्रकारे कमीपणा आणणारी नाहीत आणि प्राचीन काळच्या भारतीय लोकांनी देखील राजकीय संस्थांविषयीच्या विचारांच्या उत्क्रांतीला हातभार लावला असल्याचे त्यांवरून दिसून येते.

——————

अनुक्रमणिका

# प्रकरण ६१

## राज्याची सात अंगे

(मू. ग्रं. पा. ३.१७—५५)

आपल्या बहुतेक सर्व शास्त्रकारांच्या मताप्रमाणे राज्याची पुढीलप्रमाणे सात अंगे असतात : (१) स्वामी (राजा अथवा राज्यकर्ता), (२) अमात्य, (३) जनपद अथवा राष्ट्र (राज्यातील भूप्रदेश आणि त्यात राहणारे लोक), (४) दुर्ग (तटबंदीचे नगर अथवा राजधानी), (५) कोश (खजिना), (६) दंड (सैन्य), (७) मित्र (मित्र अथवा सहाय्यक). ह्या सातांना अंगे अथवा प्रकृति अशी संज्ञा आहे. प्रकृति हा शब्द मंडळाच्या म्हणजे राज्यांच्या समूहातील घटक राज्यांनाही लावलेला असतो. प्रकृति ह्याचा अर्थ मंत्री अथवा प्रजा असाही होतो. महाभारतातील आश्रमवासी पर्वात (५.८) राज्याच्या आठ अंगांचा उल्लेख केला आहे.

ह्या सात अंगांचा क्रम महत्त्वाचा आहे. कारण जेव्हा संकटे येतील अथवा ह्या सातांपैकी प्रत्येकाच्या अवनतीला प्रारंभ होईल तेव्हा त्यांतील प्रत्येक अंग त्याच्या नंतर आलेल्या अंगांपेक्षा अधिक महत्त्वाचे असते असे काही ग्रंथकारांनी स्पष्ट म्हटले आहे. (कौटि. ८·१; मनु. ९·२९५). ह्या अंगांच्या नावांबद्दल आणि क्रमांबद्दल मतवैचित्र्य आढळते. ‘जनपदा’ च्या ऐवजी कोणी ‘जन’ अथवा ‘राष्ट्र’ हा शब्द योजतात, कोणी ‘दंड’ ह्याच्याऐवजी ‘बल’ आणि ‘दुर्ग’ ह्याच्याऐवजी ‘पुर’ असे शब्द योजतात. सुमन्तूने दंडाचा समावेश ‘कोश’ ह्यात केला आहे. क्रमाच्या बाबतीत ह्या सातांत ‘राजा’ हे अंग सर्वांत अधिक महत्त्वाचे असल्याचे सर्वही ग्रंथकार मानतात. राज्याची ही सात अंगे शरीराच्या निरनिराळ्या अवयवांप्रमाणे एकमेकांना पूरक असतात आणि त्यांच्यापैकी एक देखील कमकुवत असले तरी राज्याची सुस्थिती राहत नाही. ह्यांतील कोणते अंग इतरांपेक्षा अधिक महत्त्वाचे आहे असे निखालसपणे म्हणता येत नाही. परंतु निरनिराळ्या प्रसंगी त्यांच्यापैकी एकाद्याला त्याच्या विशिष्ट गुणामुळे अधिक महत्त्व प्राप्त होते. एकादे उद्दिष्ट कार्य पार पाडण्यासाठी सर्वही अंगांनी एकजुटीने काम करण्याची आवश्यकता असते असे महाभारत [सप्ता त्ग्स्यास्य राज्यस्य त्रिदण्डस्येव तिष्ठतः । अन्योन्यगुणयुक्तस्य कः केन गुणऽतोधिकः ॥ शान्तिपर्व.] (शांतिपर्व) आणि मनुस्मृतीत (९·२९६-२९७) सांगितले आहे.

केवळ काही लोक एकत्र आले म्हणजे त्यांचे राज्य होऊ शकत नाही तर ते लोक एका विशिष्ट प्रदेशात राहत असले पाहिजेत, एका विशिष्ट राजाची सत्ता मानीत असले पाहिजेत, त्यांच्यात सुव्यवस्थित राज्यसंस्था असली पाहिजे, सुव्यवस्थित आर्थिक व्यवस्था पाहिजे, संरक्षणाकरिता सैन्य पाहिजे आणि त्यांच्यात आणि इतर राज्यांत व्यवस्थित संबंध असले पाहिजेत. म्हणजेच (१) स्वामी (२) राज्यकारभाराची व्यवस्था, (३) विशिष्ट भूप्रदेश (४) बरीचशी लोकसंख्या हे राज्याचे चार अत्यंत महत्त्वाचे घटक असतात ही गोष्ट गौतम (११·१; ११·५-८), आपस्तंब ह्यांच्यासारख्या अत्यंत प्राचीन अशा सूत्रांना देखील माहीत होती. (आप. २·६·२५.१०; २·१०·२५.११; २·१०.२६·४ इ०).

**राज्य** हा शब्द ‘राजन्’ ह्या शब्दाला ‘य’ प्रत्यय लावून झालेला आहे. व्युत्पत्तिदृष्ट्या त्याचा अर्थ ‘राजाचे कर्म’ अथवा ‘राजाचा भाव अथवा स्थिति’ असा आहे. लौकिक व्यवहारात राज्य हा शब्द

'राजसंस्था' ह्या अर्थाने वापरला जातो आणि मनुस्मृति (७·१११) आणि राजनीतिशास्त्रावरील ग्रंथांतही तो शब्द अशाच अर्थाने वापरला जातो. कौटिलीयात अथवा कामंदकीय सूत्रात राज्य शब्दाची व्याख्या दिलेली नाही. राज्याला सात अंगे असतात असे जेव्हा म्हणतात त्यावेळी 'राज्य' ह्या शब्दात राजा, मंत्री, देश, त्यातील रहिवासी, त्या देशाचे आर्थिक आणि संरक्षणाचे सामर्थ्य ह्या सर्वांचा समावेश होतो आणि त्या ठिकाणी 'राज्य' ह्या शब्दाचा अर्थ 'राष्ट्र' (शासनसंस्था आणि देशातील लोक) असा करणे अधिक संयुक्तिक होईल. आधुनिक काळात 'ज्या साधनांनी राष्ट्राची इच्छा प्रदर्शित केली जाते, ती प्राप्त करून घेण्यात येते अथवा अमलात आणली जाते' त्या साधनांचाही राज्य ह्या शब्दात समावेश होतो. प्राचीन भारतीय तत्त्ववेत्त्यांनी राज्याची सात अंगे सांगितली आहेत ह्यावरून राज्य ही एक सुसूत्र एकजिनसी संस्था आहे हे तत्त्व त्यांना माहीत होते असे दिसते.

राज्याच्या ह्या सात अंगांचे आता क्रमाने विवेचन करण्यात येईल.

**स्वामी (राजा अथवा राज्यकर्ता)**

राजाची आवश्यकता अनेक ग्रंथात मोठ्या परिणामकारक रीतीने प्रतिपादन केली आहे. 'आपल्याला कोणी राजा नसल्यामुळे आपला पराजय झाला असे देवांना वाटले म्हणून त्यांनी सर्वानुमते एकाला राजा निवडला' असे ऐत. ब्रा. मध्ये (१·१४) म्हटले आहे. ह्यावरून युद्धाच्या दृष्टीने आवश्यकता वाटल्यावरून राजा ह्या संस्थेची उत्पत्ती झाली असे दिसून येते. मनुस्मृतिमध्येही (७·३) म्हटले आहे की "ह्या जगात कोणीही शासनकर्ता नसल्यामुळे सर्वत्र गोंधळ माजला म्हणून विश्वकर्त्याने ह्या सर्व जगताचे संरक्षण करण्याकरिता राजा निर्माण केला आणि त्याच्याकरिता दंड (शासन करण्याची शक्ति) निर्माण केला. राजाने दंडाचा उपयोग शासनार्ह लोकांना शासन करण्याच्या कामी निरलसपणे केला नाही तर ज्याप्रमाणे पाण्यात मोठे मासे लहान माशांना भक्षण करतात त्याप्रमाणे बलिष्ठ प्राणी दुर्बल प्राण्यांना पीडा देतील." ह्या प्रकाराला 'मात्स्यन्याय' असे म्हणतात आणि त्याचा उल्लेख महाभारत (शांति अध्या. १५·३०), रामायण (२·६७) आदि अनेक ग्रंथात केला आहे. 'दंड' हा शब्द 'दम्' (नियमन करणे) ह्या धातूपासून झाला आहे. नियमभंग करणाराचे दमन करतो म्हणून आणि उद्धट अथवा असभ्य लोकांना दंड करतो म्हणून त्याला दंड हे नाव मिळाल्याचे महाभारतादी (शां. १५·८) ग्रंथांत सांगितले आहे. काही ग्रंथांत दंडाला देवता मानले आहे. दंडाच्या प्रशंसेच्या मागील मूलभूत कल्पना अशी आहे की लोक कायद्याचे आणि शास्त्राचे नियम कोणाच्या तरी बलाच्या भीतीमुळे अथवा कोणी शासन करील ह्या भीतीमुळे पालन करतात. शांतिपर्वात (५७·४१) म्हटले आहे की कोणाही व्यक्तीने प्रथमतः राजा मिळवावा, नंतर पत्नी मिळवावी आणि यानंतर संपत्ती मिळवावी. कारण राज्यकर्त्याच्या अभावी पत्नीही असू शकणार नाही आणि खाजगी संपत्तीही असू शकणार नाही. म्हणजे कुटुंबसंस्था आणि खाजगी मालमत्तेचे अस्तित्व आणि दुर्बलांचे संरक्षण ह्या गोष्टी राज्यकर्त्यांच्या अस्तित्वाशी निगडित आहेत.

राजाच्या स्थानाचे महत्त्व वाढवून सांगण्याकरिता राजाच्या शरीरात निरनिराळ्या देवतांचे अंश असतात असे अनेक ग्रंथात सांगितले आहे. इंद्र, वायू, यम इत्यादी देवतांचे महत्त्वाचे अंश घेऊन विधात्याने राजा निर्माण केला म्हणून राजा इतर सर्व जीवांपेक्षा अधिक प्रभावी असतो असे मनूने (७·४।५) म्हटले आहे. ह्यावरून राजाला राज्य करण्याचा अधिकार देवांकडून प्राप्त झाला आहे असा प्रत्यक्ष सिद्धांत निघत नाही. परंतु त्या वर्णनात राज्याच्या कार्याची विशिष्ट देवतांच्या गुणांशी एकरूपता दाखविली आहे. राजाच्या शरीरात विष्णु आदि देव वास्तव्य करीत असतात आणि तो सर्व देवांच्या अंशांनी युक्त असतो ह्या कल्पनेला

अनुसरून प्राचीन क्षत्रिय घराणी आणि त्यांचे स्तुतिपाठक आपापल्या घराण्याची उत्पत्ती सूर्यापासून, चंद्रापासून, अग्नीपासून अशा प्रकारच्या देवतांपासून झाल्याचे दाखवीत असत. संस्कृत नाटकांत राजाला 'देव' संबोधण्याची पद्धती देखील राजाच्या स्थानाचा गौरव करण्याच्या प्रवृत्तीमुळेच उत्पन्न झाली. कौटिल्याच्या काळीही ही कल्पना अस्तित्वात होती आणि त्याने तिचा भरपूर उपयोग करून घेतला होता. 'नाविष्णुः पृथिवीपतिः' हे वाक्य सुप्रसिद्ध आहे. त्याचा अर्थ 'पृथ्वीचा अधिपति हा विष्णूचा अवतार असतो' अथवा 'विष्णु नसलेला कोणताही राजा असू शकत नाही.' असा दोन प्रकाराने करिता येईल.

राजाच्या स्थानाचे मोठे महत्त्व वर्णन केले असले तरी त्यावरून राजाला मिळालेला अधिकार देवाने दिलेला असतो अथवा राजा कितीही दुर्वर्तनी असला तरी तो देवस्वरूपी असतो आणि त्याने मनाला वाटेल तसे वर्तन करावे असे लोक समजत असत असे अनुमान काढता येणार नाही. राजनीतिरत्नाकर [इति सर्वाम् (सर्व?) प्रजाविष्णुं साक्षिणं श्रावयेन्मुहुः ॥ –राजनीतिसार पा ८३.] ह्या ग्रंथात (पा. ८३) प्रजांना म्हणजे लोकांना विष्णू म्हटले आहे. राजाची ब्राह्मणांवरील सत्ता मर्यादित स्वरूपाची होती. राजा आणि ब्राह्मण ह्यांच्यात एकोपा असावा आणि राजाने ब्राह्मणांच्या सल्ल्याने वागावे ह्या गोष्टीवर ऐतरेय ब्रा. (३७·५) च्या कालापासून विशेष कटाक्ष असे. जो राजा आपल्या प्रजाजनांचा छळ करतो आणि धर्माचा ऱ्हास करतो तो राक्षसांच्या अंशापासून झालेला असतो असे शुक्रनीतिसारात (१·७०) म्हटले आहे. जुलूम करणाऱ्या वेनासारख्या राजाचा लोकांनी वध केल्याच्या कथाही प्राचीन ग्रंथात सापडतात. तै. सं. च्या (२·३·१) काला इतक्या प्राचीन काळी देखील राजाला हाकलून दिल्याचे आढळते आणि शत. ब्रा. (१२·९·३·१ आणि ३) दुष्टरीतु नावाच्या राजाला दहा पिढ्यांपासून चालत आलेल्या राज्यातून हाकून दिल्याचे सांगितले आहे. एकाद्या जुलमी राजाचा प्रत्यक्ष वध न केला तरी त्याला पदच्युत करणे योग्य होईल असे शांतिपर्व, मनु., याज्ञ. प्रभृति ग्रंथांत मत प्रदर्शित केले आहे. (शां. ९२·६ आणि ९; मनु ७·२७ आणि ३४; याज्ञ. १·३५६). ह्यावरून असे दिसून येईल की राजाच्या अंगात देवतांचे अंश असतात आणि वाईट वर्तनाबद्दल राजाला पदच्युत करता येते अथवा त्याचा वधही करता येतो ही परस्परविरोधी विधाने निरनिराळ्या परिस्थितीला अनुसरून केलेली आहेत. वर्णांची आणि आश्रमांची कर्तव्ये अखंड चालावी, निरनिराळ्या जातींना असणाऱ्या हक्कात ढवळाढवळ होऊ नये अशी धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांची श्रद्धा असे, त्याचप्रमाणे उत्तरोत्तर धर्माचा ऱ्हास होत जाणार असेही त्यांना वाटत असे आणि म्हणून समाजातील व्यवस्था बिघडू नये ह्याकरिता त्यांना सामर्थ्यवान असा राजा असावा असे वाटे. ह्याकरिता त्यांनी राजाला देवाची योग्यता असल्याचे सांगून लोकांनी त्याची आज्ञा बिनतक्रार पाळावी असे प्रतिपादन केले. तथापि काही दुष्ट राजे आणि त्यांचे मंत्री आपल्या वर्तनाने लोकांना पीडा देणारे निघतील असा धोका वाटल्यामुळे त्यांनी राजांना आणि त्यांच्या मंत्र्यांना त्यांचा नाश होईल आणि वध होईल अशी भीतीही दाखवली. ही वचने मुख्यत्त्वेकरून राजांना आणि त्यांच्या मंत्र्यांना उद्देशून सांगितलेली आहेत. राजा हा राज्याचा वेतनधारी अथवा सेवक असल्याची कल्पना कौटिलीयांत (१०·३) प्रतिपादन केली आहे.

राजा हा शब्द राज्=प्रकाशणे ह्या धातूपासून झाल्याचे निरुक्तात (२·३) सांगितले आहे. 'राजन्' हा शब्द रज् ह्या धातूपासून झाला असून सर्व लोकांना संतुष्ट ठेवतो, त्यांचे रंजन करतो तो राजा अशी व्युत्पत्ती महाभारतात (शां. ५९·१२५) - दिली आहे. तसेच क्षत्रिय हा शब्द 'क्षत् = व्रण आणि त्रै = संरक्षण करणे ह्या धातूपासून झाल्याचे महाभारतात (शां. ५९·१२६) सांगितले आहे आणि जो क्षतापासून संरक्षण करतो तो क्षत्रिय अशी व्युत्पत्ती दिली आहे.

अनुक्रमणिका

आमच्या शास्त्रग्रंथांत राजा ह्या संस्थेची उत्पत्ती कशी झाली ह्याविषयी अनेक कल्पना दिल्या आहेत. अथर्ववेदात (३·५·६ आणि ७) राजाची निवड करण्यासंबंधी उल्लेख आहे. सरदारांनी, राजकृतांनी, सूतांनी, ग्रामाधिकाऱ्यांनी, कुशल रथकारांनी आणि कुशल कारागिरांनी राजाची निवड केल्याचा त्यात अस्पष्ट उल्लेख आहे. ह्यावरून राजाला त्याचे राज्य हे सरदार, वरिष्ठ अधिकारी आणि सामान्य जनता ह्यांच्याकडून मिळते अशी कल्पना असावी असे दिसते. रामायणात (अयोध्या अ. १ आणि २) वर्णन केले आहे की दशरथाने आपला ज्येष्ठ पुत्र रामचंद्र ह्याला यौवराज्याचा अभिषेक करण्याचे ठरवून तो हेतु आपले मांडलिक राजे, पौरजन आणि जानपद (नगरवासी आणि खेडेगावातील रहिवासी) ह्यांची सभा बोलावून त्यांच्यापुढे मांडला आणि त्या योजनेला त्या लोकांनी तत्परतेने मान्यता दिली. ह्यावरून असे दिसते की जरी पुढे पुढे राजाची पदवी वंशपरंपरेने चालू लागली तरीही राजाच्या नेमणुकीला लोकांची मान्यता असली पाहिजे ह्या कल्पनेचा थोडासा अंश शिल्लक राहिला होता. राजाची निवडणूक केल्याची ऐतिहासिक काळातील देखील उदाहरणे आहेत. सुराष्ट्राच्या लोकांनी क्षत्रपरुद्रदमन ह्याला आपला राजा नेमले होते. (एपि. इं. खं. पा. ४०). बंगालमधील पाल घराण्याचा मूळ पुरुष गोपाल (इ. स. ७३०-७४०) ह्याची लोकांनी निवडणूक केली होती. (एपि. इं. खं पा. २४८). कोणाचे तरी नाव राजा म्हणून सुचविण्याचे काम मुख्य मंत्री आणि ब्राह्मण ह्यांचे असे आणि अशा लोकांना 'राजकर्तारः' असे म्हणत असत.

काही ठिकाणी रूसोने युरोपात प्रतिपादन केलेल्या सामाजिक कराराच्या कल्पनेच्या जवळ जवळ सारखी कल्पनाही गर्भितपणे मांडलेली आढळते. रूसोच्या सामाजिक कराराच्या कल्पनेचे दोन प्रकार आहेत : शासनसंस्था आणि जनता ह्यांच्या दरम्यानचा उघड अथवा अध्याहृत करार होणे हा एक प्रकार आणि अनेक व्यक्तींनी आपआपसात संघटना करून एक राजकीय स्वरूपाची संस्था निर्माण करणे हा दुसरा प्रकार (ह्या प्रकारात राज्यकर्ता हा घटक नसतो). कौटिलीयात (१·१३) अशी कथा सांगितली आहे की वैवस्वत मनूला लोकांनी आपला राजा केला आणि लोकांना राजाकडून मिळणाऱ्या संरक्षणाचा मोबदला म्हणून लोकांनी आपण उत्पादन केलेल्या धान्याचा सहावा हिस्सा राजभाग म्हणून राजाला देण्याचे कबूल केले. परंतु मनूने लोकांना काही आश्वासन दिले असल्याचे (म्हणजे लोकांशी करार केल्याचे) कौटिल्याने सांगितलेले नाही. शांतिपर्वात (५९-१०६।१०८) असे वर्णन केले आहे की पहिला राजा पृथू ह्याला देवांनी आणि ऋषींनी शपथ घ्यावयास लाविले आणि त्याने देवांना आणि ऋषींना अभिवचन दिले की मी पृथ्वीचे संरक्षण करीन, दंडनीतिशास्त्राला अनुसरून मी माझ्या कर्तव्यांचे पालन करीन, मन मानेल तसे स्वैर आचरण करणार नाही.

राजाला त्याची सत्ता देवांनी दिलेली असते ह्या कल्पनेचे मूळ ऋग्वेदातदेखील सापडेल. ऋ. (४·४२) ह्या सूक्तात त्रसदस्यु राजाने आपण देवसमूहातील सर्वशक्तिमान असे देव असल्याचे स्पष्टपणे म्हटले आहे. शत. ब्रा. मध्ये (५·१·५·१४) राजा हा प्रजापतीचा प्रतिनिधी असल्यामुळे त्याला सत्ता प्राप्त झालेली असते असे मानल्यासारखे दिसते. विश्वरूपाने (याज्ञ. १·३५० वरील टीकेत) उद्धृत केलेल्या एका वेदवचनात असे वर्णन केले आहे की देवांनी प्रजापतीला म्हटले की आम्ही चंद्र, सूर्य, इंद्र, विष्णु, कुबेर आणि यम ह्यांच्या पासून सहा गुण घेऊन मनुष्यरूपी राजा तयार करू आणि अशा रीतीने तयार केलेल्या राजाने 'धर्म' हा आपला मित्र म्हणून देण्याची देवांना विनंती केली आणि नंतर मी लोकांचे संरक्षण करीन असे म्हटले आणि नंतर देवांनी धर्माला (म्हणजे दंडाला) राजाचा मित्र केले.

राजसत्तच्या उत्पत्तीविषयी महाभारतात दोन ठिकाणी (अ. ५९ आणि अ. ६७) विवेचन केले आहे. शांतिपर्वात एके ठिकाणी (अ. ५९) म्हटले आहे की पूर्वी (कृतयुगात) राजा नव्हता, शासन नव्हते आणि

शासन करणाराही नव्हता, परंतु नंतर लोकात मोहादि विकारांचा प्रादुर्भाव झाल्यामुळे वेद आणि धर्म ह्यांचा नाश झाला, देवांना हविर्भाग मिळेनासा झाला, तेव्हा देव ब्रह्मदेवाकडे गेले आणि ब्रह्मदेवाने जगाच्या हिताकरिता एक मोठा ग्रंथ रचिला. नंतर देव विष्णूकडे गेले आणि सर्व लोकांत अत्यंत योग्य असणाऱ्या एकाची (राजा म्हणून) नेमणूक करण्याबद्दल त्यांनी विष्णूला विनंती केली. विष्णूने मनापासून विरजा नावाच्या एका पुत्राची उत्पत्ती केली. परंतु त्याला राजा होण्याची इच्छा नव्हती. विरजापासून पाचवा पुरुष वैन झाला. त्याने धर्माचा नाश केला म्हणून ब्राह्मणांनी त्याचा वध केला आणि त्याच्या उजव्या बाहूचे मंथन करून सुंदर, शस्त्रयुक्त, वेद, वेदांगे आणि दंडनीति ह्यांत निपुण असलेल्या पृथूची उत्पत्ती केली. देवांनी आणि ऋषींनी त्याला परंपरागत धर्माचे अनुकरण करण्यास, आपल्या इंद्रियांवर ताबा ठेवण्यास आणि शपथ घेण्यास सांगितले. आणि त्याला लोकांच्या संरक्षणाकरिता राज्याभिषेक केला. विष्णूने स्वतः पृथूची स्थापना करून कोणीही मनुष्य तुझ्या आज्ञेच्या विरुद्ध जाणार नाही असे सांगितले. आणि त्याच्या शरीरात प्रवेश केला आणि ह्या कारणाने त्या वेळेपासून हे विश्व राजाला देवाप्रमाणे वंदन करते. त्या कथेत पृथूने ऋषींना दिलेल्या अभिवचनाचा उल्लेख असला तरी राजाची पदवी देवांपासून उत्पन्न झाली ह्याच गोष्टीवर भर दिला आहे.

राजाच्या उत्पत्तीविषयीच्या महाभारतात दिलेल्या दुसऱ्या कथेत (शांति. अ. ६७) असे वर्णन केले आहे की अराजक देशात धर्म वसत नाही, जीविताची आणि संपत्तीची सुरक्षितता नसते ह्याकरिता लोकांच्या संरक्षणासाठी देवांनी राजाची नेमणूक केली. पुढे लोक एकत्र जमून त्यांनी आपसात असा करार केला की जो कोणी दुसऱ्याची निंदा करील, दुसऱ्यावर हल्ला करील, व्यभिचार करील आणि आपण केलेल्या कराराचा भंग करील त्याला समाजातून घालवून द्यावा. सर्व लोक ब्रह्मदेवाकडे गेले आणि ज्याला सर्व लोक मान देतील आणि जो सर्वांचे संरक्षण करील असा कोणीतरी अधिपती आम्हाला देण्याबद्दल त्यांनी विनंती केली. ब्रह्मदेवाने ह्या कामावर मनूची योजना केली. परंतु मनूला प्रथम ती योजना आवडली नाही. तो म्हणाला की, नेहमी कपटयुक्त असलेल्या लोकांवर राज्य करणे हे मोठे कठीण काम आहे आणि मनुष्यांनी केलेल्या पातकांची मला भीती वाटते. तेव्हा लोकांनी मनूला सांगितले की तू लोकांच्या पातकांबद्दल भीती बाळगू नकोस, कारण ती पातके तुला न लागता ज्याची त्याला लागतील. त्यांनी मनूला आपल्या उत्पन्नाचा (धान्याचा $^{१}/_{१०}$, पशूंचा $^{१}/_{५}$ आणि धर्माचरणाचा $^{१}/_{४}$ वगैरे प्रकारचा) अंश देण्याचे कबूल केले. तेव्हा मनु राजा होण्यास कबूल झाला आणि दुष्ट लोकांना भीती उत्पन्न करीत आणि धर्माचरण करण्याला भाग पाडीत तो सर्व पृथ्वीवर फिरला. ह्या कथेत देखील मनूने लोकांना स्पष्टपणे काही आश्वासन दिलेले नसून लोकांनी मात्र त्याला कर देण्याचे आणि आपली पातके आपणच भोगण्याचे मान्य केले आहे. ह्या कथेत ब्रह्मदेवाने ग्रंथ रचल्याचा उल्लेख नाही. पहिल्या कथेत पृथू हा पहिला राजा असल्याचे म्हटले आहे आणि दुसऱ्या कथेत मनु हा पहिला राजा झाल्याचे सांगितले आहे. दोन्ही कथांत देवांनी राजा दिला आहे. दुसऱ्या कथेत राजाची दैवी सत्ता आणि राजा आणि लोक ह्यांच्यामधील आरंभी झालेला करार ह्या दोन्ही कल्पनांचे मिश्रण झाले आहे. तथापि राजाला मिळालेली सत्ता देवांनी दिलेली असते ह्या गोष्टीवर दोन्ही कथांत जोर दिला आहे. 'लोक राजाच्या आज्ञेत वागतात ह्याचे कारण राजाची सत्ता देवनिर्मित आहे ह्याशिवाय दुसरे कोणते असू शकेल?' असेही महाभारतात एके ठिकाणी (शांति ५९·१३९) म्हटले आहे. 'इंद्र हा राजाच्या रूपाने पृथ्वीवर वावरत असतो' असे नारदस्मृतीमध्ये (प्रकी. २०।२२) म्हटले आहे.

राजाच्या दैवी अधिकाराच्या कल्पनेत पुढील चार सिद्धांतांचा समावेश होतो असे फिगिसने 'राजाचा दैवी अधिकार' ह्या ग्रंथात (पा ५।६) म्हटले आहे : (१) राजप्रमुख असणारी शासनसंस्था ईश्वरनिर्मित आहे; (२) वंशपरंपरेचा अधिकार रद्द करता येत नाही, म्हणजे जन्माने आणि ज्येष्ठ अपत्य ह्या

नात्याने प्राप्त होणारा हक्क त्या व्यक्तीपासून बलात्काराने, नालायकीमुळे अथवा पदच्युत केल्याने नष्ट होत नाही, (३) राजाला त्याच्या कृत्याचा जाब विचारणारा परमेश्वरावाचून दुसरा कोणी नसतो, राजाच्या सत्तेला मर्यादा असू शकत नाही, (४) कोणत्याही परिस्थितीत राजाला प्रतिकार करणे पाप असते, जेव्हा राजाने केलेली आज्ञा ईश्वरी आज्ञेच्या विरुद्ध असेल तेव्हा ईश्वरी आज्ञेचे पालन करावे आणि राजाच्या आज्ञेच्या भंगाचे परिणाम शांतपणे सहन करावेत.

ह्यांपैकी पहिला सिद्धांत मनु, महाभारत इत्यादी ग्रंथांत मान्य केला आहे. दुसरा सिद्धांतही सर्व संस्कृत ग्रंथकारांनी मान्य केला आहे. परंतु त्यांनी त्याला काही अपवाद सांगितले आहेत. तिसरा आणि चौथा हे दोन सिद्धांत प्राचीन ग्रंथकारांनी मान्य केलेले नाहीत. राजाच्या सत्तेला मर्यादा असल्याचे त्यांनी सांगितले आहे. राजाने धर्माच्या आज्ञा पालन केल्या पाहिजेत, नवीन नियम करण्याचा राजाचा अधिकार मर्यादित असतो आणि धर्माच्या आज्ञेप्रमाणे तो न वागल्यास त्याला पदच्यत करता येते, त्याच्या आज्ञेचा भंग करता येईल अथवा त्याचा वधही करता येईल. नारदाने (प्रकी. १२ आणि ३२) म्हटले आहे की राजाची निंदा करू नये आणि त्याच्या आज्ञांचे पालन करावे कारण तसे न केल्यास देहान्ताचे शासन मिळण्याचा संभव आहे. ह्यावरून दुष्ट राजाची सत्ता बिनतक्रार अथवा प्रतिकार न करता मानली पाहिजे असे ठरत नाही.

लोकांनी आपसात एक सामाजिक करार करून राज्यसंस्था निर्माण केली ह्या कल्पनेला प्रतिकार करण्याकरिता राजाला त्याचा अधिकार देवांनी दिला असल्याची कल्पना काढण्यात आली असे म्हणता यत नाही. राजाची सत्ता देवांनी त्याला दिली आहे ही कल्पना अत्यंत प्राचीन काळी देखील स्वाभाविकरीतीने उत्पन्न होणे शक्य आहे, परंतु सामाजिक कराराच्या कल्पनेचा उगम बऱ्याच परिणतस्वरूपाच्या राजकीय विचारांत झालेला आहे. राजाच्या दैवी सत्तेची कल्पना असमंजस नसून हिंदुस्थानाबाहेरही ती मानली जात असे. बायबलमध्ये ती कल्पना आली असून अनेक ख्रिस्ती राष्ट्रांतही ती प्रचलित होती. हिंदु राजशास्त्र आणि धर्मशास्त्र ग्रंथांप्रमाणे कर देणे आणि प्रजेचे संरक्षण करणे ह्या दोन गोष्टी परस्परांवर अवलंबून असतात. बौधा. ध. सू. मध्ये (१·१०·१) म्हटले आहे की, 'प्रजेच्या उत्पन्नाचा सहावा हिस्सा (कर म्हणून) घेत असल्यामुळे राजा हा लोकांचा सेवक आहे आणि म्हणून त्याने प्रजांचे संरक्षण केले पाहिजे.' महाभारतात (शां. ५७·४४।४५ संरक्षण न करणाऱ्या राजाचा त्याग करण्यास संमति दिली आहे. राजाने [यत्करोति परं धर्मं मुनिर्मूलफलाशनः। तत्र राजश्चतुर्भागः प्रजा धर्मेण रक्षतः ॥ अरण्यकाण्ड ६·१४.] अरण्यात राहणाऱ्या लोकांचेही संरक्षण केले पाहिजे कारण जरी ते कर देत नसले तरी राजाला त्यांच्या पुण्याचा अंश मिळत असतो असे महाभारत (शां. ६७·२७ इ०), रामायण (अरण्य ६·१४) आदि ग्रंथांत सांगितले आहे. ह्यावरून असे उघड होते की प्रजेने राजाची आज्ञा पालन करावी ह्याची पुढील कारणे सांगितली आहेत : (१) राजा देवाचा अंश असतो, (२) लोकांचे जीवित, स्वातंत्र्य आणि संपत्ती ह्याचे संरक्षण करण्याच्या कामी राजाची अत्यंत उपयुक्तता, (३) आज्ञा न मानल्यास शासन होण्याची भीती, (४) अत्यंत प्राचीन काळी राजा आणि लोक ह्यांच्या दरम्यान झालेला करार, (५) (राष्ट्र ह्या) एकाच संघटनेचे घटक विभाग ह्या नात्याने राजा आणि प्रजा ह्यांचे परस्परावलंबित्व.

**राजा कोणी व्हावे**? ह्याबद्दल निरनिराळी मते अस्तित्वात होती. मनूच्या (७·१ आणि २) मताने ज्याचा उपनयन संस्कार झाला आहे (अथवा ज्याला अभिषेक झाला आहे) अशा क्षत्रियाने आपल्या राज्यातील सर्वांचे संरक्षण करावे म्हणजे राजा होण्यास क्षत्रिय हाच सर्वात अधिक योग्य असतो. दुसऱ्या काही ग्रंथकारांच्या (पूर्वमीमांसा-पूर्वपक्ष) मताप्रमाणे 'राजन्' हा शब्द जो कोणी लोकांचे संरक्षण करतो

अनुक्रमणिका

(मग तो ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य कोणीही असो) त्याला लागतो. कुल्लूकाच्या मताप्रमाणे जो कोणी कर स्वीकारतो त्याने प्रजेचे संरक्षण केले पाहिजे (तो क्षत्रियच असला पाहिजे असे नाही). अनेक ब्राह्मण घराण्यांनी राज्यें आणि साम्राज्ये स्थापन केल्याचे इतिहासात दाखले आहेत. शुंग घराण्याचा प्रस्थापक पुष्यमित्र हा ब्राह्मण होता (एपि. इं. खं. २० पा ५४). काण्वायन, वाकाटक, कदंब हे राज्यकर्ते देखील ब्राह्मण होते (एपि इं. खं. ८ पा २४). मनूने (१२·१००) म्हटले आहे की ज्या ब्राह्मणाला वेद अवगत असतात तो राजा, सेनापती, शासनकर्ता होण्याला पात्र असतो. ज्या देशाचा राजा शूद्र असतो त्या देशात ब्राह्मणाने राहू नये असे मनूने (४·६१) सांगितले आहे. बऱ्याच पुराणांत सांगितले आहे की कलियुगात बहुतेक राजे शूद्र वर्णाचे होतील. आणि शूद्र राजे अश्वमेध यज्ञ करतील. ह्युएनत्संगाच्या वेळी सिंध प्रांतावर एक शूद्र राजा होता.

**पुरुषाने राजा व्हावे** हा बहुतेक सर्वसाधारण नियम असे. त्याला क्वचित अपवाद असत. एकादा राजपुत्र नसेल तर मृत राजाच्या कन्येला देखील राज्यावर बसवावे असे शांतिपर्वात (३३·४३।४५) सांगितले आहे. ऐतिहासिक काळात काश्मीर देशात सुगंधा राणी (इ. स. ९०४-९०६) होऊन गेली. (राजतरं. ५·२४९). तथापि स्त्रियांच्या सर्वसाधारण स्थितीमुळे, तसेच देशात अशांततेची परिस्थिती असल्यामुळे आणि युद्धाच्या दृष्टीने स्त्री राज्यकर्ती असणे इष्ट नसल्यामुळे स्त्रिया सामान्यतः राज्यकारभाराची जबाबदारी आपल्या शिरावर घेत नसत. गंजम येथे एक राजा मरण पावल्यावर त्याची राणी आणि तिच्या पश्चात तिची कन्या दंडी महादेवी हिने पुष्कळ वर्षे पर्यंत राज्य केले. (एपि. इं. खं. ६ पा १३८). अग्निवर्ण राजाच्या मृत्यूनंतर त्याची विधवा राणी सिंहासनावर बसली आणि तिने वंशपरंपरागत मंत्र्यांच्या साहाय्याने राज्यकारभार चालविल्याचे रघुवंशात (१९·५५, ५७) वर्णन केले आहे.

राजाचा **वारसा** सामान्यतः **वंशपरंपरेने** चालत असे आणि **ज्येष्ठ अपत्याकडे** जात असे. शत. ब्रा. मध्ये दहा पिढ्या राज्य चालत असल्याचा उल्लेख आहे. एकादा राजा मृत झाला अथवा त्याने राज्यत्याग केला म्हणजे त्याच्या ज्येष्ठ पुत्राने राज्यावर बसावे हा सर्वसाधारण नियम असे. ज्येष्ठाला बाजूला सारून कनिष्ठाने राज्य स्वीकारणे पाप आहे असे रामायणात (अयो० ८·२३।२४) म्हटले आहे. राजाचे सर्व पुत्र वारस होत नाहीत आणि इतर पुत्र जरी ज्येष्ठ पुत्रासारख्या योग्यतेचे असले आणि गुणसंपन्न असले तरी फक्त ज्येष्ठ पुत्रच बापाच्या मागून राजा होतो. मनूने (९·१०६) सांगितले आहे की ज्येष्ठ पुत्राच्या जन्माबरोबर मनुष्य आपल्या पितरांच्या ऋणातून मुक्त होतो म्हणून ज्येष्ठ पुत्र पित्याची सर्व संपत्ती मिळण्याला पात्र असतो.

राजधर्म कौस्तुभ (पा. २३४।३५) ह्या ग्रंथात कालिका पुराण आणि रामायण ह्यांच्या आधारावर पुढील सिद्धांत काढले आहेत : (१) राजाचा औरस पुत्र इतर गौण पुत्रांच्या हून वयाने लहान असला तरी तो गौण पुत्रांना बाजूला सारून पित्याच्या मागून राजा होतो; (२) समान वर्णाच्या कनिष्ठ राणीचा पुत्र ज्येष्ठ राणीच्या पुत्राहून वयाने मोठा असला तर तो ज्येष्ठ राणीच्या पुत्राला बाजूला सारून राजा होतो; (३) दोघा राण्यांना एकाच वेळी पुत्र झाले असले तर ज्येष्ठ राणीच्या पुत्राला अग्राधिकार मिळतो; (४) ज्येष्ठ राणीला जुळे पुत्र झाले असले तर जो पुत्र प्रथम जन्मला असेल त्यालाच राज्य मिळते. ज्येष्ठ पुत्राला शारीरिक अथवा मानसिक व्यंग असेल तर त्याला बाजूला सारून कनिष्ठ भाऊ राजा होतो असे मनुस्मृतीत (९·२०१) सांगितले आहे.

शुक्रनीतिसार (१·३४६।३४८) ह्या ग्रंथात सांगितले आहे की राजाच्या अनेक पुत्रांमध्ये **राज्याची विभागणी** करण्यापासून काही लाभ होत नाही, उलट लहान लहान राज्ये शत्रूला सहज जिंकता येतील. म्हणून जेव्हा ज्येष्ठ पुत्र राज्याचा अधिकारी होईल तेव्हा त्याने आपल्या कनिष्ठ बंधूंना राज्यांतील प्रांतांचे अधिकारी अथवा कोशाध्यक्षासारखे अधिकारी करावे. वारसासंबंधी राजधर्मकौस्तुभामध्ये म्हटले आहे की (१) ज्येष्ठ पुत्रामध्ये काही वैगुण्य असल्याने जरी तो राजा झाला नाही तरी त्याच्या पुत्राचा राज्यावरील अधिकार अबाधित राहतो; (२) ज्येष्ठ पुत्र अपात्र असल्यामुळे कनिष्ठाला राज्याभिषेक केला असेल त्यावेळी त्या कनिष्ठ पुत्रानंतर त्याच्या अभिषेकानंतर झालेल्या ज्येष्ठबंधूच्या पुत्राला अधिकार न मिळता कनिष्ठाचा पुत्र राजा होतो.

**चांगल्या राजाच्या अंगचे गुण :** राज्यशास्त्रावरील बहुतेक सर्व ग्रंथांत चांगल्या राजाच्या ठिकाणी कोणते गुण असावेत ह्याविषयी विवेचन केलेले असते. याज्ञ. स्मृतीमध्ये (१·३०९-३११ आणि ३१४) राजाच्या अंगच्या अंतरंग आणि बहिरंग अशा दोन प्रकारच्या गुणांच्या याद्या दिल्या आहेत. अंतरंग गुण हे अधिक महत्त्वाचे असून त्यात शक्ति, औदार्य, इतरांनी आपल्याशी केलेल्या (चांगल्या अथवा वाईट) वर्तनाची जाणीव असणे, (तप, विद्या आणि अनुभव ह्यांत) वृद्ध असणाऱ्यांवर अवलंबून राहणे, मनाला योग्य वळण लागलेले असणे, (वैभवात अथवा अवनत स्थितीत) समतोल स्वभाव, (मातृ आणि पितृवंशांकडून) सत्कुलात जन्म, सत्यवचनीपणा, (शरीर आणि मन ह्यात) शुद्धता, कार्यतत्परता, प्रखर स्मरणशक्ती, धर्माचे पालन करणे, व्यसनराहित्य, स्वतःच्या राज्याच्या प्रतिकूल गोष्टी गुप्त ठेवण्यात कौशल्य, (तर्कशास्त्र, राजशास्त्र, अर्थशास्त्र आणि तीनवेद ह्यांचे) उत्तम अध्ययन, ब्राह्मणांशी सहनशीलता, शत्रूंशी क्रोधयुक्तता, मित्रांशी सरळ वर्तन, सेवकांशी आणि प्रजाजनांशी पित्याप्रमाणे दयाळूपणा इत्यादी गुणांचा समावेश केला आहे. बहिरंग गुणांत मंत्री, पुरोहित आणि याज्ञिक ह्यांची निवडणूक करणे, सत्पात्र ब्राह्मणांना दान देणे, संरक्षण करणे इत्यादि गुणांचा समावेश केला आहे. कौटिलीय (६·१) मध्येही राजाच्या अंगी निरनिराळ्या दृष्टीने कोणकोणते गुण असावेत ह्यांच्या याद्या दिल्या आहेत. याज्ञ. मध्ये सांगितलेल्या अंतरंग गुणांना त्यात 'अभिगामिक' गुण म्हटले आहे. अशाच स्वरूपाच्या याद्या शांतिपर्व (अ. ७०), कामसूत्र (१·२१।२२, ४·१५।१९) इत्यादि ग्रंथांतही दिल्या आहेत. सभापर्व (५·१०७-१०९) आणि रामायण (२·१००. ६५।६७) ह्यांत राजाने टाळावयाच्या दोषांच्या याद्या दिल्या आहेत. त्यांत नास्तिक्य, मिथ्या भाषण, रागीट स्वभाव, निष्काळजीपणा, दीर्घसूत्रीपणा, इंद्रियजन्य पांच विषयांची आसक्ती, (मंत्र्याशिवाय) स्वतः एकट्यानेच राजकार्याचा विचार करणे, राजनीति न जाणणाऱ्या लोकांचा सल्ला घेणे, शाहण्या मनुष्यांची भेट न घेणे, राज्याच्या धोरणातील गुप्त गोष्टी गुप्त न राखणे, इत्यादिकांचा समावेश केला आहे.

धर्मशास्त्राच्या आणि अर्थशास्त्राच्या ग्रंथांत राजाच्या शिक्षणाविषयी आणि त्याच्या नैतिक शिस्तीविषयी बरेच विवेचन केलेले असते. गौतमधर्मसूत्रात (११·३) असे सांगितले आहे की राजाने त्रयी आणि आन्वीक्षिका ह्या विद्यांचे अध्ययन केले पाहिजे. मनु, शांतिपर्व, कौटिलीय इत्यादी ग्रंथांत राजाच्या शिक्षणात आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता आणि दंडनीति ह्या चार विषयांचा समावेश केला आहे. औशनस् सांप्रदायाच्या मताप्रमाणे राजाने दंडनीति ही एकच विद्या शिकावी. कारण सर्व विद्या शिकण्याचे प्रयत्न दंडनीतीशी जोडलेले असतात. 'दंडनीतिरेव विद्या' असे बार्हस्पतसूत्रात (१·३) म्हटले आहे.

त्रयी ह्या शब्दात तीन वेद, अथर्ववेद, इतिहास वेद (इतिहास आणि पुराणे) आणि शिक्षाकल्पादि वेदांगे ह्यांचा समावेश होतो असे कौटिल्याने म्हटले आहे. (अर्थशास्त्र १·२ आणि ३) आन्वीक्षिकी विद्येचा अर्थ निरनिराळ्या ग्रंथकारांनी निरनिराळा केला आहे. कौटिलीयात (१·२) आन्वीक्षिकी विद्येत सांख्य, योग

आणि लोकायत ह्यांचा समावेश केला आहे आणि ही विद्या नेहमी सर्व विद्यांना मार्ग दर्शविणाऱ्या दीपासारखी असते असे म्हटले आहे. हा शब्द ईक्ष धातूला अनुप्रत्यय लावून झाला असून त्याचा अर्थ तर्कशास्त्र असल्याचे त्याने म्हटले आहे. कौटिल्यानंतरच्या ग्रंथकारांनी लोकायत ह्या शब्दाचा अर्थ नास्तिक असा धरला आहे. अमरकोश, विश्वरूप, हरदत्त इत्यादींनी आन्वीक्षिकी ह्या शब्दाचा अर्थ तर्कशास्त्र असाच धरला आहे. कामसूत्र, (२·७ आणि ११), मिताक्षरा (याज्ञ. १·३११) प्रभृतींनी आन्वीक्षिकी म्हणजे 'आत्मविद्या' (अध्यात्मशास्त्र) असा केला आहे. वार्ता ह्या विषयात शेतकी, पशुसंवर्धन आणि व्यापार ह्यांचा समावेश होतो. वार्ता विद्येच्या योगाने धान्य, पशु, सुवर्ण व इतर धातु आणि मोफत कामकरी ह्यांची प्राप्ती होऊन राष्ट्राचा उत्कर्ष होतो आणि राजाला संपत्ती आणि सैन्य मिळते असे कौटिल्याने (१·४) म्हटले आहे.

राजपुत्राचे शिक्षण राजधानीत अथवा जवळच्या विद्यालयात होई. केव्हा केव्हा तक्षशीलासारख्या प्रसिद्ध विद्यापीठातही राजपुत्राचे शिक्षण होई. शिक्षणाचा प्रारंभ चौल संस्कार झाल्यावर (म्हणजे वयाच्या तिसऱ्या वर्षी अथवा तिसऱ्या वर्षानंतर) होऊन त्याने लिहिणे आणि गणित हे विषय शिकावे. पुढे उपनयन झाल्यावर त्याने वेदविद्येत पारंगत असलेल्या गुरूपासून तीन वेद आणि आन्वीक्षिकी ह्या विद्यांचे शिक्षण घ्यावे, दंडनीतीचे ज्ञान योग्य गुरु अथवा अनुभवी राजकारणी मुत्सद्दी ह्यांच्यापासून मिळवावे, वार्ता ह्या विषयाचे ज्ञान निरनिराळ्या खात्यांचे अध्यक्ष अथवा अधिकारी ह्यांच्यापासून संपादन करावे. राजपुत्राने ह्या विद्यांचे अध्ययन १६ व्या वर्षापर्यंत करावे आणि त्यानंतर विवाह करावा. राजपुत्राने गुरू विश्वसनीय, ज्यांच्यावर राजाची गैरमर्जी झालेली नाही अथवा राजाकडून ज्यांचा अपमान झालेला नाही असे असावे असे अग्निपुराणात (२२५·१-४) सांगितले आहे. राजपुत्राने पुढेही शिक्षणाने लागलेली शिस्त वृद्धिंगत व्हावी ह्याकरिता त्या त्या विद्यांत निपुण असणाऱ्या लोकांचा नेहमी सहवास करावा.

राजाचे ठिकाणी नैतिक शिस्त असणे आणि त्याचे मनोविकार आणि इच्छा ह्यांना योग्य वळण लागणे ह्या गोष्टी अत्यंत आवश्यक असतात असेही निरनिराळ्या ग्रंथांत आवर्जून सांगितले आहे. कौटिल्याने (१·६) म्हटले आहे की वासनांचा निग्रह हे विद्येमध्ये नैपुण्य मिळविण्याचे कारण असते. ह्याकरिता कामक्रोधादि सहा दोषांचा-षड्रिपूंचा– त्याग करून शिस्त संपादन करण्याचा प्रयत्न करावा. एकादा मनुष्य दिगंत पृथ्वीचा सम्राट असला तरी जर त्याचा त्याच्या इंद्रियांवर ताबा नसेल तर तो तात्काल नाश पावेल. कामक्रोधादि सहा मनोविकारांना 'शत्रु षड्वर्ग' अथवा 'अरिषड्वर्ग' अशी संज्ञा आहे. ह्या प्रत्येकापासून उत्पन्न होणाऱ्या दुर्गुणांची आणि त्यांच्या योगाने नाश पावलेल्या राजांची कौटिलीयात उदाहरणे दिली आहेत. राजाच्या व्यसनांत द्यूत हे सर्वांत अधिक अपायकारक असल्याचे कामसूत्र, (१४·६५) आणि कौटि. (८·३) यांनी मानले आहे. त्याप्रमाणेच मद्यपान आणि स्त्रियांविषयी आसक्ती ह्या व्यसनांचीही त्यांनी निंदा केली आहे. कामसूत्रात (१.४०-४६) म्हटले आहे की मनुष्याला पांचही इंद्रियजन्य विषयांचा उपभोग घेणे शक्य असते आणि तसा उपभोग तो घेतोही, परंतु त्याने त्या बाबतीत अत्यंत संयम पाळणे अवश्य आहे.

राजाच्या दैनिक कार्यक्रमाविषयीही निरनिराळ्या ग्रंथांत विवेचन केलेले असते. राजाने दिवसाचा पूर्वार्ध हत्ती, घोडे, रथ ह्यांच्यावर आरोहण करण्याचा आणि शस्त्रविद्येचा अभ्यास करण्यात घालवावा आणि उत्तरार्ध इतिहासाचे श्रवण करण्यात घालवावा.

प्राचीन भारतीय ग्रंथकारांनी राजपुत्राच्या शिक्षणाला इतके विशेष महत्त्व दिले आहे ह्याचे कारण त्यांच्या मनातील राजाचा आदर्श 'राजा राजर्षि (राजा असून ऋषि) असावा' हा असे. कालिदासाने

शाकुंतल आणि रघुवंश ह्या ग्रंथात ह्या गोष्टीचा पुष्कळ वेळा उल्लेख केला आहे. साक्रेटिसाप्रमाणेच त्या ग्रंथकारांना हा सिद्धांत माहित होता की जोपर्यंत तत्त्ववेत्ते राजे होणार नाहीत अथवा राजे लोक तत्त्ववेत्ते होणार नाहीत तोपर्यंत राष्ट्रांना आपल्यामधील वैगुण्ये काढून टाकण्यात यश येणार नाही.

——————

अनुक्रमणिका

# प्रकरण ६२

## राज्यकर्त्यांची कर्तव्ये आणि त्यांच्यावरील जबाबदाऱ्या

(मू. ग्रं. पा. ३.५६—१०३)

प्रजेचे संरक्षण करणे हे राज्यकर्त्यांचे पहिले आणि सर्वांत अधिक महत्त्वाचे कर्तव्य आहे ह्याविषयी सर्व ग्रंथांची एकवाक्यता आहे. सर्वही राजशास्त्रप्रणेत्यांनी संरक्षण हा राजाचा सर्वांत श्रेष्ठ धर्म असल्याचे सांगितले आहे असे शांतिपर्वात (६८—१—४) म्हटले आहे. प्रजेचे संरक्षण करण्याप्रमाणेच वर्णाश्रमधर्माचे नियम प्रजेकडून पाळले जात आहेत किंवा नाहीं ह्याच्याकडे लक्ष्य देणे, दुष्टांना शासन करणे आणि न्याय देणे ही राजांची मुख्य कर्तव्ये [तत्प्रजापालनं प्रोक्तं त्रिविधं न्यायवेदिभिः । परचक्राचौरभयाद् बलिनो न्यायवर्तिनः ॥ बृहस्पति (राजनीतिप्रकाश पा. २५४—२५५).] आहेत असे निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहे. (गौतम १०·७-८; बृहस्पती-राजनीतिप्रकाश पा. २५४।२५५).

संरक्षणाचे कर्तव्य करावयाचे म्हणजे त्याकरिता युद्ध करणे आणि प्रसंगी मृत्यू पावणे ह्या गोष्टी ओघानेच येतात, ह्याकरिता धर्मशास्त्रावरील ग्रंथांत असे सांगितलेले असते की युद्ध करणे हे क्षत्रियाचे कर्तव्य आहे आणि रणभूमीवर मरण पावणे हे त्याचे सर्वोच्च ध्येय असावे. युद्धात लढत असता पलायन न करता जे राजे मरण पावतील त्यांना स्वर्ग मिळतो असे निरनिराळ्या ग्रंथांत आश्वासन दिले आहे. (मनु ७·८७—८९). एकाद्या रोगाची पीडा होऊन घरात मरण पावणे हे क्षत्रियाच्या बाबतीत पापकृत्य असते असे महाभारतात (भीष्म १७·११) सांगितले आहे.

कामंदकाने (५·८२।८३) म्हटले आहे की राजाचे अधिकारी, चोर, राजाच्या प्रेमातील (राणी, राजपुत्र ह्यांच्यासारखे) लोक आणि राजाचा स्वतःचा लोभ इतक्यांपासून प्रजाजनांना संरक्षण पाहिजे असते. शांतता आणि सुव्यवस्था राखणे एवढ्यानेच शासनसंस्थेचे कर्तव्य संपत नसून शासनसंस्था ही संस्कृतिप्रसाराचे एक साधन झाली पाहिजे असे मानण्यात येत असे. अनाथ, वृद्ध, अंध, अपंग, वेडे, विधवा, मातृपितृहीन अर्भके, रोगी आणि संकटग्रस्त, गरोदर स्त्रिया ह्यांना त्यांच्या त्यांच्या गरजेप्रमाणे औषधे, आसरा, अन्न आणि आच्छादन देऊन त्यांचे संगोपन करणे हेही राजाचे कर्तव्य असते. (शांति ८६· २४; सभा ५·१२४). आधुनिक काळातही शासनसंस्था ही बहुसंख्याक लोकांना सुखसोई मिळवून देणारी संस्था झाली आहे. प्राचीन भारतात त्यासारख्या सुखसोयी देण्यासंबंधी कायदे नसले तरी लोकमत, श्रेष्ठ प्रतीच्या ग्रंथकारांनी प्रदर्शित केलेली मते आणि श्रेष्ठ प्रकारच्या राजांनी केलेले आचरण ह्या सर्वांच्या समुच्चयाने अशा प्रकारचे वातावरण बनले होते की विद्येला उत्तेजन देणे, अंध, अपंग-वृद्ध आणि विधवा ह्यांचे पालन पोषण करणे आणि ज्यांना उद्योग नसेल त्यांना उपजीविकेची साधने मिळवून देणे ह्या गोष्टी राष्ट्राचा आणि राष्ट्राच्या धनाचा प्रतिनिधी ह्या नात्याने राजाने केल्याच पाहिजेत असे मानले जाई. अशोकांच्या शिलालेखावरून (खं. १ पा २८) असे समजून येते की त्याने मनुष्यांकरिता आणि पशूंकरिता रुग्णालये स्थापन केली होती, सदावर्ते, धर्मशाळा, पाणपोया स्थापन केल्या होत्या, राजरस्त्यांच्या आणि कालव्यांच्या बाजूने छायेकरिता झाडे लावली होती, वृद्ध लोकांकडे जाऊन तो त्यांचे पालन पोषण करीत असे. अशीच कृत्ये दुसऱ्याही अनेक सम्राटांनी केल्याचे आढळून येते.

अनुक्रमणिका

कौटिलीयात [प्रजासुखे सुखं राज्ञः प्रजानां च हिते हितम्। नात्मप्रियं हितं राज्ञः प्रजानां तु प्रियं हितम्॥ अर्थशास्त्र १·१९] (१·१९) म्हटले आहे की प्रजेच्या सुखात राजाचे सुख असते. प्रजेच्या भरभराटीत राजाची भरभराट असते, राजाला स्वतःला जे आवडेल ते करण्यात राजाचे हित नसून प्रजेला जे आवडेल ते करण्यात राजाचे हित असते. प्राचीन ग्रंथकारांनी राजाची सत्ता ही पित्याच्या अपत्यावरील सत्तेसारखी असते असे सांगितले आहे. रामायणात (अरण्य ६.११) म्हटले आहे की जर एकाद्या राजाने प्रजेच्या (शेतातील) उत्पन्नाचा सहावा अंश घेऊनही तिचे आपल्या अपत्याप्रमाणे संरक्षण केले नाही तर त्याने मोठा अनर्थ केल्यासारखे होईल.

अत्यंत प्राचीन काळापासून राजांचे अनेक वर्ग असत. ऋग्वेदात (१·६५·७; ९·१०·३) 'राजन्' हा शब्द राजा आणि त्याचे सरदार अशा दोन अर्थाने वापरला आहे. ऋग्वेदात 'सम्राज्', 'सम्राट' (६·६८·९)', 'एकराट्' (८·३७·३) हे शब्दही आले आहेत. अथर्ववेदात (४·९·४) अधिराजा म्हणजे सम्राट ही कल्पना स्पष्टपणे मांडली आहे. अथर्ववेदात, 'उग्र' हा शब्द एक बलिष्ठ राजा ह्या अर्थाने आला आहे. (३·४·३). ऐत. ब्रा. [साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं माहाराज्यमाधिपत्य मयं समन्तपर्यायी स्यात्सार्वभौमः सार्वायुष आन्तादापरार्धात् पृथिव्यै समुद्रपर्यन्ताया एकराळिति.....। ऐत. ब्रा. ३९·१.] (३९·१) मध्ये 'भौज्य', 'स्वाराज्य', 'वैराज्य' आणि 'पारमेष्ठ्य' राज्य असे शब्द राजाला उद्देशून आले आहेत. त्यांचा अर्थ बहुधा सर्वश्रेष्ठ सत्ता असा असावा असे वाटते. शत. ब्रा. मध्ये (५·१·१·१३) सांगितले आहे की, राजसूय यज्ञ करणारा राजा होतो आणि वाजपेय यज्ञ करून तो सम्राट होतो. राजाची पदवी खालच्या प्रतीची असते आणि सम्राटाची वरच्या दर्जाची असते. ऋग्वेद काळी अनेक राज्यांवर अधिराज्य असण्याची कल्पना ज्ञात होती आणि ती कल्पना ऐत. ब्रा. आणि शत० ब्रा० ह्यांच्या रचनाकाळापूर्वी बद्धमूल झाली होती. पाणिनीने 'सार्वभौम' ह्या शब्दाचा अर्थ सर्व पृथ्वीचा अधिपती असा सांगितला आहे. अमरकोशात राजपार्थिव, क्ष्माभृत, नृप, भूप आणि महिक्षित हे समानार्थी शब्द असल्याचे सांगितले आहे. चक्रवर्ती हा शब्द सार्वभौम ह्या शब्दाइतका प्राचीन नसला तरी तो फार प्राचीन काळापासून वापरला जात असे. क्षीरस्वामीने चक्रवर्तिन् ह्याची व्युत्पत्ती अशी दिली आहे की, 'जो राजांच्या चक्रावर (म्हणजे समुच्चयावर) आधिपत्य करतो तो चक्रवर्तिन्' अथवा 'जो चक्राला म्हणजे राज्याला आपल्या आज्ञेत वागावयास लावतो तो चक्रवर्तिन्'. ज्या राजाचे राज्य समुद्रापासून उत्तरेकडे हिमालयापर्यंत पसरलेले असते तो चक्रवर्ती अशी व्याख्या कौटिल्याने (९·१) दिली आहे. अशाच अर्थाचा 'चतुरन्तो राजा' असा शब्दही कौटिल्याने वापरला आहे. शुक्रनीतिसार (१·१८३।१८७) ह्या ग्रंथात असे वर्णन केले आहे की १ ते ३ लक्ष चांदीचे कर्ष इतके उत्पन्न असणाऱ्या राजाला सामंत म्हणतात, ४ ते १० लक्ष उत्पन्नाच्या राजाला मांडलिक म्हणतात, ११ ते २० लक्ष उत्पन्नाचा राजन् असतो, २१ ते ५० लक्ष उत्पन्नाचा महाराज असतो, ५१ लक्ष ते १ कोटी उत्पन्नाचा स्वराट असतो, २ ते १० कोटी उत्पन्नाचा विराट असतो आणि सर्व पृथ्वीवर म्हणजे सर्व भरतवर्षावर आधिपत्य असणारा सार्वभौम असून त्याचे उत्पन्न ११ ते ५० कोटी चांदीचे कर्ष इतके असते.

प्राचीन भारतात मांडलिक राजांच्या सर्व कृत्यांवर सम्राटाचा नेहमी ताबा असेच असे नाही. सामान्यतः मांडलिकाने आपले वर्चस्व मान्य करावे ह्या गोष्टीची सम्राटाला जितकी इच्छा असे तितकी मांडलिकांच्या ताब्यातील प्रदेश मिळविण्याची नसे. साम्राज्य स्थापन करणे म्हणजे जिंकलेल्या देशांवर विजेत्यांची भाषा अथवा शासनपद्धती लादणे असा अर्थ नसे. कौटिलीयात (१२·१) आणि नीतिवाक्यामृत (पा. ३६२।६३) ह्या ग्रंथात विजेते तीन प्रकारचे सांगितले आहेत :— (१) **धर्म विजयिन्** म्हणजे जिंकलेल्या राजाने शरणागति मान्य केली अथवा वंदन केले म्हणजे संतुष्ट होणारा, (२) **लोभविजयिन्** म्हणजे जिंकलेल्याकडून देश आणि संपत्ती मिळाल्याने संतुष्ट होणारा (३) **असुरविजयिन्** म्हणजे जिताचा प्रदेश आणि संपत्ती यांनी संतुष्ट न होता त्याचे पुत्र, भार्या आणि जीवित् हरण करणारा. अशोकाने आपल्या

दिग्विजयाला धर्मविजय म्हटले आहे. (शिलालेख पा ४४). हर्षचरित (५) वरून असे दिसून येते की जिंकलेल्या मांडलिक राजांच्या राण्यांना देखील सम्राट आणि सम्राज्ञी ह्यांच्या राज्याभिषेकाच्या वेळी दासींची कामे करावी लागतात, कौटिल्याने (७·१६) सांगितले आहे की विजेत्याने युद्धात हत झालेल्या जितांच्या देशाचा, संपत्तीचा, पुत्रांचा आणि स्त्रियांचा अभिलाष करू नये, कारण तसे केल्यास राजमंडळ प्रक्षुब्ध होते आणि विजेत्याचा घात करण्यास प्रवृत्त होते, त्याने मृत राजांच्या नातलगांना त्यांच्या त्यांच्या स्थानी पुन्हा स्थापन करावे. याज्ञ. स्मृति (१·३४२।४३)' विष्णुधर्मसूत्र (३·४२ आणि ४७।४९), मनु. (७·२०२।२०३) ह्या ग्रंथांत म्हटले आहे की विजयी राजाने जित राजाच्या राज्यांचे आपल्या स्वतःच्या राज्यासारखे संरक्षण केले पाहिजे आणि जिंकलेल्या देशातील चालीरीती, प्रचलित कायदे आणि कुलाचार ह्यांना त्याने मान दिला पाहिजे. ज्या मंत्र्यांच्या सल्ल्यावरून जित राजाने युद्धाला प्रारंभ केला असेल त्याचा छळ विजेत्याने केला तरी चालेल असे कात्यायनाने (राज. नी. प्र. पा ४११) सांगितले आहे. हे नियम प्राचीन सम्राट सामान्यतः पाळीत असत.

राजांच्या पदव्या उत्तरोत्तर मोठमोठ्या होऊ लागल्या. अशोक आपल्यास राजा म्हणवी, खारवेल ह्याला महाराज ही पदवी लावली जात असे, कुषण सम्राट हविष्क ह्याची पदवी 'महाराजराजाधिराज देवपुत्र' अशी होती, गुप्त सम्राट समुद्रगुप्ताला नुसते 'महाराज' असे म्हटले आहे परंतु त्याच्या मागून झालेल्या सम्राटांनी आपल्यास 'परम भट्टारक-महाराजाधिराज' अथवा केव्हा केव्हा 'परमभट्टारक महाराजाधिराज-परमेश्वर' अशा पदव्या लावल्या आहेत.

राज्याभिषेक हा एक मोठा गंभीर स्वरूपाचा आणि महत्त्वाचा विधी असे. ह्या विधीची वर्णने ऐत. ब्रा. (३८), गोपथ ब्रा. (राजध. कौ. पा ३३५।३६), सामविधान ब्रा. (३.५) ब्रह्मपुराण, (राजध. काण्ड), विष्णुधर्मोत्तर (खंड २) इत्यादी ग्रंथांत केली आहेत. हा विधी वेदोक्त मंत्रांनी होत आहे. परंतु पुढे शूद्र जातीचे राजे होऊ लागल्यावर पुराणोक्त विधी सुरू झाले. क्षत्रिय राजांना शपथ करावी लागे. 'मी तुमचा द्रोह केला तर माझ्या जन्मापासूनच्या इष्टापूर्तापासून मिळालेले पुण्य, सुकृत, जीवित, प्रजा ह्या सर्वांचा तुम्ही नाश करा'. राजा मृत झाल्यास नवीन राजाच्या राज्याभिषेकाला शुभ मुहूर्ताची आवश्यकता नसे.

पट्टराणीचा अभिषेक राजाच्या समवेत होत असे. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकापूर्वीच्या त्यांच्या राण्यांबरोबर त्यांनी पुन्हा वेदोक्त विधींनी विवाह केले.

छत्र, चामर आणि वेत्रदंड ही राजचिन्हे समजली जात असत. केव्हा केव्हा राज्याभिषेकानंतर राजा दुसरे नाव धारण करी आणि अशा नावाला 'अभिषेकनाम' म्हणत. कित्येक राजे अश्वमेध यज्ञ केल्यानंतर नवीन पदव्या धारण करीत. पहिला कुमारगुप्त ह्या राजाने 'महेन्द्र' ही पदवी धारण केली होती असे त्याच्या काही काही नाण्यांवरून दिसून येते.

वराहमिहिराच्या बृहत्संहिता (४८) ह्या ग्रंथात राजा आणि इतर प्रमुख अधिकारी ह्यांच्या करिता करावयाचे पट्ट (म्हणजे शिरपेच) ह्या संबंधी नियम सांगितले आहेत. राजाचा शिरपेच शुद्ध सोन्याचा करावा, त्याची लांबी मध्यभागाच्या रुंदीच्या दुप्पट असावी, त्याला पाच तुरे असावेत, राणीच्या आणि युवराजाच्या शिरपेचाला तीन तुरे असावेत, इत्यादि नियम त्यात आहेत. नीतिमयूख (पा. १३) प्रभृती ग्रंथांत सांगितले आहे की पट्ट हा राजाच्या कपाळावर बांधावयाचा असतो आणि मुकुट हा मस्तकावर ठेवावयाचा

असतो. सम्राटाचा पट्ट दीड हात उंच असावा. राजाचा पट्ट सवा हात उंच आणि सामंताचा (मांडलिक राजाचा) पट्ट एक हात उंच असावा असेही काही ग्रंथांत सांगितले आहे.

पहिल्या राज्याभिषेकाच्या वाढदिवशी (नक्षत्र तेच येईल तेव्हा) राजाने राज्याभिषेकाचा विधी पुन्हा पुन्हा करावा असे विष्णुधर्मोत्तर (२·१६२), ब्रह्मपुराण (राजध, कौ. पा. १०) इत्यादी ग्रंथांत सांगितले आहे.

राजाने विषप्रयोगाविषयी विशेष सावधगिरी घ्यावी ह्यासंबंधी नियम मनुस्मृति (७·२१७-२२०) प्रभृति ग्रंथांत सांगितले आहेत. राजाने राजपुत्रांपासूनही आपले संरक्षण करावे, राणीचाही विश्वास मानू नये, भक्षण करावयाच्या अन्नात विषप्रतिबंधक औषधे मिसळावी आणि विषाचा प्रतिकार करणारी रत्ने नेहमी अंगावर धारण करावी इत्यादी नियम त्यांत सांगितले आहेत. निरनिराळ्या ग्रंथांत अशा तऱ्हेने विषप्रयोगामुळे आणि विश्वासघाताने मृत्यू पावलेल्या राजांची अनेक उदाहरणे दिली आहेत. तथापि कोणत्याही राजाचे जीवित भारतात सुरक्षित नसे असा सर्वसाधारण निर्णय काढणे योग्य होणार नाही. भारतासारख्या विस्तीर्ण खंडप्राय देशात नेहमी एकाच वेळी अनेक राज्ये असत. तेव्हा सहस्रावधी वर्षांच्या काळात अशा मोठ्या विस्तीर्ण प्रदेशात काही राजांना विश्वासघाताने आणि कारस्थानांनी मृत्यू आला असल्यास त्यात काही आश्चर्य नाही. अशी स्थिती केवळ भारतातच होती असे नाही.

वंशपरंपरा राजसत्ता ही प्राचीन आणि मध्ययुगीन काळात सर्वसाधारण नियम होता. बुद्धाच्या काळी काही गणराज्ये आणि प्रजासत्ताक राष्ट्रे अस्तित्वात होती. शांतिपर्वातही (अ० १०७) गणराज्यासंबंधी (म्हणजे काही समूहांची सत्ता असणाऱ्या राज्यांसंबंधी) माहिती दिली आहे. आणि त्यात अशा राज्यांचे दोष वर्णन केले आहेत. तथापि आमच्या धर्मशास्त्रावरील आणि अर्थशास्त्रावरील प्रमुख ग्रंथांत अशा राष्ट्रांविषयी फारच अल्प माहिती मिळते. महाभारतात (शांति. अ. १०७) अनेक लोकांच्या हाती राज्यसत्ता असणाऱ्या राज्यसंस्थेचे मर्म अचुकपणे दाखविले आहे, ते हे की अशा राज्यात गुप्तता राखता येत नाही, लोभ आणि मत्सर ह्यांच्यामुळे राज्यकारभारात दुर्वर्तन होऊ लागते आणि त्यामुळे राज्यसत्ता कोसळून पडते. दुसऱ्या एका ठिकाणी शांतिपर्वात (अ. ८१) वृष्णींच्या संघाचा उल्लेख केला आहे. संघाचा नाश अंतर्गत कलहाने आणि दुर्वर्तनाने होतो ह्या सनातन सत्याचा महाभारताने उल्लेख केला असून संघाच्या सूज्ञ पुढाऱ्यांच्या अंगात चातुर्य, क्षमा, आत्मसंयमन आणि निर्लोभीपणा हे चार गुण असले पाहिजेत असा निष्कर्ष काढला आहे.

महाभारतात संघ आणि गण हे शब्द समान अर्थाने योजले आहेत. पाणिनी आणि पतंजली ह्यांनीही तसेच म्हटले आहे. पाणिनीला आयुधजीविन् म्हणजे शस्त्रविद्येचा व्यवसाय करणारा आणि दुसरा आयुधजीविन् नसणारा अशा दोन प्रकारच्या संघांची माहिती होती आणि अशा काही संघांची नावे त्याने दिली आहेत. कौटिल्याने (१·१७) एके ठिकाणी म्हटले आहे की काही वेळा राष्ट्रावर एका कुलाची सत्ता असू शकते, कारण कुलाचा संघ दुर्जय असतो, त्यात अराजकतेचे संकट असत नाही. आणि म्हणून ती सत्ता पृथ्वीवर दीर्घकालपर्यंतही टिकते. कौटिल्याने (११·१) अशी माहिती दिली आहे की कंबोज आणि सुराष्ट्र ह्या देशांतील क्षत्रियांचे आणि इतरांचे संघ **वार्ता** (म्हणजे शेतकी, व्यापार आणि शस्त्रविद्या) हा व्यवसाय करीत असतात आणि लिच्छिविक, वृजिक, मल्लक इत्यादी देशातील संघ 'राजन्' ह्या संज्ञेवर उपजीविका करीत असतात (म्हणजे ते लोक शेतकरीही नाहीत आणि सैनिकही नाहीत तर ते केवळ पुढारी अथवा सरदार आहेत). इ. स. च्या ५ व्या अथवा ६ व्या शतकानंतर गणराज्ये अथवा लोकसत्ताक राज्ये कमी कमी होऊ लागली आणि क्रमाक्रमाने नाहीशी झाली. ह्या जनराज्यासंबंधी अधिक माहिती बुद्धधर्मीय

ग्रंथांवरून मेग्यास्थेनिससारख्या ग्रीक ग्रंथांवरून, नाण्यावरून आणि शिलालेखांवरून मिळते, अशा लोकसत्ताक व्यवस्था असणाऱ्या राज्यांपैकी कपिलवस्तु येथील शाक्य, कुसीनारा आणि पावा येथील मल्ल, मिथिलेचे विदेह, वैशाली येथील लिच्छवी ह्यांच्यासारखी काही राज्ये सुप्रसिद्ध आहेत. अशा राष्ट्रावरील पुढाऱ्याची निवड करण्यात येई आणि अशा पुढाऱ्याला राजा अशी पदवी असे. तथापि लोकसत्ताक अथवा अल्पसत्ताक राज्यपद्धती संबंधी सर्वात महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे मताचा अधिकार कोणाला असे, राज्यकारभार चालविणाऱ्या सभेच्या सभासदांच्या पात्रतेविषयी काय नियम असत, मतदान कसे करण्यात येई, अशा सभासदांची किती मुदत असे, अध्यक्ष तहाहयात निवडला जाई किंवा काही मर्यादित मुदतीपुरता निवडला जाई, अथवा अध्यक्षाची निवडणुकच होत नसे, अशा सभांचे अधिकार काय असत आणि कार्यपद्धती कोणती असे ह्यांबद्दल मुळीच काही माहिती मिळत नाही.

राजसत्ताक देशात लोकांनी निवडलेले सभासद असलेल्या परिषदा अथवा आधुनिक भाषेत ज्यांना 'संसद' (पार्लमेंट) असे म्हणतात तशा प्रकारच्या सभा असत किंवा नाही त्या प्रश्नाचे विवेचन करताना 'सभा' आणि 'समिती' ह्या शब्दांचा विचार करणे अवश्य आहे. ऋग्वेदामध्ये (१०·३४.६) 'सभा' ह्या शब्दाचा अर्थ द्यूत खेळण्याची जागा असा असावा. वाज. सं. मध्ये (३०·६) 'सभाचार' हा शब्द आला असून त्याचा अर्थ न्यायसभेचा एक सभासद असा असावा असे दिसते. अथर्ववेदात (७·१२·१) 'सभा' आणि 'समिती' ह्या प्रजापतीच्या दोन कन्या असल्याचे सांगितले आहे. तै. ब्रा. मध्ये (३·७·४) 'सभापाल' हा शब्द आला आहे. वेदकालात सभा आणि समिती ह्यांची घटना कशा प्रकारची होती हे सांगणे अशक्य आहे. सभा अथवा समिती हा एक लोकांचा समूह असून अशा समूहांमध्ये राजा, विद्वान लोक आणि इतर लोक जात असत इतकेच काय ते सांगणे शक्य आहे.

'पौर' आणि 'जानपद' हे दुसरे दोन शब्दही विचार करण्यासारखे आहेत. ऋग्वेदात (५·७४·४) 'पौर' हा शब्द आला आहे परंतु याचा अर्थ 'अश्विन', 'पौर' नावाचा एक ऋषि आणि 'मेघ' असा भिन्नभिन्न प्रकारचा होतो. श्री. जयस्वाल ह्यांनी 'हिंदूंची राज्यव्यवस्था' ह्या ग्रंथात (भाग २ पा ६०-१०८) 'पौर' आणि 'जानपद' ह्या लोकनियुक्त विधानसभा होत्या आणि त्यांना राजाला काढून टाकता येई, त्यांना राजा राज्याचे धोरण कळवीत असे, नवीन कर बसविताना त्यांची संमती घेतली जाई इत्यादी मते प्रतिपादन केली आहेत. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे पौरजानपद ह्या संघटनेला राजाला राज्यकारभार चालविणे शक्य करता येत असे अथवा अशक्य करता येत असे. परंतु निरनिराळ्या ग्रंथांत दिलेल्या माहितीवरून ही मते सिद्ध होऊ शकत नाहीत. राज्यशास्त्रावरील एकाही ग्रंथाने राज्याच्या अंगांत अशा प्रकारच्या लोकनियुक्त राजकीय स्वरूपाच्या सभेचा समावेश केलेला नाही. अशा ग्रंथांत निरनिराळ्या प्रकारच्या आणि दर्जाच्या न्यायदान करणाऱ्या सभांचाच फक्त उल्लेख असतो.

जरी राजकीय स्वरूपाच्या लोकनियुक्त सभा अस्तित्वात नव्हत्या तरी राजाच्या सत्तेवर आणि आचरणावर निरनिराळे निर्बंध आणि मर्यादा अस्तित्वात होत्या. राजाला स्वतःला उद्देशून केलेल्या उपदेशामुळे त्याच्या वर्तनावर आळा पडत असे; धर्मामध्ये सर्व बाबींचा समावेश होतो. अशा प्रकारचे धर्माचे महत्त्व आमच्या ग्रंथकारांनी राजाच्या मनावर पुन्हा पुन्हा इतके वेळा बिंबविले आहे की त्यांच्या सांगण्याचा राजाच्या मनावर परिणाम होत असला पाहिजे. तसेच 'दंड' ही देवता असून ती दुष्ट राजाचा स्वतः नायनाट करील ही कल्पनाही मनु (७·१९), याज्ञ. (१·३५४।५६) यांच्या सारख्या ग्रंथांत सागितली असून ती एकाद्या माथेफिरू राजालाही मर्यादा न सोडता वागावयास प्रवृत्त करीत असे. राजाने मनसोक्त वर्तन करता कामा नये तर आपली पदवी ही आपल्याजवळ ठेवलेली एक पवित्र ठेव असल्याचे मानले पाहिजे आणि शास्त्रात

सांगितलेल्या नियमांना अनुसरून त्याने राज्यकारभार केला पाहिजे अशी प्राचीन ग्रंथकारांची मते होती. शिवाय राजाचे मंत्री असत आणि त्यांचा सल्ला राजाने घेतला पाहिजे असा नियम असे. राजाचे पुरोहित विद्वान ब्राह्मण असत आणि धर्म काय हे समजावून सांगणे हे त्यांचे काम असे. अशा पुरोहितांच्या आज्ञा राजाने पाळल्या पाहिजेत असे बंधन असे आणि त्यांच्या अंगात दुष्ट राजाचा नाश करण्याचे सामर्थ्य असल्याचे मानले जाई. अशी दृढ भावना असे की धर्मात (श्रुति आणि स्मृतिप्रणीत धर्मात) असलेले नियम देवाच्या प्रेरणेने घालून दिलेले असून त्यांची योग्यता राजापेक्षा अधिक असते. धर्माचे पालन करणे हेच अत्यंत प्राचीन काळापासून राजासुद्धा सर्वांचे सर्वश्रेष्ठ सामाजिक आणि राजकीय ध्येय असे. कामंदकाने (१·१४) म्हटले आहे की यवन राजाने पृथ्वीवर फार काळ पर्यंत राज्य केले ह्याचे कारण तो धर्माच्या आज्ञांना अनुसरून राज्यकारभार करीत असे. न्यायदानाच्या बाबतीत न्यायाधीश आणि सभ्य ह्यांनी राजाचे नियंत्रण करावयाचे असे. त्यांनी चुकीच्या मार्गाने जाणाऱ्या राज्यकर्त्यांना निर्भयपणे सल्ला द्यावयाचा असे. शिवाय संघ आणि गण प्रबल असत आणि त्यांना एक प्रकारची अंतर्गत कारभाराची सत्ता असे. सर्वात अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मागे सांगितलेल्याप्रमाणे नालायक राजाचा त्याग करण्याचा अथवा दुर्वर्तनी अथवा जुलमी राजाचा वधही करण्याचा शास्त्रांनी प्रजेला दिलेला अंतिम अधिकार ही होय.

तात्त्विक दृष्टीने आणि सामान्य मनुष्याच्या दृष्टीने राजाची सत्ता पूर्ण स्वरूपाची आणि अनिर्बंध असे असे म्हणता येईल. तथापि वर वर्णन केल्याप्रमाणे राजाच्या वर्तनावर खरीखुरी नियंत्रणे असत आणि मर्यादाही असत. अशी ही नियंत्रणे जरी खरी होती तरी आधुनिक काळात ज्यांना घटनात्मक म्हणतात तशी ती होती असे म्हणता येत नाही. नारदाने म्हटले आहे त्याप्रमाणे प्रजा ही परावलंबी असते आणि राजावर कोणाचीही सत्ता नसते परंतु त्याला शास्त्राच्या आज्ञांच्या विरुद्ध जाता येत नाही. (हरदत्ताची गौ. ११·२ वरील टीका).

आधुनिक काळी राज्यकर्त्यांची कार्ये तीन प्रकारची असतात : (१) असलेल्या नियमांची अंमबजावणी करणे, (२) न्याय देणे, आणि (३) नवीन नियम करणे. प्राचीन काळी नवीन नियम करण्याची राजाची सत्ता फारच मर्यादित होती. वर्ण आणि आश्रम ह्यांचे नियमन करणाऱ्या ज्या शास्त्राज्ञा असतात त्यांत ढवळाढवळ करण्याचा राजाला अधिकार नसे. आधुनिक अर्थाने कायदे करणे ह्या कृत्याचा स्मृतिग्रंथांत बहुतेक अभाव असतो. गौतमाने (११·१९-२५) सांगितले आहे की एकाद्या गोष्टीचा निर्णय करण्याला लागणारा कायदा राजाने पुढील ग्रंथांत पहावा अथवा पुढील गोष्टींच्या आधारावर त्याने निर्णय द्यावा :— (१) वेद, धर्मशास्त्रे, (व्याकरणादि) वेदांगे, उपवेद, पुराणे, (२) वेदविरुद्ध नसणारे देशाचार, जातीचे आचार आणि कुलाचार, (३) शेतकरी, व्यापारी, धनगर, सावकार आणि शिल्पकार ह्यांचे रीतिरिवाज, (४) तर्कशास्त्र, (५) तीन वेदांत निपुण असणाऱ्या विद्वानांच्या परिषदांची मते. विद्वान लोकांच्या परिषदांना अथवा सभांना धर्माच्या बाबतीत अंतिम अधिकार असल्याचे याज्ञ. (१·९) आणि शंख ह्यांनी म्हटले आहे.

राजाला राज्यव्यवस्थेकरिता अनेक मंत्र्यांची आणि अधिकाऱ्यांची आवश्यकता असे. राजाची कर्तव्ये धार्मिक आणि व्यावहारिक अशी दोन प्रकारची असत. पहिल्या प्रकारची देवांची आणि अदृश्य शक्तींची आराधना करणे ह्यासारखी धार्मिक स्वरूपाची कर्तव्ये करताना राजाला पुरोहित आणि ऋत्विज ह्यांची गरज लागे. राजाच्या व्यावहारिक कर्तव्यांत ज्यांचा योगाने राज्याची उन्नति होईल, दुष्काळासारख्या आपत्तींत लोकांना साहाय्य होईल अशा कृत्यांचा आणि निःपक्षपातीपणाने न्याय देणे, प्रजाजनांच्या जीविताचे आणि वित्ताचे संरक्षण करणे आणि परचक्राचे निवारण करणे ह्या गोष्टींचा समावेश होतो.

आयुष्याच्या शेवटी आपली सत्ता पुत्रांना देऊन वनात जाण्याची राजांची परंपरा असल्याचे महाभारत, रघुवंश इत्यादी अनेक ग्रंथांत वर्णन केले आहे. (वन २०२·८. रघु १·८). चंद्रगुप्त, अशोक ह्यांनी वृद्धपणी राज्यत्याग केल्याच्या आख्यायिका आहेत.

कौटिल्याने (८·२) 'द्वैराज्य' आणि 'वैराज्य' अशा शासनपद्धतींचा उल्लेख केला आहे. पिता आणि पुत्र अथवा दोन भाऊ ह्या दोघांनी सत्ता असणारे राज्य ते "द्वैराज्य' आणि एखाद्या जीवमान राजाकडून परकीयाने देश जिंकून घेतल्यामुळे अस्तित्वात येणारे ते 'वैराज्य'. कौटिल्याने म्हटले आहे की 'द्वैराज्यात दोघा सत्ताधाऱ्यांचे हित एकच असते म्हणून असे द्वैराज्य अमात्यांच्या (त्या दोन्ही राज्यकर्त्या वरील) वजनाने टिकू शकते, परंतु वैराज्यामधील परकीय राज्यकर्ता हा स्वतःचा देश नाही ह्या भावनेने त्या देशाची संपत्ती हरण करून त्या देशाला दरिद्री करतो अथवा तो देश ही एक (विकावयाची) मिळकत आहे असे समजतो अथवा जेव्हा त्याला तेथील लोक आपल्याविरुद्ध झाल्याचे आढळते तेव्हा तो (परकीय राज्यकर्ता) तो देश सोडून देऊन चालता होता'. ह्या उताऱ्यात परकीय सत्ताधाऱ्यांच्या मनोवृत्तीचे थोडक्यात वर्णन आले आहे. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र (अं. ५) नाटकात यज्ञसेन आणि माधवसेन ह्या दोघा बंधूंच्या मनात अग्निमित्राच्या अधिराज्याच्या सत्तेखाली राहून एक द्वैराज्य स्थापन करावयाचे होते असा उल्लेख आला आहे. महाभारतात (उद्योग अ. १६६) विंद आणि अनुविंद ह्या दोघा भावांची अशा प्रकारची सत्ता अवन्ती नगरावर असल्याचे वर्णन आले आहे. अलेक्झांडरच्या स्वारीच्या वेळी सिंधु नदीच्या काठावरील तौला (पटल?) ह्या शहरांचा अधिकार दोन निरनिराळ्या कुळांतील वंशपरंपरेने चालणाऱ्या दोघा राजांच्या हातात होता परंतु राज्यकारभाराचा अंतिम अधिकार वृद्ध लोकांच्या एका समितीकडे होता असे मॅक क्रिंडलकृत 'अलेक्झांडरची हिंदुस्थानावरील स्वारी' (पा. २९६) ह्या ग्रंथात वर्णन केले आहे. बुद्धधर्मीय आणि इतर ग्रंथांतही द्वैराज्यांविषयी माहिती आली आहे. व्यक्तीचे आणि राष्ट्राचे हित स्वातंत्र्यातच असते ही गोष्ट मनु (४·१६०) मध्ये सुबोध रीतीने वर्णन केली आहे.

------

अनुक्रमणिका

# प्रकरण ६३

## अमात्य

(मू. ग्रं. पा. ३.१०४-१३१)

राज्याच्या सात अंगांपैकी दुसरे अंग अमात्य हे असते. अमात्य, सचिव आणि मंत्री हे तीन शब्द केव्हा केव्हा समानार्थी असल्याचे मानण्यात येते आणि केव्हा केव्हा त्यांच्यात भेद दाखविण्यात येतो. ह्या तीन शब्दांपैकी अमात्य हा शब्द जास्त जुना आहे. तो शब्द अमा म्हणजे समीप अथवा सहित ह्या शब्दाला त्य प्रत्यय लावून झाला आहे. अमात्य हा शब्द ऋग्वेदामध्ये (७·१५·३) आला आहे परंतु त्या ठिकाणी त्याचा अर्थ प्रधान अथवा मंत्री असा नाही. प्रधान ह्या अर्थाने तो शब्द आप. ध. [गुरूनमात्यांश्च नातिजीवेत् । आप. ध. सू. २·१०·२५·१०.] सू. मध्ये (२·१०·२५·१०) आला आहे. सचिव हा शब्द सहाय्यक ह्या अर्थाने ऐत. ब्रा. मध्ये (१२·९) आला आहे.

अमात्य अथवा सचिव का पाहिजेत हे अनेक ग्रंथकारांनी सांगितले आहे. कौटि. (१·७) म्हणतो की ज्याप्रमाणे एकच चाक चालू शकत नाही त्याप्रमाणे राजकार्यही एकट्या राजाच्या हातून होत नाही. ह्यास्तव सचिवांची नेमणूक करावी आणि त्यांचे मत ऐकत जावे. मनुस्मृति (७·५५), महाभारत (शांति १०६·११) प्रभृति अनेक ग्रंथांतही तसेच सांगितले आहे. सचिवांचे **मतिसचिव** (सल्लागार), **कर्मसचिव** (कार्यकारी) इत्यादी भेद काही ग्रंथकारांनी सांगितले आहेत. अमरकोशात [मन्त्री धीसचिवोऽमात्योन्ये कर्मसचिवास्ततः । अमरकोश २ (क्षत्रियवर्ग)] (क्षत्रियवर्ग) म्हटले आहे की जो अमात्य 'धीसचिव' असतो त्याला **मंत्री** म्हणतात आणि मंत्र्याव्यतिरिक्त असणाऱ्या इतर अमात्यांना 'कर्मसचिव' म्हणतात. परंतु हे भेद नेहमीच पाळले जातात असे नाही. कौटि. (१·८) म्हणतो की देश, काल व कार्याची अपेक्षा ह्यांना अनुसरून त्या त्या परिस्थितीला अनुरूप असे अमात्य नेमावे परंतु मंत्री नेमू नयेत. ह्यावरून मंत्री हे सामान्यतः अमात्यांच्यापेक्षा वरच्या योग्यतेचे असतात असे कौटिल्याचे मत असावे असे दिसते.

अमात्याची परीक्षा निरनिराळ्या गुप्त आणि उघड रीतीने घेतली जात असे. (कौटि. १·१०). धर्म, अर्थ, काम आणि भय ह्या प्रत्येक विषयाची प्रलोभने त्यांना दाखविली जात आणि ह्या चार परीक्षांपैकी कोणत्याही एका परीक्षेत तो प्रामाणिक असल्याचे दिसेल तर त्याला अमात्य म्हणून नेमण्यात येई आणि चारही परीक्षात त्याचा प्रामाणिकपणा आणि सचोटी दिसून आली तरच त्याला मंत्री म्हणून नेमण्यात येई.

मंत्रीमंडळातील सभासदांची संख्या किती असावी ह्याबद्दल प्राचीन काळापासून बरेच मतवैचित्र्य आढळून येते. नीतिवाक्यामृतात (पा. १२७।१२८) मंत्र्यांची संख्या ३, ५, अथवा ७ असावी असे सांगितले आहे तर शांति पर्वात (८५·७।९) राजाचे सचिव ३७ असावे असे सांगून जातीप्रमाणे वर्गवारी कशी असावी हे वर्णन केले आहे. मंत्रीपरिषदेतील अमात्यांची संख्या यथासामर्थ्य म्हणजे राज्याच्या सामर्थ्याप्रमाणे अथवा राज्याच्या गरजेप्रमाणे निश्चित करावी असे कौटिल्याने मत दिले आहे. शिवाजीमहाराजांच्या प्रधानमंडळात आठ प्रधान होते. ह्यावरून असे दिसते की, प्रथमतः तीन अथवा चार मंत्री असलेले एक लहान मंत्रीमंडळ असावे, त्यानंतर एक मंत्री परिषद असून तीत जरूरीप्रमाणे आठ अथवा अधिक मंत्री असावेत आणि

त्यानंतर बरीच संख्या असलेले अमात्य अथवा सचिव (निरनिराळ्या खात्यावरील वरिष्ठ अधिकारी) असावेत.

अमात्याच्या अंगात कोणते गुण असावेत ह्यासंबंधी नियम निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत. कौटिल्याने (१·९) म्हटले आहे की मंत्री आपल्या देशातील रहिवासी, कुलीन व वजनदार, कलाकुशल, दूरदर्शी, अर्थशास्त्रज्ञ, प्रतिभावान्, स्मरणाचा धड, साक्षेपी, बोलण्यात छाप पाडणारा, पोक्त, समयसूचक, उत्साही, सामर्थ्यवान, क्लेशसहिष्णु, शुद्धवर्तनाचा, निर्मत्सरी, स्वामीनिष्ठ, शील, बल, आरोग्य व धैर्य ह्यांनी युक्त, गर्व व चांचल्यरहित, लोकप्रिय आणि अजातशत्रु अशा लक्षणांनी युक्त असावा. मंत्र्यांच्या गुणांची जी यादी महाभारतात (शांति- ८३·३५—४६) दिली आहे. त्यात विशेष उल्लेख करण्यासारखा गुण म्हणजे त्याने पौर (शहरवासी) आणि जानपद (खेड्यातील रहिवासी) ह्यांचा विश्वास संपादन केलेला असावा हा होय.

बऱ्याच ग्रंथांत असे सांगितले आहे की मंत्र्याचा पुत्र बापासारखाच कर्तबगार असेल तर मंत्रीपद वंशपरंपरा चालावे. (मनु. ७·५४). तथापि अशा वंशपरंपरागत मंत्र्यांना त्यांच्या स्वतःच्या दायादाचा हितसंबंध असलेल्या कामाचा निर्णय करण्याचे काम देऊ नये अशीही अत्यंत समंजसपणाची सूचना काही ग्रंथांत केली आहे. (मत्स्य- २१५·८३।८४). बहुतेक ग्रंथकारांच्या मताप्रमाणे मंत्र्यांची निवड ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांच्यामधून करावी परंतु आवश्यक गुणांनी युक्त असलेल्या देखील शूद्रांमधून करू नये. (शुक्रनीति २·४२६।४२७; नीतिवाक्या पा. १०८).

मंत्रीमंडळाबरोबरचा विचारविनिमय गुप्त रीतीने झाला पाहिजे. कौटिल्याने (१·१५) म्हटले आहे की मसलत करावयाची जागा इतर मनुष्यांनाच काय पण पोपट, मैना, कुत्रे तसेच इतर क्षुद्र प्राण्यांनाही ज्या ठिकाणी जाता येणार नाही अशी असावी. कारण अशा पशुपक्षांनी गुप्त मसलती फोडल्याची वर्णने आहेत. राजाच्या मनात जी गुप्त योजना अमलात आणावयाची असेल तिची वार्ता दुसऱ्याला समजू देऊ नये. फार काय पण ज्यांच्याकडून काम करवावयाचे असेल त्यांना देखील आरंभ केल्यावर किंबहुना काम संपल्यावरच ते समजावे.

कामसूत्रात (४·४१-४९) म्हटले आहे की राजाला अनिष्ट मार्गापासून परावृत्त करणे हे मंत्र्यांचे कर्तव्य असून आपल्या मंत्र्यांचा सल्ला ऐकणे हे राजाचे कर्तव्य असते. असे मंत्री राजाचे केवळ मित्र नसून खरोखर त्याचे गुरू असतात. मंत्री बहुमताने जे ठरवतील अथवा ज्याच्या योगाने कार्यसिद्धी होईल ते धोरण राजाने अंमलात आणावे. (कौटि. १-१५). मनूने (७·५६।५९) म्हटले आहे की संधी आणि विग्रह (तह आणि युद्ध), स्थान (सैन्य, कोश, नगर आणि राष्ट्र), संपत्ति संपादनाचे मार्ग, (स्वतःचे आणि राष्ट्राचे) संरक्षण आणि मिळालेल्या संपत्तीचा योग्य विनिमय ह्या बाबतीत राजाने मंत्र्यांशी विचारविनिमय केला पाहिजे. अत्यंत महत्त्वाच्या बाबीची चर्चा सर्व मंत्र्यांत अतिशय प्रसिद्ध असलेल्या एका सूज्ञ ब्राह्मणाबरोबर करावी आणि नेहमी त्याच्यावर विश्वास ठेवावा. राजकारणाची सर्व धोरणे शेवटी त्याच्या सल्ल्यानुरूप ठरवावीत आणि नंतर कार्य करावे. मंत्र्यांबरोबर विचारविनिमय करून निश्चित केलेल्या राज्यकारभाराच्या धोरणाचे (मंत्राचे) महत्त्व अनेक ग्रंथकारांनी वर्णन केले आहे. कौटिल्याने (१०·६) मंत्राचे महत्त्व वर्णन करताना म्हटले आहे की धनुर्धारी मनुष्याने सोडलेला बाण कोणा एकाच मनुष्याचा प्राण घेईल अथवा कोणाचाच घेणार नाही परंतु शाहाण्या पुरुषाने विचारपूर्वक ठरविलेली एकादी योजना गर्भात असलेल्याही जीवाचा नाश करू शकेल. मंत्र ठरविताना साधने, मनुष्यबल आणि साहित्य, योग्य स्थल काल, संभाव्य

अनुक्रमणिका

अडचणीवरील उपाय आणि ठरविलेल्या योजनेपासून राष्ट्राला अथवा प्रजेला मिळणारे सुख ह्या पाच अंगांचा विचार करावा असे कौटिल्य (१.१५) प्रभृती बहुतेक ग्रंथांत सांगितले आहे.

**राज्यातील मोठे अधिकारी** निरनिराळ्या काळी निरनिराळे असत. वैदिक काळी अशा मोठ्या अधिकाऱ्यांना 'रत्नी' अशी संज्ञा असून त्यांत सेनापती, पुरोहित, पट्टाभिषिक्त राणी, सूत, ग्रामणी, क्षत्ता, संगृहीता (कोशाध्यक्ष), अक्षवाप (द्यूतावरील अधिकारी अथवा दप्तरावरील अधिकारी?), भागदुध (कर वसूल करणारा), गोविकर्तन (शिकारी?), दूत, परिवृक्ता (त्याग केलेली राणी) अशा सारख्यांचा समावेश होत असे (शत. ब्रा. ५·३·२). तै. ब्रा. मध्ये (१·७·३) अशा अधिकाऱ्यांना 'राष्ट्र प्रदातार' म्हटले आहे. पुढे पुढे काही विशिष्ट अधिकाऱ्यांना 'तीर्थ' असे म्हणू लागले (कौटि. १·१२) आणि त्यांची संख्या १८ असे. जे लोक धर्माला आणि राज्यकारभाराला साहाय्य करतात त्यांना तीर्थ अशी संज्ञा असते असे नीतिवाक्यामृतात (पा २९) म्हटले आहे. अशोकाच्या आज्ञापत्रांत उच्च अधिकाऱ्यांना 'महामात्र' अथवा 'धर्ममहामात्र' असे म्हटले आहे. आणि इतर अधिकाऱ्यांना युक्त, राजुक, आणि प्रादेशिक अशा संज्ञा लावल्या आहेत. राजतरंगिणीवरून (१·१२०) अशी माहिती मिळते की पूर्व काळी फक्त सात **कर्मस्थाने** म्हणजे कामाची खाती अस्तित्वात होती, पुढे ती संख्या १८ झाली आणि नंतर त्यांत आणखी ५ खात्यांची भर पडली. शुक्रनीतिसारामध्ये (२·६९।७०) राजाच्या दहा प्रमुख उच्च अधिकाऱ्यांना 'प्रकृति' अशी संज्ञा लावली आहे. ह्या सर्व उच्च अधिकाऱ्यांत पुरोहित सर्वात अधिक योग्यतेचा असून दूत हा सर्वात कमी योग्यतेचा असतो. सेनापती, प्रतिहार, दूत ह्यांच्या सारख्या अनेक वरिष्ठ अधिकाऱ्यांचा आणि खात्यावरील प्रमुखांचा उल्लेख अग्निपुराणातही केला आहे. शुक्रनीतिसारात ह्या अधिकाऱ्यांच्या हाताखालच्या दर्शक, लेखक ह्यांच्यासारख्या अधिकाऱ्यांचा उल्लेख केला आहे.

राजाच्या **जाहीर दरबाराची व्यवस्था** कशी असावी ह्याचे शुक्रनीतिसारात (१·३५३-३६१) पुढील प्रमाणे वर्णन केले आहे. दरबार भरावयाच्या सभागृहाच्या पश्चिमेकडील अर्ध्या भागात मध्यभागी राजाचे सिंहासन असावे आणि त्यानंतर राजाने चांगला पोशाक करून बसावे. त्याने मस्तकावर मुकुट आणि अंगात चिलखत घालावे आणि म्यानातून बाहेर काढलेली नागवी तलवार हातात घ्यावी. राजाचे पुत्र, नातु, पुतणे, आणि भाचे ह्यांनी राजाच्या मागल्या बाजूला बसावे. मुलीच्या मुलांनी राजाच्या उजव्या बाजूला बसावे आणि राजाच्या डाव्या बाजूला क्रमाने राजाचे चुलते, मुख्य दायाद, राजसभेचे सदस्य, सेनाधिकारी ह्यांनी बसावे. राजाच्या समोर त्याच्या उजव्या बाजूला राजाच्या आजोळातील नातलग मंडळी, मंत्री ह्यांनी बसावे आणि डाव्या बाजूला राजाचे श्वशुर, शालक, अधिकारी इत्यादिकांनी बसावे.

राजाने **प्रजेचे प्रतिपालन** कसे करावे ह्यासंबंधी काही अतिशय अनुभवशीर असे नियम शुक्रनीतिसारात (१·३७४–३७६) सांगितले आहेत. त्यांत पुढील नियम महत्त्वाचे आहेत. राजाने प्रतिवर्षी राज्यातील निरनिराळ्या गावांना, नगरांना आणि विभागांना स्वतः भेट द्यावी, प्रजाजनांना आपले अधिकारी संतुष्ट ठेवतात किंवा त्रास देतात ह्याची चौकशी करावी, राजाने स्थानिक अधिकाऱ्यांची बाजू न घेता प्रजेचीच बाजू अधिक उचलून धरावी, एकादा अधिकारी अनेक लोकांना तिरस्कार्य वाटत असल्यास त्याला काढून टाकावे आणि एकाद्या अमात्याने अनेक अन्याय्य कृत्ये केल्याचे आढळल्यास त्याला काढून टाकावे. मंत्र्यांच्या कामाची अदलाबदल करावी (२·१०७-११३), एकाच अधिकाऱ्याला फार काळपर्यंत राहू देऊ नये, कारण तसे केल्यास त्याला सत्तेची धुंदी येते, सेवकांनी लेखी आज्ञेशिवाय कोणतेही कार्य करू नये आणि राजानेही लेखी आज्ञेशिवाय कोणतेही कार्य करण्यास सांगू नये. (२·२९०) असेही त्यात पुढे सांगितले आहे.

अनुक्रमणिका

**राज्यकारभारासंबंधी आज्ञा** देताना पहिल्याने मंत्री, प्राड्विवेक (मुख्य न्यायाधीश), पंडित (धर्म खात्यावरील मंत्री), आणि दूत ह्यांनी आपआपल्या खात्यासंबंधीचे काम लिहावे, त्यानंतर अमात्याने 'सुलिखितमस्ति' (लिहिलेले चांगले आहे) असे लिहावे, सुमंताने 'सम्यग् विचारितं' (ते चांगल्या रीतीने विचार केलेले आहे) असे त्याच्यावर लिहावे, प्रधानाने 'सत्यं यथार्थम्' (ते सत्य आहे, कार्याला पाहिजे तसे आहे) असे लिहावे, प्रतिनिधीने 'अंगीकर्तुं योग्यम्' (ते मानण्यास योग्य आहे) असे लिहावे, युवराजाने 'अंगीकर्तव्यम्' (ते मान्य करावे) असे लिहावे, पुरोहिताने 'लेख्यं स्वाभिमतम्' (हे लिखाण मला मान्य आहे) असे लिहावे, नंतर सर्वांनी आपआपल्या उद्‌गारांच्या पुढे आपल्या मुद्रा कराव्या आणि नंतर राजाने 'अंगीकृतम्' (मान्य केले आहे) असे लिहून आपली मुद्रा करावी. (शुक्र. २·२६२-३७०).

राजाच्या प्रमुख अधिकाऱ्यांमध्ये **युवराज** अधिक महत्त्वाचा असतो. राज्यावर असलेल्या राजाच्या कनिष्ठ भावाला अथवा ज्येष्ठ पुत्राला त्या राजाच्या हयातीत युवराज करण्यात येत असे. (शुक्र २·१४-१६). युवराज आणि राजपुत्र ह्यांना राज्यातील निरनिराळ्या विभागांवर अधिपती म्हणून पुष्कळवेळा पाठविण्यात येत असे. सामान्यतः युवराजाची गणना मंत्र्यांमध्ये करीत नाहीत परंतु तो १८ तीर्थांपैकी एक असतो आणि त्याची एक स्वतंत्र मुद्रा असे; राज्यकारभारातील महत्त्वाच्या गोष्टी मंत्र्याच्या बरोबर युवराजाच्याही हाताखालून जात असत. शुक्रनीतिसारात (५·१७) अशी सूचना केली आहे की राजाने आसन्नमरण होईपर्यंत आपली सर्व सत्ता युवराजाच्या स्वाधीन करू नये. कामसूत्रात (७·६) असे सांगितले आहे की एकादा राजपुत्र दुर्वर्तनी निघाला तरी त्याचा त्याग करू नये. कारण तसे केल्यास तो शत्रूकडे जाईल आणि राजाला अपाय करील. अशा राजपुत्राला चांगल्या सुरक्षित ठिकाणी बंधात ठेवावे. युवराजाला द्यावयाचे वेतन मंत्री, पुरोहित, सेनापती, राणी, राजमाता ह्यांच्यासारखेच असावे असे कौटिल्याने (५·३) सांगितले आहे.

**पुरोहित**, ऋग्वेदाच्या अत्यंत प्राचीन काळापासून पुरोहित हे पद अस्तित्वात होते. पुरोहिताला राजाचा अर्धा आत्मा समजत असत. राज्याच्या उन्नतीकरिता धर्मगुरु आणि राजा ह्या दोघांचे सहकार्य अत्यंत आवश्यक असल्याचे मानले जात असे. पुरोहिताच्या अंगात कोणते गुण असले पाहिजेत ह्याचे वर्णन निरनिराळ्या धर्मग्रंथांत केले आहे. (गौत. ११·१२-१४; आप. ध. सू. २·५·१०·१६) पुरोहित केवळ ऋत्विज नसून त्याला 'राष्ट्रगोप' (राष्ट्राचा संरक्षक), (ऐत. ब्रा. ४०·२), 'राजराष्ट्रभृत्' (शुक्र २·७४) (राज्य आणि राजा ह्यांचा आधार) अशा संज्ञा लावल्या आहेत. तो राजाच्या बरोबर युद्धाला जात असे. पुरोहित वेद, इतिहास, धर्मशास्त्र अथवा दंडनीति, ज्योतिषशास्त्र ह्या विषयांत निपुण असावा, त्याला शकुनांची माहिती असली पाहिजे, शांतिकारक विधी त्याला करता येत असले पाहिजेत, तो उच्च कुलात जन्मलेला असून सर्व विद्या आणि सत्कृत्ये यांनी युक्त असला पाहिजे, त्याने उग्र तपाचरण केलेले असले पाहिजे, युद्ध चालत असताना मुख्यमंत्री आणि पुरोहित ह्यांनी वेदातील मंत्र आणि रामायण महाभारतासारख्या श्रेष्ठ ग्रंथातील श्लोक म्हणून सैनिकांना चाल करून जाण्यास प्रोत्साहन द्यावे, युद्धात मरण पावतील त्यांना परलोकी मोठे फल प्राप्त होईल असे आश्वासन द्यावे, इतर विद्यांप्रमाणेच धनुर्वेदाचे ज्ञान आणि शस्त्रांचा उपयोग करण्यातील कौशल्य, सैन्याच्या व्यूहरचनेत नैपुण्य ह्या गोष्टीही पुरोहिताच्या ठिकाणी असल्या पाहिजेत आणि शाप देण्याइतके पुण्यही त्याच्यापाशी असले पाहिजे असे शुक्रनीतिसारात (२·७८-८०) सांगितले आहे. काही ग्रंथकारांनी (शुक्र २·६९-७०) पुरोहिताचा समावेश अमात्यांमध्ये अथवा मंत्र्यांमध्ये केला आहे आणि काहींनी (याज्ञ. १·३१२) त्याला मंत्र्यांहून वेगळा मानला आहे. श्रौत आणि गृह्यसूत्रात सांगितलेले धार्मिक विधी करणे हे पुरोहिताचे काम असे आणि अपराधांबद्दल प्रायश्चित्ते देण्यासंबंधीही संपूर्ण अधिकार पुरोहिताकडे असे. बहुतेक ग्रंथकारांच्या मताप्रमाणे पुरोहिताचे कार्यक्षेत्र मुख्यत्त्वेकरून धार्मिक स्वरूपाचे

असे. न्यायसभेत राजाच्या बरोबर पुरोहित प्रवेश करीत असे परंतु न्यायदानाच्या बाबतीत सभेची जी १० अंगे सांगितली आहेत त्यांत पुरोहिताचा समावेश केलेला नाही. पुरोहिताने जर एकादा अपराध केला तर त्याला राजा शासन करू शके. कौटिल्याने (९·३) म्हटले आहे की पुरोहिताने जरी एकादा घोर अपराध केला असला तरी त्याला बंदीत टाकावे अथवा हद्दपार करावे.

पुरोहिताचे महत्त्व क्रमाक्रमाने कमी होत गेले. मंत्रीपरिषदेतील मंत्र्यांच्या नावातून पुरोहिताचे नाव वगळण्यात येऊन त्याच्या जागी पंडिताचे नाव समाविष्ट करण्यात आले. पुरोहिताकडे जी कामे असत तीच कामे बंगालप्रभृति देशांत धर्माध्यक्ष अथवा धर्माधिकरण अशी संज्ञा असलेल्या अधिकाऱ्याकडून करण्यात येऊ लागली. मत्स्य पुराणात (२१५·२४) धर्माधिकारीन् ह्याचा उल्लेख केला आहे. पुरोहिताकडे असलेल्या कामांपैकी काही कामे क्रमाक्रमाने 'सांवत्सर' (ज्योतिषी) असे नाव असलेल्या दुसऱ्या एका अधिकाऱ्याकडे देण्यात आली. सर्व बाबतींत राजाने सांवत्सरावर अवलंबून राहावे असे विष्णु [राजा च सर्वकार्येषु सांवत्सराधीनः स्यात् । विष्णु ध. सू. ३·७५.] ध. सू. (३·७५) मध्ये सांगितले आहे. तथापि कौटिल्याचे (९·४) स्वतःचे मत ज्योतिषावर अतिशय अवलंबून राहण्याच्या विरुद्ध होते.

**सेनापतीच्या** अंगात कोणते गुण असावे हे अनेक ग्रंथांत सांगितले आहे सेनापती हा क्षत्रिय अथवा ब्राह्मण असावा, त्यातल्या त्यात क्षत्रियाला अधिक पसंत करावा, असे अग्निपुराणात (२२०·१) सांगितले असून शूर असा एकादा क्षत्रिय उपलब्ध नसेल तर त्या कामी एकाद्या ब्राह्मणाची योजना करावी परंतु शूद्राला नेमू नये असे शुक्रनीतिसारात (२·४२९-४३०) म्हटले आहे. त्याच्या अंगी उच्च कुल, शील, धैर्य, अनेक भाषांत नैपुण्य, अश्वारोहण, गजारोहण आणि शस्त्रास्त्रविद्या ह्यांत प्रावीण्य, शकुनांची आणि औषधांची माहिती तारतम्यज्ञान, औदार्य, मधुर वाणी, आत्मसंयमन, बुद्धिमत्ता, आणि करारीपणा हे गुण असावेत असे मानसोल्लासात (२·२·९०-९२) सांगितले आहे. महाभारतकाळी सेनापतीची निवड करण्यात येते असे परंतु पुढील काळांत सेनापतीची नेमणूक राजा आपल्या स्वतःच्या मनाप्रमाणे करीत असे.

**दूत** (परक्या राजाकडे पाठविलेला वकील अथवा संदेश पोचविणारा). दूत हा शब्द आणि संदेश पोचविणारा अधिकारी ह्या नात्याचे त्याचे स्थान ह्यांची माहिती ऋग्वेदासारख्या (ऋ. १·१२·१) अत्यंत प्राचीन काळापासून होती. दूत ह्याचा अर्थ हेर असाही असतो आणि त्या अर्थाने तो शब्द ऋग्वेदातही (१०·१०८·२-४) वापरलेला आहे. महाभारतात (उद्योग ३७·२७) दूताचे पुढील प्रमाणे आठ गुण सांगितले आहेत : दूत दुराग्रही नसावा, भ्याड नसावा, दीर्घसूत्री नसावा, दयाशील आणि मनमिळाऊ असावा, दुसऱ्यांना वश होणारा नसावा, रोगरहित असावा, उत्कृष्ट भाषण करणारा असावा, दूताने (त्याच्या राजाने) सांगितले असेल तेवढेच बोलावे. दूताचा देह पवित्र असल्याचे मानले जात असे.

दूताचे तीन प्रकार असतात : (याज्ञ. १·३२८ वरील मिताक्षरा) (१) **निसृष्टार्थ** (म्हणजे काय बोलावयाचे हे ठरविण्याचे पूर्ण स्वातंत्र्य असणारा), (२) **परिमितार्थ** (एकादे विशिष्ट काम सोपविलेला आणि (३) **वार्ताहर** (राजाने पत्र अथवा निरोपच फक्त घेऊन जाणारा). कामसूत्रात (१२·२२।२३) सांगितले आहे की दूताने त्याला ज्या राजाकडे पाठविले असेल त्या राजाशी वैर करणारे कोण आहेत हे शोधून काढावे, त्याने शत्रू राजाच्या मित्रांना आणि नातलगांना आणि निरनिराळ्या अधिकाऱ्यांना आपल्या बाजूला वळवून घ्यावे, शत्रूच्या राज्यातील किल्ले आणि त्यांतील सामग्री ह्यांचा तपास करावा, युद्धाला अनुकूल असणारी स्थाने तसेच जेथून त्वरित बाहेर जाता येईल अशी स्थाने ह्यांची माहिती काढावी.

**दूत** आणि **चर** अथवा **चार** ह्यात भेद असल्याचे काही ग्रंथांत सांगितले आहे. दूत हा उघडपणे काम करणारा हेर असतो आणि चर हा गुप्त रीतीने काम करणारा हेर असतो असे कामसूत्रात (१२·३२) सांगितले आहे. आधुनिक काळीदेखील एका देशाच्या राजाचा दुसऱ्या देशाच्या राजाच्या दरबारी असणारा वकील पुष्कळ वेळा हा आंतरराष्ट्रीय व्यवहाराच्या कायद्याच्या संरक्षणाखाली काम करणाऱ्या संभावित हेरापेक्षा काहीही अधिक नसतो. कौटिल्याने (१·११) हेराची निरनिराळी नावे दिली आहेत. **कापटिक** (दुसऱ्याचे इंगित जाणण्यात कुशल धीट विद्यार्थी), **उदास्थित** (ढोंगी संन्यासी), **वैदेहक** (दिवाळे निघालेला व्यापारी), **तापस** (मुंडन केलेला अथवा जटाधारी ढोंगी तपस्वी), **रसद** (आळशी आणि क्रूर), **सत्री** (हस्तसामुद्रिक आणि शकुन इत्यादिकांचे अध्ययन करणारा), **तीक्ष्ण** (धाडसी स्वभावाचा), **भिक्षुकी** (भिक्षा मागणारी धीट विधवा अथवा व्यवसाय करू इच्छिणारी संन्यासिनी), **संचर** (फिरते हेर). ह्या निरनिराळ्या प्रकारच्या हेरांनी काय काय उद्योग करावे, कशी बातमी काढावी ह्यासंबंधी सविस्तर विवेचन कौटिल्याने केले आहे. **संस्था** म्हणजे एका ठिकाणी राहून काम करणाऱ्या हेरांनी आणलेली बातमी दुसऱ्या संचर हेरांकडून करून घ्यावी आणि त्या बातमीचीही तिसऱ्या प्रकारच्या हेरांकडून शहानिशा पडताळून घ्यावी आणि नंतरच ती बातमी विश्वसनीय मानावी. संचर हेरांचे काम १८ प्रकारच्या तीर्थांच्या वर उघडपणे नजर ठेवण्याचे असते, त्या अधिकाऱ्यांच्या वैयक्तिक वर्तनावर नजर ठेवण्याकरिता कुबडे, ठेंगू, किरात, बहिरे, मुके, आंधळे असल्याचा बहाणा करणाऱ्या लोकांची योजना करावी, हेरांना एकमेकांची माहिती असू नये इत्यादी नियमही त्याने सांगितले आहेत. स्वदेशातील आणि परराज्यातील निरनिराळ्या प्रकारच्या हेरांचे हे जाळे इतके विस्तृत असल्यामुळे हेर हेच राजाचे नेत्र होत (राजानः चार चक्षुषाः) असे विष्णुधर्मोत्तरपुराणात (२·२४·६३) म्हटले आहे. ह्या हेरांची नेमणूक करणाऱ्या अधिकाऱ्याला समाहर्ता अशी संज्ञा असे. न्यायदानामध्ये देखील विशेष भानगडीच्या वादाचा निर्णय करण्याच्या कामी अशा हेरांवर विश्वास ठेवून न्याय द्यावा असे कौटिल्याने (३·१) सांगितले आहे. आधुनिक काळी देखील सर्व शासनसंस्था आपल्या विरुद्ध असणाऱ्या लोकांच्या कृत्यांची माहिती आणि त्यांच्या साधनांची माहिती काढण्याकरिता हेर, बातमीदार आणि गुप्तहस्तक नेमीत असतात.

राजाचा ऋत्विज, आचार्य, मंत्री, पुरोहित, सेनापती, युवराज, राजमाता, राजपत्न्या ह्या सर्वांचे **वेतन** ४८००० पण इतके असावे आणि इतके उपजीविकेचे साधन मिळाले म्हणजे त्यांना मोह पडणार नाही अथवा ते राजाच्याविरुद्ध बंड करणार नाहीत असे कौटिल्याने (५·३) सांगितले आहे. हे वेतन मासिक असावे आणि तांब्याच्या पणात असावे असे वाटते. शुक्रनीतिसारामध्ये (२·७१।७२, ७४।७७) असे सांगितले आहे की पुरोहितप्रभृति दहा उच्च अधिकाऱ्यांना प्रत्येकाला त्याच्या नंतरच्या क्रमाच्या अधिकाऱ्यापेक्षा १/१० अधिक वेतन द्यावे (म्हणजे पुरोहिताला सर्वात अधिक वेतन असावे आणि दूताला सर्वात कमी वेतन असावे).

अनुक्रमणिका

# प्रकरण ६४

# राष्ट्र (म्हणजे राज्यामधील प्रदेश)

(मू. ग्रं. पा. ३.१३२-१७७)

राष्ट्र हा शब्द ऋग्वेदासारख्या अत्यंत प्राचीन ग्रंथात [मम द्विता राष्ट्रं क्षत्रियस्य । ऋ ४·४२·१.] (ऋ. ४·४२·१) आला आहे. त्या ग्रंथात त्या शब्दाचा अर्थ राज्यामधील प्रदेश असा आहे. ऋग्वेदातील एका मंत्रात, [राजा राष्ट्राणाम्० । ऋ. ७·३४·११.] (७.३४.११) वरुणाला राष्ट्रांचा प्रभु म्हटले आहे. तै. सं. मध्ये [अस्मिन् राष्ट्रे राजन्य इषव्यः शूरो महारथो जायतां.... तै. सं. ७·५·१८·१ = (वाज. सं. २२·२२)] (७·५·१८·१) ह्या राष्ट्रातील राजा शूर होवो असे मागणे मागितले आहे. राज्याच्या निरनिराळ्या अंगांत राष्ट्र हे सर्वात महत्त्वाचे अंग असते असे अग्निपुराणात (२३९·२) सांगितले आहे. राजाने आपले वसतिस्थान कोठे करावे हे सांगताना मनु. (७·६९), याज्ञ. (१·३२१) प्रभृती ग्रंथांत जे नियम सांगितले आहेत त्यांवरून असे दिसून येते की राष्ट्र म्हणून पसंत करावयाचा प्रदेश भरभराट असलेला, जीवनोपयोगी पदार्थांची समृद्धी असलेला आणि संरक्षण करण्याला सोईचा असा असला पाहिजे. राष्ट्रात मुख्यत्वे आर्यांची (अथवा आर्यांसारख्या लोकांची) वस्ती असली पाहिजे असे मनूने (७·६९) सांगितले आहे परंतु राष्ट्रात मुख्यत्वे वैश्य आणि शूद्र ह्यांची वस्ती असावी असे विष्णु. ध. सूत्रांत (३·५) म्हटले आहे. दुसऱ्या एका ठिकाणी मनूने (८·२२) म्हटले आहे की ज्या देशात बहुसंख्य शूद्र असतात, ज्यात नास्तिक लोकांचा भरणा असतो आणि जो द्विजरहित (म्हणजे ब्राह्मणादि तीन वर्णाच्या लोकांनी रहित) असतो तो रोगराई आणि दुष्काळ यांनी ग्रासला जातो आणि नाश पावतो. प्रत्येक राष्ट्रात असे सर्वच गुण असतील अशी अपेक्षा करता येणार नाही ह्याकरिता राजाने त्याच्या राष्ट्रात जितके गुण असतील तितक्यांचा शक्य तितका चांगला उपयोग केला पाहिजे असे मत्स्यपुराणात (२१७·५) सांगितले आहे. कौटिल्याने सांगितले (२·१) आहे की प्रत्येक खेड्यात १०० पेक्षा कमी आणि ५०० पेक्षा अधिक कुटुंबे नसतील अशी काळजी घ्यावी. खेड्यात मुख्यत्वे शूद्र जातीचे शेतकरी असावेत, प्रत्येक खेड्याचा विस्तार १ ते २ क्रोश इतका असावा आणि ते खेडे शेजारच्या खेड्यास साहाय्य करण्यास समर्थ असावे. जुन्या गावठाणांवर अथवा नव्या जागांवर नव्या खेड्यांची गटांनी वसाहत करावी. इतर देशातील लोकांना अशा गावांत रहावयास येण्यास प्रोत्साहन द्यावे अथवा आपल्याच देशातील दाट वस्तीच्या प्रदेशातील लोकांना अशा नव्या गावांत जाण्यास भाग पाडावे.

पुराणातील (विष्णुपुराण २·१·११ प्रभृति) भूवर्णनात पृथ्वीची विभागणी जंबु, प्लक्ष प्रभृती द्वीपांत केलेली असते. अशा द्वीपांची संख्या ७, १३, १८ अशी निरनिराळ्या ग्रंथांत दिली आहे. प्रत्येक द्वीपाचे वर्ष संज्ञा असलेले भाग असतात. जंबुद्वीपात ९ वर्षे असून त्यातील भरतवर्ष हे पहिले आहे. पहिल्याने कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल आणि शूरसेन ह्या प्रदेशाला पुण्यभूमी मानीत असत. भरतवर्षात प्राचीन काळापासून अनेक देशांचा समावेश करण्यात येत असे आणि अशा देशांची आणि जमातींची नावे ऋग्वेदात (१·१०८·८; ३·५३·४ इ०) आली आहेत. महाभारतात प्रसंगोपात्त जी देशांची नांवे आली आहेत त्यांची संख्या २०० हून अधिक भरेल. ऐतरेय ब्रा. मध्ये (३८·३) भरतवर्षाचे पाच विभाग सांगितले आहेत. ख्रिस्तपूर्व कित्येक शतकांपासून भरतवर्षाचे दक्षिणापथ म्हणजे नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश आणि उत्तरापथ म्हणजे नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेश असे दोन विभाग केलेले होते.

अनुक्रमणिका

राष्ट्र होण्याला बराचसा मुलूख आणि मोठी लोकसंख्या ह्यांची आवश्यकता असते. काही थोड्या खेड्यांचे अथवा थोडक्या लोकसंख्येचे राष्ट्र होणे बहुतेक अशक्य आहे. कामसूत्रात म्हटले आहे की ज्याअर्थी राष्ट्राच्या सर्व अंगांचा उद्‌भव राज्यातील प्रदेशापासून होतो त्याअर्थी राजाने सर्व प्रयत्न करून आपल्या राष्ट्रातील प्रदेश वाढवावा. आधुनिक काळातील राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेत एकाद्या विशिष्ट प्रदेशाच्या वस्तुनिष्ठ प्रेमापेक्षा भावनेचाच अधिक भाग असतो. राज्य (म्हणजे शासनसंस्था) हे सर्व काळात लोकांना एके ठिकाणी आणण्याचे एक मोठे साधन असते परंतु प्राचीन भारतात राज्यांच्या सरहद्दी वारंवार बदलत असल्यामुळे आधुनिक काळच्या सारखी 'हा माझा देश, मग तो चांगला असो अथवा वाईट असो' अशी भावना लोकांच्या मनात क्वचितच उत्पन्न होई. हिंदूच्या ताब्यांतील समग्र भारतात धर्म, तत्त्वज्ञान, वाङ्‌मय, कलाकौशल्याची परंपरा, उपासनापद्धती आणि तीर्थक्षेत्रांविषयी पूज्यता ह्यांच्या बाबतीत एक प्रकारची ऐक्यता निःसंशय अस्तित्वात होती. तथापि त्या ऐक्यतेमुळे राष्ट्रीयत्वाची दृढ भावना अथवा राष्ट्रीय ऐक्य उत्पन्न झाले नाही. मनुस्मृतीसारख्या प्राचीन ग्रंथात पवित्र मानलेला आर्यावर्त आणि म्लेच्छ देश ह्यांच्यात भेदभाव केलेला असतो. तथापि मागाहूनच्या काळात झालेल्या धर्मग्रंथांत सामान्यतः विशिष्ट प्रदेशांना महत्त्व न देता भारतातील निरनिराळ्या देशातील रूढींचा समावेश करण्यात आला आणि वेदांना अनुसरून चालणाऱ्या सर्व लोकांकरिता नियम आणि विधिविधाने सांगण्यात आली. **धर्मदृष्ट्या** भरतवर्ष अथवा आर्यावर्त हा विशिष्ट प्रकारचा देश असल्याची प्रेमाची आणि आदराची भावना अनेक शतकेपर्यंत सर्व ग्रंथकारांच्या मनात वसत होती ह्यात संशय नाही. तथापि त्या भावनेत **राजकीय दृष्ट्या** ऐक्याची भावना नव्हती. आधुनिक स्वरूपाच्या राष्ट्रीयत्वाच्या भावनेने प्रेरित झालेल्या लोकांत मोठा स्वार्थत्याग करण्याची प्रवृत्ती आणि काही विशिष्ट मूल्यवान गुण उत्पन्न होतात ह्यात संशय नाही. तथापि त्या गुणांबरोबरच काही दोषही आढळतात. आधुनिक राष्ट्रातील प्रमुख राजकारणी लोकांचा उद्देश आपल्या रहिवाश्यांच्या राहणीचे मान वाढवावे आणि जरूर तर दुर्बल वंशांतील आणि प्रदेशांतील लोकांना छळून आणि लढून देखील ते राहणीमान तसेच उंच राखावे हाच एकमेव असल्याचे दिसून येते.

**अंतर्गत आणि स्थानिक राज्यव्यवस्था.** प्रत्येक राष्ट्रात निरनिराळे विभाग असत आणि प्रत्येक विभागाचे पोटविभाग असत. अशा विभागांना देश, विषय, मंडळ अशासारख्या संज्ञा असत. देश, राष्ट्र, विषय आणि जनपद हे समानार्थक शब्द असल्याचे अमरकोशात सांगितले आहे. तथापि त्यांच्या क्षेत्रफळांत भेद असावा असे दिसते. सह्याद्री खंडात (उत्तरार्ध ४) सांगितले आहे की १०० खेड्यांचा एक देश होतो, ४ देश मिळून एक मंडळ होते, १०० मंडळांचे १ खंड होते आणि ९ खंडे मिळून पृथ्वी होते. कौटिल्याने (२·१) सांगितले आहे की १० गावांच्या गटाला संग्रहण म्हणतात, २०० गावांच्या गटाला खार्वटिक म्हणतात, ४०० गावांच्या गटाला द्रोणमुख संज्ञा असते आणि ८०० गावांच्या मध्यभागी एक स्थानीय असते. एका राष्ट्रावरील अधिपतीला राष्ट्रपती अथवा राष्ट्रीय म्हणत. गुप्तांच्या साम्राज्यात निरनिराळ्या प्रांतावरील अधिकाऱ्यांना 'उपरिक महाराज' अशी संज्ञा असे आणि त्यांची नेमणूक सम्राट स्वतः करीत; विषय संज्ञा असणाऱ्या प्रदेशावरील अधिकाऱ्याला पुष्कळ वेळा 'कुमारामात्य' अशी संज्ञा असे आणि त्यांची नेमणूक प्रांतिक अधिकारी अथवा सम्राट करी; कुमारामात्यांना राज्यकारभारात मदत करण्याकरिता एक सल्लागारमंडळ असे आणि त्यात नगरश्रेष्ठी (सावकार), सार्थवाह (प्रमुख व्यापारी), प्रथम कुलिक (शिल्पी लोकांच्या संस्थेचा अध्यक्ष) आणि प्रथम कायस्थ (मुख्य कार्यवाह) असे चार सभासद असत. न्यायदानाच्या जागा (अधिकरणे) अनेक ठिकाणी असत. जमिनीच्या हक्कांची नोंद ठेवणारा पुस्तपाल नावाचा अधिकारी असे.

मनुस्मृति, शुक्रनीतिसार ह्यांच्यासारख्या ग्रंथांत भिन्नभिन्न प्रकारच्या गावांच्या रचना आणि त्यांवरील अधिकाऱ्यांच्या सामंत, अनुसामंत, नायक इत्यादी संज्ञा दिल्या आहेत. कौटिल्याने (२·९) सांगितले आहे की राज्यातील निरनिराळ्या खात्यांवर जितके अवश्य असतील तितके अध्यक्ष नेमावे. अमात्याच्या जागेकरिता अवश्य असणारे गुण ज्यांच्या अंगात असतील अशा पुरुषांना त्यांच्या योग्यतेनुरूप निरनिराळ्या खात्यावर अध्यक्ष नेमावे. अशा अध्यक्षांच्या कामाची राजाने सतत परीक्षा करीत असावे. कारण मनुष्ये निसर्गतः चंचल स्वभावाची असतात आणि एकाद्या कार्यावर नेमल्यावर ती आपले गुण प्रकट करीत असतात. राजसेवकांवर सतत नजर ठेवण्याचे महत्त्व सांगताना राजाच्या सेवकांकडून केल्या जाणाऱ्या द्रव्याच्या अपहाराविषयी कौटिल्याने (२·९) असे अलंकारिक भाषेत वर्णन केले आहे की ज्याप्रमाणे नेहमी पाण्यात राहणारे मासे पाणी केव्हा पितात हे समजणे अशक्य असते त्याप्रमाणेच निरनिराळ्या कामावर नेमलेले राजसेवक द्रव्याचा अपहार कसा करतात हे कळणे अशक्य आहे.

कौटिल्याने (अधिकरण २ मध्ये) राज्यातील २८ खात्यातील कामांचे आणि त्या खात्यांवरील अध्यक्षांच्या संज्ञांचे वर्णन केले आहे आणि निरनिराळ्या शिलालेखांत आणि ताम्रपटांत (एपि. इं. खं. १२ पा. ४०; एपि. इं. खं. १५ पा २८३ इ०) कौटिल्याने योजिलेल्या संज्ञांचा उल्लेख केलेला आढळतो. त्यावरून त्याचा ग्रंथ त्या विषयावरील अधिकृत ग्रंथ मानला जात असे असे दिसते.

राज्यातील निरनिराळ्या अधिकाऱ्यांना काय वेतन द्यावे ह्याविषयी निरनिराळ्या ग्रंथांत नियम सांगितले आहेत. मनूने (७·११८।११९) असे म्हटले आहे की एका गावावरील अधिकाऱ्याला त्याचे वेतन म्हणून अन्न, पेय, सर्पण ह्यासारखे पदार्थ द्यावेत, दहा गावांवरील अधिकाऱ्याला १ कुल जमीन द्यावी, वीस गावांवरील अधिकाऱ्याला ५ कुल जमीन उपभोगाला मिळावी, शंभर गावांवरील अधिकाऱ्याला एका संपूर्ण गावाचा कर आणि हजार गावांवरील अधिकाऱ्याला एका नगरावरील कर वेतन म्हणून द्यावा. हे नियम अक्षरशः पाळले जात नसले तरी त्यांवरून असे दिसून येते की प्रत्येक अधिकाऱ्याला त्याच्या महत्त्वाला आणि त्यांच्यावरील जबाबदारीला अनुरूप वेतन देण्यात येत असे. कौटिल्याने (५·३) अनेक मुख्य अधिकाऱ्यांची आणि सेवकांची वेतनें सांगितली आहेत. उदाहरणार्थ, समाहर्ता = २४००० पण, पौरव्यावहारिक (राजधानीतील मुख्य न्यायाधिकारी) = १२००० पण, सैन्यावरील मुख्याधिकारी = ८००० पण, सैन्यातील वैद्य = २००० पण, पुराणिक, सूत = १००० पण, जमाखर्च लिहिणारे कारकून = ५०० पण, गवई = २५० पण, कारु (कारागिर) आणि शिल्पी = १२० पण, राजाचे शरीरसंरक्षक = ६० पण, शिक्षक आणि विद्वान पुरुष ह्यांना त्यांच्या योग्यतेप्रमाणे ५०० ते १००० पणपर्यंत पूजावेतन (पुरस्कार), राजाचा सारथी = १००० पण, पाच प्रकारचे हेर = १००० पण, चर म्हणजे फिरते हेर ह्यांना त्यांच्या मेहनतीनुरूप अधिक वेतन. ह्यावरून असे दिसून येईल की आधुनिक काळी हिंदुस्थानात सामान्य कारकुनांच्या मानाने मंत्र्यांना आणि निरनिराळ्या खात्यांवरील मुख्य अधिकाऱ्यांना अतिशय मोठे पगार दिले जातात त्याप्रमाणेच त्यावेळीही स्थिती होती.

सेवकांना वेतन म्हणून जमीन देण्याचा (शुक्र १·२११ प्रभृती) अनेक ग्रंथकारांनी [न दद्याद् व्यङ्गुलमपि भूमेः स्वत्व निवर्तनम् । वृत्यर्थं कल्पयेद्वापि यावद्ग्राहस्तु जीवति ॥ शुक्रनीतिसार १·२११.] निषेध केला आहे. निदान अधिकाऱ्याला दिलेल्या जमिनी विकण्याचा अथवा गहाण देण्याचा त्यांना अधिकार नसावा, आणि दिलेली जमीन त्याच्या मृत्यूपर्यंतच चालावी असे त्यांनी सांगितले आहे. सेवानिवृत्तीनंतरही द्यावयाच्या वेतनासंबंधी तसेच सेवा करीत असताना मृत झालेल्या सेवकांच्या पुत्रांना, विधवांना पोटगी व वेतन देण्यासंबंधी नियम असत.

(शुक्र. २·४०६-४११, सभा. ५·५४). त्यांवरून असे दिसून येते की प्राचीन भारतीय शासनसंस्था देखील आधुनिक काळच्या शासनसंस्था जी जी कार्ये करतात त्यांपैकी बहुतेक सर्व कार्ये करीत असत.

स्थानिक राज्यव्यवस्थेत गावावरील प्रमुखाला ग्रामणी, ग्रामिक अथवा ग्रामाधिपती असे म्हणत. (मनु. ७·११५।१६; कौटि. ३·१०). ग्राम म्हणजे खेडेगावच नसून राजधानीच्या नगराव्यतिरिक्त नगरांनाही तो शब्द लावला जात असे. काही शिलालेखात गावातील प्रमुखांला ग्रामकूट, पट्टकिल (आधुनिक काळचा पाटील) अशाही संज्ञा लावल्या आहेत. (एपि. इं. खं. ७ पा. ३९, १८३ इ.). कानडी जिल्ह्यातील गावातील प्रमुखाला 'गाऊंड' असे म्हणतात. तो शब्द ग्रामकूट ह्या शब्दापासून निघाला आहे. वेदकालात ग्रामणी ह्याचा रत्निन् संज्ञेच्या अधिकाऱ्यांत समावेश करण्यात येत असे. परंतु पुढे कालांतराने ग्रामणीचे महत्त्व कमी होऊ लागले, त्याची नेमणूक एकट्या राजालाही करता येऊ लागली, त्याचे पद वंशपरंपरेने चालू लागले आणि कोणाला ते निरंतरही देता येऊ लागले. प्रत्येक गावात निरनिराळ्या जातीचे सहा अधिकारी असावेत असे शुक्रनीतिसारात (२·१२०।१२१) सांगितले आहे. प्रत्येक गावात लोकमताने निवडलेल्या पंचवार सभा असत. काही विशिष्ट शिल्पकारांचा गावाशी वंशपरंपरेने संबंध असे आणि त्यांना त्यांच्या कामाबद्दलचा मोबदला बहुधा गावात उत्पन्न होणाऱ्या धान्याच्या स्वरूपात दिला जात असे. पाणिनीच्या (६·२·६२) ह्या सूत्रावरील काशिका वृत्तीत ग्रामनापित, ग्रामकुलाल ह्यांचा उल्लेख आहे. हे शिल्पकार आधुनिक काळच्या बलुतेदारांसारखेच गावकामगार असत. गावातील धंदेवाल्यांच्या समिती आणि संस्था (गण) असत आणि त्यांच्या आपसात झालेल्या करारांना 'समय' अशी संज्ञा असे. गावातील निरनिराळ्या गटांकरिता दोन पासून पाच पर्यंत सल्लागार नेमले जात आणि अशा सल्लागारांनी दिलेला सल्ला गावातील लोकांना, समित्यांना आणि संस्थांना पाळावा लागत असे. ह्याच्याविरुद्ध वागणाऱ्यांना ताकीद देणे, दंड करणे, हद्दपार करणे, जातिबहिष्कृत करणे ह्यांच्या सारख्या शिक्षा दिल्या जात आणि त्यांना राजा मान्यता देत असे. असे दिसते की अशा रीतीने गावातील राज्यव्यवस्था स्वयंपूर्ण असे आणि वरिष्ठ शासनसंस्था कोणतीही असली तरी गावातील राज्यव्यवस्था अबाधितपणे चालत असे. जमिनीवर कर घेणे, परचक्रापासून संरक्षण करणे अशा गोष्टींव्यतिरिक्त मध्यवर्ती शासनसंस्था गावच्या स्थानिक व्यवस्थेत फारशी ढवळाढवळ करीत नसे आणि सामान्य स्वरूपाचे नियंत्रण करीत असे. ग्रामसंस्था ह्या लहान प्रमाणावरील राज्यासारख्याच असत आणि मध्यवर्ती शासनसंस्थेचे अधिकार बऱ्याच प्रमाणात ग्रामसंस्था आणि गावचे अधिकारी ह्यांच्याकडे सोपविलेले असत.

गावातील सर्वसाधारण व्यवस्थेप्रमाणेच निरनिराळ्या श्रेणी आणि गण ह्यांचेही स्वतंत्र नियम आणि संकेत असत आणि त्यांपैकी कोणत्या प्रकारच्या चालीरीतींना आणि संकेतांना राजाने मान्यता द्यावी ह्याबद्दल निरनिराळ्या स्मृतींनी नियम सांगितले आहेत. (बृहस्पती-अपरार्क पा. ७९२, ७९३, ७९४). जे संकेत अथवा नियम सर्वसामान्य जनतेला मान्य नसतील अथवा राजाच्या हेतूचा नाश करण्यासारखे असतील त्यांना राजाने बंदी घालावी असेही त्यात सांगितले आहे.

राजाचे सामान्य सेवक (परिवार, भृत्य अथवा अनुजीविन्) ह्यांच्या अंगातील गुणांसंबंधी आणि त्यांच्या वेतनासंबंधीचे नियम अनेक ग्रंथांत दिले आहेत. राजनीतिप्रकाशात [परिवाराद्धि दोषाः प्रादुर्भवन्ति तेऽलं विनाशाय । तस्मात्पूर्वमेव तत्परिवारं लिखेच्छ्रुतशीलान्वयोपपन्नम् । राजनीति प्रकाश पा. १८५.] (पा. १८५) म्हटले आहे की राजाच्या सभोवती असणाऱ्या लोकांपासून दोष उत्पन्न होतात आणि असे दोष राज्याचा नाश करण्याला पुरेसे असतात. ह्याकरिता सेवकांना नेमण्यापूर्वी राजाने अशा सेवकांच्या ठिकाणी विद्या, शील, उत्तम कुल आणि वर्तन हे गुण आहेत किंवा नाही ह्यांची परीक्षा करावी.

**अनुक्रमणिका**

राजावर आणि शासनसंस्थेवर प्रजाजनांसंबंधीच्या काही जबाबदाऱ्या असत आणि त्यासंबंधी नियम निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत. अशा जबाबदाऱ्यांत पुढील प्रमुख आहेत :

(१) पशुसंवर्धनाकरिता गुरचरणे राखणे, देशाची संपत्ती त्या देशात उत्पन्न होणारे धान्य आणि गुरांची समृद्धि हीच असते असे [अर्थवानयं देश उच्यते यस्मिन्गावः सस्यानि च वर्तन्ते । महाभाष्य, खंड २ पा. ४०१.] मानले जात असे. (महाभाष्य खंड २ पा ४०१)

(२) कायस्थांसारखे जमाखर्च लिहिणारे लोक ह्यांच्या त्रासापासून प्रजेचे संरक्षण करावे असे कौटिल्याने (४·४) सांगितले आहे. जे सेवक दुराचरणी असतील, लांच घेत असतील त्यांना कडक शासन केले पाहिजे. अशा कंटकांना सामान्यतः राणी, राजपुत्र, राजाच्या मर्जीतील लोक अथवा मुख्य सेनापती ह्यांचे संरक्षण असते आणि त्यांना काढून टाकले आणि योग्य न्यायदान केले तर राज्याचा नाश होण्याची भीती नसते असे (मनु ९.२९४ वरील टीकेत) मेधातिथीने म्हटले आहे.

(३) शेतीकडे फार लक्ष देण्यात येत असे. त्याकरिता देशातील निरनिराळ्या भागांत मोठेमोठे तलाव तयार करावे आणि देशातील शेती केवळ पावसावरच अवलंबून राहणार नाही अशी व्यवस्था करावी. विहिरी, तलाव, सरोवरे बांधून आपल्या राज्यात पाण्याची समृद्धी करण्याकडे राजाने लक्ष द्यावे असे सांगितले आहे. (सभा. ५·७७; शुक्रनीतिसार ४·४·६०).

(४) रोग, दुष्काळ, उंदीर इत्यादी दैवी आणि मानवी अशा दोन प्रकारच्या आपत्तींपासून राज्यांचे संरक्षण करणे हे राजाचे कर्तव्य असे. अशा आपत्तीचे निवारण करण्याकरिता मानवी उपाय आणि धार्मिक विधी कोणकोणते करावे ह्याविषयी कौटिल्या (४·३) सारख्यांनी अनेक सूचना केल्या आहेत.

(५) विद्येला उत्तेजन देण्याकरिता विद्वान ब्राह्मणांना आश्रय देणे, कवींची आणि विद्वान लोकांची संमेलने भरविणे, शिक्षणसंस्थांना इनाम जमिनी देणे ही राजाची कर्तव्ये असत (वृद्धहारीत ७·२२९।२३०; शुक्र १·३६८।३६९ इ०) आणि प्राचीन काळापासून भारतातील राजे ह्यासंबंधीचे धर्मग्रंथांतील नियम अक्षरशः पाळीत असत.

(६) प्राचीन काळापासून राजा हा सर्व अज्ञान व्यक्तींचा संरक्षक अथवा, पालक असल्याचे धरले जात असे आणि ह्या संबंधीचे अनेक नियम (गौत. १०·४८।४९ आणि मनु ८·२७ प्रभृति) निरनिराळ्या धर्मग्रंथांत सांगितले आहेत. अज्ञानाप्रमाणेच वंध्या, स्त्रिया, निपुत्रिक स्त्रिया, निराश्रित स्त्रिया, पतिनिष्ठ स्त्रिया व विधवा, रोगपीडितांच्या स्त्रिया व विधवा ह्यांची काळजी राजाने घेतली पाहिजे असेही धर्मग्रंथांत सांगितले आहे. (मनु. ८·२८।२९)

(७) योग्य वजनांचा आणि मापांचा उपयोग केला जातो किंवा नाही हे पाहणे राजाचे एक विशिष्ट कर्तव्य असे [पण्यतुलामातवृद्धौ राजा स्वयं जागृयात् । न वणिग्भ्यः सन्ति परे पश्यतोहराः । नीतिवाक्यामृत पा. ९८.] आणि त्या संबंधी अनेक नियम सांगितले आहेत; (नीतिवाक्या. पा २८; कौटि. २·१९; मनु. ८·४०३).

(८) चोरीविषयी व्यवस्था करणे हेही असेच एक महत्त्वाचे राजाचे कर्तव्य असे आणि त्यासंबंधीचे अनेक नियम कौटिल्यादि (कौटि. ३-१६; गौ. १०·४६।४७ इ.) ग्रंथांत दिले आहेत. चोरीस गेलेला पदार्थ

चोरापासून परत मिळवून त्याच्या धन्याला राजा देऊ शकला नाही तर त्याने काही प्रसंगी धन्याचे नुकसान आपल्या खजिन्यातून भरून दिले पाहिजे आणि असे न करणाऱ्या राजाला पाप लागते असे सांगितले आहे.

राजाच्या अंगात असणाऱ्या गुणांत पहिला गुण 'महोत्साह' हा असतो. (याज्ञ. १·३०९; कौटी ६·१). राजा नेहमी उद्योगी (उत्साही) असला पाहिजे आणि आळशी अथवा दैववादी नसला पाहिजे ह्या गोष्टीला धर्मशास्त्रावरील आणि अर्थशास्त्रावरील ग्रंथांत महत्त्व दिलेले असते. ह्या निमित्ताने पुरुष प्रयत्न आणि दैव ह्या विषयांचे विवेचन अनेक ग्रंथांत केलेले आहे. महाभारतात (आदि १·२४६।४७; सभा ४६·१६ इ०) दैव आणि पुरुष प्रयत्न ह्यांपैकी कोण अधिक बलवान असते ह्याबद्दल उलटसुलट मते प्रकट केली असून कोणत्याही कार्याची सिद्धी दैव आणि पुरुष प्रयत्न ह्या दोहोंवर अवलंबून असते असेही काही ग्रंथांत सांगितले आहे. अर्थशास्त्रावरील ग्रंथकार उत्साह, प्रभु आणि मंत्र अशा तीन शक्ती मानतात आणि ह्या तीन्ही शक्तींनी युक्त असणारा राजा विजयी होतो असे सांगितले असते. संधी, विग्रह, इत्यादी सहा उपायांपैकी प्रसंगाला योग्य असणाऱ्या उपायांची योजना करणे ह्याला मंत्रशक्ती म्हणतात, भरपूर कोश आणि सैन्य ह्या दोहों मिळून प्रभुशक्ती होते आणि बलवानांनी केलेल्या कार्याला उत्साहशक्ती म्हणतात अशा व्याख्या कामसूत्रात (१५·३२) दिल्या आहेत. दशकुमारचरितात (८) म्हटले आहे की राजाचे साध्य हे मंत्रांपासून म्हणजे मंत्र्यांजवळ विचार करून निश्चित होते, ते साध्य प्राप्त करून घ्यावयाच्या कार्याचा प्रारंभ प्रभुशक्तीवर अवलंबून असतो आणि अंगिकारलेल्या कार्याची सिद्धी उत्साहाच्या योगाने घडते.

शौर्यसंपन्न राजाला आपल्या राज्याचा विस्तार करण्याकरिता आणि आपले वजन आपल्या प्रजेवर राखण्याकरिता निरनिराळे उपाय योजावे लागतात. असे उपाय साम (दुसऱ्याचे मन वळविणे), दान (देणग्या अथवा बक्षिस देणे), भेद (फूट पाडणे), आणि दंड (शासन करणे अथवा शारीरिक अथवा आर्थिक पीडा देणे) हे चार असल्याचे निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहे. (रामायण ५·४१.२।३; मनु ७·१०९ इ.). काही ग्रंथांत (कामसूत्र १७·३ बार्ह. ५·१।३) ह्या चारांच्या जोडीला माया, उपेक्षा आणि इंद्रजाल असे तीन अधिक उपाय सांगितले आहेत. ह्या अधिक उपायांच्या नावांबद्दल मतवैचित्र्य असून काहींनी माया, उपेक्षा, वध तर काहींनी माया, अक्ष (द्यूत) आणि इंद्रजाल अशी नावे दिली आहेत. चार उपायांपैकी दंड हा शेवटला उपाय म्हणून योजावा, कारण युद्धात कोणाचा जय होईल हे अनिश्चित असते असे मनुस्मृतींत (७·१९८, २००) सांगितले आहे. ह्या उपायांविषयी सविस्तर विवेचन अनेक ग्रंथांत केले असून त्यांचे भेदही वर्णन केले आहेत.

राजाला काही विशिष्ट अधिकार आणि हक्क असत. उदाहरणार्थ, (१) देशात सापडलेल्या गुप्त-द्रव्य-निधीवर तसेच खाणी, रत्न ह्यांच्यावर राजाचा हक्क असे. ह्या गुप्त निधींची बातमी देणाऱ्याला काय मिळावे ह्यासंबंधीचे नियम कौटिल्याने (४·१) सांगितले आहेत. (२) सांडलेली अथवा खऱ्या मालकाने टाकून दिलेली सर्व मिळकत मिळण्याचा हक्क राजाला असे. मुळ मालकाचा तपास कसा करावा, किती काळपर्यंत अशा मालकाची वाट पहावी इत्यादी तपशीलाचे नियम मनु (८·३०-३३; याज्ञ. २·३३; १७३।७४ इ०) प्रभृतींनी सांगितले आहेत. (३) खाजगी व्यक्तींमधील न्यायदानाच्या चौकशीत राजाला साक्षीदार म्हणून बोलाविता येत नसे. (कौटि ३·११; मनु ८·६५ इ०).

शासनसंस्थेच्या घटनेप्रमाणे राजाला शासन करील असा कोणीही नसे. परंतु धर्मशास्त्रावरील (बृह. उप. १·४·१४) ग्रंथकारांनी असे निश्चित मत सांगितले आहे की धर्म हा राजाचा राजा असतो. मनूने (९·२४५) वरुण हा राजाला शासनकर्ता असतो असे म्हटले आहे आणि राजाच्या उच्च भावनेला आणि सदसद्विवेक बुद्धीला आवाहन करून असा नियम सांगितला आहे की जर एकाद्या राजाने कोणाजवळून

अन्यायाने द्रव्यदंड वसूल केला तर त्याने त्या द्रव्याच्या तीसपट द्रव्य वरुणाला अर्पण करावे आणि ती रक्कम पाण्यात फेकावी अथवा ब्राह्मणांना वाटून टाकावी. त्याप्रमाणेच एकाद्या अपराधाबद्दल सामान्य मनुष्याला होणाऱ्या दंडाच्या सहस्रपट दंडाला जर तोच अपराध राजाने केला तर तो राजा पात्र होतो. (मनु. ८·३३६). तथापि हे नियम केवळ आदर्शस्वरूपाचेच मानले जात असत. सामान्यतः कोणताही राजा आपल्या स्वतःला द्रव्यदंडाची शिक्षा करणार नाही. ह्या कारणास्तव दंडविवेकासारख्या मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांत (पा. ५५) मनूच्या ह्या वचनाचा असा अर्थ लावला आहे की त्यात आलेला 'राजन्' हा शब्द स्वतंत्र असणाऱ्या राजाला लागत नाही तर तो केवळ राजाच्या हाताखालच्या सरदारांना अथवा मांडलिक राजांना उद्देशून घातला आहे.

सर्व सामुग्रीने सुसज्ज असणाऱ्या आणि कर्तृत्ववान राजाच्या सत्तेखाली असलेल्या समृद्ध राज्यांची अत्यंत रसाळ वर्णने रामायण, भारत प्रभृति (रामायण ५·१००·४३-४६; आदिपर्व अ० १०९) ग्रंथांत केली आहेत. त्यांवरून असे दिसते की, अशा आदर्शभूत देशात शेकडो चैत्य असत, देवालये, पाणपोया, तलाव इत्यादी सुखसोयी त्यात भरपूर असत, सार्वजनिक उद्याने, सभागृहे असत आणि त्यांत निरनिराळे समारंभ होत असत. लोक रोगरहित आणि शूर असत. दरिद्री, अमंगळ, कृश असा कोणीही मनुष्य त्यात नसे, सर्व जमीन लागवडीला आणलेली असे आणि निवळ पावसावर अवलंबून नसे, गुरांची समृद्धी असे, वेदविद्या असे, नृत्यगायनादि ललितकला ह्यांचा तेथे उत्कर्ष झालेला असे, नगरे विस्तीर्ण असून त्यांत दुकानांच्या रांगा असत आणि त्यात सुसंपन्न लोकांची दाटी असे असे मानण्यात येत असे.

——————

अनुक्रमणिका

## प्रकरण ६५

# दूर्ग (किल्ला अथवा राजधानी)

(मू. ग्रं. पा. ३.१७८-१८३)

राज्याच्या निरनिराळ्या अंगांमध्ये मनूने (९·२९४) राजधानीला राष्ट्राच्याही आधीचे स्थान दिले आहे. ह्या संबंधीचा खुलासा (मनु. ९·२९५ वरील टीकेत) मेधातिथीने आणि कुल्लुकाने असा केला आहे की राजधानी शत्रूच्या हाती जाण्याने राष्ट्राचा म्हणजे राज्याचा काही प्रदेश शत्रूच्या हाती जाण्यापेक्षा अधिक भयंकर संकट उत्पन्न होते कारण राजधानीमध्ये धान्याचे साठे ठेवलेले असतात, राज्यकारभाराची महत्वाची खाती आणि सैन्य राजधानीमध्ये असतात. ह्यामुळे राजधानीचा जर बचाव करता आला तर शत्रूच्या हाती गेलेला प्रदेश देखील परत मिळविणे आणि देशाचे संरक्षण करणे शक्य असते. राजधानी ही राज्यकारभाराच्या यंत्राच्या केन्द्रबिंदूसारखी असते. उत्तरभारतातील भौगोलिक परिस्थितीमुळे आणि प्राचीन काळच्या युद्धाच्या प्रकारामुळे बहुधा राजधानी आणि दुर्ग ह्यांना मोठे महत्त्व आले असावे. दुसऱ्या काही ग्रंथकारांनी (मनूने देखील ७·६९।७० मध्ये) राजधानी अथवा दुर्ग [आत्मदारार्थलोकानां सञ्चितानां तु गुप्तये । नृपतिः कारयेद्दुर्गं प्राकारद्वारसंयुतम् ॥ राजनीतिप्रकाश पा. २०२.] ह्यांना राष्ट्रानंतरचे स्थान दिले आहे. देशाच्या भरभराटीचे प्रतिबिंब राजधानीमध्य दिसून येत असे आणि राजधानीच्या सभोवती चांगला कोट बांधलेला असला तर तिच्या योगाने देशाला देखील सुरक्षितता मिळत असे (बृहस्पती. राज. नी. प्र. पा. २०२).

कौटिल्याने (२·३ आणि ४) दुर्ग बांधण्यासंबंधी विस्तृत विवेचन केले आहे आणि राजाने आपली राजधानी एकाद्या दुर्गात ठेवावी असे सांगितले आहे. कौटिल्याने **औदक** (बेटात असलेला), **पार्वत** (डोंगरावर असलेला), **धान्वन** (मैदानात असलेला) आणि **अरण्य** (दाट झाडीच्या प्रदेशात असलेला) अशा चार प्रकारच्या दुर्गांचा उल्लेख केला आहे. महाभारत (शांति ५६·३५), मनुस्मृति (७·७०) आणि निरनिराळी पुराणे ह्यांत दुर्गांचे चार, सहा, आठ, नऊ असे निरनिराळे प्रकार आणि त्यांची भिन्न नावे दिली आहेत आणि त्यांची रचना कशी असावी ह्याविषयी विवेचन केले आहे.

ऋग्वेदामध्ये (१·६३·७) नगराचा उल्लेख वरचेवर केलेला आढळतो आणि त्यातील वर्णनावरून असे निसून येते की सभोवती प्राकार (तटबंदी) असलेली नगरे इतक्या प्राचीन काळी देखील प्रसिद्ध होती. नगराभोवतालचे प्राकार, तोरणे (कमानीचे दरवाजे), अट्टालक (वरचे मजले), खंदक ह्यांचे उल्लेख राजधानीच्या नगरांच्या वर्णनात रामायण (५·२·५०।५३) आणि महाभारत (वन १·९।१० इ०) ह्या दोन्ही आदिकाव्यांत पुष्कळ वेळी आले आहेत. लंकेमध्ये सात मजली आणि आठ मजली राजवाडा, आणि दगडाची फरसबंदी असल्याचे वर्णन रामायणात केले आहेत. बृहत्संहितेत (अ. ५३) वास्तुशास्त्राचे जे नियम सांगितले आहेत त्यांत राजवाडा कोठे बांधावा, निरनिराळ्या अधिकाऱ्यांचे वाडे कोठे बांधावेत, त्यांची लांबी रुंदी किती असावी हे सांगितले आहे. आणि भिंती भाजलेल्या विटांच्या अथवा लाकडांच्या असाव्या असे म्हटले आहे.

राजधानीची रचना कशी करावी ह्याची वर्णने निरनिराळ्या ग्रंथांत दिली आहेत. उदाहरणार्थ, कौटिल्याने (२·४) म्हटले आहे की राजधानीच्या लांबीरुंदीचा विस्तार पश्चिमेकडून पूर्वेकडे जाणाऱ्या तीन

अनुक्रमणिका

राजमार्गांच्या योगाने आणि दक्षिणेकडून उत्तरेकडे जाणाऱ्या तीन राजमार्गांनी मर्यादित करावा. शुक्रनीतिसार (१·२६०-२६७) ह्या ग्रंथात सांगितले आहे की, उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ प्रकारच्या राजमार्गाची रुंदी अनुक्रमे ३०, २०, १५ हात असावी, राजधानीमध्ये अरुंद रस्ते नसावेत इतकेच नव्हे तर गावांत देखील सार्वजनिक रस्ते निदान १० हात रुंद असावेत, सर्व रस्ते त्यांच्या मध्य रेषेपासून दोहोबाजूला उतार असलेले असावे आणि सर्व घरे राजरस्त्यांकडे तोंडे केलेली असावी. राजाचा राजवाडा राजधानीच्या एकंदर क्षेत्रफळाच्या नवव्या हिश्याइतक्या जागेवर परंतु मध्यबिंदूच्या उत्तरेकडील भागात आणि सर्व जातीच्या लोकांच्या वस्तीच्या मध्ये पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख असा बांधावा.

मेगॅस्थेनिसने (मॅक्रिंडलचा ग्रंथ पा. १८७) केलेल्या पाटलीपुत्र नगराच्या वर्णनात त्या नगराच्या राज्यव्यवस्थेचे वर्णन केले आहे. त्याने म्हटले आहे की राजधानीच्या व्यवस्थेकरिता सहा समित्या नेमलेल्या असत आणि त्यांच्याकडे औद्योगिक कलाकौशल्य, परदेशाच्या लोकांची व्यवस्था, जन्ममृत्यूची नोंद, व्यापार उदीम, वजनेमापे, तयार माल, विकलेल्या मालावर किंमतीच्या १/१० इतका कर घेणे ही कामे सोपविलेली असत, नगराच्या सभोवती लाकडी भिंत होती आणि त्या भिंतीत बाण मारण्याकरिता भोके ठेवलेली होती. आणि नगराच्या पुढे खंदक होता.

भागवत पुराणात (४·१८·३०-३२) असे वर्णन केले आहे की वेनाचा पुत्र पृथु ह्या राजाने पहिल्याने पृथ्वी सपाट केली, गांवे, नगरे, राजधान्या, किल्ले इत्यादिकांत लोकांची वसाहत केली. पृथूच्या पूर्वी लोक आपल्या इच्छेप्रमाणे कोठेही राहत असत आणि ग्रामे, नगरे ह्यांच्या सारखे लोकवस्तीचे गट अस्तित्वात नव्हते. राजधर्मकौस्तुभ (पा. १०३-१०४) ह्या ग्रंथात ग्राम, खर्वट, खेट, नगर ह्यांच्या व्याख्या उद्धृत केल्या आहेत आणि ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या वर्णाच्या लोकांनी कोणत्या ठिकाणी वसाहत करावी हे सांगितले आहे. त्यात म्हटले आहे की ब्राह्मणांनी पांढुरक्या रंगाच्या आणि मधुर वास येणाऱ्या जमिनीत वसाहत करावी. क्षत्रियांनी तांबुस रंगाची आणि मधुर वास येणारी जमीन असलेल्या नगरात वास करावा आणि वैश्यांनी पिवळसर रंगाच्या जमिनीवर वसाहत करावी.

———————

# प्रकरण ६६

## कोश (खजिना अथवा आर्थिक व्यवस्था)

(मू. ग्रं. पा. ३.१८४-१९९)

महाभारत, कामसूत्र, कौटिलीय इत्यादी अनेक ग्रंथांत कोशाचे महत्त्व वर्णन केले आहे. कौटिल्याने (२.८) म्हटले आहे की राजाची सर्व कार्ये कोशावर अवलंबून असतात. [कोशश्च सततं रक्ष्यो यत्नमास्थाय राजभिः । कोशमूला हि राजानः कोशो वृद्धिकरो भवेत् ॥ शान्ति ११९·१६.] ह्याकरिता राजाने कोशाकडे प्रथम लक्ष दिले पाहिजे. शांतिपर्वात (११९·१६) देखील अशाच प्रकारचा उपदेश राजाला केला आहे.

कोश भरण्याचे मुख्य साधन लोकांवर बसविलेले कर हेच असते. ह्याकरिता आमच्या पूर्वीच्या ग्रंथकारांनी कर वसुलीसंबंधी निरनिराळे सिद्धान्त ठरविले होते. त्यात **पहिला सिद्धान्त** असा होता की कर बसविण्याविषयी स्मृतींनी घालून दिलेल्या नियमांना सोडून राजाला स्वतःच्या मर्जीप्रमाणे कर बसविता येत नाही. कर कोणत्या दराप्रमाणे घ्यावे ह्यासंबंधी जे नियम स्मृतींनी सांगितले आहेत त्या दरात परिस्थितीप्रमाणे राजाला फक्त कमीजास्तपणा करता येतो. तथापि अशा तऱ्हेचा अधिक कर पाहिजे असल्यास त्याबद्दल राजाने प्रजेजवळ प्रणय म्हणजे याचना केली पाहिजे असे कौटिल्याने (५·२) सांगितले आहे. तसेच असे अधिक कर फक्त आपत्काळीच आणि मर्यादित काळपर्यंतच वाढवावे असे आणखीही निर्बंध घातले आहेत. करासंबंधी **दुसरा सिद्धान्त** असा होता की राजाने बसविलेला कर लोकांना हलका वाटला पाहिजे आणि तो जरूरीपेक्षा अधिक नसावा आणि कमीही नसावा. उद्योगपर्वात [पुष्पं पुष्पं विचिन्वीत मूलच्छेदं न कारयेत् । मालाकार इवा रामे न यथाङ्गारकारकः ॥ उद्योग ३४·१८.] (३४·१७।१८) म्हटले आहे की राजाने मधमाशीप्रमाणे मध मिळविण्याकरिता प्रत्येक फुलाचा तपास करावा परंतु माळ्याप्रमाणे फुलाचे मूळ तोडू नये अथवा कोळसे करणाऱ्याप्रमाणे झाडाचा समूळ नाश करू नये. **तिसरा सिद्धान्त** असा होता की कर वाढवावयाचा झाल्यास ती वाढ क्रमाक्रमाने आणि प्रत्येक वेळी थोडी थोडी अशी करावी. (शांति ८८·७।८). कराची वसुली योग्य स्थळी आणि योग्य काळी करावी असे शांतिपर्वात (८८·१२) सांगितले आहे. असाही एक **सिद्धान्त** होता की राज्यातील प्रत्येकाने, मग तो कितीही गरीब असो; राज्याच्या सांपत्तिक व्यवहाराला हातभार लावलाच पाहिजे. मनूने (७·१३७।३८) म्हटले आहे की अत्यंत दरिद्री मनुष्याला देखील जर तो काही तरी व्यवसाय करीत असेल तर दरवर्षी काही तरी कर देण्यास लावले पाहिजे आणि अंगमेहनतीचे काम करून उदरनिर्वाह करणाऱ्या शिल्पकारांना आणि शूद्रांना राजाने महिन्यातून एक दिवस विनावेतन काम करावयास सांगावे. अशा विनावेतन काम करणाऱ्यांना राजाने भोजन दिले पाहिजे. (गौत. १०·३४).

लोकांनी राजाला कर का द्यावेत ह्याविषयी अनेक कारणे निरनिराळ्या ग्रंथांत सांगितली आहेत. राजा हा लोकांचे संरक्षण करतो म्हणून त्याला लोकांनी कर द्यावे असे गौतमाने म्हटले आहे. (गौत. १०·२८). कर हे राजाचे वेतन असून ते देण्याचा करार प्रजाजनांनी मनुराजापाशी केला होता असे शांतिपर्वात (६७ आणि ७०·१०) सांगितले आहे. राजा हा भूमीचा स्वामी असतो म्हणून त्याला जमिनीत पिकणाऱ्या उत्पन्नाचा सहावा हिस्सा मिळण्याचा अधिकार असतो असे कात्यायनाने (१६।१७) म्हटले आहे. ज्याप्रमाणे सूर्य हा समुद्रापासून पाण्याची वाफ करून ती पर्जन्याच्या रूपाने समुद्राला परत करीत असतो

असे रघु (१·१८) मध्ये म्हटले आहे त्याप्रमाणे राजाने लोकांकडून कर वसूल करून संरक्षण आदि प्रकारांनी ती संपत्ती लोकांना परत केली पाहिजे असे मनु (९·३०५) मध्ये म्हटले आहे.

कामसूत्रात (५·७८।७९) राजाला द्रव्यप्राप्तीची प्रमुख अशी आठ साधने (अष्टवर्ग) सांगितली आहेत. त्यांत शेतकी, व्यापाराचे मार्ग, राजधानी, पाणी अडविणे, हत्ती धरणे, खाणी खणणे आणि सुवर्णादि पदार्थ गोळा करणे, ओसाड प्रदेशात गाव आणि नगरे ह्यांची स्थापना करणे इत्यादी साधनांचा समावेश होतो सामान्यतः राजाने वार्षिक उत्पन्नापैकी तीनचतुर्थांश खर्च करावा आणि एक चतुर्थांश शिल्लक टाकावा अशा स्वरूपाचा नियम मानसोल्लास (२·४ पा ७७), इत्यादी ग्रंथांत सांगितला आहे. धान्यादिकांचा संग्रह राजाने किती करावा ह्या विषयीही नियम सांगितले आहेत. सामान्यतः आपल्या देशातील लोकांना तीन वर्षे पुरेल एवढा धान्यसंग्रह राजाने करावा. परंतु शुक्रनीतिसारात (४·२·१३) राजापुढ असा अशक्यप्राय वाटणारा आदर्श ठेवला आहे की शेतीच्या उत्पन्नावर कर न बसविले आणि जकात अथवा दंड वसूल न केले तरीही राजाला त्याचे सैन्य २० वर्षेपर्यंत पोसता येईल इतका त्याचा कोश समृद्ध असावा.

करवसुलीसंबंधी आपत्काली योजावयाचे काही मार्ग निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत. लोकांना विनंती करून देखील जर राजाचा कोश रिता राहिला तर त्याने धनिकांना जेवढे सोने देणे शक्य असेल तितके सोने देण्याची विनंती करावी आणि त्याच्या मोबदला दरबारामध्ये त्यांना अधिकाराची जागा द्यावी अथवा काही भूषण देऊन त्यांचा सत्कार करावा. आपत्काळी व्यापारी संघाजवळची, नास्तिक लोकांजवळची आणि देवस्थानांची देखील संपत्ती घेण्यास मोकळीक दिली आहे. आणखीही काही युक्त्या आणि लबाड्या कौटिल्याने (५·२) सुचविल्या आहेत. मात्र अशा युक्त्या आणि लबाड्या फक्त राजद्रोही अथवा नास्तिक मताचे लोक ह्यांच्याच बाबतीत योजाव्या असे सांगितले आहे. द्रव्याची अडचण पडल्यास राजाने धनिकांना व्याज देण्याचे वचन देऊन त्यांची संपत्ती घ्यावी आणि अडचण दूर झाली म्हणजे घेतलेली संपत्ती व्याजासह परत करावी असे शुक्रनीतिसारात (४·२·११) सांगितले आहे.

राष्ट्राला बारमहा उत्पन्न देणाऱ्या प्रमुख बाबी जमिनीच्या उत्पन्नावरील कर, आयात निर्यात होणाऱ्या मालावर अथवा देशातल्या व्यापाऱ्यांच्या मालावर घेण्यात येणारी जकात अथवा शुल्क आणि अपराध्यांकडून अथवा न्यायालयात पराजित होणाऱ्या पक्षाकडून घेतला जाणारा दंड ह्या तीन असत. पौर आणि जानपद लोकांकडून प्रतिमासी वसूल करण्यात येणाऱ्या द्रव्याला कर म्हणत; व्यापाऱ्यांकडून घेतल्या जाणाऱ्या १/१२ भागाला शुल्क म्हणत. जमिनीत पिकणाऱ्या धान्याचा सामान्यतः सहावा हिस्सा, आठवा हिस्सा, अथवा बारावा हिस्सा घेण्याचा राजाला अधिकार असे. कोणत्या धान्याच्या बाबतीत किती कर घ्यावा ह्याबद्दल नियम सांगितले आहेत. आपत्काली अथवा प्रसंगविशेषी हा कर १/४ पर्यंतही वाढविता येई. गुरे बाळगणाऱ्यांच्या कळपातही काही हिस्सा, व्याजबट्टा करणाऱ्यांना मिळालेल्या व्याजातील काही हिस्सा, कापडाच्या पैदाशीवर कर, तसेच झाडे, मध, तूप, औषधी, मातीची आणि दगडाची भांडी आणि पदार्थ इत्यादिकांचाही हिस्सा राजाला घेता येत असे.

जमिनीवरून आयात निर्यात केलेल्या आणि जलमार्गाने आयात निर्यात केलेल्या मालावर अशी दोन प्रकारची जकात असे. तसेच देशातल्या देशात घेतलेल्या आणि विक्रीस ठेवलेल्या मालावर शुल्क असे. ह्यांच्या दरासंबंधी आणि सूट देण्यासंबंधी नियम असत.

अनुक्रमणिका

राज्याच्या उत्पन्नाच्या ह्याशिवाय दुसऱ्या काही बाबी असत. खाणीतून काढलेल्या पदार्थाचा हिस्सा मिळण्याचा राजाला अधिकार असतो. कारण राजा हा पृथ्वीचा स्वामी असतो आणि त्यामुळे तो खाणीतून निघणाऱ्या पदार्थाचाही स्वामी असतो. मीठ तयार करण्याचे आणि इतर रीतीने तयार केलेल्या मिठाचा काही हिस्सा मिळण्याचे राजाला अधिकार असत. हत्ती पकडण्याचा अधिकार फक्त राजाला असे. कारण हत्ती हे राज्याला फार उपयुक्त असतात. केशर, रेशमी कापड, लोकर, घोडे, मोती आणि रत्ने ह्यांचावरही राजाकडे सर्वाधिकार असे. (मनु. ८·४०० वरील मेधातिथी टीका).

राजाला त्याच्या राज्यात राहणाऱ्या मुनींच्या पुण्याचा १/४ हिस्सा मिळत असतो आणि राजाने योग्य नियमन न केल्यामुळे प्रजेने केलेल्या पापाचा १/२ भाग राजाला स्वीकारावा लागतो असे रामायणात (३·६·१४) सांगितले आहे. राजाने दान दिलेल्या गावातील काही कर माफ केलेले असत. अशा माफ केलेल्या करांना परिहार अशी संज्ञा असे.

राजाला द्यावयाच्या कराला सर्वात जुना शब्द '**बलि**' हा आहे. ऋग्वेदात (७·६·५) सामान्य लोकांना 'बलिहृत' म्हणजे राजाला कर देणारे म्हटले आहे. ब्राह्मण आणि क्षत्रिय ह्यांना कर देण्याची माफी असे म्हणून वैश्यांना 'बलिकृत्' (कर भरणारा) असे ऐत. ब्रा. (३५·३) मध्ये म्हटले आहे. अमरकोशात बलि, कर आणि भाग हे शब्द समानार्थी असल्याचे म्हटले आहे.

कर वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यांत अंतपाल हा सरहद्दीवर रस्त्यावर दस्तुरी गोळा करीत असे. जुगारीचे अड्डे, नट, गवई, वाजविणारे वगैरे लोकांवर कर असत. राजाला आपल्या संपत्तीची वाढ करण्याकरिता किमया करण्याची परवानगी मानसोल्लासात [धातुवादप्रयोगैश्च विविधैर्वर्धयेद्धनम् । ताम्रेण साधयेत् स्वर्णं रौप्यं वङ्गेन साधयेत् ॥ मानसोल्लास २·४. श्लो. ३२७ पा. ६३.] (२·४ पा ६३) दिली आहे.

राजाचे दर दिवसाचे, महिन्याचे आणि वार्षिक जमाखर्च ठेवावे असे शुक्र (२·३१९।३२१ आणि ३७०) मध्ये सांगितले आहे आणि जमाखर्च तपासण्याकरिता कुशलकरण कार्यपुरुष (हिशोबतपासनीस) नेमावे असे नीतिवाक्यामृतात (पा. १८९) सांगितले आहे.

------

अनुक्रमणिका

## प्रकरण ६७

# बल (म्हणजे सैन्य)

(मू. ग्रं. पा. ३.२००-२१५)

कौटिलीय आणि दुसऱ्या काही ग्रंथांत बल ह्याला दंड अशी संज्ञा लावली आहे. ऋग्वेदात (६·७५) सैन्य, धनुष्यादि शस्त्रे, युद्ध वगैरेचे उल्लेख आले आहेत. बहुतेक ग्रंथांत सैन्य सहा प्रकारचे असल्याचे सांगितले आहे. (कौटि. ९·२, काम. १८·४) : **मौल** (वंशपरंपरागत), **भृत्य** (पगारी), **श्रेणी** (व्यापारी संघांचे सैन्य), **मित्र** (स्नेही अथवा मांडलिक राजांचे), **अमित्र** (एकेकाळी शत्रूकडे असलेले), **अटवी** (रानटी टोळ्यांचे). त्यांतील मौल हे आपल्या चरितार्थांकरिता राजावर अवलंबून असते आणि त्याच्या कवाइती निरंतर घेतल्या जातात म्हणून ते इतरांपेक्षा श्रेष्ठ असते असे कौटिल्याने (९·२) म्हटले आहे. काही ग्रंथकारांनी चार, पाच प्रकारच्या सैन्यांचाही उल्लेख केला आहे. ब्राह्मणादि चार वर्णांच्या सैनिकात ब्राह्मण हे श्रेष्ठ असल्याचे कोणी म्हटले आहे तर कौटिल्याने [प्रणिपातेन ब्राह्मबलं परोभिहारयेत् । प्रहरणविद्याविनीतं तु क्षत्रियबलं श्रेयो बहुलसारं वैश्यशूद्रबलमिति । कौटिल्य ९·२.] (९·२) ब्राह्मणसैन्यापेक्षा शस्त्रांचा उपयोग करण्याचे चांगले शिक्षण दिलेले क्षत्रियांचे, वैश्यांचे आणि शूद्रांचे सैन्य श्रेष्ठ असल्याचे सांगितले आहे कारण ब्राह्मण सैन्यापुढे साष्टांग नमस्कार घालून त्याला आपल्या बाजूला वळविणे शक्य असते. महाभारतात एके ठिकाणी (आदि. १७५·४५) क्षात्रबल तुच्छ मानून ब्राह्मणांचे तपोबल हेच खरे सामर्थ्य असल्याचे म्हटले आहे. उद्योगपर्वात (३७·५२-५५) बल पाच प्रकारचे असल्याचे सांगितले आहे : **बाहुबल** (पाशवीशक्ति), **अमात्यलाभ** (मंत्री मिळाल्यामुळे मिळणारे सामर्थ्य), **धनलाभ**, **अभिजातबल** (उच्च कुळात जन्मल्यामुळे मिळणारे सामर्थ्य) आणि **प्रज्ञाबल** (बुद्धीमुळे मिळणारे सामर्थ्य). ह्या सर्वात प्रज्ञाबल श्रेष्ठ असते.

हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ ही सैन्याची **चार** अंगे असतात. ह्या चारांखेरीज कोश, दळणवळणाचे मार्ग, विष्टि (कामकरी), नौका, हेर, देशिक (वाटाडे) ह्यांच्यापैकी काहींचा समावेश करून काही ग्रंथांत सैन्याची सहा (काम. १८·२४) अथवा आठ (शांति ५९·४१-४२) अंगे असल्याचे सांगितले आहे. प्राचीन भारतात हत्तींना लढाईचे शिक्षण देण्यात येत असे आणि त्यांच्यावर जयापजय अवलंबून असत. भारताच्या वायव्येकडील कांबोज, गांधार, बाल्हिक, सिंधु, पारसिक अशासारख्या देशांतील घोडे प्रसिद्ध असत. मध्युगीन कालात रथ उपयोगातून मागे पडला असे दिसते.

प्राचीन भारतात सैन्यातील निरनिराळ्या अंगांचे प्रमाण सामान्यतः पुढील कोष्टकावरून कळून येईल : ५०० हत्ती, ५०० रथ, १५०० घोडे आणि ५०० पायदळ इतक्यांना **सेना** अशी संज्ञा असे आणि त्यांच्या दहा दहा पटीने मोठ्या अशा पृतना, वाहिनी, ध्वजिनी, चमू आणि अक्षौहिणी ह्या संज्ञा असत. (उद्योग १५५·२४-२६).

राजाच्या सैन्याची व्यवस्था कशी असावी, स्वारीला योग्य काल कोणता, युद्धभूमी कशी असावी इत्यादी युद्धासंबंधीच्या तपशीलांबद्दलचे नियम कौटिल्याने (९·१-७ आणि १०·१-६) सांगितले आहेत. युद्धात सैन्याची रचना करण्याबद्दलचे अनेक व्यूह महाभारतासारख्या ग्रंथांत दिले आहेत. जय मिळविण्याकरिता सर्व प्रकारच्या युक्त्यांचा आणि विश्वासघाताचा उपयोग करण्याची कौटिल्याने शिफारस

अनुक्रमणिका

केली आहे परंतु महाभारतात [न तथा बलवीर्याभ्यां जयन्ति विजिगीषवः। यथा सत्यानृशंस्याभ्यां धर्मेणैवोद्यमेन च॥ भीष्म २१·१०.] (भीष्म. २१·१०) एके ठिकाणी म्हटले आहे की अधर्माने विजय मिळविण्यापेक्षा धर्माला अनुसरून लढताना मृत्यू आलेला जास्त चांगला; विजेत्याला मिळणारा जय त्याच्या सैन्याच्या योगाने आणि शौर्याच्या योगाने जितका मिळतो त्याच्यापेक्षा अधिक अंगच्या सत्य, क्रूरपणाचा अभाव, धर्मपरायणता आणि उद्योग ह्या गुणांनी मिळत असतो.

युद्धामध्ये उभय पक्षांनी पालन करावयाचेही अनेक नियम असत. कौरवपांडवांच्या युद्धात असे ठरविले होते की सारख्या सामग्रीने सज्ज असणाऱ्या सैनिकांबरोबर युद्ध करावे, दुसऱ्याबरोबर युद्ध करीत असलेल्या सैनिकाचा इतर कोणी वध करू नये, शरण आलेला, पाठ फिरविलेला, कवच नसलेला अशा सैनिकाचा कोणी वध करू नये, गुप्त शस्त्राने अथवा कांटेरी अथवा विषारी शस्त्राने युद्ध करू नये, जखम झालेल्या शत्रूच्या सैनिकाला देखील औषधोपचार केला पाहिजे आणि तो बरा झाल्यावर त्याला परत जाऊ दिला पाहिजे इ०. हे सर्व नियम प्रत्यक्ष युद्धात पाळले जातच असत असे नाही.

सैन्याबरोबर शस्त्रक्रिया करण्यास लागणारी उपकरणे, औषधे, तेले, जखम बांधण्याच्या पट्ट्या वगैरे सामग्री घेतलेले वैद्य आणि स्त्री परिचारिका सैनिकांच्या मागल्या बाजूला उभ्या राहून सैन्याला उत्तेजन देणारी भाषण करीत असत.

युद्धातून पळून जाण्यापेक्षा युद्धात मरणे हे प्रत्येक क्षत्रियाचे आणि योध्याचे कर्तव्य आहे असे लोकांच्या मनावर बिंबविण्यात येत असे. युद्धात जय झाल्यास लूट, कीर्ती, मान, आपले कर्तव्य केल्याचे समाधान इत्यादी लाभ होतील आणि मृत्यू आल्यास सर्वप्राप्ती होईल; ह्याच्या उलट जो सैनिक युद्धातून पळून जातो तो नरकात पडतो असे सांगितले आहे. युद्ध सुरू होताना आणि चालू असताना सैन्याला उत्तेजन देण्याकरिता त्यांना पारितोषिके देण्याचे आश्वासन देण्यासारखे कोणते उपाय योजावे हे सांगितले आहे.

युद्धात वापरावयाच्या निरनिराळ्या शस्त्रांची नावे-निरनिराळ्या ग्रंथांत दिली आहेत. ऋग्वेदामध्ये (५·५२·६; ५·५७·२ इ.) ऋष्टि, बाण, भाते, अंकुश, परशु, कृपाण, वज्र इत्यादिकांचा उल्लेख केला आहे. अथर्ववेदात (४·६·६) विषयुक्त बाण, सीस ह्यांचा उल्लेख आहे. तै. सं. मध्ये (१·५·७·६) शतघ्नीचा उल्लेख असून रामायण (युद्ध ३·१३), महाभारत (आदि. २०७· ३४ इ०) ह्यांतही त्या शस्त्राचा उल्लेख केला आहे. परंतु ते शस्त्र प्रत्यक्ष काय स्वरूपाचे होते हे समजत नाही. महाभारतात केलेल्या वर्णनाप्रमाणे शतघ्नी हे शस्त्र हाताने जोरात फेकले जात असे आणि त्याला चाके असून त्यात वाटोळे गोटे अथवा दगड असत. सुंदरकांडात शतघ्नी आणि मुसल ही दोन प्रकारची शस्त्रे एकत्र सांगितली आहेत. असा संभव आहे की कसल्या तरी डिंकाची पूड चाके लावलेल्या नलिकाकार यंत्रात घालून दगड उडविण्याकडे उपयोग करीत असत. शक्रनीतिसार (२·९३ व १९६ इ०) ग्रंथामध्ये **अग्निचूर्ण** संज्ञा असलेल्या बंदुकीच्या दारूचा आणि तोफांचा उल्लेख केला असून अशी दारू तयार करण्याची (शुक्र. ४·७·२०१) प्रमाणे दिली आहेत. हा ग्रंथ बहुधा १३ व्या अथवा १४ व्या शतकांच्या सुमारास रचिला गेला असावा आणि त्याकाळी युरोपखंडात तोफांचा उपयोग प्रथम करण्यात येऊ लागला होता. तथापि आज जी माहिती उपलब्ध आहे त्यावरून रामायण आणि महाभारत ह्या प्राचीन ग्रंथांच्या काळी बंदुकीच्या दारूची आणि ती वापरणाऱ्या शस्त्रांची भारतातील लोकांना माहिती होती असे वाटत नाही.

अनुक्रमणिका

नीतिप्रकाशिका (अ. २-५) ह्या ग्रंथात चार प्रकारच्या अनेक शस्त्रांची नावे दिली असून त्या शस्त्रांची वर्णनेही केली आहेत. ते शस्त्राचे चार प्रकार म्हणजे **मुक्त** (बाणासारखी सोडावयाची अथवा फेकावयाची शस्त्रे), **अमुक्त** (तलवारीसारखी न फेकावयाची शस्त्रे), **मुक्तामुक्त** (फेकावयाची आणि अस्त्रांप्रमाणे फेकल्यावर परत घेता येणारी शस्त्रे) आणि **मंत्रमुक्त** (परत घेता येत नाहीत अशी अस्त्रे). अग्नि (अ. २४९-२५२) आणि विष्णुधर्मोत्तरपुराणात (२·१७८-१८२) पाच प्रकारची शस्त्रे सांगितली आहेत : यंत्रमुक्त, पाणिमुक्त, मुक्तामुक्त, उन्मुक्त आणि नियुद्ध अथवा बाहुयुद्ध.

अस्त्रविद्या हे दैवी शास्त्र होते आणि ते गुरूपासून अथवा पित्यापासून शिकत असत अथवा तप करून ते मिळविता येत असे. अस्त्रविद्या ही लेखी होती किंवा नाही, ती वाचणाऱ्याला अस्त्रांचे अतिमानुष सामर्थ्य मिळविता येत असे किंवा नाही हे आधुनिक काळच्या कोणाही व्यक्तीला सांगता येत नाही. युद्धात जय मिळविण्याकरिता अथवा जग जिंकण्याकरिता म्हणावयाचे जादूचे मंत्र अग्निपुराणात (अ.१३४-३५) सांगितले आहेत. ब्रह्मयामलासारख्या तंत्रग्रंथातही अनेक मंत्र आणि यंत्रे आणि जादुप्रयोग दिले आहेत. (परशुरामप्रताप— राजवल्लभकांड पा ९—१२).

______

अनुक्रमणिका

# प्रकरण ६८

## सुहृद अथवा मित्र

(मू. ग्रं. पा. ३.२१६-२३४)

आपल्या सभोवतालच्या दुर्बल राजांवर विजय मिळविणे, त्यांच्यावर सत्ता गाजविणे आणि त्या योगाने आपली भरभराट करून घेणे हेच राजाचे ध्येय असावे असे आमच्या सर्व ग्रंथांत सांगितले आहे. सभोवतालच्या राजांपैकी काही शत्रु असतात, काही मित्र असतात आणि काही उदासीन असतात. ज्या राजाला आपल्या राज्याचा विस्तार करण्याची महत्त्वाकांक्षा असते, जो राज्याच्या सात अंगांनी संपन्न असतो, ज्याच्या अंगी मोठे सामर्थ्य असते आणि जो पराकाष्ठेचे परिश्रम करतो तो **विजिगीषु** राजा असे कामसूत्र (८·६) मध्ये सांगितले आहे. भूमि, सुवर्ण आणि मित्र ह्या तीन गोष्टी राजाने प्राप्त करून घेण्यासारख्या असतात. त्यांच्यापैकी तारतम्याने कमीअधिक महत्त्वाची कोणती ह्याविषयी मतवैचित्र्य आहे. मित्र संपादन करण्याचे महत्त्व निरनिराळ्या ग्रंथांत वर्णन केले आहे. तसेच राजाला कोणी मित्र नसतो आणि राजाही कोणाचा मित्र नसतो, मित्र अथवा शत्रु द्रव्याच्या योगाने अथवा आपल्यापुढे ठेवलेल्या उद्दिष्टाप्रमाणे होत असतात असेही काही [न राज्ञो विद्यते मित्रं राजा मित्रं न कस्य वै । शुक्र ४·१·९; कारणेन हि जायन्ते मित्राणि रिपवस्तथा । कामन्दक ८·५२.] ग्रंथांत म्हटले आहे. (शांति १३८·११०; शुक्र ४·१·९; कामंदक ८·५२ इ०).

मित्र संपादन करण्याच्या विषयातूनच मंडलाची कल्पना निघाली आहे. आपल्या सभोवती असणाऱ्या राजांशी कशा रीतीने वागावे आणि निरनिराळ्या राजांच्या दरम्यान शक्तीचा समतोलपणा कसा राखावा ह्याविषयी निरनिराळ्या ग्रंथांत विवेचन केले आहे. (कौटि. ६·२ आणि अधिकरण ७). कोणत्या गोष्टी संभवनीय आहेत ह्या दृष्टीने विचार केल्यास एकाद्या राजाचे अगदी निकटचे शेजारी त्याचे **अरि** अथवा **शत्रु** (निदान संभाव्य शत्रु) असतात; निकटच्या शेजाऱ्याच्या पलिकडे असणारा त्या शेजाऱ्याचा नाश करण्याकरिता विजिगीषु राजाबरोबर संगनमत करण्याची शक्यता असते म्हणजे तो त्याचा **मित्र** (अथवा संभाव्य मित्र) असतो; ज्या राजाचे राज्य विजिगीषु आणि त्याच्या समोरचा अरि ह्यांच्या सरहद्दीवर असते आणि विजि० आणि अरि ह्यांनी सख्य केलेले असो अथवा नसो जो त्या दोघांना मदत करण्यास समर्थ असतो आणि त्या दोघांनी सख्य केले नसेल त्यावेळी त्या दोघांचा पृथक्‌पणे समाचार घेण्यास समर्थ असतो तो **मध्यम** असतो; ज्या राजाचा देश विजि, अरि आणि मध्यम ह्या तिघांच्या टप्प्याच्या पलिकडे असतो आणि तिन्ही प्रकारच्या राजांनी आपसात सख्य केले असले अथवा नसले तरी जो त्यांना मदत करण्यास समर्थ असतो आणि त्यांच्यापैकी कोणाचाही प्रतिकार करण्यास समर्थ असतो तो सामान्यतः **उदासीन** असतो; विजि. राजाच्या पाठीमागे असणाऱ्या राजाला **पार्ष्णिग्राह** म्हणजे पाठीवर हल्ला करणारा म्हणतात आणि पार्ष्णिग्राहाच्या पलिकडे असणाऱ्या राजाला **आक्रंद** म्हणजे मदतीला बोलाविता येईल असा म्हणतात. मित्राच्या पलिकडे असणाऱ्या तीन राजांना अनुक्रमे **अरिमित्र, मित्रमित्र** आणि **अरिमित्रामित्र** अशा संज्ञा असतात आणि आक्रंदाच्या पलिकडे असणाऱ्या दोन राजांना अनुक्रमे **पार्ष्णिग्राहासार** आणि **आक्रंदासार** अशा संज्ञा असतात. ह्या निरनिराळ्या राजांची भौगोलिक परिस्थिती पुढील कोष्टकात दाखविली आहे :–

| | उदासीन | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अरिमित्रमित्र | मित्रमित्र | अरिमित्र | मित्र | अरि | विजिगीषु | पार्ष्णिग्राह | आक्रंद | पार्ष्णिग्राहासार | आक्रंदासार |
| | | | | मध्यम | | | | | |

मंडळात किती घटक असतात ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. कौटिल्याच्या (७·१; ७·३) मताने वरील कोष्टकात सांगितलेल्या बारा प्रकारच्या राजांचे मंडल होते. ह्या बारा प्रकारच्या राजांचे प्रत्येकी निरनिराळे भेद आणि उपभेद करून निरनिराळ्या ग्रंथकारांनी मंडळाच्या घटकांची संख्या १०८ पर्यंत भिन्न भिन्न दिली आहे. आपल्या परिस्थितीप्रमाणे कोणत्या राजावर स्वारी करावी, कोणाबरोबर संधी करावा, कोणत्या राजाचा आश्रय घ्यावा ह्यासंबंधी तपशीलवार नियम निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत.

शत्रूवर प्रत्यक्ष हल्ला करण्यापूर्वी तो शत्रू युद्धाशिवाय शरण येण्यास तयार आहे किंवा काय हे पाहण्याकरिता त्याच्याकडे एक दूत पाठवावा. स्वारीवर निघण्यापूर्वी काही विवक्षित धार्मिक विधी आणि पूजा करावयास सांगितले आहे आणि अरिष्ट निरसनाकरिता विधी करावयास सांगितले आहे. अशा विधीमध्ये जयाभिषेक संज्ञा असलेला एक स्नानविधी असतो. (राज. नी. प्र. पा. ३५१-३९५).

तसेच हत्ती, घोडे, सैनिक ह्यांच्यापुढे दिवे ओवाळण्याचा नीराजन नावाचा एक विधी असतो. (कौटि. २·३०). हा विधी युद्धाशिवाय इतरही काही प्रसंगी करावयाचा असे. (कौटि. २·३२).

युद्धामध्ये प्रतिस्पर्धी राजाचा नाश केल्यावर त्याच्या सिंहासनावर त्याच्या पुत्राची अथवा एकाद्या नातलगाची स्थापना करावी आणि जित राष्ट्रातील परिपाठ आणि चालीरीती ह्यांना मान द्यावा. (कौटि ७·१६; याज्ञ. १·३४२।४३). एकाद्या राजाचा पराजय झाला तर त्याला आपला काही प्रदेश तरी विजेत्याला द्यावा लागे अथवा साधारणतः निरनिराळ्या प्रकारची खंडणी द्यावी लागे.

प्राचीन काळी राजाची युद्धावर जातेवेळची तयारी कशी करीत असत ह्या संबंधीची वर्णने आणि नियम निरनिराळ्या ग्रंथांत सांगितले आहेत. आश्वलायन-गृह्यसूत्रात (३·१२) ह्या संबंधी जे नियम सांगितले आहेत. त्यांत पुरोहिताने निरनिराळे मंत्र उच्चारून राजाला त्याचे कवच, धनुष्य, बाणांचा भाता हे पदार्थ द्यावेत, रथावर आरोहण करताना कोणते मंत्र म्हणावेत, बाण सोडते वेळी कोणते मंत्र म्हणावे इत्यादी तपशील दिला आहे. राजाने कोणत्या दिशेकडे पहावे आणि कोणत्या बाजूने युद्ध करावे हे सांगितले आहे.

ज्यांच्या योगाने मनुष्य अतिशय चांगल्या गोष्टींना मुकतो त्यांना व्यसन ही संज्ञा आहे. (कौटि. ८·१). तापट स्वभाव, स्त्रियांविषयी अतिशय आसक्ती, परचक्रापासून अथवा दुष्काळासारख्या दैवी आपत्ती ह्यांचा व्यसनांत समावेश होतो. राजा, मंत्री, राज्यातील जनता इत्यादी निरनिराळ्या अंगासंबंधीच्या व्यसनांत कोणती अधिक महत्त्वाची असतात ह्यांसंबंधी विवेचन निरनिराळ्या ग्रंथांत केले आहे. उदाहरणार्थ, कौटिल्याच्या (८·२) मताप्रमाणे राजावर येणाऱ्या आपत्ती अथवा राजाचे दुर्गुण ह्यांचा परिणाम मंत्र्यांवर येणाऱ्या आपत्तींपेक्षा आणि त्यांच्या ठिकाणच्या दुर्गुणांपेक्षा अधिक भयंकर असतो, कारण मंत्र्यांची

नेमणूक राजा करीत असल्यामुळे मंत्र्यांवर आपत्ती आल्यास अथवा त्यांच्या ठिकाणी दुर्गुण असल्यास राजा त्यांच्या जागी दुसऱ्या व्यक्तींच्या नेमणुका करू शकेल. अशीच निरनिराळ्या दोषांची आणि दुर्गुणांची तुलना केली आहे. उदाहरणार्थ, द्यूत हे व्यसन शिकारीपेक्षा वाईट असते आणि मद्यपान हे विषयोपभोगाच्या आसक्तीपेक्षा अधिक वाईट असते; अग्निपेक्षा पुराने अधिक हानी होते.

राजधर्मकांड (पा. ११५-११७), राजनीतिप्रकाश (पा. ४१६-४१९) इत्यादी ग्रंथांत राजाने करावयाचे निरनिराळे विधी सांगितले आहेत. अशा विधींमध्ये निरनिराळ्या देवतांच्या प्रीत्यर्थ वैशाखमासापासूनच्या सहामहिन्यात भरवावयाच्या देवयात्रा, इंद्रध्वज उभारण्याचा समारंभ, चांदण्यात करावयाचे उत्सव इत्यादींचा समावेश होतो. त्याचप्रमाणे कार्तिक अमावास्येला गाई दान करावयास सांगितले आहे आणि वसोर्धारा (संपत्तीचा ओघ) नावाचाही एक विधी करावयास सांगितले आहे. अशा विधींचा आणि उत्सवांचा हेतु राष्ट्रावर येणाऱ्या आपत्तींचे निवारण करणे हा असून त्याचप्रमाणे जनतेला आनंदित ठेवणे आणि लोकांना करमणुकीची साधने पुरविणे हाही असे.

_____

## प्रकरण ६९

## राजधर्माच्या अध्ययनाचा उद्देश आणि शासनसंस्थेची ध्येये

(मू. ग्रं. पा. ३.२३५-२४१)

प्राचीन काळी आणि मध्ययुगीन काळात होऊन गेलेल्या ग्रंथकारांनी शासन संस्था आणि राज्यकारभार ह्या विषयांवर जी तत्त्वे प्रतिपादन केली आहेत आणि आचरणाचे जे नियम सांगितले आहेत त्यांच्या पोटात धार्मिक भावना असल्याचे दिसून येते. त्यांनी राज्यकर्त्यांच्या आणि अधिकाऱ्यांच्या दृष्टीपुढे ठेवलेले ध्येय उच्च नैतिक स्वरूपाचे होते. आमच्याकडील बहुतेक तत्त्वज्ञानांप्रमाणेच राजधर्माचे अंतिम उद्दिष्ट मोक्ष हेच असे. परंतु तात्कालिक ध्येय सर्व लोकांना शांततेने आणि सुखाने राहता येईल, आपआपले व्यवसाय करता येतील, आपल्या चालीरीती आणि स्वधर्म पाळता येतील, आपल्या परिश्रमाच्या फलाचा आणि संपादन केलेल्या संपत्तीचा उपभोग घेता येईल अशी परिस्थिती निर्माण करणे हे असे. लोक शासनाच्या भीतीनेच सन्मार्गाने चालतात असे आमचे ग्रंथकार मानीत असत. ह्याकरिता लोक आपआपली वर्णाश्रमांची कर्तव्ये (धर्म) नीट रीतीने पालन करतात किंवा नाही हे पाहणे आणि जर लोक धर्माचे उल्लंघन करीत असतील तर त्यांना शासन करून मार्गावर आणणे हे शासनसंस्थेचे कर्तव्य असल्याचे त्यांनी सांगितले आहे. ह्या गोष्टीमुळे पूर्वपरंपरा चालविण्याला वाजवीपेक्षा अधिक महत्त्व देण्यात आले आणि चालू असलेल्या समजुती आणि आचार आदर्श स्वरूपाचे असल्याचे मानण्यात येऊ लागले. प्रत्येक व्यक्तीने समाजहित करण्याचा प्रयत्न केला पाहिजे ह्या गोष्टीवर भर देण्यात आला नाही. राजधर्माचे अंतिम ध्येय मोक्ष हे मानण्यात आल्यामुळे वैयक्तिक गुणांना आणि ऐहिक व्यवहारापासून अलिप्त राहण्याला अवास्तव महत्त्व देण्यात आले. राजप्रमुख राज्यपद्धती हा एकच प्रकार भारतात ठाऊक होता त्यामुळे त्या पद्धतीचाच विचार सामान्यतः भारतीय ग्रंथकारांनी केलेला आहे आणि अल्पसत्ताक अथवा प्रजासत्ताक ह्यांच्यासारख्या इतर प्रकारच्या राज्यपद्धतीविषयी त्यांनी विवेचन केले नाही. स्वदेशाभिमानाची युरोपखंडात नवीन उदयाला आलेली भावना जनतेत रुजविण्याचे कार्य त्यांनी केले नाही. अशा प्रकारचे काही दोष असले तरी आमच्या देशातील प्राचीन ग्रंथकारांनी केलेली कामगिरी भरीव आणि स्वतंत्र स्वरूपाची असून जगातील बहुतेक देशांतील प्राचीन आणि मध्ययुगीन कालातील विचारांच्या तोडीचे त्यांचे कार्य आहे.

जगातील परिस्थिती आता पुष्कळच बदलली आहे आणि नवीन परिस्थितीत उद्भवणारे प्रश्न नव्या स्वरूपाचे असल्यामुळे ते सोडविण्याच्या कामी प्राचीन काळच्या इतिहासाचा फारसा उपयोग होणे शक्य नाही ही गोष्ट कबूल केली तरी प्राचीन काळच्या इतिहासाच्या अध्ययनाने आपल्यास असे कळून येईल की आम्ही पूर्वी मोठमोठी साम्राज्ये चालविली होती आणि आम्ही शोधून काढलेली तत्त्वे दुसऱ्या सुधारलेल्या राष्ट्रांनी शोधून काढलेल्या तत्त्वांपेक्षा कमी योग्यतेची नव्हती आणि असे कळले म्हणजे असा विश्वास वाटू लागेल की जर आम्हाला पुन्हा संधी मिळाली तर आम्ही ह्या परिस्थितीला अनुरूप असे कार्य करू शकू. तसेच पूर्वीच्या काळात झालेल्या चुका समजल्या तर तशा चुका पुन्हा होऊ नयेत ह्याविषयी आम्ही जास्त काळजी घेऊ.

बार्हस्पत्य सूत्रात (२·४३) म्हटले आहे की राज्यकारभाराचे फल धर्म, अर्थ आणि काम प्राप्त करून घेणे हे असते. सोमदेवाने आपल्या नीतिवाक्यामृत [अथ धर्मार्थकामफलाय राज्याय नमः । नीतिवाक्यामृत पा. ७.] नावाच्या

अनुक्रमणिका

ग्रंथाचा आरंभ (पा. ७) धर्म, अर्थ आणि काम हे तीन पुरुषार्थ प्राप्त करून देणाऱ्या राज्याला नमन करून केला आहे. कामसूत्रामध्ये (४·७७) राज्याच्या सात अंगांच्या विवेचनाचा समारोप करताना असे म्हटले आहे की सर्व राज्याचे स्थैर्य सर्वात अधिक कोश आणि सैन्य ह्यांच्यावर अवलंबून असते आणि निपुण मंत्र्याने चालविलेले राज्य तीन पुरुषार्थ प्राप्त करून देते. लोकांनी कामाचा समूळ त्याग करू नये तर धर्म आणि अर्थ ह्यांना विरोध होणार नाही अशा रीतीने कामाचा म्हणजे सुखांचा उपभोग घ्यावा असा कौटिल्याने [धर्मार्थाविरोधेन कामं सेवेत । न निःसुखं स्यात् । समं वा त्रिवर्गमन्योन्यानुबन्धम् । कौटिल्य १·७.] (१·७) उपदेश केला आहे. तीनही पुरुषार्थ परस्परावर अवलंबून असतात म्हणून त्यांचा समप्रमाणात उपभोग घ्यावा, कारण कोणत्याही एका पुरुषार्थाचा अतिरिक्त उपभोग घेतल्यास दुसऱ्या दोन पुरुषार्थांची हानि होते इतकेच नव्हे तर ज्या पुरुषार्थाचे अतिरिक्त सेवन केले असेल त्याची देखील हानि होते. धर्मशास्त्रकारांच्या मताप्रमाणे धर्म ही राज्यामधील सर्वश्रेष्ठ सत्ता असते. धर्माचे सामर्थ्य राजापेक्षाही प्रबळ असून राजा हे धर्माचे फल प्राप्त करून घेण्याचे साधन असते. कौटिल्य हा अर्थशास्त्रावरील ग्रंथकार असल्यामुळे त्याने आपल्या विषयाला अनुसरून तीन पुरुषार्थात अर्थ हा श्रेष्ठ पुरुषार्थ असल्याचे आपले अखेरचे मत सांगितले आहे आणि त्याचे कारण असे दिले आहे की दुसऱ्या दोन पुरुषार्थांची प्राप्ती द्रव्यावर म्हणजे अर्थावर अवलंबून असते. भारतातील प्राचीन काळच्या अत्यंत सुप्रसिद्ध व्यक्तींपैकी एक असलेल्या कौटिल्याच्या ह्या विधानाने राजधर्मासंबंधीच्या ह्या भागाची समाप्ती करणे उचित होईल.

———–—

अनुक्रमणिका

## प्रकरण ७०

# व्यवहार (कायदा आणि न्यायदानाची व्यवस्था)

(मू. ग्रं. पा. ३.२४२-३१६)

'व्यवहार' हा शब्द सूत्रग्रंथांत आणि स्मृतींमध्ये निरनिराळ्या अर्थाने योजलेला आहे. त्या शब्दाचा धात्वर्थ 'वि + अव + हार' म्हणजे ज्या क्रियेत अनेक शंका दूर केल्या जातात अशी क्रिया असा आहे. प्रस्तुत प्रकरणामध्ये ह्या शब्दाचा अर्थ 'कायदेशीर' दावा अथवा न्यायालयात चालणारी फिर्याद' आणि 'कायदेशीर चौकशीची कार्यपद्धती' असा गृहीत धरला आहे. निःपक्षपातीपणाने न्याय देणे आणि अपराध्याला शासन करणे ह्यांचा राजाच्या प्रमुख कर्तव्यांत समावेश हेत असे. प्रजेचे संरक्षण करणे हे राजाचे सर्वात महत्त्वाचे कर्तव्य असते आणि ते कर्तव्य दुष्टांचे निर्मूलन केल्याशिवाय आणि त्यांना शासन केल्याशिवाय पार पाडणे शक्य नसते. (याज्ञ. २·१ वरील मिताक्षरा). राजाने न्यायदान केल्यास त्याला यज्ञ केल्यासारखे पुण्य मिळते (याज्ञ. १·३५९।६०) आणि शासनास योग्य असणाऱ्यांना शासन न केल्यास त्याची निंदा होते आणि तो नरकाला जातो. (मनु. ८·१२८). अशा रीतीने न्यायदान हे राजाचे पवित्र कर्तव्य ठरते.

स्मृतिकारांचा असा विश्वास असे की फार फार प्राचीन काळी सत्ययुग अस्तित्वात होते आणि त्यावेळी लोकांची प्रवृत्ती सदाचरणाकडेच असे; परंतु त्यानंतरच्या काळात अधर्मभावनांचा उदय झाल्यामुळे विद्वान लोकांकडून आणि राजाकडून लोकांच्या वर्तनाचे नियमन होऊ लागले. ही कल्पना जगात सर्वत्र आढळून येते आणि लोकांना अधिकाधिक चांगल्या वर्तनाचे आणि सद्‌गुणी होण्याला उत्तेजन देण्याच्या हेतूने आणि त्यांनी राजसत्तेच्या आणि धर्माधिकाऱ्यांच्या शिस्तीला सुलभतेने मान्यता द्यावी ह्या हेतूनेच बहुधा ती मांडण्यात आली असावी.

न्यायदानाच्या वर्णनात 'व्यवहारपद' असा एक शब्द येतो. व्यवहारपदाची व्याख्या याज्ञ. स्मृ. मध्ये (२·५) 'जर एकाद्या व्यक्तीचा दुसऱ्या व्यक्तींनी स्मृतींतील नियमांचे, तसेच सदाचारांचे आणि रूढींचे उल्लंघन करून आशाभंग केला असला आणि त्या व्यक्तीने राजाला (अथवा त्याने नेमलेल्या न्यायाधीशाला) अशा कृत्याची माहिती दिली म्हणजे तो 'व्यवहारपद' होतो, अशी दिली आहे.

व्यवहारपद म्हणजे वादातील मुद्दा अथवा विषय. ह्याच अर्थाचा 'विवादपद' हा शब्द आहे.

व्यवहारपदांची संख्या फार प्राचीन काळापासून १८ सांगण्यात आली आहे. ह्याचा अर्थ असा की मनुष्यामनुष्यांमध्ये उत्पन्न होणाचा संभव असणाऱ्या वादांचे १८ गट करता येतील अशी समजूत असे. ह्या संस्थेत सर्वात अधिक महत्त्वाचे वादग्रस्त प्रश्नच आले आहेत. ह्या संख्येच्या आणि व्यवहारपदांच्या नावांच्या बाबतीत निरनिराळ्या स्मृतींत बरेच मतवैचित्र्य आहे. काही स्मृतींनी २२ व्यवहारपदेही सांगितली आहेत.

नमुन्याकरिता मनुस्मृतीत सांगितलेली व्यवहारपदांची नावे पुढे दिली आहेत : (१) ऋणादान, (२) निक्षेप, (३) अस्वामिविक्रय, (४) संभूयसमुत्थान, (५) दत्तस्यानपाकर्म, (६) वेतनादान, (७) संविद्‌व्यतिक्रम, (८) क्रयविक्रयानुशय, (९) स्वामीपालविवाद, (१०) सीमाविवाद, (११) वाक्पारुष्य,

अनुक्रमणिका

(१२) दंडपारुष्य, (१३) स्तेय, (१४) साहस, (१५) स्त्रीसंग्रहण, (१६) स्त्रीपुंधर्म, (१७) विभाग, (१८) द्यूतसमाह्वय.

वरील व्याख्येप्रमाणे जे वाद पक्षकारांमार्फत न्यायालयापुढे आणले जातात अथवा जे वाद न्यायालयात उपस्थित होतात त्यांनाच 'व्यवहारपद' म्हणतात. राजाने अथवा राजाच्या अधिकाऱ्यांनी आपण होऊन एकादा वाद उपस्थित करू नये (मनु. ८·४३), तसेच त्यांच्याकडे एकाद्या पक्षकाराने आणलेल्या विषयांच्या बाबतीत मौन्य स्वीकारू नये. असे असले तरी अशा अनेक बाबी असतात की त्यांच्याबद्दल कोणी तक्रार करीत नाही आणि राजाला आपण होऊन त्यांच्यामध्ये लक्ष्य घालावे लागते. अशा सर्व बाबींचा नारदाने [प्रकीर्णके पुनर्शेयो व्यवहारो नृपाश्रयः । नारद-प्रकीर्णक १.] 'प्रकीर्णक' ह्या सदरात समावेश केला आहे. (नारद– प्रकीर्णक १·४).

प्राचीन आणि मध्ययुगीन काळातील भारतात सर्वत्र न्यायालयांना सदसद्विवेक बुद्धि आणि शास्त्रवचने ह्यांचा समन्वय करून न्यायदान करावे लागे. एकाद्या वादाचा निर्णय केवळ शास्त्रवचनाच्या आधारावरच केल्यास त्या योगाने धर्महानि होते असे बृहस्पतीने म्हटले आहे. (अपरार्क पा. ५९९).

व्यवहाराच्या स्वरूपांना अनुसरून त्याला निरनिराळी विशेषणे लावण्यात येत असत. उदाहरणार्थ, काही थोडी विशेषणे पुढे दिली आहेत :– **चतुष्पाद** (धर्म, व्यवहार, चरित्र आणि राजशासन, अथवा फिर्याद, उत्तर, प्रत्याकलित आणि क्रिया), **त्रियोनि** (काम, क्रोध, आणि लोभ ही तीन उत्पत्तिस्थाने अथवा हेतु असणारा); **द्विफल** (जय आणि पराजय असे दोन परिणाम असणारा); इ०.

राजाला आपण होऊन ज्यांची चौकशी करता येते त्या बाबींना अपराध, पद आणि छल अशा संज्ञा आहेत. अशा बाबींची माहिती राजाला स्वतःला समजली असेल अथवा त्याने त्या कामाकरिता नेमलेल्या सूचक नावाच्या अधिकाऱ्यांनी दिली असेल, अथवा द्रव्याच्या आशेने आणि राजाने प्रेरणा न करताच कोणी व्यक्तींनी आपण होऊन राजाला कळविली असेल. अशा व्यक्तीला 'स्तोभक' अशी संज्ञा आहे. अपराधांमध्ये राजाज्ञेचे उल्लंघन, स्त्रीहत्या, व्यभिचार, इत्यादींचा समावेश होतो; छलांमध्ये राजाच्या नजरेसमोर अथवा त्याच्या सन्निध केलेल्या मर्यादातिंक्रमांचा समावेश होतो आणि पदांमध्ये वाढत्या पिकाचा नाश करणे, कुमारिकेवर बलात्कार करणे, बांध फोडणे, विषप्रयोग करणे, राजद्रोह करणे इत्यादि कृत्यांचा समावेश होतो.

हिंदुधर्मातील [द्विपदो व्यवहारः स्याद्धनहिंसा समुद्भवः । बृह. (स्मृ. चं. २ पा. ९)] प्राचीन स्मृतींनी (स्मृतिचंद्रि. २ पा. ९) व्यवहारपदांचे 'धनमूल' (दिवाणी) आणि 'हिंसामूल' (फौजदारी) एवढेच दोन वर्ग केले आहेत आणि तेवढेच त्यांना पुरेसे वाटले.

स्मृतिकारांनी कायद्यांचे कायम स्वरूपाचे कायदे आणि तपशीलासंबंधीचे कायदे असे दोन भाग पाडले आहेत. व्यवहारपदे ही कायमस्वरूपाच्या कायद्यांच्या गटात बसतील आणि न्यायदानासंबंधी नियम ह्यांचा समावेश विवरणात्मक कायद्यांच्या गटात करता येईल. विवरणात्मक म्हणजे तपशीलाबद्दलच्या कायद्याला आता केवळ प्राचीन काळची कार्यपद्धती समजून घेणे एवढेच महत्त्व आहे. ह्याकरिता त्याबद्दलचे विवेचन संक्षेपाने करण्यात येईल. स्मृतींनी सांगितलेली न्यायदानाची पद्धती अत्यंत उच्च दर्जाची आहे परंतु

त्या पद्धतीत निरनिराळ्या परिस्थितीमुळे, निरनिराळ्या राजांच्या पाशी असणाऱ्या साधनांचा विचार करून आणि राजांच्या मर्जीनुरूप फेरफार करण्यात येत असावेत.

न्यायदान हे मुख्यत्वेकरून राजाने करावयाचे असे. तो मूळ दाव्याची चौकशी करी आणि इतर न्यायाधीशांच्या निर्णयांचा फेरविचारही करी. राजाला स्वतःला वादाचा निर्णय करता येत नाही आणि त्याने दुसऱ्यांच्या साहाय्याने आणि दुसऱ्यांच्या सल्ल्याप्रमाणेच न्यायदान केले पाहिजे, तथापि त्या निर्णयासंबंधीची जबाबदारी राजावरच पडते. (शुक्र. ४·५·६).

न्यायालयात करावयाच्या वादाच्या निर्णयामध्ये दोन विभाग असतात–एक कायद्याचा आणि दुसरा सत्यस्थितीचा. सत्य शोधनाच्या कामात राजाला अथवा न्यायाधीशाला स्वतःची बुद्धी चालविण्याला पुष्कळ वाव असतो. राजा अथवा न्यायाधीश ह्यांनी आपले मन अकलुषित, निःपक्षपाती राखावे, राग अथवा लोभ ह्यांच्या आधीन होऊ नये, सर्व लोकांच्या समक्ष चौकशी करावी आणि स्वतःच्या एकट्याच्या बुद्धीप्रमाणे निर्णय न देता **विद्वान ब्राह्मण** आणि **सभ्य** ह्यांच्या साहाय्याने निर्णय द्यावा. धर्मशास्त्रात जेथे नियम नसेल तेथे सर्वसंमत **देशाचाराला** अनुसरून निर्णय करावा. ज्या रूढी लोकसंमत असतील आणि वेदांच्या आणि स्मृतींच्या नियमांना विरोधी नसतील त्या राजाने लिहून ठेवाव्या आणि त्या लेखावर आपली मुद्रा करावी. काही काही बाबतीत राजाची इच्छा हेच निर्णायक साधन असते.

इतर महत्त्वाच्या कामांत गुंतल्यामुळे राजाला न्यायदानाचे काम स्वतः करणे शक्य होत नसेल तेव्हा त्याने लोकांच्या वादांची चौकशी करण्याकरिता एक विद्वान ब्राह्मण आणि तीन सभ्य ह्यांची नेमणूक करावी. (कात्या. स्मृतिचं. २ पा १६). न्यायाधीश वृद्ध, चतुर आणि धर्माविषयी काळजी घेणारा, धर्मशास्त्र, तर्कशास्त्र (आन्वीक्षिकी विद्या) यांत निपुण आणि सत्कुलात जन्मलेला असावा. (आप. ध. सू. २·११. २९·५). मुख्य न्यायाधीश शक्य तो विद्वान ब्राह्मण असावा. एकादा विद्वान ब्राह्मण मिळाला नाही तर धर्मशास्त्रपारंगत क्षत्रियाला अथवा वैश्याला त्या पदावर नेमावा परंतु **एकाद्या शूद्राला न्यायाधीश नेमण्याचे कटाक्षाने टाळावे**. (कात्यायन, याज्ञ. २·३ वरील मिता.). न्यायाधीशाला 'प्राङ्‌विवाक', 'धर्मप्रवक्ता', 'धर्माधिकारी', 'प्रश्नविवाक्' अशा संज्ञा असत. 'प्रश्नविवाक्' हा शब्द वाज. सं. मध्ये (३०·१०) आला आहे. त्यावरून प्राचीन काळापासून न्यायदानाचे काम राज्यकारभाराच्या अथवा राजकीय कार्यापासून वेगळे करण्यात आले होते असे दिसून येते.

मुख्य न्यायाधीशाला साहाय्य करण्याकरिता कमीत कमी तीन **सभ्य** (सहकारी न्यायाधीश अथवा न्यायालयाचे अधिकारी) नेमावेत. **धर्मस्थीय** न्यायालयात तीन न्यायाधीश नेमावे असे कौटिल्याने (३·१) सांगितले आहे. त्यांना **धर्मस्थ** अशी संज्ञा असे. न्यायाधीशांच्या अंगात अमात्यासारखे गुण असावे.

**सभ्यांची संख्या** सात, पाच अथवा तीन अशी बृहस्पतीने (स्मृतिचं. २ पा. १५) सांगितली आहे. मुख्य न्यायाधीशाप्रमाणेच **सभ्यही शक्यतो ब्राह्मणजातीचे असावे** परंतु **क्षत्रिय** अथवा **वैश्य असण्यास प्रत्यवाय नाही.** राजा आणि न्यायाधीश ह्यांच्या ठिकाणी निःपक्षपातीपणा अवश्य असला पाहिजे. मुख्य न्यायाधीश आणि सभ्य ह्यांची मिळून **न्यायसभा** बनते. राजाने मुख्य न्यायाधीश, सभ्य आणि ब्राह्मण ह्यांच्यासह न्यायसभेत प्रवेश करावा असे सांगितले आहे.

अनुक्रमणिका

**ब्राह्मण** हे धर्मशास्त्रात निपुण असणारे असून त्यांना राजाने नेमलेले नसले तरी त्यांना न्यायसभेत बसता येत असे आणि कायद्याच्या निरनिराळ्या बिकट प्रश्नांच्या बाबतीत त्यांच्या मताचा न्यायाधीश आदरपूर्वक विचार करीत. **अशा विद्वान ब्राह्मणांचा दर्जा न्यायाधीशाचे मित्र** अथवा **त्रयस्थ सल्लागार** असा असे. वाटेल त्याला चौकशीत भाग घेता येत नसे. केवळ धर्मशास्त्राचे अध्ययन केलेल्या व्यक्तींनाच कायद्याच्या गूढ प्रश्नावर आपले मत व्यक्त करण्यास परवानगी दिली जात असे. त्यांच्याव्यतिरिक्त कोणी अशी न्यायदानाच्या कामात ढवळाढवळ करील तर त्याला दंड करण्यात येत असे (नारद ३·१).

**सभ्यांत मतवैचित्र्य** झाल्यास निम्याहून अधिक सभ्यांचे मत प्रभावी ठरते. वादाचा निर्णय करण्याच्या कामी काही **व्यापाऱ्यांचा समावेश** करावयास सांगितले आहे. ते सत्कुलात जन्मलेले, प्रौढ वयाचे, धनसंपन्न आणि सदाचारसंपन्न आणि मत्सररहित असावेत. (कात्या. ५८।५९). ह्या नियमावरून धनिक लोकांचे आणि व्यापाऱ्यांचे महत्त्व वाढत असल्याचे दिसून येते.

वादाची चौकशी चालू असताना मुख्य न्यायाधीश आणि सभ्य ह्यांनी कोणाही **पक्षकारांजवळ खाजगी संभाषण करता** कामा नये. केल्यास ते दंडाला पात्र होत असत.

न्यायाधीश (धर्मस्थ) आणि गुन्ह्याची चौकशी करणारे अधिकारी (प्रदेष्टृ) ह्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल चौकशी करण्याकरिता **हेर नेमण्याचे काम समाहर्तृ** ह्या अधिकाऱ्याकडे असे. लांच खाणाऱ्या न्यायाधीशाला हद्दपार करावे असे सांगितले आहे.

न्यायसभा चार प्रकारच्या असत. **प्रतिष्ठिता** (एकाद्या नगरात स्थापन केलेली), **अप्रतिष्ठिता** (फिरती), **मुद्रिता** (राजाची मुद्रा वापरण्याचा अधिकार असलेली) आणि **शासिता** (राजाच स्वतः बसत असलेली).

**न्यायसभेचे गृह** पूर्वाभिमुख आणि राजवाड्याच्या पूर्वेकडे असावे. ते गृह पुष्पादिकांनी सुशोभित केलेले असून त्यात धूप, आसन, बीज, अग्नि आणि पाणी हे पदार्थ ठेवावे. अशा सभेला **धर्माधिकरण, अधिकरण, धर्मस्थान, धर्मासन, सदस्** अशा संज्ञा असत. न्यायसभा **भरण्याची वेळ** सकाळची (दिवसाचे आठ भाग करून त्यापैकी पहिल्या भागानंतरचे तीन भाग) असे. न्यायसभेला अष्टमी, चतुर्दशी पौर्णिमा, अमावास्या ह्यांच्या सारख्या काही **सुट्या** असत.

राजा, मुख्य न्यायाधीश, सभ्य, स्मृति, गणक, लेखक, सुवर्ण, अग्नी, पाणी आणि स्वपुरुष अशी न्यायसभेची **दहाअंगे** असत. न्यायाधीश कायद्याची घोषणा करतो, राजा शिक्षा देतो, सभ्य वादाची चौकशी करतात, स्मृति (धर्मशास्त्र) निर्णयासंबंधी नियम सांगते, सुवर्ण आणि अग्नि दिव्य करण्याकरिता लागतात, पाणी कोणाला तहान लागल्यास लागते, गणक विवाद्य संपत्तीची गणना करतो, लेखक जबान्या आणि निर्णय लिहून घेतो, स्वपुरुष (न्यायालयातील सेवक, ह्याला 'साध्यपाल' असेही म्हणतात) सभ्य, प्रतिवादी आणि साक्षीदार यांना बोलावणे करतो आणि वादी प्रतिवादी हजर राहण्याविषयी देखरेख करतो. मृच्छकटिक नाटकात वर्णन केलेली न्यायदानाची पद्धती सामान्यतः स्मृतीत सांगितलेल्या पद्धतीसारखी आहे. ते नाटक ख्रिस्ती सनाच्या ४ थ्या अथवा ५ व्या शतकाइतके जुन्या काळचे आहे. त्या सुमारास नारद, बृहस्पती आणि कात्यायन ह्या स्मृति झाल्या.

**अनुक्रमणिका**

वर वर्णन केलेले न्यायालय (राजाचे अथवा राजाने नेमलेल्या मुख्य न्यायाधीशाचे) राज्यातील सर्वांत श्रेष्ठ प्रतीचे न्यायालय असे. त्याच्याशिवाय **कुलानि** (ग्रामपंचायती), **संघ** (अथवा श्रेणी), **समाज** (पूग अथवा गण) ह्यांची न्यायालये असत आणि ती मागच्यापेक्षा त्याच्या पुढचे अशा क्रमाने अधिकाधिक महत्त्वाची असत. सर्वही न्यायालयांच्या निर्णयांचा फेरविचार करण्याचा **अंतिम अधिकार** राजाकडे आणि त्याच्या खालोखाल राजाने नेमलेल्या न्यायाधिशांकडे असे. कुलानिप्रभृति तीन न्यायालयांत साहसासंबंधीचे वाद वगळून इतर सर्व वादांचे निर्णय करता येत परंतु **दंड** अथवा **शारीरिक शिक्षा** अंमलात आणण्याचे काम **फक्त राजाच** करू शकत असे.

ह्या न्यायालयांखेरीज **गावच्या प्रमुखाला** (ह्याला ग्रामिक अथवा ग्रामकूट असे म्हणत) काही तात्काल अमलात आणण्याचे अधिकार असत आणि तो त्या वादांची चौकशी करू शके. एकूण दहा प्रकारची न्यायालये सर्व लोकांना मोकळी असत. वनात राहणाऱ्या वगैरे पाच प्रकारच्या लोकांकरिता **कुलिक, सार्थ, पुढारी, ग्रामस्थ** आणि **नगरवासी** अशी पाच न्यायालये अनुक्रमे असत.

न्याय निर्णयाच्या बाबतीत अर्थशास्त्रातील नियमापेक्षा धर्मशास्त्रातील नियम अधिक बलवत्तर असल्याचे मानले जाई. विवादाचा निर्णय करताना राजाने निरनिराळ्या वर्णांच्या आणि १८ कनिष्ठ जातींच्या लोकांमधील **धर्माचा** आणि **रूढींचा** विचार केला पाहिजे. ह्या १८ जातींत रजक, चर्मकार, नट, बुरुड, कैवर्तक (कोळी), म्लेच्छ, भिल्ल इत्यादींचा समावेश होत असे. ही सर्व दर्जाची न्यायालये प्राचीन काळी आणि मध्ययुगीन काळी नेहमीच अस्तित्वात असत असे नाही. राजाने नेमलेल्या मुख्य न्यायाधीशाचे न्यायालय हे सर्व काळी अस्तित्वात असे आणि **न्यायाचा अंतिम अधिकार राजकर्त्याकडे** असे. शिवाजी महाराजांच्या काळी तीन प्रकारची न्यायालये अस्तित्वात असत. **गोत** (एकाच जातीच्या लोकांची सभा), **लवाद** (तंट्याच्या जागेहून निराळ्या ठिकाणी राहणारे लोक) आणि आजूबाजूच्या गावातील **अधिकारी, बलुतेदार** आणि **प्रमुख लोक ह्यांची सभा**.

न्यायालयातील **न्यायदानाच्या कार्यक्रमात** चार **टप्पे** असत. ते म्हणजे : (१) कोणी दिलेली माहिती स्वीकारणे, (२) ती माहिती कोणत्या व्यवहारपदात बसते हे पाहणे, (३) दोन्ही पक्षकारांच्या म्हणण्यांचा आणि त्यांनी सादर केलेल्या पुराव्याचा विचार करणे, (४) निर्णय करणे.

वादीची फिर्याद स्वीकारल्यावर प्रतिवादीला अथवा आरोपीला बोलाविण्यात येत असे. अशा **बोलविण्याविषयी सविस्तर नियम** असत. काही परिस्थितीत प्रतिवादीला **प्रतिनिधि** पाठविण्याची परवानगी दिली जाई. उदाहरणार्थ, प्रतिवादी अज्ञान असेल तर वादीने मान्यता दिल्यास प्रतिवादीतर्फेच्या दुसऱ्या मनुष्याला बोलाविण्यात येत असे. तसेच आजारी मनुष्य, धार्मिक विधीत गुंतलेला मनुष्य, सद्यःप्रसूता स्त्री वादीपेक्षा उच्च वर्णातील कुमारिका ह्यांच्या सारख्यांच्या बाबतीत राजाने त्यांना समक्ष हजर राहण्यास लावू नये. युद्धात गुंतलेले सैनिक, विशिष्ट हंगामात काम करणारे गुराखी, शेतकरी ह्यांना ते कामात गुंतलेले असताना समक्ष हजर राहण्यास लावू नये. एकाद्या मनुष्याला आमंत्रण केले असून आणि हजर राहणे शक्य असून तो हजर राहिला नाही तर त्याला दाव्याच्या किंमतीप्रमाणे अथवा महत्त्वाप्रमाणे कमी अधिक **दंड** करीत असत. काही विशिष्ट बाबतीत प्रतिनिधी हजर राहून चाले आणि दुसऱ्या काही गंभीर स्वरूपाच्या आरोपांच्या बाबतीत प्रतिनिधी हजर राहून चालत नसे. ह्या नियमांवरून असे दिसून येते की प्राचीन हिंदु कायदेपंडितांनी ज्यांत स्वतःचा हितसंबंध नाही अशा कामात दुसऱ्याला मदत करून दावे लढविण्याचा आणि दावा करून होणाऱ्या नफ्यात हिस्सा मिळण्याच्या अटीवर दुसऱ्याला दावा करण्याला उत्तेजन

देण्याचा धंदा करण्याला प्रोत्साहन दिले नव्हते. **राजा अज्ञानाच्या मिळकतीचा पालन करणारा** असल्याचे मानले जात असे आणि म्हणून अज्ञान व्यक्तीच्या दाव्याच्या बाबतीत काम चालविण्याकरिता राजाला प्रतिनिधी नेमता येत असे.

प्राचीन भारतात अर्वाचीन काळच्या **वकील, सालिसिटर** ह्यांच्यासारख्या राज्यकर्त्यांनी मान्यता दिलेल्या **व्यक्तींचा वर्ग** अस्तित्वात असल्याचा स्मृतीत तरी काही पुरावा आढळत नाही. तथापि स्मृतींतील नियमांची आणि न्यायालयातील कार्यपद्धतीची माहिती असलेला मनुष्य नियुक्त केला जाण्याचा संभव नव्हताच असे म्हणता येत नाही. पैशांच्या मोबदल्यात अथवा पक्षकाराच्या कुटुंबाचा जुना स्नेही म्हणून मला प्रतिनिधी नेमला आहे असे सांगून **न्यायालयापुढे काम चालविण्यास येणारे साहाय्यक** असत.

पक्षकारांच्या वतीने नेमलेल्या प्रतिनिधीला द्यावयाच्या वेतनासंबंधी काही महत्त्वाचे नियम असत. ज्याला धर्मशास्त्राची आणि न्यायदानाची माहिती असेल त्यालाच प्रतिनिधी नेमावे. अशी माहिती नसणाऱ्याला नेमू नये, माहितगार नसूनही जो वेतन स्वीकारील त्याला राजाने शासन करावे, प्रतिनिधी पक्षकाराने नेमला पाहिजे, राजाने आपल्या इच्छेप्रमाणे कोणाला तरी नेमू नये, प्रतिनिधीने लोभामुळे स्वीकारलेले काम अयशस्वी केले तर त्याला दंड करण्यात येई. हे नियम आधुनिक काळच्या वकिलांसंबंधीच्या कायद्यासारखे आहेत.

काही परिस्थितीत प्रतिवादी पळून जाण्याचा संभव असल्यास त्याला न्यायालयाचा सेवक येईपर्यंत प्रतिबंध करण्याचा वादीला अधिकार असे. अशा प्रतिबंधाला 'आसेध' (राजाच्या आज्ञेने केलेली बंदी) अशी संज्ञा आहे. असे आसेध स्थानाच्या, कालाच्या, हालचालीच्या आणि एकादी विशिष्ट क्रिया करण्यासंबंधी असे चार प्रकारचे असत.

आमंत्रण केल्याप्रमाणे प्रतिवादी हजर झाला म्हणजे वादी आणि प्रतिवादी ह्या दोघांकडून **जामीन** घेण्यात येई. असे जामीन न्यायालयाने केलेले निर्णय अमलात आणू शकतील असे असले पाहिजेत. कोणाला जामीन देता आला नाही तर त्याला न्यायालयाच्या सेवकाच्या ताब्यात राहावे लागे आणि त्या सेवकाला प्रत्येक दिवशी ठरीव वेतन द्यावे लागे. सेवकाच्या ताब्यात असताना त्याला जरूर ती आणि (संध्यावंदनासारखी) आवश्यक कृत्ये करण्यास हरकत नसे.

प्रतिवादी हजर झाला म्हणजे फिर्यादीने दिलेली माहिती बिनचूक लिहून ठेवीत. हाच फिर्याद अर्ज होय. त्याला संस्कृतमध्ये **पक्ष** अथवा **पूर्वपक्ष**, प्रतिज्ञा, भाषा अशा संज्ञा असत. पक्षकारांना **वादिन्** आणि **प्रतिवादिन्** अशा संज्ञा असत. त्यांचेच समानार्थी शब्द 'अर्थिन्' आणि 'प्रत्यर्थिन्' 'अभियोक्तृ' आणि 'अभियुक्त' हे आहेत. प्रतिवादी हजर झाल्यानंतर दुरुस्त केलेली फिर्याद (ताडपत्र, झाडाची साल, कागद ह्यांच्यासारख्या) पत्रावर लिहून घ्यावी आणि त्यात प्रतिवादीच्या तक्रारी प्रमाणे दुरुस्त्या करू द्याव्या. फिर्यादीमध्ये वर्ष, ऋतु इत्यादी काल, पुराव्याची कागदपत्रे, न्यायालयाचे नाव, कर्जाची (अथवा दुसऱ्या कसल्या येण्याची) रक्कम, वादी प्रतिवादी ह्यांचे देश, गाव वगैरे आणि धंदे आणि त्या दोघांमधील संबंध इतक्या गोष्टी लिहिलेल्या असाव्या. तसेच मिळकतीचा तपशील, तीन पूर्वजांची नावे, पूर्वी होऊन गेलेल्या राजांची नावे हे तपशील असले पाहिजेत. हे फिर्यादी संबंधीचे नियम आधुनिक काळच्या कायद्याशी अतिशय जुळते आहेत.

प्राचीन भारतात हिंसामूल (फौजदारी) दाव्यात काहीही शुल्क द्यावे लागत नसे. द्रव्यमूल (दिवाणी) स्वरूपाच्या दाव्यात देखील फिर्याद दाखल करते वेळी काहीही शुल्क द्यावे लागत नसे; दाव्याचा निर्णय झाल्यावर राजाला शुल्क द्यावे लागे. ह्या शुल्कासंबंधीही नियम असत. उदाहरणार्थ, कर्जाची वसुली करण्यासंबंधीच्या दाव्यात रिणकोला शे. १० आणि धनकोला शे. ५ इतकी रक्कम द्यावी लागे, रिणकोने कर्ज नाकबूल केले असेल तर त्याला ऋण सिद्ध झाल्यावर निवाड्याच्या रकमेच्या इतकीच रक्कम राजाला दंड म्हणून द्यावी लागे. वादीचे मागणे खोटे ठरल्यास त्याने जितके मागणे केले असेल त्याच्या दुप्पट रक्कम राजाला दंड म्हणून द्यावी लागे. प्राचीन काळच्या भारतीय पक्षकारांना वाद लढविणे आधुनिक काळच्या मानाने बरेच सोपे असे.

वादी आणि प्रतिवादी ह्यांनी आपआपले पुरावे दाखल करण्यासंबंधीही नियम असत. त्यांत वादाचा निर्णय करण्याला विलंब लागू नये हा उद्देश असे कारण वादाचा निर्णय करण्यास विलंब करणे म्हणजे 'धर्मव्यापत्ती' (न्यायाचा मृत्यू) करणे होय. असे मानले जात असे.

दाव्याच्या चौकशीत कालानुक्रमाने पुढील टप्पे असतात :

(१) वादी प्रतिज्ञेवर आपले म्हणणे सांगतो, (२) प्रतिवादी आपले उत्तर देतो, (३) दोघांची भाषणे संपल्यावर न्यायालयातील सभासद बोलतात, (४) न्यायाधीश बोलतो. ह्यांनाच **भाषापाद** (फिर्याद), **उत्तरपाद** (उत्तर), **क्रियापाद** (पुरावा देणे) आणि **साध्यसिद्धि** (निर्णय) अशा संज्ञा आहेत.

चांगल्या फिर्यादीत कोणत्या गोष्टी असल्या पाहिजेत ह्याबद्दल नियम होते. त्यांतील काही महत्त्वाच्या गोष्टी नसल्यास ती फिर्याद स्वीकारण्यास पात्र होत नसे. तसेच पतिपत्नी, गुरुशिष्य, बापलेक ह्यांच्यामधील फिर्यादीला कायदेशीर बंदी नसली तरी ती अनिष्ट मानली जात असे. राजा आणि न्यायाधीश यांनी अशा व्यक्तींना फिर्याद करण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करावा. आणि जर त्यांनी हट्टच धरला तर धर्मशास्त्रात सांगितल्याप्रमाणे त्यांचा निर्णय करावा. **निरर्थक** म्हणजे अत्यंत अल्प इजा झाल्याबद्दलची अथवा अत्यंत कमी किंमतीच्या देण्याघेण्याबद्दलचीही फिर्याद स्वीकारू नये असा नियम असे.

प्रतिवादीने द्यावयाच्या उत्तरासंबंधीही नियम होते. ह्या उत्तराचे अनेक भेद आणि उपभेद सांगितले आहेत. उत्तरामधील विधानात मिसळ अथवा गोंधळ असेल तर **संकर** म्हणून दोष उत्पन्न होतो आणि असे उत्तर स्वीकारण्यात येत नसे.

प्रतिवादीने उत्तर दिल्यावर आणि पक्षकारांनी आपले पुरावे दिल्यानंतर त्यांना न्यायालयाच्या परवानगीशिवाय आपसात तडजोड करू देऊ नये असा नियम असे. त्यांनी तशी तडजोड केल्यास राजाला मिळणारे शुल्क मिळू शकत नाही म्हणून त्यांना नेहमीच्या दुप्पट दंड करावा असा नियम होता.

प्रतिवादीच्या उत्तरानंतर पुराव्याचा बोजा कोणावर आहे ह्याचा निर्णय सभ्य करीत. **पुराव्याची साधने मानवी** आणि **दैव** अशी दोन प्रकारची असतात.साक्षीदार, कागदपत्रे, उपभोग ही मानवी साधने असून तुला आदि दैवसाधने होत.मानवी साधने शक्य नसतील अथवा उपलब्ध नसतील तेव्हाच फक्त दैवसाधनांचा अवलंब करावा. गुप्त रीतीने साहसाचा अपराध केला असल्यास दैव साधनांच्या साहाय्याने चौकशी करावी असे कात्यायनाने सांगितले आहे. (अपरार्क पा ६२९).

निरनिराळ्या साधनांना कोणत्या परिस्थितीत **अधिक मान्यता** द्यावी ह्याबद्दल नियम असत. पुराव्याच्या साधनांत पहिला क्रम कागदपत्रांना असतो. कागदपत्रांचे राजकीय आणि जानपद अथवा **शासन** आणि **चीरक** असे भेद मिताक्षरेने केले असून त्यांतील प्रत्येकाचे अनेक उपभेद सांगितले आहेत. उदाहरणार्थ, राजकीय अथवा शासन लेखांचे जयपत्र, प्रसादपत्र, आज्ञापत्र, प्रज्ञापनापत्र, निसृष्टिलेख, प्रावृत्तिक, प्रतिलेख, सर्वत्रग इत्यादी उपभेद असून जानपद लेखांचे भागपत्र अथवा विभागपत्र (वाटपपत्र), दानपत्र, क्रयपत्र (विक्रीचा लेख), आधानपत्र अथवा अधिपत्र (गहाणखत), स्थितिपत्र अथवा संवित्पत्र (करारनामा), दासपत्र (नोकरनामा), ऋणालेख, संधिपत्र (तडजोड) इत्यादी उपभेद असतात. तुलनेने त्यांना असलेल्या महत्त्वाविषयी नियम आहेत. जो लेख देशातील रूढीच्या विरुद्ध नसतो, ज्यातील मजकूर गहाणासंबंधी (आणि इतर व्यवहारासंबंधी) नियमांना अनुसरून असतो, आणि ज्यातील आशय आणि शब्द परस्परविरोधी अथवा गोंधळात पडलेले नसतात तो लेख प्रमाणभूत मानला जातो असे नारद (४·१३६), विष्णुधर्मसूत्र (७·११) आणि कात्यायन (२५२) ह्यांनी सांगितले आहे.

लेख आणि तोंडी पुरावा ह्यांच्या मध्ये लेख अधिक महत्त्वाचा असतो, एकाद्या लेखातील शर्ती नाशाबित करण्याकरिता तोंडी पुरावा आणू नये, एकादा लेख त्याच विषयावरील दुसऱ्या एकाद्या लेखानेच मात्र नाशाबित होऊ शकतो इत्यादी नियम सांगितले आहेत.

एकादा लेख नष्ट झाला अथवा चोरीस गेला, अस्पष्ट झाला, फाडून टाकला तर दोन्ही पक्ष कबूल असल्यास त्या लेखाच्या बदली दुसरा लेख करून घ्यावा.

कोणता लेख अस्सल असल्याचे समजावे ह्याविषयीही नियम असत. राजशासन आणि खाजगी लेख बनावट करणे ही गोष्ट लोकमताने इतकी निंद्य मानली जात असे की अशा अपराधाबद्दल स्त्री हत्येसारख्या अपराधांना सांगितलेली अत्यंत वरची अशी देहान्ताची शिक्षा मनु. (९·२३२) आणि विष्णु. ध. सू. (५·९।१०) यांत सांगितली आहे. राजाने दिलेल्या दानपत्रात अथवा आज्ञापत्रात काही अधिक मजकूर लिहिण्याबद्दल अथवा काही कमी मजकूर लिहिण्याबद्दल याज्ञवल्क्याने (२·२९५) सर्वात अधिक प्रकारच्या दंडाची शिक्षा सांगितली आहे.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ७१

## भुक्ति अथवा ताबा

(मू. ग्रं. पा. ३.३१७-३२९)

एकाद्या वस्तूचे स्वामित्व एकाद्या मनुष्याकडे किती प्रकारांनी येऊ शकते ह्याविषयी निरनिराळ्या शास्त्रकारांनी आपली मते प्रदर्शित केली आहेत. गौतमाने (१०·३९) विकत घेणे, वारसा हक्काने येणे, दान घेणे इत्यादी आठ प्रकार सांगितले आहेत, वसिष्ठानेही (१६·१६) आठ प्रकार, बृहस्पतीने (अपरार्क पा. ६३५) सात, नारदाने (स्मृ. चं. २. पा. ७०) सहा असे भिन्न भिन्न प्रकार वर्णन केले आहेत परंतु त्यांच्यापैकी कोणत्याही प्राचीन शास्त्रकाराने पुष्कळ काळपर्यंत ताबा असणे हाही एक एकाद्या वस्तूची मालकी प्राप्त होण्याचा मार्ग असल्याचे स्पष्टपणे सांगितलेले नाही. एकाद्या वस्तूवरील अधिकार आणि तिचा ताबा ह्यांचा परस्पर संबंध काय असतो आणि निवळ ताबा असलेल्या एकाद्या वस्तूवर निश्चित स्वामित्व प्राप्त होण्याकरिता किती लांब मुदतीपर्यंत ताबा असला पाहिजे ह्याविषयी निरनिराळ्या स्मृतिकारांमध्ये आणि निबंध ग्रंथकारांच्यामध्ये तीव्र मतभेद शेकडो वर्षे चालत आले आहेत. मालकी येण्याच्या निरनिराळ्या प्रकारांपैकी एकाद्या प्रकाराने एकाद्याकडे एकादी मिळकत आली असली आणि शिवाय ती त्या मनुष्याच्या ताब्यात असली तर त्या मनुष्याचा त्या मिळकतीवरील अधिकार नष्ट करता येत नाही असे नारद (४·८५), बृहस्पती (स्मृ.चं. २ पा.७०) ह्यांच्या सारख्या प्राचीन शास्त्रकारांचे मत होते.

एकाद्या वस्तूचा ताबा अधिकृत असल्याची पाच [सागमो दीर्घकालश्चाविच्छेदोऽपरवोज्झितः। प्रत्यर्थिसंनिधानश्च पञ्चाङ्गो भोग इष्यते ॥ व्यास (स्मृति चं. २ पा.७१).] लक्षणे व्यास, (स्मृ. चं.२ पा. ७१) आणि पितामह (स्मृ. चं. २ पा. ७०) ह्यांनी सांगितली आहेत. अशा **अधिकाराला ताब्याचा पाठिंबा** असला पाहिजे, तो ताबा **दीर्घकालपर्यंत** चालत असला पाहिजे, त्याला मध्यंतरी **खंड नसला पाहिजे**, त्याला दुसऱ्या कोणी **हरकत घेतलेली नसावी**, आणि तो विरुद्ध पक्षाच्या **दृष्टीसमोर** असला पाहिजे. अशा रीतीने ताबा आणि अधिकार ह्या गोष्टी परस्परांना पोषक होत असतात. एकाद्या वस्तूचा ताबा असणाऱ्या मनुष्याने असा ताबा **कायदेशीर** असल्याचे अथवा इतक्या **दीर्घ काळपर्यंत** असल्याचे सिद्ध केले पाहिजे की त्याच्या पूर्वजांनी ती वस्तु अन्यायाने संपादन केली असल्याचे अनुमान काढण्याचा संभवही राहणार नाही.

एकाद्या वस्तूची मालकी एकाकडून दुसऱ्याकडे जाणे ही गोष्ट घेणारा ती वस्तु स्वीकारतो तेव्हाच घडून येते. जंगम वस्तूच्या बाबतीत असा स्वीकार मानसिक, शाब्दिक आणि शारीरिक असा तीन्ही प्रकारचा होऊ शकतो परंतु स्थावर मिळकतीच्या बाबतीत शारीरिक ताबा शक्य नसल्याने त्या वस्तूच्या फलाचा अथवा उत्पन्नाचा अथवा त्यापासून मिळणाऱ्या फायद्याचा उपभोग घेणे एवढेच शक्य असते. ताब्याच्या अभावी नुसता अधिकार कमकुवत असतो.

अनधिकाराने असणारा ताबा किती मुदत असला पाहिजे आणि असा ताबा असल्याचे कसे सिद्ध करावयाचे ह्याबद्दल निरनिराळी मते अस्तित्वात आहेत. मनु. (८·१४७), याज्ञ. (२·२४) गौतम (१२·३४), प्रभृतींच्या मतांचा इत्यर्थ असा आहे की एकाद्या तिऱ्हाईताने २० अथवा १० वर्षेपर्यंत एकाद्या मिळकतीचा मूळ मालकाच्या हक्काविरुद्ध उपभोग घेतला तर मूळ मालकाची त्या मिळकतीवरील मालकी नष्ट होते आणि

अनुक्रमणिका

तो अन्यायाने उपभोग घेणारा त्या मिळकतीचा मालक होतो. काही ग्रंथकारांनी (नारद ४·८९; विष्णु ध. सू. १८७) असे सांगितले आहे की एकाद्याचा ताबा अन्यायाने संपादन केलेला असला तर तो ताबा १०० वर्षेपर्यंत चालत असला तरी त्यामुळे त्या मनुष्याला त्या मिळकतीवर स्वामित्व मिळत नाही आणि मूळ मालकाचा अधिकार नष्ट होण्याला आणि तिऱ्हाइताला वहिवाटीवरून कायदेशीर अधिकार प्राप्त होण्याला ह्यापेक्षा बरीच लांब मुदत जावी लागते. नारदाच्या (४·८८) मताने फक्त **स्मार्त** (म्हणजे मनुष्याच्या स्मरणातील काळात) असलेल्या उपभोगाला कायदेशीर अधिकाराचा पाठिंबा असावा लागतो. परंतु मनुष्याच्या स्मरणाच्या पलीकडे जेव्हा एकाद्याचा ताबा तीन पिढ्यापर्यंत अखंड रीतीने चालू राहील तेव्हा लेख नसला अथवा कायदेशीर अधिकार नसला तरीही असा उपभोग हा स्वामित्वाचा पुरावा होतो.

**स्मार्तकाल** म्हणजे १०० वर्षे असे मिताक्षरेने (याज्ञ. २·२७) म्हटले आहे. एक पिढी म्हणजे किती ह्याबद्दलही मतवैचित्र्य आहे. कोणी ती मुदत ३५ वर्षे, कोणी ३० वर्षे, कोणी २० वर्षे असल्याचे मानले आहे आणि त्यामुळे तीन पिढ्यापर्यंत (त्रि. पुरुष) ह्याचा अर्थ १०५ वर्षे, ९० वर्षे, ६० वर्षे, असा निरनिराळा होतो. पुढील काळात झालेल्या टीकाकारांपैकी आणि निबंधग्रथकारांपैकी कोणी **भुक्तिवादिन्** म्हणजे ताब्याला अधिक महत्त्व देतात, कोणी **स्वत्ववादिन्** म्हणजे कायदेशीर अधिकाराला अधिक महत्त्व देतात. (अपरार्क पा ६३१।३२; कुल्लूक इ०). ज्यांच्या मते तीन पिढ्यापर्यंत तिऱ्हाईताने अनधिकाराने उपभोग घेतल्यास मूळ मालकाचा अधिकार नष्ट होतो त्यांना '**त्रिपुरुषभुक्तिवादिन्**' अशी संज्ञा आहे. (याज्ञ. २·२७). दुसऱ्या काहींच्या (मित्रमिश्र प्रभृति) मताप्रमाणे एकाद्या वस्तूचा २० वर्षेपर्यंत अनधिकृत उपभोग घेतल्याने मूळ मालकाच्या स्वामित्वाचा नाश होत नसून त्या वस्तूच्या उत्पन्नाचा नाश होतो. म्हणजे मूळ मालकाला जरी ती जमीन परत मिळाली तरी तिऱ्हाइताने उपभोगलेले उत्पन्न मिळण्याचा अधिकार राहत नाही. मरीचि (स्मृ. चं. २ पा. ६९) सारख्या काही थोड्या आणि तुरळक आढळणाऱ्या शास्त्रकारांनी अतिशय थोड्या मुदतीपर्यंतचा उपभोग मालकी अधिकार नष्ट होण्याला पुरेसा असल्याचे सांगितले आहे; उदाहरणार्थ, स्थावर मिळकतीचे बाबतीत ३ वर्षे, धान्य, गुरे वगैरे जंगम मिळकतीच्या बाबतीत १ वर्ष; परंतु ही कल्पना असंख्य शास्त्रवचनांच्या विरुद्ध असल्यामुळे ह्या वचनांचा हेतु उपभोगाचे अत्यंत महत्त्व दर्शित करणे एवढाच समजावा असे टीकाकारांनी म्हटले आहे.

अलिकडील काळातील कायदा फारच अतिरेकाला गेला आहे आणि एकाद्या मनुष्याने एकाद्या मिळकतीचा अनधिकाराने ताबा घेतला असला तर ती गोष्ट त्या मिळकतीच्या मूळ मालकाच्या नजरेस आलेली असण्याची आवश्यकता नाही असे निर्णय दिले गेल्यामुळे अनधिकृत रीतीने एकाद्या मिळकतीचा उपभोग घेण्याला उत्तेजन मिळाले आहे. प्राचीन काळच्या हिंदुकायदेपंडितांनी दुसऱ्याची मिळकत अनधिकृतपणे बळकावण्याच्या प्रवृत्तीवर आळा घातला होता आणि अनधिकृत रीतीने उपभोग घेणाऱ्यांच्या मार्गात अनेक अडचणी घातल्या होत्या.

तिऱ्हाइताच्या दीर्घकाळ उपभोगामुळे मूळ मालकाच्या स्वामित्वाचा नाश होतो ह्या नियमाला काही अपवाद सांगितले आहेत (मनु. ८·१४९; याज्ञ. २·२५; कात्या ३३० इ.); उदाहरणार्थ, गहाण टाकलेली मिळकत, अज्ञानाची मिळकत, उघड ठेवलेली ठेव, मोहरबंद केलेली ठेव, स्त्रिया, दासी, वेद पारंतग ब्राह्मणाची मिळकत, मूर्ख आणि स्त्रिया यांची मिळकत, देवस्थानची मिळकत आणि मात्यापित्याकडून वारसाने मिळालेली मिळकत, तसेच ३६ वर्षांहून अधिक काळपर्यंत वेदाध्ययन करणारा ब्रह्मचारी, द्रव्यार्जनाकरिता परदेशात राहणारा मनुष्य, ह्यांच्या मिळकती आणि कारागृहात अडकलेला मनुष्य ह्यांच्या

अनुक्रमणिका

मिळकती ह्यांना वरील नियम लागत नाही. एकाद्या श्रोत्रियाने, राजपुरुषाने, संन्याशाने दीर्घकाळपर्यंत उपभोग घेतलेल्या मिळकतीवरील मूळ मालकाचे स्वामित्व नष्ट होत नाही.

——————

अनुक्रमणिका

## प्रकरण ७२

# साक्षीदार (साक्षिणः)

(मू. ग्रं. पा. ३.३३०-३६०)

**साक्षिन्** ह्या शब्दाचा अर्थ 'प्रत्यक्ष पाहणारा' असल्याचे पाणिनीने (५·२·९१) सांगितले आहे. जेव्हा दोन व्यक्तींमध्ये वाद उत्पन्न होतो आणि त्या दोघांपैकी कोणता खरा ह्याविषयी संशय उत्पन्न होतो, अथवा त्या दोघांच्या म्हणण्यात भेद दिसून येतो तेव्हा त्या वादातील सत्याचा निर्णय साक्षीदारांच्या योगाने होतो असे गौतम (१३·१), कौटिल्य (३·११) प्रभृतींनी सांगितले आहे.

विवादित वस्तु अथवा प्रकार ज्याने स्वतः पाहिला असेल तोच **योग्य साक्षीदार** होय. केवळ दुसऱ्याकडून ऐकीव बातमीच्या स्वरूपाचा साक्षीदाराचा पुरावा नसावा; परंतु ह्याबाबतीतही काही अपवाद असतात. जेव्हा एकादा साक्षीदार परदेशात राहत असल्यामुळे त्याला न्यायालयात आणणे शक्य नसेल तेव्हा त्या साक्षीदाराने तीन वेदांत पारंगत अशा मनुष्यासमोर **लेखी** लिहून घेतलेला पुरावा त्या वादाचा निर्णय करते वेळी वाचावा.

कोणत्याही गोष्टीला सामान्यतः निदान तीन साक्षीदार असावे. तथापि नऊ, सात, पाच, चार अथवा तीन साक्षीदार असावेत आणि विद्वान ब्राह्मण असल्यास दोन देखील चालतील. धार्मिक कृत्य करणारा आणि साक्षीदाराला अवश्य असणारे गुण असणारा आणि उभय पक्षकारांना मान्य असणारा अशा एकट्या साक्षीदाराला देखील ग्राह्य पुरावा दाखल करू द्यावा असे बृहस्पती (पौधग्रं. खं. ३३ पा. ३०१), व्यास (स्मृ. चं. २ पा. ७६) प्रभृति शास्त्रकारांनी म्हटले आहे.

साक्षीदाराच्या आंगात कोणते **गुण असावे** ह्याच्या याद्या निरनिराळ्या ग्रंथांत दिल्या आहेत. (गौ. १३·२, कौटि. ३·११ प्रभृ.). सामान्यतः साक्षीदार **पक्षकारांच्या जातीचे** असावे तथापि बहुतेक स्मृतिकारांनी **सर्व जातीचे लोक** सर्व जातीच्या वादात साक्षीदार असण्यास अनुमति दिली आहे. श्रेणी, पूग अशा प्रकारच्या सामुदायिक व्यवहार करणाऱ्या लोकांच्या संस्थांच्या वादामध्ये त्या त्या संघटनेचे प्रमुख (वर्गिन्) हेच योग्य साक्षीदार असतात.

साक्षीदार होण्यास **अपात्र** असणाऱ्या लोकांच्याही याद्या निरनिराळ्या ग्रंथांत दिल्या आहेत. (कौटि. ३·११; मनु ८·६४) कर्जासारख्या निश्चित स्वरूपाच्या व्यवहारांच्या बाबतीत साक्षीदारांच्या **शीलाविषयी काटेकोरपणे** विचार करावा.

परंतु साहसासारख्या गंभीर स्वरूपाच्या अपराधांच्या चौकशीत साक्षीदारांच्या शीलाबद्दल कांटेकोरपणे विचार करू नये असे बहुतेक प्रमुख स्मृतिग्रंथांनी सांगितले आहे. (गौत. १३·९, कौटि ३·११, मनु ८·७२ इ.). तथापि, मूर्ख, वेडे ह्यांच्यासारख्या व्यक्तींना व्यावहारिक गोष्टी कळण्याची पात्रता नसते म्हणून त्यांना साक्षीदार होण्यास मुभा दिलेली नाही. तसेच साहसासंबंधीच्या वादात अल्पवयी व्यक्ती, स्त्री, एकटाच पुरुष, नातलग आणि शत्रू ह्यांना साक्षीदार होता येत नाही. स्त्रियांच्या बाबतीत दुसरा कोणी

साक्षीदार मिळणे अशक्य असेल त्यावेळी, आणि स्त्रियांमधील वादांत स्त्रिया साक्षीदार असण्यास मनूने (८·६८) मान्यता दिली आहे. स्त्रियांचा पुरावा केवळ हिंदु कायद्यानेच त्याज्य ठरविलेला नसून प्राचीन रोमन आणि मध्ययुगीन काळातील युरोपमधील कायद्यांनी देखील स्त्रियांचा पुरावा कमीअधिक प्रमाणांत अग्राह्य मानला जातो. अपात्र म्हणून ठरविलेल्या सर्वच व्यक्ति अविश्वासु असतात असे नसून त्यांच्यापैकी काहींना साक्षीला बोलावणे इष्ट नाही म्हणून त्यांना अपात्र मानले आहे. श्रोत्रियादि व्यक्तींना ह्या कारणाकरिता साक्षीदार म्हणून नियुक्त करिता येत नसले तरी त्यांना साक्षीदार व्हावे असे वाटत असल्यास त्यांना साक्षीदार होता येते. पक्षकारांनी नियुक्त केलेल्या साक्षीदारांना **कृत** आणि अशा नियुक्त न केलेल्या साक्षीदारांना **अकृत** अशा संज्ञा नारदाने (४·१४९) दिल्या असून त्यांचे अनेक भेद आणि उपभेद सांगितले आहेत.

एकादा साक्षीदार अपात्र असल्याची काही कारणे असल्यास ती तो साक्षीदार आपली जबानी देण्यास आरंभ करण्यापूर्वी विचारार्थ मांडणे हे विरुद्ध पक्षकाराचे कर्तव्य असते. एका पक्षकाराने दाखविलेल्या दोषांचे निराकरण करण्याची संधी दुसऱ्या पक्षकाराला दिली पाहिजे. एकाद्या साक्षीदाराच्या उघड दिसणाऱ्या दोषांचा विचार न्यायालयातील सभ्यांनी आपला निर्णय देण्याच्या वेळी करावा. ह्या नियमांच्या बाबतीतही काही अपवाद असत. साक्षीदाराने जबानी दिल्यानंतर जर कोणी पक्षकार त्याचे दोष दाखवील तर त्याला दंड करावा असे सांगितले आहे. कारण अशा दोषांचे निराकरण करण्याची संधी दुसऱ्या पक्षाला द्यावी लागेल.

साक्षीदाराने न्यायालयात साक्ष कशी द्यावी ह्याविषयी सविस्तर नियम सांगितले आहेत. (आप. ध. सू. २·११·२९·७) साक्ष देण्यास प्रारंभ करण्यापूर्वी त्याने आपली पादत्राणे आणि पागोटे काढावे, न्यायाधीशाचे लक्ष्य वेधण्याकरिता आपला उजवा हात वर करावा आणि सुवर्ण, शेण, अथवा दर्भ ह्यांना स्पर्श करून सत्य असेल ते सांगावे. प्रज्वलित अग्नि आणि पाण्याचा कुंभ ह्यांच्या सन्निध साक्षीदाराने साक्ष द्यावी असे कोणी म्हटले आहे. न्यायाधीशाने न्यायसभेत जमलेल्या सर्व साक्षीदारांना वादी आणि प्रतिवादी ह्यांच्या समक्ष शपथ घालून सत्य सांगण्याविषयी बजावावे. शपथेमध्ये सत्य सांगण्याच्या आवश्यकतेविषयी एक भाग असतो आणि परिणामाविषयी आणि शापाचा उच्चार करणारा दुसरा भाग असतो. साक्षीदाराच्या वर्णाला अनुसरून न्यायाधीशाच्या भाषणात भेद असतात. ब्राह्मणाला **सत्याची** शपथ घ्यावयास सांगत, क्षत्रियाला तो बसत असणाऱ्या **जनावराची** आणि **शस्त्राची** शपथ घ्यावी लागे, वैश्याला गुरांची, धान्यांची आणि सुवर्णाची शपथ घ्यावी लागे आणि शूद्राला त्याच्या मस्तकावर सर्व **महापातकांचा दोष** लागेल अशी शपथ घ्यावयास सांगत. प्रश्न विचारण्याचे काम न्यायाधीश करी आणि त्याच्या आंगच्या दोषांशिवाय इतर बाबतीत उलट तपासणी आणि फेरतपासणी करण्यात येत नसे. साक्षीदार स्वाभाविकपणे न अडखळता जे सांगेल ते लिहून घ्यावे असा नियम असे.

साक्षीदाराला न्यायालयात येण्यास भाग पाडण्यात येत असे. असमर्थ नसूनही जर एकादा साक्षीदार न्यायालयात येण्याचे नाकबूल करील तर त्याला खोटी साक्ष देण्याचे पातक लागते आणि त्याने विवादित रक्कम आणि त्या रकमेच्या दशांश इतका दंड राजाला दिला पाहिजे. (मनु. ८·१०७; याज्ञ. २·७७).

साक्षीदाराची जबानी सामान्यतः उघड्या न्यायालयात आणि पक्षकारांच्या समक्ष घेण्यात येत असे; परंतु काही विशिष्ट प्रसंगी त्याची साक्ष इतर ठिकाणी घेण्यास प्रत्यवाय नसे. उदाहरणार्थ, एकाद्या सजीव

अनुक्रमणिका

प्राण्याच्या मृत्यूसंबंधीच्या दाव्यात साक्षीदारांना त्या मृत प्राण्याच्या प्रेतासमोर जबानी देण्यास लावले जात असे. (कात्या. ३८७·८९).

साक्षीदार खोटे सांगत आहे हे ओळखण्याविषयी काही नियम स्मृतींत दिले आहेत. त्याच्या वर्तनावरून आणि स्वरूपावरून जरी एकादा साक्षीदार खोटे बोलत आहे असे वाटले तरी अशा चिन्हांवरून त्याला खोटी साक्ष देण्याबद्दल शिक्षा करू नये कारण अशा चिन्हांवरून तो मिथ्यावादी असण्याचा फक्त संभव दर्शित केला जातो.

एकापेक्षा अधिक साक्षीदार असताना त्यांच्या जबान्यांत विरोध असेल तेव्हा काय करावे ह्याविषयी नियम असत. (नारद. ४·१९३—९६; याज्ञ. २·१३।१५). अशा प्रसंगी निम्म्याहून अधिक साक्षीदारांचे म्हणणे ग्राह्य धरावे; परंतु दोन्ही बाजूला समान संख्या असल्यास जे साक्षीदार अधिक शुद्ध वर्तनाचे असतील त्यांचे म्हणणे ग्राह्य धरावे आणि अशा शुद्ध साक्षीदारांतही मतभेद झाल्यास जे सर्वोत्कृष्ट असतील त्यांचे म्हणणे ग्राह्य धरावे. जेव्हा सर्वही साक्षीदार समान योग्यतेचे असतील आणि त्यांच्यातील एका बाजूला फक्त एकच अधिक असेल तर ते सर्वही साक्षीदार अपात्र ठरतील आणि त्या वादाच्या निर्णयाच्या कामात तोंडी पुरावा निरुपयोगी होईल. साक्षीदाराने फिर्यादीत केलेल्या महत्त्वाच्या विधानांपेक्षा कमी अथवा अधिक विधाने केली तर त्या फिर्यादीचे म्हणणे पूर्णपणे प्रस्थापित होत नाही आणि त्या साक्षीदाराची साक्ष विचारात घेऊ नये आणि तो दंडास पात्र होतो. व्यभिचार, साहस आणि चोरी ह्या अपराधांच्या बाबतीत साक्षीदारांनी फिर्यादीतील काही भागांबद्दल साक्ष दिली तर फिर्यादीतील सर्वही विधाने सिद्ध झाल्याचे मानावे. (कात्या. ३९७).

एका पक्षकाराने बोलाविलेल्या साक्षीदाराची त्याच्या विरुद्ध बाजूच्या पक्षकाराने गुप्तपणे भेट घेऊ नये अथवा दुसऱ्या कोणामार्फत अथवा धमकी देऊन त्याला आपल्या बाजूला वळविण्याचा प्रयत्न करू नये. असा करणारा शासनास पात्र होतो. (नारद ४·१६५).

उशीरा पुरावा देण्याबद्दल काही नियम असत.एकाद्या पक्षकाराजवळ सबळ पुरावा असला तरी जर त्याने अशा पुराव्याची यादी दिली नसली आणि दाव्याचे काम बहुतेक पुरे होत आले आणि फक्त निर्णय देण्याचे काम राहिले असले तर अशा स्थितीत वादीला नवीन पुरावा दाखल करू दिला जाणार नाही. तथापि इतक्या उशीरा देखील अधिक योग्यतेचे साक्षीदार घेऊन येण्यास परवानगी देण्यात येई. साक्षीदार मिळणे शक्य असेपर्यंत दिव्याचा अवलंब करू नये असा नियम असे. (याज्ञ. २·२२इ०).एका पक्षकाराने बोलाविलेल्या साक्षीदारांचा एक गट खोटा असल्याचे जर विरुद्ध पक्षाला वाटेल तर त्यांच्यापेक्षा अधिक प्रतिष्ठित अथवा अधिक संख्येचे साक्षीदार त्या साक्षीदारांच्या विरुद्ध जबानी देण्याकरिता आणता येत असत.

एकादा साक्षीदार वस्तुस्थिती सांगण्याचे कबूल करून नंतर मी विवादित गोष्ट पाहिल्याचे नाकबूल करील तर त्याला फार मोठा दंड करावा कारण असा मनुष्य खोटी साक्ष देणाऱ्या साक्षीदारापेक्षाही अधिक वाईट असतो. (याज्ञ. २·८२; नारद ४·१९७).

साक्षीदारांच्या जबान्या झाल्यानंतर मुख्य न्यायाधीश आणि सभ्य ह्यांनी साक्षीदारांच्या जबान्यांचा आपसात विचार करावा आणि कोणत्या साक्षीदारांवर विश्वास ठेवावा हे ठरवावे. खोटी साक्ष देणाऱ्याला

लौकिक (दंड) आणि पारलौकिक (नरक) अशी दोन्ही प्रकारची फळे भोगावी लागतात. अप्रामाणिक न्यायाधीश, खोटी साक्ष देणारा साक्षीदार आणि ब्रह्महत्या करणारा हे सारख्याच दर्जाचे पातकी असल्याचे बृहस्पतीने (पौ.ध.ग्रं. खं.३३पा. ३०१) म्हटले आहे. खोटी साक्ष देण्याबद्दलचा दंड आणि शारीरिक शिक्षा अपराध्याच्या वर्णानुरूप कमी अधिक असत. ज्या ज्या दाव्यांत साक्षीदारांनी खोटी साक्ष दिल्याचे सिद्ध होईल त्या त्या दाव्यांचे काम पुरे झाले असले तरी दिलेला निर्णय बाजूला ठेऊन त्या दाव्यांची पुन्हा चौकशी करावी. (मनु. ८·११७).

एकाद्या साक्षीदाराने साक्ष दिल्यानंतर सात दिवसांच्या आत एकादे तीव्र दुखणे अथवा आग अथवा आप्ताचा मृत्यू ह्यांच्यासारखी आपत्ती त्याच्यावर ओढवली तर त्यावरून त्याने खोटी साक्ष दिली असे गृहीत धरून त्या साक्षीदाराला दंड अथवा शासन करावे. एकाद्या दाव्यात दूतासारखा एकटाच साक्षीदार असेल तर त्याच्यावर अशा प्रकारची एकादी आपत्ती ओढवते किंवा काय ह्याची ७ दिवस वाट पहावी आणि त्यानंतर त्याने खोटी साक्ष दिल्याचे धरावे. (मनु. ८·१०८).

काही विवक्षित प्रसंगी खोटी साक्ष देण्यास हरकत नसते. उदाहरणार्थ, सत्य सांगण्याने एकादा मनुष्य देहान्ताच्या शिक्षेस पात्र होण्याचा संभव असेल तेव्हा, अथवा स्वतःचा अथवा दुसऱ्याचा जीव वाचावा ह्या करिता खोटे बोलावे असे महाभारतात अनेक ठिकाणी सांगितले आहे. (शांति. ४५·३५.; १०९·१९३). अशा साक्षीदाराला खोटी साक्ष देण्याबद्दल प्रायश्चित्त करण्याची आवश्यकता नाही.

सावकाराच्या निष्काळजीपणामुळे एकादे कर्ज सिद्ध करण्याला लेख नसेल (आणि तो सावकार मृत झाला असेल) आणि प्रतिवादी कर्ज नाकबूल करीत असेल तर अशा प्रसंगी त्याला वारंवार तगादा लावणे, त्याच्याशी युक्तिवाद करणे आणि **शपथ** करणे आणि **दिव्य** करणे ह्यांच्यापैकी कोणत्या तरी एका प्रकाराचा अवलंब करावा.

एकाद्या वादाचा ज्याच्या योगाने निर्णय करता येईल असे **अनुमान** हे साधन असते. (बृह. परा.मा.३पा.८३). परंतु अनुमान हे साक्षीदारापेक्षा कमी दर्जाचे नर्णयाचे साधन असते. संशय वाटण्यासारख्या परिस्थितीत न्यायाधीशांनी चिन्हांच्या [सन्देहे लिङ्गतो दैवेनेति विचित्य । आप.ध सू २·११·२९·६] साहाय्याने (म्हणजे अनुमानावरून) अथवा दैव पुराव्याच्या (दिव्याच्या) साहाय्याने निर्णय करावा. (आप. ध.सू.२·११·२९·६).

परिस्थितिजन्य पुराव्यावरून केलेले निर्णय पुष्कळ वेळा खोटे ठरतात. एकादा चोर नसणारा मनुष्यही चोर ज्या वाटेने जात असतील त्या मार्गाने सहज जात असण्याचा संभव असतो आणि चोरांना भेटलेला मनुष्यही चोरासारखा पोषाक असल्यामुळे, त्यांच्यासारखी शस्त्रे जवळ असल्यामुळे अथवा चोरीस गेलेल्या मालाच्या जवळ आढळल्यामुळे चोर म्हणून पकडला जाण्याचा संभव असतो.ह्यासंबंधीची प्रसिद्ध उदाहरणे मृच्छकटिक नाटकातील (अंक ९) प्रसंग आणि पुराणातील मांडव्य ऋषीची कथा (बृह. व्यव. प्र.पा. १३।१४) ही आहेत.

ज्यावेळी परिस्थितीजन्य पुरावा आणि त्यावरून काढलेली अनुमाने ह्यांच्या साह्याने देखील न्यायाधीशाला निर्णय करता येत नसेल त्यावेळी न्यायाधीशाने पक्षकारांना **शपथ** आणि **दिव्य** करण्यास भाग पाडावे. दैव पुराव्याला **दैविकी क्रिया** अथवा **समय क्रिया** अशी नावे आहेत. काही ग्रंथकार शपथ आणि दिव्य

अनुक्रमणिका

ह्यांत भेद मानतात, दुसरे काही असा भेद करीत नाहीत. ज्यांच्या योगाने एकाद्या वादाचा सामान्यतः तात्काल निर्णय होतो त्यांना दिव्य म्हणतात. (मिता. याज्ञ. २·९६). शपथेच्या योगाने निर्णय होण्याला कालावधी लागतो (कारण एकादी आपत्ती ओढवते किंवा काय हे पाहण्याकरिता एक आठवडा अथवा अधिक काळपर्यंत वाट पहावी लागते) तराजु, विषभक्षण, अग्निप्रवेश, तप्त लोखंडाचा तुकडा हातात धरणे, यज्ञ करून मिळविलेले पुण्य देण्याचे कबूल करणे ही पुराव्याची दैव साधने असतात. अल्प किंमतीच्या वादात सामान्यतः शपथांचा उपयोग करीत आणि मोठ्या वादांत अथवा गंभीर स्वरूपाच्या अपराधांच्या बाबतीत दिव्यांचा अवलंब केला जात असे. न्याय निर्णयाव्यतिरिक्त देखील काही प्रसंगी शपथा घेण्यात येत असत. उदाहरणार्थ, आपण केलेले विधान दृढ करण्याकरिता, स्वतःच्या शीलाबद्दल अथवा लौकिकाबद्दलच्या आक्षेपांचे निराकरण करण्याकरिता शपथा घेण्यात येत. एकाद्या वादातील पक्षकारांनी आपल्या पुत्रांच्या आणि स्त्रियांच्या मस्तकांना स्पर्श करून विशेष शपथा घ्याव्या असे सांगितले आहे. सत्याचे स्मरण करून शपथ घेण्याचा प्रघात अत्यंत प्राचीन काळी सर्वत्र प्रचलित होता हे पाणिनीच्या 'सत्यादशपथे' ह्या (५·४·६६) सूत्रावरून दिसून येते. वर्णांना अनुसरून शपथ करण्याकरिता निरनिराळ्या पदार्थांचा उपयोग करण्यात येत असे. मनूने (८·१११) असे म्हटले आहे की शाहण्या मनुष्याने खोटी शपथ घेऊ नये कारण त्याच्या योगाने त्याला ह्या लोकात (अब्रु गमावणे ह्यासारख्या) आणि परलोकात (नरकात पडणे ह्यांच्यासारख्या) हानि सोसाव्या लागतात. अयोग्य अथवा अश्रद्धेने शपथ घेणाऱ्याला शंभर पण दंड करावा असे याज्ञवल्क्य स्मृतीत (२·२३६) सांगितले आहे.

संशयाचा फायदा आरोपीला दिला पाहिजे हे न्यायदानासंबंधीचे आधुनिक मत ख्रि.पू. अनेक शतके आप. ध.सू. [न च सन्देहे दण्डं कुर्यात् । आप. ध.सू. २·५·११·२.] मध्ये (२·५·११·२) प्रतिपादन केले होते. त्यात म्हटले आहे की जेव्हा एकाद्या मनुष्याने अपराध केला आहे किंवा नाही ह्याविषयी संशय असेल तेव्हा राजाने शिक्षा करू नये.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ७३

## दिव्ये

(मू.ग्रं.पा.३.३६१-३७८)

दिव्यांसंबंधीचा पूर्वेतिहास पाहिल्यास असे दिसून येते की ऋग्वेद आणि अथर्ववेद ह्यांत अग्नि आणि उदक ह्या दिव्यांचा उल्लेख असल्याचे कित्येक पाश्चिमात्य पंडित मानतात परंतु ते मत चुकीचे आहे. पंचविंश अथवा ताण्ड्य ब्राह्मणात (१४·६·६) वत्साची कथा आली आहे. वत्साच्या सापत्न बंधूने वत्स हा शूद्र स्त्रीचा पुत्र आहे अशी त्याची निंदा केली. वत्साने त्या विधानाचा निषेध करून आपण ब्राह्मण असल्याचे प्रतिपादन केले आणि आपल्या विधानाचा खरेपणा सिद्ध करण्याकरिता त्याने अग्नीत प्रवेश केला आणि कोणतीही इजा न होता तो बाहेर आला. ह्या कथेचा मनु-स्मृतीमध्ये ही (८·११६) उल्लेख केला आहे. प्राचीन संस्कृत वाङ्मयात केलेला अग्निदिव्याचा सर्वात प्राचीन काळचा आणि स्पष्ट असा बहुधा हाच उल्लेख असावा. ह्यानंतरचा उल्लेख छान्दोग्य उपनिषदात (६·१६·१) आला असून कोणावर चोरीचा आरोप केला असेल तर त्याने आपले निरपराधित्व सिद्ध करण्याकरिता तापलेली कुऱ्हाड हातात घ्यावी असे सांगितले आहे.

शंखलिखित स्मृतीत (परा.मा.३.पा.१५१) तराजू, विष, पाणी आणि तप्त लोह हातात धरणे ह्या चार दिव्यांची नावे सांगितली आहेत. मनु, याज्ञ. (२·९५), नारद (४·२५२), वि.ध.सू. (९।१४) ह्यांत कोश (तीर्थ प्राशन) हे आणखी एक दिव्य घालून पाच दिव्यांची नावे सांगितली आहेत. बृहस्पती आणि पितामह (अपरार्क पा. ६२८,६९४) ह्यांनी नऊ प्रकारची दिव्ये सांगितली आहेत. ख्रि.शकाच्या आरंभीच्या शतकांत दिव्यांचा फार प्रचार होता हे मृच्छकटिक नाटकावरून (अं. ९·४३) आणि बाणभट्ट कृत कादंबरी (परिच्छेद ४७) ह्या ग्रंथांवरून दिसून येते. दिव्यासंबंधी अनेक ग्रंथकारांनी केलेल्या विवेचनांमध्ये पितामहाने केलेले विवेचन सर्वात अधिक विस्तृत असल्याचे त्या स्मृतीमधील जी अवतरणे निबंधग्रंथांत उद्धृत केली आहेत त्यावरून दिसते.

एकाद्या वादात ज्या गोष्टीचा निर्णय मनुष्यकृत पुराव्याच्या साधनांनी होत नाही, त्या गोष्टीचा निर्णय जे सिद्ध करते ते दिव्य अशी व्याख्या व्यवहारमयूखात आणि दिव्यतत्त्व (पा. ५७४) या ग्रंथात केली आहे. काही बाबतीत दिव्ये निरुपयोगी ठरण्याचा संभव असतो परंतु तेवढ्यावरून दिव्यांची उपयुक्तता नष्ट करता येणार नाही कारण दिव्ये निष्फल झाल्याची उदाहरणे फार वेळा घडत नाहीत. प्रत्यक्ष आणि अनुमान ह्या गोष्टींवरूनही कित्येक वेळा निश्चित निर्णय होत नाही तरी त्यांच्यावर विश्वास ठेऊ नये असे कोणी प्रतिपादन करीत नाही. दिव्याचा निर्णय चुकीचा ठरेल तर तो दिव्य करणाऱ्याच्या पूर्वजन्मार्जित कर्माचा परिणाम समजावा असे मेधातिथीने मनुस्मृतीवरील (८·११६) टीकेत म्हटले आहे.

सर्वसाधारण नियम असा आहे की, (याज्ञ.२·२२) साक्षीदार, लेख, भुक्ति इत्यादी मानवी पुरावा अथवा परिस्थितीजन्य पुरावा उपलब्ध नसेल तेव्हाच दिव्याचा उपयोग करावा. काही विशिष्ट प्रसंगी इच्छेप्रमाणे साक्षीदाराचा अथवा दैव पुराव्याचा अवलंब करावा असा विकल्प असतो. स्त्रियांच्या शुद्धतेसंबंधी दैव पुराव्याचा अवलंब केल्याचे रामायणातील सीतेचे उदाहरण सुप्रसिद्ध आहे. (नारद ४·२४२).

सर्वसाधारण नियम म्हणजे प्रतिवादीला दिव्य करावयास सांगत. तथापि याज्ञ. (२·९६) मध्ये ह्याला असा विकल्प सांगितला आहे की आपसात ठरवून दोन पक्षकारांपैकी कोणीही एकाने दिव्याचा आश्रय केला आणि दुसऱ्याने दिव्याचा निर्णय आपल्याविरुद्ध झाल्यास दंड देण्याचे अथवा शारीरिक शिक्षा भोगण्याचे कबूल केले तरी चालेल.

फार महत्त्वाच्या दाव्यात तराजु, अग्नि, विष आणि पाणी ही दिव्ये योजावी आणि इतर दाव्यांत योजू नयेत. तथापि राजद्रोहाचा आरोप असेल अथवा पंच महापातकांचा आरोप असेल तर दाव्यातील मागणे कितीही असले तरी आणि पराभव झाल्यास दंड देण्याचे त्या पक्षकाराने कबूल केले नाही तरी देखील वरील चार दिव्ये करण्यास प्रत्यवाय नाही. कोशदिव्य कोणत्याही दाव्यात करावयास प्रत्यवाय नाही. कोणते दिव्य कोणाला करावयास सांगावे ह्याविषयीही नियम असत. उदाहरणार्थ, स्त्रिया आणि अल्पवयी आणि अतिवृद्ध व्यक्ती, ब्राह्मण इत्यादींना तराजूचे दिव्य करावयास सांगावे. आपद्ग्रस्तासारख्या कांही व्यक्तींनी दिव्य करू नये. अल्पवयी आणि अतिवृद्ध ह्यांनी अग्नि, विष आणि जल ही दिव्ये करू नये.

काही विशिष्ट व्यक्तींना कोणतेही दिव्य स्वतः करण्यास निषेध असे आणि त्यांनी नियुक्त केलेल्या सदाचरणी लोकांना त्यांच्याकरिता दिव्य करू दिले जाई. अस्पृश्य, दास, म्लेच्छ इत्यादिकांवरील अपराधाचा निर्णय दिव्याच्या साहाय्याने न करता त्यांच्यामध्ये प्रचलित असणारी दिव्ये योजावीत.

कोणते दिव्य कोणत्या ऋतूत करावे ह्याबद्दल नियम असत. रविवार हा दिव्ये करण्यास युक्त वार समजला जात असे. चैत्र, वैशाख आणि मार्ग. हे महिने सर्व दिव्यांना युक्त असतात आणि कोश आणि तुला ही दिव्ये सर्वही महिन्यांत करता येतात.

सर्व दिव्ये राजाने अथवा त्याने नेमलेल्या न्यायाधीशाने राजा, सभ्य आणि ब्राह्मण ह्यांच्या समक्ष करवून घ्यावी. दिव्ये कोणत्या स्थळी करावी ह्याबद्दल नियम असत. अयोग्य काळी आणि अयोग्य स्थळी केलेली दिव्ये निर्णायक होत नाहीत असे समजत असत. (कात्या परा.मा.३ पा. १६३).

**दिव्ये करण्यासंबंधीच्या कार्यक्रमाचे वर्णन** प्रजापती, बृहस्पती आणि पितामह ह्यांच्या वचनांच्या आधारावर निरनिराळ्या ग्रंथांत केले आहे. (व्यव. निर्णय पा.१४८-५३; मिता (याज्ञ. २·९७·९९). दिव्याच्या कार्यांतील सर्व कर्मे राजाच्या आज्ञेने मुख्य न्यायाधीशाने करावी. मुख्य न्यायाधीश आणि दिव्य करणारा (ह्याला शोध्य अशी संज्ञा आहे) ह्यांनी उपोषण करावे. दोघांनी प्रातःकाळी स्नान करावे आणि शोध्याच्या आंगावर ओली वस्त्रे असावी. न्यायाधीशाने देवाची आराधना करावी. निरनिराळ्या देवतांची स्थापना करावी आणि त्यांची पूजा करावी. ऋत्विजांनी तूप, चरू आणि समिधा ह्यांच्या आहुती द्याव्या. एका कागदावर दिव्य करावयाचा विषय लिहून तो कागद शोध्याच्या मस्तकावर ठेवावा आणि ‘आदित्यचंद्रा ०’ (आदि ७४·३०) हा श्लोक म्हणावा. हा कार्यक्रम सर्व दिव्यांना सामान्य असतो. त्यानंतर दिव्य करावे.

**प्रमुख दिव्यांची त्रोटक वर्णने पुढे दिली आहेत:**

**(१) तुला अथवा घट (तराजु)**. ताजव्याच्या एका पारड्यात शोध्याला बसवावे आणि दुसऱ्या पारड्यात चिखल, विटा आणि दगड घालावे. दोन्ही पारड्यांचे वजन समान झाले म्हणून खूण करून ठेऊन शोध्याने खाली उतरावे आणि त्याने तराजूची प्रार्थना करावी. नंतर दिव्यासंबंधीचा कागद मस्तकावर

घेऊन शोध्याला पुन्हा पारड्यात बसवावा. त्याचे वजन पूर्वीपेक्षा कमी आढळले तर तो निरपराधी समजावा, पूर्वीच्या इतकेच अथवा अधिक झाले तर तो अपराधी समजावा. तराजूचे पारडे अथवा तुळई मोडल्यास अथवा दोर तुटल्यास सर्व कार्यक्रम पुन्हा करावा परंतु अशी गोष्ट एकाद्या अदृश्य कारणाने झाली तर तो मनुष्य अपराधी ठरवावा.

(२) **अग्निदिव्य.** सारवलेल्या जमिनीवर पश्चिमेकडून पूर्वेकडे नऊ वर्तुळे काढावी आणि त्यांत दर्भ पसरावे. दिव्य करणाऱ्याने आपली पाऊले दर्भावर ठेवावी. शोध्याच्या शक्तीला अनुसरून १६ अथवा ५० पल वजनाचा लोखंडाचा गोळा ठिणग्या उडू लागेपर्यंत तापवावा. दिव्याचे कारण लिहिलेला कागद शोध्याच्या मस्तकावर ठेवावा आणि त्याने पहिल्या वर्तुळात पूर्वकडे तोंड करून उभे राहावे. त्याच्या हातावरील व्रणांची तपासणी करून नंतर त्याच्या हातावर तांदूळ चोळावे आणि अश्वत्थाची सात पाने आणि तांदुळाचे दाणे आणि दही हे पदार्थ ठेवावे आणि ते दोरांनी बांधावे. नंतर न्यायाधीशांने चिमटा घेऊन तापविलेला लोखंडाचा तुकडा पानांनी आच्छादिलेल्या शोध्याच्या हातावर ठेवावा. शोध्याने तो तुकडा दोन्ही हातांनी धरून पहिल्या वर्तुळापासून आठव्या वर्तुळापर्यंत धिम्मेपणाने चालत जावे. आठव्या वर्तुळापर्यंत आल्यावर शोध्याने तो तुकडा नवव्या वर्तुळात फेकावा. न्यायाधीशाने शोध्यांच्या हातावर तांदुळाचे दाणे चोळावे. जर त्याने तांदूळ चोळण्यास हरकत घेतली नाही आणि दिवसाच्या अंती त्याच्या हातावर काही जखम झालेली दिसली नाही तर तो निर्दोषी असल्याचे ठरवावे. जर आठव्या वर्तुळाच्या पूर्वीच लोखंडाचा गोळा खाली पडला अथवा हातावर जखम झाल्याचा संशय आला अथवा त्याचा पाय घसरला अथवा हातापेक्षा इतर ठिकाणी भाजले तर त्याने पुन्हा दिव्य केले पाहिजे.

(३) **विष दिव्य.** महेश्वराची पूजा करून त्या मूर्तीसमोर ठेवलेले विष देवाच्या मूर्तीच्या आणि ब्राह्मणांच्या समक्ष शोध्याला पाजावे. ते विष कमळाची वेल, बचनाग अथवा हैमवत ह्यांपैकी कोणते तरी एक असावे. ते विष निरनिराळ्या ऋतूत कोणत्या प्रमाणात असावे, दिवसाच्या कोणत्या भागात घ्यावे ह्याविषयी नियम असत. विष भक्षण केल्यावर शोध्याला सावलीत अन्न न देता ठेवावे आणि तो दिवस संपेपर्यंत त्याच्यावर पहारा ठेवावा. जर विषाचा परिणाम झाल्याची कोणतीही लक्षणे दिसली नाही तर तो निर्दोषी समजावा. जर बरेच विष भक्षण केले असेल तर ५०० टाळ्या वाजविण्यास लागणाऱ्या वेळात विषाचा परिणाम झाल्याची चिन्हे दिसली नाही तर तो निर्दोषी समजून विष परिहाराकरिता औषधोपचार सुरू करावे.लबाडी होऊ नये म्हणून शोध्याला पूर्वी तीन अथवा पाच रात्री राजदूतांच्या नजरेखाली ठेवावा आणि विषबाधा हरण करणाऱ्या औषधांचा, रत्नांचा, मंत्रांचा गुप्तपणे उपयोग केला आहे किंवा काय ह्याची परीक्षा करावी.

(४) **कोशदिव्य.** रुद्र, दुर्गा ह्यांच्यासारख्या कडक देवतेची पूजा करून आणि त्यांना स्नान घालून घेतलेले तीर्थ शोध्याला पिण्यास लावावे. असे तीर्थ प्राशन केल्यानंतर १४ दिवसांच्या आत शोध्यावर एकादे मोठे दुखणे आले अथवा एकादी भयंकर आपत्ती आली अथवा त्याच्या संपत्तीचा नाश झाला अथवा एकादा निकटचा नातलग मृत झाला तर तो अपराधी समजावा. अशी आपत्ती साथीसारख्या अनेकांवर एकाच वेळी आलेली नसली पाहिजे. इतर दिव्यांचा निर्णय तात्काल घोषित केला जातो. परंतु कोशदिव्याच्या बाबतीत काही काळ वाट पहावी लागते. कोशपान ह्या दिव्याचा उपयोग केवळ निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी करीत नसून आपली सद्भावना दुसऱ्याला पटवून देण्यासाठी देखील करीत असत.

**(५) तप्तमाष दिव्य.** उकळी येईपर्यंत तापविलेल्या तुपात अथवा तेलात एक माष वजनाचा सोन्याचा तुकडा टाकीत आणि शोध्याला तो तुकडा आपला आंगठा आणि त्याच्या जवळची दोन बोटे ह्यांनी बाहेर काढावयास सांगत. जर त्याने आपली बोटे हालविली नाही अथवा त्याची कातडी भाजली नाही तर तो निरपराधी समजावा.

**(६) नांगराच्या फाळाचे दिव्य**. तापवून लाल केलेला नांगराचा फाळ शोध्याला एक वार जिभेने चाटावयास सांगत. जर त्याची जीभ भाजली नाही तर तो निर्दोषी समजला जाई.

**(७) धर्मदिव्य.** एक धर्माची आणि एक अधर्माची अशा दोन निरनिराळ्या धातूच्या प्रतिमा अथवा भूर्जपत्र अथवा कापडावर काढलेली भिन्न रंगांची चित्रे मातीच्या दोन गोळ्यात ठेवून ते गोळे एका मातीच्या भांड्यात घालून देवतांच्या मूर्तीच्या आणि ब्राह्मणांच्या समक्ष सारविलेल्या जागेवर ठेवीत. दिव्यासंबंधीचा कागद शोध्याच्या मस्तकावर ठेवून त्याला त्या भांड्यातून एक गोळा बाहेर काढावयास सांगत. जर त्याने धर्माची प्रतिमा अथवा चित्र असलेला गोळा बाहेर काढला तर तो निरपराधी समजत. हे दिव्य चिठ्या टाकून पाहण्यासारखेच असते.

बहुतेक प्राचीन देशांत न्यायनिर्णयाच्या कामीं दिव्यांचा उपयोग करण्यात येत असे. इंग्लंड मध्ये इ.स.१२१५ मध्ये दिव्यावर बंदी घालण्यात आली. आपल्या देशात अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत न्यायनिर्णयाकरिता दिव्ये केल्याचे अनेक उल्लेख उपलब्ध आहेत. (एपि. इं.खं. १३पा. २९१-२९२, इ. ॲंटिक्वे. सन १९३१ खं. ६० पा. १७९ इ०). मराठी सत्तेत इ.स. १७४४ मध्ये कोपरगाव येथे पेशव्यांच्या समक्ष अग्निदिव्य केल्याचा उल्लेख आढळतो. (मावजी आणि पारसनीस-वतनपत्रे इ०पा. ४६-५६).सन १७८३ मध्ये काशी येथे एका वादात फाळाचे दिव्य केले होते. (एशियाटिक रिसर्चेस खं.१).

———

## प्रकरण ७४

# निर्णय

(मू.ग्रं.पा.३.३७९-४१०)

न्यायदानाच्या कार्यक्रमातील शेवटचा म्हणजे ४ था टप्पा **सिद्धि** अथवा **निर्णय** हा असतो. (याज्ञ.२·८). पुरावा देऊन झाला म्हणजे राजाने (अथवा मुख्य न्यायाधीशाने) सभ्यांच्या साहाय्याने वादीचा जय होतो अथवा पराजय होतो ह्याविषयी निर्णय करावा. ज्यावेळी सभ्य आपला निर्णय ठरवीत असतील अथवा कोणता निर्णय जाहीर करावा हे ठरवित असतील त्यावेळी सभ्यांनी पक्षकारांना न्यायसभेतून बाहेर जाण्यास सांगावे.

वादातील निर्णय पुढील आठ गोष्टींवर आधारलेला असतोः- (व्यासव्यव. निर्णय. पा १३८) उपभोगादि तीन प्रमाणे, कायदेशीर अनुमान, देशाचार, शपथा, राजशासन (कायदे) आणि पक्षकारांचे जबाब. ज्या वादात तीन प्रमाणांपैकी कोणतीही प्रमाणे नसतील आणि दैव साधनांचाही उपयोग करिता येत नसेल त्या वादात सर्वांचा प्रभु असल्यामुळे राजा हाच अंतिम निर्णायक असतो.

निर्णयपत्रामध्ये वादीची फिर्याद, प्रतिवादीचे उत्तर, पुरावा, साक्षीदारांच्या जबान्या, ह्या सर्वांची चर्चा, पक्षकारांतर्फे मांडण्यात आलेले मुद्दे, वादाला लागू पडणारी स्मृतिवचने, सभ्यांचे मत ह्या सर्वांचा थोडक्यात गोषवारा असला पाहिजे आणि त्यावर मुख्य न्यायाधीशाने स्वाक्षरी आणि राजमुद्रा केली पाहिजे. कोणाच्या मते न्यायसभेतील इतर स्मृतिशास्त्रज्ञ सभासदांनी तो निर्णय मान्य असल्याचे दर्शित करण्याकरिता निर्णयपत्रावर स्वाक्षऱ्या कराव्या परंतु काही ग्रंथकारांच्या मते तशा स्वाक्षऱ्यांची आवश्यकता नाही. वादीने आपली तक्रार बदलल्यामुळे अथवा तशाच काही कारणांनी त्याचा पराजय झालेला असो अथवा वादाची पूर्ण चौकशी होऊन तो पराजित झालेला असो, तो पराजय सभ्यांनी जाहीर करणे आणि यशस्वी पक्षकराला जयपत्र देणे ह्या गोष्टी उचित असतात.

प्राचीन काळची संस्कृत भाषेत लिहिलेली जयपत्रे अद्यापि उपलब्ध झालेली नाहीत. जावा बेटातील प्राचीन भाषेतील इ.स.९२८ मधील एका जयपत्राचा सारांश प्रसिद्ध झाला आहे. [२५ कलकत्ता वीक्ली नोटस् पा. १४२-१४३.] मिथिला [बिहार आणि ओरिसा रिसर्च सोसायटीचे नियतकालिक. खंड ६ पा. २४६-२५८;] येथील हिंदु न्यायसभेने इ.स. १७९४ मध्ये दिलेलेही एक जयपत्र छापले आहे. ते स्मृति आणि निबंध ग्रंथांत दिलेल्या नियमांना पूर्णपणे अनुसरून आहे. दुसरीही काही मिथिला प्रांतातील न्यायालयांनी [बिहार आणि ओरिसा रिसर्च सोसायटीचे नियतकालिक, खंड २८ (सन १९४२).] १८ व्या शतकात दिलेली जयपत्रे प्रसिद्ध झाली आहेत.

जयपत्र हे मुख्यतः तीच बाब पुन्हा चर्चेचा विषय होऊ नये ह्या हेतूने दिले जाते. एकादा पक्षकार पराजित झाला असताना जो लेख देण्यात येतो त्याचा उद्देश त्या पक्षकाराला पुढे दंड देण्यास पात्र ठरविण्याचा असतो. जेव्हा एकाद्या वादाचा निर्णय (कुलासारख्या) खाजगी स्वरूपाच्या न्यायालयाने केला जातो तेव्हा जयपत्र न देता फक्त निर्णयपत्र दिले जाते.

पराभूत पक्षकाराला राजाला दंड द्यावा लागे आणि यशस्वी पक्षकाराचा राजाकडून (अथवा मुख्य न्यायाधीशाकडून) गौरव केला जाई आणि विवादित वस्तु त्याच्या ताब्यात दिली जाई. पैशासंबंधीच्या दाव्यात हरलेल्या पक्षकाराला निर्णयपत्रात देवविलेले ऋण यशस्वी पक्षकाराला देण्यास लावून शिवाय त्या पक्षकाराच्या सामर्थ्यानुसार काही दंडही राजाला देण्यास लावला जाई. हा दंड शेकडा ५ ते १० पर्यंत असून आधुनिक काळातील कोर्ट फी (न्यायदानाबद्दलचे शुल्क) सारखा असे. (मनु.८·१३९,याज्ञ. २·१८; नारद २·५).

ज्यावेळी न्यायदानासंबंधी चौकशीचे काम पुरे (तीरित) झाले असेल अथवा इतक्या मर्यादेपर्यंत झाले असेल की त्यावरून हरलेल्या पक्षकाराकडून दंड वसूल करता येईल, त्यावेळी राजाने केवळ आपल्या इच्छेप्रमाणे अथवा लोभामुळे ते चौकशीचे काम रद्द करू नये. (मनु.९·२३३).

दाव्याचे काम चालत असताना विवादित स्थावर अथवा जंगम मिळकत व्यवस्थापक अधिकारी ह्या नात्याने त्रयस्थाच्या ताब्यात असली तर त्या मिळकतीवरील व्याज अथवा वाढ यशस्वी पक्षकराला मिळावी असा उल्लेख निर्णयपत्रात केला पाहिजे.

निर्णयपत्रातील ठराव अमलात आणण्याचे निरनिराळे मार्ग असत. (कात्या.४७७-४८०). एकाद्या रिणकोने घेतलेले ऋण त्याला नगदीत परत देणे अशक्य असेल तर अशा (ब्राह्मणाव्यतिरिक्त) रिणकोला धनकोकरिता काम करावयास लावीत आणि तो काम करण्यास असमर्थ असल्यास त्याला बंदीत टाकीत. राजाने ठरविलेला दंड देण्यास एकादा (ब्राह्मणाव्यतिरिक्त) रिणको असमर्थ असेल तर त्याला राजाकरिता काम करावयास लावता येई. ब्राह्मणांप्रमाणेच स्त्रियांच्या बाबतीतही काही सवलतीचे नियम असत. (कात्या.४८८-४८९).

एकाद्या पक्षकाराचा त्याच्या स्वतःच्या कृत्यामुळे पराजय झालेला असेल तर अशा निर्णयाचा सामान्यतः फेरविचार करू नये परंतु जेव्हा एकाद्या मनुष्याचा दावा साक्षीदारांच्या अथवा सभ्यांच्या वर्तनामुळे (अप्रमाणिकपणामुळे) बुडाला असेल तर त्या दाव्याची पहिल्यापासून पुन्हा चौकशी करावी. (नारद २·४०). ह्या नियमाला काही अपवाद सांगितले आहेत.

एकाद्या दाव्याचा निर्णय सभ्यांनी पक्षपातीपणाने अथवा लोभामुळे अथवा भीती मुळे चुकीचा दिला असल्याचा संशय येत असेल तर त्या दाव्याची राजाने परत चौकशी करावी आणि जर तो संशय खरा ठरला तर सभ्यांवर आणि प्रथम यशस्वी ठरलेल्या पक्षकारावर पराभूत पक्षकाराला द्यावयास लागणाऱ्या दंडाच्या दुप्पट दंड बसवावा. (याज्ञ.२·४ आणि ३०५). न्यायदानाकरिता नेमलेल्या अधिकाऱ्यांनी लांच घेऊन पक्षकाराचे नुकसान केले असेल तर राजाने त्या अधिकाऱ्यांची सर्व संपत्ती हिरावून घ्यावी. (मनू ९·२३१). जर त्याने लाच घेतली नसेल परंतु चुकीचा निर्णय दिला असेल तर त्या अधिकाऱ्याला १००० पण दंड करावा आणि त्या दाव्याचा निर्णय राजाने स्वतः योग्य प्रकारे करावा. एकादा वाद एका न्यायालयाकडून अथवा एका न्यायाधीशाकडून काढून दुसऱ्या न्यायालयाकडे अथवा दुसऱ्या न्यायाधीशाकडे चौकशीकरता पाठविण्यासंबंधीचे स्पष्ट नियम स्मृतींत आढळत नाहीत. पेशवाईतील निःपक्षपातीपणाबद्दल प्रसिद्ध असलेल्या रामशास्त्री प्रभुणे ह्या मुख्य न्यायाधीशाने विरुद्ध पक्षकाराबद्दल जरासा पक्षपात केला अशी एका पक्षकाराने भीती व्यक्त केल्यामुळे तो वाद दुसऱ्या न्यायाधीशाकडे सोपविण्याचा हुकूम माधवराव पेशवे यांनी सन १७६४ मध्ये केला असल्याचा उल्लेख आढळतो. (पेशवे दप्तरातील उतारे खंड ४३ पा.१०८).

**अनुक्रमणिका**

एकाद्या मनुष्याने दुसऱ्याच्या शरीराला पीडा दिल्यास अथवा त्याचा एकादा अवयव तोडल्यास त्या कृत्याबद्दल शारीरिक शिक्षा सांगितली असून शिवाय झालेली पीडा बरी करण्याकरिता लागलेला खर्च आणि पीडा झालेल्या मनुष्याला समाधान वाटावे म्हणून काही द्रव्य द्यावे. (मनु. ८·२८७).

तोच अथवा तसाच अपराध पुन्हा घडू नये, समाजाचे संरक्षण व्हावे आणि त्याला सुखाची प्राप्ती व्हावी ह्यासारखे अनेक उद्देश अपराधाबद्दल शासन करण्याच्या मागे असत. शिक्षा हे एक प्रकारचे प्रायश्चित्तही समजले जाई आणि अशा प्रायश्चित्तामुळे मनुष्याची पापाकडे असणारी प्रवृत्ती नाहीशी होते आणि त्याचे शील सुधारते असे मानले जाई. राजाने शासन केल्यावर तो अपराधी मनुष्य सत्कृत्ये करणाऱ्यासारखा पुनीत होऊन स्वर्गाला जातो असे मनूने (८·३१८) सांगितले आहे.

भारतातील फार पूर्वीचा अपराधांविषयीचा कायदा अतिशय कडक होता; परंतु याज्ञ, नारद, प्रभृतींच्या वेळेपासून त्यात सौम्यपणा आला आणि बऱ्याच अपराधांबद्दल दंड हीच सर्व सामान्य शिक्षा होऊ लागली. ज्या अपराधांबद्दल देहान्ताची शिक्षा होते अशा अपराधांची संख्या पाश्चिमात्य देशांच्या मानाने भारतात कोणत्याही काळात लहानच असे. १९व्या शतकाच्या आरंभी इंग्लंडमध्ये १०० हून अधिक अपराधांबद्दल देहान्ताची शिक्षा दिली जात असे.

धर्मशास्त्रकारांनी (मनु. ८·१२९, याज्ञ. १·३६७ इ०) शिक्षा देण्याचे पुढील चार प्रकार सांगितले आहेत: सौम्य शब्दात ताकीद देणे, कडक शब्दात निर्भर्त्सना करणे, दंड आणि शारीरिक शिक्षा. शिक्षेचे पहिले दोन प्रकार न्यायाधीशाच्या अधिकारात येत परंतु दंड करणे आणि शारीरिक शिक्षा करणे ह्या गोष्टी (न्यायाधीशाच्या शिफारसीवरून) राजाने करावयाच्या असत. एकाच प्रकारच्या अपराधाबद्दल त्याचप्रकारचे शासन करावे असे धर्मशास्त्राचे मत नसे. अपराध करणाऱ्यांचे सामर्थ्य, वय, शिक्षण इत्यादी अनेक गोष्टींचा विचार करून कोणती शिक्षा द्यावी हे ठरवावे असे त्यांनी सांगितले आहे आणि ज्यांच्या योगाने अपराधाची तीव्रता कमी होईल अशा गोष्टींचा धर्मशास्त्रे नेहमी विचार करीत. सौम्य शिक्षा देण्याचे नियम सांगण्याचे दुसरे एक कारण 'कर्मविपाकाचा सिद्धान्त' हे आहे. (मनु. ११·४९-५२).ह्या सिद्धान्ताप्रमाणे विशिष्ट पातक करणारा मनुष्य पुढील जन्मी काही विशिष्ट रोगांनी युक्त अथवा अवयवहीन असा उपजतो अथवा मनुष्याहून हलक्या योनीत जन्म घेतो. कौटिल्याच्या (१·४) मताप्रमाणे राजाने अपराध्यांना त्यांच्या अपराधांना अनुरूप शासन करावे म्हणजे लोक राजाला मान देतील. कारण जो राजा कडक शिक्षा देतो त्याच्या बद्दल प्रजेला तिरस्कार वाटतो आणि जो राजा सौम्य शिक्षा देतो त्याला प्रजाजन जुमानीत नाहीत.

दंडाची रक्कम एक काकिणीपासून सर्व संपत्ती जप्त करण्यापर्यंत कमीअधिक असे. ठरीव रकमेच्या दंडाचे **प्रथमसाहस, मध्यमसाहस** आणि **उत्तम साहस** असे तीन भेद असत. ह्या प्रत्येक प्रकारच्या दंडाच्या रकमेबद्दल शास्त्रकारांत मतभेद होते. मनूने (८·१३८) त्या रकमा अनुक्रमे २५०, ५०० आणि १००० पण अशा सांगितल्या आहेत. दंडाची शिक्षा शारीरिक शिक्षेपेक्षा सौम्य मानली जाई. दंडाची रक्कम तांब्याच्या पणात अथवा तितक्या किमतीच्या मालाच्या रूपाने राजाला द्यावी असे कात्यायनाने (४९०-४९३) सांगितले आहे. दंडाची रक्कम १/४ अथवा१/२ माष अशी सांगितली असल्यास ते वजन सोन्याचे समजावे. जेथे दंडाची रक्कम माषांत सांगितली असेल तेथे ती चांदीच्या माषांची आणि जेथे कृष्णलांत सांगितली असेल तेथे ती चांदीच्या कृष्णलांत समजावी. (एक माष १/२० कृष्णल). सर्व अपराधांच्या बाबतीत स्त्रियांना दंड आणि शारीरिक शासन पुरुषांच्या पेक्षा सौम्य असे. (कात्या ४८७), उदाहरणार्थ, पुरुषांच्या अर्ध्याइतका स्त्रियांना दंड केला

जाई.शिक्षेचे प्रमाण अपराध्याच्या वयाला अनुसरून कमी अधिक असे. स्त्री १२ व्या वर्षी आणि पुरुष १६ व्या वर्षी सज्ञान म्हणजे कायदेशीर व्यवहार करण्यास पात्र होतो आणि त्या वयानंतर स्त्रीने आज्ञा मोडल्यास तिला १२ पण आणि पुरुषाला २४ पण दंड करावा असे कौटिल्याने (३·३) सांगितले आहे. पाच वर्षांपेक्षा कमी वयाच्या बालकाने केलेल्या कोणत्याही कृत्याच्या योगाने त्याला अपराध अथवा पाप घडत नाही. शिक्षेचा कडकपणा जातीवरही अवलंबून असे. (गौ. १२·१·८-१२).

शारीरिक पीडा द्यावयाची झाल्यास ती अपराध्याला बंदिवासात ठेऊन, मार देऊन, त्याची फजिती करून, लोकांना माहीत होईल अशा प्रकारे शरीरावर डाग देऊन द्यावी. कोणत्या जातीच्या अपराध्याला कोणत्या भागावर डाग द्यावा ह्याविषयी नियम असत. ब्राह्मणाला कोणत्याही अपराधाबद्दल देहान्ताची अथवा शारीरिक शिक्षा देऊ नये, परतु ज्या अपराधाबद्दल देहान्ताची शिक्षा असते अशा अपराधांबद्दल त्याच्या मस्तकांचे मुंडन करावे अथवा त्याला हद्दपार करावे, कपाळावर डाग द्यावा, गाढवावर बसवून धिंड काढावी. ब्राह्मणांना गुप्त ठिकाणी बंदिवासात ठेवावे, जेमतेम पुरेल इतके अन्न द्यावे, अथवा गाई राखण्याचे काम सांगावे अथवा सदाचरणी मनुष्याला अयोग्य असे काम सांगावे. (गौत. १२·४३, कौटि ४·८). असेच यमाने (स्मृ. चं. २ पा. ३१७) सांगितले आहे. ब्राह्मणाला काही घोर अपराधांबद्दल देहान्ताची शिक्षाही काहींनी सांगितली आहे. मृच्छकटिक नाटकात चारुदत्त ह्या ब्राह्मणाला देहान्ताची शिक्षा सांगण्यांत आली होती.

देहान्ताची शिक्षा विष देऊन, हत्तीच्या पायाखाली तुडवून, तलवारीसारख्या शस्त्राने, अथवा जाळून, पाण्यात बुडवून, सुळावर चढवून, अशा निरनिराळ्या प्रकारांनी देण्यात येत असे. (मानसोल्लास २·२० पा १४४). व्यभिचाराबद्दल अपराधी ठरलेल्या स्त्रीला उघड्या जागेत कुत्र्यांकडून खावविण्याची शिक्षा द्यावी असे सांगितले आहे. स्वतःच्या भ्रताराचा वध करण्यासारखे घोर अपराध करणाऱ्या स्त्रीला नाक, ओठ, कान आणि हात तोडून बैलांच्या शिगांनी फाडविण्याची शिक्षा सांगितली आहे. (याज्ञ. २·२७९).

सर्व संपत्ती जप्त करण्याची शिक्षा अनेक अपराधांच्या बाबतीत दिली जात असे. तथापि शिल्पकारांच्या धंद्यात लागणारी हत्यारे त्यांच्यापासून हिरावून घेत नसत. (नारद. प्रकी. १०।११).

बंदिशाळा कशी असावी ह्याविषयी नियम सांगितले आहेत. (कौटि. २·५). बंदिशाळेत पुरुषांकरिता आणि स्त्रियांकरिता पृथक् दालने असावी, दारावर चांगला पहारा असावा, बंदिवानांना सोसावे लागणारे दुःख आणि त्यांची दुःस्थिती सर्व लोकांना रस्त्यावरून दृष्टीस पडू शकावी. राज्यारोहणासारख्या काही विशिष्ट प्रसंगी आणि काही परिस्थितींत निरनिराळ्या बंदिवानांना सोडून देण्यात येई आणि देहान्ताची शिक्षा रद्द करण्यात येई. दानशूर लोकांनी बंदिवानांकरिता दंड भरल्यास अथवा हमी दिल्यास त्यांना सोडण्यात येई.

महापातक केल्याबद्दल दंडाच्या रूपाने अथवा जप्त करून घेतलेली संपत्ती राजाने स्वतः उपभोगू नये कारण तसे केल्यास त्याला ते पातक लागते. अशी संपत्ती वरुणाला अर्पण करण्याकरिता पाण्यात टाकावी. कारण वरुणाची सत्ता राजावर असते, अथवा ती विद्वान आणि सद्‌गुणी ब्राह्मणांना दान द्यावी, कारण ब्राह्मण सर्व जगाचे अधिपती असतात. (मनु. ९·२४३–४५).

अनुक्रमणिका

कर्जाच्या वसुली व्यतिरिक्त इतर कोणत्याही कामाकरिता कोणीही अपराध्यास परस्पर शासन करू नये असा सर्वसाधारण नियम असे. (नारद. पारुष्य ११।१४). तथापि काही प्रसंगी अपराध्याला तेथच्या तेथे शासन करता येत असे आणि तसे करणे अपराध केल्यासारखे धरले जात नसे. राजाला अशा लोकांना फटक्यांसारखी शारीरिक शिक्षा देण्याचा अधिकार असतो परंतु राजाने त्यांना दंड करू नये असे सांगितले आहे.

आध्यात्मिक दृष्टीने ऋण घेणारा रिणकोच नव्हे तर त्याचे पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र हे देखील घेतलेले ऋण फेडण्यास जबाबदार असल्यामुळे ऋण फेडण्याच्या बाबतीत मुदतीसंबंधी नियमांना स्मृतींत आणि निबंध ग्रंथांत फारसे महत्त्व देण्यात आलेले नाही. आपला हक्क बजावण्यास एकाद्याला विलंब लागला एवढ्याच कारणाने त्याचा न्याय्य हक्क नाहीसा करण्याकडे स्मृतींची आणि धर्मशास्त्राची प्रवृत्ती नसे. तथापि काही तुरळक ग्रंथकार ऐहिक प्रवृत्तीचे असत आणि त्यांनी मुदतीसंबंधी काही नियम केले आहेत. उदाहरणार्थ, एकाद्या मिळकतीच्या मालकाच्या समक्ष आणि त्याने हरकत न करता दुसऱ्या कोणी त्या मिळकतीचा उपभोग घेतला तर १० वर्षांनंतर मूळ मालकाचा हक्क नष्ट होतो. (मनु. ८·१४८). ह्या नियमाला अनेक अपवाद सांगितले आहेत. लेखांच्या बाबतीत ही ते किती मुदतीनंतर आणि कोणत्या परिस्थितीत अनिवार्य होतात (नाकबूल करता येत नाहीत) ह्याबद्दल नियम आहेत. (कात्या. २९८—३०१).

न्यायदानपद्धतीविषयी येथपर्यंत केलेल्या विवेचनापासून पूर्वग्रहदूषित नसणाऱ्या कोणाचीही खात्री होईल की धर्मशास्त्रांनी अनेक शतकांच्या अवधीत फार उच्च दर्जाची अशी न्यायदानाची देशी पद्धती बनविली होती. ह्या कायद्यांच्या बाबतीत नारद, बृहस्पती आणि कात्यायन ह्यांचे ग्रंथ सर्वोच्च दर्जाचे आहेत. हे ग्रंथ इ. स. ६०० च्या पूर्वी होऊन गेले आणि पहिले दोघे तर त्याच्याही अनेक शतके पूर्वी होऊन गेले असावे. त्या ग्रंथांत वर्णन केलेली न्यायदानाची पद्धती कोणत्याही पाश्चिमात्य देशात इ. स. च्या १८ व्या शतकापूर्वी अस्तित्वात असलेल्या कोणत्याही न्यायदानाच्या पद्धतीपेक्षा फारच सरस होती.

—————

अनुक्रमणिका

# प्रकरण ७५

# करार

(मू. ग्रं. पा. ३.४११-४६१)

**ऋणादान** (कर्जाची वसूली), **स्त्रीपुंसयोग** (पति पत्नी ह्यांचा संबंध) आणि **दायभाग** (संपत्तीची वाटणी) ही तीन व्यवहारपदेच आधुनिक काळच्या हिंदूंच्या दृष्टीने महत्त्वाची आहेत, कारण आधुनिक काळातील हिंदूंना ह्याबाबतीत अजूनही बऱ्याच अंशी प्राचीन हिंदुधर्मशास्त्रातील नियम आणि टीकाकारांनी त्या नियमांचा केलेला अर्थ हे लागतात. म्हणून ह्या तीन व्यवहारपदांचे अधिक विवेचन करणे अवश्य आहे. त्यांच्यापैकी ऋणादान ह्या विषयाचे विवेचन प्रस्तुत प्रकरणात करावयाचे आहे. बहुतेक सर्व स्मृतींत आणि निबंध ग्रंथांत हाच विषय प्रथम विचाराला घेतलेला असतो. बऱ्याच व्यवहारपदांचा निरनिराळ्या प्रकारांनी कराराच्या कायद्यांशी संबंध येतो.

आमच्या धर्मशास्त्रावरील ग्रंथांत करारासंबंधी सर्व व्यवहारांना लागू पडतील असे सर्वसाधारण नियम एके ठिकाणी घालून दिलेले नसतात तर निरनिराळ्या व्यवहार पदांच्या विवेचनाच्या ओघात असे नियम आलेले असतात. उदाहरणार्थ, जमिनीची विक्री आणि अदलाबदल ह्यासंबंधीचे नियम अस्वामीविक्रय आणि सीमावाद ह्या व्यवहारपदांच्या विवेचनात आणि गहाणासंबंधीचे नियम ऋणादान ह्या व्यवहारपदाच्या विवेचनामध्ये दिलेले असतात. तीच पद्धती प्रस्तुत ग्रंथामध्येही स्वीकारणे अवश्य आहे कारण त्यामुळे प्राचीन काळचा कायदा कसा होता हे दिसून येईल.

कोणकोणत्या व्यक्तींना व्यवहार करता येतो ह्याविषयी प्राचीन ग्रंथकारांनी (कौटि. ३·१ प्रभृति) केलेल्या चर्चेचा सारांश असा आहे की दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्ती, वयात न आलेल्या व्यक्ती, अतिवृद्ध लोक, पतित, संन्यासी, अपंग, व्यसनाधीन इत्यादी लोक व्यवहार करण्यास अपात्र असतात आणि अशा व्यक्तींनी केलेले करार निरुपयोगी ठरतात. स्त्रिया करार करण्यास अपात्र असतात अशी अनेक शास्त्रवचने आहेत. त्यांचा अर्थ स्त्रियांना त्यांच्या पतीवर अथवा कुटुंबावर बंधनकारक होतील असे अथवा कुटुंबाच्या मिळकतीसंबंधी करार करता येत नाही असा आहे. स्त्रियांना त्यांच्या स्वतःच्या स्वतंत्र मिळकती संबंधी करार करण्यास स्वाभाविक अपात्रता नसते परंतु त्या कामी त्यांच्या पतींना काही थोडा अधिकार असतो. (कात्या. ४९७). दुसऱ्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्तींच्या बाबतीत त्या व्यक्ती ज्यांच्यावर अवलंबून असतात त्यांनी अधिकार दिला असला तरच त्यांना कायदेशीर बंधनकारक करार करता येतो.

बलात्काराने अथवा लबाडीने केलेले करार अथवा शत्रूबरोबर केलेले करार बेकायदेशीर ठरवावे. (याज्ञ. २·३१।३२, मनु. ८·१६५ आणि १६८).

**ऋणादान.** आपण केलेले ऋण आपण फेडले पाहिजे ही भावना ऋग्वेदाच्या (ऋ. ८·४७·१७ इ०) काळापासून भारतात बद्धमूल झालेली होती. मनुष्यांना देवांचे, ऋषींचे आणि पितरांचे ऋण असते आणि ह्या तीन ऋणांची फेड अनुक्रमे देवांची पूजा (यज्ञ) करून, वेदाध्ययन करून आणि पुत्रांची उत्पत्ती करून मात्र करता येते असे समजत. असत. (तै. सं. ६·३·१०·५). ह्या तीन ऋणांच्या जोडीला पुढे मनुष्याचे [ऋणमुन्मुच्य

देवानामृषीणां च तथैव च । पितृणामथ विप्राणामतिथीनां च पञ्चमम् ॥ अनुशासन ३७—१७.] ऋण, अतिथींचे ऋण अशी आणखीही ऋणे घालण्यात आली. (आदि. १२०·१७-२०; अनु. १३७-१७.).

ऋणांच्या बरोबरच त्याच्यावर घेण्यात येणाऱ्या व्याजाची कल्पनाही ऋग्वेदामध्ये (८·६६·१०) आढळते. मूळ दिलेल्या रकमेबद्दल आणि तिच्यावर (कबूल केलेला) लाभ म्हणून जी रक्कम दिली जाते तिला **कुसौद** (व्याज) असे म्हणतात आणि हा व्यवसाय करून उपजीविका करणाऱ्यांना **कुसीदिन्** असे म्हणतात असे नारदाने (४·९८) सांगितले आहे. जितके ऋण दिले असेल त्याच्या दुप्पट परत घेण्याचा सावकार करार करीत असावेत असे त्या संबंधीच्या उल्लेखांवरून अनुमान निघते. धर्मसूत्रात आणि स्मृतिग्रंथांत 'व्याजाने कर्ज देणे' ह्या अर्थी 'कुसीद' हा शब्द वारण्यात येतो. दिलेल्या ऋणाच्या दुप्पट अथवा तिप्पट रक्कम घेणाऱ्यांना द्वैगुणिक आणि त्रैगुणिक अशा संज्ञा होत्या आणि ते शब्द 'निषिद्ध मानलेल्या पद्धतीने'. व्याजबट्टा करणाऱ्या लोकांना लावण्यात येत. दिलेल्या धान्यावर गल्ल्याच्या रूपात जे व्याज घेण्यात येते त्याला 'वार्धुष' असे म्हणतात. (नारद ४·११०). कुसीदिन् हा ब्रह्महत्या करणाऱ्या पेक्षाही अधिक पातकी असतो असे एका श्लोकात म्हटले आहे. (वसिष्ठ २·४१).

ऋणादान (कर्जाची वसूली) ह्या व्यवहारपदात पुढील सात प्रमुख मुद्यांचा समावेश होतो असे नारदाने (४·१) म्हटले आहे : कोणते ऋण फेडावे आणि कोणते फेडू नये, अशी ऋणे कोणी, कोठे आणि कशी फेडावी आणि कर्ज देण्याघेण्यासंबंधी नियम. ह्या सातांपैकी पहिल्या पाच मुद्यांचा संबंध रिणकोशी असून शेवटल्या दोन मुद्यांचा धनकोशी संबंध असतो.

काही स्मृतींनी व्याजाचे चार प्रकार असल्याचे सांगितले आहे तर काहींनी पाच अथवा सहा सांगितले आहेत. उदाहरणार्थ, जे व्याज रिणकोने स्वतः कबूल केलेले असते ते **कारित**, ज्या व्याजावर व्याज आकारण्यात येते ते **चक्रवृद्धि** (चक्रवाढ), ज्या व्यवहारात व्याजाऐवजी तारण अथवा गहाण ठेवलेल्या वस्तूचा संपूर्ण उपभोग घ्यावयाचा असतो ते '**अधिभोग**'. (नारद ४·१०२।१०४; मनु ८·१५३; गौत. १२·३१।३४).

सर्व जातींच्या रिणकोंनी सर्व जातींच्या सावकारांना परस्पर मान्यतेने ठरलेले व्याज द्यावे असा सर्वसाधारण नियम असे. (याज्ञ. २·३८). तथापि स्मृतींनी निरनिराळ्या परिस्थितीप्रमाणे निरनिराळे व्याजाचे दर सांगितले आहेत आणि स्मृतींनी सांगितलेल्या दरांपेक्षा अधिक व्याज असेल तर ते परस्परांच्या संमतीने ठरले असले तरी घेऊ नये अथवा एक वर्षापेक्षा अधिक काळपर्यंत घेऊ नये अथवा चक्रवाढ व्याज घेऊ नये, मुदलाच्या दुपटीहून अधिक व्याज घेऊ नये. (मनु. ८·१५३).

कर्ज दिलेल्या रकमेचा १/८० वा अंश दर महिन्याला व्याज म्हणून घेणे हे योग्य असल्याचे स्मृतीत सांगितले आहे. (वृद्धहारीत ७·२३५). ह्या दराने कर्जाची रक्कम ६ वर्षे आणि ८ महिन्यांनी दुप्पट होते. ह्या सर्वसाधारण नियमाला अनेक अपवाद सांगितले आहेत. उदाहरणार्थ, असे दुप्पट व्याज ज्यावेळी कर्जाच्या सुरक्षिततेसाठी तारण घेतलेले नसेल तेव्हा घ्यावे. रिणकोच्या वर्णाला अनुसरून व्याजाचे दर दरमहा दरशेकडा २, ३, ४ अथवा ५ असत. (याज्ञ. २·३७). केवळ जामीनच दिला असला तर १/६० व्या अंशाइतका व्याजाचा दर असावा, रिणकोच्या व्यक्तिशः जबाबदारीवर कर्ज दिले असेल तर दरमहा दर शेकडा २ ह्या दराने व्याज आकारावे. सावकाराने बळजोरीने अधिक व्याजाचा दर लादला असेल तर न्यायालयांनी कर्ज वसूल करून देऊ नये. (कात्या. ४९८). जे सावकार जबर व्याज घेतील ते नरकात

पडतील. रिणको ज्या प्रकारचा व्यापार करीत असेल त्याला अनुसरून मुद्दल नष्ट होण्याचा धोका वाढत असतो आणि म्हणून रानातून जाणाऱ्या वाटेने अथवा समुद्रमार्गे व्यापार करणाऱ्यांनी दरमहा दरशेकडा अनुक्रमे १० आणि २० व्याज दिले पाहिजे असे याज्ञ० ने (२·३८) सांगितले आहे. जे कोणी ह्यापेक्षा अधिक व्याज आकारतील अथवा जे रिणको धनकोना तसे करण्यास प्रवृत्त करतील त्यांना **प्रथम** साहसाचा दंड करावा असे कौटिल्याने (३·११) सांगितले आहे.

एकाच वेळी जास्तीत जास्त मूळ कर्जाच्या दुपटीहून अधिक वसूल करता येत नाही ह्या नियमाला स्मृतिग्रंथांत **द्वैगुण्याचा** नियम म्हणतात. (कौटि ३·११). ह्यालाच आधुनिक काळात 'दामदुप्पटीचा नियम' असे नाव आहे. ह्या सामान्य नियमाला अनेक अपवाद सांगितले आहेत. कर्ज ज्याला दिले असेल त्याच्यापुढील तीन पिढ्यांतील वंशजांकडून ते वसूल करता येत असल्यामुळे कर्जावरील व्याज वाढत राहू देण्याचा मोठा मोह सावकारांना उत्पन्न होई. ह्याच कारणाकरिता व्याजबट्ट्याच्या व्यवसायाचा आणि व्याजाची रक्कम वाढण्याकरिता दीर्घ काळपर्यंत वाट पहात राहण्याचा ऋषींनी निषेध केला होता आणि द्वैगुण्याचा नियम घातला होता आणि ह्या नियमाने सावकारांच्या आधाशीपणाला मोठाच आळा पडला परंतु त्या नियमात पुढे दुरुस्त्या करण्यात आल्या. उदाहरणार्थ, व्याज प्रत्येक दिवशी, महिन्याला, अथवा वर्षाला मिळत गेले असेल तर आणि सर्व व्याज एक रकमी एकाच वेळी मागितले नसेल तर सावकाराला मिळालेले एकूण व्याज मूळ कर्जाच्या किती पट झाले तरी प्रत्यवाय नसतो; गहाण अथवा तारण दिले असेल तर मुद्दल परत दिले नसेल तोपर्यंत त्या मिळकतीच्या उत्पन्नाचा लाभ घेण्यास प्रत्यवाय नसतो; काही काळपर्यंत व्याज वाढल्यानंतर त्या रिणकोबरोबर नवा करार करून मूळ मुद्दल, आणि त्यावरील व्याज मिळून झालेली रक्कम मुद्दल धरून त्या रकमेवर व्याज देण्याचे ठरले तर सावकाराला एकूण कितीही व्याज मिळाले तरी चालेल. इ०

कर्ज केव्हा परत करावे ह्याबद्दल कालमर्यादा ठरली नसली आणि मुदलाइतके व्याज झाल्यामुळे व्याज बंद झाले असले तर धनकोने मागणी केल्याबरोबर कर्ज परत केले पाहिजे. (बृहस्प पौध. ग्रं. ३३ पा. ३२८). दामदुप्पटीच्या नियमाहून दुसऱ्याही काही कारणांनी कर्जाच्या रकमेवर व्याज बंद होत असते. रिणको कर्जाची रक्कम सावकाराला देऊ करीत असून देखील सावकाराने घेण्याचे नाकबूल केले आणि रिणकोने ती रक्कम एकाद्या तिऱ्हाइताजवळ ठेव म्हणून ठेवली तर त्या रकमेवर व्याज बंद होते. (गौत १२-३०). व्याज देण्याबद्दल स्पष्ट करार नसेल तर मालाच्या किंमतीवर, नोकरांच्या वेतनावर, दंड केलेल्या रकमेवर, जुगारीसाठी देऊ केलेल्या रकमेवर, व्याज पडत नाही. मित्रत्वाच्या नात्याने उसन्या दिलेल्या रकमेवर व्याजाचा स्पष्ट करार नसला तर व्याज पडत नाही. (नारद २·३९). तथापि तसा स्पष्ट करार नसला तरी सहा महिन्यानंतर अशा उसन्या दिलेल्या रकमेवर व्याज चालू होते. (नारद ४·१०८).

कर्ज दिलेल्या रकमेच्या सुरक्षिततेसाठी जी जंगम मिळकत तारण ठेवलेली असते अथवा जी स्थावर मिळकत गहाण ठेविलेली असते तिला **आधि** म्हणतात. आधीचे अनेक पोटभेद सांगितले आहेत. उदाहणार्थ, ज्या मिळकतीचे उत्पन्न धनकोने अंशतः व्याजाऐवजी आणि अंशतः मुदलाच्या पोटी घ्यावे असा करार असतो त्याला **सप्रत्यय-भोग्य** आधी म्हणतात. ज्या गहाण मिळकतीचे उत्पन्न फक्त व्याजापोटी घेण्यात येते त्याला **अप्रत्यय-भोग्य** आधी म्हणतात. सप्रत्यय आधीच्या बाबतीत हिशोब केल्यावर धनकोला उत्पन्नातून व्याज आणि मुद्दल ह्यांच्यापेक्षा अधिक पोच झाल्याचे आढळले तर धनकोने अशी अधिक रक्कम रिणकोला परत दिली पाहिजे आणि जर मुदलाचा फक्त काही अंशच फिटला असला तर रिणकोने

उरलेला अंश [यत्तु तत्राधिकं वृद्धेर्देयं तदृणिने पुनः । हीनं यावत्तु तद् वृद्धे तावत्सम्पूरयेदृणी ॥ (भरद्वाज सरस्वती विलास, पा. २३३-२३४.)] धनकोला दिला पाहिजे. (भरद्वाज. सरस्व. वि. पा. २३३-३४).

एकाद्या मनुष्याला अनेक कर्जे असली आणि त्यांपैकी काहींच्या फेडीकरिता तारण अथवा गहाण लावून दिलेले असले आणि काही कर्जे व्यक्तिशः जबाबदारीवर काढलेली असली तर व्यक्तिशः जबाबदारीवर घेतलेली कर्जे प्रथम फेडली पाहिजेत आणि गहाण मिळकत सोडविण्याचा हुकूम त्यानंतर केला पाहिजे. (भरद्वाज-व्य.निर्ण.पा. २४५). कर्जासंबंधी अथवा दुसऱ्या एकाद्या कायदेशीर कामाकरिता केलेल्या व्यवहारात कालानुक्रमाने शेवटी केलेला व्यवहार निर्णायक ठरतो, परंतु दान, तारण अथवा खरेदी ह्यांच्या बाबतीत उलट क्रमाने म्हणजे मागाहून केलेल्या व्यवहाराच्यापेक्षा त्याच्यापूर्वी केलेले व्यवहार अधिक प्रभावी असतात. तारण, दान आणि विक्री हे व्यवहार लेख लिहून केलेले असले तर ते निव्वळ साक्षीदाराच्या समक्ष केलेल्या व्यवहारांपेक्षा अथिक प्रभावी असतात. (कात्या ५१८) एकच शेत अथवा काही वस्तु दोन मनुष्यांना पृथकपणे गहाण अथवा तारण दिली असली तर त्यांच्यापैकी ज्या मनुष्याला (बळजोरी न करता) पहिल्याने ताबा मिळेल त्याला अग्राधिकार प्राप्त होतो. (विष्णु ध.सू. ५·१८५).

तारण लावून दिलेल्या वस्तूची योग्य काळजी घेणे हे तारण घेणाऱ्याचे कर्तव्य असते. (याज्ञ २·६० वरील मिता). अशा वस्तूचा नाश झाला तर धनकोचा व्याज मिळण्याचा हक्क नष्ट होतो. गोप्य म्हणजे नुसते ठेवावयाच्या तारण वस्तूचा धनकोने उपभोग घेतला तर कर्जावरील व्याज बंद होते आणि ती वस्तु नष्ट झाली अथवा उपभोगामुळे तिची किंमत कमी झाली तर धनकोला ती पूर्ववत् करून द्यावी लागते आणि तसे न केले तर मूळच्या कर्जावरील हक्कही नाहीसा होतो. (याज्ञ. २·५९).

जेव्हा धनको अत्यंत प्रामाणिक असल्याचे प्रसिद्ध असल्यामुळे रिणको अल्प किंमतीच्या ऋणाच्या संरक्षणार्थ फार मोठ्या किंमतीची मिळकत तारण अथवा गहाण देतो अथवा रिणको अत्यंत प्रामाणिक असल्याचे प्रसिद्ध असल्यामुळे मोठ्या रकमेच्या कर्जाच्या संरक्षणार्थ अल्प किंमतीची मिळकत धनको स्वीकारतो त्यावेळी त्या आधीला **चरित्रबंधक** आधि म्हणतात. (याज्ञ. २·६१). अशा प्रकारच्या आधीवरील मालकी हक्क केव्हाही नष्ट होत नाही आणि राजाने फक्त मूळ दिलेल्या कर्जाच्या दुप्पट रक्कम धनकोला देववावी.

**प्रतिभू** (जामीन). जामीनगतीला धनको, रिणको आणि धनकोला विश्वास उत्पन्न करण्याकरिता जो इसम रिणकोने देणे न दिल्यास ते देण्याचे कबूल करतो अथवा हमी घेतो तो इसम अशा तिघांची संमती अवश्य असते. हजर राहण्याबद्दल, कर्ज देण्याबद्दल आणि प्रामाणिकपणाबद्दल असे जामीनाचे तीन प्रकार असतात असे याज्ञ. मध्ये (२·५३) सांगितले आहे. काही स्मृतींनी जामिनाचे आणखी काही प्रकार सांगितले आहेत परंतु त्या सर्वांचा अंतर्भाव ह्या तीन प्रकारात करणे शक्य आहे. ह्यासंबंधी अनेक नियम धर्मशास्त्रात सांगितले आहेत. (याज्ञ. २·५३). उदाहरणार्थ, अशा जामिनांनी नुकसान भरून देण्याची जी जबाबदारी घेतलेली असते ती त्या जामिनांवर व्यक्तिशः पडते. हजर राहण्याबद्दलची अथवा प्रामाणिकपणाबद्दल घेतलेली जबाबदारी जामीन मृत झाल्यास त्याच्या पुत्रावर पडत नाही परंतु जामीन राहण्याकरिता त्याने रिणकोकडून काही तारण घेतले असले तर त्या जामीनाच्या पुत्रांनी देखील अशा तारणामधून धनकोचे नुकसान भरून दिले पाहिजे.

अनुक्रमणिका

कर्ज वसूल करण्याचे अनेक मार्ग असतात. धनकोला ज्या कोणत्या मार्गाने आपले येणे रिणकोकडून वसूल करणे शक्य असेल त्या मार्गाने राजाने रिणकोला देण्यास लावावे. (मनू. ८·४७-४८) रिणकोने देणे अमान्य केले तर त्याच्यावर दावा घालणे एवढा एकच कर्ज वसूलीचा मार्ग शिल्लक राहतो. परंतु त्याने देणे मान्य केले तर **धर्म** (गोडीगुलाबीने मन वळविणे), **व्यवहार** (कायदेशीर तजवीज करणे), **चल** अथवा **उपधी** (लबाडीने अथवा धाकदपडशा देणे), **चरित** (दाराशी धरणे धरून बसणे) अथवा **बल** (काम करावयास लावणे अथवा अटकेत ठेवणे) असे पाच मार्ग मनूने (८·४९) आणि बृहस्पतीने (पौध.ग्रं. ३३ पा. ३२९) सांगितले आहेत. हे सर्वच मार्ग सर्वच रिणकोंच्या बाबतीत योजता येत नसत. रिणको आणि धनको ह्यांच्या दरम्यान कर्जाच्या तपशीलासंबंधी मतभेद असला तर धनकोने दाव्याव्यतिरिक्त इतर मार्गांचे अवलंबन करून रिणकोला त्रास दिला तर धनकोचा कर्ज वसूल करण्याचा हक्क नष्ट होईल आणि त्याला येणे असलेल्या रकमेइतका दंड द्यावा लागेल (कात्या. ५८९).

सर्व कर्ज एकरकमी फेडण्याचे सामर्थ्य रिणकोला नसेल त्यावेळी त्याने वेळोवेळी दिलेल्या रकमा कर्जखताच्या मागील बाजूला लिहाव्या अथवा धनकोने आपल्या सहीची पावती रिणकोला द्यावी. रिणको मागत असताही पावती दिली नाही तर धनकोचा बाकी राहिलेले कर्ज वसूल करण्याचा हक्क नष्ट होईल. (नारद ४·११४).

सर्व कर्ज परत देऊन झाल्यावर धनकोने कर्जखत फाडून टाकावे अथवा ऋणमुक्ततेचा स्वतंत्र लेख साक्षीदारांच्या समक्ष लिहून द्यावा.

कर्ज फेडण्याची जबाबदारी (मूळ कर्ज घेणाऱ्या व्यतिरिक्त) मूळ रिणकोच्या पुत्रावर आणि पौत्रावर धार्मीक कारणाने असते. प्रपितामहाने केलेल्या कर्जाबद्दल प्रपौत्र जबाबदार नसतो असे सर्व स्मृतींनी स्पष्टपणे सांगितले आहे. अशी जबाबदारी चौथ्या पुरुषापासून पुढ संपते असे काही स्मृतींत सांगितले आहे (नारद ४·४; मितायाज्ञ. २·५१) आणि चौथा पुरुष कोणापासून मोजावा ह्या प्रश्नाबद्दल मतवैचित्र्य आहे. ह्यासंबंधी निबंधग्रंथात केलेल्या चर्चेवरून असे निष्कर्ष निघू शकतात की एकाद्या मनुष्याने केलेले कर्ज त्याच्या पुढील तीन पिढ्यांतील वंशजांनी (पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र यांनी) जर त्यांच्यापाशी वडिलार्जित मिळकत असेल तर फेडले पाहिजे. (नारद ४·४). वडिलार्जित मिळकत वंशजांनी घेतली नसली तरीदेखील पित्याने केलेले कर्ज **व्याजासह** फेडण्याची जबाबदारी पुत्रावर असते. (विष्णु ध.सू.६·२७।२८). पितामहाने केलेले कर्ज **व्याजरहित** फेडण्याची जबाबदारी पौत्रावर असते आणि प्रपितामहाने केलेला कर्जाची **मुद्दल** रक्कम फेडण्याची जबाबदारी प्रपौत्रावर जर त्याची तसे करण्याची इच्छा नसेल तर नसते. काही विशिष्ट बेकायदेशीर आणि अनीतीच्या कारणांकरिता केलेली बापाची देखील ऋणे फेडण्यास पुत्र जबाबदार नसतो. बाप मरण पावला नसला आणि समीप असला तरी देखील त्याच्या पुत्रावर पित्याने केलेले ऋण फेडण्याची जबाबदारी (तो संन्यासी झाला, असाध्य रोगाने पीडित असला, वेडा झाला, अतिवृद्ध म्हणजे ८० वर्षाहून अधिक वृद्ध झाला अशासारख्या) काही विशिष्ट परिस्थितीत पडते. (नारद ४·१४, विष्णु ध. सू. ६·२७).अशा जबाबदारीला स्मृतींच्या आणि निबंधकारांच्या मताप्रमाणे काही मर्यादा असतात परंतु न्यायालयांतील निर्णयांनी अशा सर्व मर्यादा झुगारून दिल्या आहेत.

पुत्राला वडिलार्जित मिळकत मिळाली असली तरीदेखील त्याच्या पित्याची जी कर्जे देण्याची जबाबदारी नसते त्यांना न्यायालयांतील निर्णयांत ठोकळपणाने **'बेकायदेशीर** अथवा **अनैतिक कर्जे'** असे म्हणतात. (गौत. १२·३८). अशा कर्जांत जामीन राहण्यामुळे झालेली कर्जे, द्यूत अथवा मद्यपान,

स्त्रियांवरील अनैतिक प्रेमामुळे उद्‌भवणारी कर्जे, दंड अथवा दस्तुरी आणि व्यावहारिक नसलेली देणी, कुटुंबाच्या हिताकरिता **न** झालेली देणी, सभ्य वर्तनाचा आणि प्रतिष्ठित पुरुष ह्या नात्याने जे कर्ज बापाने करावयास नको होते अशासारख्या देण्यांचा समावेश होतो. पुत्राने काढलेले खाजगी कर्ज ते कुटुंबाच्या हिताकरिता काढलेले नसेल तर देण्याची जबाबदारी बापावर नसते, पतीने अथवा पुत्राने काढलेले अशा प्रकारचे कर्ज देण्याची जबाबदारी पत्नीवर अथवा मातेवर नसते. (याज्ञ. २·४७; नारद ४·१०।११).

एकादा मनुष्य मृत झाल्यावर त्याने केलेले कर्ज फेडण्याची जबाबदारी कोणत्या क्रमाने दुसऱ्या व्यक्तींवर पडते ह्याबद्दल नियम सांगितलेले आहेत. (याज्ञ २·५१). ज्याला मृताची संपत्ती मिळते त्याच्यावर (मग तो पुत्र असो अथवा अन्य जवळचा नातलग असो) मृताचे ऋण फेडण्याची जबाबदारी **सर्वात आधी** असते. परंतु मृताजवळ संपत्ती नसली तरी मृताच्या पत्नीचा जो स्वीकार करील त्याला मृताचे ऋण फेडले पाहिजे. मृताच्या पुत्रावर अशी जबाबदारी मृताजवळ संपत्ती नसली अथवा मृताच्या विधवेचा कोणी स्वीकार केला नसला तरी असते. अनेक पुत्र असल्यास जो वडिलार्जित संपत्तीचा स्वीकार करतो त्याने आपल्या पित्याचे ऋण फेडले पाहिजे. अशा पुत्राच्या अभावी जेव्हा काही पुत्र विवाहित आणि काही अविवाहित असतील तेव्हा विवाहित पुत्रांनी वडिलोपार्जित ऋण फेडले पाहिजे. जेव्हा कोणीही पुत्र विवाहित नसेल तेव्हा जो पत्नीहीन, अपत्यहीन असून धनहीनही असेल त्याने वडिलार्जित ऋण फेडले पाहिजे.

**ठेव**. निक्षेप, उपनिधी आणि न्यास हे शब्द समानार्थी असल्याचे अमरकोशात [पुमानुपनिधिर्न्यासः प्रतिदानं तदर्पणम् । अमरकोश.] म्हटले आहे. तथापि अनेक प्राचीन ग्रंथांत त्यांच्या व्याख्या भिन्नभिन्न प्रकारच्या दिल्या आहेत. एकाद्या पेटीसारख्या पात्रात एकादी वस्तु ठेऊन जरी ती पेटी तीत काय आहे हे न सांगता दुसऱ्याजवळ ठेव म्हणून ठेवली तर त्या ठेवीला **उपनिधी** म्हणतात. अशा पात्रात ठेवलेली वस्तु त्या मनुष्याच्या समक्ष मोजून ठेवली तर त्या ठेवीला **निक्षेप** म्हणतात आणि पेटी सारख्या पात्रात न ठेवता उघडपणे ठेवलेल्या ठेवीला **न्यास** म्हणतात. (याज्ञ. २·६५). निक्षेप अथवा उपनिधी ठेवलेल्या वस्तु आधीप्रमाणे एकाद्या ऋणाच्या संरक्षणाकरिता अथवा एकाद्या ऋणावरील व्याज देण्याकरिता नसून सुरक्षित ठेवण्याकरिता विश्वासाने ठेवलेल्या असतात. (सरस्व.वि.पा. २६५). सत्कुलोत्पन्न, सदाचारी, धर्मज्ञ, मोठे कुटुंब असलेल्या, धनसंपन्न आणि प्रामाणिक आणि सरळ वर्तनाच्या व्यक्तीजवळ ठेव ठेवावी असे मनूने (८·१७९) सांगितले आहे. ठेव ज्याच्याजवळ ठेवलेली असते त्याला त्या ठेवीपासून व्यक्तिशः काही लाभ मिळत नसतो ह्या कारणाने अशी ठेव स्वीकारणाऱ्याला सुवर्णाचे दान करणाऱ्यासारखे पुण्य लागते अशी त्याची प्रशंसा केली आहे आणि ठेवीचा अपहार करणे अथवा निष्काळजीपणाने ठेव सांडणे ह्या गोष्टी अत्यंत पापकारक असल्याचे सांगून त्यांचा निषेध केला आहे. (बृहस्प. पौ. ध. ग्रं. ३३ पा. ३३३). ठेवी स्वीकारल्याच पाहिजेत असे कोणावर बंधन नसते परंतु ठेव स्वीकारल्यावर तिचे काळजीपूर्वक जतन करणे हे त्याचे पहिले कर्तव्य असते आणि ठरलेल्या वेळी अथवा मागितल्याबरोबर अशी ठेव परत देणे हे त्याचे दुसरे कर्तव्य असते. ठेव स्वीकारणाऱ्याला त्या वस्तूवर मर्यादित अधिकार असतात. परंतु ती वस्तु विश्वासाने ठेवलेली असल्यामुळे त्याला विशेष अधिकार प्राप्त होतात. दैवी अथवा राजकीय आपत्तीने ठेवीचा नाश झाला अथवा ती चोरांनी चोरून नेली तर ती भरून देण्याची जबाबदारी ठेव स्वीकारणाऱ्यावर नसते. (मनु. ८·१८९). तथापि असा नाश खरा असला पाहिजे आणि लबाडीने घडवून आणलेला नसला पाहिजे. ठेव परत देण्यासंबंधीही काही नियम सांगितले आहेत. (नारद ५·६). उदाहरणार्थ, ठेव घेतलेला पदार्थ ज्या स्वरूपात घेतला असेल त्याच स्वरूपात परत दिला पाहिजे. ठेव ज्याने ठेवली असेल त्याच्याच स्वाधीन ती केली पाहिजे. ठेव ठेवणारा मृत झाल्यास त्याच्या अनेक वारसांपैकी कोणाला तरी ती देता उपयोगी नाही तर सर्व वारसांना अथवा सर्व वारसांच्या समक्ष दिली पाहिजे. ठेवीचा नाश ठेव

स्वीकारणाऱ्याच्या हलगर्जीपणामुळे झाला तर ठेव ठेवणाऱ्याचे नुकसान त्याला भरून द्यावे लागते. ठेव परत मागितल्याबरोबर परत दिली नाही अथवा ठेव ठेवणाऱ्याने मागणी केल्यानंतर (दैवी अथवा राजकीय सुद्धा) कोणत्याही कारणाने ठेवीचा नाश झाला तर ठेव स्वीकारणाऱ्याने ती वस्तु परत केली पाहिजे अथवा तिची किंमत दिली पाहिजे आणि त्याशिवाय राजाला तितक्याच किमतीचा दंड दिला पाहिजे. ठेव स्वीकारणाऱ्याने त्या वस्तूचा उपभोग घेतला तर राजाने ती वस्तु व्याजसहित परत करावयास लावावे आणि शिवाय त्याला दंड करावा. ठेव ठेवणाऱ्याने ठेवलेली ठेव योग्य वेळी परत घेतली पाहिजे आणि ठेव स्वीकारणाऱ्याने अयोग्य वेळी परत करण्याचे टाळले पाहिजे. नाही तर दोघेही दंडाला पात्र होतात.

निक्षेपासंबंधीचे हे नियम **दुसऱ्या काही प्रकारच्या ठेवींना** देखील लागतात. (याज्ञ. २·६७). अशा ठेवींत **याचितक** (एकाद्या समारंभाकरिता दागिन्यासारखा उसना मागून आणलेला जिन्नस), **अन्वाहित** (दुसऱ्या व्यक्तीच्या मालकीची तिऱ्हाइताजवळ तारण ठेवलेली वस्तु), **शिल्पिन्यास** (सोनाराजवळ एकादा अलंकार करण्याकरिता दिलेला सोन्यासारखा पदार्थ), **प्रतिन्यास** (परस्परांनी परस्परांजवळ ठेवलेल्या ठेवी) इत्यादी ठेवींचा समावेश होतो. याचितक म्हणजे उसना आणलेला पदार्थ ह्याच्याबाबतीत असा अपवाद सांगितला आहे की जर दुसऱ्या कोणी उसना मागून नेलेल्या जिन्नसाच्या मालकाला तो जिन्नस मागितल्याबरोबर परत न दिल्यामुळे नुकसान सोसावे लागणार असेल तर ठरलेली मुदत भरली नसली तरीही अथवा ज्या कार्याकरिता तो जिन्नस घेतला होता ते कार्य अर्धेच झाले असले तरीही उसना घेणाऱ्याला तो जिन्नस परत करावयास लावावे. शिल्पिन्यास दिलेली वस्तु शिल्पकाराच्या चुकीमुळे नाश पावली तर त्याला त्या वस्तूची किंमत भरून द्यावी लागेल.

एकाद्याजवळ ठेवलेल्या ठेवीचा अथवा वस्तूचा त्याने अपहार केला अथवा त्याच्याकडे असताना ती ठेव अथवा ती वस्तू नाश पावली तर त्या नुकसानीला त्या मनुष्याचा पुत्र, पौत्र अथवा प्रपौत्र जबाबदार होत नाहीत. (गौ. १२·३९).

ठेवलेल्या ठेवीचा नाश झाल्यास ती भरून देण्याची जबाबदारी जशी ठेव स्वीकारणाऱ्यावर असते तशी जबाबदारी एकाद्या पुष्कळ धन असणाऱ्या **अज्ञान व्यक्तीचा ताबा घेणाऱ्यावर** असते. म्हणजे जो मनुष्य अज्ञान व्यक्तीच्या मिळकतीची पालक ह्या नात्याने जबाबदारी पत्करील त्याने त्या मिळकतीची स्वतःच्या मिळकतीसारखीच काळजी घेतली पाहिजे आणि ठेव स्वीकारणाऱ्यावर ज्या परिस्थितीत ठेवीच्या नाशाबद्दल जबाबदारी येते त्याच परिस्थितीत अशा पालकावर अज्ञानाच्या मिळकतीच्या नाशाबद्दल जबाबदारी येते. (नारद. ५·१५).

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ७६

## अस्वामीविक्रय (मालक नसणाऱ्याने केलेली विक्री)

(मू.ग्रं.पा. ३.४६२-४६५)

जेव्हा एकादा मनुष्य आपल्यापाशी असलेली उघड ठेव (निक्षेप), मोहरबंद ठेवलेली ठेव (उपनिधी), दुसऱ्या इसमाला देण्याकरिता दिलेली वस्तु, चोरून आणलेली वस्तू, एकाद्या प्रसंगाकरिता उसनी आणलेली वस्तु, तारण ठेवलेली मिळकत, कोणाची सांडलेली आणि ह्या मनुष्याला सापडलेली वस्तु ह्यांची गुप्त रीतीने (अथवा मूळ मालकाच्या अपरोक्ष) विक्री करतो तेव्हा ती विक्री **अस्वामीविक्रय** म्हणजे मालक नसणाऱ्याने केलेली विक्री समजली जाते असे नारद (७·१) आणि बृहस्पती यांनी सांगितले आहे. ह्या वचनातील ‘विक्री’ हा शब्द उदाहरणार्थ असून त्यात दान देणे, बक्षिस देणे आणि गहाण देणे ह्यांचाही अंतर्भाव होतो. अशा वस्तूची विक्री जरी उघडपणे केली असली तरी त्या विक्रीच्या परिणामात फरक पडत नाही.

एकाद्या वस्तूचा मालक नसणाऱ्याने केलेली त्या वस्तूची विक्री, दान, अथवा गहाण हे व्यवहार राजाने अथवा न्यायाधिशाने रद्द करावे. (कात्या ६१२). मालक नसणाऱ्याजवळून ज्याने अशी वस्तु विकत घेतली असेल त्याच्याकडून ती मूळ मालकाला मिळविता येते. (नारद ७·२). विकत घेणाऱ्याने अशी वस्तु उघड बाजारात विकत घेतली नसेल तर तो शिक्षेला पात्र होतो. (नारद ७·३). त्याने जर अशी वस्तु ज्याला अशी वस्तु बाळगिण्याचे सामर्थ्य नाही अशा मनुष्यापासून, अथवा अति अल्प किंमतीला अथवा रात्रीसारख्या अवेळी, अथवा दुर्वर्तनी लोकांपासून विकत घेतली असेल तर त्याला चोरासारखी शिक्षा करावी. अशी विक्री लबाडीने केलेली विक्री असते. अनेक लोकांच्या समक्ष, योग्य किंमत देऊन एकादी वस्तू विकत घेण्याने लबाडीचा हेतु नसल्याचे सिद्ध होते आणि त्यावरून त्याने ती वस्तु सद्‍भावनेने विकत घेतली असल्याचे अनुमान निघते. अशा खरेदीदाराला जरी ती वस्तु मूळ मालकाला त्याने आपला हक्क सिद्ध केल्यावर द्यावी लागली तरीही त्याच्यावर कोणताही दोष येत नाही (म्हणजे त्याला शिक्षा होत नाही) आणि जर त्याला ती वस्तु मूळ मालकाला देणे भाग पडले तर त्याला विकणाऱ्याकडून त्या वस्तूला दिलेली किंमत परत मिळविण्याचा हक्क असतो.

मालक नसणाऱ्याकडून विकत घेणाऱ्याला आपल्यावर दोष येऊ नये असे वाटत असल्यास त्याने ती वस्तु कोणाकडून आपणास मिळाली हे लपविण्याचा प्रयत्न करता कामा नये. नाही तर तो विकत घेणाराही विकणाऱ्या इतकाच चोर म्हणून शिक्षेला पात्र होईल. (नारद. ७·४). दुसऱ्या कोणाच्या मालकीची वस्तु न जाणता अथवा चुकीने कोणी विकली तर त्या बाबतीतही असेच नियम लागतात. ज्याची वस्तु सांडली आहे आणि ती वस्तु ज्याला सापडली असेल त्याच्यापासून जो हक्काने मागतो त्याला **‘नाष्टिक’** असे म्हणतात. (कौटि. ३·१६, मनु ८·२०२).

सांडलेल्या वस्तूवर जो कोणी आपला हक्क सांगतो त्याला प्रथमतः (साक्षीदार अथवा लेख ह्यांच्यासारख्या) पुराव्याने आपला हक्क आणि उपभोग सिद्ध करावा लागतो आणि आपण ती वस्तु विकली नाही अथवा दान दिली नाही अथवा टाकून दिली नाही हे सिद्ध करावे लागते. त्याने आपला हक्क सिद्ध

केल्यावर खरेदीदाराला ती वस्तु आपण प्रामाणिकपणे विकत घेतली हे सिद्ध करण्याकरिता विकणाऱ्याला हजर करावे लागते अथवा उघडपणे आणि योग्य किंमत देऊन विकत घेतली ह्याबद्दलचा पुरावा देण्यास आवाहन करण्यात येते. खरेदीदाराने असा पुरावा दिला म्हणजे तो दोषातून मुक्त होतो परंतु त्याला विकत घेतलेली वस्तु खऱ्या मालकाला द्यावी लागते. (कात्या ६१३). अस्वामीविक्रयाच्या बाबतीत कोणत्याही दैव अथवा (नातलगांच्या साक्षीखेरीज) मानवी पुराव्याची साधने योग्य मानली जात नाहीत. (कात्या.६१६). आपली वस्तु हरवली असल्याचा दावा करणाऱ्याला ती वस्तु पूर्वी आपल्याजवळ असल्याचे आणि नंतर सांडल्याचे सिद्ध करता आले नाही तर इतरांना असे खोटे दावे करण्यापासून परावृत्त करण्याकरिता चोरासारखा दंड करावा असे कात्यायनाने (६२०). म्हटले आहे.

ज्या दाव्यात पुरावा नसेल त्या दाव्यात राजाने पक्षकारांच्या शीलाचा विचार करावा आणि पक्षकारांच्या विश्वासपात्रतेला अनुसरून निर्णय करावा. (बृह. स्मृ.चं. २ पा. २१६).

ज्यावेळी एकाद्या वस्तूची खरेदी व्यापाऱ्यांच्या रांगेत आणि राजाच्या अधिकाऱ्यांना माहित असून केलेली असते परंतु ज्या मनुष्यापासून ती खरेदी केली त्याचा ठावठिकाणा माहित नसतो अथवा खरेदी केल्यानंतर विकणारा मरण पावला असेल तर त्यावेळी (अस्वामी असणाऱ्याने विकलेल्या वस्तूच्या) खऱ्या मालकाने खरेदीदाराला अर्धी किंमत दिल्यावर त्याला आपली वस्तु परत मिळेल. (कात्या. ६२१।६२३).न्यायदानाच्या नियमाप्रमाणे अशा परिस्थितीत असे करणे अवश्य आहे. कारण (ज्याचा ठावठिकाणा माहित नाही अशा) अपरिचित मनुष्यापासून माल खरेदी करणे

हा खरेदीदाराचा दोष असतो आणि (आपल्या वस्तूची) योग्य काळजी न घेणे हा खऱ्या मालकाचा दोष असतो.

जेव्हा एकाद्या वस्तूच्या खऱ्या मालकाला आपली सांडलेली वस्तु एकाद्या तिऱ्हाइताच्या हातात असलेली आढळेल तेव्हा त्याने त्या मनुष्याला राजाच्या अधिकाऱ्याकरवी अटक करवावी परंतु अशा अधिकाऱ्याकडे जाण्यास फार वेळ मोडेल आणि तोपर्यंत तो तिऱ्हाइत इसम दूर जाईल असे वाटले तर त्या वस्तूच्या मालकाने वाटल्यास त्या इसमास स्वतः पकडावे आणि न्यायालयापुढे आणावे. अशी वस्तु विकत घेणाऱ्याने वस्तु विकणाऱ्याला अटक करावी आणि वस्तु विकणारा मृत झाला असेल तर विकत घेणाऱ्याने ती वस्तु खऱ्या मालकाच्या स्वाधीन करावी. (कौटि. ३·१६).

_____

अनुक्रमणिका

**प्रकरण ७७**

## संभूय समुत्थान (एकत्र रीतीने केलेला व्यवसाय, भागीदारी)

(मू.ग्रं.पा. ३.४६६-४७०)

ज्यावेळी व्यापारी अथवा (नट, गायक अथवा शिल्पकार ह्यांच्यासारखे) इतर लोक एकादा व्यवसाय एकत्र रीतीने चालवितात तेव्हा त्यास **संभूय समुत्थान** (भागीदारी) म्हणतात. (नारद ६·१). प्राचीन धर्मसूत्रांत भागीदारीविषयी काहीही सांगितले नाही. ह्यावरून असे दिसते की प्राचीन धर्मसूत्रांच्या काळी लौकिक कार्याकरिता करावयाच्या भागीदाराला फारसे महत्त्व प्राप्त झाले नव्हते आणि मनुस्मृतीच्या काळात देखील जवळजवळ तशीच स्थिती होती. यज्ञात वाटावयाच्या दक्षिणेसंबंधी नियम मनूने (८.२०६-२१०) सांगितले आहेत आणि तेच नियम लौकिक हेतूने केलेल्या भागीदारीला लागू केले आहेत. (मनु. ८·२११). याज्ञवल्क्य स्मृतीमध्ये (२·२६५) व्यापारी लोकांच्या भागीदारीसंबंधीचे नियम यज्ञातील ऋत्विजांना, शेतकऱ्यांना, (सुतार, नर्तक इ०) शिल्पकारांना लागतात असे सांगितले आहे. ह्यावरून असे दिसते की फार मोठ्या संख्येचे ऋत्विज लागणारे गुंतागुंतीचे यज्ञ याज्ञवल्क्य स्मृतीच्या काळी फारच क्वचित होऊ लागले होते आणि व्यापाऱ्यांच्या आणि शिल्पकारांच्या भागीदाऱ्यांना मोठे महत्त्व प्राप्त झाले होते.

भागीदार कसे असावेत ह्याविषयी बृहस्पतीने (स्मृ.चं. २ पा. १८४) सांगितले आहे की चांगल्या कुलातील हुशार, तत्पर, बुद्धिमान (अथवा सुविद्य), जमाखर्चात कुशल, प्रामाणिक आणि शूर (साहसी) अशा मनुष्यांबरोबर एकत्र व्यवसाय करावा आणि विचारी शाहाण्या मनुष्यांनी अशक्त, आळशी, रोगग्रस्त, अपयशी, कफल्लक अशा भागीदारांबरोबर व्यापारासारखे एकत्र व्यवसाय करू नयेत. अर्थात हे सर्वही गुण सर्वही भागीदारांत असलेच पाहिजेत असे नसून ज्या स्वरूपाचा व्यवसाय असेल त्याला अनुसरून ह्या गुणांपैकी काही गुण अत्यंत आवश्यक असतात.

अशा भागीदारांचा प्रत्येकाचा नफा, तोटा अथवा त्याने करावयाचे काम त्याने घातलेल्या भांडवलाच्या प्रमाणांत असते. (नारद ६·२-३). खरेदी विक्रीच्या कामात इतर भागीदार हजर नसले तरी त्यांच्याशी प्रामाणिकपणाने वागणे हे प्रत्येक भागीदाराचे कर्तव्य असते. एका भागीदाराने इतरांच्या अनुमतीने जी मिळकत दुसयाला दिली अथवा एकादा लेख लिहून दिला अथवा व्यवहार केला तर ती सर्व कृत्ये सर्व भागीदारांनी केल्याचे धरण्यात यावे. (बृह.पौ.ध.ग्रं.३३ पा. ३३७).

भागीदारीत संशय उत्पन्न झाला अथवा लबाडी झाली तर अशा गोष्टीचा निर्णय भागीदारांनीच करावयाचा असतो आणि तो निर्णय इतर भागीदारांनी मान्य केला पाहिजे असाच भागीदारीच्या कराराचा संकेत असतो. (बृह. पौ.ध. ग्रं.पा.३३ पा. ३३७). कोणी भागीदाराने इतर भागीदारांना फसविल्याचा आरोप आल्यास त्याने आपल्यावरील आरोपाचे निराकरण विशिष्ट शपथा घेऊन अथवा दिव्य करून केले पाहिजे. कपटी अथवा लबाड भागीदाराला धंद्यातील नफा न देता काढून टाकावे. (याज्ञ. २·२६५).

आपल्या हलगर्जीपणाने अथवा इतरांनी अधिकार दिला नसता अथवा संमती दिली नसता केलेल्या कामामुळे इतर भागीदारांचे होणारे नुकसान भरून देण्याची जबाबदारी प्रत्येक भागीदारावर असते. (याज्ञ.

२·२६०). एकाद्या भागीदाराने भागीदारीच्या मिळकतीचे राजकीय अथवा दैवी आपत्तीपासून अथवा चोरांपासून संरक्षण केले तर त्या भागीदाराला त्याने संरक्षण केलेल्या मिळकतीचा दहावा अंश बक्षीस म्हणून द्यावा. (नारद. ६·६).

परदेशात जाऊन मृत झालेल्या भागीदाराचा हिस्सा त्याच्या पुत्र, नातलग, सपिंड ह्यांच्या सारख्या वारसांनी घ्यावा. असा कोणी वारस उपलब्ध नसेल तर तो हिस्सा इतर भागीदारांनी घ्यावा अथवा भागीदारांच्या अभावी वारस, वंशज पुढ येण्याची १० वर्षे वाट पाहून तो हिस्सा राजाने घ्यावा. (याज्ञ. २.२६४; नारद ६·७ आणि १७-१८).

अनेक शिल्पकारांनी मिळून काम केले असेल तर त्यांच्यापैकी जे अधिक कुशल असतील त्यांना त्यांच्या कुशलतेच्या प्रमाणात कमीअधिक भाग द्यावा. (कात्या. अपरार्क पा. ८३८). जो सोन्याचे, चांदीचे, सुताचे, लाकडाचे, दगडाचे अथवा चामड्याचे पदार्थ बनवितो अथवा ज्याने ६४ कलांपैकी एकाद्या कलेत नैपुण्य मिळविले असेल त्याला शिल्पी [हिरण्यरूप्यसूत्राणां काष्ठपाषाणचर्मणाम् । संस्कर्ता च कलाभिज्ञः शिल्पी चोक्तो मनीषिभिः ॥ बृह. (विवादरत्नाकर पा १२४)] असे म्हणतात. (बृह. विवाद र. पा. १५४).

शत्रूच्या राज्यात लूट करावयास पाठविलेल्या शूर आणि धाडशी लोकांच्या तुकडीला राजाने त्या लुटीचा दहावा अंश द्यावा, तुकडीच्या पुढाऱ्याला बाकीच्या लुटीत ४ भाग मिळावे आणि अनुयायांना त्यांच्या वैयक्तिक कौशल्याला अनुसरून २ अथवा १ भाग मिळावा. पकडले गेलेल्यांना सोडविण्याकरिता द्यावा लागणारा दंड सर्वांनी आपआपल्या हिश्यांप्रमाणे भरावा. (कात्या. ६३३-३५).

अशीच वाटणी करार झालेला नसेल तेव्हा व्यापारी, शेतकरी, चोर आणि शिल्पकार ह्यांच्या मिळकतीची करावी. (कात्या.परा.माध.३पा. ३१२).

यज्ञात काम करणाऱ्या ऋत्विजांना मिळणाऱ्या दक्षिणेची वाटणी त्यांच्या कामांना अनुसरून करावी. (मनु. ८·२०६-२१०). काही विशिष्ट ऋत्विजांना काही विशिष्ट दक्षिणा देण्याबद्दल शास्त्रात सांगितलेले असते. अशा विशिष्ट दक्षिणांत सर्व ऋत्विजांनी सहभागी होऊ नये. उदाहरणार्थ, अग्न्याधानामध्ये अध्वर्यूला रथ मिळतो, ब्रह्मा त्विजाला घोडा मिळतो. तसेच चार मुख्य ऋत्विजांना अर्धी दक्षिणा मिळण्याचा हक्क असतो. त्यांच्या हस्तक ऋत्विजांच्या एका गटाला मुख्य ऋत्विजांच्या अर्ध्याइतकी दक्षिणा मिळते, दुसऱ्या गटाला तिसऱ्या हिश्याइतकी आणि तिसऱ्या गटाला चौथ्या हिश्याइतकी दक्षिणा मिळते. कोणी ऋत्विजाने काम सोडून दिले तर त्याला त्याच्यासह काम करणाऱ्या ऋत्विजांनी त्या ऋत्विजाने केलेल्या कामाला अनुरूप असा फक्त दक्षिणेत हिस्सा द्यावा. दोष नसता अथवा पीडा दिली नसताना ऋत्विजाने यजमानाचा अथवा यजमानाने ऋत्विजाचा त्याग केला तर त्या दोघांनाही शासन केले पाहिजे. (नारद ६·१० इ०).

—————

अनुक्रमणिका

## प्रकरण ७८

# दत्तानपाकर्म (दिलेले दान परत घेणे)

(मू.ग्रं.पा. ३.४७१-४७५)

जेव्हा दान देणारा मनुष्य आपण दिलेले दान अयोग्य रीतीने (कायद्याच्या विरुद्ध रीतीने) दिले असल्यामुळे ते परत घेण्याची इच्छा करतो तेव्हा त्या वादाच्या मुद्याला **दत्तानपाकर्म** असे म्हणतात. (नारद ७.१). ह्याला **दत्ताप्रदानिक** (दान दिलेली वस्तू प्रत्यक्ष स्वाधीन न केल्याचा अथवा परत घेण्याचा वाद) असेही म्हणतात. ह्या वादामध्ये (१) कोणते दान देऊ नये, (२) कोणते द्यावे, (३) कोणती दाने कायदेशीर असतात आणि (४) कोणती दाने कायदेशीर नसतात असे चार प्रश्न असतात.

नारद (७·३-५) आणि बृहस्पती ह्यांच्या मते पुढील आठ वस्तू **अदेय** म्हणजे देता न येण्यासारख्या असतात. अन्वाहित, ठेव, याचितक, तारण ठेवलेली वस्तु, आपल्याबरोबर दुसऱ्याही व्यक्तींची समाईक मालकी असणारी वस्तु, पुत्र आणि पत्नी, संतती नसणाऱ्यांची संपूर्ण मिळकत, दुसऱ्या कोणाला देण्याचे अगोदरच अभिवचन दिलेली वस्तु. ह्या वस्तु **अदेय** असण्याचे कारण त्यांच्यावर देणाऱ्याची संपूर्ण मालकी नसते अथवा शास्त्रांत अशा वस्तूंचे दान निषिद्ध सांगितलेले असते हे असते.

आपले संपूर्ण स्वामीत्व ज्या वस्तूंवर असते अशा वस्तूंपैकी आपल्या कुटुंबाच्या चरितार्थाला लागतील त्या वस्तू वगळून बाकीच्या वस्तू देय असतात म्हणजे **देता येतात** असा सर्वसाधारण नियम याज्ञ. आणि बृहस्पती ह्यांनी सांगितला आहे. (याज्ञ. २·१७५). ज्यांचे पालन करण्याची एकाद्यावर जबाबदारी असते अशा व्यक्तींना तीन वर्षे पुरेल इतकी संपत्ती ज्याच्यापाशी असेल अथवा त्यापेक्षाही अधिक संपत्ती ज्याच्यापाशी असेल त्यानेच फक्त सोमयाग (फार खर्चाचा असलेला याग) करावा असे मनु. (११·७) प्रभृतींनी सांगितले आहे.

पुढील प्रकारची दाने अक्कलहुशारीने दिलेली असल्यामुळे आणि ती शास्त्रांनी निषिद्ध सांगितलेली नसल्यामुळे ती **दत्त** असतात म्हणजे ती **परत घेता येत नाहीत**:- विकत घेतलेल्या वस्तूची किंमत, कामाबद्दल रोजमुरा, संतोषाप्रीत्यर्थ दिलेल्या वस्तु, प्रेमामुळे दिलेल्या वस्तु, वराच्या नातलगांना दिलेले पैसे आणि पारलौकिक हेतूने अथवा लोकोपकाराच्या हेतूने दिलेली दाने. (नारद ७·८)

अनेक प्रकारची दाने बेकायदेशीर अथवा शास्त्रविरुद्ध असल्याचे शास्त्रात सांगितले आहे. ज्या वस्तूंचे दान शास्त्रांत निषिद्ध मानलेले असते त्यांना **अदेय** म्हणतात आणि अशी दाने निरर्थक ठरतात. काही दात्यांच्या अंगात मद्यपान, वेड, वार्धक्य इत्यादी प्रकारची अपात्रता असते म्हणून त्यांनी दिलेली दाने **अदत्त** असतात म्हणजे अशी दाने देणाऱ्याने स्वतःच न्यायालयाकडे अर्ज केला तर ती दाने न्यायालयाकडून रद्द केली जाण्याचा संभव असतो. (नारद ७·९·११).

आणखी एका प्रकारची दाने अथवा अभिवचने मागे घेता येतात. उदाहरणार्थ, प्राणसंकट आले असताना वाचविणाऱ्याला सर्व मिळकत देऊ केली असली तरी ते अभिवचन मागे घेता येते. आणि एकादा

तज्ञ अथवा लवाद मनुष्य ठरवील तितकी मिळकत देऊ केली तरी प्रत्यवाय नसतो. (कात्या.६४६). तसेच उत्कोच म्हणजे लाच म्हणून ज्याला एकादी रक्कम दिलेली असेल तो इसम राजाने एकाद्या कामावर नेमलेला अधिकारी असेल तर राजाने अशी लाच घेतलेली रक्कम परत करावयास लावावी. आणि त्या रकमेच्या ११ पट दंड त्या अधिकाऱ्याला करावा. परंतु अशा अधिकाऱ्यांव्यतिरिक्त इतर कोणी मनुष्य काम केल्याबद्दल बक्षिस मिळवील अथवा कृतज्ञतेच्या भावनेने जे द्रव्य त्याला दिले असेल ते त्याला परत करावे लागणार नाही. (कात्या. ६५०-५३).

धार्मिक कारणाकरिता विवक्षित दान द्यावयाचे कबूल करून ते प्रत्यक्ष दिले नाही तर ते ह्या जन्मात आणि पुढील जन्मात ऋण होते म्हणजे असे दान देण्यास राजाने भाग पाडावे आणि शिवाय दंडही करावा. (हारीत-स्मृ.चं.२.पा.१९२). तथापि ज्याला दान द्यावयाचे कबूल केले होते तो मनुष्य अधार्मिक असल्याचे आढळले तर ते दान न दिले अथवा अंमलात आणले नाही तरी चालते. (गौ. ५·२१). बेकायदेशीर रीतीने दिलेल्या दानाचा उपभोग घेणारा आणि निषिद्ध सांगितलेले दान देणारा ह्या दोघांनाही राजाने शासन करावे. (नारद ७·१२).

दान दिलेल्या वस्तूचा दान घेणाऱ्याने स्वीकार केला म्हणजे त्या वस्तूवरील दान देणाऱ्याचे स्वामित्व नाहीसे होते आणि दान घेणाऱ्याचे स्वामित्व उत्पन्न होते. हा सर्वसामान्य नियम दायभाग ह्या ग्रंथाला मान्य नसून त्यात असे सांगितले आहे की दान देणाऱ्याने एकाद्या वस्तूचा त्याग केला एवढ्यानेच (म्हणजे दात्याच्या स्वतःच्या कृत्याने) त्या वस्तूचे स्वामित्व नियोजित दान घेणाऱ्याकडे जाते. (दायभाग १·२१-२४). परंतु दायभागाचे हे म्हणणे समाधानकारक नाही. कारण नियोजित दान घेणाऱ्याने ती दान दिलेली वस्तु स्वीकारावयाचे नाकारले तर काय परिणाम होईल हे त्याने सांगितलेले नाही.

———————

अनुक्रमणिका

## प्रकरण ७९

# वेतनस्यानपाकर्म, अभ्युपेत्याशुश्रूषा, आणि स्वामीपालविवाद

## (वेतन न देणे, काम न करणे आणि मालक आणि गुराखी ह्यांच्यामधील वाद)

(मू.ग्रं.पा.३.४७६-४८५)

ह्या तीनही व्यवहारपदांचा स्वामी आणि सेवक अथवा कामावर नेमणारा आणि कामकरी ह्यांच्याशी संबंध आहे. प्रस्तुत प्रकरणात पहिल्या दोन विषयांचे विवेचन करण्यात येईल आणि स्वामीपाल ह्या विषयाचे विवेचन मागून स्वतंत्रपणे करण्यात येईल.

### वेतनस्यानपाकर्म

कामावर नेमण्यासंबंधीचा करार काही विशिष्ट मुदतीचा असेल अथवा एकादे ठरीव काम पुरे करण्याबद्दल असेल आणि कामाबद्दलचे वेतन आगाऊ ठरविलेले असेल अथवा नसेल त्याला अनुसरून वेगवेगळे नियम असतात. हे नियम गौतम आणि आपस्तम्ब ह्यांच्या कालापासून (ख्रि.पू.६ व्या शतकापासून) ते बृहस्पती आणि कात्यायन ह्यांच्या कालापर्यंत (इ.स. च्या ५व्या शतकापर्यंत) निरनिराळ्या वेळी घालण्यात आले होते. ह्या नियमांत मालक आणि सेवक ह्या दोघांच्याही जबाबदाऱ्यांचा विचार केलेला आहे. कामाबद्दलचे करार आणि एकाद्या वाहनाच्या भाड्यासंबंधीचे करार ह्यांचा एकाच सदरात स्मृतींनी समावेश केला आहे.

वेतन आगाऊ ठरलेले असेल तेव्हा ते पत्करलेल्या कामाच्या प्रारंभी, मध्यंतरी अथवा काम पुरे झाल्यावर देण्यास प्रत्यवाय नाही. (नारद ९·२). जेव्हा वेतन आगाऊ ठरलेले नसेल तेव्हा केलेल्या कामाबद्दल गुमास्त्याला नफ्यातील, गुराख्याला दुधातील आणि शेतकऱ्याला शेताच्या पिकातील दहावा [भृतावनिश्चितायां तु दशभागं समाप्नुयुः । लाभगोबीजसस्यानां वणिग्गोपकृषीवलाः ॥ नारद ९·३.] हिस्सा द्यावा. (नारद ९·३). शेतकऱ्याच्या बाबतीत शेत कसण्याला विशेष कष्ट करावे लागत असतील आणि शेताचा मालक कामकऱ्याला अन्नवस्त्र पुरवीत असेल तेव्हा पिकाचा पाचवा हिस्सा आणि तसे पुरवीत नसेल तेव्हा तिसरा हिस्सा मिळावा. वेतन ठरलेले असूनही काही प्रसंगी मालकाला ते आपल्या इच्छेप्रमाणे कमीअधिक करता येते. उदाहरणार्थ, मालकाने घालून दिलेल्या काळ, स्थळ, ह्यांच्या अटी सेवक पाळणार नाही तर वेतन कमी करता येते आणि अपेक्षेपेक्षा अधिक नफा मिळवून दिला तर अधिक वेतन द्यावे. (याज्ञ २·१९५). वेतन मिळाल्यावर आणि शक्ती असतानाही सेवक काम न करील, कारणाशिवाय काम सोडून जाईल तर त्याला वेतन परत करावयास लावून वरती दुप्पट दंड करावा अथवा काम करावयास भाग पाडून शिवाय दंड करावा. (नारद ९·४). कबूल केलेले कामापैकी बरेचसे काम केले नाही तर दंड करावा आणि वेतन मुळीच देऊ नये.

नोकरीच्या ठरलेल्या मुदतीत मालकाने दुसरा कोणी सेवक नेमू नये आणि सेवकाने दुसऱ्या मालकाची नोकरी करू नये. (कौटि. ३·१४).

माल वाहून नेणाऱ्या वाहनांच्या संबंधीही काही नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, वाहनवाल्याला वाहून नेण्याकरिता दिलेला माल त्याच्या चुकीमुळे नष्ट झाला अथवा बिघडला तर ते नुकसान वाहन वाल्याने भरून दिले पाहिजे. (नारद ९·९). पालखी वाहणारे भोई, हत्यारबंद रखवालदार ह्यांच्यासारख्यानी काम नाकारून प्रवासाला निघण्याला अडथळा आणला तर त्यांना ठरलेल्या वेतनाच्या दुप्पट दंड करावा आणि त्यांच्या जागी दुसरा सेवक नेमावा. (नारद ९·८). अशा प्रकारचा सेवक प्रवासाला निघाल्यानंतर आजारी नसताना काम सोडून गेला तर त्याने जितका प्रवास झाला असेल त्या मानाने १/७, १/४ अथवा संपूर्ण वेतनाइतकी रक्कम मालकाला दिली पाहिजे आणि तशाच परिस्थितीत मालकाने सेवक काढून टाकला तर त्या मालकाला तशीच रक्कम सेवकाला देण्यास लावावे. (नारद ९·७). माल नेण्याकरिता वाहन ठरवून अथवा मालवाहू जनावरे ठरवून त्यांना माल न दिल्यास त्यांना ठरलेल्या भाड्याच्या चतुर्थांशाइतके भाडे देण्यास लावावे. थोडा प्रवास केल्यावर वाहनांचा अथवा जनावरांचा त्याग केला तर त्याला पुरे भाडे देण्यास लावावे. माल वाहून नेणारी जनावरे भाड्याने घेऊन काम पुरे झाल्यावर देखील ती परत दिली नाहीत तर ती परत करावयास लावून परत केल्याच्या दिवसापर्यंत भाडे देण्यास लावावे. (कात्या. ५ ६६२।३).भाडे देऊन जमीन घेऊन त्या जमिनीवर घर बांधले तर ती जमीन सोडताना बांधलेल्या घराचे सामान घेऊन जाण्याचा घर बांधणाऱ्याला हक्क असतो. परंतु भाडे न देता आणि जमीनवाल्याच्या इच्छेविरुद्ध घर बांधले तर जमीन सोडतेवेळी घराचे सामान जमिनीच्या मालकाकडे राहू दिले पाहिजे. (नारद ९·२०-२१).

सेवकाने धन्याच्या हिताकरिता चोरीसारखे अयोग्य कृत्य केले तर त्या कृत्यामुळे होणाऱ्या नुकसानीला धनी जबाबदार असतो. (बृह.पौ.ध.ग्रं.३३ पा. ३४६).

गुरूने शुल्क घेऊन विद्या शिकविली नाही तर त्याला त्याने घेतलेल्या संपूर्ण शुल्काइतका दंड करावा. (मस्त्य २२१.६). हाच नियम शिल्प न शिकविणाऱ्या शिल्पकाराला लागतो.

वेश्यांसंबंधीही काही नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, एकादी वेश्या मूल्य स्वीकारून त्या गिऱ्हाइकाचा स्वीकार न करता दुसरीकडे जाईल, तेव्हा तिला घेतलेल्या रकमेच्या दुप्पट रक्कम गिऱ्हाइकाला आणि तितकीच रक्कम दंड म्हणून राजाला देण्यास लावावे. (मत्स्य २२७·१४४-इ०).

**अभ्युपेत्याशुश्रूषा** (सेवा करण्याचा अथवा आज्ञा पालन करण्याचा करार करून तसे न करणे). प्राचीन धर्मसूत्रांत फक्त दोन प्रकारच्या सेवकांचा उल्लेख केलेला असतो. ते दोन प्रकार म्हणजे शेतात काम करणारा आणि गुरे संभाळणारा. नारदाने (८·२-२१) परिचारकांच्या पाच जाती सांगितल्या आहेत : **शिष्य** (वेदविद्या शिकणारा विद्यार्थी), **अंतेवासिन्** (कला शिकणारा उमेदवार), **भृतक** (मजुरी घेऊन काम करणारा), **अविकर्मकृत्** (मजुरांवर देखरेख करणारा) आणि **दास** (गुलाम). कामांचे शुभ आणि अशुभ असे दोन प्रकार असतात. उष्टी, शेण, मूत्र गोळा करणे, शेणखळी, उकिरडे झाडणे, धन्याची गुह्येंद्रिये हातांनी पुसणे ही कामे **अशुभ** म्हणजे अशुद्ध असतात आणि त्यांच्या व्यतिरिक्त सर्व कामें **शुभ** असतात. अशुभ कामे फक्त गुलामांकडून केली जातात. शिष्यप्रभृति चार प्रकारच्या सेवकांना **कर्मकर** (कामकरी) म्हणतात आणि आपल्या मनास पटेल त्याप्रमाणे काम करण्याचे स्वातंत्र्य नसणे हे त्यांचे सामान्य लक्षण असते. ह्या चार प्रकारच्या कामकऱ्यांची विवक्षित कामे ठरलेली असतात आणि त्यांच्या संबंधी विशिष्ट नियम असतात. उदाहरणार्थ, **अंतेवासिन्** (उमेदवार) हा सोनारकाम, गायन, नृत्य इत्यादी एकादी कला अथवा शिल्प शिकण्याकरिता एकाद्या तज्ञ शिल्पकाराच्या घरी काही ठरीव मुदतीपर्यंत त्या गुरूच्या हाताखाली काम

करण्याचा करार करून राहतो. तो तज्ञ शिल्पकार त्या उमेदवाराला अन्न द्यावयाचे कबूल करतो आणि आपल्या स्वतःच्या घरात त्याला कला शिकवितो, दुसऱ्या कोणत्याही कामाला लावीत नाही. तो तज्ञ शिल्पकार शिकविण्यास तयार असूनही जर उमेदवाराने गुरूचा त्याग केला तर त्या उमेदवाराला गुरूकडे राहण्यास भाग पाडावे आणि त्याला फटके मारावे अथवा कोंडून ठेवावे. तो उमेदवार आपल्या कामात निपुण झाला तरी त्याला ठरलेल्या मुदतीपर्यंत गुरूच्या घरी राहावे लागते आणि त्या उमेदवाराच्या कामापासून जी काही प्राप्ती होईल ती गुरूला मिळते. त्या तज्ञ शिल्पकाराने उमेदवाराला कला शिकविली नाही आणि अन्य काम करावयास लावले तर तो तज्ञ शिल्पकार प्रथम—श्रेणीचा दंड देण्यास पात्र होईल आणि उमेदवारान त्याचा त्याग केल्यास प्रत्यवाय नाही.

मजूरदार सेवक आणि दास (गुलाम) ह्यांच्यामध्ये असा फरक असतो की मजूरदार जरी काही बाबतीत दुसऱ्यावर अवलंबून असला तरी तो आपले थोडेसे तरी स्वातंत्र्य राखतो आणि दास हे सर्व प्रकारचे स्वातंत्र्य दुसऱ्याच्या स्वाधीन करीत असतात. (कात्या. ७१५). दासांचे १५ प्रकार सांगितले आहेत आणि त्यांना अत्यंत कनिष्ठ दर्जाचे आणि घाणेरडे (अशुभ) काम करण्याकरिता नेमण्यात येते. (नारद ८·२५). बुद्धकालीन भारतात अस्तित्वात असलेली गुलामांची परिस्थिति ग्रीक लोकांत अमलात असणाऱ्या गुलामांच्या इतकी दुःखदायक नव्हती. ब्रिटिश अमलात आसाममधील चहाच्या मळ्यांत काम करणाऱ्या मजुरांच्या संबंधीच्या सन १९०१ च्या कायद्याने एक प्रकारची गुलामगिरी निर्माण केली होती.

—————

# प्रकरण ८०

## संविद्व्यतिक्रम आणि इतर व्यवहारपदे

## (करारांचा आणि रूढींचा भंग)

(मू. ग्रं. पा. ३.४८६—५०१)

करारांच्या आणि रूढींच्या भंगासंबंधीच्या व्यवहारपदाला मनूने (८·५) '**संविद्व्यतिक्रम**' अशी संज्ञा दिली आहे आणि त्याच व्यवहारपदाला नारदाने (१३·१) '**समयस्यानपाकर्म**' असे म्हटले आहे. 'संविद्' आणि 'समय' ह्या दोन्ही शब्दांचा अर्थ करार असाच आहे. याज्ञ. आणि नारद ह्यांनी असे सांगितले आहे की "व्यापाऱ्यांच्या समिती, नैगम, नास्तिक, श्रेणी, पूग, गण यांनी ठरविलेले तसेच नगरांनी आणि देशांनी ठरविलेले करार ह्यांची अंमलबजावणी राजाने केली पाहिजे आणि कामासंबंधीच्या त्यांच्या रूढींचे संरक्षण केले पाहिजे". श्रेणी पूग, गण इत्यादी संज्ञा निरनिराळे व्यवसाय करणाऱ्या लोकांच्या समित्यांना लावण्यात येत असत. ह्या निरनिराळ्या समित्यांचे आपसातील व्यवहारासंबंधी अनेक नियम आणि अनेक प्रघात असतात. बौद्धधर्मीयांसारखे जे लोक वेदांना प्रमाण मानीत नाहीत त्यांना नास्तिक म्हणतात (याज्ञ. २·१९२, नारद १३·२) आणि अशा लोकांनी देखील आपसात ठरविलेल्या रूढींना राजाने मान दिला पाहिजे आणि त्यांची अंमलबजावणी केली पाहिजे असा नियम सांगण्याइतके धर्मशास्त्रावरील ग्रंथकार उदार मनाचे होते ही गोष्ट त्यांना भूषणावह आहे. ह्या बाबतीत धर्मशास्त्रावरील ग्रंथकारांची एकच अट असे की अशा प्रघातांची अंमलबजावणी देशाच्या अथवा राजधानीच्या हिताच्या विरुद्ध नसावी आणि ते प्रघात उघडपणे अनैतिक स्वरूपाचे नसावेत. (नारद १३·४।५ आणि ७). निरनिराळ्या स्मृतींनी (याज्ञ. २·१८८-१९२ बृह. कात्या. इ०) असेही नियम सांगितले आहेत की श्रेणी वगैरे संस्थांच्या कारभारावर देखरेख ठेवण्याकरिता एक समिती असावी आणि अशी समिती जो निर्णय ठरवील त्याप्रमाणे त्या श्रेणीच्या सदस्यांनी वागावे आणि जो सदस्य असा निर्णय मान्य करणार नाही त्याला राजाने शासन करावे.

**क्रयविक्रयानुशय** (एकादा जिन्नस विकत घेतल्यानंतर अथवा विकत दिल्यानंतर होणारा पश्चात्ताप). नारदाने (११ आणि १२) ह्या व्यवहारपदाची **विक्रीया—संप्रदान** (किंमत घेऊन एकादा जिन्नस घेणाऱ्याच्या स्वाधीन न करणे) आणि **क्रीत्वानुशय** (विकत घेतल्यानंतर खेद करणे) अशी दोन व्यवहारपदे मानली आहेत. मनूने असा एक सर्वसाधारण नियम सांगितला आहे की जेव्हा एकाद्या मनुष्याला एकादी वस्तु विकत घेतल्यानंतर अथवा विकल्यानंतर तसे केल्याबद्दल पश्चात्ताप होईल तेव्हा त्याने ती वस्तु १० दिवसांच्या आत परत द्यावी अथवा परत घ्यावी. ह्या नियमात पुढे अनेक फेरबदल आणि अपवाद करण्यात आले. उदाहरणार्थ, जमिनीच्या बाबतीत जमीन विकणारा आणि विकत घेणारा परस्परांचे सपिंड असतील तर त्यांना पश्चात्ताप करण्याकरिता १२ दिवसांची मुदत देण्यात येते आणि इतर सर्व प्रसंगी त्याहूनही कमी मुदत देण्यात येते. (कात्या. ६८५). विकत घेतलेल्या जिन्नसांची परीक्षा करण्याकरिता निरनिराळ्या जिन्नसांच्या बाबतीत निरनिराळ्या अवधी द्यावयाच्या असतात. उदाहरणार्थ, लोखंड आणि कापड यांच्या बाबतीत १ दिवस, मूल्यवान रत्नांच्या बाबतीत ७ दिवस, जळाऊ लाकडे, द्रव पदार्थ इत्यादिकांच्या बाबतीत त्यांची तपासणी विकत घेतेवेळी आणि त्याच ठिकाणी केली पाहिजे आणि मागाहून त्यांत काही दोष आढळला तरी नीट तपासून घेतलेली वस्तु परत करता येत नाही. परंतु एकाद्या जिन्नासाची विक्री

अयोग्य किंमतीला झालेली असली तर ती विक्री १०० वर्षांनंतर देखील रद्द करण्यास प्रत्यवाय नाही. **योग्य किमत** म्हणजे माहितगार, पापभीरू अशा लोकांनी आणि आजूबाजूच्या लोकांनी एकत्र जमून ठरविलेली किंमत आणि अशा योग्य किंमतीपेक्षा १/८ इतक्या रकमेने कमी अथवा अधिक असणारी किंमत ती **अयोग्य किंमत** असे कात्यायनाने (७०५-७०६) म्हटले आहे.

**उक्तलाभ**. जेव्हा एकादा मनुष्य एकाद्या जमिनीच्या किंमतीच्या काही अंशाइतकी रक्कम कोणाजवळून कर्ज म्हणून घेतो आणि असा करार करतो की ती रक्कम एका विवक्षित दिवशी परत देईन आणि त्याने तसे केले नाही तर त्याची त्या जमिनीवरील मालकी नष्ट होईल, तेव्हा अशा **सशर्त** केलेल्या विक्रीला **उक्तलाभ** [किञ्चिच्च द्रव्यमादाय काले दास्यामि ते क्वचित् । नो चेन्मूलमिदं त्यक्तं केदारस्येति यः क्रयः ॥ स उक्तलाभ इत्युक्त उक्तकालेऽप्य–नर्पणात् । भारद्वाज (व्यव. नि. पा. ३५१).] म्हणतात. (भारद्वाज—व्य. नि. पा. ३५१). अशी विक्री काही ठरीव मुदतीनंतर कायदेशीर होते. ह्यासंबंधीही तपशीलाचे बाबतीत अपवाद असतात. उदाहरणार्थ, उक्तलाभ प्रकारची विक्री जर (त्या जमिनीच्या योग्य किंमतीच्या) अर्ध्याहून अधिक रकमेला झाली असली आणि (रक्कम परत करण्याच्या ठरलेल्या मुदतीनंतर) दहा वर्षाच्या वर काळ होऊन गेला असेल तर ती विक्री कायदेशीर होईल. (कात्या ६१४).

कोणत्याही प्रकारची विक्री असली तरी विक्रीसंबंधीच्या लेखात विकलेल्या जमिनीवर असणाऱ्या विहिरी, झाडे, रस्ते (अथवा जलमार्ग) ह्यांचा निर्देश करावा. तसा निर्देश केला नसेल तर त्या विहिरी वगैरे जमीन विकणाऱ्याच्या मालकीच्या होतात. (बृह. व्य. नि. पा. ३४९).

खरेदीविक्रीच्या संबंधात काही विशिष्ट संज्ञा योजण्यात येतात. (व्य. नि. पा. ३४७-३४९) उदाहरणार्थ, सुवर्ण अथवा त्याच्यासारखा जो पदार्थ लोक दुसऱ्याला देऊ इच्छितात त्याला **मूल्य** (किंमत) म्हणतात. विकावयाच्या वस्तूला **पण्य** म्हणतात. किंमत देऊ करून नंतर एकाद्या वस्तूचा स्वीकार करणे ह्याला **क्रय** (खरेदी) म्हणतात. पण्य वस्तु देऊ करून नंतर तिचे मूल्य स्वीकारणे ह्याला विक्रय (विक्री) म्हणतात. एक वस्तु देऊन त्याच प्रकारची दुसरी वस्तु स्वीकारणे ह्याला **परिवृत्ति** अथवा **परिवर्तन** (अदलाबदल) म्हणतात. दोन निरनिराळ्या प्रकारच्या परंतु समान मूल्याच्या वस्तूंची अदलाबदली केली जाते त्या व्यवहाराला **विनिमय** म्हणतात.

जमीन महसूल न दिल्यास राजाच्या आज्ञेने जमिनीची विक्री करण्यासंबंधी जे काही नियम सांगितले आहेत त्यांवरून असे दिसून येते की सर्वसाधारणपणे राजा अथवा राज्यसंस्था सर्व जमिनीचा स्वामी आहे असे समजण्यात येत असे परंतु ज्या ठिकाणी व्यक्ति अथवा लोक ह्यांच्याकडे ते कशीत असलेल्या जमिनीचा ताबा फार काळपर्यंत चालत आलेला असे त्याठिकाणी त्या व्यक्ति आणि लोक त्या जमिनीचे **बहुतेक पूर्ण** मालक समजले जात परंतु त्यांच्यावर जमीन महसूल देण्याची जबाबदारी असे आणि त्या जमिनीचा महसूल वसूल करणे अथवा पिकाचा भाग घेणे एवढ्याच गोष्टींची सत्ता राजा अथवा राज्यसंस्थेकडे असे.

स्थावर मिळकतीचे दान उपनिषदांच्या काळातदेखील दिले जात असे तरी फार प्राचीन काळी अशा दानाला गौण मानण्यात येत [स्थावरे विक्रयो नास्ति कुर्यादाधिमनुज्ञया । मिता (याज्ञ २.११४).] असे. (मिता- याज्ञ. २·११४). प्राचीन काळी भारतात एकत्र कुटुंबात राहण्याची पद्धत प्रचलित असल्याकारणाने जमिनीची विक्री जमिनीच्या दानापेक्षा फारच कमी वेळा होत असली पाहिजे. जमिनीची विक्री करावयाची झाली तरी ती

दानाच्या स्वरूपात करावी असे स्मृतींनी सांगितले [विक्रयेपि कर्तव्ये सहिरण्यमुदकं दत्त्वा दानरूपेण स्थावरविक्रयं कुर्यादित्यर्थः । मिता. (याज्ञ २·११४).] आहे. (मिता. याज्ञ. २·११४). ह्याचे कारण दाने पुष्कळ वेळा दिली जात आणि विक्री तशी होत नसे हे बहुधा असावे असे वाटते. ह्याच्या उलट प्राचीन रोमन लोकांच्या कायद्यात दान द्यावयाचे असल्यास ते विक्रीच्या तंत्राप्रमाणे द्यावे असे सांगितले आहे.

जमिनीच्या विक्रीचा व्यवहार गावकरी, दायाद, शेजारी, सहभागीदार ह्यांच्या संमतीने आणि सुवर्ण आणि जल देऊन करावा. असा एक सावधगिरीचा आणि पुढे भानगडी उपस्थित होऊ नये ह्या दृष्टीने सोईचा नियम एका स्मृतिवचनात सांगितला आहे.

**स्वामीपालवाद** (गुरांचा मालक आणि त्याने गुरे राखण्याकरिता नेमलेला गुराखी ह्यांच्या दरम्यानचा वाद). भारतासारख्या कृषिप्रधान देशात प्राचीन काळीं हा एक प्रमुख वादाचा मुद्दा असला पाहिजे. ह्या बाबतीतील मुख्य नियम असा आहे की मालकाने सकाळी गुराख्याच्या स्वाधीन केलेल्या गाई आणि इतर पाळीव जनावरे ह्यांना कुरणात चारून आणि पाणी पाजून गुराख्याने संध्याकाळी परत आणून मालकाच्या स्वाधीन केली पाहिजेत. (याज्ञ. २·१६४). ह्या नियमावरून निघणारे अनेक इतर नियम सांगितलेले आहेत. उदाहरणार्थ, जनावरांच्या सुरक्षितपणाची जबाबदारी दिवसा गुराख्याच्या अंगावर असते आणि जनावरे वस्तीला मालकाच्या घरी असली तर मालकाच्या अंगावर असते असे मनूने (८·२३०) सांगितले आहे.

गुराख्याला द्यावयाच्या वेतनासंबंधी स्पष्ट करार केलेला नसेल तर त्याने सांभाळलेल्या गाईचे सर्व दूध प्रत्येक आठव्या दिवशी त्याला मिळावे आणि शिवाय प्रत्येक वर्षी १०० गाईंबद्दल दोन वर्षाची एक कालवड त्याला मिळावी असा एक नियम (नारद ९·१०) सांगितला असून त्याला दुसरेही पर्याय सांगितले आहेत. गुरांना चरण्याकरिता कुरण म्हणून काही जमीन गावकरी लोकांनी आपल्या मर्जीप्रमाणे अथवा राजाच्या मर्जीप्रमाणे राखून ठेवावी असे याज्ञ. (२·१६६) मध्ये सांगितले असून ती जमीन किती असावी ह्याबद्दल नियम सांगितले आहेत. गुरांनी पिकांची नासधूस करू नये ह्याकरिता शेताच्या मालकाने शेतासभोवती उंच कुंपणे घालावी (कात्या. ६६६) असे सांगून नंतर गुरांनी नासधूस केल्याबद्दल केव्हा आणि कोण जबाबदार ठरतो ह्याविषयी नियम सांगितले आहेत. काही विशिष्ट जनावरांच्या बद्दल लोकांच्या मनात नाजूक भावना असत आणि अशा जनावरांनी केलेल्या नासधुशीबद्दल त्यांच्या मालकांना दंड करू नये असे उशनसाने (याज्ञ. २·१६३ वरील मिताक्षरा) म्हटले आहे. त्याने असा नियम सांगितला आहे की जो कोणी गाईने खाल्लेल्या अथवा नष्ट केलेल्या पिकाबद्दलची नुकसानी तिच्या मालकाला भरून देण्यास लावील त्याला त्याचे पितर आणि देव त्याने दिलेले अन्न (पिंड) भक्षण करीत नाहीत असे दिसून येईल. ज्या प्रसंगी अशा नुकसानीबद्दल मालक जबाबदार असतो तेथे त्याने पिकाच्या मालकाला गाईने केलेल्या नुकसानीबद्दल शेजाऱ्यांनी ठरविले असेल त्याप्रमाणे नुकसानी भरून दिली पाहिजे. (नारद १४·३८).

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ८१

## सीमाविवाद (हद्दीसंबंधी तंटे)

(मू. ग्रं. पा. ३.५०२-५१०)

मनूने ह्या व्यवहारपदाला **सीमाविवाद** अशी संज्ञा दिली असून नारदाने (१४.१) त्याला '**क्षेत्रजविवाद**' (शेतीसंबंधी तंटे) असे नाव दिले आहे. 'ज्या वादामध्ये शेते, नांगरलेल्या आणि पडित जमिनी ह्यांच्या हद्दीसंबंधी बांध अथवा पाण्याचे पाट ह्यांच्यासंबंधी प्रश्नांचा निर्णय करावयाचा असतो तो '**क्षेत्रजविवाद**'. जमिनीसंबंधी वाद उपस्थित होण्याला सहा कारणे असतात असे कात्यायनाने (७३२) म्हटले आहे. अधिक जमिनीवर हक्क सांगणे, दुसऱ्याच्या ताब्यात असलेल्या जमिनीहून कमी जमिनीवर, त्याचा हक्क आहे असे प्रतिपादन करणे, एकाद्या जमिनीत आपला हिस्सा आहे असे म्हणणे, दुसरा कोणी त्याचा हिस्सा असल्याचे म्हणत असल्यास ते नाकबूल करणे, पूर्वी मुळीच ताबा नसलेल्या जमिनीवर आक्रमण करणे आणि हद्द. ह्या सर्व बाबतीत प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष रीतीने जमिनीच्या हद्दी निश्चित करणे अवश्य असते आणि म्हणून ह्या सर्व कारणांचा मनूने 'सीमाविवाद' ह्या विषयात समावेश केला आहे.

हद्दीचे पाच प्रकार [ध्वजिनी मत्स्यिनी चैव नैधानी भयवर्जिता । राजशासननीता च सीमा पञ्चविधा स्मृता ॥ नारद (मिता—याज्ञ २·१५०).] असतात. (नारद-याज्ञ २·१५० वरील मिता०) **ध्वजिनी** (झाडांनी दर्शित होणारी), **मत्स्यिनी** (मत्स्यांनी परिपूर्ण असणाऱ्या जलाशयांनी दर्शित होणारी), **नैधानी** (निधानासारख्या जमिनीत पुरून ठेवलेल्या, न गंजणाऱ्या वस्तूंनी दर्शित होणारी), **भयवर्जिता** (संबंधित व्यक्तींनी संमती देऊन ठरविलेली), आणि **राजशासननीता** (राजाच्या आज्ञेवरून ठरविलेली). हद्दीसंबंधीचे ज्ञान परंपरेने अस्तित्वात ठेवण्याकरिता हद्द दाखविणारी चिन्हे वृद्ध लोकांनी तरुण मंडळींना दाखवावी आणि त्यांनी वृद्ध झाल्यावर तसेच करावे.

हद्दीसंबंधीचा वाद फार महत्त्वाचा असल्यामुळे हद्दीसंबंधी साक्ष देणाऱ्या साक्षीदारांची संख्या चार, आठ अथवा दहा (सम) असावी. (याज्ञ. २·१५२). एकादा साक्षीदार कितीही विश्वासार्ह असला अथवा त्याला आत्मविश्वास वाटत असला तरी हद्द दाखविण्याचे आणि निश्चित करण्याचे काम एकट्याने अंगावर घेऊ नये. (नारद १४·९). तसेच ज्या ठिकाणी एकच साक्षीदार असेल तेथे हद्दीसंबंधी साक्ष देताना त्याने रक्तवर्णाची वस्त्रे आणि रक्तपुष्पांच्या माळा धारण कराव्या, मस्तकावर मातीचे ढेकूळ ठेवावे आणि खोटे बोलल्यास पुण्य नष्ट होईल अशी शपथ घ्यावी. (नारद १४·१०). साक्षीदार अथवा चिन्हे नसतील तेव्हा राजाने दोन गावांमधील हद्द आपल्या इच्छेप्रमाणे ठरवावी आणि नव्या खुणा तयार कराव्या. अशा वादाचा निर्णय ज्येष्ठ महिन्यात करावा कारण त्यावेळी उन्हाळ्यात पाणी सुकून गेल्यामुळे बांधबंधारे ह्यांच्या खुणा स्पष्ट होतात. (मनु. ८·२४५). स्नेह, लोभ अथवा भय ह्यांच्याकरिता हद्द ठरविण्यास जर एकादा माहितगार साक्षीदार पुढे येणार नाही अथवा जो कोणी मिथ्या रीतीने हद्द दाखवील त्याला राजाने शासन करावे. (कात्या. ७५०).

पुराने धुपून जाणाऱ्या आणि मळई साठून उत्पन्न होणाऱ्या नव्या जमिनीसंबंधी काही नियम सांगितले आहे. (बृह. पौ. ध. ग्रं. ३३ पा. ३५३). उदाहरणार्थ, ज्या दोन गावांच्या मध्ये नदी ही हद्द असेल आणि नदीने

अनुक्रमणिका

एका गावातील जमीन वाहून नेऊन दुसऱ्या गावाच्या बाजूला जमीन वाढविली असेल अशा ठिकाणी वाढलेली जमीन ज्या गावाला जोडून असेल त्या गावची होते. परंतु अशा जमिनीत पीक उभे असेल तर त्या जमिनीच्या मूळ मालकाला त्या जमिनीतील पीक मात्र काढून नेता येईल.

दुसऱ्याच्या मालकीच्या जागेतून जाण्याच्या वगैरे वहिवाटी संबंधी आणि जलप्रवाहासंबंधी काही नियम सांगितले आहेत. (बृह. पौ. ध. ग्रं. ३३ पा. ३५४). उदाहरणार्थ, एकादे गाव स्थापन झाल्याच्या वेळेपासून अथवा घर बांधल्याच्या वेळेपासून ज्या प्रकाराने त्या घराचा (दारे, परसाव इत्यादींचा) उपभोग घेण्यात येत असेल तसेच गावातील पाणी आणि बाजार ह्यांचा ज्या प्रकाराने उपभोग घेतला जात असेल त्यात व्यत्यय आणला जाऊ नये. जी उघडली असता तिच्यामधून दुसऱ्याच्या अंतर्गृहातील दृश्य दिसेल अशी खिडकी आपल्या घराला करू नये अथवा दुसऱ्याच्या घरावर पाणी पडेल असा पन्हळ लावू नये. मळमूत्र आणि घाणपाणी साठविण्याच्या जागा (खड्डे), चुली आणि खंदक शेजाऱ्याच्या घराच्या भिंतीपासून किमान दोन हात अंतरावर तयार करावे.

सार्वजनिक रस्त्यावर खटारे वगैरे उभे करून रहदारीला अडथळा आणू नये. सार्वजनिक रस्त्यावर कोणीही झाडे लावू नये. अडचणीत नसताना सार्वजनिक रस्त्यावर मलविसर्जन करू नये अथवा विष्ठा आणून टाकू नये. गुरू, शिक्षक अथवा राजा ह्यांना रस्त्यावर पुढे जाऊ द्यावे. तलाव, बाग, तीर्थ ह्यांच्यामध्ये विष्ठेसारखे घाणेरडे पदार्थ टाकून ते खराब करू नये. (बृह. पौ. ध. ग्रं. ३३ पा. ३५४).

दोन शेतांच्या मधील हद्दीवर उगवलेल्या झाडांची फुले आणि फळे दोन शेतांच्या मालकांच्या समाइक मालकीची असतात. एका शेतात उगवलेल्या झाडाच्या फांद्या दुसऱ्या शेतात पसरल्या असल्यास ज्या शेतात त्या झाडाचे मूळ असेल त्या शेताचा मालक त्या फांद्याचा मालक समजावा. (नारद १४-१३।१४).

दुसऱ्याच्या शेतात बांध अथवा ओहोळ बांधावयाचा असल्यास त्या शेताच्या मालकाची अथवा राजाची अनुमती घेऊन मग बांधावा. (नारद १४·२०।२१).

जर एकाद्याने एकादे शेत मालकापासून पीक काढण्याकरिता खंडाने घेतले परंतु थोडीशी नांगरणी केल्यावर त्याने त्या शेताची मशागत करण्याचे सोडून दिले आणि ते काम पुरे करण्याकरिता दुसऱ्या कोणाची नेमणूक केली नाही तर अशा मनुष्याकडून शेताची योग्य मशागत केली असता जितके पीक आले असते तितके पीक मालकाला देववावे आणि शिवाय दंडही करावा आणि ते शेत त्याच्याकडून काढून घेऊन दुसऱ्या एकाद्या कुळाला द्यावे. (याज्ञ. २·१५८).

―――――

अनुक्रमणिका

## प्रकरण ८२

# वाक्पारुष्य आणि दंडपारुष्य (निंदा, बेअब्रू, हल्ला)

(मू. ग्रं. पा. ३.५११-५१८)

नारदाने (१८·१) **वाक्पारुष्याची** व्याख्या अशी सांगितली आहे की "ज्या अपमानास्पद शब्दांनी एकाद्या मनुष्याच्या देशाची, जातीची, कुळाची आणि त्यांच्यासारख्या दुसऱ्या गोष्टींची निंदा जाहीर केली जाते आणि ज्यांच्यापासून दुसऱ्या मनुष्याच्या मनाला दुःख होते अथवा त्याला राग येतो अशा शब्दांना **वाक्पारुष्य** म्हणतात." निंदा तीन प्रकारची असते : **निष्ठुर** (एकाद्याला उद्देशून उच्चारलेले मूर्ख, वेडा ह्यांच्यासारखे लज्जाकारक शब्द), **अश्लील** (असभ्य अथवा चीड आणणारे शब्द), **तीव्र** (अतिघोर पातक केल्याचा आरोप करण्यासारखे निर्दयपणाने उच्चारलेले शब्द). वाक्पारुष्याचे **सामान्य, मध्यम** आणि **सर्वात अधिक** असेही तीन भेद केले आहेत. ह्या निरनिराळ्या भेदांना अनुसरून वाक्पारुष्याबद्दल कमीअधिक शासन असते. (नारद १८-२।३). निंदा करणारा आणि ज्या व्यक्तींची निंदा केली असेल ती व्यक्ती ह्यांच्या जातींना अनुसरूनही शासनामध्ये भेद करावयाचा असतो. उदाहरणार्थ, निंदा करणारा आणि ज्याची निंदा केली तो समान जातीचे असल्यास सामान्य निंदेबद्दल १२ पण दंड करावा परंतु केलेली निंदा अश्लील असेल तर त्याच्या दुप्पट (२४ पण) दंड करावा. (मनु. ८·२६८।६९). जातींना अनुसरून आणि निंदेच्या प्रकारांना अनुसरून शिक्षेमध्ये भेदभाव करणारे नियम निदान इ. स. च्या १२ व्या शतकात तरी लुप्त झाले होते आणि भारतातील राजे त्या नियमांची अंमलबजावणी करीत नसत असे स्मृतिचंद्रिका [....संप्रति तदर्थानुष्ठाननिष्ठप्रजाशिक्षकाभावाद् वृथा । स्मृ. चं. २. पा. ३२७.] (२ पा. ३२७) आणि मदनरत्न ह्या ग्रंथांतील विधानावरून दिसून येते.

केलेला आरोप खरा असला तरी शिक्षेतून सुटका होत नसे परंतु अल्प प्रमाणात दंड करण्यात येत असे. (मनु. ८·२७४). उपरोधिक स्तुती देखील शासनार्ह समजली जात असे. राजा आपले कर्तव्य करीत असताना त्याची निंदा करणाऱ्याची जीभ तोडावी अथवा त्याची सर्व मिळकत जप्त करावी असे नारद (१८·३०) आणि याज्ञ (२·३०२) यांनी सांगितले असून धर्माप्रमाणे वर्तन करणाऱ्या उच्च तीन वर्णाच्या एकाद्या मनुष्याची एकाद्या शूद्राने निंदा केल्यास त्याला तीच शिक्षा करावी असे आप. ध. सू. सूत्रात (२·१०·२७·१४) सांगितले आहे.

**दंडपारुष्य.** दुसऱ्या कोणाच्या अवयवांना हात, पाय, शस्त्र अथवा दगडासारखे काही साधन ह्यांनी दुखापत करणे अथवा राखेसारखे पदार्थ दुसऱ्याच्या अंगाजवळ आणून त्याला अपवित्र करणे अथवा त्याला दुःख देणे ह्याला दंडपारुष्य म्हणतात. अशी व्याख्या नारदाने (१८·४) केली आहे. जनावरांना आणि झाडांना दुखापत करणे ही गोष्ट देखील दंडपारुष्यात येते असे मिताक्षरेने (याज्ञ. २·२३२) म्हटले आहे. दंडपारुष्याचे सौम्य, मध्यम, आणि **अत्यंत शासनार्ह** असे तीन प्रकार असतात. (नारद १८·५।६). हल्ला करण्याची नुसती तयारी करणे हा **सौम्य** प्रकार, प्रत्यक्ष निःशंकपणे हल्ला करणे हा **मध्यम** प्रकार आणि जखम करणे हा **अत्यंत शासनार्ह** प्रकार होय.

अनुक्रमणिका

दंडपारुष्याबद्दल अथवा वाक्पारुष्याबद्दल शासन करण्याविषयी काही सामान्य नियम सांगितले आहेत. (नारद १८·७·१२ आणि मिताक्षरा या. २·२१२). उदाहरणार्थ, दुसऱ्याने निंदा केली अथवा हल्ला केला तरीही त्याची उलट निंदा न करणे अथवा त्याच्यावर उलट हल्ला न करणे ही गोष्ट प्रशंसनीय समजावी. निंदा केल्यास त्याच्या निंदेला अथवा हल्ला केल्यास त्याला प्रतिकार केला तर ज्याने प्रथम तंटा उपस्थित केला असेल त्याला प्रतिकार करणाऱ्यापेक्षा अधिक कडक शासन करावे. प्रथम तंटा कोणी उपस्थित केला हे शोधून काढणे शक्य नसेल तर दोघांनाही सारखेच शासन करावे. दोघांचे भांडण झाले असल्यास जो अधिक वेळपर्यंत भांडत राहिला असेल त्याला अधिक शासन करावे. जातीला अनुसरून कडक अथवा सौम्य शासन असते. उदाहरणार्थ, एकाद्या शूद्राने उच्च तीन वर्णांच्यापैकी एकाद्या व्यक्तीला आपल्या शरीराच्या ज्या अवयवाने प्रहार केला असेल तो तो अवयव तोडण्याची शिक्षा करावी. एकाद्या शूद्राने ब्राह्मणाच्या अंगावर मलमूत्र विसर्जन केले तर त्याचा तो अवयव तोडण्याची शिक्षा करावी. जर कोणी व्यक्तीने दुसऱ्याला दुखापत केली तर राजाने अपराध करणाऱ्याला दंड करावा आणि शिवाय जखमी इसमाला औषधोपचाराला झालेला खर्च आणि तो नेहमीचे काम करण्यास समर्थ होईपर्यंतचा त्याचा अन्नखर्च राजाने अपराध्याकडून जखमी इसमाला देववावा. अपराध करतेवेळी तो मनुष्य मादक द्रव्याच्या अंमलात असला अथवा त्याचे डोके ठिकाणावर नसले अथवा त्याने चुकीने तसे केले असले तर त्याला शिक्षा करू नये अथवा नेहमीच्या निम्याइतका दंड करावा.

(ब्राह्मणांव्यतिरिक्त इतर) कोणी अविचारी (आततायी) मनुष्याने हल्ला केल्यास **आत्मसंरक्षणाकरिता** जरूर तर त्याचा वध करून देखील शक्तीच्या जोरावर प्रतिकार करावा. कोणालाही स्वतःचे स्त्रियांचे आणि दुर्बल लोकांचे संरक्षण करण्याकरिता दुसऱ्याला प्रतिकार करण्याचा आणि त्याला ठार मारण्याचा अधिकार असतो आणि त्या अधिकाराची अमंलबजावणी करीत असताना एकाद्या ब्राह्मण जातीच्या प्रतिस्पर्ध्याचा वध झाला तरीही असा वध केल्याबद्दल राजाकडून शिक्षा होत नाही आणि ब्राह्मण वधाबद्दल करावयाचे प्रायश्चित्तही अल्प असते. (याज्ञ. २·२१ वरील मिता). अशा लोकांना त्यांनी योजलेल्या कृत्यापासून काठीने केवळ जखम करून परावृत्त करणे शक्य असेल तेव्हा त्यांचा वध करणे हा अपराध होईल. (अपरार्क पा. १०४३; याज्ञ. ३·२२७). नखे, शिंगे अथवा दाढा असणाऱ्या प्राण्यांनी तसेच घोडे आणि हत्ती ह्यांनी आपल्यावर हल्ला केला असल्यास त्यांचा वध करण्यास प्रत्यवाय नाही. (कात्या. ८०५ स्मृ. चं. २ पा. ३१६).

———

अनुक्रमणिका

## प्रकरण ८३

# स्तेय (चोरी)

(मू, ग्रं. पा. ३.५१९-५३०)

तस्कर, स्तेन आणि तायु हे शब्द ऋग्वेदामध्ये (६·२८.३; ८.२९·६ इ०) अनेक वेळा आले आहेत. ह्याच अर्थाचा 'मलिम्लु' हा शब्द वाज०संहिते संहितेमध्ये (११·७९) आढळतो.

'एकाद्या मनुष्यापासून त्याची संपत्ती गुप्त अथवा उघड रीतीने, तसेच रात्री अथवा दिवसा हिरावून घेणे' अशी **स्तेय** ह्याची व्याख्या कात्यायनाने (८१०) केली आहे. चोरलेल्या वस्तूच्या किंमतीला अनुसरून स्तेय हे तीन प्रकारचे असते (नारद १७·१३—१६); **क्षुल्लक** (मातीची भांडी, आसने, शय्या इत्यादी); **मध्यम** (रेशमी कपड्यांव्यतिरिक्त इतर कपडे, गाई बैलांच्या व्यतिरिक्त इतर जनावरे, सोन्या व्यतिरिक्त इतर धातु) आणि **सर्वात अधिक महत्त्वा**चे (सोने, रत्ने, रेशमी कपडे, स्त्रिया, गुरेढोरे इ०). **चोरांचे प्रकाश** (उघड) आणि **अप्रकाश** (गुप्त) असे दोन प्रकार असतात. असे चोर शोधून काढण्याकरिता राजाने सभागृहे, उपहारगृहे, दारूची दुकाने, वेश्यांची गृहे इत्यादी निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळे वेष घेतलेले गुप्तहेर ठेवावे. एकाद्याचे लक्ष दुसरीकडे वेधले असताना हळूच त्याच्याजवळचे द्रव्य काढून घेणारे, घरफोडी करणारे, वाटमारी करणारे, खिसेकापू, स्त्रिया अथवा पुरुष, अथवा गुरेढोरे चोरून नेणारे इत्यादी निरनिराळ्या नऊ प्रकारचे चोर असतात. (मनु. ९·२६१-२६९). चोरांना कसे शोधून काढावे आणि कसे पकडावे ह्याविषयी अनेक नियम याज्ञ. (२·२६६-६८) आणि नारद (परि. ९-१२) ह्यांनी दिले आहेत. उदाहरणार्थ, द्रव्यार्जनाचा काही उघड व्यवसाय नसणारा, उधळेपणाने खर्च करीत असलेला, हरवलेला माल अथवा आडगिऱ्हाइकी माल विकत असलेला अथवा वेषांतर करून हिंडत असलेला, दुसऱ्याच्या घरांची अथवा संपत्तीची चौकशी करीत असलेला अशा मनुष्यांना संशयावरूनही पकडावे. कोणालाही केवळ संशयावरून शिक्षा देता उपयोगी नाही (याज्ञ. २·२६८ वरील मिताक्षरा) कारण एकाद्या निरपराधी मनुष्याजवळ देखील चोरीचा माल असू शकेल अथवा दुसरेही काही लक्षण असू शकेल. ह्याकरिता अशा संशयावरून पकडलेल्या लोकांची राजाने काळजीपूर्वक चौकशी केली पाहिजे. जेव्हा एकाद्याला चोर असल्याच्या संशयावरून अटक केली असते तेव्हा त्या मनुष्याने तो अपराध नाकबूल केला एवढ्यावरून त्याला सोडून देता येत नाही, तर त्याला आपले निरपराधित्व, (मी त्या ठिकाणी नसून अन्य ठिकाणी होतो अशासारख्या) पुराव्याने अथवा दिव्य करून सिद्ध करावे लागते. (याज्ञ २·२६९). संशयावरून चुकीने शिक्षा दिल्याचे मांडव्य ऋषीचे उदाहरण प्रसिद्ध आहे.

**उघड रीतीने चोरी करणाऱ्या** चोरानां द्यावयाच्या **शिक्षेसंबंधी सर्वसाधारण नियम** असा सांगितला आहे की अशी शिक्षा अपराध्याच्या सांपत्तिक स्थितीला अनुसरून न देता अपराधाच्या कमीअधिक गंभीर स्वरूपाला अनुसरून द्यावी. (व्यास स्मृ. चं. २ पा ३१७).

**गुप्त चोरी करणाऱ्यांच्या** बाबतीत काही विशेष नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, चांगल्या कुलांतील पुरुष आणि विशेषतः स्त्रिया पळवून नेण्याबद्दल आणि मौल्यवान रत्नांची चोरी करण्याबद्दल देहान्ताची शिक्षा सांगितली आहे. (मनु ८·३२३). शिक्षेसंबंधी दुसरेही नियम आहेत. अल्प मोलाची वस्तु

चोरल्याबद्दल त्या वस्तूच्या किमतीच्या पांचपट इतका दंड करावा. (नारद-परि. २२·२४). उच्च जातीच्या मनुष्यांना चोरी करण्याबद्दल इतरांपेक्षा अधिक दंड करावा, कारण त्यांना त्यांच्या उच्च दर्जाच्या आणि संस्कृतीच्या योगाने अधिक समजत असते असे गृहीत धरले जाते. ब्राह्मण जातीच्या चोराबद्दल असे सांगितले आहे की ब्राह्मणाने कोणताही अपराध केला असला तरी त्याचा वध करू नये. (मनु. ८·३८०). त्याला देशातून हद्दपार करावे आणि त्याला त्याची सर्व संपत्ती आपल्या बरोबर घेऊन जाऊ द्यावे. ह्यालाही काही अपवाद सांगितले आहेत. विद्यासंपन्न नसलेला ब्राह्मण जर चोरीच्या मालासहित अथवा विरहित पकडला आणि त्याचा अपराध निश्चितपणे सिद्ध झाला तर त्याला उचित अशा चिन्हाचा डाग द्यावा आणि त्याची सर्व मिळकत जप्त करावी; अथवा असा ब्राह्मण सुदृढ शरीराचा असेल तर त्याच्या पायात बेड्या घालून त्याला सुरक्षित पाहऱ्यात ठेवावे, अपुरे अन्न खाण्यास द्यावे आणि आमरणान्त राजाकरिता कष्टाचे काम करावयास लावावे. (कात्या ८२४-८२५).

चोरांना अन्न आणि आसरा देणारे, चोरीचा माल विकत घेणारे, चोरांना दडवून ठेवणारे ह्यांना चोरांसारखीच शिक्षा करावी. चोरी करण्याकरिता जाण्यास मार्गदर्शन करणारे, चोरीची अवजारे अथवा द्रव्य देऊन साह्य करणारे ह्यांना सर्वात अधिक दंड करावा. (मनु. ९·२७१, २७८).

काही विशिष्ट प्रसंगी दुसऱ्याच्या मालकीची वस्तु त्याच्या संमतीशिवाय घेतली तरी तो घेणारा चोर म्हणून शिक्षेला पात्र होत नाही. उदाहरणार्थ, उच्च तीन वर्णांपैकी एकाद्या व्यक्तीने गाईकरिता कोणत्याही ठिकाणचे गवत आणि अग्नीच्या पूजेकरिता समिधा, फुले, झाडावरील फळे जणू काय स्वतःच्या मालकीची आहेच अशा रीतीने घेण्यास प्रत्यवाय नाही. त्याबद्दल त्याला दंड पडत नाही आणि ते कृत्य पातकही होत नाही. स्वतःजवळ धान्य नसल्यामुळे तीन दिवस उपोषण केल्यानंतर चौथ्या दिवशी त्याला शेतातील धान्य जेथे कोठे मिळेल तेथून एक दिवसाला खाण्याला लागेल तितके घेण्यास प्रत्यवाय नाही. (मनु ८·३३९; ११·१६-१८).

**साहस.** राजाच्या अधिकाऱ्याच्या अथवा संरक्षकाच्या अथवा लोकांच्या प्रतिकाराला न जुमानता अथवा त्यांच्या समक्ष बलाचा उपयोग करून केलेले कोणतेही कृत्य ते साहस अशी व्याख्या मनु (८·३३२), नारद (१७·१) प्रभृतींनी सांगितली आहे. **चोरी** आणि **साहस** ह्यांच्यामध्ये असा भेद असतो की दुसऱ्याची संपत्ती त्याच्याजवळून **(बलाचा उपयोग न करता) गुप्त रीतीने** हरण करणे ह्याला **चोरी** म्हणतात आणि तीच संपत्ती **बलाचा उपयोग करून** अथवा **दांडगाईने** हरण करणे ह्याला **साहस** म्हणतात. साहसात समावेश होणारे प्रमुख अपराध म्हणजे मनुष्यवध, परस्त्रियांवर बलात्कार आणि दरवडा घालणे हे होत आणि ह्यातच दोन प्रकारची पारुष्ये ह्यांचा समावेश करून **साहसाचे चार प्रकार** असल्याचे कोणी सांगतात. वरील अपराधांपैकी परस्त्रियांवर बलात्कार ह्याबद्दलचे विवेचन पुढे स्त्रीसंग्रहण ह्या सदरात करण्यात येईल.

साहसाबद्दलच्या **शिक्षेसंबंधी असा एक सर्वसामान्य नियम** बृहस्पतीने [साहसं पञ्चधा प्रोक्तं वधस्तत्राधिकः स्मृतः । तत्कारिणो नार्थदमैः शास्या वध्याः प्रयत्नतः ॥ बृह. (पौ. ध. ग्रं. खं ३३ पा. ३६३).] (पौ. ध. ग्रं. ३३ पा ३६३) सांगितला आहे की बलाचा उपयोग करून केलेल्या मनुष्यवधाबद्दल देहान्ताची शिक्षा द्यावी, दंडाची शिक्षा देऊ नये. ह्या नियमाला काही अपवादही सांगितले आहेत. ब्राह्मणाला देहान्ताची शिक्षा देऊ नये, तसेच ब्राह्मणाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणी अनवधानाने महापातके केली असतील तर त्याची सर्व मालमत्ता जप्त करावी परंतु जर बुद्धिपुरस्सर मनुष्यवध केला असेल तर मात्र देहान्ताची शिक्षा द्यावी. अपराध्याच्या जातीप्रमाणेही शिक्षेमध्ये फरक होत असे. (बौ. ध. सू. १·१० २०।२१). क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र ह्यांनी

ब्राह्मणाचा वध केला तर त्यांना निरनिराळ्या प्रकारांनी देहान्त करण्याची शिक्षा द्यावी. आपल्याच जातीच्या अथवा कनिष्ठ जातीच्या मनुष्याचा वध केला असल्यास गुन्ह्याला अनुसरून आणि अपराध्याच्या शक्तीला अनुसरून योग्य अशी शिक्षा करावी. खुनी व्यक्तीने निर्दयपणा केला नसला तर त्याचे निरनिराळ्या प्रकारचे हाल न करता केवळ देहान्ताची शिक्षा करावी. ब्राह्मणपुरुषाचा वध करण्याबद्दलचे प्रायश्चित्त **आत्रेयी** (रजस्वला अथवा अत्रि गोत्रातील) स्त्रीच्या वधाबद्दलही करावे असे सांगितले आहे. (मनु. ११·८७).

काही विशिष्ट प्रसंगी मनुष्यवध झाला अथवा दुखापत झाली तरी त्याबद्दल शिक्षा सांगितली नाही. उदाहरणार्थ, गाडीचे चाक मोडले अथवा बैलाची वेसण तुटली आणि त्यामुळे अपघात झाला तर गाडीवानाला काहीही शिक्षा होत नाही. (मनु. ८·२९१-२९२).

दुसऱ्यांना अपराध करण्याची चिथावणी देणाऱ्याला अपराध करणाऱ्याच्या दुप्पट शिक्षा करावी आणि अपराध्याला द्रव्य देण्याचे आश्वासन देणाऱ्याला चौपट शिक्षा करावी. (याज्ञ. २·२३१). अनेक लोकांनी मिळून एकाद्यावर बलात्कार करून त्याचा वध केला असेल तर ज्याने त्याच्या मर्मस्थानावर प्राणान्तिक हल्ला केला असेल तो खुनी समजावा. (कात्या. ७९८). जे लोक अपराधाला प्रारंभ करतात, अथवा त्या अपराधाला साह्य करतात, त्यांना प्रत्यक्ष अपराध करणाऱ्याच्या निम्याइतकी शिक्षा करावी. अपराधाला संमती देणारा, अपराध घडण्यास प्रतिबंध करण्याचे अथवा टाळण्याचे सामर्थ्य अंगात असूनही प्रतिबंध न करणारा अथवा न टाळणारा हे सर्वही वास्तविकपणे अपराध करणारेच असतात आणि राजाने अशा व्यक्तींना त्यांच्या त्यांच्या सामर्थ्याला अनुसरून आणि त्यांनी केलेल्या अपराधाला अनुसरून शासन करावे असे कात्यायन (८·३२·३४) आणि बृहस्पती (पौ. ध. ग्रं. ३३. पा ३६४) यांनी सांगितले आहे.

______

अनुक्रमणिका

## प्रकरण ८४

## स्त्रीसंग्रहण (व्यभिचार अथवा एकाद्या स्त्रीबरोबर अवैधिक संभोग)

(मू. ग्रं. पा. ३.५३१—५३७)

एक पुरुष आणि एक स्त्री ह्यांचे संभोगाकरिता अवैधिक (कायद्याविरुद्ध) रीतीने एकत्र येणे म्हणजे **स्त्रीसंग्रहण** अशी व्याख्या (याज्ञ २·२८३ वरील टीकेत मिताक्षरेने) दिली आहे. असे संग्रहण बलात्काराने, फसवून आणि विषयोपभोगाच्या इच्छेने असे तीन प्रकारांनी घडवून आणलेले असते. पहिल्या प्रकारात होणारा संभोग स्त्रीच्या इच्छेविरुद्ध, दुसऱ्या प्रकारात होणारा संभोग स्त्रीला फसवून आणि तिसऱ्या प्रकारात होणारा संभोग तिच्या संमतीने होत असतो. तिसऱ्या प्रकारच्या संग्रहणाचे **क्षुल्लक, मध्यम** आणि **गंभीर** असे तीन भेद असतात. क्षुल्लकामध्ये एकाद्या स्त्रीकडे पाहून हसणे, नेत्रसंकेत करणे ह्यांच्यासारख्या दूर अंतरावरून केलेल्या क्रिया येतात, मध्यम प्रकारात तिला फुले, फळे देणे इत्यादी त्यापेक्षा निकट केलेल्या क्रिया येतात आणि गंभीर प्रकारात स्त्रियेबरोबर एकाच शय्येवर निजणे, चुंबनादि कामुक चेष्टा करणे ह्यांच्यासारख्या अति निकटच्या क्रिया येतात. (बृह. पौ. ध. ग्रं. ३३ पा. ३६६).

बलात्काराने केलेला संभोग आणि संमतीने केलेला व्यभिचार ह्या अपराधाबद्दलची शिक्षा त्या अपराधाशी संबंध असलेला पुरुष आणि स्त्री यांची जात, तसेच ती स्त्री विवाहित होती किंवा अविवाहित होती, आणि ती स्त्री संरक्षित (गुप्ता) होती किंवा असंरक्षित होती ह्यांना अनुसरून भिन्नभिन्न असे. उदाहरणार्थ, समान जातीच्या स्त्रीबरोबर बलाने संभोग केल्यास पुरुषाची सर्व मालमत्ता जप्त करावी, त्याचे शिश्न आणि वृषण कापावे आणि त्याची गाढवावर बसवून धिंड काढावी. संभोग केलेली स्त्री पुरुषापेक्षा कनिष्ठ जातीची असेल तर वरील शिक्षेच्या अर्ध्याइतकी शिक्षा करावी आणि वरिष्ठ जातीची असेल तर पुरुषाची सर्व मालमत्ता जप्त करून देहान्त शिक्षा द्यावी. पहिल्या आणि दुसऱ्या प्रकारच्या स्त्रीसंग्रहणात स्त्रीला काहीही शिक्षा नसते. परंतु तिला पतीहून भिन्न पुरुषाचा संबंध झालेला असतो म्हणून कृच्छ्र अथवा पराक प्रायश्चित्त करावे लागे.

उभयतांच्या संमतीने केलेल्या संभोगाबद्दल स्त्रीपुरुष समान जातीची असल्यास पुरुषाला सर्वात अधिक प्रकारचा दंड करावा, कनिष्ठ जातीची असल्यास त्याच्या निम्मा दंड करावा आणि वरिष्ठ जातीची असल्यास पुरुषाला देहान्ताची शिक्षा द्यावी आणि स्त्रीचे कान वगैरे अवयव तोडावे.

सापत्न माता, भगिनी, गुरुपत्नी अशासारख्या अत्यंत निकट नात्याच्या अथवा विशिष्ट संबंध असणाऱ्या स्त्रीशी संभोग करण्याला **गुरुतल्पगमन** अशी संज्ञा आहे. (नारद १५· ७३—७५; मनु. ११·१७०-७१). अशा अपराधाबद्दल पुरुषाचे शिश्न कापून टाकण्याची शिक्षा द्यावी अथवा कोणाच्या मताने देहान्ताची शिक्षा द्यावी. संन्यासिनी स्त्री, दासी, वेश्या (तिच्या इच्छेविरुद्ध) ह्यांच्याबरोबर केलेल्या मैथुनाबद्दल कमीअधिक दंडाची शिक्षा द्यावी. (याज्ञ २·२९३). अनैसर्गिक अपराधाबद्दलही दंडाची शिक्षा सांगितली आहे. (कौटि. ४·१३).

दुसऱ्याच्या पत्नीबरोबर एकान्तात संभाषण करणे हा अपराध समजला जात असे. परंतु हा नियम नट, गवई ह्यांच्यासारख्या आपल्या स्त्रियांच्या कमाईवर उपजीविका करणाऱ्या लोकांच्या स्त्रियांना लागत नाही. कारण असे लोक आपण होऊन आपल्या स्त्रियांची इतरांना ओळख करून देतात आणि त्यांना परक्या पुरुषांबरोबर मिसळू देतात. (मनु ८· ३६२).

अविवाहित स्त्रीबरोबर केलेल्या व्यभिचाराबद्दल केवळ सर्व मिळकत जप्त करण्याची शिक्षा आप. ध. सू. (२·१०·२६·२०-२१) सांगितली आहे परंतु याज्ञ. (२·८८), मनु (८·३६६) प्रभृतींनी ह्याच्यापेक्षाही पुढे जाऊन असे म्हटले आहे की, जर एकाद्या पुरुषाने आपल्याच जातीच्या कुमारिकेबरोबर समागम केला आणि त्या कृत्याला त्या कुमारिकेने प्रोत्साहन दिले असले तर त्याच्यायोगाने राजाने शिक्षा देण्यासारखा अपराध घडत नाही, परंतु त्या पुरुषाने त्या कुमारिकेला अलंकार दिले पाहिजेत, तिचा सत्कार केला पाहिजे आणि तिच्याबरोबर विवाह केला पाहिजे.

पतीचा तिरस्कार करणाऱ्या स्त्रिया नरकाला जातात अशी भावना ऋग्वेदात (४·५·५) व्यक्त केली आहे परंतु वरुणप्रघास ह्या यागात यजमान पत्नीला आपला कोणी प्रियकर असल्यास ती गोष्ट कबूल करावी लागते आणि तिने तसे केल्यानंतर प्रायश्चित्त केल्यावर तिला यज्ञात भाग घेऊ दिला जात असे.

**स्त्रीपुंधर्म.** (पतीपत्नी ह्यांची कर्तव्ये). स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या विवाहासंबंधीचे आणि इतर तदनुषंगिक बाबींसंबंधीचे नियम स्त्रीपुंधर्म ह्या व्यवहारपदात येतात. ह्या सदराखाली येणाऱ्या बहुतेक सर्व गोष्टींचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे. पतीपत्नी ह्यांनी केलेल्या कर्जाच्या जबाबदारीचे विवेचन ऋणादान ह्या सदरात केले आहे. नवऱ्याच्या मिळकतीच्या वारसासंबंधी विवेचन दायभाग ह्या सदरात करण्यात येईल.

**स्त्रियांच्या संबंधी काही विधाने** धर्मशास्त्रकारांनी केली आहेत. मनूने (९·१० आणि ९·२२-२४) म्हटले आहे की स्त्रियांना बलात्काराने एकान्तात कोंडून ठेवून त्यांचे संपूर्णतः संरक्षण करणे शक्य नसते. त्यांची मनें कुटुंबातील कृत्यांत गुंतवून ठेवली पाहिजेत. पतीने पत्नीच्या प्रेमाला आणि आदराला पात्र होण्याचा प्रयत्न केला पाहिजे आणि पत्नीला मान दिला पाहिजे. नारदाने (१६·३०) म्हटले आहे की चांगल्या कुळातील स्त्रियादेखील स्वातंत्र्याच्या योगाने विनाश पावतात. मनू (९·२) म्हणतो की जर स्त्रिया विषयोपभोगात आसक्त होतील तर त्यांना अंकित आणि आपल्या सत्तेखाली ठेवणे हे पती आणि त्याच्या कुटुंबातील इतर पुरुष ह्यांचे पहिले कर्तव्य असते.

—————

## प्रकरण ८५

## द्यूत समाह्वय (जुगार आणि बक्षीस लावून लढणे)

(मू. ग्रं. पा. ३.५३८-५४२)

जो खेळ फांसे, चामड्याचे, हस्तिदंताचे आणि त्यासारख्या वस्तूचे तुकडे ह्यांच्यासारख्या निर्जीव पदार्थांच्या साहाय्याने खेळला जातो आणि ज्यात काही तरी पण असतो त्याला द्यूत म्हणतात आणि कोंबडे, पारवे, बोकड, रेडे आणि मल्ल ह्यांच्यासारख्या सजीव प्राण्यांच्या साहाय्याने खेळण्यात येणाऱ्या खेळाला **समाह्वय** असे म्हणतात अशा व्याख्या मनु (९·२२३) प्रभृतींनी दिल्या आहेत.

द्यूत आणि समाह्वत ह्या गोष्टी राष्ट्राच्या नाशाला कारण होतात ह्याकरिता राजाने त्या बंद करण्यास झटले पाहिजे असे मनूचे (९·२२१-२२२) मत होते परंतु द्यूताच्या योगाने चोरांना हुडकून काढण्यास मदत होते आणि द्यूतापासून राजाला कराची प्राप्ती होते ह्याकरिता राजाच्या नियंत्रणाखाली द्यूत खेळण्यास याज्ञ. (२·२०३) आणि कौटिल्य (३·२०) यांनी अनुमती दिली होती.

ज्या सभागृहात द्यूत खेळले जाते त्या गृहावर नेमलेल्या अधिकाऱ्याला **सभिक** असे म्हणत. (याज्ञ. २·१९९). हरलेल्या द्यूतकाराने जिंकणाऱ्या द्यूतकाराला द्यावयाच्या वस्तूला अथवा रकमेला **पण** अथवा **ग्लह** म्हणतात. द्यूतात लावलेल्या पणाला अनुसरून द्यूतकारांकडून सभिकाला **शुल्क** मिळते आणि राजाकडून सभिकाला मिळणाऱ्या संरक्षणाबद्दल सभिक राजाला कर देतो. पण १०० पणाइतका अथवा त्यापेक्षा अधिक असेल तर शेकडो ५ आणि त्यापेक्षा कमी असेल तेव्हा शेकडा १० इतके शुल्क सभिकाला मिळावे असे पराशरमाधवीयात (३ पा. ५७४) म्हटले आहे तर अपरार्काच्या (पा. ८०२) मताप्रमाणे जिंकणाऱ्या द्यूतकाराकडून शेकडा ५ आणि हरणाऱ्या द्यूतकाराकडून शेकडा १० इतके शुल्क सभिकाला मिळावे. ह्याशिवाय जागा, पाणी ह्यांच्याबद्दल भाडेही आकारता येत असे. हरलेल्या द्यूतकाराकडून पणाची रक्कम वसूल करून ती जिंकणाऱ्या द्यूतकाराला सभिक देत असे अथवा प्रथम स्वतःच्या पैशांतून देऊन मागून तो वसूल करीत असे.

द्यूत गुप्त रीतीने अथवा राजाच्या आज्ञेशिवाय अथवा खोट्या फाशांनी अथवा लबाडीच्या युक्त्या योजून खेळल्यास द्यूतकारांना पणाची रक्कम वसूल करून घेता येत नाही, सभिकाला त्याचे शुल्क मिळत नाही आणि शिवाय राजाकडून कपाळावर डाग देऊन हद्दपार करण्याची शिक्षा करण्यात येते. (नारद १९·६।७). पणाची रक्कम वसूल करण्यासंबंधीही काही नियम आहेत. (कात्या ९४१). उदाहरणार्थ, एकाद्या अनभिज्ञ द्यूतकाराचा पराजय झाला तरी त्याला पण देण्यास लावू नये, द्यूतात पटु असणाऱ्याने द्यूतात एकाद्याचे सर्वस्व हरण केले तरी त्याला सर्व मिळकत देण्यास भाग पाडू नये. ह्यासंबंधी आणि द्यूतात लबाडी केली असल्याविषयी सर्व निर्णय द्यूतगृहाच्या रक्षकाकडे असे. द्यूताचे सर्व नियम समाह्वयाला लागतात. (याज्ञ. २·२०३).

द्यूत हे अत्यंत प्राचीन व्यसनांपैकी एक आहे. ऋग्वेदात (१०·३४; १·४१·९ इ.) देखील त्याचा उल्लेख केला आहे. आणि एका द्यूतकाराचा विलाप दिला आहे. बिभीतक वृक्षाचे केलेले फासे पातकांच्या

अनुक्रमणिका

अनेक उत्पत्तिस्थानांपैकी एक स्थान असल्याचे त्यात म्हटले आहे. महाभारतातील (सभा. अ. ५८ इ) युधिष्ठिराने खेळलेल्या द्यूताची कथा प्रसिद्ध आहे. द्यूतामुळे सज्जनांच्या चित्ताला भ्रंश उत्पन्न होतो आणि सामान्यतः सदाचरणी नसणाऱ्यांमध्ये द्यूतामुळे भेदभाव उत्पन्न होऊन संकटे ओढवतात हे सर्वांना कळत होते. [अक्षद्यूतं महाप्राज्ञ सतां मति विनाशनम् । असतां तत्र जायन्ते भेदाश्च व्यसनानि च ॥ उद्योग १२८·६.] (उद्योग १२८·६). द्यूत हा खेळ इतका दोषार्ह आणि अवनतिकारक आहे की सर्वात श्रेष्ठ आणि सर्वात उत्तम असे लोक देखील एकदा त्या खेळात गुंतले की त्यांच्या कर्तव्याच्या, नीतीच्या आणि प्रेमाच्या भावना नष्ट होतात ही गोष्ट लोकांच्या मनावर बिंबवावी हाच बहुधा महाभारताच्या श्रेष्ठ ग्रंथकाराचा ही कथा वर्णन करण्यात हेतु असावा असे वाटते. पुराणांनी देखील द्यूताचा निषेध केला आहे आणि द्यूतासारखे कोणतेही पातक असत नाही असे म्हटले आहे. (ब्रह्मपुराण १७१· २९-३८).

———

अनुक्रमणिका

# प्रकरण ८६

## दायभाग (संपत्तीचे वाटप)

(मू. ग्रं. पा. ३·५४३-६६१)

वैदिक वाङ्मयाच्या सर्वात जुन्या कालात देखील '**दाय**' ह्या शब्दाचा उपयोग केलेला आढळतो. ऋग्वेदामध्ये (२·३२·४; १०·११४·१०) त्या शब्दाचा अर्थ विभाग अथवा पारितोषिक असा असावा असे दिसते. तैत्तिरीय सं. (३·१·९·४) आणि ब्राह्मणग्रंथ (ताण्ड्यब्रा. १६·४·३-५) ह्यात त्याचा अर्थ 'पितृपरंपरेने आलेली संपत्ती' अथवा नुसती 'संपत्ती' हा असावा. सूत्रग्रंथांत आणि स्मृतींत येणारा 'रिक्थ' (वारसा) हा शब्दही ऋग्वेदात (३·३१·२) वापरला आहे. 'दायाद' म्हणजे सहभागीदार, विभाग ग्रहण करणारा हा शब्द वैदिक वाङ्मयात पुष्कळ वेळा येतो. (तै. सं. ६·५·८·२; अथर्व ५·१८·६).

दायभाग ह्या व्यवहारपदामध्ये 'वाटप' आणि 'वारसा' ह्या दोन प्रमुख विषयांचे विवेचन करण्यात येते. ह्या विषयांसंबंधीचे निदान एक हजार वर्षांपासून अतिशय भिन्न मते असणाऱ्या दोन परंपरा अस्तित्वात आहेत. त्यांना त्या त्या परंपरेमधील मिताक्षरा आणि दायभाग ह्या प्रमुख ग्रंथांवरून **मिताक्षरा परंपरा** आणि **दायभाग परंपरा** अशा संज्ञा देण्यात आल्या आहेत. दायभाग परंपरेचे प्राबल्य बंगालमध्ये विशेष असून बंगालव्यतिरिक्त बाकीच्या सर्व भारतात मिताक्षरा परंपरा प्रमाण मानण्यात येते. दायभाग परंपरेतील प्रमुख संस्कृत ग्रंथ जीमूतवाहनकृत **दायभाग**, रघुनंदनकृत **दायतत्त्व** आणि श्रीकृष्णतर्कालंकारकृत **दायक्रमसंग्रह** हे तीन आहेत. मिताक्षरा परंपरेचे चार पोटविभाग असून त्यात याज्ञवल्क्य स्मृतीवरील विज्ञानेश्वर कृत **मिताक्षरा टीका** हा ग्रंथ प्रमुख आधार आहे आणि त्याला पूरक (आणि काही बाबतींत भिन्न असणारे) असे पुढील ग्रंथ आहेत :– **वाराणशी परंपरा** (वीरमित्रोदय), **मिथिलापरंपरा** (विवादरत्नाकर, विवादचंद्र आणि विवादचिंतामणी), **महाराष्ट्र** अथवा **मुंबई परंपरा** (व्यवहारमयूख), **द्रविड** अथवा **मद्रास परंपरा** (स्मृतिचंद्रिका, पराशरमाधवीय आणि सरस्वतीविलास).

**दाय** आणि **विभाग** ह्या शब्दांच्या निरनिराळ्या व्याख्या करण्यात आल्या आहेत. उदाहरणार्थ, ज्या व्यवहारपदात पुत्रांनी आपल्या पित्याच्या संपत्तीचे वाटप केल्याचा संबंध असतो त्याला दायभाग म्हणावे अशी व्याख्या नारदाने (दायभाग १) केली आहे. जी संपत्ती एकाच्या मालकीची असून त्या मालकाशी नाते आहे एवढ्याच कारणाने ती दुसऱ्याच्या मालकीची होते ती दाय अशी व्याख्या मिताक्षरेने केली असून ज्या संपत्तीचे वाटप करावयाचे असते आणि जी एकदा विभक्त होऊन पुन्हा एकत्र झालेल्या भागीदारांच्या मालकीची होत नाही अशी संपत्ती ती दाय असे व्यवहारमयूखात (पा. ९३) म्हटले आहे.

मिताक्षरापरंपरेतील मिताक्षरा, व्यवहारमयूख प्रभृति ग्रंथांनी दायाचे '**अप्रतिबंध**' आणि '**सप्रतिबंध**' असे दोन प्रकार केले आहेत. (मदनरत्न व्य. पा. ८९). ज्या प्रकारच्या दायात पिता अथवा पितामह जिवंत असले तरी त्यांच्या स्वाधीन असलेल्या संपत्तीत पुत्र अथवा पौत्र ह्यांना केवळ ते त्या कुलात जन्मले एवढ्याच कारणाने हितसंबंध उत्पन्न होण्यास प्रतिबंध होत नाही तो **अप्रतिबंध** दाय. जेव्हा एकाद्या मनुष्याला त्याच्या चुलत्याची अथवा स्वतःच्या पुत्राची संपत्ती तो चुलता अथवा पुत्र संततिहीन मरण पावल्यामुळे मिळते तेव्हा त्या संपत्तीला **सप्रतिबंध** दाय म्हणतात कारण जोपर्यंत तो चुलता अथवा पुत्र

अनुक्रमणिका

जिवंत होतो तोपर्यंत अथवा त्या चुलत्याला अथवा पुत्राला एकादा पुत्र अथवा पौत्र असेल तोपर्यंत त्या चुलत्याच्या अथवा पुत्राच्या संपत्तीत कोणत्याही प्रकारचा अधिकार नसतो. दायभागपरंपरा असे दोन भेद करीत नाही कारण त्यांच्या मताप्रमाणे एकाद्या संपत्तीची मालकी पूर्वीच्या मालकाच्या मृत्यूनंतर अथवा पूर्वीचा मालक पतित अथवा संन्यासी झाल्यामुळे नष्ट होऊन वारसाकडे जाते आणि ह्यामुळे सर्वच दाय सप्रतिबंध असतात. (दाय. १·३०-३१). दायभागाच्या ह्या सिद्धान्ताला **उपरमस्वत्ववाद** (मृत्यूनंतर उत्पन्न होणारी मालकी) असे म्हणतात आणि मिताक्षरेच्या सिद्धान्ताला **जन्मस्वत्ववाद** (जन्मतः उत्पन्न होणारी मालकी) असे म्हणतात. दायभाग आणि मिताक्षरा ह्यांच्यामध्ये हाच मोठा भेद आहे.

दाय ह्या शब्दाच्या व्याख्येत **स्वत्व** (मालकी) ह्या कल्पनेचा अंतर्भाव होतो. एकाद्या मनुष्याला एकाद्या वस्तूवरील **स्वत्व** (मालकी) ज्या प्रकारांनी प्राप्त होते त्यांत **रिक्थ** (वारसा) ह्या प्रकाराचा समावेश शास्त्राने केला आहे. (गौ. १०·३९-४२). परंतु जन्म ह्या प्रकाराने स्वत्व प्राप्त होते असे स्पष्टपणे सांगितलेले नाही तरीही पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र ह्यांच्या व्यतिरिक्त दुसऱ्या कोणालाही एकाद्या नातलगाच्या मिळकतीत जन्माने अधिकार असत नाही ह्याविषयी सर्व ग्रंथकारांचे एकमत आहे. पुत्राला जन्मतः मालकी हक्क मिळतो किंवा नाही ह्या मुद्यावर ह्या दोन परंपरांची भिन्न मते आहेत. दोन्ही बाजूला शास्त्राधार आहेत आणि एकाच शास्त्रवचनाचे दोन परंपरा भिन्न भिन्न अर्थ लावतात.

मालकी हक्काचे निरनिराळे प्रकार असतात. उदाहरणार्थ, संपूर्ण मालकी, समाईक मालकी, उपभोग मिळण्यापुरती मालकी, सशर्त मालकी इत्यादी. एकाद्याने जे संपादन केले असेल ते त्याच्या मालकीचे झाले पाहिजे परंतु पत्नी, पुत्र आणि दास हे तीन जे संपादन करतात ते त्यांच्यावर ज्याची मालकी असते त्याच्या मालकीचे होते असे [भार्या पुत्रश्च दासश्च त्रय एवाधनाः स्मृताः यत्ते समधिगच्छन्ति यस्य ते तस्य तद्धनम् ॥ मनु ८·४१६] मनूने (८·४१६) सांगितले आहे. ह्याचा अर्थ पत्नी, पुत्र आणि दास ह्यांना त्यांनी संपादन केलेल्या वस्तूचा **विनियोग** पती, पिता आणि स्वामी ह्यांच्या संमतीशिवाय स्वतंत्रपणे करता येत नाही असा असल्याचे दोन्ही परंपरा मान्य करतात. परंतु पिता आणि पुत्र ह्यांच्या दरम्यानच्या संबंधासंबंधी वर सांगितल्याप्रमाणे त्या दोन परंपरांची मते वेगवेगळी आहेत. मनुप्रभृतींनी ‘उपरमस्वत्ववाद’ हा सिद्धान्त प्रतिपादन केला होता आणि याज्ञ, विष्णु प्रभृती स्मृतींनी ‘जन्मस्वत्ववाद’ सिद्धान्त प्रतिपादन केला होता. ह्यावरून असे स्पष्ट होते की दायभाग आणि मिताक्षरा ह्या परंपरा त्या त्या ग्रंथांच्या वेळेपासून निघालेल्या नसून त्यांना बऱ्याच प्राचीन काळापासून आधार होते.

ह्या दोन परंपरांचा पुढील चार मुद्यांवर मतभेद आहे :— (१) मिळकतीवरील हक्क **जन्मतः** उत्पन्न होतो हा सिद्धान्त मिताक्षरा मानते आणि दायभाग अमान्य करतो; (२) **वारसाचा हक्क** आणि वारसांमधील **क्रम** ह्या गोष्टी धार्मिक बाबतीतील त्या व्यक्तीच्या **महत्त्वाला अनुसरून** ठरतात हा सिद्धान्त दायभागाने प्रतिपादन केला असून मिताक्षरा परंपरेचे मत ह्या गोष्टी मृत मनुष्याशी असलेल्या **रक्ताच्या संबंधानुसार** ठरतात असे आहे; (३) दायभागाच्या मताने एकत्र कुटुंबातील (बंधु अथवा चुलत बंधु ह्यांच्यासारख्या) भागीदारांना आपल्या हिश्याच्या मिळकतीवर **अपूर्ण स्वरूपाचा** मालकी हक्क असतो आणि प्रत्यक्ष वाटप झाले नसले तरी त्यांना आपल्या हिश्याच्या मिळकतीचा विनियोग करता येतो; (४) दायभागाच्या मताप्रमाणे **अविभक्त कुटुंबात** देखील एकादा पुरुष निपुत्रिक मरण पावल्यास त्याच्या **विधवेकडे** त्या पुरुषाच्या हिश्याच्या मिळकतीचा **वारसा येतो** परंतु मिताक्षरा परंपरेप्रमाणे **तसे होत नाही.**

बाकीच्या सर्व भारतात प्रचलित असलेल्या वारसा हक्कासंबंधीच्या कायद्याशी बऱ्याच महत्त्वाच्या बाबतीत भिन्न असा कायदा एकट्या बंगाल प्रांतातच का असावा ह्याविषयी निरनिराळी कारणे देण्यात येतात. उदाहरणार्थ, त्या प्रांतात अनेक शतकेपर्यंत बुद्धधर्म होता त्यामुळे बुद्धधर्मातील तंत्रग्रंथांचा पगडा त्या प्रांतातील लोकांवर पडला होता असे एक कारण देण्यात येते. परंतु बुद्धधर्मीयांचा वारसासंबंधी स्वतंत्र कायदा नव्हता. तसेच बंगाल प्रांताला समुद्राच्या सान्निध्यामुळे परदेशी व्यापाऱ्यांच्या मार्गाने नव्या नव्या कल्पना आल्या असेही एक कारण देण्यात येते. परंतु भारतातील पश्चिम किनाऱ्यावरील प्रदेशात परदेशाच्या व्यापाऱ्यांचा संबंध अधिक होता. ग्रीक लोकांना भडोच आणि कल्याण ह्या बंदरांची माहिती होती. ह्याप्रमाणेच दुसरीही कारणे खात्री पटविण्यासारखी नाहीत आणि म्हणून दायभागात जी विशिष्ट मते प्रतिपादन केली आहेत त्यांची समाधानकारक उपपत्ती लावता येत नाही असे कबूल करावे लागते. त्या मतांची उत्पत्ती आणि वाढ स्थानिक आणि स्वतंत्र अशा कारणांनी झालेली आहे.

**विभाग** (वाटप). मिताक्षरा आणि दायभाग ह्या दोन परंपरांनी विभाग ह्याची व्याख्या आपल्या मताला अनुसरून वेगवेगळी सांगितली आहे. पुत्रांना जन्मतः वडिलार्जित मिळकतीत हितसंबंध प्राप्त होतो असे मिताक्षरेचे मत असल्यामुळे मिताक्षरेने (याज्ञ. २·११४) **विभाग** ह्या शब्दाची व्याख्या अशी केली आहे की 'ज्या संपत्तीवर अनेक व्यक्तींची समाईक मालकी असते अशा संपत्तीचे निश्चित तुकडे करून ते त्या व्यक्तींना देणे ह्याला विभाग म्हणतात'.

दायभागाच्या मताप्रमाणे जन्मतः कोणालाच मालकी हक्क उत्पन्न होत नाही. बापाच्या मृत्यूनंतर अथवा अन्य कारणाने बापाचा मालकी हक्क नाहीसा झाला म्हणजे प्रत्येक पुत्राला त्या मिळकतीत काही ठरीव भाग प्राप्त होतो. बापाकडून वारसाने आलेली सर्व मिळकत सर्व पुत्रांच्या **समाईक ताब्यात** असते परंतु मालकी **एकत्र** नसते. ह्या मताला अनुसरून दायभागाने (१·८-९) विभाग ह्याची व्याख्या अशी केली की "एकाद्या जमिनीच्या अथवा द्रव्याच्या काही विशिष्ट भागावर एकादा गोळा अथवा गोटी फेकून त्याच्या योगाने त्या भागावर (अनेक व्यक्तींपैकी एका व्यक्तीचे) स्वामित्व असल्याचे दर्शित करणे ह्याला **विभाग** म्हणतात.' वडिलार्जित जमीन अथवा द्रव्य ह्यांच्यापैकी कोणत्या अंशावर कोणत्या व्यक्तींचे स्वामित्व आहे हे निश्चित सांगण्याला काही साधन नसल्यामुळे कोणा एका मनुष्याला वडिलार्जित मिळकतीच्या एकाद्या विशिष्ट अंशाची व्यवस्था करणे शक्य नसते आणि म्हणून प्रत्येक भागीदाराच्या मालकीचा अंश कोणता हे ठरविण्याकरिता असा एकादा गोळा फेकतात. मिताक्षरापरंपरेच्या व्याख्येप्रमाणे विभाग होण्यापूर्वी बाप आणि त्याचे पुत्र आणि पौत्र ह्यांचे एकत्र कुटुंब असल्यास ते सर्वही **सहभागीदार** होतात आणि जोपर्यंत कुटुंब एकत्र असते तोपर्यंत त्या कुटुंबाच्या मिळकतीवरील त्यांचे स्वामित्व एकमुखी असते. प्रत्येक भागीदाराचा त्या मिळकतीतील अंश एकत्र कुटुंबातील भागीदाराच्या मृत्यूच्या आणि जन्माच्या योगाने बदलत (वाढत अथवा घटत) असतो आणि वाटपामुळेच फक्त कोणीही सहभागीदार एकाद्या विशिष्ट अंशाचा मालक होतो. दायभागाच्या मताप्रमाणे बापाच्या मृत्यूनंतरच त्याचे पुत्र सहभागीदार होतात. परंतु त्या मिळकतीची मालकी सर्व सहभागीदारांकडे असत नाही. बापाचा मृत्यू वगैरे कारणाने हक्क नाहीसा होऊन त्याच्या प्रत्येक पुत्राला त्या मिळकतीचा जो ठरीव भाग प्राप्त होतो तो त्यानंतर एकत्र कुटुंबात होणाऱ्या जन्माच्या अथवा मृत्यूच्या योगाने बदलत (वाढत अथवा घटत) नाही.

विभाग दोन अर्थांनी होऊ शकतो : (१) चतुःसीमापूर्वक मिळकतीचे तुकडे पाडून आणि (२) हितसंबंधाची वाटणी करून अथवा हितसंबंध सोडून देऊन दायभागपरंपरेप्रमाणे पूर्वीच्या मालकाच्या मृत्यूनंतरच त्याच्या वारसांकडे कांही विशिष्ट भागांची मालकी येत असल्यामुळे त्यांच्यात होणारा विभाग

सामान्यतः पहिल्या प्रकारचा म्हणजेच चतुःसीमापूर्वक तुकडे करून देऊनच होतो. कोणी एकादा पुरूष स्वतःची उपजीविका स्वतःच करण्यास समर्थ असला आणि त्याला समाईक मिळकतीतील वाटा मिळण्याची इच्छा नसली तर त्याला कुटुंबाच्या मिळकतीमधून एकादा क्षुल्लक पदार्थ (वाटपाचे प्रतिक म्हणून) देऊन कुटुंबातून विभक्त करावे. हा क्षुल्लक पदार्थ त्या पुरूषाच्या पुत्रांनी वाटा मागू नये एवढ्याकरिता वाटपाचा पुरावा म्हणून दिलेला असतो. (मनु. ९·२०७, याज्ञ. २·११६).

वाटप ही मनाची एक विशिष्ट स्थिती असते. कोणा एका भागीदाराने त्या कुटुंबातून विभक्त होण्याचा हेतु निःसंदिग्धपणे जाहीर केला म्हणजे तो भागीदार विभक्त होतो आणि वेगळे होण्याकरिता चतुःसीमापूर्वक विभागणी झाली पाहिजेच असे नाही. (व्य. मयू. पा. ९४).

ह्या व्यवहारपदाच्या बाबतीत पुढील **चार प्रमुख विषयांचा** [इदमिह निरूपणीयम् । कस्मिन्काले कस्य कथं कैश्च विभागः कर्तव्य इति । मिता (याज्ञ २·११४).] विचार करावयाचा असतो : (१) वाटपाचा **काल**, (२) वाटप होण्यास **पात्र असलेली मिळकत**, (३) वाटप करण्याची **पद्धति** आणि (४) वाटप करून घेण्यास **पात्र असणाऱ्या व्यक्ती**. (मिता-याज्ञ २·११४).

**वाटपाचा काल**. वाटपाचा **पहिला काल** पिता आपल्या हयातीत आपली मिळकत आपल्या पुत्रांमध्ये वाटून देत असे तो आणि दुसरा काल पित्याच्या मृत्यूनंतर असतो असे गौतमाने (२८·१ आणि २) सांगितले आहे. ज्या कोणा व्यक्तीला जन्मतः हक्क प्राप्त होतो त्याला त्या मिळकतीचे वाटप करून मिळावे आणि आपल्या हिश्याचा ताबा मिळावा असे केव्हाही मागणे मागता येईल. तथापि प्राचीन काळी पित्याच्या इच्छेविरुद्ध पुत्रांनी वेगळे होणे हे कृत्य ऋषींनी निंद्य मानले होते. ह्या परिस्थितीत हळुहळु बदल होऊन मिताक्षरेच्या काळीं पित्याच्या इच्छेविरुद्ध वाटप करून मागण्याचा पुत्राचा हक्क निश्चितपणे **मानला गेला** आणि म्हणून मिताक्षरेने वाटपाचे **तीन प्रमुख काळ** सांगितले आहेत : (१) पित्याच्या हयातीत त्याच्या इच्छेनुरूप, (२) पित्याला वैराग्य उत्पन्न झाल्यानंतर आणि माता अपत्योत्पादनाच्या मर्यादेपलीकडे गेल्यानंतर आणि (३) पित्याच्या मृत्यूनंतर. दायभागपरंपरेत पुत्राला जन्मतः मिळकतीत हक्क उत्पन्न होत नसल्यामुळे पित्याच्या हयातीत वाटप करण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाही.

पित्याच्या हयातीत देखील वाटप करून मागण्याच्या पुत्राच्या हक्काला प्राचीन काळच्या काही विशिष्ट धार्मिक भावनांनी उत्तेजन मिळाले. मनूने (९·१११) म्हटले आहे की बंधु विभक्त राहण्याने धर्माची वृद्धी होते कारण बंधु विभक्त झाले म्हणजे त्यांची (देव, पितर आणि ब्राह्मण ह्यांच्या पूजेसंबंधी) धार्मिक कृत्ये प्रत्येक जण स्वतंत्र रीतीने करतो.

वाटप सामान्यतः सर्वही सहभागीदार **सज्ञान** झाल्यावर केले जाई. तथापि, एकादा भागीदार अज्ञान असला तरी वाटपाला **प्रतिबंध नसे**. [प्राप्तव्यवहाराणां विभागः । अप्राप्त व्यवहाराणां देयविशुद्धं मातृबन्धुषु ग्रामवृद्धेषु वा स्थापयेयुराव्यवहारप्रापणात् प्रोषितस्य वा । अर्थशास्त्र ३·५.] (कौटि. ३·५). अशा भागीदारांचा हिस्सा ते वयात येईपर्यंत नातलगांजवळ अथवा गावातील प्रमुखाजवळ ठेवावा. हाच नियम परदेशी गेलेल्या भागीदाराला लागतो. पुरुषांच्या बाबतीत त्यांना १६ व्या वर्षी (कोणाच्या मते १६ व्या वर्षाच्या प्रारंभी आणि कोणाच्या मते १६ व्या वर्षाच्या अंती) व्यवहाराचे ज्ञान प्राप्त होते असे शास्त्रात सांगितले आहे. एखाद्या भागीदाराची स्त्री गरोदर असली तर ती प्रसूत होईपर्यंत वाटप तहकूब ठेवावे असे

अनुक्रमणिका

वसिष्ठाने (१७·४१) सुचविले आहे. परंतु तशा परिस्थितीतही वाटप होऊ शकते आणि वाटपानंतर झालेल्या पुत्रांना काय मिळावे ह्याबद्दलचे नियम मनु (१·२१६) आणि याज्ञवल्क्य (२·१२२) ह्यांनी सांगितले आहेत.

**वाटपास पात्र होणारी मिळकत**. मिळकतीचे **स्थावर** (घर, जमीन ह्यांच्यासारखी) आणि **जंगम** (हलविता येण्यासारखी) असे **दोन प्रकार** बहुतेक स्मृतींनी सांगितले आहेत. प्राचीन काळच्या हिंदु कायद्याप्रमाणे मिळकतीचे दोन प्रकार करता येतात : (१) **एकत्र कुटुंबाची मिळकत** आणि (२) **वेगळी मिळकत** हे ते दोन प्रकार होत. एकत्र कुटुंबाची मिळकत वडिलोपार्जित असू शकते अथवा वडिलोपार्जित मिळकतीच्या मदतीने अथवा अशा मदतीशिवाय एकत्र कुटुंबाने संपादन केलेली असू शकते अथवा स्वतंत्र रीतीने संपादन करून एकत्र मिळकतीत समाविष्ट केलेली असू शकते असे मनूने (९·२०४) म्हटले आहे. एकाद्या पुरुषाला त्याच्या पित्याकडून, पितामहाकडून अथवा प्रपितामहाकडून मिळालेल्या सर्व मिळकतीला **वडिलोपार्जित** मिळकत म्हणतात. अशा मिळकतीत मिताक्षरेच्या मताप्रमाणे त्या पुरुषाचा पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र ह्यांना जन्मतः हक्कसंबंध प्राप्त होतात म्हणून ती **अप्रतिबंध दाय** असते. दायभाग परंपरेप्रमाणे पुत्राला वडिलोपार्जित मिळकतीत जन्मतः हक्कसंबंध प्राप्त होत नसल्यामुळे अशा मिळकतीचा विनियोग करण्याच्या दृष्टीने वडिलोपार्जित आणि वेगळ्या मिळकतीत फारसा भेद असत नाही.

मिताक्षरापरंपरेप्रमाणे एकादा मनुष्य हिंदु कुटुंबाचा भागीदार असला आणि त्याचा एकत्र कुटुंबाच्या मिळकतीत हितसंबंध असला तरी त्याची निरनिराळ्या मार्गाने स्वतः संपादन केलेली अशी **वेगळी मिळकत** असू शकते. अशी मिळकत मुख्यत्वे करून पुढील प्रकारची असते :- (१) बंधु, चुलता इत्यादी व्यक्तींकडून वारसाने आलेली (**सप्रतिबंधदाय**), (२) पित्याकडून वडिलोपार्जित मिळकतीतून प्रेमाने **बक्षिस मिळालेली**, (३) पित्याने आपल्या वेगळ्या मिळकतीतून **बक्षिस दिलेली**, (४) इतर नातलगांनी **बक्षिस** अथवा **मृत्युपत्रान्वये** दिलेली आणि **विवाहाच्या वेळी मिळालेल्या देणग्या**, (५) स्वतःच्या प्राप्तीतून **सोडविलेली** एकादी **वडिलोपार्जित मिळकत** आणि (६) **विद्याधन**.

एकत्र कुटुंबातील भागीदाराची वेगळी मिळकत असते ह्या कल्पनेचा हळूहळू विकास होत गेला. प्रथमारंभी एकत्र कुटुंबातील कोणाही भागीदाराने **कोणत्याही मार्गाने** संपादन केलेली सर्व मिळकत सर्व कुटुंबाच्या मालकीची असल्याचे धरले जात असे. परंतु पुढे विद्याधन ही वेगळी मिळकत समजली जाऊ लागली आणि त्यानंतर वर उल्लेख केलेल्या इतर मिळकतींचा वेगळ्या मिळकतीत समावेश होऊ लागला. [परभक्तोपयोगेन विद्या प्राप्तान्यतस्तु या। तया प्राप्तं धनं यत्तु विद्याप्राप्तं तदुच्यते ॥ कात्यायन ८६७ (अपरार्क पा. ७२४).]

विद्याधनाच्या बाबतीत कात्यायनाने (८६७-८७३) केलेली **विद्याधनाची** व्याख्या अशी होती की 'दुसऱ्याने पुरविलेल्या अन्नावर उपजीविका करून संपादन केलेल्या विद्येपासून होणारा लाभ ते **विद्याधन**.' विद्या संपादन करण्याकडे वडिलोपार्जित मिळकतीचा कोणत्या प्रकाराने उपयोग केला तरी चालतो ह्याविषयी बरीच चर्चा धर्मग्रंथात करण्यात आली आहे परंतु आधुनिक काळी झालेल्या हिंदु विद्याधनासंबंधीच्या सन १९३० च्या कायद्याने त्या सर्व शंका दूर केल्या असून असे ठरविले आहे की पूर्वीच्या रूढी अथवा नियम काही असले तरी ज्या शिक्षणापासून आणि ज्याच्या साहाय्याने कोणालाही एकादा व्यापार, उद्योग धंदा अथवा व्यवसाय करता येतो अशा शिक्षणापासून प्राप्त होणारा लाभ त्या संपादकाचे **वेगळे** आणि **एकट्याचे** धन होते, असे शिक्षण कशाही प्रकाराने मिळालेले असो अथवा त्याच्याकरिता कोणीही खर्च केलेला असो.

अनुक्रमणिका

अशा निरनिराळ्या भागीदारांच्या वेगळ्या मिळकतींखेरीज बाकीची एकत्र कुटुंबाची सर्व मिळकत **वाटपाला पात्र** असते.

तथापि काही विशिष्ट मिळकतींचे त्यांच्या स्वरूपाला अनुसरून **वाटप करू दिले जात नाही** आणि त्यांचा **उपभोग सर्वांना सर्वसाधारणपणे** अथवा **क्रमाने** घ्यावा लागतो. अशा मिळकतींचे वाटप **युक्तीने** केले पाहिजे, नाहीतर त्या **निरुपयोगी** होतील. अशा मिळकतीत **उदक** (विहिरी), **पुण्यकर्मे अथवा यज्ञ** (यांच्याकरिता वेगळे काढून ठेवलेले धन), (उत्सवादिकांकरिता) **तयार केलेले अन्न**, (भागीदारांच्या व्यक्तिशः संबंध येणाऱ्या रखेलीसारख्या) **स्त्रिया**, रोज वापरीत असलेले **कपडे**, **अलंकार**, गुरांकरिता राखून ठेवलेले **कुरण, योगक्षेमा**करिता मिळालेली इनाम जमीन इत्यादिकांचा समावेश होतो. (गौ. २८·४४।४५). ह्या वस्तूंची सहभागीदारांनी निरनिराळ्या रीतीने **वाटणी** करावी अथवा त्यांचा उपयोग अशा रीतीने करावा की त्यांचा उपभोग योग्य वेळी सर्वांना **समाईकपणे** होईल. नित्य वापरात नसलेले अलंकार, मूल्यवान कापड, एकाहून अधिक असलेल्या दासी ह्या वस्तू **वाटपाला पात्र** असतात. **वाटणी करण्याला पात्र व्यक्ती**

एकाच मूळ पुरुषापासून वंशपरंपरेने झालेल्या सर्व पुरुषव्यक्तींचा आणि त्यांच्या पत्न्या आणि अविवाहित कन्या यांचा एकत्र हिंदु कुटुंबात समावेश होतो. कन्येचा विवाह झाला म्हणजे ती आपल्या पित्याच्या कुलातील भागीदार नाहीशी होते आणि आपल्या पतीच्या कुलातील भागीदार होते. मिताक्षरामताप्रमाणे एकत्र कुटुंबातील सर्वच व्यक्ती **सहभागीदार** नसतात. ज्या पुरुष व्यक्तींना समाईक अथवा भागीदारीच्या मिळकतीत जन्मतः हितसंबंध प्राप्त होतो तेवढ्याच व्यक्ती सहभागीदार असतात म्हणजे तो पुरुष आणि त्याचे पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र एवढ्यांचीच सहभागीदारी असते. (मिता-याज्ञ २·११४).

ही भागीदारी केवळ कायद्याने निर्माण केलेली घटना असते आणि दत्तविधान ह्या कृत्याशिवाय भागीदारांच्या कोणत्याही कृत्याने ती निर्माण होऊ शकत नाही. मूळ पुरुषापासून कितीही दूरच्या नात्याची एकादी व्यक्ती असली तरी जन्मतः मिळकतीत हितसंबंध ज्याला प्राप्त झाला आहे अशा शेवटल्या दोन पुरुष मालकांपासून जर ती व्यक्ती चार पिढ्यांहून पलीकडील नसेल तर त्या व्यक्तीला वाटप करून मागण्याचा हक्क असतो.

दायभाग परंपरेची भागीदारीची कल्पना मिताक्षरेच्या कल्पनेहून सर्वस्वी भिन्न प्रकारची आहे. दायभागपरंपरेप्रमाणे पुत्रांना वडिलोपार्जित मिळकतीत जन्मतः हितसंबंध प्राप्त होत नसतो आणि तो हितसंबंध पित्याच्या मृत्यूच्या वेळी प्रथम उत्पन्न होतो म्हणून आणि तो वारस नात्याने प्राप्त होतो म्हणून दायभाग परंपरेत पिता आणि पुत्र ह्यांची मिळून भागीदारी नसते. पित्याला स्वसंपादित त्याचप्रमाणे वडिलोपार्जित मिळकत गहाण, विक्री अथवा अन्य मार्गाने दुसऱ्याला देता येते. पिता जिवंत असेपर्यंत पुत्रांना वाटप करून मागण्याचा अधिकार नसतो. पित्याच्या मृत्यूनंतर त्याचे पुत्र, पौत्र, ह्यांच्यात म्हणजे भावाभावांत, चुलते पुतण्यांत, चुलतभावांत भागीदारी उत्पन्न होते. कोणीही एकादा भागीदार निपुत्रिक मरण पावला तर इतर भागीदारांना शेषाधिकाराचा हक्क नसतो. त्या मृताची विधवा अथवा कन्या ह्यांच्याकडे त्या हिश्याचा वारसा जातो आणि अशा रीतीने दायभागपरंपरेतील भागीदारीत स्त्रियादेखील भागीदार होऊ शकतात. प्रत्येक भागीदाराचा हिस्सा निश्चित ठरीव असतो आणि कोणाही भागीदाराला आपला हिस्सा विकता येतो, गहाण टाकता येतो अथवा देणगी अथवा मृत्युपत्रान्वये त्याची विल्हेवाट लावता येते.

प्रत्येक भागीदाराला वाटपामध्ये हिस्सा मिळण्याचा अधिकार असतो असा सर्वसाधारण नियम असला तरी त्याबद्दल अनेक तपशीलाचे भेद असतात. उदाहरणार्थ, मुंबई प्रांतात एकाद्याचा पिता त्याच्या स्वतःच्या पित्याबरोबर, बंधूबरोबर अथवा इतर भागीदारांबरोबर एकत्र राहत असला तर त्या मुलाला पित्याच्या संमतीखेरीज वाटप करून मागण्याचा अधिकार नसतो. वाटपाच्या वेळी मातेच्या गर्भात असलेल्या परंतु वाटप झाल्यानंतर जन्मलेल्या पुत्रासंबंधीही शास्त्रात नियम सांगितले आहेत. (वसि. १७·४०-४१). उदाहरणार्थ, **क** आणि त्याचे पुत्र **ख** आणि **ग** ह्यांचे एकत्र कुटुंब असून त्यांनी वाटप करून घेतले आणि प्रत्येकाने एकत्र मिळकतीचा तिसरा हिस्सा घेतला आणि त्यानंतर सहा महिन्यांनी **क** च्या पत्नीला **घ** हा पुत्र झाला तर झालेले वाटप मोडावे लागते आणि **घ** ला कुटुंबाच्या मिळकतीत १/४ (अथवा मातेला हिस्सा द्यावयाचा असल्यास १/५) हिस्सा मिळेल आणि असा हिस्सा काढण्यापूर्वी पूर्वीच्या वाटपाच्या वेळेपासून दरम्यानच्या काळात झालेल्या सर्व उत्पन्नाचा आणि वाढीचा हिशोब केला पाहिजे. हाच नियम भावाभावांत झालेल्या वाटपानंतर एकाद्या मृतबंधूच्या विधवेला वाटपापूर्वी गर्भ राहिलेल्या परंतु वाटपानंतर जन्माला आलेल्या पुत्राच्या बाबतीत लागतो आणि म्हणून स्मृतींनी अशी शिफारस केली आहे की ज्यावेळी (पूर्वी मृत झालेल्या) काही बंधूंच्या स्त्रिया गरोदर असल्याचे माहित असेल त्यावेळी इतर बंधूंनी त्या स्त्रिया प्रसूत होईपर्यंत वाटप तहकूब करावे. तसेच एकत्र कुटुंबातील एकाद्या भागीदाराने अथवा एकट्याच उरलेल्या भागीदाराने दत्तक घेतलेला पुत्र मिताक्षरापरंपरेप्रमाणे त्याच्या दत्त-विधानाच्या दिवसापासून एकाद्या औरस पुत्राप्रमाणे भागीदारीमध्ये भागीदार होतो. दायभाग परंपरेप्रमाणे औरसपुत्राला देखील पित्याच्या हयातीत वाटप करून मागण्याचा हक्क नसतो म्हणून दत्तक पुत्रालाही पित्याच्या हयातीत वाटप करून मागण्याचा हक्क नसतो. एकाद्याने एकादा दत्तक पुत्र घेतल्यानंतर जर त्याला औरसपुत्र झाला तर बहुतेक टीकाकारांच्या मताप्रमाणे दत्तक पुत्राचा हिस्सा घटतो. पित्याच्या वर्णाहून कमी अथवा अधिक दर्जाच्या वर्णाच्या स्त्रीला झालेल्या पुत्रांच्या हिश्श्यांत त्या स्त्रीच्या वर्णाला अनुसरून भेद उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, मनूने (९·१५५) सांगितले आहे की उच्च तीन वर्णांच्या पुरुषाच्या शूद्र स्त्रीपासून झालेल्या पुत्राला त्याच्या पित्याच्या मिळकतीत हिस्सा मिळत नाही. कलिवर्ज्यासंबंधीच्या शौनकाच्या [अत एव कलौ निवर्तन्ते इत्यनुवृत्तौ शौनकेनोक्तं दत्तौरसेतरेषां तु पुत्रत्वेन परिग्रह इति । शौनक (अपरार्क पा ७३९).] श्लोकात (अपरार्क पा ७३९) कलियुगात औरस आणि दत्तक एवढे दोनच पुत्र शास्त्रांनी मान्य केले आहेत. तसेच पित्याच्या वर्णाहून कमी दर्जाच्या वर्णाच्या स्त्रियांबरोबरचे विवाह अनेक शतकांपासून प्रचारांतून गेले आहेत. म्हणून त्यासंबंधी विशेष विवेचन करण्याची आवश्यकता नाही.

द्विजातींपैकी कोणा एकाद्या पुरुषाला **दासीपासून** झालेल्या पुत्राला वाटपात हिस्सा मिळण्याचा अथवा वारसाचा अधिकार नसतो. त्याला फक्त अन्नवस्त्राचा अधिकार असतो. परंतु त्या बाबतीतही स्मृतिवचनांवरून आणि न्यायालयांनी दिलेल्या निर्णयांवरून अनेक सिद्धांत निघतात. उदाहरणार्थ, मिताक्षरापरंपरेने चालणाऱ्या शूद्राच्यादेखील **अनौरस** पुत्राला पित्याच्या ताब्यात असलेल्या मिळकतींत जन्मतः कोणताही हितसंबंध असत नाही आणि म्हणून त्याला पित्याच्या हयातीत वाटप करून मागता येत नाही. परंतु पित्याला आपल्या हयातीत अशा पुत्राला हिस्सा देता येतो आणि तो हिस्सा औरस पुत्रांच्या बरोबरीचाही असू शकतो. (४ मुंबई ३७, ४४-४५, २३ मद्रास १६). तसेच एकाद्या शूद्राने ब्राह्मण जातीची स्त्री रखेली म्हणून ठेवली असली आणि तिच्यापासून त्याला पुत्र झाला असला तर तो दासीपुत्र नसतो (तर प्राचीन ग्रंथांच्या मताप्रमाणे) चांडाल असतो आणि त्याला त्या शूद्र पित्याच्या अनौरस पुत्र ह्या नात्याने पित्याच्या मिळकतीत वारसा मिळण्याचा अधिकार नसतो. (रामचंद्र विरुद्ध हनमनाइक ३७ मुंबई लॉ. रि. ९२०, १८ लखनौ ५८५).

अनुक्रमणिका

वाटपाच्या वेळी **गैरहजर** असणारा भागीदार ह्याचे हक्क अज्ञानासारखेच असतात. (अर्थशास्त्र ३·१) आणि आधुनिक काळात अशा गैरहजर भागीदाराच्या हक्काला मुदतीच्या कायद्यात घालून दिलेली मर्यादा लागते.

कोणाही स्त्रीला (मग ती पत्नी असो अथवा माता असो) वडिलोपार्जित संपत्तीचा हिस्सा मिळू नये तर तिच्या चरितार्थाला अवश्य असेल तेवढीच संपत्ती मिळावी असे अनेक ग्रंथकारांनी म्हटले आहे. परंतु पुढे पत्नीच्या आणि मातेच्या अधिकारात क्रमाक्रमाने वाढ झाली, **पत्नीला** आपण होऊन वाटप करून मागता येत नाही परंतु जर पतीने आपल्या हयातीत पुत्रांना आपल्यापासून विभक्त केले तर पत्नीला पुत्राच्या इतका हिस्सा मिळण्याचा हक्क असतो. (याज्ञ. ३·११५). एकीहून अधिक पत्न्या असल्यास प्रत्येकीला पुत्राच्या समान हिस्सा मिळतो. **मात्र** पतीने अथवा अथवा सासऱ्याने दिलेले **स्त्रीधन** अशा पत्नीच्या ताब्यात असेल तर त्या स्त्रीधनात जितकी भर घालून ते पुत्राच्या हिश्याइतके होईल तितकीच मिळकत त्या पत्नीला देण्यात यते. मृतपुत्रांच्या आणि पौत्रांच्या विधवांना देखील त्यांचे पती जिवंत असते तर जेवढा हिस्सा त्यांना मिळाला असता तेवढा हिस्सा पित्याने पुत्रांच्या बरोबर वाटप करताना दिला पाहिजे. सन १९३८ च्या हिंदु विधवांच्या हक्कासंबंधीच्या कायद्याने मिताक्षरा परंपरेचा कायदा आणि दायभाग परंपरेचा कायदा ह्यांच्या मधील भेद नाहीसा केला आहे.

पित्याच्या मृत्यूनंतर जेव्हा पुत्र वाटप करतात तेव्हा भागीदारीच्या मिळकतीत **मातेला** (अथवा **सापत्नमातेला**) देखील पुत्राच्या इतका हिस्सा मिळण्याचा अधिकार असतो. (याज्ञ. २·१२३). परंतु पुत्रांच्या मनात एकत्र राहावयाचे असेल तोपर्यंत तिला वाटप करून मागता येत नाही. पत्नीप्रमाणेच मातेचा (अथवा सापत्न मातेचा) हिस्सा तिच्या स्त्रीधनाला अनुसरून कमीजास्त होण्याला पात्र असतो. आधुनिक काळी भारतातील काही न्यायालये पत्न्यांना आणि मातांना वडिलोपार्जित मिळकतीत हिस्सा न देवविता फक्त अन्नवस्त्र देववितात. एकाद्या मनुष्याला अनेक स्त्रिया असल्या आणि प्रत्येकीला अनेक पुत्र असले तर प्राचीन काळच्या शास्त्राप्रमाणे अशा पुत्रांना त्या मनुष्याच्या पत्न्यांना अनुसरून (म्हणजे **पत्नीभाग**) अथवा त्या पुत्रांच्या मातांना अनुसरून (म्हणजे **मातृभाग**) द्यावा. परंतु आधुनिक काळात अशा सर्व पुत्रांना त्यांच्या संख्येप्रमाणे (म्हणजे **पुत्रभाग**) भाग मिळतात. **पित्याची माता** अथवा **पित्याची सापत्न माता** ह्यांच्या संबंधीही असेच नियम सांगितले आहेत. उदाहरणार्थ, व्यासाने (अपरार्क पा ७३०) असे म्हटले आहे की पित्याच्या संतानरहित पत्न्यांना (पुत्राच्या इतका) हिस्सा मिळण्याचा अधिकार असतो आणि **सर्व आज्या** ह्या मातेच्या समान दर्जाच्या असतात.

विशिष्ट शारीरिक, मानसिक अथवा इतर प्रकारची **व्यंगे** असल्याच्या कारणाने आणि काही विशिष्ट **कृत्ये** केल्याच्या कारणाने प्राचीन काळीं मनुष्यांना वाटपात हिस्सा मिळण्याचा तसेच वारसाने मिळकत मिळण्याचा हक्क काढून घेण्यात येत असे.

(मनु. ९·२०१). अशा कारणांत वेड, जन्मजात मूर्खत्व, नपूंसकत्व, घोर पातक करण्याबद्दल घातलेला बहिष्कार, अंधत्व, असाध्य रोग, अन्य आश्रमात (वानप्रस्थ अथवा संन्यास आश्रमात) प्रवेश इत्यादिकांचा समावेश होतो. अशी व्यंगे अथवा दोष असणाऱ्या व्यक्ति धर्मकृत्ये करण्याला अपात्र मानल्या जात असत आणि मिळकत आणि धर्मकृत्यांकरिता संपत्तीचा विनियोग करणे ह्यांचा अत्यंत निकट संबंध मानण्यात येत असे. ह्या कारणानेच बहुधा अशी अपात्रता उत्पन्न झाली असावी. अशा व्यक्तींचे कुटुंबाने फक्त पालन पोषण केले पाहिजे. सन १९२८ च्या हिंदूंच्या वारसा संबंधीच्या कायद्याने मिताक्षरा परंपरेने

चालणाऱ्या एकाद्या व्यक्तीला फक्त जन्मतः असलेला उन्माद आणि जन्मतः असलेले वेड एवढ्याच दोषांकरिता वाटपाच्या अथवा वारसाच्या हक्कातून वगळता येते. दायभाग परंपरेने चालणाऱ्या व्यक्तींच्या बाबतीत त्या कायद्याच्या वेळी जेवढे निर्बंध अस्तित्वात होते त्यापेक्षा अधिक काही फरक त्या कायद्याने केला गेला नाही. जन्मतः उन्मत्त अथवा वेडे असलेल्या व्यक्तींचे पुत्र जर जन्मतः उन्मत्त अथवा वेडे नसतील तर त्यांना कुटुंबाच्या संपत्तीत हिस्सा मिळतो.

वरील अपात्रतेची कारणे पुरुषांप्रमाणे स्त्रियांनाही लागू पडतात. (मितायाज्ञ. २·१४०). पतित झालेल्या पुरुषांनी आणि स्त्रियांनी काही विशिष्ट प्रायश्चित्ते केल्यास ते पुरुष अथवा त्या स्त्रिया **व्यवहार्य** (संसर्ग ठेवण्यास योग्य) होतात. ज्यांनी अशी प्रायश्चित्ते केली नसतील त्यांना जातिबहिष्कृत करण्याकरिता आणि त्यांच्या बरोबर सर्व संसर्ग सोडून देण्याकरिता आणि त्यांना मृतासमान मानण्याकरिता **घटस्फोट** नावाचा एक विशिष्ट कार्यक्रम करावयाचा असे. (गौ. २०·२·७). पतित झालेल्या व्यक्तींना त्यानंतर झालेला पुत्रदेखील पतित होतो. परंतु कन्या दुसऱ्याकडे (एकाद्याची पत्नी म्हणून) जावयाची असल्यामुळे तिच्या पित्याचे कोणतेही **धन न घेता** तिच्याशी कोणीही विवाह करण्यास प्रत्यवाय नाही. पतित झालेल्या आणि प्रायश्चित्त **न केलेल्या** स्त्रियांना रस्त्यावर सोडून देऊ नये तर त्यांना राहण्याकरिता घराशेजारी एक झोपडी द्यावी आणि प्राणरक्षणापुरते अन्नवस्त्र द्यावे आणि त्यांच्याकडून आणखी पातक घडू नये म्हणून त्यांच्यावर पाहारा ठेवावा. (याज्ञ. ३·२९६).

अशा रीतीने निरनिराळ्या दोषांकरिता ज्यांचे वाटपासंबंधी आणि वारसासंबंधीचे हक्क काढून घेतले असतील त्यांना विवाह करता येतो आणि जर त्यांच्या निपुत्रिक स्त्रिया **निर्दोष** वर्तनाच्या असतील तर त्या स्त्रियांना पालनपोषणाचा हक्क असतो. (याज्ञ. २·१४२). त्यांच्या **औरस** अथवा **क्षेत्रज** पुत्रांना वरील प्रकारचा दोष नसेल तर एकत्र कुटुंबाच्या मिळकतीत हिस्सा मिळण्याचा अधिकार असतो. कन्यांना पालन पोषण होण्याचा आणि विवाहाची तरतूद करून घेण्याचा हक्क असतो. अशा व्यक्तींना **दत्तक पुत्र** घेता येत नाही. (याज्ञ. २·१४१) पतितांचे दोष औषधाने अथवा अन्य रीतीने दूर झाल्यास त्यांना झालेले वाटप फिरवून मागण्याचा हक्क असतो आणि अशा रीतीने एकदा प्राप्त झालेला हिस्सा अथवा वारसाचा हक्क त्यानंतर उत्पन्न होणाऱ्या दोषांमुळे काढून घेतला जात नाही. (मिता. याज्ञ. ५·१४०).

**प्रतिलोम** संबंधापासून झालेल्या पुत्रांना त्यांच्या पित्यांकडून पालनपोषण मिळण्याचा अधिकार असतो. त्या पुत्रांना वडिलोपार्जित मिळकत मिळत नाही परंतु अन्य कोणी नातलग नसतील तर पित्याची सर्व [बन्धूनामप्यभावे तु पित्र्यं द्रव्यं तदाप्नुयात् ॥ कात्यायन (८६२-६४) (दायभाग ५·१४)] संपत्तीदेखील त्यांना मिळते (कात्या ८६२-८६४).

बंधूबंधूंमध्ये वाटप करण्यापूर्वी अविवाहित भगिनींच्या विवाहाची तरतूद केली पाहिजे. मिताक्षरेने असे म्हटले आहे की अविवाहित भगिनी जर पुरुष असती तर तिला जितका हिस्सा मिळावा असता त्या हिश्याच्या चतुर्थांशाइतका हिस्सा तिच्या विवाहाच्या खर्चाकरिता मिळावा. (मिता. याज्ञ. २·१२४). ह्याबाबतीत तपशीलाचे अनेक नियम आहेत. दायभागाचे (३·३६ आणि ३९) मत असे होते की वडिलोपार्जित संपत्ती थोडकी असेल तर अविवाहित भगिनीला चतुर्थांश हिस्सा देऊन तिच्या विवाहाची तरतूद करावी. परंतु जर वडिलोपार्जित संपत्ती विपुल असेल तर अविवाहित भगिनीला तिच्या विवाहाला लागेल तेवढेच धन द्यावे.

वाटपाच्या बाबतीत काही शिफारसवजा नियम स्मृतींनी सांगितले आहेत. उदाहरणार्थ, ज्येष्ठ पुत्राने अथवा ज्येष्ठ बंधूने अनीतीच्या अथवा अयोग्य कारणांकरिता समाईक मिळकत उधळली असली तरी देखील (पित्याने अथवा बंधूंनी) वाटपाच्या वेळी त्याला हिस्सा द्यावा असे काही स्मृतींनी सांगितले आहे. (आप. ध. सू. २·६·१४-१५; गौत. २८·३८; मनु ९·३१४).

## वाटप करण्याची आणि हिस्से देण्याची पद्धती

समाईक मिळकतीत हिस्से पाडण्यापूर्वी समाईक कुटुंबावर असणाऱ्या आर्थिक जबाबदाऱ्या पुऱ्या करण्याची तजवीज केली पाहिजे. (कात्या ८५० स्मृ. चं. २ पा. २७३) अशा आर्थिक जबाबदाऱ्यामध्ये समाईक कुटुंबाचे कर्ज, अनीतीच्या कारणांकरिता न काढलेली पित्याने केलेली देणी, पित्याने प्रेमाकरिता दिलेल्या लहान देणग्या, ज्यांचे हक्क नष्ट केले आहेत अशा भागीदारांच्या कुटुंबाच्या आश्रयाने असणाऱ्या स्त्रियांच्या पालनपोषणाकरिता आणि विवाहाच्या खर्चाकरिता लागणारे द्रव्य, ह्यांच्या सारख्या जबाबदाऱ्यांचा समावेश होतो. (मनु. ८·१६६ इ.) बंधुबंधूमधील वाटपाच्या वेळी जर त्यांच्यामधील कांहीचे विवाह झाले असून कांहींचे व्हावयाचे असेल तर अविवाहित बंधूंच्या (विवाहासारख्या) संस्कारांच्या खर्चाची तरतूद एकत्र कुटुंबाच्या मिळकतीतून केली पाहिजे. (याज्ञ. २·१२४).

फार प्राचीन काळी सर्व पुत्रांना समान वाटे देणे आणि ज्येष्ठ पुत्राला इतरांपेक्षा मोठा वाटा देणे ह्या दोन्ही पद्धती सुप्रसिद्ध होत्या. (तै. सं. २·५·२·७).बहुतेक सूत्रांनी आणि स्मृतींनी असा नियम सांगितला आहे की पित्याच्या समान वर्णाच्या पत्न्यांपासून झालेल्या पुत्रांमध्ये समान विभागणी करावी. (आप. ध. सू. २·६·१४·१; मनु. ९·१५६ इ०). तथापि काही ग्रंथांनी ज्येष्ठ पुत्राला विशिष्ट वाटा देण्याचा अथवा त्याची तरतूद करण्याचा उल्लेख केला आहे. अशा विशिष्ट वाट्याला '**उद्धर**' अशी संज्ञा आहे. पूर्वीच्या काळातील भारतीय पिते वडिलोपार्जित संपत्तीची वाटणी पुष्कळ वेळा आपल्या पुत्रांत स्वतःच्या इच्छेप्रमाणे कमी अथवा अधिक हिस्से देऊन करीत असत. पिता हा सर्वांचा स्वामी असल्याचे मानले जात असे. परंतु पुढे पुढे अशा असमान विभागणीसंबंधीची शास्त्रवचने अन्य युगाला अथवा पित्याच्या स्वसंपादित संपत्तीला लागतात असे मानण्यात येऊ लागले. पित्याने कशीही वाटणी केली तरी तीच पुत्रांना योग्य असते आणि ती रद्द करता येत नाही असे पूर्वीच्या स्मृतिकारांनी म्हटले असले तरीही क्रमाक्रमाने पित्याच्या ह्या अधिकाराला मर्यादा घालण्यात आल्या आणि पिता रोगग्रस्त असला, एकाद्या अथवा अनेक पुत्रांवर रागावला असला, अथवा शास्त्रविरुद्ध मार्गाने चालत असला, अथवा विषयोपभोगात मग्न झाला असला तर त्याला **आपल्या इच्छेप्रमाणे** आपल्या पुत्रांना विभाग देता येत नाही असे ठरविण्यात आले. (नारद दाय १६).

आधुनिक काळापर्यंतच्या सर्व काळांत **ज्येष्ठ पुत्राला विशेष प्रकारची वर्तणूक** देण्यात येत आली आहे. शास्त्रकारांपैकी काहींनी ज्येष्ठ पुत्राला **सर्व मिळकत द्यावी** असे सांगितले आहे. (आप. ध. सू. २·६·१४·६). काहींनी ज्येष्ठ पुत्राला **सर्व वडिलोपार्जित मिळकत** द्यावी आणि इतर पुत्रांनी आपल्या चरितार्थाकरिता ज्येष्ठ पुत्रावर अवलंबून रहावे असे सांगितले आहे. ज्येष्ठ पुत्राला विशेष भाग देण्याबद्दल असे कारण सांगितले आहे की ज्येष्ठ पुत्र केवळ आपल्या जन्मामुळे पित्याला पितृऋणातून मुक्त करतो. (मनु. ९·१०५-१०७).

ज्येष्ठ पुत्राला विशिष्ट रीतीने वागविण्याचा दुसरा एक मार्ग कांही ग्रंथकारांनी सांगितला आहे. कांहींनी त्याला एकादा उत्कृष्ट अथवा मौल्यवान पदार्थ द्यावा असे सांगितले आहे, कांहींनी ज्येष्ठ पुत्राला

अनुक्रमणिका

सर्व संपत्तीचा १/२० वा हिस्सा आणि वडिलोपार्जित मिळकतीत जे सर्वात अधिक मूल्यवान असेल ते मिळावे असे सांगितले आहे. (मनु ९·११२). काही ग्रंथकारांनी असे सांगितले आहे की ज्येष्ठ पुत्राला सर्वात अधिक मूल्यवान जिन्नस वेगळा काढला नसेल तर त्याला २ वाटे द्यावे. कालांतराने ज्येष्ठ पुत्राला आणि स्वतः पित्याला देखील विशेष हिस्सा देण्याच्या विरुद्ध लोकमत झाले आणि मातापिता आणि बंधु ह्यांनी सर्व समाईक मिळकतीचे समान हिस्से करून केलेले वाटप योग्य आणि कायदेशीर असल्याचे मानण्यात येऊ लागले आणि वाटप करताना समान हिस्सेच केले पाहिजेत असा मर्यादित नियम याज्ञ. स्मृतीत (२·११७) घालण्यात आला.

ज्येष्ठ पुत्राला मोठा हिस्सा देण्याची अथवा त्याला सर्व मिळकत देण्याची प्रथा जरी सामान्यतः व्यवहारातून गेली असली तरी तिचे काही अवशेष अद्यापि आढळण्यात येतात. जमीनदारी अथवा राज्य ह्या स्वरूपाच्या मिळकती अविभाज्य असतात आणि त्या ज्येष्ठ पुत्राच्या वंशाकडे चालतात. केव्हा केव्हा देशमुख, देशपांडे ह्यांच्या सारखी वतने देखील अविभाज्य ठरविण्यात येतात.

एकाद्या मनुष्याला अनेक पत्न्यांपासून पुत्र झाले असतील तर त्यांपैकी ज्येष्ठ पुत्र कोणाला म्हणावे ह्याविषयी अनेक नियम सांगितले आहेत. (मनु. ९·१२५). उदाहरणार्थ, सर्व पत्न्या एकाच जातीच्या असल्या तर प्रथम जन्मलेला पुत्र (मग तो मागाहून विवाह झालेल्या पत्नीपासून झाला असला तरी) ज्येष्ठ पुत्र ठरतो. निरनिराळ्या जातींच्या स्त्रिया असल्या तर पित्याच्या समान जातीच्या स्त्रीपासून झालेला पुत्र (जरी मागाहून जन्मला असला तरी) ज्येष्ठ होतो. जुळ्या पुत्रांत धर्माच्या बाबतीत प्रथम जन्मलेला पुत्र ज्येष्ठ धरला जातो. (भागवत ३·१७—१८).

वाटपात हिस्से देण्याच्या बाबतीत पुढील सिद्धान्त सांगता येतील : (१) पिता आणि पुत्र ह्यांच्यामधील वाटपात प्रत्येक पुत्राला पित्याच्या हिश्याइतका हिस्सा मिळतो; (२) फक्त भावाभावात वाटप होत असल्यास सर्वांना समान हिस्से मिळतात; (३) एकत्र कुटुंबातील एकाद्या मृत भागीदाराला पुरुष अपत्य असेल तर त्या मृत भागीदाराचा वाटपात हिस्सा मिळण्याचा अधिकार त्या पुरुष अपत्याकडे जातो; (४) चुलते पुतणे अथवा चुलत बंधू ह्यांच्या वाटपात (कौटि. २.५) त्यांना मिळणारे हिस्से प्रथम त्यांच्या शाखांच्या मूळ पुरुषांच्या अनुरोधाने पडतात आणि प्रत्येक शाखेतील भागीदारांना त्यांच्या शाखेला मिळणाऱ्या हिश्यांतून व्यक्तिशः हिस्से मिळतात. मद्रास येथील वरिष्ठ न्यायालयाने असे ठरविले आहे की मूळ पुरुषाच्या द्वारे वाटणी करण्याचे तत्त्व ज्यावेळी सर्वही भागीदार एकाच वेळी वाटप करू इच्छित असतील त्या वेळीच मात्र लागते.

'वाटप' कन्येचा विवाह आणि एकाद्या वस्तूचे दान ह्या तीन गोष्टी एकदाच होतात' असे मनूने [सकृदंशो निपतति सकृत्कन्या प्रदीयते । सकृदाह ददानीति त्रीण्येतानि सतां सकृत् ॥ मनु. ९·४७.] (९·४७) म्हटले आहे. त्या वचनाचा वाटपाच्या बाबतीत असा अर्थ आहे की वाटप एकदा केले म्हणजे ते निश्चित होते आणि सामान्यतः त्यात फेरबदल करता येत नाही. तथापि ह्या नियमाला काही अपवाद असतात. उदाहरणार्थ, वाटप झाल्यानंतर एकाद्या मृत भागीदाराला पुत्र झाला तर ते वाटप मोडावे लागते. तसेच एकादा भागीदार वाटपाच्या वेळी परदेशी गेलेला असला तर त्याचा वंशज बऱ्याच काळानंतर परत स्वदेशी आल्यास त्याला त्याचा हिस्सा द्यावा लागतो. एकत्र मिळकतीपैकी काही अंश एकाद्या भागीदाराने दडवून ठेवला असला आणि मागाहून तो उघडकीला आला अथवा एकादी मिळकत चुकीने अथवा अकल्पित रीतीने वाटपातून वगळली गेली असली तर अशी मिळकत पहिले वाटप ज्या भागीदारांमध्ये झाले होते त्या भागीदारांनी

आपआपल्या हिश्श्यांप्रमाणे वाटून घ्यावी. (मनु. ९·२१८). अशा तऱ्हेने लबाडीने एकादी मिळकत दडवून ठेवणे हा अपराध होतो किंवा नाही ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे आणि कात्यायनाने अशी शिफारस केली आहे की अशा प्रकारची तक्रार राजाकडे केली असली तर राजाने अशा लबाड सहभागीदाराविरुद्ध बलाचा उपयोग न करिता त्याने दडवून ठेवलेली मिळकत त्याला त्याचे मन वळवून अथवा युक्तीने सोडून देण्यास लावावे.

पूर्वी एकदा वाटप झाले होते किंवा नाही ह्यासंबंधी शंका उपस्थित झाल्यास पूर्वी वाटप झाले असल्याचे अनुमान ज्यावरून होऊ शकेल अथवा वाटप झाल्याचा पुरावा म्हणून देता येतील अशी काही लक्षणे निरनिराळ्या स्मृतींनी सांगितली आहेत. उदाहरणार्थ, याज्ञ. (२·१४९) ने म्हटले आहे की अशा वादाचा निर्णय नातलगांच्या, सपिंडांच्या अथवा इतर साक्षीदारांच्या **साक्षीवरून**, वाटपासंबंधीच्या **लेखावरून** आणि घरे आणि जमिनी वेगवेगळ्या रीतीने वापरल्या जात आहेत त्या **वस्तुस्थितीवरून** होतो. नारदाने (दाय. ४१) असा एक नियम सांगितला आहे की जर बंधु (आणि कुटुंबातील इतर भागीदार) दहा वर्षेपर्यंत पृथक् पृथक् राहत असतील, धार्मिक विधी वेगवेगळे करीत असतील आणि त्यांचे व्यवहार वेगवेगळे असतील तर वडिलोपार्जित मिळकतीच्या बाबतीत ते विभक्त आहेत असे समजावे. आधुनिक काळातील न्यायालयांनीही असे ठरविले आहे की प्रत्येक हिंदु कुटुंब अन्न, पूजा आणि मिळकत ह्यांच्या बाबतीत एकत्र असते आणि एकत्र कुटुंबाच्या मिळकतीचे वाटप झाले आहे किंवा नाही ह्या प्रश्नाचा निर्णय करताना एकत्र जेवण होणे हे विचार करण्यास योग्य असे एक लक्षण असू शकते.

मिताक्षरेने (याज्ञ. २·११४) उद्धृत केलेल्या स्मृतिवचनात [स्थावरं द्विपदं चैव यद्यपि स्वयमर्जितम् । असम्भूय सुतान्सर्वान् न दानं न च विक्रयः ॥ मिता (याज्ञ २·११४).] असे म्हटले आहे की पित्याने जरी स्थावर मिळकत आणि द्विपाद पशूसारखी जंगम मिळकत संपादन केली असली तरी त्याला वस्तूंचे दान अथवा विक्रय सर्व पुत्रांना विचारल्याशिवाय करता येत नाही कारण जन्माला आलेले आणि मातेच्या उदरात असलेले पुत्र ह्या सर्वांना आपल्या पालनपोषणाची अपेक्षा असते म्हणून अशा वस्तूंचे दान अथवा विक्री होऊ शकत नाही. तथापि मिताक्षरा आणि दायभाग ह्या ग्रंथांनी अशी वचने शिफारसवजा असल्याचेच कमीअधिक प्रमाणात मानले आहे आणि मिताक्षरेने तर स्पष्ट म्हटले आहे की पुत्राला पित्याच्या स्वसंपादित मिळकतीच्या विल्हेवाटीला हरकत घेण्याचा अधिकार नसतो. आधुनिक काळातील न्यायालयांनी असे ठरविले आहे की एकाद्या हिंदु पित्याला (अथवा कोणत्याही हिंदु व्यक्तीला) आपली स्वसंपादित (स्थावर अथवा जंगम) मिळकत दुसऱ्या कोणालाही दान देता येते अथवा विकत येते अथवा मृत्युपत्रान्वये देता येते.

जन्मतः वडिलोपार्जित मिळकतीवरील हक्काच्या बाबतीत आणि वाटपात प्राप्त होणाऱ्या हिश्श्यांच्या बाबतीत पुत्रांचा उल्लेख वरचेवर आला आहे तेव्हा निरनिराळ्या प्रकारच्या पुत्रांसंबंधी थोडेसे विवेचन करणे उचित होईल.

कोणाही मनुष्याच्या पारलौकिक हिताच्या दृष्टीने पुत्राला असणाऱ्या महत्त्वाचा उल्लेख ऋग्वेदादी प्रमुख धर्मग्रंथांत केलेला आहे. आपला वंश चालावा आणि कुल सतत चालावे आणि धार्मिक संस्कार केले जाण्याची आणि चालू राहण्याची व्यवस्था व्हावी अशी इच्छा प्राचीन काळच्या सर्व समाजात, सर्वत्र, सर्वसाधारणपणे असे पुत्राच्या पूर्वजांना पिंड देण्याशी असलेल्या संबंधाचा उल्लेख सूत्रग्रंथांत आणि स्मृतींत अधिक प्रामुख्याने केलेला आहे. मनूने (९·१३७) म्हटले आहे की मनुष्याला पुत्राच्या जन्माच्या योगाने उच्च लोकांची प्राप्ती होते, पौत्राच्या योगाने (इहलोकी) अनंतत्व मिळते, प्रपौत्राच्या योगाने तो सूर्य लोक

जिंकतो. अनेक पुत्र व्हावेत म्हणजे त्यांच्यापैकी एकादा तरी गयेला जाऊन पितरांना पिंड अर्पण करील अशी इच्छा पितर करीत असतात. पुत्रापासून पारलौकिक हिताप्रमाणेच ऐहिक हिताचीही अपेक्षा असते. पुत्र आपणाला कनिष्ठ आणि वरिष्ठ अशा ऋणांपासून मुक्त करील असे पित्यांना वाटत असते असे नारदाने (४·५) म्हटले आहे.

बहुतेक प्राचीन स्मृतिकारांनी **औरसाच्या** व्यतिरिक्त अकरा अथवा बारा गौण दर्जाच्या पुत्रांचा उल्लेख केलेला असतो. निरनिराळ्या प्रकारच्या पुत्रांच्या याद्या निरनिराळ्या क्रमाने आणि भिन्न भिन्न नावांनी त्या ग्रंथांत दिलेल्या आहेत. मनुस्मृतीत (९·१५८-१६०) दिलेली यादी पुढे दिली आहे :

(१) औरस, (२) पुत्रिकापुत्र, (३) क्षेत्रज, (४) दत्त, (५) कृत्रिम, (६) गूढोत्पन्न, (७) अपविद्ध, (८) कानीन, (९) सहोढ, (१०) क्रीत, (११) पौनर्भव, (१२) स्वयंदत्त, (१३) शौद्र.

विष्णु ध. सू. (१५·२७) मध्ये 'यत्र क्वचनोत्पादित' (कोठेतरी जन्म झालेला) हा १२ वा आणि शेवटला पुत्र सांगितला आहे. एका स्मृतीत १५ प्रकारच्या पुत्रांचा उल्लेख केला आहे. पराशर स्मृतीत (४·२३-२४) कुंड आणि गोलक ह्यांच्या व्यतिरिक्त फक्त ५ प्रकारच्या पुत्रांचा उल्लेख केला आहे.

वर उल्लेख केलेल्या पुत्रांच्या थोडक्यात व्याख्या पुढे दिल्या आहेत.

**औरसपुत्र.** एकाद्या मनुष्याने शास्त्रोक्त विधीने विवाह केलेल्या आपल्या पत्नीच्या ठिकाणी उत्पन्न केलेला पुत्र तो औरस पुत्र अशी व्याख्या मनु (९·१६६) प्रभृतींनी दिली आहे. पतीच्या समानवर्णाच्या पत्नीपासून उत्पन्न केलेला पुत्रच तेवढा औरस ठरतो असे प्राचीन ग्रंथांवरून दिसते. परंतु मध्ययुगीन काळात झालेल्या ग्रंथांत असे प्रतिपादन केले आहे की अनुलोम पद्धतीने विवाह केलेल्या पत्नीपासून उत्पन्न केलेला पुत्र देखील औरस असतो. परंतु ह्या नियमाला ब्राह्मणाला शूद्र वर्णाच्या स्त्रीपासून झालेला शौद्र अथवा पारशव ह्या पुत्राचा अपवाद असतो आणि तो इतर औरस म्हटल्या जाणाऱ्या पुत्रांहून वेगळ्या प्रकारचा मानतात. एकादा पुत्र औरस ठरण्यास त्या पुत्राची उत्पत्ती आणि जन्म ह्या दोन्ही गोष्टी विवाहानंतर झालेल्या असल्या पाहिजेत असे स्मृतिग्रंथांवरून दिसते तथापिं आधुनिक काळच्या न्यायालयांनी त्या पुत्राची उत्पत्ती विवाहानंतरच झाली असली पाहिजे अशी आवश्यकता मानलेली नाही.

**पुत्रिकापुत्र** — एकाद्या पुत्रहीन मनुष्याने आपल्या कन्येची पुत्र म्हणून योजना केलेली असल्यास त्या कन्येला 'पुत्रिका' म्हणतात. अशा कन्येला पुत्राप्रमाणे वागविण्यात येते (मनु. ९·१३४) अथवा तिला दुसऱ्या कोणाला विवाहात देतेवेळी 'तिला होणारा पुत्र त्या कन्येच्या पित्याचा पुत्र होईल' अशा अटीवर दिलेली असते. आधुनिक काळी मलबार प्रांतात नंबुद्री ब्राह्मणांत पुत्रिकापुत्र कायदेशीर मानला जातो.

**क्षेत्रज पुत्र.** एकाद्या मनुष्याच्या पत्नीच्या (अथवा विधवेच्या) ठिकाणी एकाद्या सगोत्र पुरुषाने अथवा सगोत्र नसणाऱ्या पुरुषाने तो मनुष्य स्वतः मृत झाला असताना अथवा नपूंसक अथवा असाध्य रोगाने पीडित झालेला असताना नियोगाच्या नियमांना अनुसरून उत्पन्न केलेल्या पुत्राला क्षेत्रज पुत्र म्हणतात. ब्रह्मपुराणात (अपरार्क पा ७३७) सांगितले आहे की क्षेत्रज पुत्र सर्वसाधारणपणे क्षत्रियांमध्ये अस्तित्वात असत कारण त्यांना (दुर्वर्तनामुळे ऋषींनी दिलेल्या) शापामुळे अथवा सदोदित युद्धात गुंतलेले असल्यामुळे संतती नसे. मिताक्षरेने (याज्ञ. २·१२७) क्षेत्रज पुत्राला **द्व्यामुष्यायण** अशी संज्ञा लावली आहे. कलियुगात नियोग वर्ज्य सांगितला आहे आणि ती रूढी प्रचारातून गेली आहे.

**दत्तक** (दिलेला) पुत्र. एकाद्या पुत्राला त्याच्या मातेने अथवा पित्याने आपत्काली प्रेमाने त्याच जातीच्या दुसऱ्या मनुष्याला उदकपूर्वक दिले असते त्याला दत्तकपुत्र म्हणतात. ह्यासंबंधी विवेचन पुढे स्वतंत्रपणे करण्यात येईल.

**कृत्रिम** (बनविलेला) पुत्र. एकाद्या मनुष्याने आपल्याच जातीच्या आणि योग्य गुणांनी संपन्न असलेल्या मातापितारहित मुलाला द्रव्य देण्याचे प्रलोभन दाखवून आपला पुत्र मानलेला असतो तो कृत्रिम पुत्र. (मनु. ९·१६९). त्याच्यामध्ये आणि दत्तकपुत्रामध्ये इतकाच भेद असतो की कृत्रिम पुत्राला त्याच्या पित्याने अथवा मातेने दिलेला नसतो आणि त्याची स्वतःची संमति अवश्य असते म्हणजे तो सज्ञान झालेला असावा लागतो. आधुनिक काळी कृत्रिमपुत्र मिथिला (तिरहूत) आणि आजूबाजूच्या जिल्ह्यांत आणि मलबार प्रांतात नंबुद्री ब्राह्मणात मान्य केला जातो.

**गूढज अथवा गूढोत्पन्न पुत्र.** एकाद्या गृहात गुप्त रीतीने जन्मलेला आणि ज्याचा बीजदाता पिता कोण आहे हे माहीत नसलेला जो पुत्र तो गूढज अथवा गूढोत्पन्न. ह्या प्रकारच्या पुत्राचा ऋग्वेदामध्ये (२·२९·१) देखील उल्लेख केलेला असावा असे दिसते.

**अपविद्ध** (टाकून दिलेला) पुत्र. एकाद्या मुलाला त्याच्या मातापितरांनी अथवा त्यांच्यापैकी कोणी एकाने सोडून दिल्यावर ज्याचा एकाद्याने स्वीकार केलेला असतो असा पुत्र.

**कानीन** (कुमारिकेचा) पुत्र. एकाद्या कुमारिकेला आपल्या पित्याच्या घरी गुप्तपणे झालेला पुत्र तो कानीन. तो पुढे ती कन्या ज्याच्या बरोबर विवाह करील त्याचा पुत्र होतो आणि त्याला त्याच्या मातेची संपत्ती प्राप्त होते. कानीन हा शब्द अथर्ववेदात (५·५·८) आला आहे आणि कुमारीपुत्र हा शब्द वाजस. संहितेमध्ये (३०·६) आला आहे.

**सहोढ पुत्र** (वधू बरोबर प्राप्त झालेला). हा विवाहाच्या वेळी गरोदर असलेल्या स्त्रीचा पुत्र असतो. विवाहाच्या वेळी ती स्त्री गरोदर होती ही गोष्ट (तिच्याबरोबर विवाह करणाऱ्याला) माहिती असो अथवा नसो असा पुत्र त्या (गरोदर) स्त्रीबरोबर विवाह करणाऱ्या मनुष्याचा होतो. पारिजात (विवा. रत्ना पा. ५६५) ह्या ग्रंथात म्हटले आहे की कानीन आणि सहोढ हे त्यांच्या मातांचा पिता निपुत्रिक असेल तर त्याचे पुत्र होतात आणि जर त्याला पुत्र असतील तर ते त्यांच्या मातेच्या पतीचे पुत्र होतात आणि जर त्या दोघांनाही (म्हणजे मातेच्या पित्याला अथवा पतीला) पुत्र नसतील तर ते त्या दोघांचेही पुत्र होतात.

**क्रीत** (विकत घेतलेला) पुत्र. एकाद्या मनुष्याने जो मुलगा आपला पुत्र करण्याकरिता त्याच्या (म्हणजे त्या मुलाच्या) मातापित्यांजवळून विकत घेतलेला असतो तो क्रीतपुत्र. असा पुत्र गुणांत पित्याच्या समान असो अथवा नसो.

**पौनर्भव** (पुनर्विवाह केलेल्या स्त्रीचा) पुत्र. पतीने त्याग केलेल्या अथवा विधवा असलेल्या स्त्रीने स्वतःच्या मनाप्रमाणे दुसरा विवाह केल्यानंतर जन्म दिलेला पुत्र.

**स्वयंदत्त** (स्वतःच दिलेला) पुत्र. जो मुलगा आपले मातापिता मृत झाल्यामुळे अथवा त्यांनी योग्य कारणाविना त्याग केल्यामुळे दुसऱ्या एकाद्या मनुष्याला (पुत्र म्हणून) आपण स्वतःच देतो तो स्वयंदत्त पुत्र.

**शौद्र** अथवा **पारशव** पुत्र. एकाद्या ब्राह्मणाने कामविकाराने एकाद्या शूद्र पत्नीच्या ठिकाणी उत्पन्न केलेला पुत्र.

ही यादी जराशी प्रचंड दिसते आणि मोठेमोठे विद्वान लोक देखील त्या यादीच्या योगाने विस्मित झाले आहेत आणि त्यांनी इतक्या प्रकारच्या पुत्रांच्या उद्भवाविषयी आणि आवश्यकतेविषयी सर्व प्रकारची भरमसाट विधाने केली आहेत आणि असमर्थनीय उपपत्या सुचविल्या आहेत. काहींच्या मते काही अंशी मातेच्या अनैतिक संबंधामुळे उत्पन्न झालेले आणि बहुतांशी पित्याच्या रक्ताचा संबंध नसणारे हे इतक्या प्रकारचे पुत्र बहुधा त्यांनी आपले श्राद्ध करावे ह्या पारमार्थिक कारणाने आणि कुटुंबात शक्य तितके अधिक सामर्थ्यवान कार्यकर्ते असावेत ह्या आर्थिक कारणाने मानण्यात आले असावेत. ह्या विद्वान ग्रंथकारांनी असे गृहीत धरले असावे असे दिसते की स्मृतींनी सर्वही गौण पुत्र पारलौकिक लाभाच्या दृष्टीने समान योग्यतेचे मानले असून एकाद्या मनुष्याला एकाच वेळी निरनिराळ्या सर्व प्रकारचे अथवा बहुतेक प्रकारचे पुत्र असणे शक्य असते. परंतु ह्या दोनही बाबतीत त्यांची चूक झालेली आहे.

सर्व प्रकारचे गौण पुत्र स्मृतींनी पारलौकिक लाभाच्या बाबतीत समान योग्यतेचे मानलेले नाहीत. वेदग्रंथांत आणि स्मृतींत पुत्राची जी अतिशय प्रशंसा केलेली असते ती फक्त औरस पुत्राला अनुलक्षून केलेली असते आणि मनूने (९·१८०) म्हटल्याप्रमाणे औरस आणि पुत्रिका ह्यांच्या व्यतिरिक्त बाकीचे पुत्र हे खऱ्या पुत्राचे केवळ **प्रतिनिधी** असतात. औरस पुत्र जसे पारलौकिक हित करू शकतो तसे हित गौण पुत्र करू शकत नाहीत. सुमारे २००० वर्षे तरी क्षेत्रज आणि इतर पुत्र ह्यांना स्मृतींनी वर्ज्य मानले होते.

कोणाही मनुष्याला एकाच वेळी निरनिराळ्या सर्व प्रकारचे अथवा बहुतेक प्रकारचे पुत्र असू शकत नाहीत. ज्या मनुष्याला अगोदरचा औरस पुत्र, पौत्र अथवा प्रपौत्र असेल त्याला पुत्रिकापुत्र, क्षेत्रजपुत्र अथवा दत्तकपुत्र असू शकत नाही.

पित्याच्या रक्ताच्या संबंधाचे बाबतीत औरसाप्रमाणेच पौनर्भव आणि शौद्र हेही त्या मनुष्याचे कायदेशीर पुत्र असतात फक्त त्यांच्या बाबतीत काही कारणाने दोष आलेला असतो. पुत्रिका ही त्या मनुष्याचे स्वतःचेच अपत्य असते आणि पुत्रिका पुत्र हा त्याचा नातू असतो.

मातेच्या अनैतिक संबंधाच्या बाबतीत दत्तक, कृत्रिम, क्रीत, अपविद्ध, स्वयंदत्त हे पाच प्रकारचे पुत्र कोणत्यां तरी एका मनुष्याचे पुत्र असतात आणि त्यांना दुसऱ्या कोणत्या तरी मनुष्याने आपले पुत्र मानलेले असते. त्यांच्यापैकी एकाच्याही बाबतीत मातेच्या दुर्वर्तनाचा जरा देखील संबंध नसतो. अशा रीतीने १३ प्रकारांपैकी ९ प्रकार मातेच्या अनैतिक संबंधाच्या दोषापासून मुक्त असतात.

क्षेत्रज, गूढज, कानीन आणि सहोढ ह्या चार प्रकारच्या बाबतीत मातेच्या अनैतिक वर्तनाचा संबंध असतो आणि ते पुत्र सज्जनांनी निंद्य मानले आहेत. कानीन हा मातेच्या विवाहापर्यंत तिच्या पित्याच्या पालकत्वाखाली असतो आणि तो त्या मुलीशी विवाह करणाऱ्याला दिला जातो ह्यावरून त्या मनुष्याने त्या मुलीच्या पूर्वीच्या वर्तनाबद्दल तिला क्षमा केली आहे असे गृहीत धरले जात असे. सहोढाच्या बाबतीत ते अपत्य त्या मुलीच्या पतीनेच विवाहापूर्वी उत्पन्न केले असावे अथवा तिच्या पतीने आपल्या पत्नीच्या वर्तनाची क्षमा केली असावी. हेच विधान गूढज पुत्राच्या बाबतीत लागू पडते. गूढज, कानीन आणि सहोढ हे पुत्र जरी अनैतिक संबंधापासून झालेले असले तरी कोणी तरी त्यांचे संगोपन आणि पालकत्व करणे अवश्य असे

आणि असे पुत्र त्यांच्या मातांबरोबर विवाह करणारांचे होतात असे जे स्मृतींनी म्हटले आहे त्यात त्यांच्या पालनपोषणाची आणि पालकत्वाची व्यवस्था लावणे हाच त्यांचा खरा हेतु होता. ज्यावेळी एकाद्या पतीने एकाद्या स्त्रीबरोबर विवाह करण्याचे कबूल करून तिच्या अपराधाची क्षमा केली असेल त्या वेळी स्मृती अशा अनैतिक संबंधापासून झालेल्या अपत्याच्या पालनपोषणाची आणि वारसा हक्काची तरतूद करतात. दत्तक, क्षेत्रज आणि इतर प्रकारचे पुत्र जर पित्याच्या वर्णाचे असतील तर त्यांना पित्याला औरस पुत्र झाल्यास फक्त १/३ हिस्सा मिळण्याचा हक्क असतो आणि जर ते पित्याच्या वर्णाहून भिन्न वर्णाचे असले तर त्याला फक्त अन्न वस्त्र मिळण्याचा अधिकार असतो. (कात्या ८५७). मनूने म्हटले (९·१३४) म्हटले आहे की पुत्रिका प्रथम केल्यानंतर औरसपुत्र जन्मला तर त्या दोघांना समान मिळकत मिळावी आणि क्षेत्रजाच्या बाबतीत औरसाने त्याला पित्याच्या मिळकतीत १/५ अथवा १/६ भाग द्यावा.

निरनिराळ्या प्रकारच्या पुत्रांच्या स्थानांबद्दल आणि हिश्यांबद्दल स्मृतींच्या निरनिराळ्या मतांवरून असे वाटते की निरनिराळ्या प्रकारच्या पुत्रांची ही व्यवस्था फारशी प्रचलित नसावी अथवा सर्वसाधारणपणे मान्य समजली जात नसावी आणि जात असलीच तर ती व्यवस्था बहुधा काही विशिष्ट प्रांतांत अथवा समाजांत प्रचलित असून प्राचीन स्मृतींच्या काळी देखील ती नष्ट होण्याच्या मार्गाला लागली असावी. आधुनिक काळी न्यायालये सामान्यतः औरस आणि दत्तक ह्या दोन प्रकारच्या पुत्रांनाच मान्यता देतात आणि इतर प्रकारचे पुत्र फार काळापासून प्रचारातून गेले असल्याचे मानतात.

——————

अनुक्रमणिका

# प्रकरण ८७

## दत्तक पुत्र

(मू. ग्रं. पा. ३.६६२–६९९)

दत्तकाच्या प्रश्नावर आधुनिक काळी जितके वाद उपस्थित झाले आहेत तितके हिंदू कायद्याच्या दुसऱ्या कोणत्याही प्रश्नावर झालेले नाहीत. काही काही वेळी एकाद्या न्यायालयाने निर्णय केल्यानंतर ५० वर्षानंतर सर्वांत वरिष्ठ न्यायालयाने तो निर्णय फिरविला आहे. एकाच स्मृतिवचनाचे निरनिराळ्या निबंधग्रंथांनी निरनिराळे अर्थ केलेले आढळतात आणि त्यांना अनुसरून निरनिराळ्या प्रांतांतील न्यायालयांनी दत्तकाच्या कायदेशीरपणाविषयी निरनिराळे निर्णय केले आहेत आणि त्यामुळे दत्तकासंबंधीच्या कायद्यात अतिशय गुंतागुंत झालेली आहे. प्रस्तुत प्रकरणात स्मृतींनी आणि मध्ययुगीन काळात झालेल्या निबंधग्रंथांनी दिलेल्या नियमांवरून निघणारा प्रचलित कायदा कसा आहे हे थोडक्यात सांगण्याचा प्रयत्न करण्यात येईल आणि त्या कायद्याशी संबंध असलेले न्यायालयांनी दिलेले काही थोडेसे निर्णयही सांगण्यात येतील.

वेदकाळात दत्तक घेण्याची कल्पना मनात [मनासापि न मन्तव्या दत्ताद्याः स्वसुता इति । ते दत्तकत्वमिच्छन्ति दृष्ट्वा यद् धनिकं नरम् ॥ शुक्रनीति २·३१.] (शुक्रनीति २·३१) येण्याच्याही योग्यतेची नसल्याचे मानण्यात येत असले तरी वेदवाङ्मयात देखील दत्तक घेतलेल्या पुत्राविषयी काही उल्लेख सापडतात. उदाहरणार्थ, तैत्ति. सं. (७·१·८·१) मध्ये आपला एकुलता एक पुत्र दत्तक देणाऱ्या अत्रीची कथा आली आहे. ऐत. ब्रा. (३३) मध्ये विश्वामित्राने **स्व**तःचे १०१ पुत्र असताना देखील शुनःशेपाला देवरात ह्या नावाने दत्तक घेतल्याचे वर्णन केले आहे.

सूत्रांत आणि स्मृतींत दिलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या पुत्रांच्या याद्यांत दत्तक पुत्राचा समावेश केला आहे आणि काही ग्रंथांनी त्या पुत्राच्या व्याख्या दिल्या आहेत. तथापि, वसिष्ठ ध. सू. व्यतिरिक्त इतर सूत्रांत आणि स्मृतींत दत्तकाविषयी ह्याहून फारसे अधिक काही सांगितलेले नाही. वसिष्ठ ध. सू. मध्ये (१५·१-९; १७·२८-२९) मध्ये दत्तकासंबंधी सविस्तर नियम दिले असून असे विवेचन करणाऱ्या धर्मग्रंथांत तोच ग्रंथ सर्वांत प्राचीन असा आहे. मनुस्मृती मध्ये (९·१४१।१४२) दत्तक घेणाऱ्याच्या गोत्राचा नसलेल्या पुत्राच्या दत्तविधानापासून होणाऱ्या परिणामांचे वर्णन केले आहे. अत्रि, शौनक, शाकल यांच्या स्मृतींत आणि कल्कि पुराणामध्ये दत्तकासंबंधी विवेचन केले असल्याचे त्या ग्रंथांतील अवतरणांवरून दिसून येते. आधुनिक काळात झालेल्या ग्रंथांत व्यवहारमयूख, दत्तकमीमांसा, दत्तकचन्द्रिका, संस्कारकौस्तुभ ह्या ग्रंथांत दत्तकाविषयी सविस्तर विवेचन केले आहे.

दत्तकासंबंधी विचार करावयाच्या प्रमुख बाबी पुढीलप्रमाणे आहेत : (१) दत्तक घेण्याचे हेतू (२) कोणत्या व्यक्तींना कायदेशीरपणे दत्तक घेता येतो, (३) कोणत्या व्यक्तींना दत्तक म्हणून स्वीकारता येते, (४) दत्तविधानाला आवश्यक गोष्टी, (५) दत्तकाचा विधी आणि (६) दत्तक घेतल्यामुळे होणारे परिणाम.

**दत्तक घेण्याचे हेतू :** दत्तकासंबंधीची मूलभूत कल्पना प्रत्येक हिंदूवर असणार पितरांचे ऋण आणि ते ऋण फेडण्याकरिता प्रत्येक हिंदूला आपला वंश चालू राहावा आणि धार्मिक संस्कार केले जावेत ह्याविषयी तजवीज करणे अवश्य असते ही भावना आहे. पुत्राला मिळकत प्राप्त होण्याचा अधिकार ही गौण बाब असते.

'ज्या मनुष्याला पुत्र नसेल त्यानेच आपणाला पिंड आणि उदक मिळावे ह्याकरिता शक्य ते प्रयत्न करून पुत्राकरिता एकादा प्रतिनिधी मिळवावा' असे अत्रीने (५२) म्हटले आहे. ह्यावरून दत्तक घेण्याचे दोन हेतु दिसून येतात, ते म्हणजे (१) पिंड आणि उदक मिळावे आणि (२) दत्तक घेणाऱ्याचे आणि त्याच्या कुटुंबाचे नाव अखंडपणे पुढे चालावे.

**दत्तक कोणाला देता येतो.** दत्तक देण्याचा मूलभूत अधिकार मुलाच्या पित्याला असतो आणि त्याला मातेची संमती न घेता देखील आपला पुत्र देता येतो. पिता जिवंत असून संमती देण्याला समर्थ असताना मातेला आपल्या पतीची संमती न घेता आपला पुत्र दत्तक देता येत नाही. माता आणि पिता उभयता मृत असतील तर पितामह अथवा दुसऱ्या कोणालाही एकादा मनुष्य दत्तक देता येत नाही. एकादा मनुष्य दत्तक दिलेला असेल तर त्याला स्वतःला दत्तक बसण्यापूर्वी झालेला पुत्र दत्तक देता येतो. एकाद्या हिंदूने दुसरा धर्म स्वीकारला असला तर त्याला हिंदु असताना झालेला आणि हिंदु असणारा पुत्र दत्तक देता येतो (फक्त त्याला दत्तकाच्या धार्मिक विधीत प्रत्यक्ष भाग घेता येत नाही आणि त्याकरिता एकाद्या हिंदू मनुष्याला नेमता येतो). एकाद्या पुत्राच्या मातेने पुनर्विवाह केला असेल तर तिला पहिल्या पतीपासून झालेला पुत्र दत्तक देता येत नाही.

**कोणत्या व्यक्तींना दत्तक घेता येतो.** प्रत्येक हिंदूला जर स्वतःचा एकादा औरसपुत्र अथवा पौत्र अथवा प्रपौत्र नसेल तर दत्तकपुत्र घेता येतो. असा हिंदु स्वतः कायदेशीर रीतीने अज्ञान असला तरी चालते मात्र तो अक्कलहुशारीत असला पाहिजे आणि त्याचे सारासार विचार कळण्याइतके वय झालेले असले पाहिजे. एकाद्याला असणारे पुत्र, पौत्र अथवा प्रपौत्र जन्मतः मूकपणासारख्या एकाद्या व्यंगाने वारसा मिळण्याला अपात्र असतील तर त्याला देखील दत्तक पुत्र घेता येतो.

एकादा मनुष्य मृत झाल्यावर त्याच्या विधवेला त्या मृत मनुष्याकरिताच फक्त दत्तक घेता येतो. विधवेच्या ह्या अधिकाराच्या बाबतीत अतिशय मतवैचित्र्य अस्तित्वात आहे. कोणत्याही स्त्रीने आपल्या पतीच्या संमतीशिवाय दत्तक **देऊ** नये अथवा **घेऊ** नये असे वसिष्ठाने [न स्त्री पुत्रं दद्यात्प्रतिगृह्णीयाद्वान्यत्रानुज्ञानात्भर्तुः । वशिष्ठ १५·५.] (१५·५) म्हटले आहे. ह्या वचनाचे भिन्नभिन्न प्रकारचे अर्थ करण्यात आले आहेत. उदाहरणार्थ, मुंबई आणि पश्चिम भारतात प्रमाण मानले जाणाऱ्या व्यवहारमयूख (पा. ११३), निर्णयसिंधू (३. पूर्वार्ध पा. २४९) प्रभृति ग्रंथांनी असे प्रतिपादन केले आहे की वसिष्ठाचे हे वचन फक्त ज्या स्त्रीचा पती जिवंत आहे तिलाच लागते आणि विधवेने पतीच्या आदेशाशिवाय दत्तक घेण्यास प्रत्यवाय नाही कारण पतीने आपल्या विधवेला स्पष्टपणे अथवा अवश्य अशा अनुमानावरून दत्तक घेण्यास **प्रतिबंध** केला नसेल तर तिला दत्तक घेण्याची पतीची अनुमती आहे असे गृहीत धरले पाहिजे.

ह्या बाबतीत न्यायालयांनीही निरनिराळ्या प्रकारचे निर्णय केले आहेत. उदाहरणार्थ, मुंबईच्या वरिष्ठ न्यायालयाने एका दाव्यात [रामजी वि० घमाऊ, ६ मुंबई ४९८ (फु—बें.) मुंबई हायकोर्ट.] असा निर्णय दिला होता की ज्या विधवेचा पती मृत्यूच्या वेळी एकत्र कुटुंबाचा भागीदार होता, तिला तिच्या अथवा पतीच्या अविभक्त

सहभागीदारांच्या अनुमतीशिवाय दत्तक घेता येत नाही. हा निर्णय ५० वर्षेपर्यंत अबाधित राहिल्यानंतर प्रीव्ही कौन्सिल [भीमाबाई वि. गुरुनाथ गौड, लॉ. रि. ६० इंडि. अपीले पा. २५ प्रि. कौ.] ह्या सर्व वरिष्ठ न्यायालयाने दुसऱ्या एका दाव्यात **रद्द** ठरविला आणि असे ठरविले की अशा विधवेला तिच्या पतीच्या सहभागीदारांच्या अनुमतीशिवाय दत्तक घेता येतो. पुढे ह्या निर्णयाला दुसऱ्या एका दाव्यात [अमरेंद्राचा दावा, ६० इंडि. अपीले २४२. प्रि. कौ.] प्रीव्ही कौन्सिलने अशी पुस्ती जोडली की ज्या विधवेला दत्तक घेण्याचा असतो अशा विधवेने दत्तक घेतल्यावर त्या दत्तविधानाच्या पूर्वी जरी एकादी मिळकत दुसऱ्या कोणा पुरुष वारसाकडे वारसा हक्काने गेली असली तरी देखील ती त्या वारसाकडून काढून त्या दत्तक पुत्राला प्राप्त होते. तसेच असे ठरविण्यात आले [राजे व्यंकटराव वि. जयवंतराव, ४ मुं. हायकोर्ट रिपो. (ए. सी. जे.) १९१.] आहे की विधवेला तिच्या हयातीत केव्हाही दत्तक घेता येतो (एका दाव्यातील विधवेने तिच्या पतीच्या मृत्यूनंतर ७१ वर्षांनी दत्तक घेतला होता). अशा प्रकारच्या निर्णयांचा मिताक्षरा पद्धतीच्या एकत्र कुटुंबपद्धतीवर फार अनर्थकारक परिणाम झाला आहे. मुंबई प्रांतात एकादी शूद्र जातीची विधवा व्यभिचारी असली तरी तिला दत्तक घेता येतो.

**कोण दत्तक होऊ शकतो.** व्यवहारमयूखात [दत्तकश्च पुमानेव भवति न कन्या । सझेयो दत्रिमः सुतः ॥ मनु ९·१६८.] (पा १०८-१०९) असे सांगितले आहे की दत्तक घ्यावयाची व्यक्ती **पुरुषच** असली पाहिजे. परंतु कुमाऊन प्रांतातील रूढीप्रमाणे कन्या देखील दत्तक घेता येते. दत्तक घ्यावयाची व्यक्ती दत्तक घेणाऱ्याच्याच जातीची असली पाहिजे. परंतु एकाच वर्णाच्या भिन्नभिन्न पोट जातीतील मुलगा घेण्यास न्यायालये संमती देण्याचा संभव आहे. काही ग्रंथांत (दत्त. चं. पा. ७) असे सांगितले आहे की दत्तकपुत्र [यदि स्यादन्यजातीयो गृहीतोपि सुतः क्वचित् । अंशभाजं न तं कुर्याच्छौनकस्य मतं हि तत् ॥ शौनक (दत्तक चं. पा. ७.).] भिन्न जातीचा असला तरी चालेल परंतु अशा दत्तकपुत्राला दत्तक घेणाऱ्या पित्याची संपत्ती मिळणार नाही.

ज्याला एकच पुत्र असेल त्याने तो दत्तक देऊ नये असे वसिष्ठाचे [न त्वेकं पुत्रं दद्यात्प्रतिगृह्णीयाद्वा। स हि सन्तानाय पूर्वेषाम् । वसिष्ठ १५· १—९.] (१५.१-९) वचन आहे. तसेच ज्येष्ठ पुत्राला दत्तक देऊ नये असा नियम आहे. परंतु हे दोन्ही नियम शिफारसवजा असल्याचे मानण्यात येते. दोन अथवा अधिक व्यक्तींना एकच मुलगा दत्तक घेता येत नाही. परंतु ह्या नियमाला द्व्यामुष्यायण दत्तक हा अपवाद आहे.

शौनकाने (दत्त मी. पा. १४८-१४९) असा नियम सांगितला आहे की दत्तक घ्यावयाचा मुलगा **पुत्रच्छायावह** असला पाहिजे (म्हणजे तो औरस पुत्राच्या प्रतिबिम्बासारखा असला पाहिजे). ह्या नियमाचे टीकाकारांनी भिन्न भिन्न अर्थ लावले आहेत आणि त्यांना अनुसरून निरनिराळ्या प्रांतातील न्यायालयांनी परस्परविरोधी निर्णय दिले आहेत. उदाहरणार्थ, दत्तक मीमांसा आणि दत्तक चंद्रिका ह्या ग्रंथांनी वरील वचनाचा असा खुलासा केला आहे की दत्तक घ्यावयाच्या पुत्राची उत्पत्ती दत्तक घेणाऱ्याने स्वतः नियोगाच्या विधीने आणि **तशासारख्या प्रकाराने** करण्याची शक्यता असली पाहिजे. ह्या खुलाशाच्या आधारावर न्यायालयांनी [मीनाक्षी वि. रामनाद ११ मद्रास ४९ (फु. बें.); भगवान सिंघ वि. भगवान सिंघ लॉ. रिपो. २६ इंडि. अपीले, १५३, १६०. (प्रि. कौ.)] असा एक चमत्कारिक नियम बनविला आहे की ज्या मुलाच्या मातेबरोबर ती कुमारिका असताना दत्तक घेणाऱ्या पुरुषाला विवाह करता आला नसता त्या मुलाला दत्तक घेता येत नाही. परंतु मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा आणि मावशीचा मुलगा ह्यांच्या व्यतिरिक्त परगोत्रातील मुलगा दत्तक घेण्यास प्रत्यवाय नाही. ह्या नियमाचे विचित्र परिणाम झाले आहेत व मुलीचा नवरा, स्वतःचा बंधु, मामा, मामाचा पुत्र, ह्यांच्यासारख्या व्यक्तींना दत्तक घेण्यास मोकळीक मिळाली आहे परंतु मुलीचा मुलगा, बहिणीचा मुलगा आणि मावशीचा मुलगा ह्यांना दत्तक घेण्यास प्रतिबंध केला आहे.

दत्तक घ्यावयाच्या मुलांच्या पसंतीच्या बाबतीत दत्तकमीमांसा (पा. ४१, ४८) प्रभृती ग्रंथांनी काही क्रम सांगितला आहे. परंतु तो क्रम केवळ शिफारसवजा मानला जातो आणि त्याच्याविरुद्ध घेतलेला दत्तक पूर्णपणे कायदेशीर असतो.

दत्तक घ्यावयाच्या मुलाच्या **वयाच्या** बाबतीत देखील अतिशय मतवैचित्र्य आहे. दत्तकमीमांसेच्या (पा. १३२) मताप्रमाणे तीन वर्षांपर्यंतचा **उत्तम** काल, तीन ते पांच हा **गौण**काल आणि पाच वर्षानंतर कोणाही मुलाला दत्तक घेता येणार नाही. दत्तकचंद्रिकेच्या मता (पा. ३६) प्रमाणे तीन उच्च वर्णातील मुलगा उपनयनापर्यंत दत्तक घेता येतो. व्यवहारमयूख [दत्तकस्तु परिणीत उत्पन्नपुत्रोपि च भवतीति तातचरणाः । युक्तं चेदं बाधकाभावात् । व्य. म. पा. ११४.] (पा. ११४) प्रभृती ग्रंथांच्या मताप्रमाणे सगोत्र नसलेलाही मुलगा उपनयनानंतर अथवा विवाहानंतर दत्तक घेता येतो. मुंबई प्रांतात मुलाचे केवढेही वय असले आणि त्याला अपत्ये झाली असली तरी आणि तो दत्तक घेणाऱ्या व्यक्तीपेक्षा मोठा असला तरी चालते.

**द्व्यामुष्यायण दत्तक.** ज्यावेळी एकादा मनुष्य आपला एकुलता एक पुत्र दुसऱ्या मनुष्याला अशी अट घालून दत्तक देतो की तो पुत्र जनक पित्याचा आणि दत्तक घेणाऱ्या पित्याचा असा दोघांचा पुत्र समजण्यात यावा, त्यावेळी त्या पुत्राला द्वामुष्यायण म्हणतात. अशा पुत्राला दोन्ही कुटुंबातील वारसाहक्क प्राप्त होतो. द्व्यामुष्यायणाचे नित्य आणि अनित्य असे दोन प्रकार शास्त्रात सांगितले आहेत. (दत्त मी. पा. १८८-८९). परंतु न्यायालयांनी असे ठरविले आहे की त्या प्रकारात समाविष्ट होणारे क्षेत्रज आणि द्व्यामुष्य हे प्रकार प्रचारातून गेले असल्यामुळे दत्तक घेतलेला पुत्र दोघांचा पुत्र होईल अशी अट असल्याचे सिद्ध न झाल्यास प्रत्येक दत्तक **साधा दत्तकच** आहे असे गृहीत धरले जाईल.

**दत्तक घेण्याचा विधि.** दत्तविधानामध्ये दत्तक मुलाच्या जनक पित्याने तो मुलगा दत्तक घेणाऱ्याच्या कुलात समावेश होण्याच्या हेतून देणे आणि दत्तक घेणाऱ्यान त्या मुलाचा स्वीकार करणे हे सर्वांत अधिक महत्त्वाचे घटक असतात. काही प्रसंगी दत्तहोम करणे हाही एक महत्त्वाचा घटक असतो. मुलगा दिला आणि घेतला म्हणजे लागलीच दत्तहोम केला पाहिजे असे नाही. तो मागाहून केला तरी चालते आणि दत्तक देणारी अथवा घेणारी व्यक्ती विधवा स्त्री अथवा शूद्र अथवा आजारी असेल त्यावेळी तो होम करण्याचे काम दुसऱ्याकडेही सोपविता येते. द्विजांच्या (ब्रांह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्यांच्या) बाबतीत दत्तक घ्यावयाचा मुलगा दत्तक घणाऱ्याच्या जातीचा असेल तर दत्तहोम आवश्यक नसतो. शूद्राच्या बाबतीत होमाची आवश्यकता नसते.

**दत्तविधानाचे परिणाम.** दत्तविधानाच्या योगाने दत्तक घेतलेली व्यक्ती तिच्या मूळच्या कुटुंबातून काढली जाऊन दत्तक घेणाऱ्याच्या कुटुंबात समाविष्ट केली जाते. दत्तविधानाच्या योगाने दत्तक घेतलेल्या व्यक्तीला दत्तक घेतलेल्या कुटुंबात, काही थोड्या बाबीव्यतिरिक्त, औरस पुत्राचे सर्व अधिकार आणि हक्क प्राप्त होतात. मनूने (९·१४१।१४२) म्हटले आहे की दत्तक घेतलेला पुत्र आपल्या दत्तक घेणाऱ्या पित्याची संपत्ती ग्रहण करतो. दत्तविधान झाल्यावर दत्तक दिलेला पुत्र आपल्या जनकपित्याचे गोत्र लावीत नाही आणि जनक पित्याच्या संपत्तीवर त्या पुत्राला काहीही हक्क राहत नाही आणि अशी संपत्ती त्यानंतर त्या मुलाच्या जनक पित्याच्या मालकीची होते. तो दत्तक दिलेला पुत्र आपल्या जनक पित्याचे अंत्य विधी आणि श्राद्ध करीत नाही.

अनुक्रमणिका

व्यवहारमयूखाने म्हटले आहे की एकादा पुत्र दत्तक दिल्यानंतर त्याचे जनक कुटुंबातील बंधु, चुलता ह्यांच्याबरोबर असलेले तशाच स्वरूपाचे संबंध नष्ट होतात.

दत्तकाच्या जनक पित्याला त्याच्या मृत्यूच्या वेळी संतती नसेल त्या ठिकाणी दत्तक दिलेल्या पुत्राने देखील आपल्या जनक पित्याचे अंत्य संस्कार करावे असे विष्णूचे (सर. विला. पा. ३९४) मत आहे.

वर उल्लेख केलेल्या वचनांचे न्यायालयांनी भिन्नभिन्न प्रकारचे अर्थ करून निर्णय दिले आहेत. काही न्यायालयांनी [दत्तात्रय वि. गोविंद, ४० मुंबई ४२९ मुं. हायकोर्ट.] असे ठरविले आहे की जरी एकादा मनुष्य काही मिळकतीचा एकत्र कुटुंबातील भागीदार ह्या नात्याने पूर्णपणे मालक असला तरी तो दत्तक दिल्यावर त्याची त्या मिळकतीवरील मालकी नष्ट होऊन ती मिळकत तो मनुष्य दत्तविधानाच्या दिवशी मृत झाल्याचे समजून त्याच्या वारसाकडे जाते. ह्याच्या उलट दुसऱ्या काही [वेंकट नरसिंह वि. रंगय्या, २९ मद्रास ४३७.] न्यायालयांनी असे ठरविले आहे की एकाद्या मनुष्याला दत्तविधानापूर्वी जी मिळकत प्राप्त झाली असेल त्या मिळकतीवरील त्याचा हक्क त्या मनुष्याला दत्तक दिल्याने नष्ट होत नाही. ह्या दोन्ही तत्त्वांना विसंगत असेही निर्णय काही न्यायालयांनी [महाबळेश्वर वि. सुब्रह्मण्य, ४७ मुंबई ५४२.] दिले आहेत.

मूळ श्लोकांच्या वास्तविक अर्थाप्रमाणे दत्तक घेतलेल्या व्यक्तीचे त्याच्या जनक कुटुंबाच्या गोत्राशी असलेले संबंध सर्व दृष्टीने नष्ट होत नाहीत. जनक कुटुंबातील गोत्र एकादा मनुष्य दत्तक घेतल्यानंतरही काही काही बाबतीत चालू राहते.

उदाहरणार्थ, प्रत्येक दत्तकाने विवाह करतेवेळी आपले मूळचे गोत्र आणि दत्तक पित्याचे गोत्र ही वर्ज्य केली पाहिजेत. हा निषेध कोणाच्या मताप्रमाणे पाच अथवा सात पिढ्यांपर्यंत मर्यादित असतो आणि कोणाच्या मताप्रमाणे तो निरंतर पाळला पाहिजे. साध्या दत्तकाच्या दत्तक कुळात ७ पिढ्यांपर्यंत सपिंड संबंध असतो आणि दत्तक मातेच्या कुळातील ५ पिढ्यांपर्यंत असतो. दत्तक पुत्राला आपल्या जनक पित्याचे श्राद्ध काही परिस्थितीत करिता येते, जनक पित्याच्या मृत्यूच्या वेळी ३ दिवस आशौच पाळावे लागते आणि जनक पित्यालाही दत्तक दिलेल्या पुत्राच्या मृत्यूच्या वेळी ३ दिवस आशौच पाळावे लागते. दत्तक पुत्राला विवाहाच्या बाबतीत जनक कुलातील निषिद्ध पिढ्यांपर्यंत विवाह करता येत नाही आणि त्या गोष्टीपुरता तो जनक कुळात जन्मलेला नाही असे समजता येणार नाही. त्याच्या जनक कुळात त्याचे जे संस्कार झाले असतील ते पुन्हा करण्यात येत नाहीत. अशा रीतीने दत्तविधानामुळे मूळच्या कुटुंबाशी असणारे संबंध अंशतःच मात्र नष्ट होतात, सर्वस्वी नष्ट होत नाहीत.

दत्तक घेतलेल्या पुत्राला जणू काय त्याचा त्या दत्तक कुटुंबात जन्म झाला आहे अशा संपूर्ण रीतीने त्या कुटुंबात वारसा हक्क प्राप्त होतो म्हणजे त्याला दत्तक पित्याचाच नाही तर दत्तक पित्याच्या बंधूला अथवा चुलत भावाला पुत्र अथवा दुसरा कोणी जवळचा वारस नसेल तर त्यांचाही वारसा प्राप्त होतो. उलट पक्षी, दत्तक मातेला आणि तिच्या पित्याच्या कुटुंबातील नातलगांनाही दत्तक पुत्राचा वारसा मिळण्याचा हक्क असतो.

दत्तक पुत्र घेतल्यानंतर दत्तक पित्याला जर औरस पुत्र होईल तर दत्तकपुत्राला काय मिळते ह्याविषयी स्मृतीग्रंथांत आणि निबंध ग्रंथांत मतवैचित्र्य आहे. उदाहरणार्थ, दायभागात उद्धृत केलेल्या कात्यायनाच्या (दायभाग १०-१३ पा १४८) वचनाप्रमाणे अशा परिस्थितीत दत्तकादी इतर पुत्रांना जर ते पित्याच्या जातीचे असतील तर १/३ मिळकत मिळते. जैन लोकात आणि वाराणसी प्रांतात १/४ मिळते.

अनुक्रमणिका

मुंबईच्या न्यायालयांनी [गिरिअप्पा वि. निंगाप्पा १७ मुंबई १००.] असा निर्णय केला आहे की दत्तक पुत्राला औरस पुत्राच्या हिश्याचा १/४ म्हणजे संपूर्ण मिळकतीचा १/५ मिळावा आणि औरसाला ४/५ मिळावा. मद्रास प्रांतात शूद्रामध्ये औरस आणि दत्तक ह्यांना समसमान वाटे मिळतात. मिळकत अविभाज्य असेल आणि वडील घराण्याकडे चालावयाची असेल तर ती मागाहून झालेल्या औरस पुत्राला संपूर्ण मिळते. दोन बंधू मिळून एकत्र कुटुंब [नगीनदास वि. बच्चू, लॉ. रिपो. ४३ इं. अपीले ५६.] असेल आणि एका बंधूला एक औरसपुत्र आणि दुसऱ्या बंधूला एक दत्तक पुत्र असेल तर त्या दोघांना समान वाटे मिळतात कारण वसिष्ठाने सांगितलेला दत्तकाला १/४ मिळण्याचा नियम त्याच मनुष्याच्या औरस आणि दत्तक पुत्रांच्या बाबतीत लागतो.

―――――

**अनुक्रमणिका**

# प्रकरण ८८

## पुत्रानंतरचा वारसाचा क्रम

(मू. ग्रं. पा. ३.७००-७६९)

पुरुषांच्या आणि स्त्रियांच्या मिळकतीच्या वारसांचे पृथक् पृथक् नियम असतात. ह्या बाबतीत देखील मिताक्षरा आणि दायभाग ह्यांच्यामध्ये त्यांच्या मतांप्रमाणे मूलतत्त्वे भिन्न भिन्न आहेत. प्रथमतः पुरुषांच्या मिळकतीच्या वारसांचा विचार करू.

एकादा मनुष्य, त्याचा सहोदर भ्राता, आणि त्या मनुष्याच्या सवर्ण पत्नीपासून झालेले तीन वंशज (पुत्र, पौत्र, आणि प्रपौत्र) ह्या सर्वामिळून झालेल्या गटाला अविभक्त-दाय-सपिंड म्हणतात आणि ह्या गटातील कोणीही नसेल तरच त्या मनुष्याची संपत्ती त्याच्या सकुल्यांकडे जाते.

जेव्हा एकादा एकत्र कुटुंबातील एक भागीदार असलेला मनुष्य पुत्रसंततिरहित मृत्यु पावतो तेव्हा त्याची सर्व मिळकत त्या एकत्र कुटुंबातील हयात असणाऱ्या सहभागीदारांकडे जाते. ह्याला अपवाद म्हणजे सन १९३७ च्या कायद्यान्वये एकत्र कुटुंबाच्या मिळकतीच्या बाबतीत त्या मनुष्याची जागा त्याची विधवा घेते. परंतु असा मनुष्य विभक्त झाल्यावर मृत झाला असेल आणि त्याला पुत्रसंतती असेल (आणि अशा पुत्र संततीपासूनही तो विभक्त झालेला असेल) तर त्याच्या पुत्रसंततीला म्हणजे **पुत्र**, (पूर्वी मृत झालेल्या पुत्राचा पुत्र असणारा) **पौत्र**, आणि (पूर्वी मृत झालेल्या पुत्राच्या मृत पुत्राचा पुत्र असणारा) **प्रपौत्र** ह्या सर्वांकडे त्यांच्या मूळ पुरुषाला अनुसरून त्याची विभक्त असलेली मिळकत जाते. पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र ह्यांना त्याच्या स्वसंपादित मिळकतीत देखील जन्मतः हितसंबंध प्राप्त होतो. परंतु त्यांना त्या मनुष्याने केलेल्या त्या मिळकतीच्या विनियोगाला प्रतिबंध करता येत नाही. पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र ह्यांच्यापैकी कोणी विभक्त झालेले असतील आणि कोणी विभक्त नसतील तर त्या मनुष्याची स्वसंपादित मिळकत मृताजवळ राहणाऱ्यांना प्रथम मिळेल आणि तसे कोणीच राहत नसतील तर विभक्त पुत्र, पौत्र, प्रपौत्र ह्यांना त्यांच्या मूळ पुरुषांच्या अनुरोधाने मिळते. एकादा मनुष्य एकदा विभक्त झाल्यावर पुन्हा एकत्र होऊन मृत झाला तर त्याच्या पत्नीला तिच्या मृत पतीची मिळकत मिळते.

मृत पतीच्या मिळकतीचा वारसा हक्क त्याच्या विधवेला अनेक शतकेपर्यंत झगडल्यानंतरच मान्य करण्यात आला आहे. स्त्रिया शक्तिहीन असतात आणि दाय मिळण्याला अपात्र (अदायादीः) असतात अशा अर्थाचे वचन [तस्मात्स्त्रियो निरिन्द्रिया अदायादीरपि पापात्पुंस उपस्तितरं वदन्ति । तै. सं. ६·५·८·२.] तै. सं. (६·५·८·२) मध्ये आहे. ते वचन वास्तविकपणे सोम अर्पण करण्याच्या विधीला अनुलक्ष्यून आलेले आहे परंतु बौ. ध. सू. (पौ. ध. ग्रं. खं. १४ पा २३१) मध्ये त्या शब्दांवरून असा अर्थ काढला आहे की स्त्रियांना वारसा हक्कातून वगळावे आणि त्याच वचनाच्या आधारावर मागाहूनच्या काळात झालेल्या ग्रंथकारांनी स्त्रियांना वारसा हक्कातून वगळले आहे आणि स्मृतींनी ज्या स्त्रियांचा वारसा हक्क मान्य केला आहे त्यांच्या व्यतिरिक्त बाकीच्या सर्व स्त्रियांना वारसाच्या हक्कातून वगळाव्या असा त्याचा हेतु असल्याचे मानले आहे. मिताक्षरा आणि व्यवहारमयूख ह्या दोन्ही ग्रंथांत तै. सं. अथवा बौ. ध. सू. ह्यांचा मुळीच उल्लेख केला नाही. माधवाचार्यांनी तै. सं. मधील वचनाचा असा अर्थ केला आहे की स्त्रिया शक्तिहीन असल्यामुळे जेव्हा अपत्यें असतील तेव्हा

अनुक्रमणिका

स्त्रियांना वारसा मिळत नाही. मिताक्षरा आणि व्य. म. यांनीही बहुधा त्या वचनाचा तसाच अर्थ घेतला असावा. ह्याचा परिणाम असा झाला आहे की मद्रास आणि मुंबई हे प्रांत वगळून बाकी सर्व भारतभर स्मृतींनी उल्लेख केलेल्या फक्त पाच स्त्रियांच्या वारसा हक्काला मान्यता देण्यात येत आहे. ह्या पाच स्त्रिया म्हणजे विधवा, कन्या, माता, पितामही आणि प्रपितामही.

विधवा ही पहिली वारस असल्याचे सांगणाऱ्या ग्रंथांत याज्ञवल्क्य आणि विष्णु ह्या स्मृती आहेत. ह्या हक्काला अट म्हणजे विधवा पवित्र आचरणाची [पत्नी भर्तुर्धनहरी या स्यादव्यभिचारिणी । कात्या (मिता–याज्ञ २·१३५.)] असली पाहिजे. (कात्यायन-मिताक्षरा). एकत्र कुटुंबाच्या मिळकतीच्या वाटपात देखील याज्ञ. ने (२.१२३) पुत्रांच्या बरोबरीने पत्नी आणि माता ह्यांना वाटे द्यावे असे सांगितले आहे. ह्या वचनाचा अर्थ निरनिराळ्या टीकाकारांनी भिन्न भिन्न प्रकारचा केला आहे. विधवेच्या वारसाच्या बाबतीत मिताक्षरेने (याज्ञ. २·१३५) असा सिद्धान्त काढला आहे की विधवा शुद्ध आचरणाची असेल तर तिला तिच्या पुत्रहीन पतीची सर्व मिळकत मिळण्याचा हक्क असतो. मिताक्षरेनंतर झालेल्या बहुतेक ग्रंथकारांनी हा हक्क मान्य केला आहे. त्यांनी असे मानले आहे की, विधवेला फक्त अन्न वस्त्र मिळण्याचा अधिकार असतो हे नारद (दाय २५-२६) प्रभृतींचे वचन मृताच्या रखेल्यांना किंवा पुनरेकत्रित झालेल्या भागीदारांच्या विधवांना लागते.

पत्नी ह्या शब्दाचा अर्थ 'यज्ञामध्ये पतीबरोबर राहण्याला पात्र' असा होतो. जी स्त्री द्रव्य देऊन विषयोपभोगाकरिता संपादन केलेली असते ती पत्नी नसून केवळ दासी असते आणि म्हणून ती तिच्या पुत्रहीन प्रियकराचा वारसा मिळण्याला पात्र नसते. कात्यायनाने (मिता. याज्ञ २.१३५) म्हटले आहे की अव्यभिचारिणी पत्नीला तिच्या पतीची संपत्ती प्राप्त होते. न्यायालयांनी असे ठरविले आहे की एकदा मृतपतीची मिळकत विधवेकडे आली म्हणजे त्यानंतर तिने केलेल्या व्यभिचारी वर्तनामुळे ती मिळकत तिच्याकडून काढून घेता येत नाही किंवा तिचा त्या मिळकतीवरील हक्क नष्ट करिता येत नाही. विधवाविवाहाच्या (सन १८५६ च्या) कायद्याने विधवेने केलेला पुनर्विवाह कायदेशीर ठरविला असला तरी तिने पुनर्विवाह केला तर तिला मिळालेल्या पतीच्या मिळकतीवरील अथवा मृत पुत्राची माता ह्या नात्याने तिला मिळालेल्या मिळकतीवरील तिचा हक्क नष्ट होतो आणि अशी मिळकत ती मृत झाल्याचे मानून तिच्या पतीच्या अथवा पुत्राच्या विद्यमान असणाऱ्या दुसऱ्या वारसांकडे जाते आणि हा नियम सर्व जातींच्या विधवांना लागतो. दायभागाच्या मताप्रमाणे 'अप्रतिबंध दाय' मुळीच अस्तित्वात नाही आणि एकत्र कुटुंबातील पुत्रहीन भागीदाराच्या विधवेला त्या भागीदाराचा समाईक मिळकतीतील हिस्सा प्राप्त होतो आणि एकत्र आणि विभक्त मिळकतीत काही भेदभाव नसतो. शूद्राच्या बाबतीत मृताच्या मागे मृताची विधवा अथवा कन्या अथवा कन्येचा पुत्र आणि अनौरस पुत्र असले तर न्यायालयांनी असे ठरविले आहे की विधवा अथवा कन्येचा पुत्र ह्यांना अर्धी मिळकत मिळते आणि अनौरस पुत्राला उरलेली अर्धी मिळकत मिळते.

विधवेकडे पतीच्या वारसा अधिकाराने आलेल्या स्थावर आणि जंगम मिळकतीवर तिला मर्यादित अधिकार असतात. तिला फक्त उपभोग घेण्याचाच अधिकार असतो आणि दान, विक्री, गहाण इत्यादी कृत्यांनी त्या मिळकतीची विल्हेवाट करता येत नाही. स्थावर मिळकतीची विक्री पुरुष नातलगांच्या संमतीशिवाय तिला करता येत नाही. ज्या विधवेला तिच्या पतीने मृत्युपत्राने जंगम मिळकत दिली असेल तिला त्या मिळकतीवर पूर्ण मालकी प्राप्त होते, कारण अशी मिळकत वारसा हक्काने आलेली नसल्यामुळे ती तिचे स्त्रीधन होते. वारसाने आलेली जंगम मिळकत विधवेला तोंडी बक्षिस देता येते. धार्मिक आणि परोपकारी कार्यांकरिता अथवा पतीच्या पारलौकिक हिताकरिता विधवेला आपल्या मिळकतीची विक्री,

अनुक्रमणिका

दान वगैरे रीतीने विल्हेवाट लावण्याचा बराच अधिकार असतो आणि हे नियम न्यायालयांनी [मसुलीपट्टमचा कलेक्टर वि. कवली वेंकट ८ मूरकृत इं. अपीले ५०० पा. ५२६—५२७.] मान्य केले आहेत.

ज्या व्यक्तींना विधवा मृत झाल्यावर तिचा वारसा प्राप्त होतो त्यांना दायाद म्हणतात. हा शब्द कात्यायनाने योजिला असून दायभागातही तो शब्द आला आहे.

एकापेक्षा अधिक विधवा हयात असल्यास त्यांनी आपल्या मृत पतीची मिळकत समान रीतीने वाटून घ्यावी असे मिताक्षरेने [ताश्चबह्व्यश्चेत्सजातीया विजातीयाश्च तदा यथांशं विभज्य गृह्णन्ति । मिता—याज्ञ २·१३५.] (याज्ञ. २·१३५) म्हटले आहे. अशा रीतीने वाटप करून घेतल्यानंतर जर त्यांच्या पैकी एक विधवा मरण पावली तर तिला दिलेला हिस्सा बाकीच्या एक अथवा अनेक विधवांकडे येतो आणि जोपर्यंत एकादी विधवा हयात असेल अथवा तिने पुनर्विवाह केला नसेल तोपर्यंत त्यांच्या पतीची मिळकत दुसऱ्या कोणाकडे वारसा हक्काने जाऊ शकत नाही.

याज्ञ. (२·१३५।१३६) म्हणतो की एकादा [पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा । तत्सुता गोत्रजा बन्धुशिष्यसब्रह्मचारिणः ॥ एषामभावे पूर्वस्य धनभागुत्तरोत्तरः । स्वर्यातस्य ह्यपुत्रस्य सर्ववर्णेष्वयं विधिः ॥ याज्ञ २·१३५-१३६.] मनुष्य मृत झाला आणि त्याला पुत्रसंतती नसली तर त्याचा वारसा पुढील क्रमाने जातो : पत्नी, कन्या, (कन्येचा पुत्र), माता, पिता, भ्राता, भ्रात्याचा पुत्र, गोत्रज, बंधु (म्हणजे त्याच कुटुंबातील नातलग), शिष्य, सहाध्यायी. हा नियम सर्व सवर्ण व्यक्तींना लागतो. सवर्ण हा शब्द अनुलोम आणि प्रतिलोम संबंधापासून झालेल्या संततीला देखील लागतो असे मिताक्षरेने म्हटले आहे.

**कन्या.** मृत मालकाची एकादी विधवा हयात असेल तोपर्यंत कन्यांना वारसा मिळत नाही. प्राचीन सूत्रकारांनी कन्येला वारसातून वगळली होती. आपस्तंबाने (२·६·१४३) विकल्पाने तिचा वारसा मान्य केला होता. मनूने (९·१३०) कन्येला पुत्राच्या समान असल्याचे म्हटले आहे परंतु संदर्भावरून ह्याठिकाणी मनूच्या मनात **पुत्रिका** कन्या असावी असे वाटते. परंतु कन्येला नियुक्त करण्याची प्रथा प्रचारातून नाहीशी होऊ लागल्यानंतर पुत्रिकेशी सादृश्य असल्यामुळे पुत्रहीन पुरुषाची वारस म्हणून विधवेच्या नंतर साध्या कन्येला मान्यता मिळू लागली. असे असले तरी मनुस्मृतीचे प्राचीन टीकाकार त्या वचनाचा शब्दशः अर्थ घेण्यास नाखूष असत. मिताक्षरेने अशा टीका टीकाकारांच्या मताचे खंडण केले आहे.

निरनिराळ्या प्रकारच्या कन्या असल्यास त्यातील कोणाकडे वारसा जातो ह्याबद्दल मतवैचित्र्य आहे. कात्यायनाने (९२६) अविवाहित कन्येला अग्रहक्क द्यावा असे सांगितले आहे. मिताक्षरेने विवाहित कन्यांपैकी दारिद्र्यात असलेल्या अथवा असहाय स्थितीत असलेल्या कन्येला अग्रहक्क द्यावा असे म्हटले आहे. दायभागाने मृताच्या पारलौकिक हिताला महत्त्व देऊन निरनिराळ्या विवाहित कन्यांत विधवा, वंध्या अथवा जिला मुलीच आहेत अशा कन्येपेक्षा जिला पुत्र आहेत अथवा पुत्र होण्यासारखा आहे अशा विवाहित कन्येला अग्रहक्क दिला आहे. उलटपक्षी मिताक्षरेने रक्ताच्या संबंधाला महत्त्व देऊन रक्ताच्या अनुरोधाने वारसा जातो असे म्हटले आहे.

मुंबई व्यतिरिक्त इतर सर्व ठिकाणी कन्येचा अधिकार विधवेच्या अधिकारासारखा असतो म्हणजे तिला त्या मिळकतीचा फक्त उपभोग घेता येतो आणि दान, विक्री वगैरे करता येत नाही. तिच्या पश्चात ती मिळकत तिच्या स्वतःच्या वारसाकडे न जाता तिच्या पित्याच्या पुढील वारसाकडे जाते. मुंबई प्रांतात मात्र

कन्येला [भागीरथीबाई वि. कान्हूजीराव, ११ मुंबई २८५ (फु. बें.).] अनिर्बंध स्वामीत्व प्राप्त होते आणि तिच्या मृत्यूनंतर ती मिळकत तिच्या स्वतःच्या वारसाकडे जाते. दायभागाव्यतिरिक्त इतर ग्रंथकारांच्या मताने पित्याच्या मृत्यूच्या वेळी कन्या व्यभिचारी असली तरी तिच्याकडे वारसा येतो. परंतु दायभाग मताप्रमाणे व्यभिचारी कन्येकडे वारसा जात नाही. एकाद्या शूद्राच्या अनौरस कन्येला तिच्या पित्याचा वारसा हक्क असत नाही. न्यायालयांनी अविवाहित परंतु वेश्या झालेल्या कन्येला मान्यता दिली आहे परंतु अशा कन्येला अन्य विवाहित आणि अविवाहित कन्यांच्या नंतरचे स्थान दिले आहे.

**स्नुषा.** मुंबई प्रांताखेरीज इतर कोठेही स्नुषा वारस मानण्यात येत नाही. मुंबई प्रांतात गोत्रज सपिंडाची विधवा ह्या नात्याने स्नुषेकडे तिच्या सासऱ्याचा वारसा येतो. परंतु असा वारसा तिला कन्येच्या पूर्वी मिळत नाही.

**कन्येचा पुत्र** (दौहित्र). कन्यांच्या अभावी कन्यापुत्राकडे वारसा जातो. गौतम प्रभृति प्राचीन स्मृतिकारांनी कन्यापुत्राचा उल्लेख केलेला नाही. मनूने (९·१३६) मात्र असे म्हटले आहे की पुत्रहीन पुरुषाच्या सर्व संपत्तीचा वारसा दौहित्राकडे जावा. पौत्राचा पिता आणि दौहित्राची माता ज्या अर्थी

संपत्तीच्या मृत स्वामीच्या शरीरापासून झालेले असतात म्हणून धार्मिक बाबतीत पौत्र आणि दौहित्र ह्यांच्यामध्ये काहीही भेद नसतो.

कन्येच्या पुत्रांना वारसा हक्क त्यांच्या मातांच्या अनुरोधाने न मिळता त्यांना व्यक्तिशः मिळतो. म्हणून एकाद्या मनुष्याला दोन कन्या असल्या आणि त्यांपैकी एकीला दोन आणि दुसरीला तीन पुत्र असले तर प्रत्येक दौहित्राला १/५ हिस्सा मिळतो. कन्येचा पुत्र हा वस्तुतः **बंधु** आणि **भिन्नगोत्रसपिंड** असतो परंतु त्याने केलेल्या श्राद्धाला धार्मिकदृष्ट्या फार महत्त्व देण्यात आल्याकारणाने त्याला वारसामध्ये बरेच वरचे स्थान दिले आहे.

**माता पिता** (पितरौ). पिता आणि माता ह्यांना त्यांच्या पुत्राचा वारस म्हणून कोणते स्थान असते ह्याबद्दल स्मृतींत आणि मध्ययुगीन कालातील निबंधग्रंथांत बरेच मतवैचित्र्य आहे. उदाहरणार्थ मनूच्या (९·२१७) मते अपत्यहीन पुत्राच्या मृत्यूनंतर त्याची संपत्ती मातेला मिळते परंतु दुसऱ्या एका श्लोकात मनूने (९·१८५) पुत्रहीन मनुष्यांची संपत्ती पित्याला मिळते असे म्हटले आहे. पत्नी, कन्या आणि त्या दोघींच्या अभावी पिता, माता, भ्राता आणि भ्रात्याचे पुत्र हे पुत्रहीन पुरुषाचे वारस होतात असे कात्यायनाने (९२७) म्हटले आहे. टीका आणि निबंधग्रंथांपैकी मिताक्षरा, व्यवहारप्रकाश प्रभृतींनी मातेला अग्रहक्क दिला आहे आणि दायभाग, व्यवहारमयूख प्रभृतींनी पित्याला अग्राधिकार दिला आहे. मिताक्षरेने दिलेल्या कारणात एक असे आहे की मातेचा आपल्या पतीपेक्षा पुत्राविषयी अधिक जिव्हाळ्याचा संबंध असतो. ह्या मतवैचित्र्याचा असा चमत्कारिक परिणाम झाला आहे की एकाच मुंबई प्रांतात मुंबई बेट आणि उत्तर कोकण ह्यांत व्यवहारमयूख हा ग्रंथ आधारभूत मानला असल्याने वारसाचे बाबतीत पित्याला अग्रस्थान देण्यात येते आणि बाकीच्या सर्व मुंबई प्रांतात मातेला अग्रस्थान देण्यात येते.

माता ह्या शब्दात दत्तक मातेचाही अंतर्भाव होतो. मिताक्षरेत आलेल्या माता ह्या शब्दात सापत्न मातेचा अंतर्भाव होत नाही. मुंबई प्रांताव्यतिरिक्त सर्व भारतात सापत्न मातेला वारस मानण्यात येत नाही. मृत मनुष्याच्या मागे जर फक्त सापत्न माता हयात असेल तर तिला त्याची मिळकत न मिळता ती सरकारजमा होते आणि सापत्न मातेला फक्त अन्नवस्त्राचा हक्क राहतो. मुंबई प्रांतात सापत्न मातेकडे गोत्रज

सपिंडाची विधवा ह्या नात्याने वारसा जातो. परंतु अशा गोत्रज सपिंडांत तिला फार दूरचे स्थान दिले आहे. एकाद्या विधवेने पुनर्विवाह केल्यानंतर जर तिचा मूळच्या पतीपासून झालेला पुत्र अपत्यहीन मरण पावला आणि त्याला दुसरा कोणी वारस नसला तर त्याच्या पुनर्विवाह केलेल्या मातेला त्याची वारस म्हणून मुंबईच्या न्यायालयाने मान्यता दिली आहे, परंतु त्याच न्यायालयाने असे ठरविले आहे की पुत्राची माता ह्या नात्याने वारसा आल्यानंतर जर एकाद्या विधवेने पुनर्विवाह केला तर तिला मिळालेली मिळकत काढून घ्यावी. मातेला मिळणारा हक्क विधवेला मिळणाऱ्या वारसाहक्काप्रमाणे मर्यादित असतो.

**भ्राता आणि भ्रात्याचा पुत्र.** याज्ञ. आणि विष्णु ध. सू. ह्यांनी सांगितले आहे की माता आणि पिता ह्यांच्या अभावी भ्रात्याकडे आणि भ्रात्याच्या अभावी भ्रात्याचा पुत्र ह्यांच्याकडे वारसा जातो. मनु (९·१८५) प्रभृती काही ग्रंथकारांनी पितरांच्या पूर्वी भ्रात्याला स्थान दिले आहे आणि मिताक्षरेने आणि त्यानंतर झालेल्या सर्व निबंधकारांनी भ्रात्याकडे पितरांच्या नंतर वारसा येतो असे एकमताने म्हटले आहे. निरनिराळ्या प्रकारच्या भ्रात्यांत सापत्न भ्रात्यांपेक्षा सख्या भ्रात्याला अग्राधिकार दिला पाहिजे असे मिताक्षरेने रक्ताच्या संबंधाच्या आधारावर सांगितले आहे कारण सख्या भ्रात्यामध्ये मृताच्या मातेच्या आणि पित्याच्या शरीराचे कण असतात, परंतु सापत्न भ्रात्यामध्ये मृताच्या पित्याच्या शरीराचे कण असतात परंतु मातेच्या शरीराचे कण नसतात. दायभागाने पारलौकिक हिताला महत्त्व देऊन असे कारण सांगितले आहे की सख्ख्या भ्राता मृताने ज्या पितृत्रयी आणि मातृत्रयी यांना पिंड दिसले असते त्यांनाच पिंड देतो परंतु सापत्न भ्राता मृताने फक्त ज्या पितृत्रयींना पिंड दिले असते त्यांनाच पिंड देतो परंतु भिन्न मातृत्रयींना पिंड देतो.

कोणी ग्रंथकार 'भ्रातरः' हा शब्दाचा विग्रह 'भ्राता च भगिनी च' असा करून भ्रात्याच्या अभावी **भगिनीला** वारसा मिळतो असे म्हणतात. परंतु ह्या मताला सर्वसाधारण जनमताचा पाठिंबा मिळू शकला नाही. एकाच पित्यापासून (भिन्नभिन्न मातांच्या पोटी) झालेल्या भ्रात्यांना एकाच मातेपासून (भिन्न भिन्न पित्यांपासून) झालेल्या भ्रात्यापेक्षा वारसाचा अग्राधिकार द्यावा असे न्यायालयांनी ठरविले आहे.

पत्नीपासून भ्रातृपुत्रापर्यंतच्या वारसांना मिताक्षरा, व्यवहारमयूख प्रभृति ग्रंथात '**बद्धक्रम**' वारस म्हटले आहे आणि न्यायालयांनी त्यांना '**वारसांचा एक गट**' म्हटले आहे. त्यानंतरच्या वारसांच्या बाबतीत निरनिराळ्या ग्रंथकारांनी भिन्नभिन्न क्रम सांगितले आहेत. दायभाग ह्या ग्रंथात (११·६·६ पा २०८) भ्रातृपुत्राच्या पुत्राने दिलेल्या पिंडाच्या योगाने मृताचे अधिक पारलौकिक हित होते ह्या कारणाकरिता भ्रातृपुत्राच्या लागलीच पुढे भ्रातृपुत्राच्या पुत्राचा क्रम सांगितला आहे. वाराणसी परंपरेप्रमाणे वारसांचा निश्चित क्रम भ्रातृपुत्राच्या पुत्रापर्यंत चालतो आणि ते मत अत्युच्च न्यायालयाने मान्य केल्यासारखे दिसते.

**गोत्रज** (एकाच गोत्रात जन्म पावलेले अथवा **सगोत्र**). याज्ञ. ने असे सांगितले आहे की भ्रातृपुत्रापर्यंतच्या वारसांच्या अभावी गोत्रजांकडे वारसा जातो. वास्तविक पिता, भ्राता, आणि भ्रातृपुत्र हेही गोत्रजच असतात. तथापि, गोबलिवर्द न्यायाने त्यांना महत्त्व देऊन त्यांचा वारसा स्वतंत्र रीतीने सांगितला असल्याकारणाने त्यांच्या व्यतिरिक्त त्याच गोत्रात जन्म झालेल्या व्यक्तींचा 'गोत्रज' ह्या संज्ञेत समावेश केला जातो. मिताक्षरेने गोत्रजांत पितामहीला प्रथम स्थान दिले आहे आणि तिच्या नंतर इतर **सपिंड** आणि **समानोदक** ह्यांचा गोत्रजांत समावेश होतो. याज्ञ. ने सपिंड हा शब्द टाळला असून गोत्रज हा शब्द वापरला आहे. मिताक्षरा आणि व्यवहारमयूख यांनी सपिंडाकडे वारसा जातो असे सांगून सपिंडाचे '**गोत्रज सपिंड**'

आणि '**भिन्न गोत्र सपिंड**' असे दोन भेद केले आहेत. भिन्न गोत्र संपिडाला याज्ञ. ने '**बंधु**' अशी संज्ञा दिली आहे. सपिंड आणि सगोत्र हे शब्द समानार्थी नाहीत.

मनूने (९·१८७) म्हटले आहे की सपिंडांपैकी जो कोणी सर्वांत निकटचा असेल त्याला (मृताच्या) मिळकतीचे स्वामित्व प्राप्त होते. मनूच्या ह्या वचनाचे निरनिराळ्या ग्रंथकारांनी निरनिराळे अर्थ केले आहेत. मिताक्षरेच्या मताप्रमाणे वारसा हक्क रक्तसंबंधावर अवलंबून असतो आणि म्हणून रक्तसंबंधाच्या व्यक्तींपैकी अग्रहक्क कोणाला द्यावयाचे हे निकट संबंधावरून ठरविले जाते. दायभागाच्या मताने वारसा हक्क मृताच्या धार्मिकदृष्ट्या लाभावर अवलंबून असतो म्हणजे श्राद्धामध्ये पिंड देण्याच्या पात्रतेवर अवलंबून असतो. सपिंडांमध्ये अग्रस्थान कोणाला द्यावयाचे ह्यासंबंधी दायभागाने एक विशिष्ट योजना तयार केली आहे. असे दिसते की प्राचीन सूत्रग्रंथांत पिंड मिळण्याच्या लाभाला फारसे महत्त्व दिलेले नाही. त्यांनी फक्त निकट संबंधाचा उल्लेख केला आहे आणि असा संबंध रक्तसंबंधाप्रमाणे असणे अधिक स्वाभाविक आहे. याज्ञ. ने वारसांच्या विवेचनात सपिंड हा शब्द अजिबाद गाळला आहे. मनूने पिंड हा गोत्र आणि रिक्थ (संपत्ती) ह्यांना अनुसरून असतो असे म्हटले आहे. विष्णु ध. सू. (१५·४०) ने ज्याला संपत्ती मिळेल त्याने पिंड दिले पाहिजेत असे म्हटले आहे. न्यायालयांनी पिंड देण्याच्या पात्रतेवर वारसाचा अग्राधिकार प्राप्त होतो असे ठरविले आहे. ह्यावरून असे दिसते की मनु, विष्णु प्रभृती ग्रंथकार वारसा प्राप्त होण्याच्या बाबतीत पिंड देण्याच्या पात्रतेला आधारभूत मानीत असत. याज्ञ.ने ठरविलेल्या क्रमात वारसाचा अधिकार रक्तसंबंधावरून ठरतो ही कल्पना गृहीत धरली आहे. अंधासारख्या व्यक्तींना धार्मिक विधी करण्याची पात्रता नसते म्हणून त्यांना वारसातून वगळले असावे.

**श्राद्धे.** मृताच्या पारलौकिक हिताच्या दृष्टीने श्राद्ध करण्याच्या पात्रतेला महत्त्व असते. निरनिराळ्या प्रकारच्या श्राद्धांत दोन श्राद्धे विशेष उल्लेखनीय आहेत : **एकोदिष्ट** आणि **पार्वण**. मनुष्य मृत झाल्यानंतर एक वर्षाच्या अवधीत अथवा अकराव्या दिवसापर्यंत जी १६ श्राद्धे करावयाची असतात ती **एकोद्दिष्ट** म्हणजे फक्त मृताला उद्देशून करावयाची असतात आणि प्रतिवर्षी मृताला उद्देशून त्याच्या मृत्युतिथीला एकोद्दिष्ट श्राद्ध करता येते. **पार्वण** श्राद्ध प्रत्येक महिन्यातील अमावास्येला, भाद्रपद महिन्यातील वद्यपक्ष अथवा त्या पक्षातील अमावास्या ह्यांच्या सारख्या काही विशिष्ट दिवशी करण्यात येते. ह्या श्राद्धात पितृवंशातील तीन मृत पूर्वजांची आराधना मुख्यत्वे करण्यात येते आणि मातृवंशातील तीन मृत पूर्वजांची आराधना दुय्यम स्वरूपाने करण्यात येते. मृत्यूनंतर एक वर्षाने अथवा मृत्यूपासून बाराव्या दिवशी करावयाच्या श्राद्धविधीला **सपिंडन** अथवा **सपिंडीकरण** असे नाव असून त्या श्राद्धाच्या योगाने नुकताच मरण पावलेला मृत **प्रेत** (मृतात्मा) न राहता पितर ह्या वरच्या दर्जाला जातो. विधवा आणि कन्या ह्यांना फक्त एकोद्दिष्ट श्राद्ध करता येते परंतु पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र ह्यांना पार्वणश्राद्ध देखील करता येते. पार्वणश्राद्धाला दायभागाने (११·७·१७ पा २११) **'त्रैपुरुषिक'** (तीन मृत पूर्वजांच्या हितार्थ केलेले) श्राद्ध अशी संज्ञा दिली आहे. ज्या विधवेला पतीची सर्व स्थावर आणि जंगम मिळकत वारसाने प्राप्त होईल तिने आपल्या पतीची मासिक, षण्मासिक आणि वार्षिक श्राद्धे केली पाहिजेत असे प्रजापतीने (स्मृ. चं. २ पा. २९१) म्हटले आहे. दायभागाने मृताच्या पित्यापेक्षाही कन्येच्या पुत्राला अग्राधिकार दिला आहे. कारण कन्येचा पुत्र मृताला स्वतः पिंड अर्पण करतो परंतु मृताच्या ज्या तीन पूर्वजांना त्याने पिंड दिले असते त्यांच्या पैकी फक्त दोघांना (पितामह आणि प्रपितामह ह्यांना) मृताचा पिता पिंड अर्पण करतो.

दायभागाने आणि मिताक्षरेने आपआपल्या मताप्रमाणे वारसांचे क्रम ठरविले आहेत. **दायभागाने ठरविलेला क्रम पुढीलप्रमाणे** आहे :

पुत्र, पौत्र, प्रपौत्र, विधवा, कन्या, कन्यापुत्र, पिता, माता, सख्खा भ्राता, सापत्न भ्राता, सख्खा भ्रात्याचा पुत्र, सापत्न भ्रात्याचा पुत्र.

ह्या क्रमात दायभागाला आपली स्वतःचीच योजना काटेकोरपणे पाळता आली नाही. कोणत्याही परंपरेच्या मताप्रमाणे वारसाचा क्रम ज्यांना **श्राद्धाधिकारिन्** असे म्हणतात त्यांच्या क्रमाशी तंतोतंत जुळता असत नाही. वारसाच्या बाबतीत पिंड मिळण्याची पात्रता एवढ्याच गोष्टीची आवश्यकता असते, प्रत्यक्ष पिंड देणे ह्या गोष्टीला महत्त्व नाही असे दायाभागाने म्हटले आहे.

**सपिंड.** (१) एकादा मनुष्य जिवंत असताना ज्यांना ज्यांना त्याने पिंडे दिले पाहिजेत त्यांचा आणि (२) तो मृत झाल्यावर ज्या ज्या लोकांना त्या मृताला उद्देशून पिंड द्यावे लागतील त्यांचा, तसेच (३) त्या मनुष्याला ज्या पूर्वजांना पिंड देणे अवश्य असते त्याच पूर्वजांना ज्या कोणाला पिंड देणे अवश्य असते त्या सर्वांचा तो मनुष्य सपिंड असतो.

**सकुल्य.** एकाद्या मनुष्याने (पितृशाखेतील तीन पूर्वजांना) पिंड दिल्यानंतर त्याच्या हाताला जे अन्न चिकटून राहिलेले असते अथवा जे अन्न शेष राहते ते शेष अन्न पितृशाखेतील तीन पूर्वजांच्या वरच्या तीन पिढ्यातील पूर्वजांना दर्भावर अर्पण करण्यात येते. तसेच मृताच्या पौत्राच्या पुढचे तीन वंशज हे त्या मृताला अशाच प्रकारचे शेष अन्न अर्पण करीत असतात. ह्या तीन दूरच्या पूर्वजांना आणि तीन दूरच्या वंशजांना बौधायनाने आणि दायभागाने **सकुल्य** अशी संज्ञा लावली आहे. दायभाग सांप्रदायाप्रमाणे सर्व सपिंड वारस संपल्यानंतर सकुल्यांकडे वारसा येतो. मनूनेही असेच सांगितले आहे. परंतु विष्णु. ध. सू. ने बंधूंच्या अभावी सकुल्यांकडे वारसा येतो असे सांगितले आहे. दायभागाने **समानोदकांचा** सकुल्यांमध्ये समावेश केला आहे. उलटपक्षी, दायभागाने ज्यांना सकुल्य असे म्हटले आहे त्यांचा मिताक्षरेने **गोत्रज सपिंडा**मध्ये अंतर्भाव केला आहे. मिताक्षरेने म्हटले आहे की मृताची पितामही ही त्याच्या गोत्रजांतील पहिली असून तिच्यानंतर पितामह हा गोत्रजात येतो. मिताक्षरेच्या मताप्रमाणे **सपिंड संबंध** हा (मृतापासून मोजून आणि त्याचा समावेश करून) सातव्या पिढीपर्यंत चालतो. मिताक्षरेच्या मताप्रमाणे वारसा हक्काच्या दृष्टीने पुढील व्यक्ती सपिंड होतात : (१) मृताचे ६ पुरुष वंशज, (२) ६ पुरुष पूर्वज आणि त्यांच्यापैकी पहिल्या तिघांच्या पत्न्या (म्हणजे माता, पितामही, प्रपितामही) आणि बहुधा त्याच्यावरच्या तिघांच्याही पत्न्या, (३) मृताच्या सहा पुरुष पूर्वजांपैकी प्रत्येकाचे समान पिढीतील सहा पुरुष वंशज. ह्या शिवाय, स्वतःची पत्नी आणि कन्या ह्यांना त्या मनुष्याच्या सपिंड मानण्यात येते आणि कन्येचा पुत्र हा जरी भिन्न गोत्र सपिंड असतो तरी त्याला गोत्रज सपिंडात बरेच वरचे स्थान देण्यात येते.

मिताक्षरेच्या मताप्रमाणे वारसांचा क्रम पुढीलप्रमाणे असतो :

सख्खा भ्राता, सापत्न भ्राता, सख्या भ्रात्याचा पुत्र, सापत्न भ्रात्याचा पुत्र, पितामही, भगिनी (सख्या भगिनीला सापत्न भगिनीपेक्षा अग्राधिकार असावा), पितामह. व्यवहारमयूखाच्या मते असणारा क्रम थोडासा भिन्न असतो म्हणजे सख्खा भ्राता आणि मृत सख्या भ्रात्याचे पुत्र ह्यांना एक गटाने, नंतर सख्या भ्रात्याचा पुत्र, पितामही, सख्खी भगिनी, सापत्न भ्राता, सापत्न भ्रात्याचा पुत्र, पितामह.

भगिनीच्या वारसा हक्काच्या बाबतीत विधिमंडळांनी हस्तक्षेप करून सन १९२९ च्या कायद्याने असे ठरविले आहे की ज्या प्रदेशात मिताक्षरेतील नियमांचा अंमल चालतो त्याठिकाणी काही विशिष्ट स्वरूपाच्या

नसलेल्या पुरुषांच्या मालकीच्या मिळकतीत पुत्राची कन्या, कन्येची कन्या, भगिनी आणि भगिनीचा पुत्र ह्यांना पितामहीच्या नंतर आणि पितृव्याच्या पूर्वी वारसा हक्क मिळण्याची पात्रता असेल.

ह्या कायद्याने दायभागाच्या योजनेत काहीही बदल केला नाही आणि म्हणून त्या कायद्यात ज्या तिघा स्त्रियांचा निर्देश केला आहे त्यांना दायभागाप्रमाणे अद्यापिही वारस समजण्यात येत नाही.

**समानोदक.** मिताक्षरेच्या मताप्रमाणे गोत्रजांचे सपिंड आणि समानोदक असे दोन प्रकार असतात. समानोदक ह्या शब्दाला विशिष्ट पारिभाषिक अर्थ असतो. मनूने (५·६०) म्हटले आहे की सपिंड संबंध सातव्या पिढीपासून समाप्त होतो, समानोदक संबंध त्या कुलाचा उद्भव आणि नाव ह्याची स्मृति अस्तित्वात असेपर्यंत चालू राहतो. मिताक्षरेने सांगितले आहे की सपिंडाच्या नंतरच्या सात पिढ्यातील पुरुषांच्या आणि मृतव्यक्तीच्या कुलात ज्यांचा जन्म आणि नाव माहित आहे अशा सपिंडानंतरच्या सर्व पुरुषांचा समानोदकात समावेश होतो. समानोदकांच्या व्याप्तीच्या बाबतीत मतवैचित्र्य आहे. न्यायालयातील एक निर्णयात असे ठरविले आहे की मिताक्षरापरंपरेप्रमाणे समानोदक संबंध १४ व्या पिढीच्या पुढे चालत नाही.

**बंधु** (एकाच कुलात जन्मलेला). मिताक्षरेच्या मताप्रमाणे बंधु हे मृताचे **परगोत्री सपिंड** असतात. दायभाग सांप्रदाया व्यतिरिक्त सर्व शास्त्र ग्रंथांच्या आणि मिताक्षरा, व्यवहारमयूख ह्या ग्रंथांच्या मताप्रमाणे समानोदक (अथवा सोदक) व्यक्तींच्या अभावीच फक्त बंधूंकडे वारसा जातो. सपिंड आणि समानोदक असणारे गोत्रज (आणि काही बाबतीत त्यांच्या पत्न्या) हे सर्व मृताच्या पितृशाखेकडील नातलग असतात म्हणजे त्यांचा मृताशी संबंध सर्वस्वी **पुरुषांच्या द्वारा** आलेला असतो. बंधु हे अशा स्वरूपाचे नातलग असतात की त्यांचा मृताशी संबंध एक अथवा अनेक **स्त्रियांच्या द्वारे** आलेला असतो.

बंधूंचे तीन गट असतात : (१) पितृभगिनीचे पुत्र, मातृभगिनीचे पुत्र आणि मातुलाचे पुत्र ह्यांना **आत्मबंधु** म्हणतात, (२) पितामहाच्या भगिनीचे पुत्र, पितामहीच्या भगिनीचे पुत्र, पित्याच्या मातुलाचे पुत्र ह्यांना **पितृबंधु** म्हणतात, (३) मातामहाच्या भगिनीचे पुत्र, मातेच्या मातृभगिनीचे पुत्र, मातेच्या मातुलाचे पुत्र ह्यांना मातृबंधु म्हणतात. मिताक्षरेच्या मताप्रमाणे आत्मबंधूचा मृताशी पितृबंधूंपेक्षा अधिक निकट संबंध असल्यामुळे त्यांच्याकडे पितृबंधूंच्या आधी वारसा जातो आणि त्याच कारणाने पितृबंधूंकडे मातृबंधाच्या आधी वारसा जातो. निरनिराळ्या गटातील नावे उदाहरणादाखल दिलेली असल्याचे मानण्यात येते. ह्या बाबतीत काही तपशीलाचे प्रश्न अनिर्णीत आहेत आणि न्यायालयांनी परस्परविरोधी निर्णय दिले आहेत. सर्व प्रकारच्या बंधूची सविस्तर यादी कोणत्याही ग्रंथात उपलब्ध नाही.

**वारसा येणारे त्रयस्थ.** मिताक्षरेने सांगितले आहे की एकाद्याला बंधूही नसेल तर त्याचा वारसा (त्याला वेद शिकविणाऱ्या) **गुरूकडे** येतो, गुरूच्या अभावी त्या मनुष्याच्या **शिष्याकडे** येतो आणि शिष्याच्या अभावी **सब्रह्मचारी** त्याचा वारस होतो. सब्रह्मचारी उपलब्ध नसेल त्याची संपत्ती कोणातरी **श्रोत्रियाला** (वेद पारंगत ब्राह्मणाला) द्यावी (गौतम) आणि श्रोत्रियाच्या अभावी त्याची संपत्ती **कोणत्याही ब्राह्मणाला** द्यावी (दायभाग). ब्राह्मणाचे धन केव्हाही राजाकडे जात नाही असा नियम मनूने (९·१८८-१८९) सांगितला आहे. हा नियम आधुनिक काळी पाळला जात नाही. मनु (९·१८९) आणि बृहस्पती (पौ. ध ग्रं ३३ पा ३८०) यांनी असे सांगितले आहे की क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्यांना सब्रह्मचारीपर्यंत कोणी वारस नसेल तर त्यांची संपत्ती राजाकडे जाते आणि जेव्हा अशी संपत्ती राजा ग्रहण करतो तेव्हा त्याने त्या संपत्तीपैकी

काही अंश मृताच्या रखेल्या आणि त्याचे सेवक ह्यांच्या उदरनिर्वाहाकरिता आणि मृताच्या अंत्य संस्काराकरिता आणि श्राद्धे करण्याकरिता बाजूला काढून ठेवला पाहिजे.

वानप्रस्थ, यती आणि नैष्ठिक ब्रह्मचारी ह्यांच्या संपत्तीच्या वारसाचा क्रम आचार्य, सच्छिष्य आणि धर्मभ्राता असा असल्याचे याज्ञ. ने (२·१३७) सांगितले आहे. ह्या क्रमाच्या बाबतींतही मतवैचित्र्य आहे. उदाहरणार्थ, मिताक्षरेच्या मताप्रमाणे हा क्रम उलट समजावा म्हणजे आचार्य हा अखेरचा समजावा आणि त्याला नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याचा वारस करावा, सच्छिष्य यतीचा वारस समजावा आणि धर्मभ्राता वानप्रस्थाचा वारस समजावा. दायभागही हा क्रम उलटच घ्यावा असे म्हणतो परंतु वानप्रस्थ, यती आणि नैष्ठिक ब्रह्मचारी यांची संपत्ती अनुक्रमे धर्मभ्राता, सच्छिष्य आणि आचार्य यांना द्यावी असे सांगतो. वर उल्लेख केलेल्या व्यक्तींना त्या त्या आश्रमातील मनुष्यांच्या संपत्तीचा वारसा त्या मनुष्यांच्या स्वतःच्या नातेवाईकांच्या आधी प्राप्त होतो.

### विभक्त झालेल्या भागीदारांचे पुनरेकत्रीकरण

पहिल्याने वाटप झाल्यानंतर त्या वाटपात पक्षकार असणाऱ्या व्यक्ती पुन्हा एकत्र राहू लागल्या तर त्या कुटुंबाला **पुनरेकत्रित** म्हणतात. असे पुन्हा कोणाला एकत्र होता येते आणि कोणाबरोबर एकत्र होता येते आणि अशा रीतीने पुनरेकत्रित झाल्यानंतर मृत झालेल्या व्यक्तीचा वारसा कोणाकडे जातो इत्यादी प्रश्नांच्या बाबतीत मतवैचित्र्य आहे. गौतमाने (२८·२६) असा नियम सांगितला आहे की पुनरेकत्रित झालेल्या सहभागीदाराच्या मृत्यूनंतर त्याच्या हिश्श्याचा वारसा हक्क त्यावेळी हयात असलेल्या इतर पुनरेकत्रित सहभागीदारांकडे जातो. परंतु ह्याबद्दल इतर ग्रंथकारांनी वेगवेगळे नियम सांगितले आहेत. पुनरेकत्रित झाल्यासंबंधाचे दावे न्यायालयापुढे फारच क्वचित येतात.

# प्रकरण ८९

## स्त्रीधन

(मू. ग्रं. पा. ३.७७०-८०२)

स्त्रीधन म्हणजे एकाद्या स्त्रीची मालमत्ता. ह्या विषयाच्या अंगभूत असलेल्या निरनिराळ्या प्रश्नांच्या बाबतीत मतवैचित्र्य असल्याचे आढळून येते.

स्त्रीधनाच्या कल्पनेची बीजे वैदिक वाङ्‌मयात सापडतात. ऋग्वेदातील विवाहसूक्तात (ऋ. १०·८५·१३ आणि ३८) वधूबरोबर तिच्या पतीच्या घरी आंदणादाखल दिलेल्या वस्तु पाठविण्यात येत असल्याचा उल्लेख केला आहे. तै. सं. मध्ये (६·२·१·१) पत्नी घरातील सर्व सामानाची स्वामिनी असते असे म्हटले आहे. पत्नी जे काही मिळविते ते तिच्या पतीच्या मालकीचे होते असे मनूने (८·४१६) म्हटले आहे. परंतु मेधातिथीच्या मते त्या वचनाचा अर्थ एवढाच असावा की स्त्रियांना मिळकतीच्या मालकीचा हक्क असला तरी त्यांना स्वतंत्रपणे त्या मिळकतीची विल्हेवाट लावता येत नाही अथवा असेही असण्याचा संभव आहे की मनूने त्या वचनात प्राचीन काळचे मत काय होते एवढेच सांगितले असावे आणि त्याच्या मनातील हेतु एवढाच असावा की विवाहानंतर पती जिवंत असताना स्त्रीधनाच्या बाबतीत स्त्रीवर तिच्या पतीची सत्ता असावी. वसिष्ठाने (१७·४६) असा नियम [मातुः पारिणेयं स्त्रियो विभजेरन् । वसिष्ठ १७·४६.] सांगितला आहे की कन्यांनी त्यांच्या मातेला विवाहप्रसंगी ज्या देणग्या मिळाल्या असतील त्या वाटून घ्याव्या.

ह्या वचनांवरून असे दिसते की प्राचीन काळी स्त्रियांच्या मालकीची म्हणून जी मिळकत समजली जात असे तिच्यामध्ये विवाहाच्या वेळी त्यांना देण्यात आलेल्या (अलंकार आणि मूल्यवान कापड ह्यांच्यासारख्या) देणग्या आणि सामान्यतः स्त्रियांच्या ताब्यात असणारे घरातील जिन्नस अशाच वस्तूंचा समावेश होत असे आणि मागूनच्या काळात झालेल्या स्मृतिग्रंथांत स्त्रीधनाचा वारसा स्त्रियांच्या शाखेत जावा अशा सारखे जे नियम करण्यात आले त्यांची उत्पत्ती स्त्रियांकडे ज्या वस्तूची मालकी सोपविण्यात आली त्या वस्तूंच्या विशेष प्रकारच्या स्वरूपामुळे झाली असावी.

स्त्रीधनाच्या विषयाला अनुलक्षून असणारे प्रमुख मुद्दे : (१) स्त्रीधनात कोणत्या वस्तूंचा अंतर्भाव होतो, (२) स्त्रीची तिच्या स्त्रीधनावरील सत्ता आणि (३) स्त्रीधनाचा वारसा हे आहेत.

**स्त्रीधनात अंतर्भाव होणाऱ्या वस्तू.** स्त्रीधनाचा अर्थ स्त्रीची मिळकत असा असला तरी स्मृतिग्रंथांनी तो शब्द एकाद्या स्त्रीला एकाद्या विशिष्ट प्रसंगी अथवा तिच्या आयुष्यातील निरनिराळ्या प्रसंगी द्यावयाच्या काही विशिष्ट प्रकारच्या मिळकतींनाच फक्त लावला आहे. स्त्रीधनाच्या उपलब्ध असलेल्या व्याख्यांपकी सर्वांत प्राचीन व्याख्या [अध्यग्नयध्यावहनिकं दत्तं च प्रीतिकर्मणि । भ्रातृमातृपितृप्राप्तं षड्विधं स्त्रीधनं स्मृतम् ॥ मनु ९·१९४.] मनूने (९·१९४) अशी दिली आहे की एकाद्या स्त्रीला जे जे विवाहाग्निसमीप दिले असेल (**अध्यग्नि**), वरातीच्या वेळी दिले असेल (**अध्यावहनिक**), प्रेमाचे चिन्ह म्हणून दिले असेल (**प्रीतिदत्त**), आणि जे तिला तिच्या भ्रात्याकडून (**भ्रातृदत्त**), मातेकडून (**मातृदत्त**) अथवा पित्याकडून (**पितृदत्त**) प्राप्त झाले असेल त्यांना सहा प्रकारचे स्त्रीधन म्हणतात.

याज्ञवल्क्याने (२·१४३-४४) स्त्रीधनाचे नऊ प्रकार सांगितले असून तितकेच बहुतेक प्रकार विष्णु ध. सू. (१७·१८) मध्येही दिले आहेत. स्मृतिकारांपैकी कात्यायनाने सर्वांत विस्तृत विवेचन केले आहे आणि त्याने दिलेल्या व्याख्या दायभागासहित सर्व निबंधकारांनी मान्य केल्या आहेत.

पारिभाषिक दृष्ट्या **सौदायिक** आणि **यौतक** हे शब्द स्त्रीधनाचे समानार्थी असल्याचे दिसून येते.एकाद्या विवाहित स्त्रीला अथवा कुमारिकेला तिच्या पतीच्या अथवा पित्याच्या गृहात तिच्या भ्रात्याकडून अथवा मातापित्यांकडून जे धन मिळते त्याला सौदायिक म्हणतात. (स्मृ.चं.२पा. २८२) एकाद्या स्त्रीला ती विवाहाच्या समयी आणि तशाच प्रसंगी पतीसह बसलेली असताना जी संपत्ती देणगी दाखल मिळालेली असते तिला यौतक म्हणतात. (स्मृ.चं.२पा. २८५). (यौतुक असाही पाठ दायभाग प्रभृति काही ग्रंथांत दिला आहे).

स्त्रीधनात कोणत्या वस्तूंचा समावेश होतो ह्या विषयीच्या स्मृतिग्रंथांतील वचनांवरून असा निष्कर्ष निघतो की स्त्रीधन ही एक पारिभाषिक संज्ञा असून तिच्यात प्रारंभी फक्त सहा प्रकारच्या संपत्तींचा अंतर्भाव होत असे परंतु क्रमाक्रमाने कात्यायनाने दिलेल्या व्याख्येप्रमाणे त्या संज्ञेत एकाद्या स्त्रीला अविवाहित अथवा विवाहित स्थितीत तिच्या मातापितरांकडून, नातेवाईकांकडून अथवा पतीकडून अथवा पतीच्या कुटुंबाकडून मिळालेल्या सर्व (पतीने दिलेल्या स्थावर मिळकतीखेरीज इतर) संपत्तीचा अंतर्भाव होऊ लागला. परंतु एकाद्या स्त्रीला विवाहानंतर तिच्या स्वतःच्या परिश्रमाने, कलाकौशल्यामुळे अथवा तिऱ्हाइतांकडून प्राप्त होणारे धन हे स्त्रीधन होत नाही असे मानले जात असे. स्मृतींनी स्त्रीधनाची पूर्णव्यापक अशी व्याख्या दिलेली नसून फक्त काही विशिष्ट प्रकारच्या मिळकतींचीच नावे दिली आहेत.

टीकाकारांनी आणि निबंधग्रंथकारांनी केलेल्या स्त्रीधनाच्या व्याख्यांना व्यावहारिक दृष्टीने अतिशय महत्त्व असते, कारण न्यायालयात प्रत्येक परंपरेतील अधिकृत मानलेल्या टीकाकारांच्या मतांना अनुसरून निर्णय करण्यात येतो आणि अशा अधिकृत टीकाकारांच्या मताशी विरुद्ध असणारा असा आपला स्वतःचा अर्थ करण्याचे स्वातंत्र्य न्यायाधीशांना असत नाही.

मिताक्षरेने स्त्रीधनाची व्याख्या इतकी विस्तृत केली आहे की त्या संज्ञेत गौतमाने सांगितलेल्या ज्या पाच प्रकारच्या संपत्तीचा एकादा मनुष्य भिन्न भिन्न मार्गांनी स्वामी होतो त्या पाच प्रकारच्या संपत्तींचा समावेश होतो. दायभागाने [तदेव च स्त्रीधनं यद् भर्तृतः स्वातन्त्र्येण दानविक्रयभोगान् कर्तुमधिकरोति । दायभाग ४·१-१८.] दिलेल्या व्याख्येत मनूने सांगितलेल्या सहा प्रकारच्या संपत्तींचा अंतर्भाव होतो इतकेच नव्हे तर इतर स्मृतींनी सांगितलेल्या इतर प्रकारच्या संपत्तींचाही अंतर्भाव होतो. ज्या मिळकतीचे दान देण्याचा, विक्री करण्याचा, अथवा पतीच्या नियंत्रणाव्यतिरिक्त उपभोग घेण्याचा एकाद्या स्त्रीला अधिकार असतो तेवढेच मात्र तिचे स्त्रीधन असते. (दायभाग ४·१·१८ आणि २३). **मेधातिथीच्या** मताने एकाद्या स्त्रीला काही अलंकार स्पष्टपणे देणगी म्हणून दिलेले नसले तरी जर असे अलंकार तिने आपल्या पतीच्या संमतीने वापरले असतील तर ते त्या स्त्रीचे स्त्रीधन होते.

**न्यायालयांतील निर्णयांवरून** असे दिसून येते की एकाद्या स्त्रीला तिचा जन्म ज्या कुटुंबात झाला त्या कुटुंबातील पुरुषांकडून वारसा हक्काने प्राप्त झालेली मिळकत अथवा दुसऱ्या स्त्रीकडून वारसा हक्काने प्राप्त झालेली मिळकत (मुंबई प्रांतात) त्या स्त्रीचे स्त्रीधन होते.

**स्त्रीधनावरील सत्ता.**स्त्रीधनावर त्या स्त्रीची सत्ता किती असते ह्या गोष्टीचा निर्णय ते धन तिला कोणत्या प्रकाराने प्राप्त झाले, ते प्राप्त होण्याच्या वेळी ती स्त्री अविवाहित, विवाहित अथवा विधवा होती आणि तिला कोणत्या परंपरेचे कायद्याचे नियम लागू पडतात ह्या तीन बाबींवर अवलंबून असतो.

कात्यायनाने (अपरार्क पा. ७५२) म्हटले आहे की एकाद्या स्त्रीच्या स्त्रीधनाचा उपभोग घेण्याचा अथवा ते दुसऱ्या कोणत्याही प्रकाराने दुसऱ्याला देण्याचा अधिकार तिच्या पतीला अथवा पुत्राला अथवा तिच्या पित्याला अथवा भ्रात्याला असत नाही. हिंदु स्त्रीला अविवाहित अवस्थेत तिच्या सर्व प्रकारच्या स्त्रीधनाचा आपल्या इच्छेप्रमाणे विनियोग करता येतो, वैधव्यावस्थेमध्ये तिला तिच्या सर्व प्रकारच्या स्त्री– धनाचा आपल्या इच्छेप्रमाणे विनियोग करता येतो आणि तिच्या पतीने दिलेल्या जंगम मिळकतीचा सुद्धा तिला स्वेच्छेप्रमाणे विनियोग करता येतो; परंतु पतीने दिलेल्या **स्थावर** मिळकतीचा विनियोग करण्याचा तिला अधिकार नसतो आणि विवाहित स्त्रीला पती जिवंत असेपर्यंत **फक्त सौदायिक** (म्हणजे पतीखेरीज अन्य नातेवाईकांनी दिलेल्या देणग्यांच्या) स्वरूपाच्या मिळकतीचा विनियोग स्वेच्छेप्रमाणे करता येत नाही. आधुनिक काळात न्यायालयांत झालेल्या निर्णयांत सौदायिक मिळकत आणि सौदायिक व्यतिरिक्त मिळकत ह्यात भेदभाव कायम राखण्यात आला आहे परंतु सौदायिक मिळकतींत नातलगांनी दिलेली आणि पतीने दिलेली असा भेद राखण्यात आलेला नाही. जर एकाद्या स्त्रीचे स्त्रीधन ज्याला सौदायिक म्हणतात त्या प्रकारचे असेल तर तिला त्या स्त्रीधनाचा विनियोग विक्री करून, दान देऊन, अथवा व्यवस्थापत्राने आपल्या इच्छेप्रमाणे आणि पतीच्या संमतीशिवाय करता येतो परंतु इतर प्रकारच्या स्त्रीधनाचा विनियोग पतीच्या संमतीशिवाय तिला करिता येत नाही.

पतीला आपल्या पत्नीच्या स्त्रीधनाचा उपयोग काही विशिष्ट अडचणीच्या वेळी करता येतो आणि तशा परिस्थितीत ते परत करण्याची त्याच्यावर जबाबदारी नसते. (याज्ञ. २·१४७). परंतु इतर परिस्थितीत जर पतीने स्त्रीधनाचा उपयोग केला तर ते त्याने परत केले पाहिजे. पतीशिवाय इतर नातलगांनी एकाद्या स्त्रीच्या स्त्रीधनाचा उपयोग केला तर ती चोरी होते असे मनूने (८·२९) म्हटले आहे. हे नियम आजमितीला देखील सर्व परंपरांत अधिकृत मानले जातात. एकादी स्त्री व्यभिचारी अथवा दुर्वर्तनी असली तर तिला आपल्या स्त्रीधनाचा व्यय करण्याची पात्रता नसते आणि अशा परिस्थितीत तिचे स्त्रीधन तिच्याकडून काढून घेण्यास प्रत्यवाय नाही असे स्मृतिचंद्रिका [अपचारक्रियायुक्ता निर्लज्ज्या वार्थनाशिका । व्यभिचाररता या च स्त्रीधनं सा न चार्हति । कात्या. (स्मृतिचं २ पा. २८३).] (२.पा २८३) आदि काही ग्रंथांत सांगितले आहे. परंतु आधुनिक काळात स्त्रीधनावरील एकाद्या स्त्रीची सत्ता रद्द करण्याबद्दलच्या ह्या नियमाची अंमलबजावणी न्यायालयांकडून करण्यात येणार नाही.

**स्त्रीधनाचा वारसा.** ह्या मुद्यावर निरनिराळ्या परंपरांमध्ये मतवैचित्र्य असले तरी **सामान्यतः** एका गोष्टीवर सर्व परंपरांचे एकमत आहे आणि ती गोष्ट म्हणजे स्त्रीधनाच्या वारसाच्या बाबतीत पुत्रांपेक्षा कन्यांना अग्राधिकार असतो.

स्त्रीधनाचा वारसा ज्या स्त्रीचे ते स्त्रीधन असेल ती अविवाहित, विवाहित अथवा विधवा होती, तिचा विवाह कोणत्या प्रकाराने झाला होता, ते स्त्रीधन कोणत्या प्रकारचे आहे आणि त्या स्त्रीला धर्मशास्त्राची कोणती परंपरा लागत होती ह्या गोष्टींवर अवलंबून असतो.

अनुक्रमणिका

स्मृतींपैकी सर्वात प्राचीन अशा **गौतम ध.सू.** (२८·२२) मध्ये असे सांगितले आहे की स्त्रीधनाचा वारसा प्रथमतः कन्यांकडे जातो आणि निरनिराळ्या कन्यांत अविवाहित कन्यांना आणि विवाहित कन्यात सुसंपन्न नसणाऱ्या कन्यांना अग्राधिकार असतो.

**मनूने** (९·१९२।१९३ आणि १९५) म्हटले आहे की मातेची संपत्ती सर्वही सहोदर भ्राते आणि सहोदर भगिनी यांनी समान वाटून घ्यावी आणि कन्यांच्या कन्यांना देखील त्यांच्या मातामहीच्या संपत्तीतून त्यांच्या प्रेमाच्या कारणास्तव योग्य दिसेल असा हिस्सा द्यावा. पतीच्या हयातीत स्त्री मरण पावली तर तिचे सहा प्रकारचे स्त्रीधन तसेच अन्वाधेय स्त्रीधन आणि पतीने तिला प्रेमाने दिलेल्या देणग्या त्या स्त्रीच्या अपत्यांकडे जाव्या. ब्राह्म, दैव प्रभृती पाच **मान्य** प्रकारचा विवाह असेल तर अपत्यहीन मृत झालेल्या स्त्रीचे स्त्रीधन पतीकडे जाते. आसुरप्रभृति तीन **अमान्य** प्रकारचा विवाह असेल तर अपत्यहीन स्त्रीचे स्त्रीधन मातापित्यांकडे जाते. (मनु ९·१९६-१९७).

**याज्ञ.** (२·११७) मध्ये असे सांगितले आहे की ब्राह्मप्रभृती चार **मान्य** प्रकारचा विवाह असेल तर अपत्यहीन स्त्रीचे स्त्रीधन पतीकडे आणि बाकीच्या चार प्रकारचा विवाह असेल तर मातापित्यांकडे जाते.

**कात्यायनाचे** (९१७-९२०) मताप्रमाणे अपत्यहीन स्त्रीचे स्त्रीधन भ्राते आणि भगिनी ह्यांच्या मध्ये वाटावे. कन्यांच्या अभावी स्त्रीधन पुत्राकडे जाते. पितृकुलातील अथवा मातृकुलातील नातलगांनी दिलेली संपत्ती त्या नातलगांच्या अभावी पतीकडे जाते, स्थावर मिळकत भ्रात्याकडे जाते, अविवाहित कन्यांना अग्राधिकार असतो.

**मिताक्षरेच्या** (याज्ञ· २.१४५) मताप्रमाणे वारसाचे दोन प्रकारचे क्रम असतात. **शुल्काचा** वारसा स्त्रीच्या सहोदर भ्रात्याकडे आणि त्याच्या अभावी मातेकडे जातो.ह्या बाबतीत दायभाग, पराशर माधवीय प्रभृतींनी मिताक्षरेचे अनुकरण केले आहे.

**कुमारिकेचे** स्त्रीधन प्रथमतः सहोदर भ्राता, नंतर माता, पिता, निकट सपिंड यांचेकडे जातो. कुमारिकेचा विवाह ठरला असून वराकडून शुल्क अथवा इतर देणग्या मिळाल्या असतील तर त्यांतून खर्च वजा करून बाकीची संपत्ती वराला परत मिळते.

(शुल्क आणि कुमारिकाचे स्त्रीधन यांच्या व्यतिरिक्त) **इतर सर्व प्रकारच्या** स्त्रीधनाचा वारसा मिताक्षरेच्या मताप्रमाणे पुढील क्रमाने जातोः अविवाहित कन्या, विपन्नावस्थेतील विवाहित कन्या, कन्यांच्या कन्या, कन्येचा पुत्र, पुत्र, पुत्राचे पुत्र आणि मान्य प्रकारचा विवाह असेल तर पती, पतीचे सपिंड, माता, पिता, पित्याचे सपिंड आणि राजा.

**दायभागाच्या** (४·२ आणि ४·३) मताप्रमाणे **मान्य** प्रकारचा विवाह असल्यास **शुल्काचा** वारसा सहोदर भ्राता, माता, पिता, पती ह्यांच्याकडे जातो; **यौतक**-अविवाहित आणि वाङ्निश्चय न झालेल्या कन्या, वाङ्निश्चय झालेल्या कन्या, पुत्र असलेल्या अथवा होण्याचा संभव असणाऱ्या विवाहित कन्या, विवाहित वन्ध्या कन्या आणि संततिहीन विधवा कन्या ह्यांना समान वाटे; त्यांच्यानंतर पुत्र, कन्येचे पुत्र, पुत्राचे पुत्र, पुत्राचे पौत्र, सापत्न पुत्र, सापत्न प्रपौत्र ह्यांच्याकडे जाते.

अनुक्रमणिका

**अमान्य** प्रकारचा विवाह असेल तर **यौतक** पती, भ्राता, माता, पिता, ह्यांना **इतर स्त्रीधन** माता, पिता, भ्राता, पती, ह्यांना **अन्वाधेय देणग्या** अथवा **व्यवस्थापत्राने** मिळालेली संपत्ती पित्याने विवाहानंतर दिलेल्या असल्यास गौतमाप्रमाणे **अयौतक स्त्रीधन**-पुत्र कुमारी कन्या, सपुत्रिक विवाहित कन्या, पुत्राचे पुत्र, कन्येचा पुत्र, वंध्या कन्या, विधवा कन्या, पतीचा कनिष्ठ भ्राता, पतीच्या भ्रात्याचा पुत्र स्त्रीच्या भगिनीचा पुत्र, स्त्रीच्या भ्रात्याचा पुत्र ह्यांना मिळते.

**वेश्या** व्यवसायामुळे रक्ताचे संबंध नष्ट होत नाहीत असे न्यायालयांनी [हिरालाल वि. त्रिपुरा, ४० कलकत्ता ६५० (फु.बें.).] ठरविले आहे म्हणून **नर्तकीचे** अथवा **विवाहित** असून वेश्या बनलेल्या स्त्रीचे स्त्रीधन तिचा भ्राता अथवा भगिनी अथवा पती अथवा पतीचे नातलग ह्यांच्याकडे जाते.

―――――

**अनुक्रमणिका**

## प्रकरण ९०

## अन्नवस्त्र आणि इतर विषय

(मू.ग्रं.पा. ३.८०३-८२४)

आधुनिक काळातील हिंदु कायद्यांत अन्नवस्त्राच्या प्रश्नाला महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे. प्राचीन काळच्या हिंदु धर्मशास्त्रानुसार काही विवक्षित व्यक्तींना अन्नवस्त्र पुरविण्याची जबाबदारी दोन प्रकारांनी उत्पन्न होत असते. ते प्रकार म्हणजे दोन व्यक्तींमधील केवळ नात्यामुळे अथवा एकाद्या मिळकतीच्या ताब्यामुळे.

मनूने [वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः । अप्यकार्यशते कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत् ॥ मेधा (मनु॰ ४.२५१).] असे सांगितले आहे की प्रत्येकाने आपल्या वृद्ध मातापितरांचे, सद्गुणी पत्नीचे आणि अल्पवयी पुत्राचे पालनपोषण शंभर अकार्ये करून देखील केले पाहिजे. ह्यावरून असा निष्कर्ष निघतो की एकाद्या जवळ काही संपत्ती नसली तरी देखील पित्यावर आपल्या अल्पवयी पुत्राचे, पतीवर आपल्या पत्नीचे आणि पुत्रावर आपल्या वृद्ध मातापितरांचे पालनपोषण करण्याची कायदेशीर व्यक्तिगत जबाबदारी असते. कौटिल्याने (२·१) अशा व्यक्तींच्या यादीत अल्पवयी भ्राते आणि भगिनी, अविवाहित कन्या, विधवा कन्या ह्यांचाही समावेश केला आहे आणि अशा व्यक्तीचे पालनपोषण करण्यास कोणी चुकेल तर त्याला राजाने दंड करावा असे सांगितले आहे. आधुनिक काळातील न्यायालयांनी देखील असे ठरविले आहे की एकाद्या पुत्राला त्याच्या पित्याकडून वडिलोपार्जित मिळकत वारसाने प्राप्त झालेली असो वा नसो त्याच्यावर त्याच्या वृद्ध मातापितरांच्या पालनपोषणाची जबाबदारी असते. ही जबाबदारी केवळ नात्यामुळे उत्पन्न होत असते.

एकत्र कुटुंबातील कर्त्यापुरुषावर त्या कुटुंबातील सर्व पुरुष भागीदार, त्यांच्या पत्न्या आणि अपत्ये ह्यांचे पालनपोषण करण्याची कायदेशीर जबाबदारी असते. एकत्र कुटुंबातील एकादा भागीदार मृत झाला तर त्याच्या पत्नीला केवळ अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार असतो अथवा तिला वडिलोपार्जित मिळकतीचा हिस्सा तिच्या मृत्यूपर्यंत मिळू शकेल असे कात्यायनाने (९२२) म्हटले आहे. अशा विधवेचे पालनपोषण करण्याची जबाबदारी मिळकत ग्रहण करण्यावर अवलंबून असल्याकारणाने कात्यायनाने दोन पर्याय सांगितले आहेत. हा नियम भारतातील न्यायालयांनी मान्य केला आहे.

कोणाकडे दुसऱ्या कोणाच्या मिळकतीचा वारसा आला असेल तर ज्याची मिळकत त्याच्याकडे आली असेल तर त्याच्यावर ज्या व्यक्तींचे पालनपोषण करण्याची कायदेशीर अथवा नैतिक जबाबदारी होती त्या व्यक्तींचे पालनपोषण त्या वारसाने त्या मिळकतीमधून केले पाहिजे. ज्यांना वारसा प्राप्त होत नाही अथवा ज्यांना वाटपात भाग मिळत नाही त्यांना अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार असतो आणि त्यांच्या साध्वी पत्न्यांना आणि अविवाहित कन्यांना अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार असतो असे याज्ञ. ने (२·१४०-१४२) म्हटले आहे. अंध, क्लीब अशांसारख्या लोकांनाही (पतित आणि त्याची संतती वगळून) अन्न आणि वस्त्र द्यावे असे बौधायनाने म्हटले आहे. (२·२·४३-४६).

अनुक्रमणिका

सन १९३७ च्या कायद्याने मिताक्षरा परंपरा लागणाऱ्या एकत्र कुटुंबातील भागीदारांच्या (सुना अथवा नातसुना ह्यांच्यासारख्या) विधवांना त्यांच्या पतीचे त्या एकत्र कुटुंबातील हितसंबंध प्राप्त होण्याचा अधिकार दिला आहे. अशा विधवांपैकी ज्या विधवा मिळकतीचा हिस्सा तोडून घेण्याचे पतकरतील त्याच्यापुरता त्यांना अन्नवस्त्र मिळण्याचा नियम लुप्त होईल.

व्यभिचार करणाऱ्या पत्नीचा धार्मिक बाबतीत दर्जा काढून घेतला तरी तिला जेमतेम पुरेल इतके अन्नवस्त्र द्यावे आणि घरातील एकाद्या भागात तिला कोंडून ठेवावे. (मनु. ११·१७६). स्त्रियांच्या बाबतीत हलक्या जातीच्या पुरुषाबरोबर व्यभिचार करणे, गर्भाचा नाश करणे आणि पतीची हत्या करण्याचा प्रयत्न करणे ही तीन महापातके असतात. एकाद्या स्त्रीने एकादे महापातक केले तर तिचा त्याग करावा परंतु ह्याचा अर्थ तिला घरातून घालवून देणे असा नसून तिच्याशी संबंध ठेवू नये. हिंदु विधवांना अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार त्या सदाचरणी राहण्यावर अवलंबून असतो. एकाद्या विधवेने अत्यंत निंद्य स्वरूपाचा व्यभिचार केला असेल आणि त्यानंतर त्या अपराधाला योग्य ते प्रायश्चित्त घेऊन सदाचारी आयुष्यक्रम चालविण्यास सुरुवात केली असेल तर तिला त्या वेळेपासून सामान्य अन्नवस्त्र मिळण्याची पात्रता येऊ शकते. (मनु. ११-१८९). व्यभिचाराचा अपराध केलेल्या विधवांची शुद्धी प्रायश्चित्ताने होऊ शकते आणि त्यानंतर त्यांना त्यांचे सर्व सामाजिक अधिकार परत देण्यास प्रत्यवाय नाही असे मनूने म्हटले आहे. अशाच प्रकारचे निर्णय आधुनिक न्यायालयांनी केले आहेत.

उच्च तीन वर्णातील पुरुषांना शूद्र जातीच्या **रखेली**पासून झालेल्या पुत्रांना अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार असल्याचे फार प्राचीन काळापासून मानण्यात येते. (गौतम २८·२७). **अनौरस पुत्राचा** अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार त्याच्या **स्वतःपुरता** असतो, त्याच्या पुत्राकडे तो देता येत नाही. **अनौरस कन्यांना** अन्नवस्त्राचा अधिकार नसतो.

रखेलीला तिच्या प्रियकराच्या हयातीत अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार नसतो, कारण तो प्रियकर तिला केव्हाही सोडून देऊ शकतो. तो पुरुष मृत झाल्यावर त्याच्या रखेलीला त्याच्या मिळकतीतून अन्नवस्त्र मिळण्याचा अधिकार प्राप्त होतो. (नारद, दाय. ५२). मात्र ती रखेली त्या पुरुषाच्या मृत्यूपर्यंत त्याच्या खास आश्रयाखाली असली पाहिजे. हा नियम मिताक्षरा (याज्ञ. २·११४) प्रभृति ग्रंथांच्या मताने अवरुद्ध स्त्रीलाच लागतो. अवरुद्ध स्त्री कोणाला म्हणावे ह्याविषयी न्यायालयांतील निर्णयांत बरेच मतवैचित्र्य आढळते. सामान्यतः त्या शब्दाचा अर्थ 'एकाद्या मनुष्याच्या मृत्यूपर्यंत त्याच्या खास आश्रयाखाली असणारी रखेली' असा करण्यात येतो. किती काळपर्यंत ती तशी असली पाहिजे ह्याबद्दल निश्चित नियम सांगता आला नाही तरी एका दाव्यात पाच वर्षांचा काळ पुरेसा मानण्यात आला होता. ह्याशिवायही दुसऱ्या काही अटी असतात. ज्या दासीला दुसऱ्या कोणाबरोबर रतिसंभोग करण्याला प्रतिबंध केला असेल त्या दासीला **अवरुद्धा दासी** म्हणतात.

एकाद्या हिंदू व्यक्तीने केलेल्या ऋणाच्या परतफेडीला त्याच्या हयातीत त्याच्या पत्नीला व लहान अपत्यांना अन्नवस्त्र मिळण्याच्या अधिकारापेक्षा अग्राधिकार असतो. तसेच त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या विधवेला अन्नवस्त्र मिळण्याच्या अधिकाराहून अग्राधिकार असतो. एकत्र कुटुंबाच्या हिताकरिता आणि न्याय्य गरजेकरिता केलेल्या कर्जाला विधवेला अन्न वस्त्र मिळण्याच्या अधिकारापेक्षा अग्राधिकार असतो असे न्यायालयांनी ठरविले आहे.

शेवटल्या क्रमांकाचा व्यवहारपाद ‘**प्रकीणक**’ हा आहे. त्याची व्याख्या विष्णु ध. सू. (४२·१) मध्ये अशी केली आहे की संकीर्ण अथवा इतरत्र न सांगितलेले ते **प्रकीर्णक** होय. ज्या प्रश्नांच्या बाबतीत राजाने आपण होऊन तजवीज केली पाहिजे त्यांना प्रकीर्णक म्हणतात [प्रकीर्णके पुनर्ज्ञेयो व्यवहारो नृपाश्रयः। नारद (प्रकीर्णक १).] असे नारदाने सांगितले आहे. अशा प्रश्नांचे विवेचन मागे करण्यात आले असल्यामुळे त्यांच्याविषयी आणखी काही लिहिण्याचे प्रयोजन नाही.

व्यवहार अथवा वादनिर्णयाच्या बाबतीत मृत्युपत्र अथवा व्यवस्थापत्र हा एक विवाद्य विषय असतो. परंतु एकत्र कुटुंब पद्धति आणि दत्तकाची प्रथा ह्या कारणाने प्राचीन भारतात व्यवस्थापत्राने मिळकतीची व्यवस्था करण्याची चाल अस्तित्वात आली नव्हती. तथापि अशा गोष्टी अगदीच अज्ञात नव्हत्या. मुसलमान लोकांत मृत्युपत्राची चाल आहे आणि त्यांच्या सहवासाने मृत्युपत्राची कल्पना सहज सुचली असण्याचा संभव आहे. आपल्या मृत्यूनंतर काय करावे ह्याबद्दल इच्छा प्रदर्शित करण्याचा उल्लेख स्मृतीत [स्वस्थेनार्तेन वा देयं श्रावितं धर्मकारणात्। अदत्त्वा तु मृते दाप्यस्तत्सुतोनात्र संशयः। कात्यायन (अपरार्क पा. ७८२).] आला आहे. (कात्या. ५६६). पेशवाई अंमलात केलेली मृत्युपत्रे [भारत इतिहास संशोधक मंडळाचे त्रैमासिक खंड २० पा. २१० (मे १९४०) यात एका नारो बाबाजी नांवाच्या गृहस्थाने इ. स. १७७५ मध्ये केलेले व्यवस्थापत्र छापले आहे.] उपलब्ध आहेत. ब्रिटिशांनी सन १७९३ साली हिंदु मालकांना मृत्युपत्रान्वये व्यवस्था करण्याचा अधिकार असल्याचे मान्य केले. (बंगाल रेग्युलेशन ११, कलम ६).

ह्याप्रमाणे निरनिराळ्या व्यवहारपदांचे विवेचन केले. हिंदु राज्यांतील न्यायदान पद्धती तशाच स्वरूपाच्या इतर देशातील कायद्यांपेक्षा अधिक चांगली होती ह्याबद्दल गौरवपर उद्‌गार अनेक इंग्रज न्यायाधीशांनी काढले आहेत. मनूने (८·१३) न्यायदानपद्धतीच्या विवेचनास सुरुवात करताना अशी सूचना केली आहे की एकतर कायदा आणि सत्यस्थिती उघडपणे सांगितली गेली पाहिजे आणि तसे होत नसेल तर न्यायाधीश, पक्षकार आणि साक्षीदार ह्यांनी न्यायालयात पाऊलच न टाकले पाहिजे. कायद्याच्या दृष्टीने सर्व मनुष्यांचा दर्जा एकसारखा असतो हे आधुनिक काळातील न्यायनिर्णयाच्या बाबतीत ध्येय मानले जाते आणि जवळ जवळ तशाच स्वरूपाचे ध्येय मध्ययुगीन काळात झालेल्या निबंधग्रंथांतही प्रदर्शित केले आहे. परंतु विसाव्या शतकातील इंग्लंडमध्ये देखील अशी समता पूर्णपणे अंमलात येत नाही. हिंदु कायदेपंडितांनी करार, ऋण, ठेवी, तारणे, स्थावर मिळकतीची विक्री, गहाण, दान ह्यासंबंधीच्या बऱ्याच स्पष्ट आणि निर्दोष कल्पना मांडल्या आहेत; एकत्र कुटुंबाचे हक्क आणि जबाबदाऱ्या ह्यांच्याविषयी एक योजना तयार केली आहे; पुरुष आणि स्त्रिया ह्यांच्या वारसासंबंधीचा एक विशिष्ट कायदा घालून दिला आहे आणि त्यात मुसलमानी पद्धती आणि इंग्लिश पद्धती ह्यांच्यामधील मध्यममार्ग स्वीकारला आहे.

प्राचीन काळच्या आणि मध्ययुगीन काळच्या ऋण, दत्तक, वाटप आणि वारसा ह्या विषयांवरील नियमांमध्ये ब्रिटिश सत्तेत झालेल्या कायद्यांनी आणि न्यायालयांनी केलेल्या निर्णयांनी बदल घडवून आणले आहेत. ह्याकरिता हिंदु कायद्याला सुसूत्र स्वरूप देण्याची वेळ येऊन ठेपली आहे. अशा सुसूत्रीकरणाला अनेक पक्षांकडून अत्यंत जोराचा विरोध करण्यात येत आहे. परंतु अशा विरोधामध्ये फारसा जोर नाही.

विरोधकांनी मांडलेले मुद्दे काही बाबतीत गैरसमजुतीवर आधारलेले आहेत आणि काही बाबतीत तडजोडीने दूर करण्यासारखे आहेत.

हिंदु कायद्याचे सुसूत्रीकरण का केले पाहिजे ह्याबद्दल अनेक कारणे आहेत. सर्व लोकांना लागू पडणारे कायदे सर्वांना सहज समजतील असे असले पाहिजेत. अगदी लहान आणि साध्या गोष्टींत देखील

लोकांना वकिलांचा सल्ला घेणे अथवा प्रचंड ग्रंथांचे साहाय्य घेणे भाग पडावे ही स्थिती खात्रीने प्रशंसनीय आहे असे म्हणता येणार नाही. हिंदूच्या कायद्याची साधारण रूपरेषा आणि त्यातील नियम ह्या गोष्टी प्रत्येक बुद्धिमान अथवा चौकस हिंदु व्यक्तीला सहज समजण्यासारख्या असल्या पाहिजेत. सर्व हिंदूंना लागू पडणारा एकच सुसूत्र कायदा असेल तरच असा परिणाम होऊ शकेल.

\-\-\-\-\-\-

अनुक्रमणिका

# प्रकरण ९१

## सदाचार (रूढी आणि रूढीवरून बनलेला आधुनिक कायदा)

(मू. ग्रं. पा. ३.८२५-८५५)

गौतमाने (१·१-२) म्हटले आहे की वेद हे धर्माचे मूल आधार आहेत आणि त्याचप्रमाणे परंपरा (म्हणजे स्मृति) आणि वेदवेत्त्यांचे आचार हे देखील धर्माचे मूल आधार [वेदो धर्ममूलम् । तद्विदां च स्मृतिशीले । गौतम १·१-२.] असतात. धर्म कोणता हे समजण्याची वेद आणि वेदवेत्त्यांच्या रूढि ही साधने असतात असे आपस्तंबाने म्हटले आहे. (१·१·१·१-३). मनु (२·६) [वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदाम् । आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव च ॥ मनु. १·६.] आणि याज्ञ. [श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियामात्मनः । सम्यक् संकल्पजः कामः धर्ममूलमिदं स्मृतम् ॥ याज्ञ. १·७.] (१.७) यांनीही असे सांगितले आहे की वेद (अथवा श्रुती), स्मृति आणि सज्ञनांचे आचार ही धर्माची उगमस्थाने असतात.

निरनिराळ्या धर्मग्रंथांत शील, समय, आचार अथवा सदाचार अथवा शिष्टाचार हे शब्द योजले आहेत. ह्यांच्यापैकी शेवटल्या तीन शब्दांचा अर्थ एक सारखाच आहे. आपस्तंब सूत्रात (१·४·१२·८·१०-१३) समय आणि आचार हे दोन्ही शब्द योजले आहेत आणि त्यांचे अर्थ बहुधा ठराव अथवा प्रघात अथवा रूढि असावे असे वाटते. रूढि ह्या शब्दाने सांप्रतकाळी काहीशी प्राचीनत्वाची कल्पना ध्वनित होते, परंतु प्रघात हा अलीकडच्या काळातील असू शकतो. आचार, शिष्टाचार अथवा सदाचार हे धर्माचे मूळ आहे असे ज्या ग्रंथांत सांगितले आहे तेथे त्यांचा अर्थ असा होतो की ज्याप्रमाणे देवप्रणीत आणि स्मृतिग्रंथांत धर्म म्हणजे काय हे सांगितलेले असते त्याप्रमाणेच आयुष्यातील निरनिराळ्या प्रसंगांत धर्म काय ह्याचा शोध करीत असताना ज्यांना **शिष्ट** [तै. उप. १·११ मध्ये 'शिष्ट' हा शब्द योजला नसला तरी शिष्ट कोणाला म्हणावे ह्याची अत्यंत प्राचीन व्याख्या सापडते :- "ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः युक्ता आयुक्ता अलूक्षा धर्मकामाः स्युः यथा ते तत्र वर्तेरन् तथा तत्र वर्तेथाः ।....] म्हणता येईल अशा लोकांच्या आचरणावरून त्या त्या प्रसंगी कसे वागावे ह्याचे ज्ञान आपणास मिळू शकते. वेद हे अपौरुषेय आणि स्वतःप्रमाण असतात. स्मृतिग्रंथ हे पौरुषेय असतात म्हणून धर्माच्या बाबतीत त्यांना स्वतःचे असे प्रामाण्य नसते. प्राचीन काळच्या ग्रंथकारांची अशी भावना असे की स्मृतिगंथ हे एके काळी अस्तित्वात असलेल्या आणि सांप्रत काळी उपलब्ध नसलेल्या (मंत्र, ब्राह्मण ग्रंथ ह्यांच्या स्वरूपाच्या) वेदभागांच्या आधारावर केलेले असतात आणि त्याचप्रमाणे वेदवेत्त्या आणि शिष्ट म्हटल्या जाणाऱ्या व्यक्तींचे आचार देखील सांप्रत उपलब्ध नसणाऱ्या वेदभागांवर आधारलेले असतात असे अनुमान काढणे आवश्यक आहे. ते ग्रंथ मनूसारख्या वेदाच्या अनुयायांनी रचलेले असतात. स्मृतीत सांगितलेले नियम ज्यांना शिष्ट म्हणतात असे लोक पिढ्यान् पिढ्या पाळीत आले आहेत आणि त्या नियमांना वेदाचा आधार आहे असे मानणे शक्य आहे. मनूच्या पूर्वी होऊन गेलेले आचार्य (विद्वान लोक) काही कृत्ये वेदाच्या आधारावर असल्याप्रमाणे करीत असल्याचे मनूने पाहिले असले पाहिजे आणि त्यावरून त्याने आपली स्मृती रचली असली पाहिजे. मनूच्या पूर्वीचे आचार्य देखील त्यांच्या पूर्वीचे आचार्य ती कृत्ये वेदाच्या आधारावर असल्याचे समजून करीत असल्याचे पाहून त्याप्रमाणेच आपण करीत आले असले पाहिजेत. स्मृतींच्या वचनांना ज्यांचा आधार आहे असे म्हणता येईल अशी शेकडो वेदवचने सर्वश्रुत आहेत आणि तशीच इतर वचने एकदा अस्तित्वात असून आता नष्ट झाली असण्याचा संभव आहे.

तथापि धर्माच्या बाबतीत शिष्ट आचरत असलेल्या काही थोड्या रूढींना धर्म मानले जात असले तरी त्यामुळे शिष्ट आचरत असलेल्या सर्व रूढींना धर्म समजावे असा निष्कर्ष निघत नाही. दुसऱ्या काही रूढि (शिष्टांसहित) सर्व मानवांत प्रचारात असल्या तरी त्यांना शिष्टाचार समजत नाहीत. ज्या रूढीचे पालन [धर्मत्वेन प्रपन्नानि शिष्टैर्यानि तु कानिचित् । वैदिकैः कर्तृसामान्यात्तेषां धर्मत्वमिष्यते । तन्त्रवार्तिक पा. २०५-६.] कर्तव्यबुद्धीने शिष्टांकडूनच फक्त केले जाते त्यांनाच मात्र धर्म असे समजले जाते आणि ज्या रूढि सर्व जीवांना साधारण असतात त्यांना धर्म समजले जात नाही.

गौतम (१·३-४) आणि आपस्तंब (२·६·१३·७-९) ह्यांनी म्हटले आहे की, अनेक थोर प्राचीन लोकांनी धर्माचे अतिक्रमण करून साहसाची कृत्ये केली असल्याची उदाहरणे आहेत. त्या थोर लोकांना त्यांच्या अंगच्या तेजाच्या प्रभावाने पाप लागले नाही. परंतु अलिकडच्या काळातील कोणी मनुष्य त्यांचे अनुकरण करून तीच कृत्ये करू लागेल तर तो नरकात पडेल. महाभारतात (आश्रमवासिक ३०·२४) म्हटले आहे की बलवानांना कोणतीही गोष्ट हितकारक होते अथवा करता येते (सर्व बलवतां पथ्यम्). उदाहरणार्थ, हत्तीला वृक्षाची खांदी काहीही अपाय न होता भक्षण करता येते, परंतु दुसरा कोणी तसे करू जाईल तर तो मृत्यू पावेल.

प्रत्येक देशात ज्यांना दुराचार म्हणता येईल अशा काही काही रूढी असतात. अशा रूढि निषिद्ध समजाव्या आणि त्यांचे अनुकरण करू नये अथवा त्या प्रमाणभूत मानू नयेत असे कुमारिल भट्टांनी सांगितले आहे. अशा रूढींची जी उदाहरणे त्यांनी दिली आहेत त्यांत मथुरा प्रांतातील स्त्रिया मद्यप्राशन करतात आणि दक्षिण भारतातील ब्राह्मण आपल्या मातुलाच्या कन्येबरोबर विवाह करतात ह्यांचा उल्लेख केला आहे. (तन्त्र वार्तिक पा. २०४).

स्मृति आणि सदाचार ह्यांच्यामध्ये विरोध आल्यास कोणाला प्राधान्य द्यावे ह्याविषयी तीन पर्याय असू शकतील : दोन्ही तुल्यबल असतील अथवा आचार अधिक बलवान असेल अथवा स्मृति अधिक बलवान असेल. कुमारिल भट्टांनी (तंत्रवार्तिक पा २२०-२२१) स्मृतींना आचारापेक्षा प्राधान्य असल्याचे प्रतिपादन केले आहे. त्याचे कारण त्यांनी असे दिले आहे की जरी स्मृति आणि सदाचार ह्यांना वेदाचा आधार असल्याचे समजणे योग्य असले तरी त्या दोघांत भेद आहे. शिष्टांच्या आचाराला स्मृतीचा आधार असल्याचे अनुमान करता येईल आणि स्मृतींना श्रुतीचा (वेदाचा) आधार असल्याचे अनुमान करता येईल. अशा रीतीने आचार श्रुतीपासून दोन टप्पे दूर असतो परंतु स्मृति एकच टप्पा दूर असते. म्हणून स्मृति आणि आचार ह्यांच्यामध्ये विरोध आल्यास स्मृति अधिक बलवान असते.

पूर्वमीमांसा परंपरेच्या ग्रंथकारांनी शास्त्रशुद्ध रूढि अथवा आचार कोणते हे ओळखण्याची काही लक्षणे सांगितली आहेत : अशी रूढी प्राचीन काळापासून चालत आल्या असल्या पाहिजेत; त्या वेदांच्या अथवा स्मृतींच्या स्पष्ट नियमांशी विरोधी असता कामा नये; त्यांचा हेतु उघड दिसणारा अथवा दृश्य स्वरूपाचा नसला पाहिजे आणि अशा रूढि नीतिबाह्य असता कामा नये. खंडदेवाने [श्रुतिस्मृत्यविरुद्धानां शिष्टैर्धर्मबुद्ध्यानुष्ठीयमानानामाचाराणां वेदमूलकत्वम् । मीमांसा कौस्तुभ पा. ४३-४४.] असे म्हटले आहे की ज्या रूढि वेद आणि स्मृति ह्यांच्या विरुद्ध नसतील आणि ज्या रूढींचे पालन आपण धर्माचरण करीत आहोत अशा भावनेने सन्मान्य लोकांकडून केले जात असेल त्या रूढीच फक्त वेदांच्या आधारावर असल्याचे मानता येईल. (मी. कौ. पा. ४३·४४).

अनुक्रमणिका

मीमांसाकौस्तुभ (पा. ५१) ह्या ग्रंथात उद्धृत केलेल्या एका श्लोकात सांगितले आहे की रूढि, श्रुति अथवा स्मृति ह्यांच्याविरुद्ध असणारे काही प्रघात वंशपरंपरेने एकाद्या कुटुंबात चालत आले असतील तर त्या कुटुंबातील व्यक्तीने ते प्रघात पाळल्यास त्याला मात्र कोणताही दोष लागत नाही. परंतु ज्यांची अशी परिस्थिती नाही अशा इतरांनी ते प्रघात पाळल्यास त्यांना दोष लागेल.

कुमारिल भट्टांनी (तन्त्रवार्तिक पा. ८५९-८६०) कोणत्या गोष्टीला दुसऱ्या कोणत्या गोष्टीने बाध येतो ह्याविषयी एक यादी दिली आहे. त्यात त्यांनी असे म्हटले आहे की अनुमानाचा बाध प्रत्यक्षाने होतो, स्मृतीचा बाध श्रुतीने होतो, अनधिकारी पुरुषाने केलेल्या स्मृतीचा अधिकारी पुरुषाने केलेल्या स्मृतीने होतो, दृष्टार्थ स्मृतीचा बाध अदृष्टार्थ स्मृतीने होतो, आचाराचा बाध स्मृतीने होतो, अधिक सन्मान्य लोकांच्या रूढीने इतर रूढीचा बाध होतो, संदिग्धाचा बाध असंदिग्धाने होतो, ज्या स्मृतीला श्रुतीचा आधार असल्याचे अनुमान केले असेल त्या स्मृतीचा बाध श्रुतीच्या प्रत्यक्ष वचनाचा आधार असलेल्या स्मृतीने होतो.

―――――

# प्रकरण ९२

## रूढि आणि धर्मशास्त्र ग्रंथ

(मू. ग्रं. पा. ३.८५६-८८४)

सदाचारासंबंधी विवेचन करताना मागील प्रकरणात धर्मशास्त्रावरील ग्रंथांच्या मतांचा उल्लेख केला आहे. रूढींच्या प्रामाण्याविषयी आणि त्यांचे बंधन किती पाळावे ह्यासंबंधी धर्मशास्त्रावरील ग्रंथांच्या मताचे आणखी काही विवेचन ह्या प्रकरणात करावयाचे योजिले आहे.

मनूने (४·१७८) म्हटले आहे की, [येनास्य पितरो याता येन याताः पितामहाः । तेन यायात्सतां मार्गं तेन गच्छन्नरिष्यति ॥ मनु ४·१७८.] ज्या मार्गाने आपले वाडवडिल चालत असत अशा सदाचाराच्या मार्गाने चालावे. असे वर्तन केल्यास कोणालाही अपाय होणार नाही. ह्या नियमात पूर्वीच्या चालीरीतींत फेरबदल करू नये ह्या गोष्टीला अधिक महत्त्व दिले आहे. पूर्वीच्या चालीरीतींत फेरफार केला तर न जाणो, एकादे अनपेक्षित संकट ओढवेल अशी भीती असते आणि अनंत काळापासून आजतागायत हिंदुस्थानातील लोकांच्या वागणुकीचे हेच तत्त्व असते.

रूढीच्या बंधनाविषयी मनूने (वसिष्ठ १·१७) सांगितले आहे की ज्या ठिकाणी एकाद्या विषयासंबंधी नियम वेदामध्ये सांगितलेला नसेल त्याठिकाणी त्या देशातील जातींतील आणि कुलांतील विशिष्ट प्रघातांना अनुसरून चालावे. बृहस्पतीच्या [देशजातिकुलानां च ये धर्मास्तत्प्रवर्तिताः । तथैव ते पालनीयाः प्रक्षुभ्यन्त्यथा प्रजाः । जनापरक्तिर्भवति बलं कोशश्च नश्यति । बृहस्पति (स्मृति चं १·१०).] (स्मृ. चं. १.१०) एका श्लोकात राजाला असा उपदेश केला आहे की त्याने देश, जाती, कुल ह्यांच्यात पुष्कळ काळपर्यंत चालत आलेल्या रूढीत फेरफार न करता त्या रूढींचे पालन केले पाहिजे, कारण असे न केल्यास लोकांत क्षोभ आणि असंतोष उत्पन्न होईल आणि संपत्ती आणि सैन्य ह्यांची हानी होईल. कात्यायनाने (स्मृति चं. २ पा. २६) म्हटले आहे की कायदेशीर वादांचा निर्णय देशाचार आणि कुलाचार ह्यांना अनुसरून करावा. अशाच प्रकारचे नियम दुसऱ्याही ग्रंथकारांनी सांगितले आहेत. हे नियम कायदेशीर वादांसंबंधी असले तरी ते सामान्यतःही लागू पडण्यासारखे आहेत.

श्रुती, स्मृती आणि सदाचार ही धर्माची उगमस्थाने आहेत. त्यांत परस्परांत विरोध आला तर कोणाचे बल किती समजावे ह्याविषयी बिकट प्रश्न उपस्थित होतात. श्रुतीला सर्व श्रेष्ठ प्रामाण्य असले तरी श्रुतीत सांगितलेली एकादी गोष्ट स्मृतिवचनावरून अथवा जनमताला मान देऊन बाजूला सारावी लागते अथवा तिच्या विरुद्ध वर्तन करावे लागते. ही गोष्ट विश्वरूप, मेधातिथि, प्रभृती टीकाकारांना मान्य करावी लागली. उदाहरणार्थ, अग्निष्टोम यज्ञात अनुबन्ध्या गाईचा बलि द्यावा असे श्रुतीत सांगितले असूनही तो नियम पुढील काळात निषिद्ध मानण्यात येऊ लागला आणि गाईच्या ऐवजी आमीक्ष्याचा (तापलेल्या दुधाचे आणि दह्याचे मिश्रण) उपयोग करण्यात येऊ लागला. दोन स्मृतींत विरोध आल्यास त्याचे निराकरण कसे करावे ह्यासंबंधीही नियम आहेत. तसेच स्मृति आणि रूढी ह्यांच्यामध्ये विरोध आल्यास काय करावे ह्याबद्दलही निरनिराळे नियम सांगितले आहेत.

वसिष्ठ १·५ आणि याज्ञ १·७ ह्यांच्या आधारावर असलेला आणि कुल्लूक (मनु २·१०) आणि अनेक ग्रंथकारांनी पुष्टि दिलेला सर्वसामान्य नियम असा आहे की शिष्टांच्या रूढीपेक्षा स्मृतींना अधिक प्रामाण्य

अनुक्रमणिका

असते. तथापि ह्या नियमाच्या विरुद्ध मते ही अस्तित्वात होती. उदाहरणार्थ, विश्वरूपाने (याज्ञ. ३·२५०) म्हटले आहे की स्मृतीचा जो आशय आर्यावर्तात वास्तव्य करणाऱ्या आर्यांच्या रूढ आचाराशी जुळता असेल त्याला अनुसरून वागावे.

स्मृतींच्या बाबतीत आणखी असा नियम होता की बौद्ध, जैन, चार्वाक ह्यांच्या सारख्या वेदांना प्रामाण्य न मानणाऱ्या पाखंड वाद्यांच्या ग्रंथांचा विचारच करू नये. मनूने (१२·९५) अशा ग्रंथांना स्मृती अशी संज्ञा दिली आहे.

सूत्रे आणि जुन्या स्मृति पुराणांना धर्माची उगमस्थाने मानीत नाहीत. तथापि धर्माचे ज्ञान ज्या प्रकारच्या ग्रंथांवरून समजून घ्यावे अशा ग्रंथांत याज्ञ. आणि गौतम ह्यांनी पुराणांचा समावेश केला आहे. वेदव्यास स्मृतीत [श्रुतिस्मृतिपुराणानां विरोधो यत्र दृश्यते । तत्र श्रौतं प्रमाणं स्यात् तयोर्द्वैधे स्मृतिर्वरा ॥ वेदव्यास १·४.] (१·४) म्हटले आहे की स्मृति आणि पुराणे ह्यांत विरोध असल्यास स्मृतीला अधिक महत्त्व द्यावे. अपरार्काने (पा. ९) उद्धृत केलेल्या एका स्मृतिवचनात [अतः स परमो धर्मो यो वेदादधिगम्यते । अवरः स तु विज्ञेयो यः पुराणादिषु स्मृतः ॥ व्यास (अपरार्क पा. ९).] सांगितले आहे की वेदांपासून ज्याचे ज्ञान होते तो सर्व श्रेष्ठ धर्म समजावा आणि पुराणांपासून ज्याचे ज्ञान होते तो कमी प्रतीचा धर्म समजावा. अपरार्काने (पा. १५) असेही सांगितले आहे की **व्यामिश्र** (शुद्ध वेदप्रणीत नसलेला आणि मिश्र प्रकारचा) धर्म कोणता हे सांगण्याच्या बाबतीत पुराणे प्रमाणभूत असतात. मध्ययुगीन काळात पुराणांच्या प्रामाण्याविषयीची इतकी पुढे मजल गेली की, मनु, याज्ञ, पराशर ह्यांच्यासारख्या सर्व स्मृतींनी आणि मिताक्षरेसहित अनेक टीकाकारांनी कलियुगात चार वर्ण अस्तित्वात असल्याचे मान्य केले असले तरीही पुराणातील (कलियुगात चार वर्ण नष्ट होऊन केवळ ब्राह्मण आणि शूद्र अस्तित्वात राहतील अशा आशयाच्या) भविष्य वचनाच्या आधारावर मध्ययुगीन काळातील ग्रंथकारांनी कलियुगात क्षत्रिय आणि वैश्य वर्णाचे अस्तित्व अमान्य केले.

'आचारः परमो धर्मः' असे ज्या मनूच्या (१·१०८) श्लोकात म्हटले आहे त्याच्या अर्थाविषयी मतवैचित्र्य अस्तित्वात आहे. ज्या श्लोकाचा स्वाभाविक अर्थ असा करता येईल की 'आचार आणि श्रुतींत आणि स्मृतींत सांगितलेले आचरणाचे नियम हे श्रेष्ठ प्रकारचे धर्म असतात' आणि अलिकडील काळातील न्यायालयांच्या निर्णयांत असाच अर्थ मान्य केला आहे.

स्मृति, टीकाग्रंथ आणि निबंध ग्रंथ ह्यांत बंधनकारक रूढींची जी लक्षणे सांगितली आहेत ती पूर्वमीमांसेत दिलेल्या लक्षणांसारखीच आहेत. बंधनकारक रूढी पुरातन काळापासून चालत आलेल्या असल्या पाहिजेत, त्या श्रुती आणि स्मृती ह्यांच्या विरुद्ध नसल्या पाहिजेत, शिष्ट लोक त्या रूढींना बंधनकारक समजत असले पाहिजेत, आणि तशा भावनेने त्यांचे पालन शिष्टांकडून होत असले पाहिजे, त्यांचा अर्थ कांटेकोरपणाने केला पाहिजे आणि त्या रूढींच्या कक्षेबाहेरच्या लोकांनी त्यांचा फायदा घेता उपयोगी नाही, त्या अनीतियुक्त अथवा लोकमताने निंद्य मानलेल्या नसल्या पाहिजेत. (मी. कौ. पान. ४३-४४). फार प्राचीन काळी नीतिसंपन्न आणि निःस्वार्थी विद्वान ब्राह्मणांनी अनुसरलेला अथवा प्रतिपादन केलेला आचार अनुकरणीय समजला जात असे; पुढे पुढे ज्या रूढीला दृश्य स्वरूपाचा ऐहिक हेतु नसेल ती रूढि बंधनकारक मानण्यात येऊ लागली आणि अखेरीला शूद्रांचे आणि प्रतिलोम जातींचे आणि पाखंडवादी लोकांचे आचार देखील राजाच्या द्वारा अंमलात आणण्यासारखे मानण्यात येऊ लागले.

अनुक्रमणिका

धार्मिक विधींच्या बाबतीत देखील दाक्षिणात्य आणि उदीच्य (उत्तरेकडील) लोकांच्या रूढींत भेद असल्याचे अनेक टीकाकारांनी आणि निबंध ग्रंथकारांनी सांगितले आहे. तसेच विवाहाच्या बाबतीत देशाचार आणि कुलाचार ह्यांना फार प्राचीन काळापासून विशेष मान्यता प्राप्त झाली आहे. आप. गृ. सू. [आवृतश्चा स्त्रीभ्यः प्रतीयेरन् । आप. गृ. २·१५.] (२·१५) त म्हटले आहे की देशाचाराला अनुरूप कोणती गोष्ट करावी हे लोकांनी स्त्रिया आणि इतर लोक ह्यांच्यापासून समजावून घ्यावे. जातीतील अनेक रूढि प्राचीन काळापासून मान्य करण्यात आल्या आहेत आणि राजाने त्या रूढींची अमंलबजावणी करावी असा गौतम (११·२०), मनु (१·११८), कौटिल्य (३·७) प्रभृतींनी राजाला आदेश दिला आहे. कात्यायनाने (४०) म्हटले आहे की प्रतिलोम जातीच्या तसेच दुर्गम अशा प्रदेशात राहणाऱ्या लोकांच्या ठरीव चालीरीतींची त्या स्मृतीच्या विरुद्ध असल्या तरी अवहेलना करू नये. मित्रमिश्राने सांगितले आहे की “सदाचार संपन्न आणि नैतिक दोषरहित असणाऱ्या शूद्रांच्या देखील चालीरीति त्या शूद्रांना वेदज्ञान नसले तरीही त्यांच्या पुत्रांना आणि इतरांना बंधनकारक असतात.” (परिभाषाप्रकाश पा. ९).

निरनिराळे धार्मिक विधी करताना भिन्न भिन्न वेदशाखांच्या अनुयायांत आणि गृह्यसूत्रांत विशिष्ट रूढि आणि प्रघात पाळण्यात येतात. उदाहरणार्थ, याज्ञ. (१·२४२) च्या मताप्रमाणे श्राद्धात करावयाचे पिंडदान श्राद्धाला आमंत्रण केलेल्या ब्राह्मणांचे भोजन झाल्यानंतर करावयाचे असते. परंतु मनुस्मृतीवरून (३·२६१) असे दिसते की पिंडदान ब्राह्मणांचे भोजन होण्याच्या पूर्वीही केले जात असे. स्मृतिचंद्रिकेने (श्राद्ध पा. ४७) म्हटले आहे की प्रत्येकाने आपल्या शाखेला अनुसरून चालावे.

पाश्चिमात्य ख्रिस्ती धर्मी देशांच्या तुलनेने प्राचीन भारतात धर्माच्या बाबतीत फारच सहिष्णुता अस्तित्वात होती. स्मृतींनी आणि निबंध ग्रंथांनी असा नियम सांगितला आहे की पाखंडी मताच्या लोकांच्या रूढींची देखील राजाने अंमलबजावणी करावी.

―――――

अनुक्रमणिका

# प्रकरण ९३

## कलिवर्ज्य (कलियुगात निषिद्ध मानलेली कृत्ये)

(मू. ग्रं. पा. ३.८८५-९६८)

निरनिराळ्या स्मृतिवचनांमधील विरोध नाहीसा करण्याचे अनेक मार्ग असत आणि काही स्मृतींत सांगितलेले नियम अन्य कल्प अथवा अन्य युगाकरिता होते असे प्रतिपादन करणे हा त्यांच्यापैकी एक मार्ग असे. अशा रीतीने कलियुगात निषिद्ध मानलेल्या कृत्यांना कलिवर्ज्य असे म्हणतात. उदाहरणार्थ, स्त्रियांचे उपनयन करता येते असे हारीत स्मृतीत सांगितले आहे परंतु ते वचन अन्य कल्पाला (अन्य युगाला) उद्देशून आहे असे स्मृतिचंद्रिका (१·२४) आणि पराशरमाधवीय (१·२ पा ८३) ह्या ग्रंथांत प्रतिपादन केले आहे. आश्चर्य करण्यासारखी गोष्ट अशी आहे की कलियुगाकरिताच श्रेष्ठधर्म कोणते हे सांगतो असे ज्या पराशर स्मृतीत म्हटले आहे त्याच स्मृतीतील अनेक महत्त्वाचे नियम आदित्य पुराणातील वचनात कलिवर्ज्यात समाविष्ट केले आहेत. ह्याकरिता युगाची कल्पना आणि कलिवर्ज्याची कल्पना ह्या कशा उत्पन्न झाल्या आणि त्या कल्पनांचा पुढे कसा विकास झाला ह्याची थोडक्यात चिकित्सा करणे अगत्याचे आहे.

महाभारत (शांति ५९), मनुप्रभृति (१·८१) स्मृतिं आणि निरनिराळी पुराणे ह्यांच्यावरून असे स्पष्ट दिसून येते की त्या सर्वांची अशी भावना होती की फार फार प्राचीन काळी सर्वप्रकारे आदर्शस्वरूप असा समाज अस्तित्वात होता आणि त्यानंतरच्या काळात समाजातील नीति, आरोग्य, आयुष्य ह्या सर्वांचा क्रमाक्रमाने ऱ्हास होत गेला. त्याबरोबरच त्या सर्व ग्रंथांची अशीही भावना होती की ह्या ऱ्हासाच्या काळाच्या मागून अनेक वर्षांनंतर पुन्हा एकदा नीतिपूर्ण असा समाज अस्तित्वात येईल. खेदाची गोष्ट एवढीच आहे की अस्तित्वात असलेल्या सर्व ग्रंथांच्या समजुतीप्रमाणे त्या त्या ग्रंथांच्या रचनेच्या वेळचा काळ अत्यंत पापी होता आणि नीतिपूर्ण काळ लवकरच येईल असे एकाही ग्रंथाला वाटत नव्हते.

समाजाच्या नीतिमत्तेमध्ये क्रमाक्रमाने ऱ्हास होत असल्याची कल्पना थेट ऋग्वेदात देखील आढळते. यम आणि यमी ह्यांच्या सुप्रसिद्ध संवादात (ऋ. १०·१०·१०)

एके ठिकाणी यमाने [आ घा ता गच्छनुत्तरा युगानि यत्र जामयः कृणवन्नजामि । ऋ १०·१०·१०] असे उद्‌गार काढले आहेत की जेव्हा भगिनीसारखे वर्तन न करणाऱ्या भगिनी उत्पन्न होतील तो ह्यानंतरचा काळ अजून यावयाचा आहे.

अशा तऱ्हेच्या आदर्शस्वरूपाच्या कल्पनेतील काळाला **कृतयुग** अशी संज्ञा असून अनीतिमान अशा चालू असलेल्या काळाला **कलियुग** अशी संज्ञा आहे. कलि आणि युग हे दोन्ही शब्द अलग अलग ऋग्वेदात आले आहेत. युग ह्या कालवाचक शब्दाचा अर्थ ऋग्वेदामध्ये निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळा आहे. कोठे कोठे (ऋ. १·१५८·६) तो चार अथवा पाच वर्षांचा अवधि असा असावा, काही ठिकाणी (ऋ. ६·१५·८) त्याचा अर्थ 'दीर्घ कालावधि' असा करावा लागतो. अथर्ववेदामध्ये (८·२·२१) युग शब्दाचा अर्थ 'अनेक सहस्त्र वर्षांचा काळ' असा असावा असे वाटते. ऋग्वेदामध्ये कृत हा शब्द आला आहे. परंतु त्याचा अर्थ कालवाचक नसून 'द्यूतात टाकलेला फासा' असा आहे अथवा 'विभीतकाच्या बिया' असा आहे. कृत, त्रेत,

अनुक्रमणिका

द्वापर आणि आस्कंद अथवा कली हे शब्द दुसऱ्या संहितांत आणि उपनिषदांत आले आहेत. कृत हा सर्वांत अधिक लाभदायक फासा असून कलि हा सर्वांत हानिकारक फासा असतो. ह्यावरून असे म्हणता येईल की प्राचीन वेदकालात आणि उपनिषदांसारख्या वेदग्रंथांच्या रचनेच्या कालापर्यंत देखील कृत, त्रेता, द्वापर आणि कलि हे शब्द सृष्टीच्या निरनिराळ्या कालखंडांना अनुलक्षून वापरण्यात येत नसत. गौतम (१·३-४) आणि आपस्तंब (२·६·१३·७-९) ह्या दोन्ही प्राचीन धर्मसूत्रांच्या मताप्रमाणे त्यांच्या रचनेच्या काळी धर्माचा ऱ्हास होऊ लागला होता आणि मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या मागाहून झालेले ऋषि त्यांच्याहून कमी योग्यतेचे झाले होते. (आप ध. सू. १·२·५·४). परंतु असे असले तरीही त्यांच्या काळी देखील युगाची कल्पना पूर्णपणे प्रस्थापित झालेली नव्हती असे म्हटल्यास चुकीचे होणार नाही.

युगाची कल्पना केव्हा प्रस्थापित झाली असली पाहिजे त्या काळाची अलीकडील बाजूची मर्यादा निश्चित करण्याला शिलालेखांवरून काही थोडी मदत होते. अशोकाच्या वेळच्या आणि त्यानंतरच्या काळातील शिलालेखांवरून असे दिसून येते की कल्पान्ताची म्हणजे जेव्हा सृष्टीचा प्रलय होतो अशा काळाची कल्पना आणि ती कल्पना ज्या युगाच्या कल्पनेत समाविष्ट होते त्या युगाची कल्पना ह्यांचा उल्लेख त्या शिलालेखांत केला आहे. (अशोकाची आज्ञापत्रे क्र. ४ आणि ५). ह्यावरून असे म्हणण्यास हरकत नाही की युग आणि कल्प ह्यांच्या कल्पनांचा उद्भव ख्रि. पू. ४ थ्या अथवा ३ ऱ्या शतकात झाला असावा आणि त्या कल्पना ख्रि. सनाच्या आरंभीच्या शतकांत पूर्णपणे प्रस्थापित झाल्या असाव्या. त्या कल्पनांच्या उद्भवापासून त्या पूर्णपणे प्रस्थापित होईपर्यंत त्यांत अनेक फेरबदल होत गेले असले पाहिजेत. ब्रह्मस्फुट सिद्धांत (११·१०) ह्या ग्रंथात ब्रह्मगुप्ताने म्हटले आहे की आर्यभटाने सांगितलेली युग, मनु आणि कल्प ह्यांची योजना स्मृतींत सांगितलेल्या योजनेसारखी नव्हती.

महाभारत, मनुस्मृती, विष्णु. ध. सू., मार्कंडेय आणि प्रभृति पुराणे ह्यांत आणि संस्कृत वाङ्मयातील प्राचीन ग्रंथ ह्यांत सांगितलेली युग आणि मन्वंतरे ह्यांची सर्वसाधारण योजना थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे :

कृत, त्रेत, द्वापर आणि कलि ह्या युगांची देवांची वर्षे अनुक्रमे ४०००, ३०००, २००० आणि १००० इतकीं असतात आणि ह्या चार युगांचे संध्या आणि संध्यांश काळ अनुक्रमे ४००, ३००, २०० आणि १०० देववर्षे असतात. ३६० मानवी वर्षे म्हणजे देवांचे एक वर्ष होते. तेव्हा संध्या आणि संध्यांश धरून चारी युगांची मानवी वर्षे अनुक्रमे १७,२८,०००, १२,९६,०००, ८,६४,००० आणि ४,३२,००० होतात. ह्या चार युगांमिळून एक **चतुर्युग** होते. अशी १००० चतुर्युगे एवढा ब्रह्मदेवाचा दिवस असतो. त्या कालावधीला **कल्प** म्हणतात. ब्रह्मदेवाची रात्र तेवढीच मोठी असते. कल्पाच्या अंती सर्व विश्व ब्रह्मामध्ये विलीन होते आणि ह्याला **प्रलय** म्हणतात. ब्रह्मदेवाची रात्र समाप्त झाल्यावर विश्वाची पुन्हा उत्पत्ती होते. ब्रह्मदेवाच्या एका दिवसात १४ मनु होतात म्हणून एक **मन्वंतर** सुमारे ७१ चतुर्युगांच्या एवढे असते. ब्रह्मदेवाचे आयुष्य १०० वर्षे आहे आणि त्यापैकी अर्धे आयुष्य निघून गेले आहे. प्रस्तुत काळी ब्रह्मदेवाचा **द्वितीय परार्ध** चालू आहे आणि चालू कल्पाचे नाव 'वाराह' असे आहे. पुराणांच्या मताप्रमाणे विश्वाची उत्पत्ती आणि प्रलय अनेक वेळा होऊन गेले असून मन्वंतरेही अनेक होऊन गेली आहेत. चारी युगांची लक्षणे, वर्ण, धर्म वेगवेगळे असतात. कृतयुगात प्रत्येक व्यक्तीकडून तिचे कर्तव्य पूर्णपणे पार पडते आणि कोणतीही कर्तव्ये करावयाची उरत नाहीत म्हणून त्याला 'कृत' युग [कृतमेव न कर्तव्यं तस्मिन्काले युगोत्तमे । वनपर्व १४९·११.] म्हणतात, (वनपर्व १४९·११). कृत युगामध्ये धर्म संपूर्णपणे अस्तित्वात असतो आणि तो चार पायावर उभा असतो. त्याच्यापुढील प्रत्येक युगात त्याचा एक एक पाय कमी होऊन कलियुगात धर्माचा एकच पाय शिल्लक राहतो आणि अधर्म तीन चतुर्थांश भाग

अनुक्रमणिका

व्यापतो. कृत युगात लोक रोगविमुक्त असून त्यांचे आयुष्य ४०० वर्षे असे आणि पुढे प्रत्येक युगात आयुष्याचा चतुर्थांशाने ऱ्हास होतो. कृत युगात एकच वर्ण होता परंतु कलियुगाच्या अंती बहुतेक सर्व लोक शूद्र होतील. कलियुगात पुढे काय होणार आहे ह्याची अत्यंत निराशाजनक, खेदकारक आणि भीतीदायक वर्णने निरनिराळ्या पुराणांत दिली आहेत. सामान्यतः समाजात, नीति, धर्म इत्यादी सर्व गुणांचा लोप होईल.

पुराणांच्या रचनेचा काल निर्विवादपणे सांगता येत नसल्याकारणाने युगांच्या कल्पनेचा पूर्ण विकास कोणत्या विशिष्ट कालात झाला हे सांगणे कठीण आहे. तथापि एवढे तरी निश्चितपणे म्हणता येते की निदान इ.स. च्या ४ थ्या शतकात युग कल्पनेचा पूर्ण विकास झालेला होता. हल्ली असे मानण्यात येते की कलियुगाची इ. स. १९४५ मध्ये अथवा शके १८६७ अथवा संवत २००१।२ मध्ये ५०४६ वर्षे होऊन गेली. ह्या कालगणनेप्रमाणे कलियुगाचा नक्की आरंभ शुक्रवार ता. १८ फेब्रुवारी सन ख्रि. पू. ३१०२ हा दिवस येतो. तथापि कलियुगाचा आरंभ केव्हा झाला ह्याविषयी भिन्नभिन्न मते अस्तित्वात आहेत. कोणाच्या मताप्रमाणे श्रीकृष्णाने आपला अवतार संपवून स्वर्गलोकी गमन केले त्यावेळी कलियुग सुरू झाले. कोणाच्या मते द्रौपदीच्या मृत्यूच्या वेळी कलियुगाला आरंभ झाला. एक मत असे होते की ज्यावेळी भारतीय युद्ध झाले त्यावेळी कलियुगाचा लवकरच प्रारंभ व्हावयाचा होता. हे मत ऐहोळ येथील शिलालेखात प्रदर्शित केले असून त्या मताप्रमाणे कलियुगाचा आरंभ होऊन शके ५५६ ह्या वर्षी भारतीय युद्धानंतर ३७३५ वर्षे पुरी झाली होती. भारतीय युद्ध केव्हा झाले हे निरनिराळ्या पुराव्यांच्या आधारावर ठरविण्याचा अनेक विद्वान ग्रंथकारांनी आणि आधुनिक पंडितांनी प्रयत्न केला आहे. त्यावरून उपलब्ध झालेली काही माहिती उद्‌बोधक आहे.

वराह मिहिराने (बृह. सं. १३·३) असे म्हटले आहे की ज्यावेळी युधिष्ठिर राज्यावर होता त्या वेळी सप्तर्षी नक्षत्रपुंज मघा नक्षत्रात होता. ह्या मताप्रमाणे युधिष्ठिर द्वापराच्या अंती आणि कलियुगाच्या प्रारंभी न होता ६५३ वर्षांनी होऊन गेला.

श्री. चिं. वि. वैद्य (महाभारताची चिकित्सा पा. ८०-८१) ह्यांच्या मताप्रमाणे युधिष्ठिराचा काल ख्रि. पू. २४४८ येतो. भास्कर वर्मन् राजाच्या निधनपुर येथील ताम्रपटात (एपि. इं. खं. १२ पा ६५) जी वंशावळी दिली आहे तिच्या वरून भारतीय युद्धाचा सामान्यतः काळ ख्रि. पू. २५०० येतो आणि तो वराह मिहिराच्या विधानाशी (ख्रि. पू. २४४८) जवळ जवळ जुळतो. काही पुराणांत राजांच्या वंशावळी दिल्या आहेत आणि राजांच्या कारकीर्दीची वर्षे दिली आहेत. त्यांच्या आधारावर भारतीय युद्धाचे काल ख्रि. पू. ३१०१, ख्रि. पू. २४४८ आणि ख्रि. पू. १९०० असल्याचे निरनिराळ्या विद्वानांनी प्रतिपादन केले आहे. त्यांतल्या त्यात ख्रि. पू. १९०० हा काळ प्रस्तुत ग्रंथकाराला अधिक संभवनीय वाटतो.

मेग्यास्थेनिस ह्या ग्रीक गृहस्थाने केलेल्या हिंदुस्थानच्या वर्णनामध्ये भारतीय युद्धाच्या कालाचा अथवा कलियुगाच्या आरंभाचा प्रत्यक्ष संबंध काहीही नाही. काही विद्वानांनी मेग्यॅस्थेनीसने उल्लेख केलेला हिरोक्लीस म्हणजे हरिकृष्ण होय असे मानले आहे. ते मत ग्राह्य धरल्यास त्या वर्णनाचा भारतीय युद्धाच्या अथवा कलियुगाच्या कालाशी संबंध येऊ शकेल. त्याने दिलेल्या हिरोक्लीसच्या वर्णनातील काही थोड्या गोष्टी कृष्णाच्या चरित्राशी जुळतात परंतु दुसऱ्या काही आख्यायिका कृष्णाच्या चरित्राशी मुळीच जुळत नाहीत. मेग्यास्थेनिसने केलेले निरनिराळ्या प्राचीन राजघराण्यांच्या कालांचे विवेचन (मॅकक्रिंडलकृत ग्रंथ पा. २०३) एका दृष्टीने फार महत्त्वाचे आहे कारण त्यावरून असे सिद्ध होते की ख्रिस्तपूर्व ४ थ्या शतकापूर्वी

अनुक्रमणिका

६००० वर्षांपासून भारतात सुसंस्कृत समाज आणि सुव्यवस्थित राज्यपद्धती ह्या गोष्टी अस्तित्वात होत्या अशी आख्यायिका मेग्यास्थेनिसच्या काळी म्हणजे ख्रि. पू. ४ थ्या शतकात चांगली रूढ होती.

पुराणांत राजवंशांची माहिती दिली आहे परंतु दुर्दैवाने आज ज्या स्थितीत ती माहिती उपलब्ध आहे त्या माहितीप्रमाणे पुराणांच्या आधारावर प्राचीन काळचा निश्चित अथवा सुसंगत इतिहास आणि कालगणना तयार करता येणे शक्य नाही. पुराणांची पुनर्रचना निरनिराळ्या काळांत झाली असावी असे दिसते. त्यांनी दिलेली वर्णने काल्पनिक आहेत असे गृहीत धरता येत नाही. त्यांनी दिलेल्या परीक्षितापासून नंदापर्यंतच्या राजवंशांच्या वर्षांची बेरीज आणि वैयक्तिक राजांच्या कारकीर्दीची बेरीज एकमेकींशी जुळत नाहीत आणि ही गोष्ट पुराणकर्त्यांना निश्चित माहित असली पाहिजे. परंतु त्यांनी बेरजांमधील विसंगतीची संगती लावण्याचा प्रयत्न न करता दोन्ही प्रकारची माहिती दिली कारण त्यांना सर्व आख्यायिकांची नोंद करावयाची इच्छा होती.

महाभारतात जी ज्योतिषविषयक माहिती आली आहे त्यावरून भारतीय युद्धाचा काल काढण्याचे विद्वानांकडून अनेक प्रयत्न करण्यात आले आहेत. अशा विद्वानांपैकी काहींची नावे आणि त्यांनी ठरविलेला भारतीय युद्धाचा काल पुढे दिला आहे.

श्री. एन्. जगन्नाथराव (ख्रि. पू. ३१३९), श्री. के. जी. शंकर (ख्रि. पू. ११९८), केसरीचे संपादक श्री. ज. स. करंदीकर (ख्रि. पू. १९३१), प्रा. पी. सी. सेनगुप्ता (ख्रि. पू. २४४९), डॉ. के. ल. दप्तरी (ख्रि. पू. ११९७), प्रा. के. व्ही. अभ्यंकर (ख्रि. पू. ३१०१). ह्यांच्यापैकी श्री. करंदीकर ह्यांनी सांगितलेला काल संभवनीय अशा दोन कालांपैकी एक असून त्याला सर्वांत अधिक आधार आहेत. त्याप्रमाणेच प्रा. सेनगुप्ता ह्यांनी प्रतिपादन केलेला कालदेखील संभाव्य असा आहे.

वरील एकंदर विवेचनावरून असे दिसून येते की महाभारतात दिलेल्या ज्योतिषशास्त्र विषयक माहितीच्या आधारावर भारतीय युद्धाचा काल ठरविण्याकरिता केलेले प्रयत्न सर्वस्वी अयशस्वी झाले आहेत. त्या माहितीच्या आधारावर ठरविलेले काल ख्रि. पू. ११९३ ते ख्रि. पू. ३१०१ ह्यांच्या दरम्यानचे आहेत इतकेच नव्हे तर त्याच्याही मागचे आहेत आणि कोणत्याही एका कालाच्या बाबतीत दोन विद्वांनातही बहुधा एकमत क्वचितच आढळते. ह्याला अनेक कारणे आहेत. महाभारतात वर्णन केलेली अनेक लक्षणे परस्परविरोधी आहेत आणि अनेक मूलभूत गोष्टी अनिर्णित आहेत. दुश्चिन्हांची वर्णने स्वकपोलकल्पित अथवा अलंकारिक नाहीत असे निश्चियपूर्वक सांगणे कठीण आहे. कित्येक विद्वानांनी काही वर्णने प्रक्षिप्त ठरविली आहेत आणि काही ठिकाणी आपल्यास सोईचे पाठ स्वीकारले आहेत. महाभारतातील तथाकथित ज्योतिषविषयक माहितीचा विचार करण्याचे हे अत्यंत अयोग्य मार्ग होत. ती वर्णने इतकी परस्परविरोधी आहेत की त्यांची संगती लावणे अशक्य आहे आणि त्यांच्या आधारावर कोणताही निश्चित निष्कर्ष काढता येणार नाही. ग्रहस्थितीविषयी दिलेली माहिती एकतर कोणीतरी बऱ्याच मागाहून त्या ग्रंथात घुसडून दिलेली असावी अथवा ती अत्यंत विसंगत आहे आणि म्हणून त्या माहितीच्या आधारावर भारतीय युद्धाच्या कालाची चिकित्सा करण्याकरिता अयनगती आणि ग्रहांची स्थाने ह्यांची जी आंकडमोड अनेक विद्वानांनी केली आहे तिची छाननी करणे अनावश्यक आहे.

कलियुगाचा नक्की प्रारंभ केव्हा झाला हे सांगता येत नसले तरी पुराणांतील वर्णनाप्रमाणे कलियुगाची अजून सुमारे ४,२७,००० वर्षे जावयाची आहेत. तेव्हा आपण आज कलियुगाच्या प्रवेशद्वारातच

आहोत आणि कलियुगाच्या उरलेल्या अवधीत काय काय घडेल ह्याची कोणाला कल्पना करता येणार नाही. पुराणांत असे भविष्य वर्णन केले आहे की ह्या अवाढव्य कालावधीनंतर भगवान विष्णु शंभलग्रामात कल्किन्‌रूपाने अवतार धारण करील आणि सर्व म्लेच्छांचा, शूद्र राजांचा आणि नास्तिक मतवादी लोकांचा नाश करून धर्माची पुन्हा स्थापना करील आणि अशा रीतीने कृतयुगाचा प्रारंभ होईल. परंतु ह्या भविष्यावरून चालू काळातील कोणाचेही फारसे समाधान होणे शक्य नाही. इतर गोष्टींप्रमाणे ह्या बाबतीतदेखील निरनिराळ्या पुराणांत भिन्नभिन्न आख्यायिका अस्तित्वात आहेत. काही पुराणांत (वायु ५८·७५-९० आणि मत्स्य १४४·५०-६४) विष्णूच्या भविष्य कालच्या अवताराचे नाव प्रमतिभार्गव असे दिले आहे. काही ग्रंथांत (वायु. ९८·१०४-११०, भागवत १२·२·१६-२३ इ.) कल्किन् हा धर्मविजयी स्वरूपाचा चक्रवर्ती होऊन कृतयुगाला प्रारंभ करील असे म्हटले आहे. काही ठिकाणी (भागवत १२·२·१६) तो विष्णुयशस् नावाच्या ब्राह्मणाचा पुत्र असेल असे म्हटले आहे तर दुसऱ्या काही ग्रंथांत (वायु ९८·१०४ इ.) त्यालाच विष्णुयशस् असे म्हटले आहे. काही ग्रंथांत तो आधीच होऊन गेला (वायु. ९८·१११) असे वर्णन आहे तर इतर काही ग्रंथांत (भागवत १२·२·१६) तो पुढे होणार आहे असे म्हटले आहे. शिवाय पुराणांच्या मताप्रमाणे चार युगे (आणि कल्कि अवतारही) अनेक वेळा पुन्हा पुन्हा होऊन गेले आहेत. मनु स्मृतीत (९·३०१ आणि ३०२) म्हटले आहे की युगे हे सर्वस्वी तुटक असे कालखंड नसतात; राजा हाच आपल्या स्वतःच्या वर्तनाने एका युगाची लक्षणे अन्य युगांचे ठिकाणी देखील उत्पन्न करू शकतो.

जरी पुराणांनी उत्साहाच्या भरात कलियुगात झालेल्या नैतिक आणि शारीरिक बलाच्या ऱ्हासाचा निषेध करण्याची पराकाष्ठा केलेली असली तरी बहुतेक कोणत्याही पुराणात कलियुगात वर्ज्य सांगितलेल्या गोष्टीसंबंधी श्लोक आलेले नाहीत. **कलिवर्ज्य** ह्या विषयाला प्रामुख्य केव्हा प्राप्त झाले आणि अशी कोणती कृत्ये आहेत की जी करण्यास एकेकाळी प्रत्यवाय मानला जात नसे परंतु तीच कृत्ये कालांतराने वर्ज्य समजण्यात येऊ लागली अथवा निंद्य मानली जाऊ लागली ह्याचा आपणास विचार करावयाचा आहे.

आप. ध. सू. मध्ये (२·६·१४·६-१०) ज्येष्ठ पुत्राला वडिलोपार्जित सर्व मिळकत अथवा तिचा मोठा भाग देणे ह्या रूढीचा आणि आप. ध. सू. (२·१०·२७२-६) मध्ये नियोगाचा निषेध केला आहे. ह्या दोन्ही गोष्टींचा कलिवर्ज्य कृत्यांत समावेश झाला आहे. एकवार प्रचलित असणाऱ्या रूढींचा कलियुगात निषेध करणारे स्मृतिग्रंथांतील सर्वांत प्राचीन कालचे उल्लेख अपरार्काने (पा. ९७) उद्धृत केलेल्या बृहस्पतीस्मृतीतील अवतरणात आले आहेत आणि त्या अवतरणात नियोग आणि निरनिराळ्या प्रकारचे गौण पुत्र हे प्रकार लोकांचे पुण्य आणि आध्यात्मिक सामर्थ्य कमी झाल्या कारणाने द्वापर आणि कलियुगात शक्य होणार नाहीत असे म्हटले आहे. श्राद्धात मांस आणि मद्य अर्पण करणे ह्या गोष्टी कलियुगात वर्ज्य कराव्या असे प्रजापतीने (श्लो. १५१) सांगितले आहे. व्यास, लघु आश्वलायन, पराशर ह्यांच्यासारख्या स्मृतींनी आणखी काही गोष्टी कलियुगात वर्ज्य कराव्या असे सांगितले आहे. टीका आणि निबंधकारांमध्ये एका युगात प्रचलित असणाऱ्या काही विशिष्ट गोष्टी अन्य युगात वर्ज्य असतात हे मेधातिथीला मान्य नव्हते. विज्ञानेश्वराने कलिवर्ज्याविषयी फक्त एकच [यथा नियोगधर्मो नो नानुबन्ध्यावधोपि वा । तथोद्धारविभागोऽपि नैव संप्रति वर्तते ॥ मिता- याज्ञ २·११७.] श्लोक उद्धृत केला आहे आणि त्यात नियोग, उद्धार विभाग आणि यज्ञामध्ये गाईची हत्या ह्या गोष्टी कलियुगात करू नयेत असे सांगितले आहे, स्मृतिचंद्रिकेत (१. पा १२) ऋतूचा एक श्लोक उद्धृत केला असून त्यात चार गोष्टी कलियुगात वर्ज्य सांगितल्या आहेत. नारदीय पुराणात (पूर्वार्ध २४·१३-१६) कलिवर्ज्यासंबंधी चार श्लोक आहेत. अपरार्काने (पा. १५ आणि ६३) ब्रह्म पुराणातील कलिवर्ज्यासंबंधी एक श्लोक आणि एक श्लोकार्ध उद्धृत केले आहेत. अपरार्काने उद्धृत केलेले श्लोक ब्रह्मपुराणात सापडत नाहीत परंतु तेच श्लोक हलायुध प्रभृति ग्रंथकारांनी ब्रह्मपुराणातून उद्धृत केले आहेत. अपरार्काने (पा. २३३) ह्या

विषयावरील दोन श्लोक एका स्मृतीतून (नाव न देता) आणि एक अवतरण मार्कंडेयपुराणातून उद्धृत केले आहे. मार्कंडेय पुराणातील अवतरणात कलियुगात यज्ञामध्ये पशुहत्या करू नये असा नियम भृगूने घातला असल्याचे म्हटले आहे. स्मृतिचंद्रिका (१ पा १२), हेमाद्री (सह्याद्री खंड, उत्तरभाग अ. ५·६४-६५), स्मृत्यर्थ सार (पा २), पराशरमाधवीय (१·१· पा. १३१-१३७), निर्णय सिंधु (३ पूर्वार्ध) प्रभृति अनेक ग्रंथांत पुराणांतील दीर्घ अवतरणे उद्धृत केली असून त्यांत सुमारे ५० कलिवर्ज्य गोष्टींची नावे दिली आहेत. कलिवर्ज्यविनिर्णय अथवा कलिवर्ज्यनिर्णय ह्या नावाचा एक ग्रंथ नीलकंठाचा ज्येष्ठ भ्राता दामोदर (इ. स.च्या १७ व्या शतकाचा पूर्वार्ध) ह्याने केला असून त्यात आदित्यपुराण, ब्रह्मपुराण प्रभृति ग्रंथांमधील अवतरणे उद्धृत केली असून ती अवतरणे हेमाद्रीच्या आणि दामोदराच्या पूर्वी होऊन गेलेल्या इतर निबंध ग्रंथांवरून उतरून घेतली आहेत.

ह्या अवतरणांत ज्या अनेक कलिवर्ज्य गोष्टींची नावे आली आहेत ती काही विशिष्ट क्रमाने अथवा व्यवस्थेने दिलेली नाहीत. त्या अवतरणांतील पहिल्या श्लोकात असे म्हटले आहे की कलियुगात चांगल्या वर्तनाच्या लोकांचा अभाव असल्याकारणाने सूज्ञ लोकांनी आपसात विचारविनिमय केला आणि काही गोष्टी चालू ठेवल्यास धर्महानि होण्याची भीती वाटल्यावरून (श्रुति अथवा स्मृती ह्यांची संमती नसताना देखील) त्या टाकून द्याव्या असा निर्णय ठरविला. शेवटी पुन्हा असे म्हटले आहे की कलियुगाच्या प्रारंभी श्रेष्ठ लोकांनी परस्परांशी संकेत केला आणि लोकांचे (अपाय आणि पाप ह्यांच्यापासून) संरक्षण करण्याच्या हेतूने काही विशिष्ट कृत्यांचा त्याग करण्याचे ठरविले आणि (ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे की) सज्ञनांनी ठरविलेल्या संकेतांना [धर्मज्ञसमयः प्रमाणम्। वेदाश्च। आप. ध. सू. १·१·१·२-३.] च्या समान प्रामाण्य असते. (आप. ध. सू. १·१·१·२-३) वेदाच्या समान.

अशा अनेक कलिवर्ज्य गोष्टींची यादी आणि काही ठिकाणी थोडेसे विवेचन खाली दिले आहे. ह्या यादीत कायद्याशी संबंध येणाऱ्या गोष्टी प्रथमतः दिल्या आहेत आणि बाकीच्या गोष्टी कलिवर्ज्यनिर्णय ग्रंथात ज्या क्रमाने आल्या आहेत त्या क्रमाने दिल्या आहेत. शेवटी ज्या गोष्टी वर उल्लेख केलेल्या अवतरणांत समाविष्ट केलेल्या नाहीत त्यांचेही विवेचन केले आहे.

**१. ज्येष्ठांश अथवा उद्धार अथवा उद्धारविभाग** म्हणजे वडिलोपार्जित मिळकतीचा इतरांपेक्षा अधिक भाग अथवा अशी सर्व मिळकत ज्येष्ठ पुत्राला देणे. ह्या विषयाचे विवेचन मागे आले आहे.

**२. नियोग.** एकाद्या निपुत्रिक मनुष्याच्या पत्नीच्या ठिकाणी पुत्रोत्पत्ती करण्याकरिता तिच्या पतीच्या भ्रात्याची (अथवा दुसऱ्या कोणी सगोत्र पुरुषाची वगैरे) योजना करणे. ह्या विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे.

**३. औरस आणि दत्तक ह्यांच्याव्यक्तिरिक्त निरनिराळ्या प्रकारच्या गौण पुत्रांचा स्वीकार करणे.** ह्या विषयाचे विवेचन मागे आले आहे.

**४. विधवांचा पुनर्विवाह.** ह्या विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे. वसिष्ठ स्मृतीसारख्या [पाणिग्राहे मृते बाला केवलं मन्त्रसंस्कृता । सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनः संस्कारमर्हति । वसिष्ठ १७·७४·] (१७·७४) काही स्मृतींत **अक्षययोनि** (म्हणजे जिचा पतीबरोबर संभोग झाला नाही अशा) विवाहित स्त्रीचा पुनर्विवाह आणि **क्षतयोनि** (म्हणजे पतीबरोबर संभोग झालेल्या) विवाहित स्त्रीचा पुनर्विवाह ह्यांच्यात भेद करून पहिल्या प्रकाराला

संमती दिली आहे आणि दुसऱ्या प्रकाराचा निषेध केला आहे. परंतु कलिवर्ज्य कृत्यांसंबंधीच्या श्लोकांत दोन्ही प्रकारांचा निषेध केला आहे.

**५. भिन्न जातीच्या वधुवरांचा विवाह.** ह्या विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे.

**६. सगोत्र मुलीबरोबर अथवा (मातुल कन्येसारख्या) मातेच्या सपिंड मुलीबरोबर विवाह करणे**. ह्या विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे. मातुलकन्येशी विवाह करण्याच्या कृत्याचा कलिवर्ज्यांत समावेश केला असूनही तो प्रघात अनेक जातींत चालत आहे.

**७. धर्मयुद्धात आततायी स्वरूपाने हल्ला करून येणाऱ्या ब्राह्मणाचा वध करणे.** ह्या विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे.

**८. पितापुत्रांमधील वादात साक्ष देणाऱ्या साक्षीदाराला दंड करणे.** पितापुत्रांमधील वाद प्राचीन काळी भारतात सामान्यतः निंद्य मानण्यात येत असे. कालांतराने अशा गोष्टी वरचेवर घडून येऊ लागल्या कारणाने साक्षीदाराला दंड करावा हा नियम गैरवाजवी असल्याचे वाटू लागले असले पाहिजे. अशा वादात राजाला आपण होऊन हात घालता येत असे. (नारद- प्रकीर्णक श्लो. ३).

**९. ज्यावेळी एकादा ब्राह्मण सहा वेळा (म्हणजे तीन दिवस) अन्नावाचून असले त्यावेळी त्याने एकाद्या नीच कर्म करणाऱ्याकडून (म्हणजे शूद्राकडून देखील धान्य स्वीकारणे (अथवा चोरणे).** असा नियम गौतम (१८·२८।२९, मनु. ११·१६, याज्ञ. ३·४३) ह्यांनी सांगितला होता. परंतु मागाहूनच्या काळी ह्या बाबतीत अधिक कडक रीतीने विचार करण्यात येऊ लागला.

**१०. एकाद्या ब्राह्मणाने समुद्रपर्यटण केले असेल आणि त्याबद्दलचे योग्य प्रायश्चित्त केले असेल तर त्याला इतरांबरोबर व्यवहार करू देणे.** ऋग्वेद, अथर्ववेद आणि ब्राह्मणग्रंथ यांत समुद्राचा उल्लेख आलेला आहे. बौधायन ध. सू. (१·१·२२) मध्ये समुद्रपर्यटणाचा निषेध केला आहे. मनूने (३·१५८ आणि १६६-७) असा नियम सांगितला आहे की ज्या ब्राह्मणाने समुद्रपर्यटण केले असेल तो पातकी होतो आणि त्याला श्राद्धाकरिता आमंत्रण करू नये. परंतु ही गोष्ट स्पष्ट आहे की असा ब्राह्मण जातिबाह्य होतो आणि संगति करण्याला अपात्र होतो असे मनूने सांगितलेले नाही. समुद्र पर्यटणावरील बंदी फक्त ब्राह्मणांपुरतीच होती आणि ब्राह्मण समुद्रांचे उल्लंघन करून जावा, बोर्नियोसारख्या दूरदूरच्या देशात गेले होते ही गोष्ट त्या देशांतील शिलालेखांवरून (एपि. इं. १७ पा. ३१४) सिद्ध करिता येते. कोणत्याही प्राचीन ग्रंथामध्ये निदान शूद्राला समुद्रपर्यटणाचा निषेध सांगितलेला नाही आणि गलबतात बसून समुद्रावर जाण्याबद्दल कोणत्याही ग्रंथात प्रायश्चित्त सांगितलेले नाही. ज्या विशिष्ट कारणाकरिता प्रायश्चित्त सांगितले आहे ती कारणे म्हणजे समुद्रप्रवासामुळे मनुष्याला संध्यावंदनासारखी नित्यकर्मे करण्याचे सोडून द्यावे लागण्याचा संभव असतो आणि भोजनाच्या बाबतीत त्याचा म्लेच्छांबरोबर निकट संबंध येण्याचा संभव असतो. जर त्याने तो जेथे असेल तेथे नित्य कर्मे केली अथवा भोजनाच्या बाबतीत त्याने म्लेंच्छांशी निकट संबंध ठेवला नाही तर त्याला प्रायश्चित्त करावे लागणार नाही आणि मग तो सामाजिक व्यवहाराला अपात्र ठरणार नाही हे सांगावयास नको.

अनुक्रमणिका

स्तृतिकौस्तुभ ह्या ग्रंथात समुद्रयात्रा म्हणजे समुद्रापलीकडील तीर्थांची यात्रा असा खुलासा करून अशी तीर्थयात्रा करणे कलियुगात वर्ज्य आहे असे म्हटले आहे. परंतु हा खुलासा चुकीचा आहे असे निर्णयसिंधूवरील टीकेत कृष्णभट्टाने म्हटले आहे.

**११. सत्रांची दीक्षा घेणे.** सत्रांचे वर्णन खंड २ मध्ये आले आहे. प्राचीन वेदोक्त यज्ञात (१२ वर्षे अथवा त्याहूनही अधिक) फार मोठ्या कालाची आणि द्रव्याची आवश्यकता असे म्हणून अशा यज्ञांना लोक कंटाळले होते आणि यज्ञांव्यतिरिक्त आणि सुलभ असे उपासनेचे मार्ग त्यांना पसंत पडू लागले होते ही गोष्ट त्या निषेधावरून स्पष्ट दिसून येते.

**१२. पाण्याचा कमंडलू धारण करणे.** प्रत्येक स्नातकाने पाणी भरलेला कमंडलू धारण करावयाचा असे आणि त्या कमंडलूमधील पाणी त्याने स्वतःच्या शरीरशुद्धीकरिता घ्यावयाचे असे. ह्यासंबंधी अनेक नियम असत आणि त्यामुळे क्रमाक्रमाने कमंडलू धारण करणे अवघड वाटू लागून कमंडलू धारण करण्याचा नियम मोडण्याकडे प्रवृत्ती होत गेली. कलियुगात कमंडलू धारण करण्याचा पूर्णपणे निषेध करून लोकामधील ह्या प्रवृत्तीला मान्यता देण्यात आली.

मदनपारिजात (पा. १६) ह्या ग्रंथाने कमंडलू धारण करणे ह्या कृत्याचा **नैष्ठिक** (आजन्म) ब्रह्मचर्याशी संबंध असल्याचे म्हटले आहे. परंतु ते मत चुकीचे आहे. नारदीय पुराणात (पूर्वार्ध २४·१३) त्या दोन प्रघातांचा स्वतंत्र विचार केला आहे.

**१३. महाप्रस्थान यात्रा.** ह्या विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे. मनु (६·३१) आणि याज्ञवल्क्य (३·५५) ह्यांनी असा नियम सांगितला आहे की एकादा वानप्रस्थ असाध्य रोगाने ग्रस्त झाला असेल आणि त्याला आपली आश्रमविहित कर्मे करवत नाहीशी झाली असतील तर त्याला ईशान्य दिशेला महाप्रस्थानाकरिता निघून देहपात होईपर्यंत प्रवास करीत जाण्याला संमती आहे. अशा रीतीने महाप्रस्थानाकरिता हिमालयपर्वतात जाऊन अथवा अग्नि अथवा जलप्रवेश करून अथवा डोंगराच्या कड्यावरून खाली पडून आत्महत्या केल्यास त्याला काहीही पातक लागत नाही. उलट तो स्वर्गलोकी जाईल असे आदिपुराणात (अपरार्क पा ८७७-७९) म्हटले आहे.

**१४. गोसव नावाच्या यज्ञामध्ये गाईचे बलिदान करणे.** प्राचीन काळी अनेक प्रसंगी गाईची हत्या करण्यात येत असे. मांसभक्षण कमी प्रतीचे मानण्यात येऊ लागल्याकारणाने गोहत्या अत्यंत गर्ह्य समजण्यात येऊ लागली आणि शेकडो वर्षे अस्तित्वात आलेल्या निषेधाचा कलिवर्ज्यासंबंधीच्या वचनांत समावेश करण्यात आला.

**१५. सौत्रामणि यज्ञात सुरापात्रांचा उपयोग करणे.** 'सुत्रामन्' ही एक इंद्राची संज्ञा असून त्या शब्दावरून ह्या यज्ञाला सौत्रामणि असे नाव मिळाले आहे. ह्या यज्ञामधील विशेष गोष्ट म्हणजे पात्रात सुरा घेऊन तिची आहुती देणे ही होय. आधुनिक काळी ह्या यज्ञामध्ये सुरेच्या ऐवजी दुधाची आहुती देण्यात येते आणि आप. श्रौ. सू. (१९·२·७·१३) मध्ये देखील प्राचीन काळी ही दुधाची आहुती देण्याला संमती दिली होती. ह्या यज्ञासंबंधी माहिती खंड २ मध्ये दिली आहे. ह्या कलिवर्ज्य कृत्याचा अर्थ असा आहे की 'सौत्रामणी यज्ञात जो सुरेचा उपयोग करतो त्याच्याबरोबर सामाजिक व्यवहार करणे' असे निर्णयसिंधूने

म्हटले आहे आणि 'सौत्रामणि आदि यज्ञात सुरापात्रांचा उपयोग करणे' असा अर्थ धर्मसिंधूने (३ पूर्वार्ध पा. ३५७) दिला आहे. निर्णयसिंधूने दिलेला अर्थ समाधानकारक वाटत नाही.

**१६. अग्निहोत्रहवणी. जिभेने चाटणे आणि अशा रीतीने चाटली असताही त्यानंतर तिचा उपयोग करणे.** अग्निहोत्रहवणी म्हणजे अग्निहोत्रात ज्या स्त्रुवा पळीचा उपयोग करून हवन केले जाते ती पळी. ह्या संबंधी वर्णन खंड २ मध्ये आले आहे. सामान्यतः जर एकादे पात्र कोणी मनुष्याने चाटले असले तर त्या पात्राची योग्य प्रकारची शुद्धि केल्याखेरीज त्या पात्राचा उपयोग धार्मिक विधीमध्ये पुन्हा करता येत नाही. तथापि हा नियम अग्निहोत्रहवणी आणि सोमरसाचे चमस ह्यांना लागत नाही. प्रस्तुत कलिवर्ज्य कृत्यात ह्या कृत्याचा निषेध केला आहे.

**१७. शास्त्रात सांगितलेल्या विधीने वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करणे.** गौतम, (३·२५-३४), आप. ध. सू. (२·९·२१·१८ प्रभृति), वसिष्ठ (९·१-११), मनु (६·१-३२), याज्ञ (३·४५-५५) ह्यांनी वानप्रस्थाश्रमाचे सविस्तर नियम दिले आहेत. खंड २ मध्ये त्यानंतर करावयाच्या संन्यासविधीचे वर्णन दिले असून त्यासंबंधी विवेचन केले आहे.

**१८. मनुष्याच्या वेदाध्ययनाला अनुसरून** आणि त्याच्या आचाराला अनुसरून **आशौचाच्या कालावधीचा संकोच करणे.**

संपिडाच्या मृत्यूनंतर ब्राह्मणाने पाळावयाच्या आशौचाचा काल दहा दिवस असावा असा सर्वसाधारण नियम गौतम (१४-१), मनु (५·५९ आणि ८३) प्रभृतींनी सांगितला आहे परंतु कुंभीधान्य (एक रांजणभर धान्य संचय करणारा) प्रभृती तीन प्रकारच्या ब्राह्मणांकरिता चार, तीन आणि एक दिवस आशौचाचे अवधी मनूने (५·५९) सांगितले आहेत. दक्ष आणि पराशर ह्यांनी वेदाध्ययन आणि आचार ह्यांच्या आधारावर एक आणि तीन दिवसांचे काल सांगितले आहेत. मिताक्षरेने (याज्ञ. ३·२८-२९) म्हटले आहे की आशौचाच्या कालाचा संकोच सर्व बाबतींत करावयाचा नसून दान घेणे, अग्निहोत्र करणे, वेदाध्ययन करणे आणि ज्या बाबतींत अडचण उत्पन्न होईल अशा काही विशिष्ट बाबतींतच करावयाचा असतो. आशौचाच्या कालावधीचा संकोच करण्याचा निषेध करण्याचे कारण बहुधा असे असावे की एकादा मनुष्य आपण विद्वान असल्याचे मानील परंतु ती गोष्ट त्याचे शेजारी मान्य करणार नाहीत आणि अशा रीतीने गोंधळ उत्पन्न होण्याचा संभव आहे.

**१९. ब्राह्मणाला देहान्त प्रायश्चित्त सांगणे.** ब्रह्महत्या, सुरापान ह्यांच्यासारख्या काही महापातकांकरिता कड्यावरून उडी मारणे अथवा अग्निप्रवेश करणे ह्यांच्याव्यतिरिक्त प्रायश्चित्त नसते असे मनु (११·१४६) प्रभृति स्मृतींनी सांगितले आहे. परंतु कालांतराने ब्राह्मणाचा देह अधिकाधिक पवित्र मानण्यात येऊ लागल्या कारणाने ब्राह्मणाने कितीही घोर स्वरूपाचे पाप केले असले तरी त्याला देहान्त प्रायश्चित्त देण्याचे बंद झाले. हा नियम ब्राह्मणाव्यतिरिक्त अन्य कोणालाही लावण्यात येत नसे.

**२०. पातकी व्यक्तीशी संसर्ग झाल्यामुळे उत्पन्न होणारा दोष.** महापातक केलेल्या व्यक्तीशी संसर्ग झाल्याने पतितत्व प्राप्त होते आणि असा संसर्ग कोणत्या प्रकारचा आणि किती कालपर्यंत झाला म्हणजे असा परिणाम होतो ह्याविषयी निरनिराळ्या स्मृतींनी (मनु. ११·१८०, बौ. ध. सू. २·१·८८ इ.) नियम सांगितले आहेत. युगपरत्वेही निरनिराळे परिणाम होतात. असे कडक नियम कलियुगात बदलण्यात आले

आणि पातकी मनुष्याबरोबर संभाषण केल्याने अथवा त्याला पाहिल्याने पातक लागत नाही असा निर्णय ठरविण्यात आला. (पराशर १·२५-२६). पराशर माधवीयात (२ भाग २ पा ९०) असे सांगितले आहे की कलियुगात पातकी मनुष्याबरोबर केलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या संसर्गाने पातित्य येत नाही असे पराशराचे मत होते आणि म्हणून त्याने संसर्गाकरिता कोणतेही प्रायश्चित्त सांगितलेले नाही. निर्णयसिंधु (३ पा ३६८) आणि भट्टोजी ह्यांनीही असेच मत दिले आहे.

**२१. चोरीव्यतिरिक्त इतर महापातकांबद्दल (गुप्त) प्रायश्चित घेणे.** पराशराने (९·६१) असा सर्वसाधारण नियम सांगितला आहे की कोणीही आपण केलेल्या पातकाची उघडपणे घोषणा करावी. ह्या नियमाला काही अपवाद काही स्मृतींनी सांगितले आहेत. ब्रह्महत्या, सुरापान, गुरुतल्पगमन आणि सुवर्णाची चोरी ह्यांच्यासारख्या महापातकांकरिताही काही प्रायश्चित्ते गुप्तपणे (तिसऱ्या व्यक्तीला प्रायश्चित्त केल्याचे न कळविता) करावीत असे गौतमाने (अध्याय २४) म्हटले आहे. अशी गुप्त प्रायश्चित्ते करण्याचा अधिकार फक्त अग्निहोत्री, शिस्तशीर वर्तनाचे, वृद्ध अथवा विद्वान ह्यांनाच असतो असे वसिष्ठाने (अध्या. २५·२) म्हटले आहे. निर्णयसिंधूने असे गुप्त प्रायश्चित्त फक्त ब्राह्मणांनाच घेता येते असे म्हटले आहे. कलियुगात गुप्त प्रायश्चित्ते वर्ज्य आहेत असे कलिवर्ज्यविनिर्णय (पृष्ठ ८ अ) ह्या ग्रंथाचे मत असावे असे दिसते.

**२२. वर, अतिथी ह्यांच्या सत्काराकरिता आणि पितरांच्या प्रीत्यर्थ वेदमंत्र उच्चारून पशु अर्पण करणे (पशूपाकरण क्रिया).** प्राचीन काळी मधुपर्क हा अनक प्रसंगी आणि राजा, ऋत्विज, वर ह्यांच्यासारख्या अनेक व्यक्तींना अर्पण करण्यात येत असे. पूर्वी एकाद्या सन्मान्य अतिथीच्या सत्काराकरिता एक गाय अथवा बैल मारण्यात येत असे. पुढे जेव्हा गाय अत्यंत पवित्र मानण्यात येऊ लागली तेव्हा दुसऱ्या एकाद्या पशूचे मांस अर्पण करण्यात येऊ लागले आणि जेव्हा मांसभक्षण करणे हेच निंद्य समजण्यात येऊ लागले तेव्हा पायस आणि इतर वनस्पतिजन्य पदार्थ अर्पण करावे असा नियम सांगण्यात येऊ लागला. प्रस्तुत कलिवर्ज्य नियमात वर अथवा एकादा सन्मान्य अतिथी ह्यांना द्यावयाच्या मधुपर्कात आणि श्राद्धातील ब्राह्मणांना द्यावयाच्या भोजनात मांस अर्पण करण्याचा निषेध सांगितला आहे. ह्या एका निषेधामध्ये इतर ग्रंथकारांनी स्वतंत्र रीतीने सांगितलेल्या 'गोवध', 'गवालंभ' आणि 'पलपैतृक' त्यादी अनेक निषेधांचा समावेश होतो. मधुपर्क आणि मांसभक्षण ह्या दोन्ही विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे.

**२३. सवर्ण नसणाऱ्या स्त्रियांबरोबर सुरतक्रीडा केल्याचा दोष ज्यांनी केला असेल त्यांनी त्याबद्दल प्रायश्चित्त घेतले असले तरीही त्यांच्याबरोबर व्यवहार करणे.** समानवर्णाच्या, आपल्या वर्णापेक्षा उच्च वर्णाच्या, अथवा कनिष्ठ वर्णाच्या स्त्रीबरोबर व्यभिचार करणाऱ्या पुरुषाने कोणते प्रायश्चित्त करावे ह्याबद्दल प्राचीन काळच्या सूत्रांची कठोरपणाची मते असत. (गौतम. २३·१४-१५; वसिष्ठ २१·१-३ इ.). हा कठोरपणा मागाहूनच्या काळात झालेल्या स्मृतिकारांनी (पराशर १०·५-७) बराच कमी केला होता. कलिवर्ज्यनिर्णय ह्या ग्रंथातील वचनात असा नियम सांगितला आहे की आपल्याहून भिन्न वर्णाच्या स्त्रियांबरोबर रतिसंग केल्याचा दोष केलेल्या पुरुषांनी जरी त्याबद्दल प्रायश्चित्त घेतले असले तरीही त्यांना त्यांच्या जातिबांधवांबरोबर सामाजिक व्यवहार करण्याला परवानगी देता येत नाही. ह्या नियमामुळे नीतिमत्ता चांगली कडक रीतीची राहण्याला मदत केली असली तरी त्यामुळे निरनिराळ्या जाती अलग अलग राखल्या गेल्या.

**२४. माता (अथवा नात्याने सन्मानास पात्र असणारी एखादी स्त्री) हिने आपल्याहून कनिष्ठ वर्णाच्या पुरुषाबरोबर सुरतसमागम केल्यास तिचा त्याग करणे.** स्त्रियांनी व्यभिचार केल्यास त्यांना द्यावयाच्या प्रायश्चित्तासंबंधी सूत्रांत आणि स्मृतींत निरनिराळ्या काळी निरनिराळ्या प्रकारचे नियम सांगितले आहेत. गौतमाने (२३·१४) अशा स्त्रीला कुत्र्याकडून खावविण्याचे शासन करावे असे सांगितले आहे. परंतु इतर स्मृतींनी (मनु. ११·१७६) इतके कडक शासन न सांगता तिला पतीने आपल्या घरात एका खोलीत कोंडून ठेवावे आणि व्यभिचाराबद्दलचे प्रायश्चित्त तिच्याकडून करवून घ्यावे असे सांगितले आहे. वसिष्ठाने असा नियम सांगितला आहे की उच्च वर्णाच्या स्त्रीने कनिष्ठ वर्णाच्या पुरुषाबरोबर व्यभिचार केला असेल आणि त्यांना अशा संबंधांपासून अपत्य झाले नसेल तरच तिची प्रायश्चित्ताने शुद्धि होऊ शकते. (वसि. २१·१२). याज्ञ. ने असा नियम सांगितला आहे की एकाद्या स्त्रीने व्यभिचार केला आणि अशा कृत्यामुळे तिला गर्भधारणा झाली तर तिचा त्याग करावा. (याज्ञ. १·७२). कलिवर्ज्यनिर्णयातील वचनात असे म्हटले आहे की मातेसारख्या दुसऱ्यांना सन्मानार्ह असणाऱ्या स्त्रीने व्यभिचार केला असला तरीही तिचा त्याग करू नये. मात्र मातेसारख्या सन्मानार्ह नसणाऱ्या इतर स्त्रियांचा त्याग करण्यास परवानगी दिली आहे.

**२५. दुसऱ्याकरिता आपल्या देहाचे बलिदान करणे.** विष्णु ध. सू. [गोब्राह्मणनृपतिमित्रधनदारजीवितरक्षणाद्ये हतास्ते स्वर्गभाजः । विष्णु ध. सू. ३·४५.] (३·४५) मध्ये असे सांगितले आहे की एकाद्या गाईचा, ब्राह्मणाचा, राजाचा, मित्राचा जीव वाचविण्याकरिता, तसेच स्वतःच्या संपत्तीच्या आणि आपल्या पत्नीच्या संरक्षणाकरिता जे पुरुष इतरांकडून मारले जातात ते स्वर्गाला जातात आणि हा नियम चार वर्णांच्या पलीकडे असणाऱ्यांना देखील लागतो. (विष्णु ध. सू. १६-१८) कलिवर्ज्यनिर्णयात वरील सारख्या प्रसंगी केवळ स्वर्गप्राप्तीच्या आशेने स्वतःच्या देहाचे बलिदान करण्याचा निषेध केला आहे. त्या ग्रंथात' (पृ. ९ ब) बलिदान ह्या शब्दाचा दुसरा एक (जरासा दूरान्वित) अर्थ 'दुसऱ्या करिता गुलाम म्हणून सेवा करण्यास तयार होणे, असा दिला असून असे कृत्य तीन उच्च वर्णांत जन्मलेल्या मनुष्याने कलियुगात करू नये परंतु शूद्रांनी करण्यास प्रत्यवाय नाही असे प्रतिपादन केले आहे.

**२६. आपले भोजन झाल्यावर राहिलेले उच्छिष्ट (अन्न) दुसऱ्यास अर्पण करणे.** मधुपर्कात सन्मान्य अतिथीला अर्पण केलेल्या मध, दूध आणि दही ह्या पदार्थापैकी काही भाग त्या अतिथीने भक्षण केल्यावर उरलेला भाग एकाद्या ब्राह्मणाला (अथवा आपल्या पुत्राला अथवा कनिष्ठ भ्रात्याला) द्यावयाचा प्रघात असे. ह्या प्रघाताचा प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात निषेध केला आहे. ह्या प्रघाताचे वर्णन खंड २ मध्ये आले आहे. ह्या वचनाचे दुसरेही काही अर्थ (निर्णयसिंधू, भट्टोजी, स्मृ. कौ. इ०) निरनिराळ्या ग्रंथांनी केले आहेत. ह्यावरून असे दिसून येते की कलिवर्ज्यासंबंधी काही काही वचने तुलनेने मागाहूनच्या काळातील असून त्यांच्या निश्चित अर्थाविषयी अलीकडच्या काळातील निबंधग्रंथकारांमध्येही एकमत नाही.

**२७. एखाद्या विशिष्ट देवतेच्या मूर्तीची निरनिराळ्या उपचारांनी (जन्मभर) पूजा करण्याची प्रतिज्ञा करणे.** निर्णय सिंधूमध्ये असा खुलासा केला आहे की, एकाद्या देवतेच्या मूर्तीची वेतन घेऊन पूजा करण्याचा प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात निषेध केला आहे.

**२८. (एकादा नातलग मृत झाल्यामुळे) आशौच आलेल्या व्यक्तींच्या शरीराला अस्थिसंचय केल्यानंतर स्पर्श करणे.** संवर्ताने (३८·४०) असे सांगितले आहे की प्रेताचा दाह केल्यानंतर पहिल्या, तिसऱ्या, सातव्या अथवा नवव्या दिवशी अस्थिसंचय करता येतो आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्यांच्या बाबतीत अस्थिसंचयानंतर अनुक्रमे ४ थ्या, ६ व्या, ८ व्या, आणि १० व्या दिवशी मृताशौच आलेल्या

व्यक्तींना स्पर्श करण्यास प्रत्यवाय नसतो. प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात असे करण्याचा निषेध केला असून आशौचाचा नियम अधिक कडक केला आहे.

**२९. एखाद्या यज्ञात पशुहत्या करण्याचे (शमित्राचे) काम एखाद्या ब्राह्मणाने करणे.** श्रौतयज्ञात पशूचा वध करणाऱ्याला शमितृ अशी संज्ञा असे. सर्वसामान्य मत शमितृ हा ऋत्विजाहून भिन्न असावा असे असे आणि तो ब्राह्मण असे अथवा ब्राह्मणेतरही असू शके. (आश्व. श्रौ. १२·९·१२-१३). पशुयज्ञच मुळी निंद्य अथवा निषिद्ध धरण्यात येऊ लागल्यामुळे प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात ब्राह्मणाने शमितृचे काम करण्याचा निषेध केला आहे.

**३०. ब्राह्मणांनी सोमवल्लीची विक्री करणे.** सोमवल्ली विकत घ्यावी लागे. प्राचीन काळी सोमविक्रय करणारा एकादा कुत्स गोत्राचा ब्राह्मण असे अथवा दुसरा कोणताही ब्राह्मण अथवा शूद्र असे. मागाहूनच्या काळात ब्राह्मणाला सोमविक्रय करण्यास मनूने (१०·८८) निषेध केला आणि सोम विक्रय करणारा ब्राह्मण श्राद्धाला आमंत्रण करण्यास अपात्र असतो आणि त्याच्या घरी कोणीही अन्नग्रहण करू नये असा नियम सांगितला. (मनु. ३·१५८; याज्ञ. १·१६५ आणि वसि. १४·३).

**३१. एखाद्या ब्राह्मण गृहस्थाला** आपला दास, आपला गुराखी, पिढीजात स्नेही आणि आपले शेत अर्धेलीच्या कराराने कसणारा शेतकरी ह्या **चार प्रकारच्या शूद्रांच्या घरी अन्न ग्रहण करण्यास असणारी परवानगी**. अशी परवानगी गौतम (१७·६) प्रभृति स्मृतींनी दिली आहे. अशी परवानगी फक्त अत्यंत आपत्कालापुरतीच आहे असे हरदत्ताने (गौ. १७·६) आणि अपरार्काने (पा. २४४) म्हटले आहे. ह्यावरून असे दिसून येते की असे अन्नग्रहण करण्याला जो सक्त निषेध कलिवर्ज्यवचनात सांगितला आहे तो ख्रिस्ती सनाच्या १२ व्या शतकापर्यंत एक तर प्रसिद्ध नसावा अथवा त्याला फारसे महत्त्व दिले जात नसावे. अन्नग्रहण करण्याच्या आणि विवाहाच्या बाबतींत निरनिराळ्या जातींतील विभक्तता कलिवर्ज्य वचनांमुळे अधिक कडक झाली.

**३२. फार दूरच्या तीर्थक्षेत्रांची यात्रा करणे.** एकादा ब्राह्मण दूर ठिकाणी यात्रा करण्याकरिता गेल्यास त्याला अवश्य कराव्या लागणाऱ्या कर्तव्यात अंतर पडेल म्हणून ब्राह्मणाला तसा दूरचा प्रवास करण्यास बंदी घातली आहे. परंतु यज्ञाकरिता द्रव्य मिळविण्याकरिता तसा प्रवास करण्यास मनाई नाही. (सत्यव्रताचे वचन. कलिवर्ज्य निर्णय पृष्ठ १० अ).

**३३. शिष्याने नेहमी आपल्या गुरूच्या पत्नीबरोबर गुरूबरोबरच्या वर्तनासारखेच वर्तन ठेवावे हा नियम.** मनु (२·२१०) प्रभृतींनी असा नियम सांगितला आहे की शिष्याने आपल्या गुरूच्या पत्नीला अथवा अनेक पत्न्यांना गुरूप्रमाणेच मान देण्याची कृत्ये करावी आणि त्यांच्या आज्ञा पालन कराव्या. गुरूची पत्नी अल्पवयी असेल तर वंदन करताना तिचे पाय न धरता तिचे समोर जमिनीवर साष्टांग नमस्कार घालावा. प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात ह्या दुसऱ्या विशेष नियमाचे तत्त्व मान्य केले आहे.

**३४. आपत्काळी उदरनिर्वाह करण्याचे ब्राह्मणाला विहित असलेले मार्ग.**

आपत्काली ब्राह्मणांना अध्यापन, याजन आणि प्रतिग्रह ह्या विहित मार्गांनी द्रव्यप्राप्ती न झाली तर त्यांनी क्षत्रियांना अथवा वैश्यांना विहित असलेली कृत्ये करण्यास गौतम (७·६-७) प्रभृतींनी अनुमती दिली आहे. हे वचन केवल नाममात्र आहे.

**३५. उद्याकरिता काहीही धान्य अथवा धन संचय न करणे.** स्मृतींनी (मनु. ४·७ इत्यादी) ब्राह्मणांचे जे चार प्रकार सांगितले आहेत त्यांत उद्याकरिता काहीही धान्यसंचय न करणारा हा एक असून तो सर्वात श्रेष्ठ मानला आहे. ब्राह्मणाने अत्यंत दारिद्र्यावस्थेत आणि संग्रहबुद्धीचा त्याग करून राहण्याचे ध्येय कलियुगात आवश्यक समजू नये असे प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात सांगितले आहे.

**३६. एकाद्या व्यक्तीला झालेल्या अपत्याला दीर्घ आयुष्य प्राप्त व्हावे ह्या हेतूने करावयाच्या जातकर्म होमाच्या वेळी अग्नि उत्पन्न करण्याकरता लागणाऱ्या अरणीचा स्वीकार करणे.**

अरणी हे पिंपळाच्या लाकडांचे दोन ओंडे असून त्याच्या घर्षणाने (मंथनाने) अग्नि उत्पन्न करण्यात येतो आणि गार्हपत्य अग्नि पेटविते वेळी त्या अग्नीचा उपयोग करण्याचा काही शाखांत प्रघात आहे.

**३७. ब्राह्मणांनी सतत प्रवास करणे.** महाभारतात (शांतिपर्व २३·१५) असे म्हटले आहे की विद्या मिळविण्याकरिता प्रवास न करणाऱ्या ब्राह्मणाला पृथ्वी भक्षण करते. प्रस्तुत वचनात निष्कारण केलेल्या दीर्घ प्रवासाचाच फक्त निषेध केला आहे.

**३८. अग्नी प्रज्वलित करण्याकरिता तोंडाने अग्नीवर फुंकर घालणे.** गौतम (९·३२) मनु, (४·५३) प्रभृतींनी तोंडाने फुंकर घालण्याचा निषेध केला आहे कारण तसे केल्याने मुखातून ओघळणाऱ्या लाळेचे बिंदू अग्नीत पडून अग्नि अपवित्र होण्याचा संभव असतो. वाज. शाखेमध्ये सांगितले आहे की सृष्टीकर्त्याच्या मुखापासून अग्नीची उत्पत्ती झाली असल्याकारणाने श्रौत अग्नि तोंडाने वारा घालून प्रज्वलित करता येतो. (आप. ध. सू. १·५·१५-२० वरील हरदत्ताची टीका). प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात श्रौत अग्नि देखील तोंडाने फुंकर घालून प्रज्वलित करण्याला निषेध केला आहे.

**३९. बलात्कारासारख्या कृत्यामुळे दूषित झालेल्या स्त्रियांशी (त्यांनी प्रायश्चित्त केल्यावर) सामाजिक व्यवहार करणे.** वसिष्ठ (२८·२-३), अत्रि (५·२-३) प्रभृती स्मृतींनी असे सांगितले आहे की अशा रीतीने दूषित झालेल्या स्त्रीचा त्याग न करता तिच्या मासिक रजोदर्शनापर्यंत वाट पहावी आणि काही विशिष्ट प्रायश्चित्ते तिच्याकडून करवावी आणि नंतर ती शुद्ध होते. देवलाने (४८-४९) तर असे सांगितले आहे की अशा स्त्रीला गर्भाधारणा झाली तरीही तिची शुद्धी सांतपन प्रायश्चित्त केल्याने होऊ शकेल. परंतु प्रस्तुत वचनाने अशा स्त्रीने प्रायश्चित्त केल्यानंतर देखील तिच्याबरोबर सामाजिक व्यवहार करण्यास बंदी केल्यामुळे ते वचन त्या निरपराधी आणि अभागी स्त्रीच्या बाबतीत स्मृतींपेक्षाही अधिक निष्ठुरपणाचे आहे.

**४०. संन्याशाने शास्त्रांतील नियमांना अनुसरून शूद्रांसहित सर्व वर्णांच्या लोकांकडे अन्नाची भिक्षा मागणे.** अशी भिक्षा मागण्यास बौधायन (२.१०·६९) प्रभृतींनी परवानगी दिली आहे. परंतु प्रस्तुत वचनात तसे करण्याला बंदी केली आहे.

अनुक्रमणिका

**४१. पावसाचे नवे पाणी दहा दिवसपर्यंत उपयोगात न आणणे.** जमिनीवर सांचलेले पावसाचे नवे पाणी दहा दिवसांनंतर अथवा तीन दिवसानंतर पिण्याकरिता घ्यावे अशी स्मृतिवचने आहेत. (आप. ध. सू. १·५·१५·२ वरील हरदत्ताची टीका). प्रस्तुत वचनात दहा दिवसपर्यंत वाट पहाण्याची गरज नाहीशी केली आहे परंतु तीन दिवसांचा नियम रद्द केलेला नाही.

**४२. ब्रह्मचर्याची मुदत पूर्ण झाल्यावर गुरूने मागितलेली दक्षिणा देणे.** गौतमाने (२·५४-५५) असा नियम सांगितला आहे की विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर विद्यार्थ्याला जे धन देणे शक्य असेल त्याचा स्वीकार करण्याबद्दल त्याने गुरूला विनंती करावी अथवा काय देऊ हे गुरूला विचारावे आणि गुरूने जे काही सांगितले असेल ते करून नंतर गुरूने जाण्यास परवानगी दिल्यावर समावर्तन करावे.

प्रस्तुत वचनात गुरु जे मागेल ते दिले पाहिजे हा नियम रद्द ठरविला आहे. परंतु विद्यार्थ्याने स्वखुषीने दक्षिणा देण्याला प्रतिबंध घातला नाही.

**४३. ब्राह्मणादिकांच्या घरी स्वयंपाक करण्यासारख्या कामाकरिता एकाद्या शूद्राची नेमणूक करणे.** आपस्तंबाने (२·२·३·१-८) असा नियम सांगितला आहे की वैश्वदेवाकरिता लागणारे अन्न विकल्पेकरून शूद्रानेही तयार करण्यास प्रत्यवाय नाही, मात्र त्याच्यावर तीन उच्च वर्णांच्या लोकांची देखरेख असली पाहिजे आणि त्याने शारीरिक आणि कपड्याच्या शुद्धीचे काही नियम पाळले पाहिजेत. प्रस्तुत वचनाने शूद्राला नेमण्याची ही परवानगी काढून घेतली आहे.

**४४. अतिवृद्ध व्यक्तींनी अग्निप्रवेश करून अथवा कड्यावरून उडी घेऊन आत्महत्या करणे.** हे वचन क्र. १३ च्या वचनासारखेच आहे. अशा प्रकारच्या आत्महत्येच्या योगाने काहीही पातक लागत नाही असे अत्रि (श्लो. २१८-२१९) सारख्या स्मृतींनी सांगितले आहे. प्रस्तुत वचनाने अशा प्रकारच्या आत्महत्येचाही निषेध केला आहे.

**४५. गाईची तहान भागविण्यास पुरेल इतक्या पाण्याने शिष्टांनी आचमन करणे.** जमिनीवर साठलेले पाणी जर एकाद्या गाईची तहान भागविण्यास पुरेल इतके असले तर ते शुद्ध असते आणि त्याचा आचमनाकरिता उपयोग करण्यास प्रत्यवाय नाही असे मनु (५·१२८) प्रभृतींनी सांगितले आहे. तथापि आरोग्याच्या दृष्टीने अशा पाण्याचा आचमन करण्यासाठी उपयोग करण्याला प्रस्तुत वचनात निषेध केला आहे.

**४६. सायंकाळी ज्या घराच्या सन्निध एकादा यती असेल त्या घरात त्याने वास्तव्य करणे.** यतीने जेथे कोठे तो सूर्यास्ताच्या वेळी असेल त्याठिकाणी मुक्काम करावा असा जो नियम स्मृतींनी (शंख ७·६) सांगितला आहे तो ह्या वचनाने रद्द ठरविला आहे.

आदित्य पुराणात सांगितलेल्या कलिवर्ज्य गोष्टींचे (एक दोन सोडून) विवेचन वर केले आहे. आता ह्या विषयाचे सामग्रयाने विवेचन करण्याच्या हेतूने इतर ग्रंथांत सांगितलेल्या दुसऱ्या काही गोष्टींचे विवेचन खाली केले आहे :

**४७. संन्यास ग्रहण करणे.** ह्या विषयाचे विवेचन खंड २ मध्ये आले आहे. प्रस्तुत वचनात सांगितल्याप्रमाणे संन्यास कलियुगात सर्वस्वी बंद [यावद्वर्णविभागोस्ति यावद्वेदः प्रवर्तते । तावन्यासोग्निहोत्रं च कर्तव्यं तु कलौ युगे ॥ देवल (निर्णय सिं. ३ पूर्वार्ध पा ३७०).] झालेला नसून आज मितीला देखील सहस्रावधि लोक प्रतिवर्षी संन्यास घेत असतात. निर्णयसिंधूच्या (३ पूर्वार्ध) मते ही बंदी त्रिदंडी संन्यासापुरतीच आहे आणि एकदंडी संन्यासाला नाही. तसे असेल तर मुख्य गोष्टीला महत्त्व न देता बाह्य चिन्हानांच फक्त महत्त्व दिल्यासारखे होते म्हणून ती बंदी निरर्थक आहे.

**४८. अग्निहोत्राचे पालन करणे अथवा तीन अग्नींचे ग्रहण करणे.** निर्णयसिंधु (३· पा. ३७०) प्रभृति निबंधग्रंथांनी असा खुलासा केला आहे की ह्या वचनाने कलियुगात **सर्वाधान** प्रकारच्या अग्निहोत्राला बंदी घातली आहे आणि **अर्धाधान** प्रकारच्या अग्निहोत्राला परवानगी आहे. ज्यावेळी कोणी मनुष्य तीन श्रौत अग्नींची स्थापना करतो त्यावेळी त्याला ती स्थापना आपल्या स्मार्त अग्निमधील अर्धा अग्नि घेऊन करता येते आणि अर्धा अग्नि तसाच ठेवता येतो. ह्या प्रकाराला **अर्धाधान** अशी संज्ञा आहे. त्याने जर आपला स्मार्त अग्नि वेगळा राखून ठेवला नाही तर त्या प्रकाराला **सर्वाधान** असे म्हणतात.

**४९. नरमेध.** तै. ब्रा. (३·४·१-१९) मध्ये नरमेधाचे वर्णन केले आहे. नरमेधामध्ये मनुष्याची प्रत्यक्ष हत्या केली जात नसे आणि ते विधान सांकेतिक स्वरूपाचे असे. हा यज्ञ एकाद्या ब्राह्मणाने अथवा क्षत्रियाने करावयाचा असे. ब्राह्मणादिक बलि देण्याकरिता आणण्यात येऊन त्यांच्यावर काही विधी करून त्यांना निरनिराळ्या देवतांना अर्पण करण्यात येते आणि नंतर यज्ञस्तंभापासून सोडून देण्यात येते आणि बकऱ्यांचे बलिदान करून त्यांच्या मांसाच्या आहुती देण्यात येतात.

प्रस्तुत वचनात कलियुगात हा याग करण्याचा निषेध केला आहे.

**५० अश्वमेध.** अश्वमेध केल्याने ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्ती मिळते असे. तै. सं. (५·३·१२·२) मध्ये सांगितले आहे. ह्याची माहिती खंड २ मध्ये आली आहे. निदान ख्रि. पू. २०० पासून इ. स. च्या १८ व्या शतकात झालेल्या जयसिंग राजापर्यंत अनेक राजांनी अश्वमेध केला असल्याचे इतिहासप्रसिद्ध आहे. बृहन् नारदीय प्रभृति पुराणांनी अश्वमेधाला बंदी केली आहे.

**५१. राजसूय** हा विधी अतिशय भानगडीचा असून तो दोन वर्षे पर्यंत चालतो आणि तो फक्त क्षत्रियालाच करता येतो. ह्याचे वर्णन खंड दोन मध्ये आले आहे. कलिंग सम्राट खारवेलने हा यज्ञ केला असल्याचे शिलालेखावरून (एपि. इं. खं. २० पा. ७९) समजते.

**५२. नैष्ठिक ब्रह्मचर्य.** जे विद्यार्थी आमरणान्त विद्यार्थी म्हणूनच राहत असतात त्यांना नैष्ठिक ब्रह्मचारी अशी संज्ञा आहे. हा जीवनक्रम फार खडतर असतो आणि शरीर दुर्बल असल्याकारणाने अनेक प्रकारचे मोह उत्पन्न होतात. म्हणून बृहन् नारदीय प्रभृति पुराणांनी नैष्ठिक ब्रह्मचर्याला बंदी घातली आहे. कलिवर्ज्यनिर्णय आणि निर्णयसिंधु ह्यांच्या सारख्या ग्रंथात ‘नैष्ठिक’ ह्या शब्दाच्या जागी ‘दीर्घकालं’ असा पाठ घेतला आहे.

**५३. दीर्घकालपर्यंत ब्रह्मचर्य.** बौधायनाने (१·२·१-५) असे सांगितले आहे की प्राचीन काळी वेदाध्ययनाकरिता पालन करावयाच्या ब्रह्मचर्याची मुदत ४८ वर्षे, २४ वर्षे, अथवा प्रत्येक वेदाकरिता १२ वर्षे

अनुक्रमणिका

अथवा प्रत्येक कांडाकरिता निदान एक वर्ष अथवा वेद पाठ होईपर्यंत चालत असे. प्रस्तुत कलिवर्ज्य वचनात गृहस्थाश्रम स्वीकारण्यापूर्वी इतका दीर्घ काल घालविण्याला बंदी केली आहे. काही निबंधग्रंथकारांनी म्हटले आहे की प्रस्तुत वचनात काही विशिष्ट हेतूने नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रत स्वीकारण्याला कलियुगात बंदी केलेली नाही.

**५४. पशुयज्ञ.** मार्कंडेय पुराणात (अपरार्क पा ९२९) पशुयज्ञाला कलियुगात बंदी घातली आहे. तरीही पशुयज्ञ सर्व काळी करण्यात येत होते आणि क्वचित प्रसंगी अद्यापिही करण्यात येतात.

**५५. मद्य.** वेदकाळी सोम हे पेय ऋत्विज पीत असत आणि सुरा हे सामान्य लोकांचे पेय होते. सुरा बहुधा देवांना अर्पण करण्यात येत नसे. पुढे सुरा प्राशन करणे ही गोष्ट पापकारक असल्याचे ब्राह्मण मानू लागले आणि छां. उ. (५·१०·९) मध्ये सुरापान हे पंचमहापातकापैकी एक पातक असल्याचे म्हटले आहे. **मद्य** ही संज्ञा सर्व प्रकारच्या उन्मादक पेयांना सामान्यतः देण्यात येते. सर्व प्रकारची उन्मादक पेये ब्राह्मणांना कोणत्याही आश्रमात निषिद्ध असतात. (मनु ११·९५). परंतु षैष्ठी (म्हणजे तांदुळाच्या पिठापासून केलेल्या सुरे) व्यतिरिक्त इतर उन्मादक पेये क्षत्रियांना आणि वैश्यांना निषिद्ध नसतात असे काही ग्रंथकारांनी (विश्वरूप, मिता, अपरार्क इ०) प्रतिपादन केले आहे. सर्व वर्णाच्या ब्रह्मचाऱ्यांना सर्व प्रकारच्या उन्मादक द्रव्यांपासून अलिप्त राहावे लागे. उन्मादक द्रव्ये शूद्रांना निषिद्ध सांगितलेली नव्हती. अपरार्काने (पा. ६३) उद्धृत केलेल्या ब्रह्मपुराणांतील वचनात म्हटले आहे की उन्मादक पेये कलियुगात तीन वर्णांच्या लोकांना निषिद्ध असून ब्राह्मणांना ती सर्वही युगात निषिद्ध असतात. महाभारतात (आदिपर्व अ. ७६) म्हटले आहे की पहिल्या प्रथम शुक्राचार्यांनी ब्राह्मणांना उन्मादक पेये पिण्याचा निषेध सांगितला.

काही ग्रंथांत (स्मृ. कौ. पा. ४७७; कलिवर्ज्यवि. पृष्ठ ११ ब) आणखी दोन कलिवर्ज्य श्लोक दिले आहेत. त्यांत म्हटले आहे की शपथा, शकून, स्वप्ने, हस्तसामुद्रिक, प्रश्नावरून भविष्य सांगणे ह्यांच्या सारख्या क्वचित प्रसंगी खऱ्या ठरणाऱ्या गोष्टी एकादे फल प्राप्त होण्याच्या इच्छेने कोणीही करू नये. त्याचप्रमाणे दुसरीही काही कृत्ये कलियुगात त्याग करावयाची असतात, कारण लोक अशा कृत्यांचा अधर्मकृत्यांत समावेश करतात.

कोणत्याही प्राचीन स्मृतिग्रंथात कलिवर्ज्याविषयी काहीही सांगितले नाही. विश्वरूप, मेधातिथी, विज्ञानेश्वर ह्यांच्या टीकांत देखील कलिवर्ज्याच्या लांब याद्या दिल्या नाहीत. अशा याद्या पहिल्या प्रथम स्मृत्यर्थसार, हेमाद्री, स्मृतिचंद्रिका ह्या इ.स. च्या १२ आणि १३ व्या शतकांत होऊन गेलेल्या ग्रंथांनी आणि ग्रंथकारांनी सांगितल्या आहेत. ह्यावरून असे अतिशय संभवनीय अनुमान निघते की ह्या कलिवर्ज्य कृत्यांच्या याद्या फार तर इ. स. च्या १० व्या अथवा ११ व्या शतकांइतक्या मागे संकलित करण्यात आल्या असाव्या.

पौर्वात्य लोक प्रगमनशील नसतात असे म्हणणाऱ्यांना कलिवर्ज्य प्रकरण हे अत्यंत समर्पक उत्तर आहे. अत्यंत स्थिर अशा समाजात देखील सामाजिक मते आणि प्रघात मोठ्या प्रमाणात बदलतात. ज्या प्रघातांना (स्वयंप्रामाण्य आणि चिरंतनत्व असल्याचे मानले जाणाऱ्या) वेदांचा आणि आपस्तंब, मनु, याज्ञ. ह्यांच्यासारख्या प्राचीन स्मृतींचा आधार होता, हे प्रघात कालांतराने एकतर टाकून देण्यात आले अथवा लोकांना अनिष्ट वाटू लागले. मोठे मोठे लोक एकत्र जुळले आणि त्यांनी कलियुगात पाळावयाचे धर्म ठरविले ही जी कपोलकल्पित कथा कलिवर्ज्य प्रकरणात वर्णन केली आहे ती धार्मिक आचारांत आणि

नीतिविषयक कल्पनांत फेरफार करण्याकरिता योजलेली एक युक्ती आहे. धर्म (आणि विशेषतः आचारधर्म) कधीही न बदलणारा (अपरिवर्तनीय) असतो अशा मताला चिकटून राहणाऱ्यांना देखील कलिवर्ज्य प्रकरण हे पूर्ण उत्तर आहे. अत्यंत प्रामाण्य असणारी वेदांची आणि प्राचीन ऋषींची आणि धर्मशास्त्रकारांची वचने प्रचलित लोकमताच्या विरुद्ध असल्यामुळे कशी बाजूला सारण्यात आली आणि बंधनकारक नसल्याचे ठरविण्यात आले ही गोष्ट कलिवर्ज्य प्रकरणावरून अचूक रीतीने दिसून येते आणि आधुनिक हिंदु समाजात विवाह, वारसा इत्यादी बाबतींत सुधारणा करण्याची इच्छा असणाऱ्यांच्या हातात कलिवर्ज्य प्रकरणाने एक प्रभावी शस्त्र मिळते. कलिवर्ज्य प्रकरणात निषिद्ध मानल्या असूनही आपल्या मातुलाच्या कन्येबरोबर विवाह करणे, संन्यास ग्रहण करणे, अग्निहोत्र धारण करणे आणि (क्वचित प्रसंगी) श्रौत पशुयाग देखील करणे ह्यांच्या सारख्या काही गोष्टी अजून कशा प्रचलित आहेत हेही दिसून येते.

-----

अनुक्रमणिका

# प्रकरण ९४

## आधुनिक काळच्या भारतातील कायद्यांत रूढीचे स्थान

(मू. ग्रं. पा. ३.९६९-९७३)

भारतातील सध्याच्या कायद्यात रूढीचे काय स्थान आहे ह्या विषयाचे सविस्तर विवेचन करणे प्रस्तुत ग्रंथाच्या कक्षेबाहेरचे असले तरी आधुनिक काळातील रूढींच्या बाबतीत काही थोडेसे विवेचन केल्यास ती गोष्ट अगदीच अनुचित होणार नाही. ब्रिटिशांनी भारतात राजकीय सत्ता संपादन करण्यास आरंभ केला त्यावेळी भारतातील लोक रूढींना कसे महत्त्व देतात ह्या गोष्टीची जाणीव त्यांना झाली आणि इ. स. १७५३ पासून त्यांनी केलेल्या कायद्यांत हिन्दुस्थानातील लोकांच्या बाबतीत त्या लोकांचे स्वतःचे कायदेकानू आणि रूढि ह्याच चालू ठेवाव्या अशी तरतूद करण्यात आली. मनू (७·२०३) आणि याज्ञ. (१·३४३) ह्यांनी विजेत्यांने जित राष्ट्राशी कसे वागावे ह्याविषयी असेच नियम सांगितले आहेत आणि ब्रिटिश राज्यकर्त्यांना त्या नियमांची माहिती नव्हती तरी त्यांनी केलेली वरील तरतूद अजाणता त्या नियमांना अनुसरून अशीच झाली. इ. स. १७८१ मध्ये इंग्लिश पार्लमेंटने पास केलेल्या कायद्याच्या प्रस्तावनेत तो कायदा करण्याचा हेतु बंगाल, बिहार आणि ओरिसा प्रांतांच्या रहिवाशांच्या स्वतःच्या कायद्यांचे, रूढींचे, अधिकारांचे आणि सवलतींचे पालन आणि संरक्षण केले जावे हा असल्याचे सांगितले आहे. त्या कायद्यात सांगितलेल्या नियमांत असा एक नियम आहे की कलकत्ता येथील मुसलमान रहिवाशांचे बाबतीत त्यांच्या जमिनी, मक्ते, मालमत्ता ह्यांच्या वारसाहक्काबद्दलच्या सर्व वादांचा तसेच मुसलमान मुसलमान ह्यांच्या दरम्यानचे करार आणि इतर व्यवहार ह्यांच्याबद्दलच्या वादांचा निर्णय मुसलमानांच्या कायद्यांना आणि रूढींना अनुसरून करण्यात यावा; त्याचप्रमाणे मुसलमानेतर रहिवाशांच्या वादांचा निर्णय त्या त्या लोकांच्या कायद्यांना आणि रूढींना अनुसरून करण्यात यावा आणि ज्यावेळी एकाद्या वादातील एक पक्षकार मुसलमान आणि दुसरा पक्षकार मुसलमानेतर असेल त्यावेळी अशा वादांचा निर्णय प्रतिवादीच्या कायद्यांना आणि रूढींना अनुसरून करण्यात यावा. ह्या नंतर केलेल्या अनेक कायद्यांत असा एक नियम सांगितला आहे की वारसा, विवाह, जाती, धार्मिक संस्था ह्यांच्यासारख्या विषयांसंबंधीच्या वादांचा निर्णय उभय पक्षकारांच्या अथवा प्रतिवादीच्या रूढींना अनुसरून करावा.

एकादी रूढि अधिकृत आहे असे सिद्ध करण्याकरिता ती रूढि अज्ञात काळापासून चालत आली आहे अथवा प्राचीन काळची आहे, सर्वत्र एकाच स्वरूपात चालत आहे, ती सयुक्तिक आहे, सर्वांना बंधनकारक आहे असे सिद्ध केले पाहिजे आणि अशी रूढि अनैतिक स्वरूपाची अथवा सार्वजनिक हिताला विरोधी अथवा प्रचलित कायद्याच्या एकाद्या स्पष्ट नियमाच्या विरुद्ध अशी असता कामा नये. ती रूढी प्राचीन काळापासून चालत आलेली असली पाहिजे ह्याचा अर्थ ती लोकांना आठवत नाही इतक्या मागील काळची असली पाहिजे असा होत नाही. लोकांच्या आठवणीतील काळ ह्याचा अर्थ मिताक्षरेने (याज्ञ. २·२७) एकाद्या वस्तूच्या ताब्याच्या बाबतीत १०० वर्षे असा केला आहे, परंतु कात्यायन (अपरार्क पा ६३६) आणि व्यास (स्मृ. चं. २ पा. ७५) ह्यांनी **स्मार्त** (म्हणजे आठवणीचा) काळ म्हणजे ६० वर्षे असे सांगितले आहे. एकादी रूढी २०,३०,८० अथवा ९० वर्षे इतक्या काळपर्यंत अस्तित्वात असल्याचा पुरावा असला तरीदेखील ती रूढी प्राचीन असल्याचे अनुमान न्यायाधीश करू शकतात आणि अशा अनुमानाच्या विरुद्ध पुरावा प्रतिपक्षाकडून दाखविण्यात आला नाही तर अशी रूढि प्राचीन आणि अधिकृत असल्याचे ठरवू [परमोत्तम वि.

वेणीचंद, ४५ मुंबई ७५४, ७६७.] शकतात. काही काही प्रसंगी एकाद्या रूढीच्या अस्तित्वाचा प्रत्यक्ष दाखला देण्याची आवश्यकता नसल्याचे मानून ज्यांना त्या रूढीची माहिती असणे शक्य आहे अशा लोकांच्या मतांना अधिक महत्त्व देण्यात येते, मग त्या लोकांना अशा रूढींची प्रत्यक्ष उदाहरणे देता आली नाही तरी चालते. एके वेळी प्रचलित असणाऱ्या काही काही रूढि विशेषतः एकाद्या कुलात चालत आलेल्या रूढि एकाद्या आकस्मिक घटनेमुळे, लोकमतात परिवर्तन झाल्यामुळे अथवा त्या कुलातील लोकांच्या एकविचाराने नष्ट होण्याचा संभव असतो. रूढींचा अंमल काटेकोरपणे करणे अवश्य असते. एकादी रूढि प्रचलित असलेल्या ठिकाणच्या परिस्थितिसारख्याच दुसऱ्या ठिकाणच्या परिस्थितीत तशीच रूढि असेल असे ठरविता येत नाही, किंवा रूढीचे अस्तित्व सिद्ध करण्याच्या कामी तर्कशास्त्राचा उपयोग करता येत नाही. उदाहरणार्थ, एका जातीत मामाच्या मुलीबरोबर केलेला विवाह रूढीला अनुसरून मान्य करण्यात येतो एवढ्यावरून त्याच जातीत मावशीच्या अथवा आतेच्या मुलीबरोबर केलेला विवाह मान्य करण्यात येईलच असे निश्चयपूर्वक म्हणता येत नाही. एकाद्या रूढीच्या अस्तित्वाबद्दल द्यावयाचा पुरावा अशा स्वरूपाचा असला पाहिजे की त्यावरून ती रूढी एकाच निश्चित स्वरूपात आणि सतत चालत आली असल्याचे, ती रूढि पाळणाऱ्यांना आपण कायद्याला धरून चालत आहो असे वाटत असल्याचे आणि त्या रूढीप्रमाणे चालणे आवश्यक आहे असे वाटत असल्याचे सिद्ध झाले पाहिजे आणि अशी रूढि केवळ लोकांच्या सवयीवरून अथवा दुसऱ्याच्या अनुकरणाने अथवा अज्ञानाने अथवा आपसात करार करून अस्तित्वात आलेली नसली पाहिजे. कोणतीही रूढि गैरवाजवी स्वरूपाची नसली पाहिजे. एकाद्या देवालयाचा उपयोग आणि त्यातील मूर्तीची पूजा एका विशिष्ट जातीच्या लोकांनाच करता येईल (इतर जातीच्या लोकांना करता येणार नाही) अशी रूढि भारतात आधुनिक काळी सुशिक्षित लोकांना चीड आणणारी वाटली तरी गैरवाजवी स्वरूपाची नसल्याचे ठरविण्यात आले होते.

कोणतीही रूढि नीतिविरुद्ध नसली पाहिजे. एकादी रूढि, अनैतिक स्वरूपाची असल्याचे ठरविताना सर्व समाजाच्या मताचा विचार केला पाहिजे. मुंबई येथील वरिष्ठ न्यायालयाने [केशव वि. बाई गंदी, ३९ मुंबई ५३८, ५४३.] असे ठरविले होते की, एकादा विवाह पतीची संमती न घेता रद्द ठरविण्याचा आणि अशा स्त्रीला दुसरा विवाह करण्याची परवानगी देण्याचा जातीच्या लोकांना अधिकार नसतो. काही जातीत खड्गविवाहाची रूढी आहे. ब्रह्मपुराणात (अध्याय १११·१५ आणि ४४-४६) ह्या प्रकारच्या विवाहाची रूढि क्षत्रियांत असल्याचे म्हटले आहे. आधुनिक काळी कट्यारीबरोबर अथवा तलवारीबरोबर केलेला विवाह शूद्रांच्या बाबतीत देखील कायदेशीर [कोल्हापूरचे महाराज वि. सुंदरम् ४८ मद्रास १.] मानला जात नाही.

भारतातील मध्यवर्ती आणि प्रांतिक सरकारच्या कायद्यांनी अनेक रूढि अथवा प्रघात स्पष्टपणे मना केले आहेत. उदाहरणार्थ, सती, कन्या अपत्याचा नाश, गुलामगिरी, काही विशिष्ट वयाहून कमी वय असणाऱ्या मुलामुलींचे विवाह, देवालयांना अथवा देवतांच्या मूर्तींना देवदासी म्हणून स्त्रिया अर्पण करणे. अशी स्थिती असल्याकारणाने अशा कायद्यांच्या विरुद्ध असणारी रूढी आमच्या जातीत अस्तित्वात असल्याची कोणाचीही सबब न्यायालयात मान्य करण्यात येणार नाही. मुंबई प्रांतात एकाद्या यजमानाने वतनदार जोशाला धार्मिक विधी करता न बोलावता दुसऱ्या कोणाकडून काम करून घेतले तर त्या वतनदार जोशाला त्या यजमानावर फिर्याद करून त्या विधीबद्दलची वाजवी दक्षिणा वसूल करून घेता येत असे आणि ज्या दुसऱ्या मनुष्याने वतनदार जोशाऐवजी असे धार्मिक विधी चालविले असतील त्याच्याजवळून नुकसानी वसूल करता येत असे. परंतु इ.स. १९२६ च्या मुंबईच्या ११ व्या कायद्याने आता तसे करण्याला बंदी घातली आहे आणि त्यामुळे वरील स्वरूपाचे दावे आता वतनदार जोशांना मुंबई प्रांतात करता येणार नाहीत.

अनुक्रमणिका

एके वेळी प्रचारात असलेल्या रूढि आणि प्रघात कसे बंद होतात अथवा स्थगित केले जातात ही गोष्ट कलिवर्ज्य प्रकरणावरून चांगल्या रीतीने दिसून येते. ज्या रूढींचा कायद्याशी संबंध येतो त्यांच्या बद्दलचे विवेचन वर करण्यात आले आहे.

अनुक्रमणिका